# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

## Vol. 18

## PART 2

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

## खंड १८

## भाग २




# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे

## भाग २

## १९३७ ते १९४५




डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
शिक्षण विभाग,
महाराष्ट्र शासन
२०१६

**Dr. BABASAHEB AMBEDKAR**
**WRITINGS AND SPEECHES**

*Published Volumes*

**Vol. 1**
*Pages 520, Rs. 40.00*
Castes in India and 11 other essays.
1st Edi. 1982, 2nd Edi. 1989.
3rd Edi. 2010, 4th Edi. 2016.

**Vol. 2**
*Pages 826, Rs. 80.00*
Dr. Ambedkar In the Bombay Legislature, with the Simon Commission and at the Round Table Conferences- 1927 to 1939.
1st Edi. 1982, 2nd Edi. 2005.

**Vol. 3**
*Pages 508, Rs. 40.00.*
Philosophy of Hinduism, India and the Pre-requisites of Communism.
Revolution and Counter-Revolution.
Buddha or Karl Marx.
1st Edi. 1987.

**Vol. 4**
*Pages 368, Rs. 35.00*
Riddles in Hinduism.
1st Edi. 1987, 2nd Edi. 1996.

**Vol. 5**
*Pages 496, Rs. 40.00*
Essays on Untouchables and Un-touchability.
1st Edi. 1989, 2nd Edi. 2016

**Vol. 6**
*Pages 712, Rs. 55.00*
The Evolution of Provincial Finance In British-India.
The Problem of the Rupee.
1st Edi. 1989.

**Vol. 7**
*Pages 390, Rs. 40.00*
Who were the Shudras ? The Untouchables.
1st Edi. 1991, 2nd Edi. 2016.

**Vol. 8**
*Pages 510, Rs. 40.00*
Pakistan or the Partition of India.
1st Edi. 1990.

**Vol. 9**
*Pages 500, Rs. 50.00*
What Congress and Gandhi have Done to the Untouchables.
Mr. Gandhi and the Emancipation of the Untouchables.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2015.

**Vol. 10**
*Pages 1080, Rs. 95.00*
Dr. Ambedkar As Member of the Governor General's Executive Council 1942-46.
1st Edi. 1991, 2nd Edi. 2016.

**Vol. 11**
*Pages 620, Rs. 70.00*
The Buddha and His Dhamma.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2010.

**Vol. 11 (Supplement)**
*Pages 45, Rs. 10.00*
The Buddha and His Dhamma.
1st Edi. 1995.

**Vol. 12**
*Pages 794, Rs. 95.00*
Unpublished Writings.
Ancient Indian Commerce, Notes on Laws Waiting for a Visa.
Miscellaneous Notes etc.
1st Edi. 1993.

हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधी पुष्कळ गैरसमज रूढ आहेत. पुष्कळ विद्वान इतिहासकारांनी म्हटले आहे की, हिंदुस्थानात राजकारणाचा काही गंधच नव्हता. प्राचीन भारतीयांनी केवळ तत्त्वज्ञान, धर्म व अध्यात्म याविषयी लिहिण्याकडेच लक्ष दिले होते व ते इतिहासापासून, राजकारणापासून साफ अलिप्त होते. असेही म्हणतात की, हिंदी जीवन व समाज एका ठरावीक पोलादी चौकटीमध्येच फिरत आहेत व त्या चौकटीचे वर्णन केले की इतिहासकाराचे काम संपले ! हिंदुस्थानचा प्राचीन काळचा इतिहास अभ्यासल्यानंतर माझे मत मात्र ह्या विद्वानाहून अगदी निराळे बनले आहे. ह्या अभ्यासात मला आढळून आले आहे की, जगात कुठल्याही देशात हिंदुस्थानसारखे प्रचंड गतिमान राजकारण नव्हते आणि हिंदुस्थान हा बहुधा एकच देश असा आहे की जेथे जगात दुसरीकडे कोठेही दिसली नाही अशी क्रांती घडून आली होती.

हिंदी इतिहासाच्या विद्यार्थ्यांनी एक मूलभूत गोष्ट-ज्याचा इतिहासकारांना साफ विसर पडलेला दिसतो-नेहमी ध्यानात घेतली पाहिजे, ती म्हणजे प्राचीन हिंदुस्थानात घडलेला बौद्ध व ब्राह्मण यामधील लढा. याचा इतिहास काही प्रोफेसरांनी म्हटल्याप्रमाणे हा केवळ एखादा पंथामधला मामुली लढा नव्हता. सत्य म्हणजे काय यासाठी तो लढा होता. — (पृ. क्र. ४६१)

— डॉ. बाबासाहेब आंबेडकर



मनुष्याच्या अंगी जितके नैतिक बल अधिक असेल तितका त्याचा आत्मविश्वास वाढत जाऊन पराजयातूनही त्याला शेवटी सन्मानाचे यश मिळविता येते.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर




# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

## Vol. 18

## PART 2

डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

खंड १८

भाग २

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

## भाग २

## १९३७ ते १९४५

संपादक

वसंत मून

हरी नरके

प्रा. अशोक गोडघाटे

प्रा. डॉ. म. ल. कासारे

एन. जी. कांबळे

द्वितीय आवृत्ती

प्रा. अविनाश डोळस

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती, महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१.

Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches Vol. 18, Part 2 (Dr. Babasaheb Ambedkar Yanchi Bhashane) Marathi book, Edited by Vasant Moon, Hari Narke, Ashok Godghate, M. L. Kasare, N. G. Kamble, for Dr. Babasaheb Ambedkar, Source Material Publication Committee, Govt. of Maharashtra, Barrack No. 18, Opp. Mantralaya, Mumbai–400 021. INDIA.

**First Edition** - 15th October 2002.

**प्रथमावृत्ती :** १५ ऑक्टोबर २००२
(धम्मचक्र प्रवर्तन दिन)

**प्रती :** ३०,०००

**Second Edition** - 14th April 2016.

**द्वितीय आवृत्ती :** १४ एप्रिल २०१६

**प्रती :** १,००,०००



**प्रकाशक :**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८,
मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०२१.



**मूल्य :** १०० रुपये

**मुद्रक :**
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.

मुख्यमंत्री
महाराष्ट्र




Chief Minister
Maharashtra
५ मे २०१६

# शुभेच्छा

महाराष्ट्र शासनाच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समितीतर्फे खंड १८ - डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे भाग-१, भाग-२ आणि भाग-३ यांचे प्रकाशन करण्यात येत आहे.

या खंडात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जानेवारी १९४६ ते २० मे १९५६ या कालावधीत ठिकठिकाणी केलेल्या भाषणांचे संकलन आहे. विशेषत: या भाषणांमध्ये निवडणुकीच्या प्रचार सभांपासून ते त्यांच्या सत्कारापर्यंतच्या प्रसंगानिमित्त व्यक्त केलेल्या विचारांचा समावेश आहे. ही भाषणे बहुतांशी प्रासंगिक स्वरूपाची असली तरी त्यातून बाबासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू उलगडतात. त्याचबरोबर या भाषणांमधून त्यांचा प्रचंड व्यासंग आणि सखोल चिंतनाची प्रचिती येते. धम्मासारखा गहन विषयही ते अतिशय सोप्या आणि सुव्यवस्थित पद्धतीने स्पष्ट करतात.

मराठी वाचकांसाठी हे खंड विशेष महत्त्वाचा आहेत, कारण यापूर्वी प्रसिद्ध झालेले खंड हे इंग्रजी भाषेत असल्याने काही वाचकांची अडचण होत होती. या खंडाने बाबासाहेबांचे विचार वाचकांना त्यांच्या मातृभाषेतून वाचावयास मिळणार आहेत, हे प्रशंसनीय आहे.

(देवेंद्र फडणवीस)

मंत्री,
शालेय शिक्षण, क्रीडा व युवक कल्याण,
उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण,
मराठी भाषा, सांस्कृतिक कार्य,
महाराष्ट्र शासन




मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
www.maharashtra.gov.in
दिनांक : ११ मार्च २०१६.

# शुभ संदेश

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जीवन, विचार व त्यांची शिकवण प्रेरणादायी आहे. प्रभावी व्यक्तिमत्त्व, निकोप विचार व कार्याप्रतीची निष्ठा यांच्या बळावर डॉ. आंबेडकरांनी त्यांच्या अनुयायांच्या जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले. सर्व क्षमतांनिशी जीवनात यशस्वी होण्याची ऊर्मी त्यांनी निर्माण केली.

भारताच्या सामाजिक व राजकीय संरचनेच्या उद्धारासाठी डॉ. आंबेडकरांनी दिलेले महान योगदान शब्दांत वर्णन करणे कठीण आहे; परंतु त्यांनी आखून दिलेल्या मूल्यांचे प्रामाणिकपणे आचरण करणे आपल्या हातात आहे. जेणेकरून डॉ. आंबेडकरांनी आजीवन ज्या भारताचे स्वप्न पाहिले ते प्रत्यक्षात नक्की साकार होईल.

१९४६-१९५६ या कालावधीत डॉ. आंबेडकरांची भाषणे, त्यांनी वेळोवेळी व्यक्त केलेले विचार यांचे सार या आपल्या खंडात आपल्या मातृभाषेत मराठीत मांडलेले आहे. मला खात्री आहे की, वाचकांना, विशेषत: युवकांना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांमधून प्रेरणा देण्यास हे पुस्तक मोलाची भूमिका बजावेल. जेणेकरून आपली युवापिढी जीवनात उमेदीने यशस्वी वाटचाल करू शकेल.

धन्यवाद.

आपला,

( विनोद तावडे )

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | -- | मा. ना. श्री. विनोद तावडे,<br>मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण. |
| उपाध्यक्ष | -- | मा. ना. श्री. रवींद्र वायकर,<br>राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण. |
| सदस्य | -- | ॲड. श्री. प्रकाश आंबेडकर |
| सदस्य | -- | श्री. रामदास आठवले |
| सदस्य | -- | प्रा. जोगेंद्र कवाडे |
| सदस्य | -- | डॉ. जनार्दन वाघमारे |
| सदस्य | -- | श्री. नितीन राऊत |
| सदस्य | -- | डॉ. आ. ह. साळुंके |
| सदस्य | -- | डॉ. बाबा आढाव |
| सदस्य | -- | प्रा. जनार्दन चांदूरकर |
| सदस्य | -- | श्री. टी. एम. कांबळे |
| सदस्य | -- | श्री. लक्ष्मण माने |
| सदस्य | -- | डॉ. जयसिंग पवार |
| सदस्य | -- | प्रा. रमेश जाधव |
| सदस्य | -- | श्री. एन. जी. कांबळे |
| सदस्य | -- | प्रा. डॉ. एम. एल. कासारे |
| सदस्य | -- | प्रा. डॉ. रावसाहेब कसबे |
| सदस्य | -- | प्रा. दत्ता भगत |
| सदस्य | -- | प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण. |
| सदस्य | -- | संचालक, शासकीय मुद्रण,<br>लेखनसामग्री व प्रकाशने |
| निमंत्रक | -- | संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे |
| सदस्य सचिव | -- | प्रा. अविनाश डोळस |

# द्वितीय आवृत्तीच्या निमित्ताने

या खंडाची प्रथम आवृत्ती ही १५ ऑक्टोबर २००२ ला प्रकाशित झाली, तेव्हापासून या ग्रंथाची मागणी जनतेकडून सातत्याने होत आहे, ही बाब लक्षात घेऊन या खंडाची द्वितीय आवृत्ती प्रकाशित करावी, असे समितीने ठरविले व त्यानुसार ही द्वितीय आवृत्ती आपल्यासमोर येत आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे लेखन हे बहुसंख्येने इंग्रजी भाषेत आहे. मराठीपेक्षाही त्यांचे सर्व महत्त्वाचे ग्रंथ हे इंग्रजी भाषेत लिहिलेले आहेत, त्यामुळे बाबासाहेबांच्या ग्रंथाला जगभरातील वाचकवर्ग लाभला; परंतु इंग्रजी भाषेशी ज्याचे फारशे देणे-घेणे नाही अशा मराठी भाषकाला मात्र ते समजून घेणे दुरापास्त होते. बाबासाहेबांची चळवळ ही जिवंत होती व या चळवळीचा एक महत्त्वाचा भाग म्हणून बाबासाहेब अनेकदा लोकांना मार्गदर्शन करीत असत. सभा ही त्या काळातील लोकप्रबोधन व लोकजागृतीचे मोठे माध्यम होते. भाषण हे त्यातील सर्वात महत्त्वाचे माध्यम होते. बाबासाहेब हे जसे लेखक म्हणून ओळखले जात तेवढेच ते वक्ते/व्याख्याते म्हणूनही लोकप्रिय होते. 'पुढारी' हा एक रोल त्यांनी केला. पुढाऱ्याच्या शब्दाला त्याकाळी वजन होते. त्यांच्या शब्दाशब्दांतून व्यक्त झालेला विचार त्यांच्या अनुयायांचा एक जीवनमार्ग ठरत होता. हे सारे प्रत्यक्ष घडत होते त्याचे माध्यम होते भाषण- आणि ही भाषणे मराठी भाषेत होत होती. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जेवढे ज्ञान त्यांच्या ग्रंथात मांडले होते तेवढेच ते भाषणकृतीतून आपल्या जनतेसाठी मराठीतून व्यक्त केले आहे. या भाषणात प्रश्नांची केलेली मांडणी, ती सोडविण्यासाठी करावयाचे उपाय व त्यासाठी करावी लागणारी कृती असा त्रिवेणी संगम झाला आहे. हे एकप्रकारचे विलक्षण असे नाट्य आहे. त्याचा प्रत्यय आपल्याला त्यांच्या या तीनशे एकावन्न भाषणांतून आल्याशिवाय राहत नाही. या भाषणांचा हा ऐवज एकत्र करून संपादक मंडळीने आपल्यासमोर ठेवला आहे. ही धनसंपत्ती आहे, हे ज्ञानभांडार या खंडाद्वारे मराठी वाचकांसमोर ठेवले आहे.

या खंडाचे तीन भाग कालानुक्रमे केले आहेत. पहिल्या भागात इ. स. १९२० ते १९३६ हा काळ घेतला आहे. एकूण ९६ भाषणांचे संकलन या भागात केले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बहुतेक महत्त्वाच्या भाषणांचा अंतर्भाव त्यात आहे. विशेषत: १९२७ च्या महाडच्या सत्याग्रहाच्या वेळचे भाषण, १९३० च्या गोलमेज परिषदेतील भाषण, १९३५ चे येवला येथील धर्मांतर घोषणेचे भाषण व सर्वात महत्त्वाचे १९३६ चे मुंबई येथील 'मुक्ती कौन पथे' हे भाषण. या भाषणांचा समावेश या भागात केलेला आहे. आंबेडकर चळवळीची मूलभूत भूमिका व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा नवसमाज नवनिर्मितीचे प्रारूप या भाषणातून आपल्याला पाहावयास मिळते. बाबासाहेबांचे विचार समजून घ्यावयाचे असल्यास या चार भाषणांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. यातील बहुतेक भाषणे लिखित स्वरूपाची असून मूलभूत विचार मांडणारी आहेत. आंबेडकर चळवळीची भूमिका व स्वरूप या भाषणामधून स्पष्ट होते. केवळ अस्पृश्यता निर्मूलन एवढेच या चळवळीचे ध्येय कधीच नव्हते. मानवमुक्तीचा लढा म्हणून या चळवळीकडे पाहिले जाते. भेदभावाच्या पलीकडे जाणारा समाजनिर्मिती हा उद्देश या चळवळीचा होता व आहे, हे यातून स्पष्ट होते. एकसंध भारत निर्मितीसाठी करावयाच्या प्रक्रियेचा तो एक ऐतिहासिक लढा होता, असे म्हणावे लागेल. १९३० ला नागपूरला केलेल्या दि ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस कॉंग्रेस परिषदेच्या भाषणातून एकसंध भारत व राजकीय सत्ताप्राप्तीचा आपला उद्देश बाबासाहेबांनी अधोरेखित केलेला आहे. यादृष्टीनेही मराठीत उपलब्ध असलेल्या या भाषणाचे विशेष महत्त्व आहे.

या लिखित भाषणाशिवाय इतरत्र दिलेली भाषणे ही प्रसंगानुरूप आहेत. त्यात विशेषत: १९३७ च्या प्रांतीय निवडणूक प्रचाराची भाषणे आहेत. या भाषणातून भारतात येऊ पाहणारी लोकशाही पद्धतीची तोंडओळख व तिचे महत्त्व विशद केलेले दिसते. स्वतंत्र मजूर पक्ष हा सर्व श्रमजीवींचे प्रतिनिधित्व करीत असून तो या लोकशाही पद्धतीत किती महत्त्वाची भूमिका पार पाडीत आहे व एका विरोधी पक्षाची भूमिकाही सत्ताधारी पक्षाइतकीच जबाबदारीची व महत्त्वाची असते, हे लोकशाही प्रशिक्षणही त्यातून देतात. निवडणूक प्रचार हा भावी लोकशाही पद्धती स्वीकार याची मनोभूमिका बनविण्यासाठी त्यांनी

कार्य केल्याचे आपणास दिसून येते. याशिवाय काही भाषणे ही बौद्ध धम्माची ओळख व महत्त्व सांगणारी अशा स्वरूपाची आहेत. धर्मांतरापूर्वीची भाषणे ही प्रस्थापित हिंदुधर्म सुधारणेच्या मर्यादा स्पष्ट करणारी व त्यातून मुक्त होण्यासाठी धर्मांतराची आवश्यकता प्रतिपादन करणारी आहेत. याचबरोबर बौद्ध धर्माची मूल्ये कोणती आहेत व त्यात समता, बंधुभाव व स्वातंत्र्य या त्रयींचा पाया कसा आहे, तो मानवमुक्तीसाठी किती आवश्यक आहे हे सांगणारे आहेत. काही भाषणे ही धर्मांतरानंतरची आहेत. यात वाराणसी, सारनाथ येथील भाषणांचा समावेश आहे. त्याचबरोबर धम्मदीक्षा या ऐतिहासिक घटनेच्या वेळी केलेले ऐतिहासिक भाषण व खाटमांडू येथे केलेले बौद्ध धर्म व मार्क्सवाद या विषयावर ऐतिहासिक भाषण केलेले आहे. धम्माचा मूलभूत विचार, त्याचे प्रयोजन, तो जीवनमार्ग व्यतित करताना पूर्वसंस्कारातून येणाऱ्या विसंगत कल्पना, रुढी यांचा धोका या साऱ्यांना तात्त्विक व व्यावहारिक पातळीवर केलेला विचार महत्त्वाचा आहे. विसाव्या शतकातील मार्क्सचे तत्त्वज्ञान व त्यातून झालेली रशियन क्रांती यामुळे कुठल्याही तत्त्वज्ञानाला त्यांच्याशी असलेले साम्य आणि वेगळेपण स्पष्ट करणे आवश्यक झाले होते. खाटमांडूच्या बौद्ध परिषदेत बाबासाहेबांनी केलेली बुद्ध व मार्क्सची तुलना यादृष्टीने महत्त्वाची आहे. या भाषणात बौद्ध धम्मात शोषणाचा विचार मार्क्सपेक्षा अधिक खोलवर जाऊन केल्याचा दावा केला आहे. एका दृष्टीने मार्क्सच्या विचारांशी साम्य सांगत बौद्ध धम्ममार्ग हा साम्यवादापेक्षा किती व्यापक आहे याची जाणीव त्यांनी करून दिली आहे. परिवर्तनाचा मार्ग धम्म असल्याची प्रचिती त्यातून येते. ही दोन्ही भाषणे खंडाच्या तिसऱ्या भागात समाविष्ट केली आहेत.

दुसऱ्या भागात दोन ऐतिहासिक भाषणे आहेत. ही भाषणे लिखित स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यापैकी १९३८ चे मनमाड येथील रेल्वे कर्मचारी परिषदेतील आहे. जाती व्यवस्थेत श्रम करणारा वर्ग एकत्र आला तरी त्याचे काही प्रश्न वेगळे राहतात व त्यामुळे त्याला स्वत:चे संघटन करणे क्रमप्राप्त कसे होते याचे विवेचन करीत कर्मचारी हा राजकीय उद्दिष्टे साध्य करण्यासाठी कसा उपयोगी असतो याची जाणीव त्यांनी कर्मचारीवर्गास करून दिली आहे. त्याबरोबरच आपली लढाई ही व्यवस्था परिवर्तनाची कशी आहे, हे सांगून

शेटजी-भटजी संस्कृती नष्ट करणे हे आपल्या चळवळीचे उद्दिष्ट कसे आहे हे समजावून सांगितले आहे. १९४२ साली दलित वर्ग परिषद नागपूर येथे झाली. या परिषदेस मार्गदर्शन करताना लोकशाही जिवंत असणे किती आवश्यक आहे याचे विवेचन केले आहे.

तिसऱ्या भागात धम्मदीक्षेच्या वेळचे भाषण हे आंबेडकरी चळवळीचे सार आहे, असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. अस्पृश्यतेच्या गर्तेतून बाहेर पडण्यासाठी धर्मांतर हा एकमेव मार्ग असल्याचे त्यांनी यापूर्वी अनेकदा स्पष्ट केले आहे. १९२० ते १९५६ हा प्रवास एका क्रांतीचा प्रवास म्हटला पाहिजे. 'मुक्ती कौन पथे' ची परिपूर्ती दिनांक १४ ऑक्टोबर १९५६ ला झाली आहे. यावेळी त्यांनी केलेले भाषण हे जसे भारतीयांसाठी महत्त्वाचे आहे, तसेच जगभरातील मुक्ती इच्छुकांसाठीदेखील मार्गदर्शक आहे. परंपरेतून बाहेर पडताना इतिहासाची साक्ष देत स्वाभिमानाबरोबरच नीतीचा आधार देत अनुयायांना त्यांनी पुनर्जीवित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचा हा प्रयत्न यशस्वी झाल्याचे आज दिसते आहे.

या सर्व भाषणांमध्ये व लेखनांमध्ये दोन सूत्रे मांडली गेली आहेत. एकतर इतिहासाची पुनर्मांडणी त्यांनी केली आहे. इतिहासाचे पुनर्लेखन व पुनर्आलेखन मांडले आहे. भारतीय इतिहास हा नाग व आर्य यांचा संघर्ष आहे. दुसऱ्या शब्दात मांडायचा झाल्यास हा संघर्ष दोन विचारधारांतील आहे. बौद्ध धम्म व ब्राह्मण यांच्या संघर्षाचा हा इतिहास असल्याचे त्यांनी मांडले आहे. त्याचबरोबर जाती-वर्ण व्यवस्था नष्ट केल्याशिवाय नव्या मूल्यांवर आधारित नवसमाज निर्माण होणार नाही यासाठी समता, बंधुता, स्वातंत्र्य या मूल्यांवर आधारित समाज निर्माण केल्याशिवाय येथे मानवास मुक्तता मिळणार नाही, हे स्पष्ट केले आहे. यासाठी भारतीयांनी नवसमाज निर्मितीच्या कामाला लागले पाहिजे, हा त्यांचा आग्रह कायम आहे. भारत बौद्धमय करण्याचे त्यांचे हे स्वप्न आपल्याला येथे दिसून येते.

बाबासाहेबांचे अखेरचे भाषण हे दिनांक २५ नोव्हेंबर १९५६ रोजी महाबोधी सोसायटीने आयोजित केलेल्या स्वागत समारंभाचे आहे. बुद्धांचे पहिले प्रवचन

ज्या स्थळी झाले त्या धम्मके स्तूपाच्या सान्निध्यात बाबासाहेबांचे अखेरचे भाषण सारनाथ येथील मूलगन्ध कुटी विहाराच्या मैदानात झाले. भिक्खू धर्मरक्षिताने या घटनेचा संदर्भ भगवंताच्या पाहिल्या प्रवचनाशी जोडला आहे, हे विशेष !

संपादकाने ही सर्व भाषणे मुख्यत: बाबासाहेबांनी चालविलेल्या मुखपत्र 'जनता'तून घेतल्याचे नमूद केले आहे व त्या-त्या भाषणाचा स्रोतही दिला आहे. या खंडाच्या तीन भागात कालानुक्रमे ते मांडले आहेत. त्यापैकी ३४ भाषणे भाग पहिल्यात, दुसऱ्या भागात ९१, तिसऱ्या भागात ७० असे एकूण तीन भागात २१८ भाषणे 'जनता'मधून घेतली आहेत. १९३० ते १९५६ पर्यंत चालविलेले 'जनता' हे सर्वात दीर्घकाळ चाललेले आंबेडकरी पाक्षिक आहे. त्यामुळे साहजिकच आंबेडकरी चळवळीचा तो इतिहास आहे. या पाक्षिकाचा स्वतंत्र अभ्यास करण्याची गरज आहे. इतर २२ भाषणे ही 'बहिष्कृत भारत', १ भाषण 'मूकनायक' यातून घेतली आहेत. १९२० ते १९३० या काळातील ही मुखपत्रे असल्यामुळे या प्रारंभीच्या काळातील बाबासाहेबांचे विचार व तत्कालीन चळवळीचे चित्र सतत पाहावयास मिळते. 'जनता' व 'मूकनायक' ही दोन महत्त्वाची साधने या खंडासाठी उपयुक्त ठरली आहेत. उर्वरित समकालीन वृत्तपत्रे, नियतकालिकांतील बाबासाहेबांची भाषणे, विविध मासिके, वृत्तपत्रे, चरित्रातील लेख यांसारख्या माध्यमांतून घेतली आहेत; त्याचा तपशील येणेप्रमाणे विविधवृत्त-३, चित्रा-१, नवयुग-१, नवाकाळ-१, लोकयुद्ध-१, अरुण-१, दलितबंधू-३, गरुड-१०, ज्ञानप्रकाश-३, समता-२, निर्भीड-१, मा. फ. गांजरे-७, एच. एल. कासारे-३, बी. सी. कांबळे-२, खैरमोडे खंड-१२, कीर धनंजय-३, भिक्षू संभव-२, धर्मदूत-४, वसंत मून-२, रमेश शिंदे-१, शा. शं. रेगे-१, अस्मितादर्श-१, शंकरराव होतोले-२ व डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन व भाषणे खंड-१३, खंड २-१, प्रबुद्ध भारत-१४ या स्रोतांमधून भाषणे व संदर्भ घेतले आहेत. यात काही संदर्भ एकाच भाषणाचे दोन दिले आहेत.

या भाषणाचे स्रोत शोधताना दोन प्रकारच्या स्रोतांचा उपयोग संपादक मंडळाने केलेला आहे. एक बाबासाहेबांची वृत्तपत्रे ही अधिकृत स्रोत म्हणून

मानली गेलेली आहेत. सारनाथचे महाबोधी सोसायटीचे मुखपत्र धर्मदूत, नवयुग ही अशीच अधिकृत स्रोत आहेत. बुद्ध की मार्क्स या भाषणाच्या शीर्षकासंबंधी वाद निर्माण झाला होता. काही अभ्यासकांनी व वाचकांनीही याबद्दल लेखी, जाहीर भाषणांद्वारे विचारणा केली होती व आपले आक्षेपही नोंदविले गेले. त्यादृष्टीने शोध घेतला असता, दिनांक ३ ऑगस्ट १९५७ च्या 'प्रबुद्ध भारत'मध्ये या भाषणाचे वृत्त प्रसिद्ध झाले असून त्यात बाबासाहेबांचे 'बौद्ध धर्म व मार्क्सवाद' या विषयावर भाषण झाल्याचे नोंदविले गेले आहे. त्याचे संग्राहक म्हणून बाबासाहेबांबरोबर खाटमांडू परिषदेला गेलेले प्राचार्य म. भि. चिटणीसांचा उल्लेख आढळतो. बुद्ध व मार्क्स या उर्वरित नियोजित ग्रंथाचा उल्लेख बाबासाहेबांनी 'बुद्ध ॲन्ड हिज धम्म' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केला आहे. त्याचे स्पष्टीकरण खंड ३ च्या प्रस्तावनेत संपादक मंडळाने केले आहे. परिषदेच्या स्मरणिकेत Buddha and Marx अशा शीर्षकाखाली हे भाषण दिले आहे. 'व' (and) व (or) 'किंवा' यात खूप फरक आहे. आमच्या रेकॉर्डप्रमाणे पुराभिलेखमध्ये हे लेखन 'बुद्ध की कार्ल मार्क्स' (Buddha or Karl Marx) या नावाने उपलब्ध आहे; परंतु या शीर्षकाचे प्रकरण हे खाटमांडू भाषणाचे नसून ते स्वतंत्र आहे (खंड ३ रा संपादक मंडळाची प्रस्तावना). हा सारा विचार करून या तिसऱ्या भागातील क्रमांक ३४७ भाषणाच्या शीर्षकात दुरुस्ती करून 'बौद्ध धर्म व मार्क्सवाद' हे मूळ शीर्षक दिले आहे.

ही भाषणे जी लिखित स्वरूपाची आहेत, त्यात बाबासाहेबांचे विचार मुद्देसूद व सर्वकाळ वाचायला मिळतात. उर्वरित भाषणे ही मुख्यत्वेकरून वृत्तांकन असल्यामुळे ती थोडक्यात व अनेकदा प्रासंगिक असल्याने जशी वृत्तांकने प्रसिद्ध झाली आहेत तशीच ती छापली गेली आहेत. वृत्तपत्रांतील लेखनाचे स्वरूप बघता हे वाचकांच्या लक्षात येईल, असे वाटते.

या द्वितीय आवृत्तीसाठी मा. मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांनी शुभ संदेश देऊन आमचा उत्साह वाढविला आहे. त्यांचे आभार. समितीचे अध्यक्ष तथा शिक्षणमंत्री विनोद तावडे यांनी शुभ संदेश दिला व या कार्याला चालना दिली त्याबद्दल त्यांचे आभार. या कार्यासाठी तत्कालीन प्रधान सचिव डॉ. संजय

चहांदे यांनी पुढाकार घेतला. वेळोवेळी समितीच्या अडचणी सोडविण्यासाठी आदेश दिले; त्याबद्दल त्यांचे आभार. उपसचिव सिद्धार्थ खरात यांचेही आभार. प्रधान सचिव सीताराम कुंटे यांनी वेळोवेळी समितीच्या कार्यास प्रोत्साहन दिले; त्याबद्दल त्यांचे आभार. समितीच्या सर्व सदस्यांचेही आभार. या कामासाठी कार्यालयातील सुमित्रा नेवरेकर, कदम, पार्टे, शेटकर, दळवी, करंडे यांनी सहकार्य केल्याबद्दल त्यांची नोंद घेतो. प्रेसचे संचालक, प. ज. गोसावी, व्यवस्थापक, न. म. गोटे व मुद्रणालयातील कर्मचारी यांचे सहकार्याबद्दल आभार.

प्रा. अविनाश डोळस,

सदस्य-सचिव

# अनुक्रमणिका
## खंड १८, भाग २

## अनुक्रमणिका--*चालू*

# अनुक्रमणिका--चालू

## अनुक्रमणिका--*चालू*

# अनुक्रमणिका--*चालू*

## अनुक्रमणिका--*चालू*

## अनुक्रमणिका--*चालू*

# अनुक्रमणिका--चालू

# १७

# या जागा मानाच्या नसून मान्याच्या आहेत

अस्पृश्यांचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विलायतेहून आगमन होताच त्यांनी आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या दौऱ्याचा कार्यक्रम आखला. पहिल्या फेरीत त्यांनी नाशिक जिल्ह्यातून दौरा काढण्याचे ठरविले. सभा वगैरे घेण्यास अवधी थोडा होता. तरीपण नाशिकचे कर्तबगार आणि धीरवंत पुढारी भाऊराव गायकवाड यांनी डॉ. बाबासाहेबांच्या दौऱ्याचा कार्यक्रम इतक्या कुशलतेने आखला की, हजारो स्त्री-पुरुष व मुले निरनिराळ्या ठिकाणी, रस्त्यात, चावडीत, गावच्या वेशीवर डॉ. बाबासाहेबांच्या दर्शनासाठी उत्सुकतेने वाट पहात होते.

प्रथम शनिवार ता. १६ जानेवारी १९३७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नागपूर मेलने इगतपुरीस रात्रौ ८ वाजता आले असता इगतपुरीकर मंडळीतर्फे व स्वावलंबन मंडळातर्फे स्टेशनवर पुष्पहार अर्पण करण्यात येऊन रात्रौ ९ वाजता पोस्टाचे शेजारच्या पटांगणात जाहीर सभा भरली. सभेस सुमारे दोन हजारांवर जनसमूह हजर होता. दुसरे दिवशी ता. १७-१-३७ रविवार रोजी पॅसेंजर ट्रेनने सकाळी सव्वा सात वाजता कँप देवळालीस येत असता इगतपुरी स्टेशनवर पुष्पहार अर्पण करण्यात येऊन "डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय" च्या जयघोषात इगतपुरी सोडली. डॉ. बाबासाहेबांसमवेत नाशिकचे उमेदवार श्रीयुत भाऊराव कृष्णराव गायकवाड, पूर्व खानदेशचे उमेदवार श्री. दौलतराव जाधव व नगरचे उमेदवार श्री. प्रभाकर जनार्दन रोहम, नाशिक जिल्हा युवक संघाच्या जलशा मंडळापैकी देवराव डांगळे, भीमराव कर्डक, बाळाजी वगैरे मंडळी होती. नाशिकरोडवरील व इगतपुरी येथील स्काऊट मंडळाने शांतता व सुव्यवस्था ठेवण्याचे काम उत्तम तऱ्हेने केले. पुढे वाटेत घोटी, आसवली, लहवीत या स्टेशनांवर लोकांनी डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण केले. कँप देवळालीचे स्टेशनवर लोकांची अलोट गर्दी उसळली होती. अनेक संस्थांतर्फे डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात येऊन तेलखोला व नाशिकरोडच्या स्काऊट पथकांचे स्टेशन बाहेर गार्ड ऑफ ऑनर (सलामी) झाले. नंतर स्टेशनवरून त्यांची मिरवणूक कँप देवळालीच्या ज्ञान मंदिरापर्यंत मुख्य-मुख्य अशा रस्त्यांनी आली, मातंग मंडळीचा बँड पुढे वाजत होता. "डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय" "आंबेडकरांचा जयजयकार", "आंबेडकर कौन है । दलितोंका राजा है।।" "तरुण पार्टी

---

जनता : २३ आणि ३० जानेवारी १९३७.

झिंदाबाद । थोडे दिनमें भीमराज।" स्वतंत्र मजूर पक्षाच्या जयजयकारात मिरवणूक ज्ञान मंदिरात आली. सुमारे हजारावर जनसमूह अत्यंत अल्पावधीत जमला. श्री. भाऊराव गायकवाड यांनाच मते देऊन निवडून देणे किती अगत्याचे आहे, या विषयावर अगदी मार्मिकपणे व थोड्या वेळात प्रास्ताविक झाल्यानंतर ज्ञानमंदिरातर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आला. त्याचप्रसंगी तेलखोरा स्काऊट मंडळातर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आला. नंतर नाशिकास येत असता वाटेत विदगाव, देवळाली, नाशिक रोडवरील दिनबंधू आंबेडकर वाचनालयातर्फे डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात आला. नाशिक येथे श्री. भाऊराव गायकवाड यांनी डॉ. साहेबांना थाटाची "टी पार्टी" दिली. धुळेकर वामनराव पवार यांनी तसेच भगिनीमंडळातर्फे सौ. गिताबाई गायकवाड यांनी पुष्पहार अर्पण केला. तेथून सभेसाठी महारवाड्यात जात असता वाटेत श्रीमती अक्काबाई तेजाळे यांनी पुष्पहार अर्पण केला. सभास्थानी डॉ. बाबासाहेब जाताच "डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय" 'आंबेडकर कौन है । दलितोंका राजा है ।' 'तरुण पार्टी झिंदाबाद । थोडे दिनमें भीमराज' वगैरे गर्जनांनी तेथील वातावरण दुमदुमून गेले. जमलेल्या दीड दोन हजार जनसमुहापुढे डॉ. बाबासाहेबांनी भाऊराव गायकवाड यांच्या उमेदवारीस पाठिंबा देणारे भाषण केले. तेथे दाणी मंडळीतर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आला. पवळाशी नेटावटे यांनी पुष्पहार अर्पण केला व समस्त महार मंडळीतर्फे श्री. सखाराम काळे यांनी पुष्पहार अर्पण केला. नाशिकात श्री. शिवराम पालाजी मोरे यांच्या दुकानी डॉ. बाबासाहेबांचा फोटो मेघवाळ मंडळीने घेतला. तेथून वरखेड्यास येत असता वाटेत मसरूळ, ढकांबे, तळेगाव या गावी पुष्पहार अर्पण करण्यात आले. दिंडोरी येथे गावातून मिरवणूक काढण्यात आली. पुढे सुस्वर वाद्ये वाजत होती. डॉ. बाबासाहेबांच्या जयजयकाराने दिंडोरी गाव गजबजून गेला. महारवाड्यात सुंदरशा मंडपात तयार केलेल्या व्यासपिठावर आरूढ होताच तेथील शेकडो स्त्रियांनी आरती करून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना भक्तीभावाने व भगिनीप्रेमाने ओवाळून 'इडा पिडा टळो । नी भीमराज लवकर येवो ।।' म्हणाल्या. सदर प्रसंगी भाषण करताना डॉ. बाबासाहेब म्हणाले, 'श्री. भाऊराव गायकवाड हे जरी तुमच्या तालुक्याचे असले तरी वृथा तालुकाभिमानाने हुरळून त्यांना मते देण्यापेक्षा खरे लायक व कर्तबगार उमेदवार म्हणून तुम्ही सर्वांनी त्यांना आपली चारही मते देणे जरूरीचे आहे', पुष्पहार अर्पण झाल्यानंतर पुढे आवनखेड येथेही पुष्पहार अर्पण करण्यात आला. आंबेवणी

येथे श्री. किसनराव शिवराम गांगुर्डे यांनी चहापार्टी दिली. सदर प्रसंगी आंबेवणी येथील महार मंडळीतर्फे व भगिनी मंडळातर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आले. तेथून वाजंत्र्यांच्या व जयजयकारांच्या जयघोषात मिरवणूक वरखेडा येथे आली. श्री. शिवराव दादाजी गांगुर्डे यांचे घरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांच्याबरोबर मंडळीस मेजवानी देण्यात आली. या सभेस अत्यंत मार्मिक असे त्यांनी अर्धा पाऊण तास भाषण केले. सभेसाठी जमलेल्या सर्व मंडळीस वरखेडकर समस्त मंडळीने सभेनंतर सुग्रास भोजन दिले. तेथून पुढे जाताना वाटेत जऊळके येथे पुष्पहार अर्पण करण्यात आला. पिंपळगाव बसवंत येथील चावडीसमोरील पटांगणात श्री. भाऊराव गायकवाड यांच्या उमेदवारीस पाठिंबा देणारे छोटेसे भाषण डॉ. बाबासाहेबांनी केले. तेथील मंडळीनी डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करून फलाहारही दिला. ओझर, तांबट येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची मिरवणूक गावच्या मुख्य-मुख्य रस्त्यांनी काढण्यात आली. मिरवणुकीत सुस्वर वाद्ये वाजत होती व जयजयकार चालला होता. महारवाड्यात जमलेल्या मंडळीपुढे थोडे भाषण करून श्री. गायकवाड यांच्या उमेदवारीस पाठिंबा दिला. तेथून पुढे खेरवाडी, चांदोरी, सायखेडा, चाटोरी, नायगाव वगैरे ठिकाणी पुष्पहार अर्पण करण्यात आले. रात्रौ ८.३० वाजता सिन्नर येथील मुख्य-मुख्य रस्त्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची मोटारमधून प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. रात्रौ ९.३० वा. सभेच्या कामास सुरुवात होऊन, सुरुवातीस श्री. दौलतराव जाधव, पुंजाजी नवसाजी जाधव व रघुनाथराव रिपोटे यांची श्री. भाऊराव गायकवाड यांच्या उमेदवारीस पाठिंबा देणारी भाषणे झाली. शेवटी डॉ. बाबासाहेब टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात बोलावयास उभे राहिले. आगामी निवडणूक किती महत्त्वाची आहे व आपण किती दक्षतेने वागावयास हवे यांचे स्पष्टीकरण करून आपल्या जिल्ह्यातर्फे आपण श्री. भाऊराव गायकवाड यांनाच निवडून देणे अगत्याचे आहे, असे सांगितले. नंतर सिन्नर तालुका संघाचे अध्यक्ष, श्री. बापूराव भालेराव यांचेकडे सिन्नर येथे डॉ. बाबासाहेबांना व स्काऊट मंडळास मेजवानी झाली. तेथून नाशिक स्टेशनवर येत असता वाटेत शिंदे येथील मराठे मंडळीने व महार मंडळीने डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण केले. तसेच पळसे येथील महार मंडळीने पुष्पहार अर्पण केला.

याप्रमाणे अखिल भारतीय अस्पृश्य मानलेल्या समाजाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी कायदेमंडळाच्या निवडणुकीबाबत नाशिक जिल्ह्यातून

दौरा काढला असता इगतपुरी, कँप देवळाली, नाशिक, दिंडोरी, वरखेडा, पिंपळगाव, बसवंत, ओझर, तांबट, सिन्नर वगैरे अनेक ठिकाणी केलेल्या भाषणांचा सारांश रूपाने अहवाल खालीलप्रमाणे :--

प्रिय बंधू-भगिनींनो,

आजच्या प्रसंगी तुम्हास येथे बोलावण्याचे कारण प्रसिद्ध झालेल्या हस्तपत्राद्वारे तुम्हास कळविले आहेच. मुंबई कायदेमंडळाच्या आगामी निवडणुकीत आपण कोणास मते देऊन निवडून आणावे याचा विचार आपणास करावयाचा आहे. या देशात अनेक राजे होऊन गेले. इंग्रजांनाही येथे येऊन उणीपुरी १५० वर्षे झाली आहेत. या १५० वर्षांच्या इंग्रजांच्या कारकिर्दीपैकी सुमारे ६० वर्षांपासून ही कौन्सिले अमलात आली आहेत व या कौन्सिलाद्वारे जनतेचे प्रतिनिधी आपल्या लोकांची गाऱ्हाणी सरकारकडे मांडीत आहेत. परंतु ८ कोटी अस्पृश्य मानलेल्या वर्गातर्फे त्यांचे गाऱ्हाने मांडणारा त्यांचा प्रतिनिधी असावा ही गोष्ट जगाच्या इतिहासात आतापर्यंत घडली नाही. ती गोष्ट आपल्या प्रयत्नाने झाली आहे. येत्या एप्रिल १९३७ पासून सुरू होणाऱ्या कायदेमंडळासाठी नाशिक जिल्ह्यातील लोकास एक प्रतिनिधी पाठविण्याचा अधिकार मिळाला आहे. आता जे कौन्सिल भरणार आहे त्यात आपल्या सुखदु:खाची दाद लावण्याची संधी प्राप्त झाली आहे. आतापर्यंतचा शिरस्ता, आपली गाऱ्हाणी सरकारी अधिकाऱ्यांमार्फत मांडण्याचा असे परंतु यापुढे आपले गऱ्हाणे कायदेमंडळाकडे करावे लागेल. आपल्या सर्व सुखदु:खांचा जेथे विचार होणार आहे अशा कायदेमंडळाच्या रिंगणात तुमच्यातर्फे जाणारा मनुष्य चांगला मजबूत असला पाहिजे. ह्या जागा मानाच्या नसून माऱ्याच्या आहेत. कायदेमंडळात जाणारा मनुष्य हा स्वत:साठी जात नसून आपल्या समाजासाठी जात आहे. समाजहिताच्या दृष्टीने उद्‌भवणाऱ्या प्रश्नांचा साधकबाधक विचार करून कायदे-मंडळात आपल्यावतीने लढणारा मनुष्य आपण निवडून द्यावयास हवा आहे. कायदे-मंडळ हे आपल्या बचावाचे साधन आहे.

आपल्या जिल्ह्यातील पश्चिम भागातर्फे एक प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार तुम्हास मिळाला आहे. या एका जागेसाठी श्री. भाऊराव गायकवाड व रामचंद्र रोकडे असे दोन् उमेदवार उभे आहेत. या दोघांनाही तुम्ही चांगल्यातऱ्हेने ओळखता. तेव्हा याबाबत मी शिफारस करण्याचे प्रयोजन नाही.

या कायदेमंडळाद्वारे महार लोकांच्या वतनाचा विचार होणे जरूर आहे. तुम्हास जमिनी नसल्याने पडित असलेल्या जमिनी तुम्हास हव्या आहेत.

आपला समाज शिक्षणात मागासलेला असल्याने आपल्या मुलाबाळांना योग्य असे शिक्षण मिळाले पाहिजे. गरिबी असल्यास सरकारी स्कॉलरशिपा मिळाल्या पाहिजेत. तुम्हास अस्पृश्य लेखल्यामुळे तुमची झालेली कुचंबणा थांबविण्यासाठी अस्पृश्यता निवारणाविषणी कायदा होणे जरूर आहे. आपल्या लोकांची सरकारी नोकरीत योग्य त्या प्रमाणात भरती होणे जरूर असल्याने त्याबाबत तशी तरतूद झाली पाहिजे. अशा एक ना दोन शेकडो गोष्टी या कायदेमंडाळाद्वारे झगडून मिळविल्या पाहिजेत. हे कार्य या दोन उमेदवारांपैकी कोण करील असे तुम्हास वाटते ? (गायकवाड करतील, असे लोक ओरडतात).

नेहमीच्या व्यवहारात आपण असे पाहतो की जर एखाद्या इसमास घर बांधावयाचे असल्यास सुताराची गरज लागली तर जो सुताराचे काम जाणतो त्यासच आपण त्या कामी लावतो. गवंड्याचे कामासाठी गवंडी काम जाणणाऱ्यासच नेमतो. तद्वतच कायदेमंडळात व्हावयाची कामे कोण चांगल्याप्रकारे करील हें तुम्ही विचार करून ठरविणे अत्यंत जरूर आहे. तेथे आंगाजांघाचा पाहता कामा नये. सोयऱ्या धायऱ्याचे नाते ओळखता कामा नये, अगर आपसातील द्वेषाने प्रेरित होऊन सूडाच्या भावनेने भांबावता कामा नये. आपली गाऱ्हाणी कायदेमंडळात मांडून जो ती निवारण करील असे तुम्हास वाटते त्यासच आपण मते देऊन निवडून आणणे जरूर आहे. जो मनुष्य कायदेमंडळासाठी लायक असेल त्यासच कायदेमंडळात पाठवा.

आता आपल्यापुढे एका जागेसाठी उभे राहिलेल्या दोन उमेदवारात जास्त लायक कोण हे पाहणे अत्यंत जरूर आहे. श्री. भाऊराव गायकवाड यांनी गेली कित्येक वर्षे केलेली सार्वजनिक सेवा मशहूर आहे. लोकल बोर्ड व नासिक म्युनिसिपालिटीसारख्या स्थानिक स्वराज्य संस्थांवर गेली कैक वर्षे जबाबदारीची कामे केली आहेत. आपल्या जिल्ह्यातील लोकांची गाऱ्हाणी सरकार दरबारात मांडून ती निवारण करण्याचे प्रयत्न गेल्या सहा-सात वर्षापासून ते करीत आहेत. नाशिक जिल्हा हा अस्पृश्य मानलेल्या समाजाच्या चळवळीचे केंद्र झालेले आहे. गेली पाच-सहा वर्षे या जिल्ह्यात चळवळीचा किती मोठा धुमाकूळ माजला होता. याची जाणीव तुम्हा सर्वांना आहे. त्या सर्व चळवळीत त्यांनी मान्याच्या व जबाबदारीच्या जागी राहून केलेली सेवा तुमच्या नजरेपुढे आहेत. त्या चळवळीत कित्येक प्रसंगी मारहाण तर कित्येक प्रसंगी सरकारकडून दंड तर कित्येक प्रसंगी तुरुंगवासाच्या सक्त मजुरीच्या शिक्षाही त्यांनी भोगल्या

आहेत. श्री. भाऊराव गायकवाड यांची ही कामगिरी लक्षात घेऊनच स्वतंत्र मजूर पक्षातर्फे मी त्यांचे नाव सुचविले आहे. श्री. गायकवाड यांच्याविरुद्ध श्री. रामचंद्र रोकडे उभे आहेत. ते मंदिर-प्रवेश सत्याग्रहाचेवेळी कोठे दडून बसले होते ? सार्वजनिक सेवा म्हणून ज्याला म्हणतात ती काही त्यांच्या पाठीशी आहे काय ? (नाही-नाही म्हणून लोक ओरडतात) १९३५ च्या इंडिया ॲक्टात स्पष्टपणे म्हटले आहे की, यापुढे मुंबई कायदेमंडळाच्या सभांचे कामकाज इंग्रजीतून चालेल. जर आपले काही गाऱ्हाणे कायदेमंडळापुढे मांडणे असल्यास ते इंग्रजीतूनच मांडले पाहिजे. असा स्पष्ट निर्बंध आहे. असे असता आपले गाऱ्हाणे इंग्रजीतून मांडण्याइतके इंग्रजी श्री. रोकडे यांना येते काय ? (नाही-नाही म्हणून लोक ओरडतात.) रोकडे यांनी प्रसिद्ध केलेल्या विनंतीपत्रात ते म्हणतात की मी कोणत्याही पक्षातर्फे अगर संस्थेतर्फे उभा नाही. जर रोकडे कोणत्याही पक्षातर्फे अगर संस्थेतर्फे उभे नसतील तर मग त्यांच्या कार्यात त्यांना कोण मदत करणार ? ना पशू ना पक्षी म्हणणाऱ्या वटवाघुळासारखी स्थिती अशा इसमाची झाल्याशिवाय राहील काय ? त्यापेक्षा सरळ काँग्रेस अगर अशाच इतर संस्थेतर्फे रोकडे उभे राहिले असते तर एकवेळ परवडले असते. परंतु, 'ना ही धड ना ती धड' ही स्थिती बरी नाही.

वरील सर्व गोष्टींचा विचार करता उभे राहिलेल्या उमेदवारात कायदेमंडळासाठी लायक कोण नी नालायक कोण हे शोधून काढणे अत्यंत सोपे काम झाले आहे. कारण श्री. भाऊराव गायकवाड व श्री. रामचंद्र रोकडे यांची सार्वजनिक कार्याच्या दृष्टीने, हुशारीच्या दृष्टीने, कर्तबगारीच्या दृष्टीने, अनुभवाच्या दृष्टीने, शिक्षणाच्या दृष्टीने सर्वतऱ्हेने तुलना करता :

"कहां राजा नि कहां पोतराजा"

"कोठे पर्वत तर कोठे खडा"

"कोठे सोने तर कोठे कथील"

"कोठे घोडा तर कोठे गाढव"

इतके अंतर उभय उमेदवारात आहे, ही गोष्ट सुर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. असे असता तुम्हाला बुचकळ्यात पडण्यासारखे काय आहे ? तरी सर्वांनी आपली चारही मते श्री. भाऊराव गायकवाड यांनाच द्यावीत. अशी मी विनंती करतो.

मला असे कळले आहे की काही विरोधीप्रचारक आपल्याकडे मते मागण्यासाठी आले असता दोन मते श्री. गायकवाडास द्या व दोन मते श्री. रोकड्यास द्या, अशी मतदारांची विनंती करीत फिरत आहेत. कारण, दोन्ही उमेदवार जातीचीच लेकरे आहेत असेही ते प्रचारक सांगत फिरत असल्याचे समजते. याबाबत मला तुम्हाला स्पष्ट सांगावयाचे आहे की, या जिल्ह्यातर्फे आपल्याला एकच इसम निवडून द्यावयाचा असल्याने मतांची अशी विभागणी करून भागणार नाही आणि जर तुम्ही तुम्हास दिलेल्या एका जागेसाठी मिळालेली मते निरर्थक वाटू लागतात तर त्यात तुमचा आत्मघात आहे-मोठे असे नुकसान आहे, हे विसरून चालणार नाही. तसेच तुमच्या या मतांकरिता लोक तुम्हास पैशांची लालूच दाखवितील, कामापुरता मामा या न्यायाने गोड थापा मारतील. परंतु, तुम्ही कोणत्याही मोहास बळी पडू नका. मताचा मिळालेला अधिकार हे तुमच्या मुक्तीचे साधन आहे. मुक्तीचे मिळालेले साधन जर तुम्ही पैशावारी विकाल तर मग तुमच्यासारखे आत्मघातकी, समाजद्रोही व मूर्ख तुम्हीच. यासाठी बंधूंनो आणि भगिनींनो कोणत्याही स्थितीत तुम्हास मिळालेला हा अधिकार पैशावारी विकू नका, अशी नम्र सूचना आहे.

मी, काल येथे आल्यानंतर श्री. रोकडे हे फार श्रीमंत आहेत म्हणून त्यांना मते द्यावीत, म्हणून काही लोक म्हणत असल्याचे मी ऐकले. याबाबत मी तुम्हास स्पष्टपणे सांगतो की, बाबांनो, कायदेमंडळे ही काही श्रीमंतांची प्रदर्शने मांडण्याची ठिकाणे नाहीत. तेथे गरीब अगर श्रीमंत हा भेद नसून 'ज्याची तरवार खंबीर तो हंबीर' या न्यायाने कायदेमंडळात आपल्या पक्षाच्यावतीने भांडणारा रस्त्यावरचा भिकारी हा श्रीमंतीत आणि ऐषआरामात लोळणाऱ्या नादान, ऐदी व मुक्या श्रीमंतापेक्षा अनेक पटीने श्रेष्ठ आहे. कायदेमंडळात निवडावयाच्या उमेदवाराची लायकी ही श्रीमंतीवर अधिष्ठित झाली नसून ती कर्तबगारीवर, समाजसेवेवर व खडतर तपस्येवर अधिष्ठित झाली आहे. नुसत्या श्रीमंतीवर भुलण्याचे काही कारण नाही. कारण श्रीमंत संभाजी रोकडे यांच्या निधनानंतर त्यांच्या संपत्तीचा वारसा त्यांच्या मुलाकडे गेलेला आहे. श्रीमंत धोंडिबा रणखांब्यांच्या निधनानंतर त्यांच्या संपत्तीचा वारसा त्यांच्या मुलाकडेच गेला आहे. माझ्या निधनानंतर माझ्या संपत्तीचा वारसा माझ्या मुलांकडे जाईल. जर असे तर मग श्रीमंतांचे तुम्हा-आम्हाला काय ? कित्येक लोक असे म्हणतात की कायदेमंडळात अत्यंत हुशार आणि कर्तबगार

लोकांचीच जरुरी आहे, असे नाही. मराठा समाजाच्या उमेदवारांकडे व मागे कौन्सिलर असलेल्यांकडे पाहिल्यास ही गोष्ट दिसून येईल. यावर माझे असे म्हणणे आहे की मराठ्यांचा एकही वाटोळ्या पगडीचा व अडाणी इसम कायदेमंडळात गेला तरी चालेल. परंतु तुमचा मनुष्य मात्र तसाच पाठवून भागणार नाही. तर तो त्यापेक्षा १५ पट हुशार व कर्तबगार असावयास हवा आहे.

आपल्या या नाशिक जिल्ह्यात गायकवाड व रणखांबे हे दोघेही कार्यकर्ते असताना भाऊराव गायकवाडांचीच निवड मी का केली याबाबत बराच संशय माजला असल्याचे माझ्या ऐकिवात आहे. आपल्या नाशिक जिल्ह्यातील दोन इसम गायकवाड व रणखांबे कायदेमंडळात जाण्यासाठी लायक आहेत, ही गोष्ट खरी म्हणूनच चार महिन्यांपूर्वी उभयताना बोलावून मी स्पष्टपणे सांगितले होते की, तुमच्या जिल्ह्यातर्फे कायदेमंडळाच्या निवडणुकीसाठी कोणी उभे राहावे हे तुम्ही उभयता आपसात ठरवून मला तसे कळवा. तसेच तुम्हा उभयतात जर हा वाद मिटला नाही व निकाल देण्याची पाळी जर मजवर आली तर मात्र मी भाऊराव गायकवाड यांच्यातर्फे निकाल देईन, असे रणखांबे यांनाही सांगितले होते. कारण उभयतात अधिक लायक कोण हे तुम्हापेक्षा मी चांगले जाणतो. आतापर्यंत अमृतराव रणखांबे यांनी अध्यक्ष व स्वागताध्यक्ष म्हणून अनेक सभात जी भाषणे केली ती अमृतरावांची नसून भाऊराव गायकवाडांनी लिहून दिली आहेत. हे मी जाणतो. रणखांब्यांचा 'बोलविता धनी वेगळाची' असल्याची मूळकथा मला पूर्णपणे माहीत आहे व म्हणून अमृतराव रणखांब्यांपेक्षा भाऊराव गायकवाड मला अधिक लायक वाटले.

दुसरे असे की, रणखांबे यांनी राजीखुषीने, अंमलपाणी न करता स्वत:च्या सहीने पत्र पाठवून मला स्पष्टपणे कळविले आहे की, कायदेमंडळात नाशिक जिल्ह्याच्या राखीव जागेसाठी श्री. भाऊराव गायकवाड यांनाच द्या. असे असता आज श्री. रणखांबे यांनी श्री. गायकवाड यांच्या उमेदवारीस मदत करावयास हवी आहे. परंतु प्रत्यक्ष मदत न करता अगर तटस्थही न राहता रणखांबे उघड-उघड भाऊराव गायकवाड यांच्या उमेदवारीस विरोध करीत आहेत यास काय म्हणावे ? तसे पाहता रणखांबे घराण्याचा व रोकडे घराण्याचा माझ्या माहितीप्रमाणे गेली सात-आठ वर्षे काही कारणांमुळे वाद होता. उभयतात सलोखा अगर प्रेमभाव तर मुळीच नव्हता. असे असता रणखांबे यांचे नाव मी

कायदेमंडळासाठी सुचविले नाही म्हणून गेली कैक वर्षे भावा-भावाप्रमाणे व गुण्यागोविंदाने राहिलेल्या गायकवाडांविरुद्ध रणखांब्यांनी जाऊन विरोधी गटाच्या गळ्यात मिठ्या माराव्यात व ज्याला आतापर्यंत मित्र म्हणून घेतले त्याला विरोध करावा हे रणखांब्यांचे करणे न्यायाचे नाही, अयोग्य आहे. नाशिक जिल्ह्यात असलेली संघटना दुभंगून जो निरर्थक बेबनाव व बखेडा माजविला आहे त्यास श्री. रणखांबेच जबाबदार आहेत.

माझे भाषण संपण्यापूर्वी मला तुम्हा सर्वांना एक आग्रहाची विनंती करावयाची आहे की तारीख १७ फेब्रुवारी १९३७, बुधवार रोजी मतदार बंधू-भगिनींनी आपल्या स्वत:च्या खर्चाने अगर पायी आपल्या पोलीस स्टेशनवर जाऊन आपली चारही मते, स्वतंत्र मजूर पक्षातर्फे, मी उभे केलेले उमेदवार भाऊराव गायकवाड यांनाच द्यावीत. त्यांची निशाणी घोडा असून घोड्याच्या चित्राच्या उजव्या बाजूस चार फुल्या कराव्यात.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा नाशिक जिल्ह्यातील दौरा कल्पनेच्याबाहेर यशस्वी झाला. दोन दिवसांचा मुक्काम नाशिक जिल्ह्यात चांगलाच गाजला. डॉ. बाबासाहेबांना नाशिक येथे श्री. भाऊराव गायकवाड यांनी काही प्रमुख स्पृश्यास्पृश्य पुढारी मंडळीसह चहापार्टी दिली. श्री. भाऊराव गायकवाड हे नाशिक जिल्ह्यात प्रतिस्पर्ध्याला चारीमुंडी चित करून प्रचंड मतांनी निवडून येणार हे खास! शेवटी डॉ. आंबेडकर साहेबांनी सर्व नाशिककर बंधू-भगिनींना संदेशाद्वारे सांगितले की, "आजपर्यंत नाशिककर बांधवांनी दाखविलेला स्वाभिमान, वीरवृत्ती आणि आपल्या ध्येयाविषयी निष्ठा यापुढे येणाऱ्या प्रत्येक कार्यात अधिक कसास लावून आपल्या पक्षास यशस्वी करा. नाशिक जिल्ह्याने श्री. भाऊराव गायकवाड यांना प्रचंड मतांनी निवडून देणे हेच त्यांचे पवित्र व पहिले कर्तव्यकर्म आहे याची मी तुम्हास जाणीव करून देत आहे आणि मी तुमच्यावर आज लोटून जात असलेली कामगिरी आपण निर्भयपणे पार पाडाल अशी मला बळकट आशा वाटत आहे."

शेवटी पहाटेच्या मेलगाडीने डॉ. बाबासाहेब मुंबईस परत गेले.



# १८

# ज्यांना पक्ष नाही, ध्येय नाही, तत्त्व नाही अशा अधांतरी लोंबकळणाऱ्या उमेदवारांना निवडून देऊ नका

अखिल भारतीय अस्पृश्यांचे एकमेव वंदनीय पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर विलायतेहून परत आल्याबरोबर स्वतंत्र मजूर पक्षाच्या दौऱ्याचा कार्यक्रम आखला गेला व तारीख २४ जानेवारी १९३७ हा सोलापूर जिल्ह्यासाठी मिळाला. ही बातमी समजताच सोलापूरचे वयोवृद्ध सरपंच श्री. विश्वनाथबुवा बंदसोडे, धाकट्या महारवाड्याचे कारभारी संभाजीराव तळभंडारे तसेच केशवराव सोवे, शंकरराव सातपुते, श्रीपतराव पक्षाळे, विठ्ठलराव साबळे, मारुतीराव बंदसोडे, मारुतीराव गायकवाड, जनतेचे एजंट रा. बल्लाळ, रामकृष्ण पुजारी वगैरे भागातील पुढाऱ्यांनी बाबासाहेबांच्या आगमनाची बातमी जिल्ह्यात तातडीने पोचविली. त्याबरोबर ताबडतोब करसाळे, बार्शी, कुर्डुवाडी, टेंभुर्णी, मंद्रूप, घळसंग वगैरे भागातील पुढाऱ्यांनी बाबासाहेबांच्या दौऱ्यातील कार्यक्रम-सभेला येणाऱ्या मंडळींच्या जेवणासह पार पाडण्याची तयारी केली व अस्पृश्यांचा उद्धारक, अखिल भारतीय दलितांचा राजा बाबासाहेब आंबेडकर यांचे दर्शन घेण्यासाठी आबालवृद्ध जनता जिल्ह्यात सर्वत्र त्यांची मार्गप्रतिक्षा करीत राहिली. २३ जानेवारीची रात्र सोलापूर येथे जमलेल्या अस्पृश्य समाजाने बाबासाहेबांच्या स्वागताची जय्यत तयारी करण्यासाठी जागून काढली. कॅप्टन यादवराव लोंढे व शहरातील निरनिराळ्या तालमीतील भीमसेनेचे स्वयंसेवक यांनी पहाटे ३ वाजताच सोलापूर स्टेशनवर आपला तळ दिला. ४ वाजल्यापासून लोकांची सारखी रीघ स्टेशनकडे सुरू झाली. ६ वाजण्याच्या आत ५-६ हजार लोकांच्या समुदायाने स्टेशनचे पटांगण आणि बाहेरची जागा चिक्कार भरून गेली. ७ नंतर बाबसाहेबांच्या गाडीने स्टेशनात प्रवेश करताच 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय' 'आंबेडकर झिंदाबाद' वगैरे-वगैरे जयजयकाराने वातावरण दणाणून गेले. त्या जयजयकारात मातंग समाजातर्फे केरू रामचंद्र जाधव व आपाराव दणाणे, सत्यप्रसारक भीमसेनचे कॅप्टन यादवराव लोंढे, थोरला महारवाडा पंचाच्या तालमीतर्फे नारायण बाबरे, धाकटा महारवाडा आंबेडकर तालमीतर्फे संभाजी तळभंडारे, फॉरेस्ट दीनबंधू आंबेडकर तालमीतर्फे हरिबा ख़लीफा, श्री. तात्याबा पांडुरंग सावंत, चेअरमन, गाळशिरस ग्रामपंचायत, निवृत्तीराव माने व अकुबा लोंढे आणि शहरातील सर्व मोहल्ल्यांतर्फे बाबासाहेबांना हार घालण्यात आले. पुष्पवृष्टी करीत-करीत आनंदोत्साहाने जयजयकार

---

जनता : ६ व १३ फेब्रुवारी १९३७

गाजविणाऱ्या त्या प्रचंड जनसमुदायातून स्वयंसेवकांनी साखळी करून मोटारीपर्यंत बाबासाहेबांना मोठ्या प्रयासाने पोचविले. पुढे बाबासाहेब मेसर्स जी. आर. देशपांडे वकील यांच्या बंगल्यावर मुक्कामास गेले व मंडळी 'आंबेडकर झिंदाबाद' च्या ललकाऱ्या मारीत थोरल्या महारवाड्यातील मंडपात गेली. चहापानानंतर बरोबर ८ वाजता बाबासाहेब मंडपात दाखल झाल्याबराबर (झिंदाबादची घनगर्जना, टाळ्यांचा कडकडाट व एकदम शांतता) मातंग समाजातर्फे केरू रामचंद्र जाधव यांनी पुन्हा हार घालून "अखिल भारतीय अस्पृश्य समाजाला शिक्षण, समता, सन्मान आणि भाकर मिळवून देण्यासाठी स्वत:च्या प्राणाचीही पर्वा न करिता अत्यंत निर्भयतेने, समतेने आणि व्यापकतेने बाबासाहेबांनी चालविलेली सनदशीर चळवळ ही खास आमचा उद्धार करील, बाबासाहेब हेच आमचे पुढारी, हेच आमचे धर्माधिकारी व हेच आमचे पूज्य दैवत आहेत आणि मातंग समाज त्यांचा एकनिष्ठ अनुयायी आहे ही गोष्ट मुंबईत झालेल्या इलाखा मातंग परिषदेने सिद्ध केलेली आहे." वगैरे भाषण केल्यावर बाबासाहेब बोलावयास उभे राहिले (झिंदाबादची गर्जना, प्रचंड टाळ्या व एकदम शांतता).

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

बंधूंनो व भगिनींनो,

मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या आगामी निवडणुकीत कोणाला मते देऊन निवडून आणावे याचा विचार करण्यासाठी आज आपण येथे जमलो आहोत. या देशात अनेक राजे होऊन गेले व इंग्रजांना येथे येऊन उणीपुरी १५० वर्षे झाली. इंग्रजांच्या या १५० वर्षांच्या कारकिर्दीत सुमारे ६० वर्षांपासून ही कौन्सिले अमलात आली असून त्यांच्याद्वारे जनतेचे प्रतिनिधी आपल्या लोकांची गाऱ्हाणी सरकारकडे मांडीत आहेत. परंतु अस्पृश्य मानिलेल्या ८ कोट प्रजेतर्फे त्यांचे गाऱ्हाणे मांडणारा त्यांचा प्रतिनिधी कौन्सिलात असावा ही गोष्ट आतापर्यंत जगाच्या इतिहासात घडून आली नव्हती. ती गोष्ट आता आपल्या प्रयत्नाने झाली आहे. येत्या एप्रिल १९३७ पासून सुरू होणाऱ्या कायदे मंडळासाठी सोलापूर जिल्ह्यातील आपल्या लोकांस एक प्रतिनिधी पाठविण्याचा अधिकार मिळाला आहे. आता जे कौन्सिल भरणार आहे, ते आपल्या समाजाच्या बचावाचे साधन आहे. तेथेच आपल्या सुखदु:खाची दाद लागणार आहे. तेथेच महारांच्या वतनासंबंधी, पडित जमिनी मिळण्यासंबंधी, शिक्षण संपादनासाठी, स्कॉलरशिपा मिळविण्यासंबंधी, अस्पृश्यतेमुळे आलेली दैन्यवस्था टाळण्यासंबंधी, सरकारी नोकरीत योग्य त्या प्रमाणात शिरकाव होण्यासंबंधी अशा एक ना दोन शेकडो गोष्टी या कायदे मंडळाच्या द्वारे झगडा करून आपणास मिळवावयाच्या आहेत. अर्थात तेथे जाणारा तुमचा प्रतिनिधी मानासाठी जाणारा

नसून आपल्या समाजाच्या हिताच्या बाजूने लढण्यासाठी जाणारा आहे हे लक्षात घ्या. तसेच नेहमीच्या व्यवहारात आपण पाहतो की, घर बांधताना दगडकामासाठी गवंडी व लाकूड कामासाठी सुतार आपण लावतो. कुठे एकदा रेल्वेचा पूल बांधावयाचा असल्यास इंजिनिअरची जरुरी असते. शाळा मास्तरला ते काम करता येत नाही. पण तुमच्या येथील उद्धव शिवशरण मास्तरने या जबाबदारीच्या जागेसाठी आपली निवड करावी म्हणून मला पत्र लिहिले. इंग्रजी न जाणणाऱ्या या मास्तराबद्दल मी मुग्ध राहिलो. तब्बल दोन महिने विचार केला आणि नंतर श्री. जिवाप्पा ऐदाळे यांचे नाव जाहीर केले. इतके होईपर्यंत श्री. मागाढे यांचे नाव मला कळविले नाही. मागाहून कळविले. पण याच्या बुडाशी कॉँग्रेसचा हात आहे व याबद्दल माझ्याकडे पुरावा आहे. बंधूंनो, काँगेसला स्वराज्य पाहिजे आहे. आम्हालाही स्वराज्य पाहिजे. पण ते मिळविण्याचा कॉँग्रेसचा मार्ग जो कायदेभंग तो आम्हाला मान्य नाही. कायदेभंगाने स्वराज्याचा खुंटा हालवून बळकट केला आहे. कॉँग्रेसवाले तुम्हाला सांगतील की, आपल्या सर्वांच्या एकजुटीने इंग्रज सरकारला आपल्या देशातून हाकून लावू या आणि स्वातंत्र्य मिळवू या. पण ढेकूण मारण्याची ज्यांना छाती नाही, ते सर्वतोपरी सुदृढ, सुसज्ज अशा इंग्रज सरकारला कसे हाकून लावणार, अथवा समजा उद्या इंग्रज सरकार इंग्लडला निघून गेले, तर आम्हाला धार्मिक, आर्थिक, सामाजिक अवनतीच्या खड्ड्यात कुजत ठेवणारे खोत, जमीनदार हे कुठे परदेशी जाणार आहेत काय ? आणि कॉँग्रेस तर शेठ सावकार, जमीनदार, भांडवलदार लोकांची संस्था म्हणून अशा लोकांच्या कसल्याच भूलथापा तुम्ही ऐकू नका.

बंधूंनो, तुमच्या मतांची किंमत मीठ मिरचीसारखी समजू नका. तुमच्या प्राणाइतकीच किंबहुना जास्तच तुमच्या मतांची किंमत आहे, हे विसरू नका. भलत्याच उमेदवाराला मत द्याल तर खाटक्याच्या हातात बकऱ्याने सुरी दिल्यासारखे होईल. श्री. जिवप्पा ऐदाळे हे माझ्या पक्षाचे उमेदवार आहेत. त्यांना ध्येय आहे, त्यांना तत्त्व आहे. त्यांची आणि तुमच्या भावी हितानहिताची सर्व जबाबदारी माझ्या शिरावर आहे. म्हणून श्री. जिवाप्पा ऐदाळे यांनाच आपली तिन्ही मते देऊन निवडून आणा. दुसरे उमेदवार कोणी माझे शत्रू नाहीत. पण ज्यांना पक्ष नाही, ध्येय नाही, तत्त्व नाही अशा अधांतरी लोंबकळणाऱ्या लोकांची जबाबदारी मी घेणार नाही. आजपर्यंत तुम्हाला कोणी तुमच्या जिल्ह्याचा, तालुक्याचा, नात्या-गोत्याचा अभिमान धरा म्हणून सांगितले असेल किंवा पुढे सांगतील, पण असा अभिमान धरावयाचा झाल्यास शेवटी तुम्हाला आपल्या गावचा व घराचासुद्धा अभिमान धरावा लागेल आणि असे घरोघरी उमेदवार उभे राहतील तर तुमच्या भावी कल्याणाचा सत्यानाश होईल याचा विचार करा.

शेवटी तुम्हाला सांगावयाची गोष्ट ही की, या शहरातील मजुरांच्या तर्फे तुम्हाला एक मत देण्याचा अधिकार आहे. त्या जागेसाठी मजुरांच्या तर्फे श्री. रघुनाथराव बखले हे उभे राहिले आहेत. आतापर्यंत त्यांनी कौन्सिलात केलेली गोरगरीब, मजूर, शेतकरी, अस्पृश्य यांची सेवा मला मान्य आहे. त्यांनाच सोलापूरच्या मजुरांनी मते द्यावी. शेठ सावकार, गिरणीवाले यांच्या हस्तकांना मते देऊन तुमचे कल्याण होणार नाही. तरी श्री. बखले यांनाच आपली मते द्या.

इतके बोलून बाबासाहेबांनी आपले भाषण पुरे केल्यावर तुळजापूरचे कदम ब्रदर्स यांनी व इतर अनेकांनी हार घातल्यावर जयजयकारात सभा बरखास्त होऊन बाबासाहेब मंद्रूपकडे रवाना झाले.

### मंद्रूपची सभा

सोलापूरचा कार्यक्रम संपवून बाबासाहेब येथे येणार म्हणून मंद्रूप परगणा व मंगळवेढे संस्थानातून जमलेला दोन हजारांवर लोकांचा समुदाय वाद्य-वाजंत्र्यांसह आतुरतेने गावाबाहेर उभा होता. १० च्या सुमारास बाबासाहेबांची मोटार येऊन थडकली व 'आंबेडकर झिंदाबादची' दंगल उडाली. बाबासाहेब मिरवणुकीने मंडपाजवळ येताक्षणी सुवासिनी बायांनी त्यांच्या चरणाजवळ पाण्याच्या घागरी ओतल्या. कापूर लावून नारळ फोडले व पंचारत्या घेऊन 'इडा पिडा जावो, बाबासाहेब यशस्वी होवो' म्हणून ओवाळणी केल्यावर सभेच्या कामास सुरवात झाली. प्रथम मंद्रूप परगण्याचे देशमेहत्रे गंगापा रणखांबे यांनी स्वागतपर भाषण केले व बाबासाहेबांनी थोड्या-बहुत फरकाने सोलापूरच्या सभेप्रमाणे भाषण केले. श्री. ऐदाळे यांस मते देण्याचे सांगितले. नंतर भीमाप्पा रणखांबे यांनी श्रीमंत देशमुख, श्री. पांढरे आणि सभाजन यांचे आभार मानले व बाबासाहेबांच्या जयजयकारात सभा खलास झाली. नंतर बाबासाहेब सोलापूरकडे परतले. तेथे धाकटा महारवाडा आंबेडकर तालमीची पानसुपारी उभ्या उभी स्वीकारून लागलेच ते वळसंगकडे रवाना झाले.

### वळसंगची सभा

वाटेत कुंभारीकर योगीबुवा आणि समस्त मंडळी यांनी आपल्या चावडीसमोर मुद्दाम उभारलेल्या मंडपात केलेली पानसुपारी हारतुरे घेऊन ११-२५ च्या सुमारास बाबासाहेब वळसंगला पोचले. तेथेही वळसंग कुंभारी, सलगर, मंगळूर भागातून व अक्कलकोट संस्थानातून तीन हजारावर लोकसमुदाय जमला होता. नंतर तेथील कारभारी श्री. ओंकारप्पा वळसंगकर यांनी स्वागत केल्यावर बाबासाहेबांनी थोड्याबहुत फरकाने सोलापूरप्रमाणेच भाषण करून ऐदाळे यास मते देण्यास सांगितले. नंतर सोलापूर जिल्हा लोकल बोर्डाने बांधून दिलेल्या विहिरीतून पाणी काढण्याबद्दल लोकांनी विनंती केल्यावरून

चांदीच्या गडव्याला बांधलेला दोर ओढून बाबासाहेबांनी विहिरीतून पाणी काढले. लोकांनी प्रसाद म्हणून पाणी मागताच बाबासाहेब विनोदाने 'दक्षिणा काढा' असे म्हणाले व सर्वत्र हशा पिकला. अखेर बाबासाहेबांना लोकांना पाण्याचा प्रसाद द्यावा लागला. लोकांनी सदर विहिरीचे नाव आंबेडकर बावडी असे ठेविले व बाबासाहेब सोलापूरास रवाना झाले.

सोलापुरास श्री. देशपांडे वकील यांचे बंगल्यावर जेवण झाल्यानंतर बाबासाहेब बार्शीकडे गेले. वाटेत बैराग, पानगाव वगैरे ठिकाणी हारतुरे स्वीकारून तीनच्या सुमारास बार्शी येथील श्री. भगवंत मीलजवळ पोचले.

### बार्शीची सभा

येथे ८-९ हजार लोकांचा समुदाय व सरमाळेकर, रा. नामदेवराव वासकर, माणकेश्वर, कासारवाडीकर यांच्या बँडच्या ताफ्यासह सामोरा आला होता. तेथून मिरवणुकीने बाबासाहेब पोस्ट ऑफिस, पोलीस चौकी, काझी मशीद, जैन मंदीर, भाजी मार्केट या रस्त्याने म्युनिसिपल दवाखान्याजवळ उभारलेल्या भव्य मंडपात येऊन पोचले.

प्रथम बार्शीचे तरुण-सुशिक्षित महार पुढारी श्री. मनोहर दादा बोकेफोडे यांनी स्वागतपर, सुंदर विचारपरिप्लुत असे भाषण केले. नंतर बाबासाहेबांनी थोड्याफार फरकाने सोलापूर प्रमाणेच अर्धा तास भाषण केले व श्री. ऐदाळे यास मते देण्यास सांगितले. यानंतर निरनिराळ्या संस्थांतर्फे हारतुरे होऊन सभा विसर्जित झाली व बाबासाहेब कुर्डुवाडीकडे रवाना झाले.

### कुर्डुवाडीची सभा

येथे जिल्हा बोर्डाचे मेंबर श्री. शंकरराव रिकीबे, कोंडीराम कांबळे, निंगापा कुमार ऐदाळे, सांगोळकर, बंदसोडे, खंडेराव मिस्त्री, भाऊसाहेब कांबळे, केसकर वगैरे मंडळीनी 'श्री. हिरालाल थिएटर' शृंगारून सर्व प्रकारची जय्यत तयारी ठेविली होती. श्री. बाळकृष्ण ऐदाळे यांचे स्वागतपर विस्तृत भाषण झाल्यावर बाबासाहेबांनी सोलापूरप्रमाणे अर्धा तास भाषण केले व ऐदाळे यासच मते देण्याची कबुली लोकांनी दिल्यानंतर हारतुरे होऊन बाबासाहेब टेंभुर्णीकडे रवाना झाले.

### टेंभुर्णीची सभा

येथे महार आणि मातंग समाजांनी आपापल्या चावडीसमोर शोभिवंत मंडप उभारून पान-सुपारीची तयारी केली होती. तेथे १०-१० मिनिटे बाबासाहेबांनी इलेक्शनसंबंधी मागील प्रमाणेच भाषण करून पान-सुपारी व हार-तुरे स्वीकारून ते करमाळ्यास रवाना झाले.

## करमाळ्याची सभा

करमाळे येथील पुढारी श्री. खंडेराव कांबळे आणि त्यांच्या साह्यकारी बांधवांनी भव्य आणि शोभिवंत अशा उभारलेल्या मंडपात पाच हजार लोकांचा समुदाय आतुरतेने मार्गप्रतीक्षा करीत बसला होता. बाबासाहेब येताच 'आंबेडकर झिंदाबाद, आंबेडकर की जय' वगैरे घोषणांनी आकाश दुमदुमले. प्रथम तेथील सुशिक्षित महार पुढारी श्री. जनार्दनराव कांबळे यांनी बाबासाहेबांचे गुणगौरवपर सुंदर आणि मुद्देसूद असे भाषण केले व बाबासाहेबांच्या सांगण्याप्रमाणे श्री. ऐदाळे यास मते देण्यास इकडील समाज आनंदाने तयार असल्याचे सांगितले. नंतर बाबासाहेबांनी सोलापूरप्रमाणेच अर्धा तासपर्यंत भाषण केले. नंतर नगरचे उमेदवार श्री. प्रभाकरराव रोहम यांनीही त्यास दुजोरा देणारे उत्तम भाषण केले. नंतर तेथील ख्रिश्चन मिशनकडील उपदेशक यांनी श्री. ऐदाळे यास दुजोरा देणारे भाषण केले. स्थानिक पुढारी श्री. खंडेराव कांबळे यांनी बाबासाहेबांचे व सभाजनांचे आभार मानून ऐदाळे यास निवडून आणण्याबद्दल करमाळे तालुका अगोदरच तयार असल्याचे सांगितले. शेवटी हारतुरे होऊन बाबासाहेबांच्या जयजयकारात सभा बरखास्त झाली व श्री. रोहम आणि नगरकडील इतर पुढारी मंडळी यांच्यासमवेत बाबासाहेब कर्जतकडे रवाना झाले.

सोलापूर जिल्ह्यातील बाबासाहेब आंबेडकर यांचा दौरा सर्वपरी यशस्वी होण्याच्या कामी ज्या कित्येक सद्‌गृहस्थांनी मदत केली त्यात सोलापूरचे अस्पृश्यांचे हितचिंतक रा. ब. डॉ. मुळे यांची मदत फारच झालेली आहे. तसेच कुर्डुवाडीचे त्यांचे मित्र श्री. हिरालाल शेठ परदेशी व बार्शी येथील स्पृश्य मंडळी यांचीही मदत झालेली आहे. जिल्ह्यातील सर्व ठिकाणच्या महार बांधवांनी झटून मदत केली. तसेच सोलापूरचे तरुण मातंग पुढारी केरू रामचंद्र जाधव, अंबाजी पिलाजी जाधव, परशुराम केशव लोंढे, शंकर मऱ्याप्पा जाधव, वमाजी धोंडी चव्हाण, भागणा परशुराम हेगडे, अप्पाजी सुभाना वाघमारे, टेंभुर्णीचे जगताप ब्रदर्स आणि बार्शीचे मनोहर गोमाजी कांबळे व प्रेमाजी आपा कांबळे या मातंग बांधवांनीही अतिशय मेहनत घेतली आहे. बार्शी भागातील मत प्रचार, मिरवणुकीची आणि मंडपातील सर्व प्रकारची व्यवस्था बार्शीकर कांबळे ब्रदर्स या मातंग बांधवांच्या सहाय्यामुळेच उत्तम अशी झाली हे त्यास भूषणावह आहे.



# ११

# खोटे दस्तऐवज करणारे गरीब, शेतकरी, कामकरी लोकांचे कल्याण करतील काय ?

अहमदनगर येथे तारीख २५ जानेवारी १९३७ रोजी आगाऊ जाहीर केल्याप्रमाणे कॅम्प सदर येथे शनीच्या देवळामागील भव्य मंडपात अस्पृश्य समाजाची अहमदनगर जिल्हा परिषद, अखिल भारतीय अस्पृश्य समाजाचे एकमेव पुढारी परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली भरविण्यात आली होती. या परिषदेला लोकसमुदाय सरासरी ५-६ हजारांवर जमला होता. जिकडे-तिकडे लोकात उत्साह व आनंद दिसत होता. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनाची लोक आतुरतेने वाट पहात होते. काही अस्पृश्य व अधिकारीवर्गही हजर होता. मंडपामध्ये पुण्याचे अर्जुनराव नलावडे, पारगावकर भानुदास, नेवासकर कवराम व पंढरीनाथबुवा हे सामाजिक पदे वीरश्रीयुक्त म्हणून लोकांची करमणूक करीत होते. तसेच म्हपाजी भिमाजी चाबुकस्वार, झखणगावकर कवी यांनी बाबासाहेबांचे गुणवर्णनपर वीरश्रीयुक्त, लोकांत शौर्य उत्पन्न होईल असे पोवाडे गाईले. बाबासाहेबांची येण्याची वेळ ८ वाजण्याची होती, परंतु दुपारचे बारा वाजून गेले तरी बाबासाहेब येईनात म्हणून काही स्पृश्य वर्गात निराशा भासू लागली. तरीपण अस्पृश्य वर्गात सारखा उत्साह व आनंद दिसत होता. वरच्यावर लोकांचे थवेच्या थवे जमून बाबासाहेबांच्या दर्शनाकरिता लोक सारखे तिष्ठत बसले होते. बाबासाहेबांच्या येण्याच्या वाटेवर त्यांचे स्वागत करण्याकरिता फर्स्ट लॉयन स्काऊट बॅन्ड व स्काऊट, राधीचा मळा येथील बलभीम स्काऊट, मातंग प्रभृति मंडळ स्काऊट, माळीवाडा, दरेवाडी येथील स्काऊट, पेवशव लाइन कॅम्प येथील मातंग स्काऊट, बाकोडी येथील स्काऊट मिळून तिनशे स्काऊट लाठी व बँडसह हजर होते. तसेच राहरीकर महार मंडळीच्या बँड, शिंग, तुताऱ्या वाद्यांच्या आवाजाने सर्व वातावरण दुमदुमून गेले होते. जिकडे तिकडे वीरश्री उत्पन्न होऊन बाबासाहेबांच्या नावाचा सारखा जयजयकार होत होता. बरोबर दुपारी २ वाजता बाबासाहेबांची मोटार येताच वाद्यांचा घनघनाट व डॉ. बाबासाहेबांच्या जयजयकाराच्या घोषणांचा सारखा गजर होत होता. बाबासाहेबांबरोबर मोटारीत श्री. प्रभाकर रोहमसाहेब, बी. एस. कदम, कर्जत; एस. आर. साळवे, नगर; विठ्ठलराव गायकवाड, नगरकर ही प्रमुख मंडळी होती. बाबासाहेबांना सर्व स्काऊटने बँडसह सलामी दिली. त्यावेळचा देखावा

---
जनता : १३ फेब्रुवारी १९३७

अत्यंत शौर्याचा व वीरश्रीचा दिसत होता. बाबासाहेबांची मोटार मध्ये घेऊन आजुबाजूस सर्व लाठीबंद स्काउट रांगेने चालत असून मध्ये बँड, शिंग, तुताऱ्या अशा वाद्यांच्या गजरात अफाट जनसमुदायासह मोठ्या थाटाने ही जंगी मिरवणूक निघाली. ठिकठिकाणी स्त्रियांचा जमाव जमलेला असून बाबासाहेबांना हार अर्पण करीत व फुले उधळत होता. मिरवणुकीनंतर बाबासाहेब सभेत स्टेजवर स्थानापन्न झाले व सभेस रीतसर सुरवात झाली. परिषदेचे सेक्रेटरी रंगनाथ मारुतीराव सूर्यवंशी यांनी जमलेल्या लोकांचे अभिनंदन करून डॉ. बाबासाहेबांनी नगर जिल्ह्याला भेट दिली याबद्दल आम्ही बाबासाहेबांचे अत्यंत ऋणी आहोत असे सांगून आभार मानले. तसेच स्वागताध्यक्ष सखाराम बाळाजी भिंगारदिवे यांनी बाबासाहेबांचे स्वागतपर भाषण करून जमलेल्या लोकांना बाबासाहेबांची ओळख करून दिली. मे. रामचंद्र मकाजी नलवडे (ढोर) व श्री. सोनवणे (ढोर), नगर येथील मातंग समाजाचे पुढारी शंकरराव साठे (माळीवाडा), महार समाजातील श्री. भाऊराव यशवंत कदम, मारुतीराव गायकवाड देहरेकर, यशवंत श्रावण पाटोळे, वगैरे मंडळीनी नगर जिल्ह्यातर्फे श्री. प्रभाकर जनार्दन रोहम यांनाच निवडून देणे किती जरूरीचे आहे असे भाषण करून प्रचंड मताने त्यास आम्ही निवडून देऊ असे बाबासाहेबांना आश्वासन दिले. नंतर स्काउट मास्तर शंकरनाथ कुशाबा कांबळे यांनी बाबासाहेबांची कर्तबगारी, चांभार समाजाचे समाजद्रोही व घातक वर्तन, काँग्रेसचे कृतघ्न धोरण यावर परिणामकारक भाषण करून श्री. प्रभाकर जनार्दन रोहम यांनाच आपल्या नगर जिल्ह्यातर्फे निवडून देण्याबद्दल लोकांना विनंती केली. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भाषण करण्यास उठताच सर्वत्र बाबासाहेबांच्या जयजयकाराच्या घोषणा व टाळ्या एकसारख्या होत होत्या.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

बंधु-भगिनींनो,

आजच्या सभेतील लोकांचा हा अलोट समुदाय आणि एकंदरीत नगर जिल्ह्यातील सर्व लोकांचा उत्साह पाहून मला आनंद वाटतो. आजची ही परिषद रा. रोहम यांचे निवडणुकीचे बाबतीत भरली आहे हे आपणास माहीत आहे. तरीपण ज्याअर्थी मी माझ्या पार्टीतून जे जे उमेदवार उभे केले आहेत त्याअर्थी त्या त्या उमेदवाराला मदत करणे हे माझे कर्तव्य आहे.

रा. रोहम यांना ह्या नगर जिल्ह्यात महार-मांग लोकांचा विरोध नाही ही आनंदाची गोष्ट होय. फक्त चांभार विरोध आहे ; पण त्याची तुम्ही पर्वा करू नका. त्यांच्या उमेदवारांना मुळीच मते देऊ नका हे मी उघड सांगतो. अस्पृश्य वर्गासाठी मिळविलेले हक्क सर्व अस्पृश्य लोकात विभागले जावेत ही गोष्ट खरी.

परंतु ह्या चांभार लोकांनी आरंभापासून माझ्या कोणत्याही कार्यात भाग घेतलेला नाही. इतकेच नाही पण मी राउंड टेबल परिषदेमध्ये स्पृश्य हिंदुंशी व सरकारशी झगडत असता आंबेडकर आमचे पुढारी नाहीत, त्यांचे म्हणणे आपण कबूल करू नये, अशा तारा पार्लमेंटला ह्या लोकांनी केल्या असून नाशिक सत्याग्रह चालू असता आपल्या लोकांवर स्पृश्य लोकांकडून जो दगडा-विटांचा वर्षाव झाला त्यात चांभार सामील होते. (धिक्कार धिक्कार, शेम शेम) हे मला पक्के माहीत आहे. तेव्हा आपण विचार करा. जे लोक माझ्या कार्याच्या आड येतात किंवा कॉंग्रेसच्या बगलेत घुसून माझ्या कार्याच्या मार्गात काटे पेरतात त्या लोकांना आम्ही आमचे का म्हणावे ? आणि त्यांनी तरी आमच्याकडे याचना का करावी ? हल्लीदेखील प्रत्येक ठिकाणी हे चांभारलोक कॉंग्रेस तिकीटावर उभे राहून आपल्या पक्षाच्या उमेदवाराला उघड-उघड विरोध करीत आहेत. तुमच्या जिल्ह्यात रा. रोहम यांना विरोध करण्याकरिता सोनवणे नावाचे गृहस्थ उभे आहेत. काही स्पृश्य लोक म्हणतात की सोनवणे हा बी. ए. एलएल. बी. झालेला असून रा. रोहम फक्त मॅट्रिक आहेत. पण अशा लाखो बी. ए. ला पुरून उरणारा मी रोहमच्या पाठीमागे आहे ना. ( प्रचंड टाळयांचा कडकडाट व बाबासाहेबांच्या नावाचा जयजयकार ) श्री. सोनवणे कोणत्याच पक्षातर्फे उभे राहिले नसल्यामुळे त्याने जर तुमच्यासाठी काहीच केले नाही तर तुम्ही कोणाला जबाबदार धराल ? रा. रोहम हे माझ्या स्वतंत्र मजूर पक्षातर्फे उभे असल्यामुळे त्यांच्या कार्याची जबाबदारी माझ्यावर आहे. (टाळया) म्हणून मी सांगतो की तुम्ही आपल्या मतांच्या तिन्ही फुल्या श्री. रोहमच्या घोड्यापुढे करा (' होय होय बाबासाहेब ' लोक ओरडतात) श्री. सोनवणे यांना एकही मत देऊ नका (नाही नाही मुळीच नाही).

ह्या देशामध्ये सुशिक्षित व श्रीमंत लोकांचे बरेचसे प्रबळ पक्ष आहेत तसा माझाही हा एक लहानसा स्वतंत्र मजूर पक्ष आहे. यापेक्षा काही पक्ष असे आहेत की, त्यांच्या आणि माझ्यामध्ये जमीन अस्मानाचे अंतर आहे व काही पक्ष असे आहेत की, त्यांच्या आणि माझ्यामध्ये थोडे अंतर आहे. कॉंग्रेस आणि माझा पक्ष यांच्यामध्ये जो फरक आहे तो म्हणजे कॉंग्रेसने श्रीमंत उमेदवार उभे केले आहेत व मी माझ्या पक्षातर्फे गरीब उमेदवार उभे केले आहेत. तत्त्वाला बाध येऊ नये म्हणून मी माझ्या समाजातील काही श्रीमंत लोक वगळले आहेत व त्यामुळे त्यांचा माझ्यावर रोष झालेला आहे. तरी पण तत्त्वाकरिता त्यांची मला कदर वाटत नाही. कॉंग्रेस गरिबांची कैवारी म्हणवते व फिरोदीया सारखा श्रीमंत मारवाडी उभा करते परंतु तुम्ही विचार करा, जे मारवाडी खोटेनाटे दस्तऐवज करून व खोटे आंगठे लाऊन तुमच्या जमीनी, घरेदारे जप्त करतात, ते मारवाडी गरीब, शेतकरी, कामकरी लोकांचे कल्याण करतील असे तुम्हाला वाटते काय ? (नाही नाही) कॉंग्रेसला आपली भांडवलशाही टिकवावयाची आहे व

तुमचे नुकसान करावयाचे आहे म्हणून तुम्ही त्यांच्या कोणत्याही भूलथापाला बळी पडू नका. तुम्ही आपल्या विरुद्ध पक्षांचा विचार करा आणि स्वतंत्र मजूर पक्षाचे उमेदवार श्री. रोहम यांनाच आपली सर्व मते द्या अशी मी तुम्हास विनंती करतो. आता जाता जाता मला, अहमदनगर कॅम्पमधील स्काउट मंडळाचे अभिनंदन केल्यावाचून राहवत नाही. तुमच्या अंगी शूरत्व बनण्यास स्काऊट हे एक साधन आहे म्हणून प्रत्येक खेडेगावच्या लोकांनी सुद्धा आपल्या ११ वर्षांच्या पुढील मुलास स्काउटचा ड्रेस केला पाहिजे. आता धोतरे नकोत. या धोतरांनी आपली फार नासाडी केली आहे. आजची ही शेकडो स्काउट मंडळी पाहून मला फार आनंद वाटतो व मी पुन्हा या स्काउट मंडळाचे मन:पूर्वक अभिनंदन करतो असे म्हणून त्यांनी आपले भाषण पुरे केले. त्या वेळेस टाळयांचा कडकडाट व त्यांच्या नावाचा जयजयकार व बँड, शिंगे, तुताऱ्या वगैरे वाद्यांनी तो भव्य मंडप दुमदुमून गेला. त्यांनी अहमदनगर कँप फर्स्ट लाईन स्काउट ट्रुप, रायीचा मळा बलभीम स्काउट, प्रगती मातंग मंडळ, माळीवाडा स्काउट, दरेवाडी स्काउट, बाकोडी स्काउट, सदर कँप मातंग स्काउट वगैरे स्काउटला यश चिंतनपर लेखी शेरे दिले. नंतर श्री. प्रभाकर जनार्दन रोहम यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी नगर जिल्ह्याला भेट दिल्याबद्दल बाबासाहेबांचे आभार मानले व जमलेल्या सर्व लोकांनी व मतदारांनी माझ्या विषयी जी निष्ठा द प्रेम व्यक्त केले त्याबद्दल मी सर्व समाजाचा अत्यंत ऋणी असून आपल्या नगर जिल्ह्याने इलेक्शनच्या बाबतीत जी धडाडी दाखविली ती अत्यंत वाखाणण्यासारखी असून अभिनंदनास पात्र आहे असे स्फूर्तिदायक भाषण केल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते फर्स्ट लॉयन स्काउटचे (जुने) कॅप्टन ल. बा. बनसोडे, बलभीम स्काउटचे कॅप्टन श्रीपतराव गायकवाड, दरेवाडी स्काउटचे कॅप्टन कुंडलिक भिंगारदिवे, बाकोडी स्काउटचे कॅ. किसनराव, मातंग प्रगती मंडळ स्काउटचे कॅ. किसनराव पारधे यांना व व्यायाम मंडळाचे वस्ताद यशवंत श्रावण पाटोळे, राहुरीचे बँड मास्तर नामदेव साळवे यांना रौप्य पदक अर्पण करण्यात आले. शेवटी सर्व संस्थेतर्फे बाबासाहेबांना हार अर्पण करण्यात आले. नंतर बाबासाहेब यांच्या जयजयकारात ही जंगी सभा बरखास्त झाली.



## १००

# भूलथापास बळी न पडता सावधगिरीने वागले पाहिजे

अखिल भारतीय अस्पृश्य समाजाचे एकमेव पुढारी व स्वतंत्र मजूर पक्षाचे संस्थापक डॉ. बाबासाहेब आंबेडकर, एम. ए., पीएच. डी., बार-ॲट-लॉ हे दिनांक २५ जानेवारी १९३७ रोजी सोलापूर व नगर जिल्ह्यातील दौरा संपवून रात्री साडे तीन वाजता जळगाव स्टेशनवर आले. त्यांचे बरोबर पूर्व खानदेशातील स्वतंत्र मजूर पक्षाचे उमेदवार श्री. दौलतराव गुलाजी जाधव, बी. ए. हे होते. जामनेरला पोचल्यावर जंगी मिरवणूक काढण्यात आली. मिरवणूकीचे सभेत रुपांतर झाल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभेला संबोधित करताना म्हणाले,

आज मी दौऱ्यावर का निघालो, आपणास कळले आहे. येत्या सुधारणा कायद्यानुसार आपणास मुंबई कायदे कौन्सिलमध्ये १५ उमेदवार निवडून देण्याचा अधिकार मिळाला आहे. राज्यघटनेनुसार स्थापन होणाऱ्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये एकूण १७५ सभासद असतात. त्यांच्या मानाने आपले थोडे आणि तेही जर एकजुटीने राहिले नाहीत तर आपले काहीच हित साधणार नाही. सर्व लोक एकजुटीने राहाण्यास ते कोणत्यातरी पक्षास निगडित झाले पाहिजेत. तुमच्या जिल्ह्यातर्फे मी माझ्या पक्षातर्फे श्री. जाधव ह्यांची निवड केली आहे. त्यांना विरोध करणारे श्री. मेढे, बिऱ्हाडे किती लायकीचे आहेत ते आपणास माहीत आहे. जाधव जर पुढे तुमच्या इच्छेप्रमाणे वागणार नाही तर त्याला जबाबदार मी आहे पण श्री. मेढेच्या बाबतीत तुम्ही कोणास जबाबदार धरणार ? दुसरी गोष्ट म्हणजे कायदे कौन्सिलमध्ये सर्व कामे इंग्रजीतून चालत असल्यामुळे तुमची गाऱ्हाणी मांडण्यास चांगला इंग्रजी जाणणारा मनुष्य पाहिजे. त्या गोष्टीस लायक इसम फक्त श्री. जाधव आहे. श्री. जाधव काही माझा नातलग नाही व इतर उमेदवार माझे शत्रू नाहीत पण ज्या त्या कामास जो तो मनुष्य नेमणे माझे कर्तव्य आहे. तुम्हास हा हक्क मिळू नये म्हणून महात्मा गांधी सारख्या लोकांनी प्राणांतिक उपवास आरंभिला होता परंतु त्यास न जुमानता हा हक्क आम्ही मिळविला आहे. त्याचा उपयोग करणे आता तुमच्या स्वाधीन आहे. तुम्हास बळी पाडण्याकरिता काही लोक तुमच्या करिता बोर्डिंगे काढतात, चहादारी करतात पण ते सर्व अगदी थोडावेळ टिकणारे आहे. तेवढ्याने आपला

---

जनता : ६ फेब्रुवारी १९३७.

उद्धार होणार नाही. आपणास अजून पुष्कळ मिळवावयाचे आहे व ते मिळविण्याकरिता तुम्ही आता अगदी सावधगिरीने वागले पाहिजे. श्री. मेढे यांना मदत करणारे काही मास्तर लोक आहेत असे ऐकतो. पण ते त्याला का मदत करतात त्याचे कारण समजत नाही. पण त्यात एक कारण दिसते ते हे की मेढे हा स्कूलबोर्ड मेंबर आहे व त्याची पार्टी सोडल्यावर आपली बदली करेल. पण त्या मास्तर लोकांना मला हे सांगावयाचे की, मेढे काही कायमचा सिंहासनावर बसला नाही. तो या वर्षी आहे तर पुढे नाही. समजा पुढील वेळी श्री. जाधव स्कूलबोर्डात निवडून आले तर मग हे मास्तर लोक कोणाच्या तोंडाकडे पहातील ? मला तुम्हाला हे सांगावयाचे की, माझे कर्तव्य मी पार पाडले आहे आता तुमचे कर्तव्य राहिले आहे. कोणाच्या भुलथापास बळी न पडता तुम्ही अगदी सावधगिरीने वागले पाहिजे.

श्री. जाधवांजवळ काही मोटार गाड्या नाहीत किंवा पैसा नाही. तुम्ही घरची भाकरी पाठिशी बांधून पोलीस स्टेशनवर गेले पाहिजे. या देशात मत देणे म्हणजे उमेदवारावर उपकार करणे असा समज झाला आहे पण तो खरा नाही. उमेदवार जाणार तो कोणाकरिता जातो हे समजाऊन घेतले पाहिजे. उमेदवार हा तुमची गाऱ्हाणी सांगण्याकरिता व त्याचे निवारण कसे करावयाचे याचे कायदे करण्याकरिता जात असतो. आपणास जे काही मिळवावयाचे ते कायद्याने मिळणार आहे अशी स्थिती लक्षात घेऊन तुम्ही श्री. जाधव यांनाच आपली सर्व मते देऊन निवडून आणावे, अशी विनंती करून त्यांनी भाषण संपविले. भाषण झाल्यावर सर्वांनी जाधवांनाच मते देण्याची जाहीर घोषणा केली.



# केवळ निवडणुकीत विजय मिळविल्याने चळवळीचे कार्य संपले असे समजू नका

'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्थापन केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षातर्फे मुंबई प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये निरनिराळया जिल्ह्यातील विभागांमध्ये जे स्पृश्यास्पृश्य उमेदवार निवडणुकीसाठी उभे केले होते त्यापैकी तीन चार उमेदवारांच्या अपयशाशिवाय बहुतेक सर्व उमेदवार यशस्वी झाले आहेत. मुंबई शहर व उपनगर विभागाच्या निवडणुकीत मोठी चुरस लागलेली होती. या विभागातर्फे स्वतंत्र मजूर पक्षाचे फक्त दोनच उमेदवार उभे होते. त्यापैकी या नवीन पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर काँग्रेसच्या कसोशीच्या विरोधाशी धैर्याने टक्कर देऊन विजयी झाले आहेत. याशिवाय विजापूर, नाशिक, पुणे, सातारा, बेळगाव, अहमदनगर, पूर्व खानदेश, ठाणे, रत्नागिरी, सोलापूर वगैरे ठिकाणचे उमेदवार बहुमताने निवडून आले आहेत. रत्नागिरी जिल्ह्यातून आपल्या पक्षातर्फे तीन उमेदवार उभे होते. त्यापैकी हे तिघेही उमेदवार निवडून आले आहेत. भाई चित्रे, श्री. शामराव परुळेकर व भाऊसाहेब गडकरी यांच्या विजयामुळे, स्वतंत्र मजूर पक्षाचे बळ वाढले आहे.

| यशस्वी उमेदवारांची नावे | मिळालेली मते |
|---|---|
| मुंबई इ व एफ वार्ड– | |
| डॉ. बी. आर. आंबेडकर | १३,२४५ |
| पुणे पश्चिम विभाग– | |
| श्री. आर. आर. भोळे | १२,१११ |
| सातारा उत्तर भाग– | |
| श्री. खंडेराव सखाराम सावंत | ६,७३६ |
| पुणे पूर्व भाग– | |
| श्री. विनायकराव आ. गडकरी | ८,२६७ |
| ठाणे दक्षिण विभाग– | |
| श्री. रामकृष्ण गंगाराम भातनकर | ४,२३३ |
| रत्नागिरी उत्तर भाग– | |
| श्री. अनंतराव वि. चित्रे | ९,२६८ |
| श्री. गंगाराम रा. घाटगे | ५,५२३ |

रत्नागिरी दक्षिण भाग–

श्री. शामराव विष्णु परुळेकर ७,५८९

अहमदनगर दक्षिण भाग–

श्री. प्रभाकर जनार्दन रोहम ८,९८५

सोलापूर उत्तर भाग–

श्री. जिवाप्पा सुभान ऐदाळे ७,६६२

पूर्व खानदेश पूर्व भाग–

श्री. दौलतराव गुलाजी जाधव ९,५१९

नाशिक पश्चिम भाग–

श्री. भाऊराव कृष्णराव गायकवाड १६,६०५

बेळगाव उत्तर भाग–

श्री. बळवंत हनुमंत वराळे २१,३२२

ठाणे जिल्हा उत्तर विभाग–

श्री. दत्तात्रय वामन राऊत १०,१२५

डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांनी उभे केलेले अस्पृश्य वर्गीय उमेदवार आणि इतर स्पृश्य उमेदवार निवडून येऊ नयेत म्हणून कॉंग्रेसादी पक्षांनी जितके विरोधी वातावरण निर्माण करता येईल तितके शिकस्तीचे प्रयत्न पैशाच्या बळावर केले. डॉ. बाबासाहेबांविषयी खोडसाळपणाच्या बातम्या प्रसिद्ध करून त्यांच्या उज्ज्वल चारित्र्याला काळिमा लाविण्याचा आटोकाट प्रयत्न केला परंतु या सर्व प्रकारच्या विरोधी परिस्थितीला टक्कर देऊन डॉक्टरसाहेब विजयी झाले ही गोष्ट अपूर्व नाही असे कोण म्हणेल ? ''[१]

'' स्वतंत्र मजूर पक्षाच्या वतीने कायदेमंडळाच्या निवडणुकीत यशस्वी झालेल्या प्रतिनिधींचे अभिनंदन करण्यासाठी पक्षाच्या विद्यमाने रविवार ता. ३० मे १९३७ रोजी संध्याकाळी परळ येथील कामगार मैदानावर डॉ. पी. जे. सोळंकी, जे. पी. यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती.

कायदेमंडळाचे प्रतिनिधी आणि निमंत्रित सन्माननीय पाहुणे यांना बसण्यासाठी उच्चासनावर गादीच्या खुर्च्या व मखमलीची कोचे ठेवण्यात आली होती. मैदानात लॉऊडस्पीकर लावण्यात आले होते. ठिकठिकाणी किटसन् लाईट लावले होते. सभेला १५ हजारावर लोकसमुदाय जमला असून हजार बाराशे स्त्रिया होत्या.

---

[१] जनता : २७ फेब्रुवारी १९३७.

सभेची व्यवस्था ठेवण्यासाठी समता सैनिक दलाची अनेक पथके बोलविण्यात आली होती व त्यांनी सभेची शिस्त उत्तम राखली होती. उच्चासनावर पक्षाच्या यशस्वी प्रतिनिधींपैकी श्री. अ. वि. चित्रे, एस. व्ही. परुळेकर, आर. जी. भातनकर, भाऊराव गायकवाड, डी. जी. जाधव, जी. आर घांगुर्डे, पी. जे. रोहम, बी. एच. वराळे व जे. एस. ऐदाळे हजर होते. त्याचप्रमाणे खालसा कॉलेजचे प्रिन्सीपाल काशिमरासिंग, प्रो. रॉय, श्री. समर्थ, बार-ॲट-लॉ, श्री. खांबे, श्री. डी. व्ही. प्रधान, कमलाकांत चित्रे, कद्रेकर, प्रिन्सिपॉल दोंदे, श्री. केनी, जे. पी., बापूसाहेब सहस्त्रबुध्दे, मुसाढकरबुवा, मघाळे, आर. आर. पवार, धो. ना. पगारे, काळोखे, सुभेदार देवरुखकर वगैरे मंडळी होती. बरोबर ७ वाजता नियोजित अध्यक्ष डॉ. सोळंकी, डॉ. आंबेडकर व इतर प्रतिनिधी सभेच्या मंडपात आले. समता सैनिक दलाच्या स्वयंसेवकांनी गार्ड ऑफ ऑनर देऊन त्यांचा सन्मान केला. सर्व मंडळी स्थानापन्न झाल्यावर सभेच्या कामाला सुरुवात झाली. श्री. चां. ना. मोहिते यांनी अध्यक्षाची सूचना दिल्यावर डॉ. सोळंकी अध्यक्षस्थानी विराजमान झाले. त्यानंतर अध्यक्षांच्या परवानगीने सवादकर यांनी पुढील ठराव सभेपुढे मांडले. स्वतंत्र मजूर पक्षातर्फे मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्ये निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या अभिनंदनाचा ठराव मांडण्यास मला फार आनंद वाटतो. सर्व सभासदांचे स्वतंत्र मजूर पक्षाच्या विद्यमाने भरलेली ही जाहीर सभा अंतःकरणपूर्वक अभिनंदन करिते.

वरील ठरावावर भाषण करताना सुभेदार सवादकर म्हणाले '' स्वतंत्र मजूर पक्षातर्फे निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या अभिनंदनाचा ठराव मांडण्यास मला फार आनंद वाटतो. अस्पृश्य वर्गाचा लढा सर्व भारतात यशस्वीपणे लढवून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी शेतकरी कामकरी लोकांच्या हितासाठी स्वतंत्र मजूर पक्ष स्थापन केला. निवडणुकीच्या वेळी काँग्रेसने आमच्या पक्षाला हाणून पाडण्यासाठी सर्व तऱ्हेचे प्रयत्न केले, परंतु काँग्रेसला हार खावी लागली. आमच्या पक्षाचा विजय झाला. आपले निवडून आलेले सर्व प्रतिनिधी हे आघाडीचे वीर आहेत. ते आपली जबाबदारी उत्तम प्रकारे पार पाडतील याबद्दल कोणी शंका बाळगू नये.''

या ठरावाला श्री. शां. अ. उपशाम यांनी अनुमोदन दिले. त्यांच्या अनुमोदनपर भाषणानंतर अध्यक्षांनी ठराव मतास टाकला व टाळयांच्या प्रचंड कडकडाटात तो मंजूर झाला. त्यानंतर यशस्वी सभासदांना श्री. रेवजीबुवा डोळस व श्री. संभाजी गायकवाड यांनी हारतुरे अर्पण केले. नंतर प्रत्येक यशस्वी सभासदाने आपले अभिनंदन केल्याबद्दल जमलेल्या मंडळीचे आभार मानिल्यावर अध्यक्षांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना भाषण करण्याची विनंती केली.

टाळयांच्या प्रचंड कडकडाटात उभे राहून डॉ. आंबेडकरांनी आपल्या भाषणास सुरवात केली, ते म्हणाले.

प्रिय बंधुंनो आणि भगिनींनो,

या ठिकाणी माझ्याबरोबर स्वतंत्र मजूर पक्षातर्फे निवडून आलेल्या सर्व सभासदांचे अभिनंदन करण्यात आले असे असता या प्रसंगी भाषण करण्याची जबाबदारी माझ्या एकट्यावर का टाकण्यात यावी, हे मला कळत नाही. तरीपण आपल्या इच्छेला मान देऊन मी दोन शब्द बोलणार आहे. मी आपल्या सार्वजनिक आयुष्यक्रमाची सुरुवात केल्यापासून तो अगदी गेल्या वर्षापर्यंत अस्पृश्य वर्गाच्या चळवळीतच कार्य करीत होतो. परंतु बदललेल्या परिस्थितीला अनुसरून मी आपल्या कामाची दिशा बदलली आणि यापुढे धर्म आणि जात यांचा विचार न करता सर्व शेतकरी-कामकरी वर्गाच्या हिताच्या दृष्टीने कार्य करण्याकरिता सुरुवात केली. मी स्थापन केलेला स्वतंत्र मजूर पक्ष हाच माझ्या बदललेल्या कार्यक्रमाचा द्योतक आहे. गेल्या निवडणुकीत स्वतंत्र मजूर पक्षाने स्पृहणीय यश मिळविले ही गोष्ट खरी असली तरी आमच्यातील दोन कळकळीचे कार्यकर्ते, डॉ. सोळंकी व सुभेदार सवादकर, हे निवडणुकीत अयशस्वी झाले, याबद्दल माझ्याप्रमाणेच आपणा सर्वांना वाईट वाटत असेल यात शंका नाही. निवडणुकीत अपयश आले असून देखील आजच्या या अभिनंदनाच्या सभेत त्यांनी मोठ्या आनंदाने आणि उत्साहाने भाग घेतला आहे. यावरून त्यांच्या मनाचा मोठेपणा व्यक्त होत आहे. डॉ. सोळंकी यांना असेंब्लीच्या निवडणुकीत जरी अपयश आले असले तरी लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये सरकार नियुक्त सभासद म्हणून बसण्याची संधी त्यांना लाभेल, अशी मला आशा आहे.

लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकीत विजयी झाल्याबद्दल अभिनंदन करण्याला कोणता एखादा पक्ष पात्र असेल तर तो स्वतंत्र मजूर पक्षच होय. कारण, स्वतंत्र मजूर पक्षाला ज्या इतर पक्षांबरोबर टक्कर द्यावी लागली ते सर्व पक्ष आमच्यापेक्षा अनेक पटीने प्रबल होते. ते सधन आणि संघटित असून त्यांना सर्व प्रकारची परिस्थिती अनुकूल होती. मुंबई इलाख्यात काँग्रेस, ब्राह्मणेतर, मुसलमान, ख्रिश्चन वगैरे अनेक पक्षातील उमेदवार निवडणूक लढवीत होते. त्यापैकी मुसलमानांनी सवत्या-सुभ्याचे काटेरी कुंपण आपल्याभोवती घातलेले होते. आमचा व काँग्रेसचा आखाडा एकच होता. आमच्या बरोबर ब्राह्मणेतर पक्षही त्याच आखाड्यात उतरला होता. परंतु स्वतःला लढवय्ये म्हणविणाऱ्या ब्राह्मणेतर पक्षाची काँग्रेसने कशी धुळधाण उडवून दिली हे सर्वांनी पाहिलेच आहे. त्याचप्रमाणे इतर पक्षांच्या पदरीही अपयश आले. परंतु काँग्रेस बरोबर झालेल्या संग्रामात जर कोणता पक्ष विजयी झाला असेल तर तो

एकटा स्वतंत्र मजूर पक्षच होय. आमच्या पक्षाजवळ पैसा नव्हता, संघटना नव्हती. केवळ स्वतःच्या चिकाटीने प्रचार कार्याच्या बळावरच आमची १४ माणसे निवडून येऊ शकली आणि काँग्रेससारख्या बलवान पक्षाशी दोन हात करून, विजय मिळवून अधिकाराने अभिनंदन समारंभ साजरा करण्याचा हक्क आमच्या पक्षाला प्राप्त झाला आहे. निवडणुकीत इतर पक्षांची जी दैना झाली आहे, तिच्याशी तुलना करता स्वतंत्र मजूर पक्षाने मिळविलेला विजय अपूर्व होय, ही गोष्ट आमच्या शत्रुंनाही कबूल करावी लागेल.

आपल्या इलाख्याप्रमाणे इतर प्रांतांच्या असेंब्लीतही अस्पृश्य वर्गाला जागा राखून ठेवलेल्या आहेत. परंतु मुंबई व्यतिरिक्त इतर प्रांतात काँग्रेसने अस्पृश्यवर्गीय उमेदवारांच्या निवडणुकीत अक्षम्य ढवळाढवळ केली. मुंबई प्रांतात मात्र आम्ही आमचा लढा वीरवृत्तीने लढविला. कुस्तीकरता एकदा दंड ठोकून उभे राहिल्यावर ज्याला जो डाव साधेल त्याने तो करून विजय मिळवावा यात काही वावगे नाही. तथापि, महाभारतात सांगितले आहे की, धर्मयुद्ध करून नीतीने मिळविलेल्या विजयाची थोरवी आणि आनंद श्रेष्ठ प्रतीचा असतो. दुर्दैवाने गेल्या निवडणुकीच्या युद्धात काँग्रेसने धर्मनीती ठेवलेली नव्हती. ठळक उदाहरणे द्यावयाची झाल्यास अनेक आहेत. मी फक्त एकाच उदाहरणाचा येथे उल्लेख करणार आहे. अलाहाबाद येथे काँग्रेसच्या अधिपतीच्या प्रांतात त्याच सर्वाधिकारी म्हणविणाऱ्या व्यक्तिकडून गेल्या निवडणुकीत घडलेले आचरण अगदी हीन वृत्तीचे नव्हते, असे कोण म्हणेल ? अलाहाबाद शहरात अस्पृश्य समाजाकरिता एक जागा राखून ठेवण्यात आली आहे. या जागेकरिता दोन उमेदवार उभे होते. त्यात अस्पृश्य समाजासाठी ज्याने कित्येक वर्षे तन-मन-धनाने कार्य केले असा एक लायक, अनुभवी आणि जुना पुढारी उभा होता. त्याच्याविरुद्ध काँग्रेसचे पंचप्राण म्हणविणारे पंडित जवाहरलाल नेहरू यांनी आपला हरी नावाचा एक सांगकाम्या नोकर उभा केला. अस्पृश्य पुढाऱ्याच्या आजपर्यंतच्या समाज सेवेच्या तुलनेने पाहता या हरी पाणक्याची पात्रता किती असेल हे न सांगताही समजण्यासारखे आहे. काँग्रेसच्या पुढाऱ्यांना अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांपेक्षा हरीची कर्तबगारी श्रेष्ठ प्रतीची वाटली. परंतु आपल्याला असल्या गोष्टीची पर्वा बाळगण्याची जरूर नाही. युद्धाला एकदा उभे राहिल्यावर रडत-राऊताची वृत्ती स्वीकारण्यात काहीच अर्थ नाही. सुरत येथे डॉ. सोळंकीच्या उमेदवारीच्या वेळी तीच गोष्ट केली. काँग्रेसने डॉ. सोळंकी यांच्याविरुद्ध एका चपराशाला उभे केले होते. या सर्व गोष्टींचा विचार करता गेल्या निवडणुकीत आपला जो विजय झाला तो सामान्य प्रतीचा खास नव्हे. मगराच्या मगर-मिठीतून आणलेला हा एक दिव्य मणी आहे. अर्थातच आपण आज जो विजय मिळविला तो अखेरचा विजय नव्हे. केवळ निवडणुकीत

विजय मिळविल्याने आपल्या चळवळीचे कार्य संपले, असे समजू नका. नवीन कायदेमंडळाची मुदत पाच वर्षांची असली तरी या मुदतीच्या आत देखील हे कायदेमंडळ मोडून टाकण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. असा प्रसंग केव्हा येईल हे आज जरी सांगता आले नाही तरी फेरनिवडणुकीसाठी आपण आपल्या पक्षाची सर्व प्रकारची जय्यत तयारी ठेवली पाहिजे आणि सूचना मिळताच अवघ्या पाच मिनिटात आपण निवडणुकीच्या संग्रामाला सिद्ध झाले पाहिजे. स्वतंत्र मजूर पक्षाने आज बहुजन समाजात जो आत्मविश्वास आणि जागृती निर्माण केली आहे ती अखंड चालू ठेवण्याची योग्य खबरदारी आपण सर्वांनी घेणे अत्यंत जरूर आहे. पक्ष संघटनेच्या दृष्टीने ठिकठिकाणी पक्षाच्या शाखा स्थापन केल्या पाहिजेत. काँग्रेस पक्षाबरोबर पुनश्च दोन हात करण्याचा प्रसंग आल्यास आपल्या पक्षाचा जोम पूर्वीपेक्षाही अधिकच वाढलेला आहे, ही गोष्ट आपण जगाच्या निदर्शनास आणून दिली पाहिजे.

जाता जाता चालू परिस्थितीविषयी दोन शब्द बोलणे जरूर आहे. तुम्हाला ठाऊकच आहे की, आज राजकीय क्षेत्रात जिकडे तिकडे थंड वातावरण निर्माण झालेले आहे. सारा राजकीय खेळ बंद झाला आहे आणि सर्वबाजूला उद्वेगजनक परिस्थिती दृष्टोत्पत्तीस येत आहे. मात्र या परिस्थितीची जबाबदारी आपल्यावर बिलकुल नाही. राजकारणात अल्पसंख्य पक्षाला पुढाकार घेऊन काही करता येत नाही. लोकहितासाठी काहीतरी भरीव स्वरूपाचे कार्य करण्याची कायदेमंडळातील जबाबदारी आमच्याकडून पार पडली नाही तर त्याचा दोष ज्यांनी हा विपरीत प्रसंग निर्माण केला त्यांच्याच डोक्यावर बसेल. आज राजकारणाचा डाव बंद पडला असला तरी ज्या दिवशी हा डाव नव्याने सुरू होईल, त्यावेळेस जरूर असणारी तयारी आमच्याजवळ मजबूत आहे. आम्हाला जे कायदे घडवून आणावयाचे आहेत त्यांचे बार आमच्याजवळ भरून तयार आहेत. टारगेट लावण्याची खोटी की, आम्ही एकदम आमचे पिस्तूल झाडणार आहोत. आज जरी सर्वत्र निराशेचे वातावरण पसरलेले असले तरी लवकरच आशायुक्त परिस्थिती निर्माण झाल्याशिवाय राहणार नाही. तुम्हाला निराश होण्याचे बिलकूल कारण नाही. प्रांतिक कायदेमंडळात जी माणसे तुमच्यातर्फे निवडून गेली आहेत ती तुमच्या हितासाठी सदैव जागृत राहतील, असे मी तुम्हाला आश्वासन देतो.

काँग्रेसशिवाय इतर पक्षांतर्फे निवडून आलेल्या उमेदवारांना आपला पक्ष सोडून काँग्रेसमध्ये जावे, असे वाटत आहे. परंतु आम्ही अशा दुबळ्या वृत्तीने काँग्रेसला कधीच मिळणार नाही. आम्हाला श्रमजीवी बहुजन समाजाच्या सर्वांगीण हितासाठी स्थापन केलेला स्वतंत्र मजूर पक्ष जिवंत ठेवावयाचा आहे. आमची १४ जणांची संख्या अल्प असली तरी आम्हाला लाभालोभासाठी कोणत्याही संस्थेत

विरून जावयाचे नाही. काँग्रेस ही संस्था सर्व प्रकारच्या लोकांची खिचडी आहे. भांडवलदार-मजूर, जमीनदार-शेतकरी, खोत-सावकार व कुळे, शत्रू-मित्र अशा परस्पर विरोधी वर्गांचा सबगोलंकारी पक्ष म्हणजेच काँग्रेस होय. अशा सबगोलंकारी काँग्रेसकडून गोरगरिबांचे कधीही कल्याण होणार नाही. आपला स्वतंत्र मजूर पक्ष कामकरी व शेतकरी वर्गावर श्रीमंतांकडून जो जुलूम व अन्याय होत आहे तो नाहीसा करण्यासाठी स्थापन झालेला आहे. काँग्रेसच्या आजच्या परिस्थितीवरून पाहता तिच्यामध्ये पुढे मागे दुफळी झाल्याशिवाय राहणार नाही, याची मला खात्री आहे आणि त्यावेळी काँग्रेसमधील आपल्या विचाराची माणसे आपल्या पक्षाला येऊन मिळतील, याबद्दलही मला शंका वाटत नाही.

तात्पुरत्या लाभाकरिता आम्ही काँग्रेसला मिळून अप्रामाणिकपणा करू शकत नाही. आम्हाला राष्ट्रकार्य करावयाचे आहे. सार्वजनिक हिताच्या प्रश्नासंबंधी एकमत होईल त्यावेळी तात्पुरते भेदभाव विसरून आम्ही काँग्रेसबरोबर सहकार्य करू परंतु सर्व प्रकारचे भेदभाव कायमचे विसरून काँग्रेसबरोबर एकजीव होणे आम्हाला कधीच शक्य होणार नाही.

सध्याच्या तात्पुरत्या मंत्रीमंडळात मी दिवाणगिरी का स्वीकारली नाही ? असा प्रश्न पुष्कळ लोक मला विचारतात. त्याचे उत्तर एवढेच की, ज्या मंत्रीमंडळाला बहुमताचा पाठिंबा नाही ते मंत्रीमंडळ फार दिवस टिकणे शक्य नाही आणि असल्या औटघटकेच्या राज्यकारभारात भाग घेण्याने कोणत्याही तऱ्हेचा फायदा होऊ शकत नाही.

मंत्रीमंडळे बनविण्याचे नाकारून काँग्रेसने राजकारणाच्या गाड्याला खीळ घालण्याचा जो सध्या प्रयत्न चालविलेला आहे त्यापासून काँग्रेसचा काहीएक फायदा होणार नाही. काँग्रेसने गव्हर्नराकडून मागितलेले आश्वासन अगदीच अनावश्यक आहे. काँग्रेस पक्षाच्या पुढाऱ्यांनी अधिकारपदे स्वीकारून राज्यकारभार चालविणे हाच मार्ग काँग्रेसच्या दृष्टीनेदेखील श्रेयस्कर आहे. राज्य घटना मोडण्याचे धोरण स्वतंत्र मजूर पक्षाला मान्य नाही. घटना रद्द झाल्यास पिळल्या जाणाऱ्या शेतकरी-कामकरी वर्गाची दुःखे आणि गाऱ्हाणी थोड्याबहुत प्रमाणात नाहीशी करण्याचा मार्गदेखील बंद होईल. काँग्रेसचा साम्राज्यशाही विरोधी लढा संपेपर्यंत आम्ही आपली दुःखे उराशी बाळगून कष्ट सोशीत बसण्याला मुळीच तयार नाही. कायदेमंडळापुढे मांडावयाच्या कायद्याचे मसुदे आमच्या खिशात तयार आहेत. आम्ही फक्त खेळ सुरू होण्याचीच वाट पाहात आहोत. ''[१]



[१] जनता : १२ जून १९३७.

# १०२

# शिस्त व संघटना हेच आपल्या पक्षाचे ध्येय

स्वतंत्र मजूर पक्षातील मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या सभासदांची पहिली सभा मंगळवार तारीख २० जुलै १९३७ रोजी पुणे येथे अहिल्याश्रमात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती.

कौन्सिलमधील कामकाजासंबंधी नियम वगैरे पास करण्यात आल्यावर स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी या नात्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या पक्षाची कडक शिस्त व संघटना याची जाणीव करून दिली. कोणत्याही पक्षाला आपले नैतिक बलाने कार्य करावयाचे असेल तर त्याने शिस्त व संघटना या दोन गोष्टींकडे प्रथम लक्ष दिले पाहिजे. आपल्या अंगिकारलेल्या कार्यात प्रथम अपयश मिळाले तरी हरकत नाही. परंतु आपण आपल्या ध्येयापासून कधीही अलिप्त होता कामा नये. मनुष्याच्या अंगी जितके नैतिक बल अधिक असेल तितका त्याचा आत्मविश्वास वाढत जाऊन पराजयातूनही त्याला शेवटी सन्मानाचे यश मिळविता येते. इंग्लंडमधील निरनिराळ्या राजकीय पक्षांचे सिंहावलोकन आपण केल्यास तेथेही शिस्त आणि संघटना याची जिवाभावाची सांगड झालेली दिसून येईल. इंग्लंड मधील एकेकाळी चिमुकला वाटणारा मजूर पक्ष, शिस्त आणि संघटनेच्या बळावरच शेवटी अधिकारारूढ झालेला आपण पाहिला आहे. परंतु त्यांची पूर्वीची शिस्त व संघटना थोडीशी ढासळताच तो पक्ष अधिकारपदावरून कसा घसरला याचेही प्रत्यंतर आपण पाहिले आहे.

जगातल्या राजकीय घडामोडीत यश मिळविणे काही सोपे काम नव्हे. त्यासाठी एक प्रकारची तपश्चर्याच करावी लागते. आपला पक्ष सबळ होण्यासाठी आपणामध्ये कोणत्या प्रकारच्या उणीवा आहेत या गोष्टीकडे प्रथम लक्ष द्यावे लागते. राजकीय स्वरूपाच्या पक्षात नुसत्या श्रीमंतांचा व आपल्या आवडत्या माणसांचा समावेश करून भागत नसते. निरनिराळ्या विषयांवर अध्ययन केलेले आणि निरनिराळ्या विषयांवर तज्ज्ञ म्हणून ज्यांना संबोधिता येईल अशाच माणसांना आपापल्या पक्षाच्या जबाबदारीच्या जागांवर नेमून कार्याची दिशा आखावी लागते. भावनामय, प्रभावी भाषेने अज्ञ जनतेची दिशाभूल करून

---

जनता : ३१ जुलै १९३७.

संख्येने मोठा असलेल्या पक्षापेक्षा शिस्त, संघटना व उज्ज्वल ध्येयाची जाणीव असलेला अल्पसंख्यांक लोकांचा लहानसा पक्ष शेवटी राजकीय क्षेत्रात खरा प्रभावी ठरून यशस्वी होतो. आपला स्वतंत्र मजूर पक्ष आज दिसायला लहान असा पक्ष आहे. परंतु आपण आखलेल्या ध्येयमुक्त कार्याची रुपरेषा ही इतकी उज्ज्वल अशी आहे की, त्यात आपणास पुढेमागे अपूर्व यश मिळाल्याशिवाय राहाणार नाही.

मुंबई असेंब्लीतील स्वतंत्र मजूर पक्षाच्या आमदारांनी या गोष्टींना प्रत्यक्ष आचरणात आणण्याचा प्रयत्न करावा. त्यांनी शिस्त व संघटना या बाबी आपल्या पक्षात सामील होणाऱ्या प्रत्येक सभासदांच्या हृदयावर पूर्णपणे बिंबविण्याचाही प्रयत्न करावयास पाहिजे. बहुजन समाजाशी समरस होण्याचा आपल्या पक्षाचा कार्यक्रम आहे. गोरगरीब, कामकरी व शेतकरी वर्गाचे हितरक्षण करणे हे आपल्या पक्षाचे पहिले कार्य आहे. ते कार्य करण्यासाठी आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाची शिस्तीने संघटना वाढून आपल्या ध्येयाचा मार्ग आक्रमण करण्याचा आजच संकल्प करावा. निःस्वार्थवृत्तीने केलेल्या कार्यात आपणास खात्रीने यश मिळेल यात बिलकूल शंका नाही.



# १०३

# साम्राज्यशाहीपेक्षा ब्राह्मण्य हजारोपट वाईट

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना ता. ३१ जुलै १९३७ रोजी धुळे येथे काही कोर्टाच्या कामाकरिता जावयाचे होते. ते शुक्रवारी रात्रीच्या गाडीने येथून निघाले. त्यांची गाडी ता. ३१ रोजी सकाळी ५ वाजता चाळीसगाव येथे आली. डॉ. बाबासाहेब चाळीसगावाहून धुळे येथे जाणार ही बातमी ऐकून हजारो अस्पृश्य बंधुभगिनी त्यांचे हार्दिक स्वागत करण्याकरिता मोठ्या पहाटे पासून चाळीसगाव स्टेशनवर येऊन हजर होती. अगदी अवचित सर्व स्टेशन स्त्रीपुरुष व मुलांनी फुलून ते डॉ. आंबेडकर साहेबांचा सारखा जयघोष करीत तेथे उभे होते.

गाडी बरोबर ५ वाजता स्टेशनमध्ये आली. डॉक्टरसाहेब हास्यवदन करीत गाडीतून उतरताच 'आंबेडकर झिंदाबाद' असा त्रिवार प्रचंड जयघोष झाला. आरंभी मे. एस. एस. कर्णिक, चीफ ऑफीसर व अस्पृश्योद्धारक बोर्डिंग बिल्डिंग फंड कमिटीचे सेक्रेटरी व मे. चव्हाण यांनी त्यांची मुलाखत घेतली. नंतर श्री. दिवाण चव्हाण यांच्या बोर्डिंगतर्फे आणलेला हार श्री. डी. जी. जाधव, बी.ए., एम.एल.ए. यांनी डॉक्टरसाहेबांच्या गळ्यात घातला. त्यानंतर रांजणगाव तेथील भगिनी श्रीमती सखुबाई कन्नडकर, सोनाबाई कन्नडकर, सावित्रीबाई अहिरे वगैरे भगिनींनी त्यांची पंचारती केली व त्यांना वंदन केले. वेडाबाई सरदार, शांताबाई चव्हाण, शांताबाई जाधव यांनी विद्यार्थी वर्गातर्फे हार अर्पण केले. डॉ. बाबासाहेब अस्पृश्योद्धारक बोर्डिंग पहावयास येतील असे कित्येकांना वाटल्यावरून बराच मोठा समुदाय बोर्डिंगाच्या आवारात जमा झाला होता. म्हणून श्री. शामराव कामाजी जाधव व श्रावण धर्मा जाधव यांनी त्यांना विनंती केली, परंतु वेळेच्या अभावी रात्रौ ८-३० वाजता येण्याचे त्यांनी नंतर कबूल केले. त्यामुळे बोर्डिंगमध्ये जमलेला जनसमुदाय त्यांचा गगनभेदी जयजयकार करीत स्टेशनवर आला. अस्पृश्य लोकांचे डॉक्टरसाहेबांवरील अलौकिक प्रेम व त्यांच्या कामगिरीविषयीचा उत्साह पाहून चाळीसगाव येथील स्पृश्य जनतेने आश्चर्याने तोंडात बोटेच घातली. त्यांच्या दर्शनसुखासाठी अस्पृश्य बांधवांचा हा अपूर्व उत्साह कौतुकास्पद नाही असे कोण

---

जनता : ७ आणि १४ ऑगस्ट १९३७.

म्हणेल ? कारण डॉक्टरसाहेब कोणत्याही कार्यक्रमाकरिता या भागात आले नव्हते. ते फक्त आपल्या कोर्टाच्या कामासाठी जात असतानासुद्धा लोकांना त्यांच्या दर्शनसुखाची इतकी आतुरता वाटावी हे अलौकिकत्वाचे लक्षण म्हणावयास कोणतीच हरकत नाही.

विशेषतः हा दिवस बाजाराचा असूनही लोकांनी आपली खरेदीविक्री चटकन आटपून ते बायकामुलांसह चाळीसगाव स्टेशनवर आले होते. तसेच डॉक्टर-साहेबांच्या आगमनासंबंधी हँडबिले वगैरे काहीच काढली नव्हती. नुसत्या ऐकिव बातमीने हा सारा अफाट जनसमुदाय त्यांच्या दर्शनासाठी येथे जमला होता हे विशेष होय !

यानंतर डॉ. आंबेडकरसाहेब सर्वांचा प्रेमभराने निरोप घेऊन सकाळच्या ६-४५ च्या गाडीने धुळयास गेले. त्यांच्याबरोबर मे. डी. जी. जाधव व दत्तात्रय मागाडे हे उत्साही तरुण समाजकार्यकर्तेही होते. रात्रौ बोर्डिंगला डॉ. आंबेडकर भेट देणार हे ऐकून तेथे दिवाबत्ती रोषणाई वगैरेची तयारी सुरू होती. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनाची वाट पाहण्याकरिता बोर्डिंगपासून ते स्टेशनपर्यंत दोन फर्लांगावर लोक ठिकठिकाणी दुतर्फा उभे होते. लोकांची शिस्त ठेविण्याकरिता पहिलवान धावजी यांनी आपल्या आखाड्यासह एकंदर व्यवस्था ठेविली होती. तसेच डॉ. आंबेडकरसाहेबांना स्टेशनवरून आणण्याकरिता श्री. हरिभाऊ पाटसकर, वकील यांची पत्नी सौ. वारूबाई पाटसकर यांनी आपल्याकडील मोटारगाडी पाठवून दिली होती. श्री. पाटसकर कुठे बाहेरगावी गेल्यामुळे ते यावेळी डॉक्टरसाहेबांना भेटू शकले नाहीत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर, ता. ३१ जुलै १९३७ शनिवार रोजी सकाळचे गाडीने कोर्टाचे कामासाठी धुळे येथे निश्चित येणार आहेत, असे मि. पाटील वकील यांचेकडून समजताच समतावादी दलित मंडळाच्या कार्यकारी मंडळींनी अगोदरच कडेकोट तयारी केली होती. त्याप्रमाणे ता. ३१-७-१९३७ रोजी ७०-८० स्काऊटसह हजारो अस्पृश्य बंधुभगिनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे हार्दिक स्वागत करण्यासाठी मोठ्या पहाटेस उत्सुकतेने धुळे स्टेशनवर हजर होते. धुळे स्टेशन स्त्री, पुरुष व मुलांनी फुलून ते डॉ. आंबेडकरांचा सारखा जयघोष करीत व सामाजिक पदे गात उभे होते. स्वागतास श्री. ए. आर. सावंत, पुनाजीराव लळिंगकर, तुकारामजी पहिलवान, श्री. ढेंगे, जी. एस. अहिरे, आर. बी. अहिरे, सुकदेव पहिलवान, धोंडिराम पहिलवान, सखाराम पहिलवान, देवरामपंत अहिरे वगैरे मंडळी प्रामुख्याने हजर होती.

गाडी बरोबर ८-२० वाजता धुळे स्टेशनवर आली. डॉक्टरसाहेब हास्यवदन करीत श्री. डी. जी. जाधव, एम. एल. ए. यांचेसह गाडीतून उतरताच, ' आंबेडकर कौन है। दलितोंका राजा है।' ' आंबेडकर झिंदाबाद ' असा

त्रिवार प्रचंड जयघोष झाला. आरंभी श्री. सावंत, ढेंगे, बैसाणे, पुनाजीराव लळिंगकर वगैरे मंडळींनी त्यांची मुलाखत घेतली. समतावादी दलित मंडळाचे सेक्रेटरी श्री. तुकाराम पहिलवान यांनी संघातर्फे व सौ. पार्वताबाई अहिरे यांनी चोखामेळा बोर्डिंगतर्फे आणलेले हार डॉ. बाबासाहेबांचे गळयात घातले. नंतर स्टेशनपासून ट्रॅावलर्स बँगलोपर्यंत मि. पाटील वकील यांचे मोटारीतून डॉ. बाबासाहेबांची मिरवणूक काढण्यात आली. सदरहू वेळी, आंबेडकर चौक, लळिंग, अवधान, वर्‍हाळ, जुने धुळेमील येथील स्काऊटच्या मंडळींनी उत्तमप्रकारे शिस्त ठेविली होती. मिरवणूक सदरहू बंगल्यापर्यंत येताच तेथेही बाहेर गावाहून आलेल्या स्त्री, पुरुष व मुलांचा अफाट समुदाय जमला होता. इतकेच नव्हे तर डॉक्टर बाबासाहेबांचे दर्शनास लळिंग येथील अनेक मोळविक्या स्त्रियाही आल्या होत्या. सदरहू बंगल्यातून डॉ. बाबासाहेबांचे दर्शन झाल्याशिवाय अस्पृश्य स्त्री, पुरुष हालेनात. नंतर डॉ. बाबासाहेब हास्यवदन करीत बंगल्याचे बाहेर आले. त्यांनी मंडळींना आता कोर्टाचे काम आहे ते संपल्यानंतर आपण मला ज्या ठिकाणी बोलवाल त्या ठिकाणी मी येईल, असे सांगून सर्व मंडळींना जाण्यास सांगितले.

दुपारी कोर्टाचे काम संपल्यानंतर ठरल्याप्रमाणे डॉ. बाबासाहेब यांना हरिजन सेवक संघाचे चिटणीस श्री. बर्वे वकील यांचे घरी बरोबर चार वाजता श्री. जाधव, एम.एल.ए., श्री. सावंत, श्री. पुनाजीराव लळिंगकर, श्री. तुकाराम पहिलवान व श्री. ढेंगे वगैरे मंडळीसह टी पार्टी झाली. तेथे काँग्रेसची काही मंडळी हजर होती. तेथे बरीच चर्चा झाली. नंतर डॉ. बाबासाहेब यांनी राजेंद्र हरिजन छात्रालयाला व चोखामेळा बोर्डिंगला भेट दिली. तेथेही डॉ. बाबासाहेबांना स्वोद्धारक वसतिगृह, हरिजन छात्रालय व चोखामेळा बोर्डिंगतर्फे हारगुच्छ अर्पण करण्यात आले.

नंतर ठरल्याप्रमाणे धुळे विजयानंद थिएटरमध्ये डॉ. बाबासाहेबांचे फारच जोरदार भाषण झाले. सदरहू थिएटर अफाट स्पृश्यास्पृश्य स्त्री-पुरुषांनी दुमदुमून गेले होते. जागेच्या अभावी कित्येकांना बाहेर उभे राहावे लागले.

डॉ. आंबेडकर म्हणाले,

उद्या ता. १ ऑगस्ट रोजी गुढीपाडव्याप्रमाणे स्वराज्याचा प्रारंभ दिन म्हणून साजरा करावा, असे काँग्रेसने फर्माविले आहे. काँग्रेस पक्षानी राज्यकारभाराची सूत्रे हातात घेतली म्हणून ते स्वराज्य झाले आणि आमच्यासारख्याने कोणी

दिवाणपद घेतले तर मात्र ते स्वराज्य नव्हे, हे म्हणणे योग्य आहे काय ? भावना व तत्त्वज्ञान क्षणभर बाजूला ठेवून व्यवहारी दृष्टीने विचार केला तर असे दिसून येईल की गळे कापणारे सावकार, मजुरांना नाडणारे गिरण्यांचे मालक व आपल्याला अन्य तऱ्हेने गांजणारे लोक जसे होते तसेच या देशात राहणार आहेत. जमीनदार लोक, पाटील लोक हे सर्व तसेच राहणार. इंग्रज लोक निघून गेले तरी हे लोक कायम राहणार आहेत. म्हणून पूर्वीपेक्षाही आपणाला जास्त चिंता बाळगली पाहिजे. इतके दिवस एक गोष्ट आम्हाला पोषक होती. ती अशी की, इंग्रज मनुष्य जातीविषयक भावना व स्पृश्यास्पृश्य विचार पाहात नव्हता. यापुढे तुम्हाला गांजणाऱ्या लोकांच्या हातात सत्ता गेली आहे. आता आपल्या लोकांची दाद घेणार तरी कोण ? हे स्वराज्य नसून इतर लोकांचे आमच्यावर राज्य होणार आहे. म्हणून संघटना करणे हे तुमचे कर्तव्य आहे. संघटना न केल्यास तुमची दैना शतपट होईल. आज महारांवर जुलूम झाला तर पाटील, शिपाई, मामलेदार कोणी त्याला मदत करीत नाही. इतकेच नव्हे तर एक महारही दुसऱ्या महाराला मदत करीत नाही. म्हणून जातीय संघटन अवश्य करा. अन्यायाच्या वेळी तरी त्याला मदत करा. पैशाशिवाय काही काम होत नाही. वकील, साक्षीदार, कोर्टाची प्रोसेस, मोटारचे भाडे या सर्व गोष्टींना पैसा लागतो. सबब न्याय मिळविण्यासाठी जातीचा फंड उभारा.

एका गावात प्रयत्न करून तुम्ही न्याय मिळविला तर त्याची दहशत इतर गावावर पडेल. तुमचे काम दुसऱ्याने करावे, अशी अपेक्षा का करता ? तुमच्यासाठी श्री. बर्वे यांनी छात्रालय काढावे किंवा गांधींनी काढावे असे का ? महाराष्ट्रात दहा लाख महार अस्पृश्य लोक आहेत. प्रत्येकाने एक रुपया दिला तर दहा लाखाचा फंड जमा होईल.

इंग्रज आता काही करू शकत नाही. याचे मी उदाहरण देतो. मंत्रीमंडळात होता होईल तो अल्पसंख्यांकांचे प्रतिनिधी घ्यावेत, असे बादशहाने गव्हर्नरला दिलेल्या आज्ञापत्रिकेत म्हटले आहे. हल्लीचे मंत्रीमंडळ गांधींच्या सांगण्यावरून तयार झाले. मुंबईच्या मंत्रीमंडळात महार-मांगांचा एकही प्रतिनिधी नाही तरी पण गव्हर्नराने त्यात हात घातला नाही.

मी कॉंग्रेसला का मिळालो नाही, असा प्रश्न काही लोक विचारतात. त्याची कारणे अशी आहेत :—

(१) कॉंग्रेसच्या राजकारणात जर काही निष्पन्न झाले असेल तर ब्राह्मण्याचा उदय झाला एवढेच मला दिसते. सहा प्रांतात कोण लोक दिवाण झाले ते पाहा. ब्राह्मण मुख्य प्रधान झाले आहेत. साम्राज्यशाहीपेक्षा ब्राह्मण्य हजारोपट वाईट आहे.

(२) मी अस्पृश्यांकरता जी चळवळ करतो ती बंद करा, असे मला सांगण्यात येते; परंतु मला पगाराची मातब्बरी नाही किंवा मान मिळविण्याचीही मला पर्वा नाही. तुम्ही लोकांनी स्वाभिमानी बनावे हीच माझी आकांक्षा आहे व त्याकरता स्वतंत्र चळवळ करणे मला अवश्य आहे. तुमच्यात व माझ्यात फरक एवढाच की तुमच्यापेक्षा मला जास्त ज्ञान आहे. म्हणून मी जास्त पाहू शकतो व धोका कोठे आहे, हे मला समजते. काँग्रेसच्या लोकांनी काहीही म्हटले तरी मला त्याची पर्वा नाही. तुम्ही माणसे झालात म्हणजे माझे श्रम सफल झाले. हे स्वराज्य धोकादायक आहे. ज्यांच्या हाती सामाजिक सत्ता होती त्यांच्याच हाती राजकीय सत्ताही गेली आहे. तरी आता दरएक गावाने दहा रुपये तरी फंडाला द्यावे. म्हणजे तुम्हा लोकांना न्याय मिळविता येईल. आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाची पंधरा माणसे मुंबईच्या असेंब्लीत आहेत. ही माणसे एका दावणीत पक्की बांधलेली आहेत. एकाचे तोंड एकीकडे व दुसऱ्याचे दुसरीकडे असे नाही. यामुळे काँग्रेस पक्षाला कोणाची भीती वाटत असेल तर ती आमच्या पक्षाची आहे. काँग्रेस पक्षाला मुसलमानांची भीती वाटत नाही किंवा लोकशाही पक्षाची भीती वाटत नाही. ही गोष्ट वल्लभभाई यांनी पुणे येथे जे भाषण केले त्यात उघड झाली. आपण निवडणुकीच्या वेळी संघटनेने वागलो म्हणून हे फळ मिळाले. निवडणुकीच्यावेळी जी शपथ घेतली ती कायम ठेवा. आपल्या संस्थेची शाखा प्रत्येक जिल्ह्यात स्थापन केली पाहिजे. वरून मदत करणारा दाता कोणी नाही, जो कष्ट करील त्याची सत्ता असते. प्रत्येक संस्थेत आपली जास्त माणसे जातील, अशी एकजुटीने खटपट करा. काँग्रेसला हरिजनांची दया असती तर कोणतीही शर्त न घालता एखादा हरिजन त्यांनी मंत्रीमंडळात घेतला नसता काय ? पण यासाठी आपण कोणाजवळ भिक्षा मागू नये. मी काँग्रेसच्या मंडळीशी कधी मसलत केली नाही. सव्वा मैल दूर राहिलो.

खानदेशात आपल्या पक्षाचे श्री. दौलत गुलाजी जाधव हे निवडून आलेले आहेत, त्यांच्याकडून काम करवून घ्या. या देशात आपणाला माणुसकीने वागवीत नाहीत, ही गोष्ट तुम्ही विसरता, परंतु मी कधीच विसरू शकत नाही. सतत जागृत राहा म्हणजे यश मिळेल.

याप्रमाणे डॉक्टरसाहेबांचे व्याख्यान झाले. व्याख्यान झाल्याबरोबर डॉक्टरसाहेबांना सौ. नर्मदाबाई वाघ, लळींगकर, दशरथ धांकू वाघ, जुने धुळे व इतर तालुक्यातील लोकांनी हार अर्पण केले व सभा विसर्जित झाली.

या पश्चिम खानदेश जिल्ह्यात डॉ. बाबासाहेब सामाजिक कार्यासाठी कधीही आले नव्हते व इतर जिल्ह्यातील अस्पृश्य पुढाऱ्यांनी केव्हाही चालना दिली नाही. परंतु डॉ. बाबासाहेबांची विद्वता व अपूर्व कामगिरी पाहून स्वाभिमानी अस्पृश्य जनता खडबडून जागी झाली यात संशय नाही.

नंतर स्काऊटसह डॉ. बाबासाहेबांनी आंबेडकर चौकास भेट दिली व डॉ. बाबासाहेबांची मोटार सायंकाळी ६ वाजता धुळे स्टेशनवर गेली.

आज रोजी धुळे प्रताप मिल चालू होती. ती पाच वाजता बंद होते. मिलची सुट्टी झाल्यावर पुन्हा स्टेशनवर अनेक स्त्री-पुरूष डॉ. बाबासाहेबांचे दर्शनास जमले होते. तेथे स्काऊटच्या लाठीकाठीची डॉ. बाबासाहेबांना सलामी देण्यात आली. सदरहू वेळी भीमराव साळुंखे, वेसा पहिलवान, शंकरराव घोडे, किसनराव वगैरे मंडळीनी लाठीचे हात फिरविले. सदरहू ठिकाणीही अनेक स्त्री-पुरूषांनी डॉ. बाबासाहेबांना हार अर्पण केले. नंतर ६-४० वाजता सर्व मंडळींना निरोप दिला व गाडी चाळिसगावी गेली.

पूर्वी ठरल्याप्रमाणे डॉक्टरसाहेब रात्रौ ८-३० वाजता चाळिसगावला नक्की येणार हे ठरल्यासारखेच होते परंतु इतक्यात एक बातमी आली की, डॉक्टरसाहेबांना घेऊन येणाऱ्या आगगाडीचे इंजिन वाटेत जामदे स्टेशन सोडताच सीक झाले. त्यामुळे लोकांमध्ये निराशा उत्पन्न झाली. १-२ तासात इंजिन नीट होऊन गाडी फारतर दोन तास उशीरा येईल, अशी लोकांची कल्पना होती. डॉक्टरसाहेबांच्या स्वागतासाठी श्री. झिपरू तुकाराम जाधव, नथ्थू दोनू जाधव, जाबरसाहेब, मांगो आनंदा जाधव हे स्टेशनवर गेले होते. बोर्डिंगमध्ये जमलेल्या लोकांचे मनोरंजन करण्याकरिता मे. भास्कर मास्तर, जगन्नाथ सुंदरनाथ यांचे पोवाडे गायन व वेडाबाई चव्हाण, शांताबाई जाधव यांच्या बोधपर पदांचे गायन वगैरे कार्यक्रम झाले. भगिनी वर्गाची बसण्याची वगैरे व्यवस्था उत्तम ठेविली होती. श्रीमती ध्रुपताबाई दिवाण, झेलाबाई पोम मोरे, सखुबाई आनंदा जाधव, सावित्रीबाई तोताराम जाधव, नारदाबाई नानाजी जाधव, भागाबाई उरवा सरदार, दयाबाई रामाजी जाधव वगैरे प्रमुख स्त्रिया हजर होत्या. शेवटी पहाटे तीन-चार वाजता गाडी स्टेशनवर येईल अशी बातमी श्री. रायला मास्तर यांनी आणली. झाले, लोकांनी बोर्डिंगचे आवार सोडून रात्रौ बारा वाजता स्टेशन गाठले. यापूर्वीच आजूबाजूच्या खेड्यातील लोकांची स्टेशनवर गर्दी झाली. त्यात हा जमाव येऊन मिळाल्यामुळे स्टेशनचा सर्व भाग माणसांनी पूर्णपणे भरून गेला. लोक पहाटे चार वाजेपर्यंत जागरण करीत होते. एकदाची स्टेशनमध्ये गाडी आली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयघोषाने सारे वातावरण दुमदुमून गेले. डॉ. बाबासाहेब गाडीतून उतरताच येथील समाजातर्फे श्री. रायला मास्तर यांनी त्यांना हार अर्पण केला. त्याचवेळी आठ मैलाचा पायी प्रवास करीत श्री. डी. जी. जाधव यांचे वडील व माता डॉक्टरसाहेबांच्या भेटीस आले. त्या उभयतांनी डॉ. बाबासाहेबांना वंदन केले. इंजिनाच्या नादुरुस्तीमुळे

त्यांना उशीर झाला होता आणि लगेच ५ वाजण्याचे गाडीने मुंबईस जावयाचे असल्यामुळे बोर्डिंगमध्ये त्यांना जाता आले नाही. जमलेल्या लोकांनी त्यांचे स्वागत स्टेशनवरच केले. निरनिराळया संस्थेकडून त्यांना अनेक हार अर्पण करण्यात आले. डॉक्टरसाहेबांनी त्यांचा प्रेमाने स्वीकार केला आणि सर्वास आपल्या चळवळीसाठी थोडासा उपदेश करून निरोप घेतला. हा अपूर्व सत्कार समारंभ चाळीसगाव शहरात दिवसभर गाजून राहिला होता.



# १०४
# तुम्ही संघटन करून स्वतंत्र मजूर पक्षाला बलवान करा

(डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे हे भाषण दि. १४ ऑगस्ट १९३७ च्या जनतेच्या अंकात अग्रलेखाच्या जागी दिलेले आहे. भाषण कोठे व केव्हा झाले याचा उल्लेख नाही.– संपादक)

प्रिय बंधुंनो,

आपल्या या सभेस हजर राहण्यास मला अत्यंत आनंद होत आहे. स्वतंत्र मजूर पक्षाला व्यवस्थित स्वरूप देण्याचा व आपल्या लोकात संघटना घडवून आणण्याचा हा जो उपक्रम तुम्ही सुरू केला आहे तो स्तुत्य व अत्यंत महत्त्वाचा आहे.

सहा महिन्यांपूर्वी होऊन गेलेल्या असेंब्ली इलेक्शनचे आपण सिंहावलोकन केल्यास त्यावेळी आपल्या लोकांनी बजावलेल्या कामगिरीबद्दल मला धन्यता वाटते. कारण अत्यंत प्रभावशाली व श्रीमंत अशा काँग्रेसशी आपणास त्यावेळी स्पर्धा करावयाची होती. स्वतंत्र मजूर पक्षाचा एकही उमेदवार निवडून येऊ द्यावयाचा नाही, असा काँग्रेसने पण केला होता. आपल्या उमेदवारास पाडण्यासाठी काँग्रेसने आटोकाट प्रयत्न केला होता. अशा बिकट परिस्थितीला तोंड देण्याचे काम मला करावे लागले. इतर प्रांतांकडे आपण पाहिल्यास सर्वांनी काँग्रेसला शरणचिठ्ठी दिल्याचे आपणास दिसून येईल. सबंध हिंदुस्थानात काँग्रेसबरोबर लढा करण्यास काय तो मी एकटाच उभा होतो व त्यात मी यशस्वीही झालो. मात्र ही गोष्ट केव्हाही खरी आहे की तुम्हा लोकांच्या पाठिंब्याशिवाय मला यश येणे शक्य नव्हते. तुम्हाला माहीतच आहे की त्यावेळी आपल्यातीलच काही माणसे काँग्रेसला बळी पडली होती. परंतु असे असतानासुद्धा त्यावेळी आपण मोठे यश संपादन केले, ही गोष्ट काँग्रेसचे पुरस्कर्ते देखील कबूल करतात. त्यावेळी सबंध हिंदुस्थानात काँग्रेसला तीनच जागा महत्त्वाच्या वाटत होत्या. त्या म्हणजे डॉ. वाडांची मुंबई युनिव्हर्सिटीची जागा, लोकशाही स्वराज्य पक्षाचे अध्वर्यू श्री. लक्ष्मण बळवंत भोपटकर यांची पुण्यातील जागा आणि तिसरी स्वतंत्र मजूर पक्षाची माझी मुंबईची जागा. यापैकी पहिल्या दोन जागा काँग्रेसला मिळविता आल्या. मात्र तिसरी आपली जागा त्यांना घेता आली नाही. यामुळे काँग्रेसच्या लोकांनासुद्धा आपल्या

जनता : १४ ऑगस्ट १९३७.

सामर्थ्याची कल्पना आली आहे. जे वल्लभभाई पटेल इलेक्शनपूर्वी स्वतंत्र मजूर पक्षाचे नावसुद्धा घेण्यास तयार नव्हते तेच वल्लभभाई पटेल कॉंग्रेसने मंत्री पदे स्वीकारली त्यावेळेस शनिवार वाड्यापुढे भरलेल्या जाहीर सभेत म्हणाले की मुंबई असेंब्लीमध्ये निरनिराळे जे पक्ष आहेत त्यामध्ये डॉ. आंबेडकरांचा स्वतंत्र मजूर पक्षसुद्धा अत्यंत महत्त्वाचा आहे व त्या पक्षाचे म्हणणे कॉंग्रेसला कबूल करावे लागेल. तेव्हा हा परिणाम कशाचा, याचा तुम्ही पूर्ण विचार करा. हा परिणाम दुसरा कशाचा नसून आपल्या संघटनेचाच परिणाम आहे.

कॉंग्रेस ही हिंदू लोकांची संस्था आहे. हिंदुस्थानावर आजपर्यंत इंग्रज सरकारचे राज्य होते. म्हणून आतापर्यंत या लोकांच्या हातात राजकारणाची सूत्रे नव्हती परंतु हिंदुस्थानावर आज नुसते नावाला इंग्रज सरकारचे राज्य आहे. राजकारणाची सर्व सूत्रे आज हिंदू लोकांच्याच हातात आली आहेत. म्हणून यापुढे आपण आपला बचाव करण्याचा संघटित प्रयत्न केला पाहिजे. त्याशिवाय यापुढे आपणास गत्यंतर नाही. ज्या कौन्सिलमार्फत राजकीय सत्तेचा विनियोग केला जातो त्या कौन्सिलात तुमचे प्रतिनिधी गेले पाहिजेत. हिंदुस्थानात जो सर्वत्र कॉंग्रेसचा जय झाला आहे तो कॉंग्रेसचा जय नसून तो ब्राह्मण्याचा जय झाला आहे, हे तुम्ही विसरू नका. ५-६ प्रांतातील मुख्य दिवाणांच्या जागा ब्राह्मणांकडेच गेल्या आहेत व आमच्या मुंबई प्रांतातील ११ जागांपैकी ५ जागा ब्राह्मणांच्याच वाट्याला गेल्या आहेत. १९१९ पासून १९३५ पर्यंत कौन्सिलमध्ये ब्राह्मण सभासदांची संख्या अत्यंत थोडी म्हणजे १०-१२ होती व ती पुढे कमी कमी होत गेली. परंतु आज कॉंग्रेसच्या नावावर मुंबई प्रांतात २७ ब्राह्मण निवडून आले आहेत. यावरून ब्राह्मण्याचा किती मोठा जय झाला आहे हे आपणास दिसून येईल. या ब्राह्मण्यापासून तुम्हाला स्वतःचा बचाव करावयाचा असेल तर तुम्ही पूर्ण संघटित झाले पाहिजे.

मागच्या राऊंड-टेबल कॉन्फरन्सच्या वेळेस माझ्याकडून एक चूक झाली. अल्पसंख्यांक पक्षाचा एकतरी प्रतिनिधी गव्हर्नरने मंत्रीमंडळात नेमला पाहिजे, असा कायदाच बनवून घ्यावयास पाहिजे होता. या लोकांच्या मर्जीवर ती गोष्ट अवलंबून ठेवावयास नको होती. परंतु त्यावेळेस मी विचार केला की 'काही वाढतीने लाजावे व काही खातीनेही लाजावे' या उक्तीप्रमाणे मी याबाबतीत जास्त ताणून धरले नाही. परंतु यांच्या मर्जीवर ही गोष्ट ठेवल्यामुळे काय परिणाम झाला पहा ! त्यांनी अस्पृश्यांचा एकही प्रतिनिधी मंत्रीमंडळात घेतला नाही. याबाबतीत कायदा नाही; परंतु शिष्टाचार म्हणून तरी त्यांनी एक प्रतिनिधी घ्यावयास पाहिजे होता. आमच्या १५ जागांपैकी चार जागांवर कॉंग्रेसने आपल्यातर्फे आमची माणसे निवडून आणली. मग त्यांना मंत्रीपद का दिले नाही ? बरे चारही माणसे नालायक आहेत असे जर म्हणावे तर मग

काँग्रेसने या नालायक माणसांना निवडून आणले यात काँग्रेसने चूक केली, असे म्हणावयास काय हरकत आहे ? मुसलमानांचा प्रतिनिधी घेण्यासाठी जर त्यांनी इतकी यातायात केली तर त्यांनी अस्पृश्यांचा प्रतिनिधी का घेतला नाही ? तर याला एकच गोष्ट कारण आहे ती ही की ' आम्ही तुमच्याकरता सर्व काही करू. तुम्हाला स्वतःला तुमच्याकरिता काही करण्याची जरूर नाही ' अशी त्यांची वृत्ती आहे.

थोड्या दिवसांपूर्वी एका चांभार पुढाऱ्याने वर्तमानपत्रात प्रसिद्ध केले होते की ' अस्पृश्यांचा प्रतिनिधी मंत्रीमंडळात घेतला नाही याबद्दल आम्हाला वाईट वाटत नाही. कारण आमचा खेर साहेबांवर पूर्ण विश्वास आहे. ' असे जर आहे तर मग या लोकांनी निवडणूक लढविण्याची एवढी यातायात का केली ? अशा रीतीने जर या लोकांवर विश्वासून राहाल तर तुम्ही खास बुडाल, हे लक्षात ठेवा.

महात्मा गांधी हे काँग्रेसचे चार आणेवाले सभासदसुद्धा नाहीत परंतु त्यांचा सर्व फतवा काँग्रेसचे सर्व लोक मानतात. मग त्यांनी या बाबतीत काही का करू नये ? परंतु त्यांना आपल्याबद्दल काही करावयाचे नाही, हेच यावरून दिसते. म्हणूनच आपण संघटित होण्याची जरूर आहे. मला दुसरीही एक गोष्ट तुम्हाला सांगावयाची आहे ती ही की कौन्सिलमध्ये जाणे हे काही सोपे नाही. त्यासाठी प्रपंच सोडावा लागतो. इलेक्शनचा खर्च जबरदस्त होतो. तो करणे आपल्यातील उमेदवारांना शक्य नसते. मला सांगितले पाहिजे की मागच्या इलेक्शनच्या वेळेस उभे राहिलेल्या बऱ्याच उमेदवारास मला पैशाची मदत करावी लागली तेव्हा ते निवडून आले परंतु प्रत्येक वेळेस अशी मदत करणे मला शक्य नाही व उमेदवारांनाही त्यांचा त्यांना खर्च भागविणे शक्य नाही. म्हणून तुम्हाला तुमच्यातर्फे चांगली माणसे कौन्सिलमध्ये पाठवावयाची असतील तर त्यांचा खर्च तुम्ही दिला पाहिजे. मागच्या इलेक्शनमध्ये काँग्रेसतर्फे जे उमेदवार उभे होते त्यांचा खर्च काँग्रेसनेच केला होता. एकट्या मुंबई शहरात इलेक्शनचे दिवशी काँग्रेसने हजारो रुपये खर्च केला होता, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे.

मला तुम्हाला एवढेच सांगायचे आहे की या संस्थेला तुम्ही चांगल्यातऱ्हेने पाठबळ द्या व तिला काँग्रेससारखी प्रबळ बनवा. मुंबईमध्ये आपली लोकसंख्या एक लक्षाच्या वर आहे. तेव्हा निदान एक लाख लोक तरी या संस्थेचे सभासद बनवा.

या संस्थेची वार्षिक वर्गणी आंठ आणे ठेवलेली आहे, ती फार कमी आहे तेव्हा ती भरण्यास प्रत्येकास काही हरकत नाही. काँग्रेसच्या पाठीमागे जसे श्रीमंत लोक आहेत तसे तुमच्या पाठीमागे कोणी नाही. तुमचा संसार तुम्हीच केला पाहिजे. विलायतेतही पार्लमेन्टात मजूर पक्ष आहे. परंतु ते सुद्धा अशी वर्गणी जमा करून इलेक्शने लढवितात.

कोणत्याही पक्षाला वर्तमानपत्राची फार जरूरी असते. वर्तमानपत्राशिवाय आपणास कार्य करता येणार नाही. म्हणून आपल्या पक्षाचे जनतापत्र चांगल्या तऱ्हेने चालले पाहिजे. तुम्ही सर्वांनी त्याचे वर्गणीदार झाले पाहिजे. कौन्सिलमध्ये तुम्ही पाठविलेले लोक तुमच्यासाठी काय करतात ते समजावून घ्यावयाचे झाल्यास तुम्हाला ते जनता पत्रावरूनच समजेल. याकरिता तुम्ही सर्वांनी जनता पत्राचे वर्गणीदार जरूर झाले पाहिजे. काही लोक इतर पत्रे घेऊन वाचतात. का ? तर त्यात सट्ट्याचे नंबर व भविष्ये दिलेली असतात. सट्टा खेळून कोणाचेही बरे झाले नाही. शिवाय वर्तमानपत्रात वर्तविलेली भविष्ये खरी ठरत नाहीत. आपल्या पत्राशिवाय आपल्या पक्षाचे अधिकृत कार्यक्रम व चळवळीची खरी दिशा इतर वर्तमानपत्रात वाचावयास मिळणार नाही. यासाठी आणि आपल्या पक्षाचा अभिमान बाळगण्यासाठी सर्वांनी जनता पत्राचे वर्गणीदार झाले पाहिजे.

शेवटी तुम्हाला मला एकच अत्यंत महत्त्वाची गोष्ट सांगायची आहे ती ही की तुम्ही तुमच्यात असलेली मानापानाची वाईट भावना काढून टाकली पाहिजे. माझे नाव आले नाही तर मी पुढे आलेल्या कार्याला विरोध करीन ही भावना अत्यंत वाईट आहे. तुम्ही काम करा की नाव तुमच्या पाठीस लागेल. मला व माझ्या सहकारी मित्रांना माहीत आहे की जोपर्यंत आम्ही काही कार्य करून दाखविले नव्हते तोपर्यंत टाइम्ससारख्या पत्रात थोडासा मजकूर छापण्यासाठी आम्हास कितीतरी मनधरणी करावी लागत होती, परंतु आता तेच लोक ' तुमचा काही मजकूर आहे काय ? असल्यास पाठवा ' असे म्हणत आमच्या पाठीमागे लागतात. सर्व लोकांनी राजकारणातील व समाजकारणातील भांडणे तत्काळ विसरून गेले पाहिजे. मागे होऊन गेलेल्या महार परिषदेच्या वेळेस मला असे दिसून आले की ज्यांच्या हातात त्या परिषदेची अधिकारसूत्रे मिळाली होती त्यापैकी काही लोकांनी त्या अधिकाराचा आपापसातील भांडणासाठी दुरुपयोग केला, असे होता कामा नये.

या संस्थेचे मुख्य काम इलेक्शनच्या वेळी एकमताने वागणे हेच राहील. या संस्थेने उभे केलेल्या उमेदवारासच तुम्ही सर्वांनी मते दिली पाहिजेत. यासाठीच तुम्ही संघटना केली पाहिजे व ती इतकी मजबूत केली पाहिजे की आपल्यापैकी एकही माणूस फुटून जाता कामा नये. असे करण्याशिवाय आता आपणास गत्यंतर नाही. मागच्या इलेक्शनच्या वेळी माझ्या व पी. बाळूच्या मतात फारतर हजार दोन हजार मताचेच अंतर होते. त्यावेळी तुम्हापैकी काही लोकांनी कुचराई केली असती तर इलेक्शनमध्ये माझी धडगत नव्हती. तुमच्या उन्नतीची सर्व भिस्त राजकारणावरच आहे. म्हणून तुम्ही संघटना करून स्वतंत्र मजूर पक्षाला बलवान करा, एवढेच मला तुम्हाला सांगावयाचे आहे.



१०५

# प्रांताचे प्रधान मंडळ हा प्रांताच्या बुद्धिमत्तेचा अलौकिक संचय असला पाहिजे

ता. २३ ऑगस्ट १९३७ रोजीच्या विधीमंडळ बैठकीत प्रथम मामुली कामकाज झाल्यावर मुख्य प्रधान ना. बाळासाहेब खेर यांनी दिवाणांच्या पगारासंबंधी वगैरे पहिले सरकारी बिल सादर केले. या बिलाप्रमाणे प्रत्येक दिवाणाला दरमहा ५०० रु. पगार, १०० रु. भाडे आणि १५० रु. मोटार अलाउन्स देण्यात आले होते. हे बिल असेंब्लीपुढे मांडताना मुख्य प्रधानांनी काँग्रेसच्या स्वार्थत्यागाचे वगैरे गोडवे गाईले होते. या सरकारी बिलावर स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. या बिलाविरुद्ध बोलताना त्यांनी पुढीलप्रमाणे आपले मुद्दे प्रभावी आणि मुद्देसूद भाषेत मांडले. ते म्हणाले,

मी भाषण करावयास आता उभा राहिलो आहे. मी भाषण असे म्हटले, कारण या मुद्यावर सभागृहात मतविभागणी नोंदणी करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. प्रस्तुत बिलावर माझा पहिला आक्षेप असा आहे की, सरकारतर्फे असे बिल आपणहून मांडण्यात येण्यापेक्षा सर्व पक्षांच्या संमतीने मांडण्यास यावयाला पाहिजे होते. दुसरी गोष्ट अशी की, हा मुक्रर करण्यात आलेला तनखा योग्य नाही. ब्रिटिश साम्राज्यातील इतर वसाहतीतील मंत्र्यांच्या पगाराकडे आपण क्षणभर दृष्टिक्षेप केला तर तिकडील मंत्र्यांचे पगार सर्वसाधारण दरमहा २,००० रुपयांच्या आसपास असल्याचे आढळून येते. हंगामी मंत्रिमंडळाच्या काळात त्या मंत्र्यांना हिंदुस्थानातील निरनिराळया प्रांतात नेमून दिलेले पगारही एकट्या ओरिया प्रांताखेरीज २,००० रुपयांच्यावर होते असे आपणाला दिसून येईल पण आता एक नवीनच रूढी घातली जात आहे. यापुढे मंत्र्यांना दरमहा ५०० रुपये पगार मिळावा असे सुचविण्यात आले आहे. या दोन्ही रकमेतील फरक हा केवळ आकड्यांचाच नसून तो एक तत्त्वाचा फरक आहे. कोणत्याही जागेचा पगार मुक्रर करताना चार गोष्टी ध्यानात घेणे जरूर आहे. (१) मंत्र्यांचे सामाजिक स्थान, (२) कार्यक्षमता, (३) लोकशाही व (४) राज्यकारभाराचे पावित्र्य आणि सचोटी याच त्या चार गोष्टी होत. प्रांताचे मंत्री हे प्रांतातील पहिले नागरिक असल्याने त्यांचे जीवन सुसंस्कृत असावे हे रास्तच असावे, पण त्याबद्दल त्यांच्यावर सक्ती करता येणार नाही. तथापि मंत्र्यांच्या पगाराचा विचार

---

जनता : २८ ऑगस्ट १९३७.

करताना शेवटच्या तीन गोष्टींकडे कानाडोळा करून चालणार नाही. खुद्द आज मंत्र्यांना काय वाटते हे मला माहीत नाही. तथापि, झेंडावंदन करणे किंवा केशरिया स्वयंसेविकांची सलामी घेणे एवढीच त्यांची मंत्रिपदाची कल्पना नाही अशी माझी भावना आहे. राज्यकारभाराच्या तीन प्रमुख अंगांपैकी कार्यकारी मंडळ ही अत्यंत महत्त्वाची बाब होय.

प्रांताचे प्रधान मंडळ हा प्रांताच्या बुद्धिमत्तेचा अलौकिक संचय असला पाहिजे. या बिलात नमूद केलेल्या पगारांमुळे राज्यकारभारात उत्पन्न होणाऱ्या कठीण प्रश्नांना तोंड देऊन ते सोडविण्यास लायक असे लोक पुढे येतील किंवा नाही याची शंका वाटते. कारण इतर दुसऱ्या ठिकाणी याहून कितीतरी अधिक आमिषे त्यांना आढळतील. दुसरी गोष्ट अशी की, आपल्याकडे सुशिक्षित वर्ग फार लहान आहे. आपल्या सामाजिक व्यवस्थेमुळे शिक्षणाचा फायदा फक्त एका लहान वर्गालाच मिळत गेला आहे. या समाजव्यवस्थेचा ब्रिटिश सरकारलाही उच्छेद करता आला नाही. चातुर्वर्ण्यातही शिक्षण एका वर्गालाच बहाल करण्यात आलेले आहे. आता लोकशाहीच्या दृष्टीने याचा परिणाम काय होतो तो पहा. ज्या लोकांजवळ पैसा आहे, त्या लोकांना आपल्या खाजगी किंवा इतर हेतूंच्या पुरस्कारार्थ राजकीय सत्ता काबीज करता येईल किंवा ज्यांना कोठे काहीच मिळू शकत नाही असे लोक मंत्रिमंडळात शिरतील. माझे म्हणणे असे आहे की, मंत्र्यांचा पगार हा त्यांना मोहापासून दूर ठेवण्याइतका अवश्य हवा. ज्यावेळी मंत्र्यांचा पगार ४,००० आणि ३,००० रुपये होता त्यावेळीही आपल्या प्रांतात अनेक गोष्टींचा दुर्लौकिक होता, मग आता मंत्र्यांचा पगार ५०० रुपये झाल्यावर त्यांची संख्या वाढेल असे म्हटले तर काय बिघडले ? खरा प्रश्न असा आहे की, पगाराचा हा दर्जा ठेवल्यास राज्यकारभार सुरक्षित राहील काय ? कंत्राटे देताना सुद्धा आपण ती नेहमीच सर्वांना कमी रकमेच्या टेंडरवर देत नाही. कमी पगार घेण्याला तयार असणेही काही पगार कमी ठेवण्याला योग्य सबब नाही. बचत करावयाची ती देखील योग्य विचारानेच केली पाहिजे. दुसरा एक मुद्दा असा आहे की, हे पगार कमी ठेवले याचे कारण राष्ट्रीय जीवनाच्या दर्जाशी ते सुसंगत आहे. ' हरिजन ' मध्ये निरनिराळया देशातील रहिवाश्यांच्या सामान्य उत्पन्नाचे जे आकडे दिले आहेत त्यात हिंदी इसमाचे सामान्य उत्पन्न ४ पौंडांचे असता हा पगार त्यात सुचविल्याप्रमाणे दरमहा ७५ रुपये असणे उचित ठरेल. त्या दृष्टीने ५०० रु. पगार ही मोठी उधळपट्टीच ठरेल. मग प्रामाणिकपणे ७५ रु. पगारच का घेत नाही ? मला असे सांगावयाचे आहे की, अशा रीतीने जनतेच्या मनात तुमच्याबद्दल भरवसा

काँग्रेसने या नालायक माणसांना निवडून आणले यात काँग्रेसने चूक केली, असे म्हणावयास काय हरकत आहे ? मुसलमानांचा प्रतिनिधी घेण्यासाठी जर त्यांनी इतकी यातायात केली तर त्यांनी अस्पृश्यांचा प्रतिनिधी का घेतला नाही ? तर याला एकच गोष्ट कारण आहे ती ही की ' आम्ही तुमच्याकरता सर्व काही करू. तुम्हाला स्वतःला तुमच्याकरिता काही करण्याची जरूर नाही ' अशी त्यांची वृत्ती आहे.

थोड्या दिवसांपूर्वी एका चांभार पुढाऱ्याने वर्तमानपत्रात प्रसिद्ध केले होते की ' अस्पृश्यांचा प्रतिनिधी मंत्रीमंडळात घेतला नाही याबद्दल आम्हाला वाईट वाटत नाही. कारण आमचा खेर साहेबांवर पूर्ण विश्वास आहे. ' असे जर आहे तर मग या लोकांनी निवडणूक लढविण्याची एवढी यातायात का केली ? अशा रीतीने जर या लोकांवर विश्वासून राहाल तर तुम्ही खास बुडाल, हे लक्षात ठेवा.

महात्मा गांधी हे काँग्रेसचे चार आणेवाले सभासदसुद्धा नाहीत परंतु त्यांचा सर्व फतवा काँग्रेसचे सर्व लोक मानतात. मग त्यांनी या बाबतीत काही का करू नये ? परंतु त्यांना आपल्याबद्दल काही करावयाचे नाही, हेच यावरून दिसते. म्हणूनच आपण संघटित होण्याची जरूर आहे. मला दुसरीही एक गोष्ट तुम्हाला सांगावयाची आहे ती ही की कौन्सिलमध्ये जाणे हे काही सोपे नाही. त्यासाठी प्रपंच सोडावा लागतो. इलेक्शनचा खर्च जबरदस्त होतो. तो करणे आपल्यातील उमेदवारांना शक्य नसते. मला सांगितले पाहिजे की मागच्या इलेक्शनच्या वेळेस उभे राहिलेल्या बऱ्याच उमेदवारास मला पैशाची मदत करावी लागली तेव्हा ते निवडून आले परंतु प्रत्येक वेळेस अशी मदत करणे मला शक्य नाही व उमेदवारांनाही त्यांचा त्यांना खर्च भागविणे शक्य नाही. म्हणून तुम्हाला तुमच्यातर्फे चांगली माणसे कौन्सिलमध्ये पाठवावयाची असतील तर त्यांचा खर्च तुम्ही दिला पाहिजे. मागच्या इलेक्शनमध्ये काँग्रेसतर्फे जे उमेदवार उभे होते त्यांचा खर्च काँग्रेसनेच केला होता. एकट्या मुंबई शहरात इलेक्शनचे दिवशी काँग्रेसने हजारो रुपये खर्च केला होता, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे.

मला तुम्हाला एवढेच सांगायचे आहे की या संस्थेला तुम्ही चांगल्यातऱ्हेने पाठबळ द्या व तिला काँग्रेससारखी प्रबळ बनवा. मुंबईमध्ये आपली लोकसंख्या एक लक्षाच्या वर आहे. तेव्हा निदान एक लाख लोक तरी या संस्थेचे सभासद बनवा.

या संस्थेची वार्षिक वर्गणी आठ आणे ठेवलेली आहे, ती फार कमी आहे तेव्हा ती भरण्यास प्रत्येकास काही हरकत नाही. काँग्रेसच्या पाठीमागे जसे श्रीमंत लोक आहेत तसे तुमच्या पाठीमागे कोणी नाही. तुमचा संसार तुम्हीच केला पाहिजे. विलायतेतही पार्लमेन्टात मजूर पक्ष आहे. परंतु ते सुद्धा अशी वर्गणी जमा करून इलेक्शने लढवितात.

कोणत्याही पक्षाला वर्तमानपत्राची फार जरूरी असते. वर्तमानपत्राशिवाय आपणास कार्य करता येणार नाही. म्हणून आपल्या पक्षाचे जनतापत्र चांगल्या तऱ्हेने चालले पाहिजे. तुम्ही सर्वांनी त्याचे वर्गणीदार झाले पाहिजे. कौन्सिलमध्ये तुम्ही पाठविलेले लोक तुमच्यासाठी काय करतात ते समजावून घ्यावयाचे झाल्यास तुम्हाला ते जनता पत्रावरूनच समजेल. याकरिता तुम्ही सर्वांनी जनता पत्राचे वर्गणीदार जरूर झाले पाहिजे. काही लोक इतर पत्रे घेऊन वाचतात. का ? तर त्यात सट्ट्याचे नंबर व भविष्ये दिलेली असतात. सट्टा खेळून कोणाचेही बरे झाले नाही. शिवाय वर्तमानपत्रात वर्तविलेली भविष्ये खरी ठरत नाहीत. आपल्या पत्राशिवाय आपल्या पक्षाचे अधिकृत कार्यक्रम व चळवळीची खरी दिशा इतर वर्तमानपत्रात वाचावयास मिळणार नाही. यासाठी आणि आपल्या पक्षाचा अभिमान बाळगण्यासाठी सर्वांनी जनता पत्राचे वर्गणीदार झाले पाहिजे.

शेवटी तुम्हाला मला एकच अत्यंत महत्त्वाची गोष्ट सांगायची आहे ती ही की तुम्ही तुमच्यात असलेली मानापानाची वाईट भावना काढून टाकली पाहिजे. माझे नाव आले नाही तर मी पुढे आलेल्या कार्याला विरोध करीन ही भावना अत्यंत वाईट आहे. तुम्ही काम करा की नाव तुमच्या पाठीस लागेल. मला व माझ्या सहकारी मित्रांना माहीत आहे की जोपर्यंत आम्ही काही कार्य करून दाखविले नव्हते तोपर्यंत टाइम्ससारख्या पत्रात थोडासा मजकूर छापण्यासाठी आम्हास कितीतरी मनधरणी करावी लागत होती, परंतु आता तेच लोक ' तुमचा काही मजकूर आहे काय ? असल्यास पाठवा ' असे म्हणत आमच्या पाठीमागे लागतात. सर्व लोकांनी राजकारणातील व समाजकारणातील भांडणे तत्काळ विसरून गेले पाहिजे. मागे होऊन गेलेल्या महार परिषदेच्या वेळेस मला असे दिसून आले की ज्यांच्या हातात त्या परिषदेची अधिकारसूत्रे मिळाली होती त्यापैकी काही लोकांनी त्या अधिकाराचा आपापसातील भांडणासाठी दुरुपयोग केला, असे होता कामा नये.

या संस्थेचे मुख्य काम इलेक्शनच्या वेळी एकमताने वागणे हेच राहील. या संस्थेने उभे केलेल्या उमेदवारासच तुम्ही सर्वांनी मते दिली पाहिजेत. यासाठीच तुम्ही संघटना केली पाहिजे व ती इतकी मजबूत केली पाहिजे की आपल्यापैकी एकही माणूस फुटून जाता कामा नये. असे करण्याशिवाय आता आपणास गत्यंतर नाही. मागच्या इलेक्शनच्या वेळी माझ्या व पी. बाळूच्या मतात फारतर हजार दोन हजार मताचेच अंतर होते. त्यावेळी तुम्हापैकी काही लोकांनी कुचराई केली असती तर इलेक्शनमध्ये माझी धडगत नव्हती. तुमच्या उन्नतीची सर्व भिस्त राजकारणावरच आहे. म्हणून तुम्ही संघटना करून स्वतंत्र मजूर पक्षाला बलवान करा, एवढेच मला तुम्हाला सांगावयाचे आहे.



# १०५

# प्रांताचे प्रधान मंडळ हा प्रांताच्या बुद्धिमत्तेचा अलौकिक संचय असला पाहिजे

ता. २३ ऑगस्ट १९३७ रोजीच्या विधीमंडळ बैठकीत प्रथम मामुली कामकाज झाल्यावर मुख्य प्रधान ना. बाळासाहेब खेर यांनी दिवाणांच्या पगारासंबंधी वगैरे पहिले सरकारी बिल सादर केले. या बिलाप्रमाणे प्रत्येक दिवाणाला दरमहा ५०० रु. पगार, १०० रु. भाडे आणि १५० रु. मोटार अलाउन्स देण्यात आले होते. हे बिल असेंब्लीपुढे मांडताना मुख्य प्रधानांनी काँग्रेसच्या स्वार्थत्यागाचे वगैरे गोडवे गाईले होते. या सरकारी बिलावर स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. या बिलाविरुद्ध बोलताना त्यांनी पुढीलप्रमाणे आपले मुद्दे प्रभावी आणि मुद्देसूद भाषेत मांडले. ते म्हणाले,

मी भाषण करावयास आता उभा राहिलो आहे. मी भाषण असे म्हटले, कारण या मुद्यावर सभागृहात मतविभागणी नोंदणी करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. प्रस्तुत बिलावर माझा पहिला आक्षेप असा आहे की, सरकारतर्फे असे बिल आपणहून मांडण्यात येण्यापेक्षा सर्व पक्षांच्या संमतीने मांडण्यास यावयाला पाहिजे होते. दुसरी गोष्ट अशी की, हा मुक्रर करण्यात आलेला तनखा योग्य नाही. ब्रिटिश साम्राज्यातील इतर वसाहतीतील मंत्र्यांच्या पगाराकडे आपण क्षणभर दृष्टिक्षेप केला तर तिकडील मंत्र्यांचे पगार सर्वसाधारण दरमहा २,००० रुपयांच्या आसपास असल्याचे आढळून येते. हंगामी मंत्रिमंडळाच्या काळात त्या मंत्र्यांना हिंदुस्थानातील निरनिराळया प्रांतात नेमून दिलेले पगारही एकट्या ओरिया प्रांताखेरीज २,००० रुपयांच्यावर होते असे आपणाला दिसून येईल पण आता एक नवीनच रूढी घातली जात आहे. यापुढे मंत्र्यांना दरमहा ५०० रुपये पगार मिळावा असे सुचविण्यात आले आहे. या दोन्ही रकमेतील फरक हा केवळ आकड्यांचाच नसून तो एक तत्त्वाचा फरक आहे. कोणत्याही जागेचा पगार मुक्रर करताना चार गोष्टी ध्यानात घेणे जरूर आहे. (१) मंत्र्यांचे सामाजिक स्थान, (२) कार्यक्षमता, (३) लोकशाही व (४) राज्यकारभाराचे पावित्र्य आणि सचोटी याच त्या चार गोष्टी होत. प्रांताचे मंत्री हे प्रांतातील पहिले नागरिक असल्याने त्यांचे जीवन सुसंस्कृत असावे हे रास्तच असावे, पण त्याबद्दल त्यांच्यावर सक्ती करता येणार नाही. तथापि मंत्र्यांच्या पगाराचा विचार

---

जनता : २८ ऑगस्ट १९३७.

करताना शेवटच्या तीन गोष्टींकडे कानाडोळा करून चालणार नाही. खुद्द आज मंत्र्यांना काय वाटते हे मला माहीत नाही. तथापि, झेंडावंदन करणे किंवा केशरिया स्वयंसेविकांची सलामी घेणे एवढीच त्यांची मंत्रिपदाची कल्पना नाही अशी माझी भावना आहे. राज्यकारभाराच्या तीन प्रमुख अंगांपैकी कार्यकारी मंडळ ही अत्यंत महत्त्वाची बाब होय.

प्रांताचे प्रधान मंडळ हा प्रांताच्या बुद्धिमत्तेचा अलौकिक संचय असला पाहिजे. या बिलात नमूद केलेल्या पगारांमुळे राज्यकारभारात उत्पन्न होणाऱ्या कठीण प्रश्नांना तोंड देऊन ते सोडविण्यास लायक असे लोक पुढे येतील किंवा नाही याची शंका वाटते. कारण इतर दुसऱ्या ठिकाणी याहून कितीतरी अधिक आमिषे त्यांना आढळतील. दुसरी गोष्ट अशी की, आपल्याकडे सुशिक्षित वर्ग फार लहान आहे. आपल्या सामाजिक व्यवस्थेमुळे शिक्षणाचा फायदा फक्त एका लहान वर्गालाच मिळत गेला आहे. या समाजव्यवस्थेचा ब्रिटिश सरकारलाही उच्छेद करता आला नाही. चातुर्वर्ण्यातही शिक्षण एका वर्गालाच बहाल करण्यात आलेले आहे. आता लोकशाहीच्या दृष्टीने याचा परिणाम काय होतो तो पहा. ज्या लोकांजवळ पैसा आहे, त्या लोकांना आपल्या खाजगी किंवा इतर हेतूंच्या पुरस्कारार्थ राजकीय सत्ता काबीज करता येईल किंवा ज्यांना कोठे काहीच मिळू शकत नाही असे लोक मंत्रिमंडळात शिरतील. माझे म्हणणे असे आहे की, मंत्र्यांचा पगार हा त्यांना मोहापासून दूर ठेवण्याइतका अवश्य हवा. ज्यावेळी मंत्र्यांचा पगार ४,००० आणि ३,००० रुपये होता त्यावेळीही आपल्या प्रांतात अनेक गोष्टींचा दुर्लौकिक होता, मग आता मंत्र्यांचा पगार ५०० रुपये झाल्यावर त्यांची संख्या वाढेल असे म्हटले तर काय बिघडले ? खरा प्रश्न असा आहे की, पगाराचा हा दर्जा ठेवल्यास राज्यकारभार सुरक्षित राहील काय ? कंत्राटे देताना सुद्धा आपण ती नेहमीच सर्वांना कमी रकमेच्या टेंडरवर देत नाही. कमी पगार घेण्याला तयार असणेही काही पगार कमी ठेवण्याला योग्य सबब नाही. बचत करावयाची ती देखील योग्य विचारानेच केली पाहिजे. दुसरा एक मुद्दा असा आहे की, हे पगार कमी ठेवले याचे कारण राष्ट्रीय जीवनाच्या दर्जाशी ते सुसंगत आहे. ' हरिजन ' मध्ये निरनिराळ्या देशातील रहिवाश्यांच्या सामान्य उत्पन्नाचे जे आकडे दिले आहेत त्यात हिंदी इसमाचे सामान्य उत्पन्न ४ पौंडांचे असता हा पगार त्यात सुचविल्याप्रमाणे दरमहा ७५ रुपये असणे उचित ठरेल. त्या दृष्टीने ५०० रु. पगार ही मोठी उधळपट्टीच ठरेल. मग प्रामाणिकपणे ७५ रु. पगारच का घेत नाही ? मला असे सांगावयाचे आहे की, अशा रीतीने जनतेच्या मनात तुमच्याबद्दल भरवसा

उत्पन्न होणार नाही अशी फसवाफसवी का ? उघड्या अंगानी हिंडण्याने, सिगारेटच्या ऐवजी विड्या ओढल्याने, बैलगाड्यातून हिंडण्याने किंवा तिसऱ्या वर्गाने प्रवास करण्याने लोकांच्या डोळयात धूळ का फेकतात ? विलायतेतील मध्ययुगी भिक्षु ब्रह्मचर्य, शुचिर्भौत्य व दारिद्र्य यात आपले जीवन कंठण्याची प्रतिज्ञा करीत. आपल्या मंत्र्यांना ब्रह्मचर्याचा प्रश्न नाही. कारण आता तो प्रश्न त्यांच्या हाताबाहेर गेलेला आहे. शुचिर्भौत्याच्या प्रतिज्ञेचा त्यांनी भंग केला, तर या सभागृहाला त्याबद्दल तक्रार करण्याचे कारण नाही. दारिद्र्याबद्दल म्हणाल तर ते भिक्षु सडेफटिंग असल्याने त्यांना ते जड जात नसे पण सध्याच्या मंत्र्यांना दारिद्र्यात जीवन कंठणे योग्य आहे काय ? मला असे म्हणावयाचे आहे की, ५०० रु. पगार ठरविण्यात मंत्रिमंडळाचा हेतू पवित्र नाही. त्यामागे त्यांचा एक डाव आहे. हे मंत्रीपद कायमचेच आपल्याकडे राहून त्यावर दुसऱ्या कोणालाही आरूढ होता येऊ नये हाच यात त्यांचा डाव आहे. मंत्र्यांचा पगार दरमहा ४,००० किंवा ३,००० असावा असेही म्हणावयाचे नाही. मी जी या बिलावर टीका केली आहे ती केवळ सार्वजनिक धोरणाची चर्चा व्हावी या हेतूनेच केली आहे. डॉ. जॉन्सन एकदा म्हणाले होते की, बदमाश लोकांना देशभक्तीचा आश्रय घेणे सुलभ जाते. मला खात्री वाटते की, बदमाशांना मंत्रीपदावर आरूढ होणे सुलभ जाते असे म्हणण्याची पाळी आमच्यावर कधीही येणार नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणानंतर प्रोग्रेसिव्ह पक्षाचे पुढारी मि. ॲबर क्रॉम्बी यांनी डॉ. आंबेडकरांच्या बहुतेक मुद्यांवर आपल्या भाषणात भर दिला. बॅ. जमनादास मेहतांनीही काँग्रेसच्या बिलाच्या अव्यवहार्यतेबद्दल सडकून समाचार घेतला. खा. ब. अब्दुल लतिफ, शि. ल. करंदीकर व स. का. पाटील यांची भाषणे झाल्यावर भाई अनंतराव चित्रे यांचे भाषण झाले.



## १०६

# अशा देवांना काय पुजावे ?

ता. २८ ऑगस्ट १९३७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली वांद्रे, मुंबई येथील म्युनिसिपल हॉलमध्ये अस्पृश्य वर्गाची जंगी जाहीर सभा भरून खालील ठराव पास झाले.--

**ठराव १ ला.**– मुंबई इलाखा महार परिषदेच्या ठरावाप्रमाणे आपल्या बंधूभगिनींनी हिंदू धर्माचे सणवार, व्रतवैकल्ये वगैरे धार्मिक विधी आणि उपोषण वगैरे धार्मिक आचार पाळू नयेत.

**ठराव २ रा.**– वांद्रे म्युनिसिपालिटीत अस्पृश्य वर्गासाठी एक राखीव जागा दिल्याबद्दल मे. कलेक्टर साहेबांचे ही सभा आभार मानीत असून, अस्पृश्य वर्गाच्या लोकसंख्येच्या मानाने एक जागा अपुरी असल्यामुळे अधिक जागा देण्याबद्दल ही सभा मे. कलेक्टर साहेबांना विनंती करीत आहे.

**ठराव ३ रा.**– स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होण्याबद्दल सर्व जनतेस या सभेची आग्रहाची विनंती आहे.

**ठराव ४ था.**– श्री. संभाजी तुकाराम गायकवाड यांच्या मानपत्रासाठी वांद्रे पंचायतीकडून २५ रु. देण्यात येत आहेत. तरी इतर ठिकाणच्या पंचायतींनीही या कार्यास सढळ हाताने मदत करण्याची कृपा करावी.

सदर ठरावावर श्री. ठु. तु. शिर्के , स. भि. धोत्रे, अमरसिंग, शं. ल. वडवलकर, ध. सो. जाधव, म. ग. जाधव, चां. ना. मोहिते, शां. अ. उपशाम, ना. भि. असगोलकर, वां. स्कू. बो. मेंबर इत्यादी मंडळीची भाषणे झाली.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले. सूचनावजा ते म्हणाले, धर्मांतराबद्दल मुंबई इलाखा महार परिषदेने केलेल्या ठरावाची आठवण देण्याकरिता विशेषतः आजची सभा आहे. म्हणून धर्मांतराबद्दल कोणास काही शंका विचारावयाच्या असल्यास त्यांनी त्या अवश्य विचाराव्यात. शंका विचारावयास कोणीच पुढे न आल्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या भाषणास सुरूवात केली. ते म्हणाले,

प्रिय भगिनींनो व बंधुंनो,

मी या सभेला येणार नव्हतो. परंतु मला समजले की येथे जुन्या परंपरेला चिकटून राहाणारे असे काही लोक आहेत व ते महार परिषदेने पास केलेल्या धर्मांतराबद्दलच्या ठरावाची अंमलबजावणी पूर्णपणे करीत नाहीत, तेव्हा अशा लोकांच्या शंकानिरसनासाठी मी येथे आलो आहे. माझी मते यापूर्वीच मी अनेकवेळा बोलून दाखविली आहेत.

---

जनता : ४ सप्टेंबर १९३७.

त्याबद्दल तुमच्या मनात शंका असू नये. १९३५ साली भरलेली मुबई इलाखा महार परिषद ही महार जातीच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी झाली आहे. ती परिषद अपूर्व, अवाढव्य व पूर्ण प्रातिनिधिक अशी झाली आहे. तेव्हा अशा परिषदेने पास केलेले ठराव वास्तविक सर्व महार जातीने मानावयास पाहिजे व महार जातीतील बहुसंख्यांक लोक ते ठराव मानतातही. मात्र महार जातीतील काही थोडे लोक अद्याप जुन्या परंपरेलाच धरून आहेत, असे माझ्या कानावर आले आहे. अशा लोकांना मला असे सांगावेसे वाटते की, अल्पमतवाल्या लोकांना नेहमी बहुमतवाल्या लोकांप्रमाणे वागावे लागते. सध्याच्या कौन्सिलचेच उदाहरण घ्या. सध्या कौन्सिलमध्ये काँग्रेसचे बहुमत आहे त्यामुळे ते करतील त्या कायद्यांना मान देणे आपणास भागच पडते. ' जातीसाठी खावी माती ' अशी म्हण आहे. मग जातीने धर्मांतराबद्दल दिलेला निर्णय मानणे आपले कर्तव्य नाही काय ?

अनेक कार्यासाठी जातीकडेच आपणास जावे लागते. मग जातीने ठराव केला तो मान्य का नसावा ? हिंदू धर्माप्रमाणे आपण जे पाळीत होतो ते सर्व धार्मिक सण-वार सोडून दिले पाहिजेत. हे सोडून देण्याचे कारण आज जे मी सांगणार आहे ते मात्र निराळे आहे. हिंदू धर्माप्रमाणे जे काही विधी करतात ते धर्माच्याच नव्हे तर नीतीच्या दृष्टीने रास्त असतात काय याचा आपण विचार केला पाहिजे. काही विधीत तर अतिशय बाष्कळपणा भरलेला असतो. उदाहरणार्थ, शंकराच्या नावाने लोक सोमवारी उपवास करतात व शंकराच्या पिंडीची बहुतप्रकारे पूजा करतात. परंतु शंकराची पिंडी ही काय वस्तू आहे, याचा क़ोणी विचार केला आहे ? ती दुसरे तिसरे काहीही नसून पुरुष-स्त्रीच्या संभोगक्रियेची प्रतिमा आहे. अशा बीभत्स प्रतिमेचे गोडवे आपण गावे का ? रस्त्यावर श्वानाप्रमाणे जर नर-नारी वाह्यातगिरी करू लागले तर आपण त्यांची फुलाने पूजा करायची की जोड्याने ? मग पार्वती-शंकर यांच्या त्याच क्रियेच्या प्रतिमेला म्हणजे देवाच्या बीभत्सपणाला आपण पूजावे काय ?

गणपतीचासुद्धा तसलाच प्रकार ! गणपतीची कथा अशी आहे की एकदा पार्वती नग्न स्नान करीत होती. त्यावेळेस शंकर कोठेतरी दुसरीकडे गेला होता. म्हणून पार्वतीने आपणास कोणापासून उपसर्ग पोहोचू नये म्हणून आपल्या अंगावरचा मळ काढून त्याचा रक्षणकर्ता गणपती बनविला. तेव्हा मळातून उत्पन्न झालेल्या अमंगळाला देव कसे मानावयाचे ? ईश्वर निष्कलंक, मूर्तीमंत, पवित्र असावयास पाहिजे. परंतु हिंदू धर्मातील देव मोठे विचित्र आहेत ! म्हणून त्यांची पूजा करू नये, अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

तिसरी गोष्ट दत्तात्रेयाची. अत्री ऋषीची बायको अनसूया ही महान पतिव्रता आहे, असे ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन देवांच्या बायकांना नारद सांगत गेला. आपल्यापेक्षा कोणी स्त्री अधिक पतिव्रता असावी हे त्यांना पाहावेना. तेव्हा या तिन्ही बायकांनी आपापल्या नवऱ्यांना अनसूयेचे पातिव्रत्य हरण करण्यास सांगितले व बायकांचे म्हणणे ऐकून हे तिघे वीरही त्या कामास तयार झाले. हे तिघेजण अनसूयाच्या घरी गेले. तिच्या नवऱ्याला काही कारण सांगून दुसरीकडे पाठविले व आपण अनसूयेच्या सहवासात राहू लागले. या अवस्थेत तिने एका मुलाला जन्म दिला आणि या बालकाचे जनकत्व कोणाकडे हा विचार पडल्यामुळे त्या तिघांवर सारखीच जबाबदारी टाकण्याकरिता त्याला तीन तोंडे लावली व तोच हा दत्तात्रेयाचा अवतार ! पुष्कळ लोकांचा असा समज झाला आहे की धर्मांतराची लाट आता थंडावली आहे. परंतु तसे नाही. धर्मांतर हे होणारच आहे. ही चळवळ मी सोडली नाही, हे तुम्ही पक्के लक्षात ठेवा. पुष्कळ हिंदू लोक मला म्हणतात की, ' तुमच्या धर्मांतराच्या प्रश्नाने आमचे डोळे उघडले आहेत. आम्ही आता सावध झालो असल्यामुळे तुमच्या बाबतीतल्या कर्तव्यात आता आम्ही चुकणार नाही म्हणून तुम्ही धर्मांतराची चळवळ परत घ्या. ' परंतु आतापर्यंत मी जे बोललो त्या कारणासाठीच मला चळवळ परत घ्यावयाची नाही. तुम्ही पूर्ण विचार करा. दुसरा धर्म स्वीकारावयाचा तो पूर्ण तावून सुलाखूनच स्वीकारला पाहिजे. मला आशा आहे की यापुढे महार जातीतील सर्व लोक महार परिषदेने केलेल्या ठरावाप्रमाणेच वागतील.

डॉ. बाबासाहेबांचे भाषण झाल्यावर आभार प्रदर्शन, हारतुरे होऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयजयकारात सभा संपली.



१०७

# बहुजन समाजावर अन्याय होणार नाही असे कायदे करवून घेतले पाहिजेत

मु. मसूर, जि. सातारा येथे पूर्वी ठरल्याप्रमाणे ता. ६ नोव्हेंबर १९३७ रोजी सातारा जिल्हा महार परिषदेचे ७ वे अधिवेशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रीतीने पार पडले. यावेळी डॉक्टरसाहेबांच्या जंगी स्वागतास हजारो स्त्रीपुरुषांचा अलोट जमाव जमला होता. परिषदेच्या अगोदर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची मोटारमधून दीड दोन मैल लांबीची मिरवणूक काढण्यात आली. पांचगणी, दहिगाव व इतर ठिकाणच्या समता सैनिक दलांनी या मिरवणुकीची शिस्त वाखाणण्यासारखी ठेविली होती. डॉक्टरसाहेबांच्या गगनभेदी जयजयकाराने ते सारे वातावरण दुमदुमून गेले होते. स्पृश्यवर्गीय समाज बांधवांना हे अपूर्व आणि उत्साही वातावरण पाहून कौतुक व आश्चर्य वाटल्यास नवल नाही. या मिरवणुकीत अध्यक्षसाहेबांबरोबर स्वागताध्यक्ष मि. के. एस. सावंत, एम. एल. ए. हे मोटारीत बसले होते. त्यांच्या मागील मोटारीत आमदार श्री. राजाराम भाऊ भोळे, ॲ. विनायकराव गडकरी, अण्णासाहेब पोतनीस वगैरे पुढारी मंडळी बसली होती. सायंकाळी तीन वाजण्याच्या सुमारास ही प्रचंड मिरवणूक परिषदेसाठी खास उभारलेल्या भव्य मंडपात येऊन दाखल झाली. डॉ. बाबासाहेबांचे दर्शन होण्यासाठी लोकांच्या झुंडीच्या झुंडी मंडपाच्या प्रवेशद्वारी लोटू लागल्या होत्या. त्यामुळे, परिषदेची व्यवस्था ठेवणे काही वेळ कठीण झाले होते. समता सैनिक दलाच्या उत्कृष्ट कामगिरीमुळे परिषदेची सारी व्यवस्था उत्तम प्रकारे राखण्यात आली.

स्वागत गीत झाल्यावर रीतसर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची अध्यक्षस्थानी निवड करण्यात आली. त्यावेळी टाळयांचा व जयजयकारांचा प्रचंड ध्वनी झाला. त्यानंतर स्वागताध्यक्ष मि. खंडेराव एस. सावंत यांचे भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा परिचय करून देताना त्यांचे एका साधु उक्तीत वर्णन केले, ते असे ' झाले बहू , आहेत बहू , होतील बहू , परंतु या सम हा ' हे त्यांनी केलेले डॉक्टरसाहेबांविषयीचे वर्णन अतिशयोक्तीचे खास नव्हे !

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो,

मसूर या गावाचे नाव घेतले की मला माझ्या बालपणी अस्पृश्यतेसंबंधी अनुभवलेल्या कडू अनुभवांची आठवण होऊन डोळ्यात अजूनही अश्रू उभे

---

जनता : १३ आणि २० नोव्हेंबर १९३७.

राहतात. माझी या गावी गेल्या ३५ वर्षानंतर ही दुसरी खेप आहे. या भागात गोरेगावला ज्यावेळी तळे बांधले, त्यावेळी त्या कामावर माझे वडील कॅशियर म्हणून काम करीत होते. मी, माझे दोघे बंधु आणि माझ्या बहिणीचा मुलगा असे चौघेजण सातारा येथे शिक्षणासाठी राहात होतो. माझी मातोश्री त्यावेळी स्वर्गवासी झाली होती. आम्हा सर्व मुलांवर आमचे वडिलांचे एक स्नेही, शेजारी राहात असत, ते लक्ष ठेवीत असत. उन्हाळयाच्या सुट्टीत आमच्या वडिलांनी आम्हास गोरेगावी बोलाविले. आम्ही तेथे येणार असल्याचे एक पत्र अगोदर एका हमालाबरोबर पाठविले होते. आम्हाला रेल्वेगाडीने जाण्यात मोठा आनंद झाला. कारण यापूर्वी ही गाडी इंजिनने कशी चालते, हे पाहिले नव्हते. त्यामुळे आम्हास एक प्रकारची आतुरता लागली होती. प्रवासासाठी नवीन कपडे, जरीच्या टोप्या वगैरे खरेदी करून आम्ही साताऱ्याहून पाडली स्टेशनावर गाडीत बसलो. तेथून मसूर पर्यंतचा प्रवास अत्यंत आनंदात गेला. मसूर स्टेशनवर पोचताच आम्हास कोणीच उतरून घ्यावयास आलेले नाही, हे पाहून आश्चर्य वाटले. दुपारी ४ ते रात्री ७ वाजेपर्यंत आम्ही मसूर स्टेशनवर बसून राहिलो. आम्ही असे तिष्ठत बसलेले पाहून स्टेशन मास्तरने आमची चौकशी केली. आम्ही आमची जात सांगताच स्टेशन मास्तर चमकला. शेवटी त्याने मोठ्या मुश्किलीने गोरेगावास जाण्याकरिता एक गाडी ठरवून दिली पण गाडीवानाला आमची जात सांगताच तो बिचकला. तो आम्हास महाराची पोरे म्हणून नेण्यास तयार होईना. शेवटी आमच्या बंधुने अशी तडजोड केली की ठरलेल्या भाड्यापेक्षा एक रुपया अधिक देऊन गाडी आम्ही हाकू व गाडीवानाने बरोबर चालावे. तडजोड मान्य करून त्याने गाडीस बैल जुंपले व आम्ही गाडी हाकू लागलो. पुढे मसूर गावच्या नाल्याजवळ गाडी उभी केली. त्यावेळेस आम्हास अत्यंत तहान लागली होती. आम्ही गाडीवानास कुठचे पाणी प्यायचे असे विचारताच त्याने अस्पृश्य लोकांसाठी असलेला शेणसड्याने भरलेला खड्डा दाखविला. येथील दुर्गंधी पाणी पिणे अशक्य होते. आम्हाला तहान फार लागली होती. परंतु या पाण्याच्या गैरसोयीमुळे मुकाट्याने पुढचा मार्ग धरावा लागला. रात्र पडत होती. पाण्याने व भुकेने जीव तळमळत होते. दुसऱ्या स्पृश्यांच्या नाल्यावर पाणी पिण्यास किंवा मागून घेण्यास आम्हास मज्जाव होता. मध्यरात्रीच्या सुमारास आम्ही टोलनाक्यावर आलो. तेथेही महार जातीमुळे पाणी मिळाले नाही. अखेर अशा घायाळ अवस्थेत आम्ही गोरेगाव मुक्कामी पोहोचलो. वडिलांनी आम्हास असे अगोदर कळविल्याशिवाय का आलात म्हणून विचारले. त्यावरून आमचे एका इसमाबरोबर पाठविलेले पत्र त्यांना अजून मिळाले नव्हते. त्यांना आमची ही वाटेतली शोचनीय अवस्था पाहून गहिवर आला. या प्रवासाने ' आपण अस्पृश्य ' आहोत,

आपणास कमी लेखतात, आपले पाणवठे गलिच्छ ठिकाणी असतात, स्पृश्य लोक आपला विटाळ मानतात वगैरे संबंधीचा पहिला अनुभव माझ्या आयुष्यात मला मिळाला. माझ्या बालमनाला ही गोष्ट फारच लागून राहिली आणि ती गोष्ट आज येथेच जमलेल्या हजारो लोकांपुढे सांगण्याची वेळ येईल, असे स्वप्नातही त्यावेळी वाटले नव्हते. असो.

आज येथे आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना करण्यासाठी आपण सर्वजण जमलो आहोत. आपल्या पक्षाच्या कार्यक्रमाची आपणा सर्वांना जाणीव आहे. हिंदुस्थानावर लादलेल्या नवीन सुधारणात भरपूर दोष व व्यंगे असल्यामुळे त्या पूर्ण जबाबदारीचे स्वराज्य प्राप्त करून देण्यास असमर्थ आहेत. प्रांतिक राज्यकारभारातील कित्येक घटना, विशेषतः सेकंड चेंबरची घटना ही आपल्या पक्षास आक्षेपार्ह वाटते. तथापि, या नवीन सुधारणा राबविण्यास हरकत नाही. मात्र जबाबदारीच्या स्वराज्याचे स्वरूप निष्प्रभ करून टाकण्याजोगे जे खास व अनियंत्रित स्वरूपाचे अधिकार गव्हर्नरास मिळालेले आहेत त्यांचा उपयोग या मुदतीत होऊ नये याबद्दल स्वतंत्र मजूर पक्ष जागृत राहील. तसेच अस्पृश्य बांधव, मजूर व शेतकरी यांचे नाते इष्ट कसे होईल याचा विचार करून सर्वसाधारण श्रमजीवी वर्गासाठी विधायक कार्य करण्याचा आपल्या पक्षाचा संकल्प आहे. तुम्हास ठाऊक असेलच की गिरणीतील मजूर वर्गात स्पृश्य मजूर व अस्पृश्य मजूर असा उघड भेदभाव आहे. स्पृश्य मजुरास कापड खात्यात काम मिळते व तो जॉबरचे जागेपर्यंत वर चढू शकतो. परंतु अस्पृश्य मजुरास तो कितीही लायक असला तरी त्याला कापड खात्यात काम मिळत नाही. तो तेलवालाच राहतो. सर्वसाधारणपणे मजुरांची परिस्थिती हलाखीची व कष्टमय आहे. स्पृश्य मजुरांचे दारिद्र्य मालकशाहीमुळे तर अस्पृश्य मजुरांचे दारिद्र्य, मालकशाही अधिक अस्पृश्यता या दोहोंमुळे आहे. परंतु दुःखाची गोष्ट ही की कॉंग्रेसमधील व बाहेरील मजुरांचे पुढारी या गोष्टीकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करीत आहेत. स्वतंत्र मजूर पक्षाचा सवतासुभा स्थापन करण्यास जी काही कारणे आहेत त्यापैकी हे एक होय. मजुरांना जातीभेदाने अगर वर्गभेदामुळे त्यांच्या लायकीला धक्का मिळणार नाही व त्यांचा उन्नतीचा मार्ग सुखकर होईल असा प्रयत्न आज कॉंग्रेस अगर इतर पक्षाचे मजूर पुढारी करू शकत नाहीत. कारण कॉंग्रेसचे पुढारी आज भांडवलवाल्यांच्या कचाटीत सापडल्यामुळे गरीब मजुरांचे व शेतकऱ्यांचे कल्याण त्यांच्याकडून होऊ शकत नाही. कॉंग्रेस 'भांडवलवाल्यांचे हित करणार व गरिबांचेही हित करणार' अशी घोषणा करते. अशा दुटप्पी परिस्थितीत एका म्यानात दोन सुऱ्या राहू शकत नाहीत. अशा परिस्थितीत आपल्या श्रमजिवी वर्गाने कॉंग्रेसच्या विश्वासावर राहणे व्यर्थ आहे. कॉंग्रेसचे पंचप्राण महात्मा गांधी यांच्या मनाचा ठाव मला

पूर्णपणे आहे. त्यांचे हृद्गत जितके मला माहीत आहे तितके तुम्हास नाही. त्यांचा व माझा जो परिचय आहे त्यावरून पाहता महात्माजी तुमचे कल्याण करू शकत नाहीत. त्यांचे व आपले या बाबतीतले मार्ग अगदी भिन्न आहेत. ज्याला भाकरी पाहिजे त्याला देवळांचा काय उपयोग ? गेल्या राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये अस्पृश्य समाजाविषयी मोठा दुर्घट प्रश्न होता. नोकरशाहीची सत्ता काढून ती बहुजन समाजाचे हाती देताना त्यातील काही अंश अस्पृश्यांचे हाती द्या, असे सर्वांचे म्हणणे होते. परंतु हे महात्माजीच त्यावेळी अस्पृश्यांच्या हक्कांविरूद्ध गेले. मात्र मुसलमान, ख्रिस्ती वगैरे अल्पसंख्यांकांना या सत्तेतील काही अंश देण्यासाठी ते तयार होते. अशा बिकट प्रसंगी या हिंदुंच्या महान पुढाऱ्याशी आपल्या स्वतंत्र हक्कासाठी झगडावे लागले. अस्पृश्यांचे कल्याणकर्ते म्हणविणारे हे हिंदुस्थानचे महात्मे या वेळी आपल्याविरुद्ध जावयास नको होते. ते आपले खरेखुरे कल्याणकर्ते असते तर त्यांच्याशी वादविवाद करण्यात मला माझी शक्ती खर्च करण्याचे कारण पडले नसते.

महात्माजीस स्वराज्यासाठी चटकन एक कोटी रुपये देणारे स्पृश्य लोक अस्पृश्यता निवारण्यास पाच, सहा लाखापर्यंत वर्गणी देण्यास समर्थ का होऊ शकत नाही ? यावरून स्पृश्य समाजाला अस्पृश्यता निवारणाच्या कार्याची किती तळमळ आहे, हे दिसून येते. ही जुलमाच्या रामरामाची गांधीजींची चळवळ आपला उत्कर्ष कसा काय करणार ? आणि तुमचा विटाळ, तुमचेवरील जोर जुलुम, तुमची सामाजिक हाल अपेष्टा, मानहानी, दारिद्र्य हे लोक कशा रीतीने नष्ट करणार ? खरे पाहिले असता स्पृश्य हिंदू दिखाऊ कामे करण्यात पटाईत आहेत. आतून तुमच्या सामाजिक जीवनात काटे पसरविण्याचा ते नेहमी नेटाने प्रयत्न करतात. श्रीमंत, सावकार, खोत, भांडवलवाले हे तुमचे आर्थिक जीवन कष्टप्रद करीत आहेत. तर इकडे बहुजन समाजाची प्रातिनिधिक कॉंग्रेस दिमाखाने कॉंग्रेस हीच अस्पृश्यांची, गोरगरिबांची म्हणविणाऱ्या लोकांची, रंजल्या गांजलेल्यांची असे तोऱ्याने म्हणत आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता कॉंग्रेस ही संस्था जर आपली कल्याणकर्ती आहे, असे वाटले असते तर मी मोठ्या आनंदाने तीमध्ये सामील झालो असतो पण मला कॉंग्रेसकडून आपल्या समाजाचे, मजूरांचे, शेतकऱ्यांचे व गोरगरिबांचे हित होत नाही, असे वाटल्यावरून मी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली आहे.

या देशातून एकवेळ इंग्रज लोक जाऊ शकतील परंतु सर्व गरीब जनतेला नागवून तिचे रक्त शोषण करणारा जळवांसारखा जो धनिक भांडवलवाला वर्ग आहे तो या देशातून जाणारा नाही. तो कॉंग्रेसमध्ये सामील झाला. म्हणून

त्याची रक्त शोषक वृत्ती नाहीशी होणार नाही. त्याची भरमसाट व्याज घेण्याची आसुरी वासना नष्ट होणार नाही. त्यांची गोरगरिबांच्या घरादारावर निखारे ठेवण्याची बुद्धी नाहीशी होणार नाही.

आपल्या मुंबई इलाख्यातील ब्राह्मणेतर पक्ष गरिबांसाठी काही कार्य करील, असे वाटत होते. इतकेच नव्हे तर त्याचा काही काळ अभिमान वाटत होता. परंतु शेवटी शिस्तीच्या व संघटनेच्या अभावी आणि वाहत्या गंगेत हात धुवून घेण्याच्या वृत्तीमुळे या पक्षाचे सारे बळ लयास गेले आहे आणि उच्च म्हणविणाऱ्या ब्राह्मण समाजाचे चढेल धोरण नेस्तनाबूद करण्याचा त्यांचा हेतू कोठल्या कोठे लयास गेला आहे. एका प्रबळ अशा पक्षाची ही आजची शोचनीय अवस्था आपण लक्षात घेतली पाहिजे आणि आपल्या प्रत्येक माणसाने पक्षाशी पूर्ण इमानी राहिले पाहिजे. त्याने पुढाऱ्याची आज्ञा शिरसावंद्य मानली पाहिजे. पक्षाच्या कार्यक्रमावर नितांत विश्वास ठेवून प्रतारणा न करता अंमलात आणण्याचा जोमाने प्रयत्न केला पाहिजे. त्याने वैयक्तिक स्वार्थ सोडला पाहिजे. पक्षासाठी हाल, कष्ट सोसले पाहिजे व शिस्तीने सारे कार्य करणे हे ध्येय बाळगले पाहिजे. म्हणून स्वतंत्र मजूर पक्षात सामील होणारांनी या सर्व गोष्टींचा नीट विचार केला पाहिजे.

आज असेंब्लीमध्ये आपल्या पक्षाचे प्रतिनिधी थोडे असले तरी असेंब्ली-मधील दुसऱ्या पक्षांना त्याची भीती वाटते. याचे कारण आपण लोककल्याणासाठी जो कार्यक्रम आखला आहे तो पूर्णपणे पार पाडण्याचा आपण आटोकाट प्रयत्न करू याची त्यांना खात्री आहे. बहुजन समाजाला सुख मिळेल, त्यांच्यावर अन्याय होणार नाही असे कायदे सत्ताधारी पक्षाकडून करवून घेतले पाहिजेत. आपणास जे थोडे राजकीय हक्क मिळाले आहेत त्यात तूर्त समाधान मानून अधिकारासाठी झगडले पाहिजे. फौजदार, मामलेदार, सर्कल इन्स्पेक्टर, तलाठी व पाटील यांचे हाती सत्ता नाही. महार ज्याप्रमाणे सरकारी नोकर त्याचप्रमाणे ते नोकर आहेत. खरी राजसत्ता लोकांचे हाती म्हणजे कौन्सिलच्या हाती आहे. म्हणून तुम्हास सरकारी नोकरांना भिण्याचे कारण नाही. त्यांनी व इतरांनी तुम्हास त्रास दिल्यास त्याची दाद लावण्यासाठी, तुमची गाऱ्हाणी, दुःखे व जुलूम वेशीवर टांगून, स्वतंत्र मजूर पक्ष ती नाहीशी करण्याचा प्रयत्न करील, असे आश्वासन मी तुम्हास देतो. स्वतंत्र मजूर पक्षाच्या जिल्हानिहाय शाखा स्थापन होणार आहेत. माझे बालपण व प्राथमिक शिक्षण या जिल्ह्याला झाल्यामुळे या जिल्ह्याची शाखा स्थापन करताना मला अत्यंत आनंद होत आहे.

● ● ●

# १०८

# मनुष्य असूनही भाकरीसाठी स्वाभिमानशून्य होणार काय ?

मु. दौंड, जि. पुणे येथे तारीख ७ नोव्हेंबर १९३७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. पुणे जिल्ह्यात हा भाग विशेष मागासलेला आहे आणि यासाठीच डॉ. आंबेडकरसाहेबांनी या ठिकाणी जाऊन तेथे एकंदर परिस्थिती पाहिली. त्यांच्या आगमन प्रसंगी सौ. ठकूबाई रोकडे, भीमाबाई मचार, चिमाबाई सोनवणे, गोधाबाई, भागीरथीबाई रोकडे, लक्ष्मीबाई डिखळे व जयाबाई भिंगारदिवे वगैरे स्त्रियांनी त्यांना पंचारती ओवाळून त्यांचे स्वागत केले व नंतर सभेस सुरवात झाली. प्रथम आमदार राजाराम भोळे यांनी सर्वांचे स्वागत करून डॉ. आंबेडकरांना अध्यक्षस्थान स्वीकारावयास सांगितले. त्यांच्यानंतर आमदार डॉ. भाऊसाहेब गडकरी यांचे पाठिंब्यादाखल भाषण झाले.

यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उठले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

प्रिय भगिनींनो व बंधुंनो,

येथे येऊन फारसे बोलावे लागेल, असे मला वाटले नव्हते. तुम्हा मंडळीची भेट घेतल्याने कार्यभाग संपला असे वाटत होते. परंतु तुमच्या येथील परिस्थिती पाहून मला दोन शब्द बोलणे भाग पडत आहे. आंजच्या सभेचा मुख्य उद्देश म्हणजे स्वतंत्र मजूर पक्षाची शाखा काढणे हा आहे. हा आमचा पक्ष फक्त अस्पृश्य वर्गाकरिता नसून जे लोक मजूरी करून पोट भरतात व शेतकरी वर्ग आहे अशांचा मुख्यत्त्वेकरून या पक्षात समावेश होतो. आपल्या पक्षाची स्थापना होऊन एक वर्षही झालेले नाही. परंतु त्याच्या कार्याचा विस्तार व्यापकतेने वाढत आहे. यावरून या पक्षाच्या आवश्यकतेची जाणीव होईल. श्रमजीवी वर्गाचे कॉंग्रेस मुळीच कल्याण करणार नाही. कॉंग्रेस ही माया आहे. या महामायेच्या पाशात सापडून आपला अधःपात करून घेऊ नका. तुम्हाला ठाऊक आहे की एखादा लांडगा जर मेंढीला म्हणाला की, ' चल मी तुला स्वर्गात नेतो ' पण तो तिला स्वर्गात घेऊन जाण्याऐवजी तिला मध्येच खाऊन खरा स्वर्ग दाखविल्याशिवाय राहाणार नाही. यासाठी आपण वेळीच

---

जनता : २० नोव्हेंबर १९३७.

सावध राहा. खरे खोटे कोणते ते स्वतःच्या बुद्धीने ठरवा. तुमचे खरे हित व्हावे, अशी जर तुमची इच्छा असेल तर आजच स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हा. कायदेमंडळात आपले लोक अधिक प्रमाणात जाणे जरूरीचे आहे. तेच आपले प्रतिनिधी आपल्या हिताचे काम करतील.

तसेच वतनाच्या बाबतीत काँग्रेसचे लोक तुमचा गैरसमज करतील, खेडेगावात तुमची वस्ती थोडी असते. तुमची उपजीविका येथील स्पृश्यांच्या मर्जीवर अवलंबून आहे. त्यासाठी ते तुमची हडकी हाडवळे जातील म्हणून दिशाभूल करतील, त्यांच्यावर तुम्ही विश्वास ठेवू नका. दिवाळीत महारणीने पाटलास ओवाळण्यास जावे आणि म्हणावे ' बळीचे राज्य येवो '. आतापर्यंत त्याने पुष्कळ राज्य भोगले आहे. मग पाटलाच्या बायकोने महारास का ओवाळू नये ? दसऱ्याच्या दिवशी महाराने आपटा आणावा व तो पाटलाने खुशाल लुटावा. अशावेळी पाटलाला आपटा आणावयास काय झाले ? पंचायती वगैरे महत्त्वाच्या कामासाठी सर्व लोकास बोलाविण्याकरिता महारास पाठविले जाते, पण पंचायतीमध्ये बसण्याचा अधिकार महारास का नसावा ? मयताचे निरोप पोष्टाने किवा तारेने पाठवावयाचे सोडून ते सारे महाराने पायपीट करून काय म्हणून कळवादे ? मी आतापर्यंत फक्त दोन गोष्टी सांगितल्या आहेत. त्या म्हणजे (१) मृतमांस न खाणे, (२) उच्छिष्ट अन्न न खाणे. भाकरी वगैरे भीक मागून आणण्याच्या प्रकाराविरूद्ध मी आहे. अशामुळे आपण इतरांप्रमाणे मनुष्य असूनही भाकरीसाठी स्वाभिमानशून्य का व्हावे ?

अशा परिस्थितीत मी तुम्हास स्पृश्य लोकांकडे भाकरीसाठी भीक मागा, असे कसे सांगेन. मला येथे जमलेल्या स्त्रियांना सांगावयाचे आहे की तुम्ही मुलांना जन्म दिल्यानंतर त्यांची योग्य निगा न करता, त्यांना इतर स्पृश्य समाजातील मुलाबाळांप्रमाणे वळण लावून त्याचे शिक्षणाकडे लक्ष न वेधविता गावातून भीक मागीत का फिरविता ? तुम्ही मनुष्य आहात. स्पृश्य समाजातील मुले शिकून आपला नावलौकिक काढतात त्याप्रमाणे आपल्या मुलांना का वळण देत नाही. माझ्या सांगण्याप्रमाणे जर येथले लोक वागायला लागले, असे कळले तरच मला आनंद होईल.

या सभेस पुण्याहून मे. सुभेदार घाटगे बंधु, मधाळे, अण्णा पोतनीस, डिखळे बंधू, बोराळे, पानसरे, गायकवाड, घोटके वगैरे बरीच मंडळी हजर होती. या सभेत (१) महार वतन बिलास पाठिंबा, (२) लोकल बोर्डाच्या विहिरी अस्पृश्यांच्या वस्तीजवळ बांधणे, (३) खोती पद्धती नष्ट करणाऱ्या बिलास पाठिंबा, (४) मिलिटरी गोळीबारामुळे महार लोकांना होणारा त्रास दूर व्हावा किंवा त्याबद्दल त्यांना वेतन मिळावे वगैरे ठराव पास झाले. शेवटी हारतुरे वगैरे देण्याचा समारंभ झाल्यावर ही सभा बरखास्त करण्यात आली.

● ● ●

## १०९

# मी जे कमाविले ते अखिल अस्पृश्यांसाठी

रविवार तारीख ७ नोव्हेंबर १९३७ रोजी रात्रौ ८ वाजता पुण्यातील भवानी पेठ, भंगी वस्तीला अस्पृश्य समाजाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भेट दिली. सदर प्रसंगी आमदार भोळे, मे. खंडेराव सखाराम सावंत, मे. सुभेदार आर. एस्. घाटगे साहेब, मे. रेवजी दगडूजी डोळस, मे. के. गायकवाड, मे. एस्. थोरात, मे. शांताराम पोतनीस, मे. के. आर. मधाळे, मे. एस्. गायकवाड, वगैरे प्रमुख मंडळी व महार, मांग, भंगी वगैरे जनसमुदाय हजर होता. डॉ. बाबासाहेबांची मोटार येताच त्यांचे जयजयकारात स्वागत करण्यात आले. प्रथम भंगी समाजातील प्रसिद्ध गायनरत्न कासम इसूफ ज्ञानज्योत यांचे साथीदारांसह सुस्वर असे संगीत गायन झाल्यावर भंगी समाजातील तरूण कार्यकर्ते मे. विठ्ठलदास अल्लीभाई चव्हाण यांनी भंगी समाजाच्या आर्थिक परिस्थितीविषयी व फ्लशींग संडास सिस्टिममुळे झालेल्या बेकारीची डॉ. बाबासाहेबांना माहिती दिल्यावर भंगी समाजातर्फे त्यांचे स्वागताप्रित्यर्थ पुष्पहार अर्पण केले. नंतर हरिजन हितचिंतक मंडळाकडून चालत असलेल्या मोफत वाचनालयातर्फे मंडळाचे जॉईंट सेक्रेटरी मे. किसन तुकाराम भोसले यांनी मंडळ व वाचनालय यांची माहिती सांगून वाचनालयातर्फे पुष्पहार अर्पण केले.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या अमृततुल्य भाषणाच्या अमोल प्रसादाने जमलेल्या श्रोतृजनास तृप्त केले. ते म्हणाले,

मी जे कमाविले आहे ते केवळ महारांकरिता नसून अखिल अस्पृश्यांसाठी आहे. आम्ही जसे ब्राह्मणासंगती मिळून मिसळून वागण्यास पाहतो तसेच महारांनी भंगी, मांग यांच्यात मिसळून वागले पाहिजे, नाही तर मी महारांकरिता काही करणार नाही. तसेच भंगी समाज सांगेल ते मी करीन.



---

जनता : २० नोव्हेंबर १९३७..

११०

# आपले अस्तित्व स्वतंत्रपणे राखल्याशिवाय दुःखांना तोंड फोडता येणार नाही

आदि-द्रविड (मद्रास भागातील बहिष्कृत) समाजाची बरीचशी वस्ती मुंबईमध्ये धारावी (सायन) भागात आहे. बहुतेक लोक त्या भागात कातडे कमावण्याचे जे कारखाने आहेत त्यात मजूर म्हणून काम करीत असतात. या समाजातील काही तरुणांनी 'आदि-द्रविड युवक संघ' या नावाची एक संस्था चालविली आहे. या संस्थेची सर्वसाधारण सभा रविवार तारीख १४ नोव्हेंबर १९३७ रोजी माटुंगा येथील बपू हॉलमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस श्री. कमलाकांत चित्रे, श्री. शांताराम उपशाम व डी. व्ही. प्रधान वगैरे निमंत्रित पाहुणे म्हणून हजर होते. सभेचे आरंभी आदि-द्रविड समाजाकडून डॉ. बाबासाहेबांस मानपत्र अर्पण करण्यात आले व नंतर संस्थेची मामुली कामे उरकण्यात आली.

डॉ. साहेबांनी मानपत्राच्या उत्तरादाखल भाषण केले. ते म्हणाले,

प्रिय भगिनींनो व बंधुंनो,

आपण जो माझा मानपत्र देऊन गौरव केला त्याबद्दल मी आपले आभार मानतो. तुम्ही सर्व मंडळी मद्रास प्रांतातून मुंबई येथे कामकाजाकरिता आला आहात. आपापल्या गावात तुम्ही जात येत असता. तेव्हा तुमचा आणि तुमच्या प्रांतातील इतर लोकांचा ज्या ज्या वेळेस संबंध येईल त्या त्या वेळेस तुम्ही त्यांना एक गोष्ट पटवून द्यायला हवी. सध्या जी नवीन राजघटना अंमलात आली आहे तीत अस्पृश्य वर्गास जे राजकीय हक्क प्राप्त झाले आहेत ते अभूतपूर्व असे आहेत. अद्यापपावेतो आपल्या वर्गाच्या बाबतीत अशी गोष्ट घडली नव्हती. हे जे हक्क प्राप्त झाले आहेत त्यांचा उपयोग जर अस्पृश्य वर्गाच्या हिताकरिता पूर्णपणे झाला नाही तर ते मिळून न मिळून सारखेच. इतर कोणत्याही प्रांतापेक्षा मद्रास प्रांतातील बहिष्कृत वर्गाला अधिक जागा मिळाल्या आहेत. तसेच इतर कोणत्याही प्रांतापेक्षा तुमच्या प्रांतातील अस्पृश्य वर्गाची दुःखे अधिक आहेत. अशा परिस्थितीत तुम्हाला मिळालेल्या राजकीय हक्कांचा उपयोग तुम्ही योग्यरीतीने केला आहे का, असा प्रश्न केल्यास मोठ्या कष्टाने असे म्हणावे लागते

---

जनता : २० नोव्हेंबर १९३७.

की तुम्ही याबाबतीत आपल्या कर्तव्याला जागला नाहीत. ३० जागांपैकी काही अगदी थोड्या प्रतिनिधींशिवाय सर्वजण आज कॉंग्रेसमध्ये विरून गेले आहेत. त्याचा परिणाम असा झाला आहे की त्या प्रांतातील अस्पृश्य वर्गाच्या गाऱ्हाण्यांना त्यामुळे गौणत्व आलेले आहे. तुम्हाला अस्पृश्य म्हणून लेखणारे व तुमच्यावर जुलूम करणारे कोण तर हिंदू व त्याच हिंदू लोकांनी आज सर्व कॉंग्रेस व्यापलेली आहे. आता त्यांच्याशीच जर अस्पृश्य वर्ग एक झाला तर तुमची गाऱ्हाणी दूर कशी होणार ? कॉंग्रेसमध्ये सामील झालेल्या अस्पृश्य वर्गाच्या प्रतिनिधींना अधिकारारूढ झालेल्या कॉंग्रेस मंत्रीमंडळाला पक्षाच्या शिस्तीप्रमाणे कोणत्याही गाऱ्हाण्याबद्दल कायदेमंडळात प्रश्न विचारता येणे शक्य नाही. त्यांच्याविषयी आकांडतांडव करून मंत्रीमंडळास ती गाऱ्हाणी दूर करण्यास भाग पाडणे तर दूरच राहिले. दुसरा एक महत्त्वाचा प्रश्न असा की तुमच्यावर जुलूम करणारे हिंदू म्हणजे कॉंग्रेस यांचेवर जर तुमचा एवढा विश्वास आहे तर तुम्हाला तुमचे भिन्न अस्तित्व मानण्याचे कारण काय ? उद्या तुम्हाला असा कोणीही प्रश्न विचारील की तुम्हाला खास राजकीय हक्कांची आवश्यकता तरी कोठे राहिली ? तेव्हा अस्पृश्य वर्गाचे जर कोठे हित होत असेल तर कॉंग्रेसमध्ये विरून जाण्यामध्ये नाही तर आपले अस्तित्व आज स्वतंत्रपणे जाहीर करून त्यांच्या अनेकविध दुःखांना वेळोवेळी तोंड फोडणे या नीतीमध्येच आहे. त्याशिवाय अस्पृश्य वर्ग जाचातून मुक्त होणार नाही व त्याची उन्नती होणार नाही. नंतर परत एक वेळ आदि-द्रविड समाजाचे आभार मानून डॉक्टर साहेबांनी आपले भाषण संपविले. यानंतर मद्रासकडील अस्पृश्यांचे एक पुढारी श्री. दि. ब. श्रीनिवासन यांचे भाषण झाले.



# १११

# पुढाऱ्यांच्या निधनानंतरही समाजकार्य अव्याहत चालून ते चिरकाल टिकले पाहिजे

जनता दिनांक १३ नोव्हेंबर १९३७ मध्ये जाहीर केल्यानुसार शनिवार दिनांक २० नोव्हेंबर १९३७ रोजी रात्रौ ८ वाजता वडाळा, मुंबई येथे श्री. भाऊराव गायकवाड यांना मानपत्र देऊन त्यांचा गौरव करण्याच्या कार्यक्रमाचे आयोजन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली करण्यात आले. या प्रसंगी श्री. शंकरराव वडवलकर यांचे श्री. भाऊराव गायकवाड यांनी केलेल्या कामगिरीचे ओझरते सिंहावलोकन करणारे भाषण झाले. त्यानंतर श्री. भाऊराव गायकवाड यांचे मानपत्राला उत्तरादाखल भाषण झाले.

यानंतर मानपत्र अर्पण समारंभाचे सन्माननीय अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आजच्या प्रसंगी या समारंभाला मला हजर राहता आले याबद्दल मी स्वतःला धन्य समजतो आणि म्हणून हा समारंभ घडवून आणल्याबद्दल मी येथील चालक मंडळीचा फार आभारी आहे. आपण नेहमी चळवळीची ज्योत पाजळण्यासाठी ज्या कामचलाऊ सभा करतो तशा प्रकारची ही सभा नाही. एका सन्माननीय अशा व्यक्तीच्या अभिनंदनाची ही सभा असून तिचे महत्त्व तितकेच मोठे आहे. श्री. भाऊराव यांचा दर्जा किती मोठा आहे, हे नव्याने सांगावयास नको. आजच्या मानपत्रातील भाषा त्यांना अतिशयोक्तीची वाटते पण माझ्या मते उलट ती पाण्यासारखी पातळ आहे. त्यामानाने भाऊरावांची कामगिरी अधिक अमोल अशी आहे. मला यावेळी वाईट वाटते हे की, हा मानपत्र अर्पण समारंभ वडाळा येथील सर्व रहिवाशांतर्फे न होता काही लोकांतर्फेच तो होत आहे आणि दुसरे हा समारंभ सर्व मुंबई इलाख्यातर्फे, निदान मुंबई शहरातर्फे तरी व्हावयास पाहिजे होता. असो. तरी पण या गोडप्रसंगी अध्यक्षपद स्वीकारण्याविषयीच्या विनंतीला मला नाही म्हणता येईना.

गेल्या १० वर्षाच्या आपल्या समाजाच्या प्रगतीचा जेव्हा मी शांतपणे विचार करतो त्यावेळी माझ्या मनात वारंवार दोन विचार घोळत असतात. एक

---

जनता : २७ नोव्हेंबर १९३७.

गांधीजीसारख्या पुरुषाबरोबर झगडण्यात यश मिळून आम्हास राजकीय हक्क मिळाले आणि आपणाला राजकारणात समानतेचा दर्जा मिळाला. ब्राह्मण, क्षत्रिय यांच्या मांडीला मांडी लावून कायदेमंडळात बसण्याची, त्यांच्याबरोबर विचारविनिमय करण्याची संधीही मिळाली. हे सारे मिळवून घेण्याला मी फक्त निमित्तमात्र झालो आहे, असे मला वाटते. दुसरी गोष्ट, श्री. भाऊराव गायकवाडांसारख्यांचे सहाय्य मिळाले नसते तर एकटा काही करू शकलो नसतो. आज जनतेकडून माझ्या कामगिरीबद्दल जे मला धन्यवाद मिळत आहेत त्यापैकी शेकडा ८० टक्के भाग श्री. गायकवाड यांचा आहे, हे येथे नमूद करावयाला मला मुळीच दिक्कत वाटत नाही. अशा या सर्वतोपरी लायक पुढाऱ्याचा आज जो येथे मानपत्र देऊन सन्मान करण्यात येत आहे तो माझ्या दृष्टीने योग्य व अपूर्व असा आहे.

आता याप्रसंगी आपल्या चळवळीसंबंधी दोन गोष्टी सांगण्यास काही हरकत नाही. या हिंदुस्थान देशात राष्ट्रीय कॉंग्रेस ही मोठी प्रबळ संस्था मानण्यात येते. असे असूनही मी स्वतंत्र मजूर पक्षाचा सवतासुभा का निर्माण केला ? याचे कारण एकच की कॉंग्रेसमध्ये ज्या भांडवलदार वर्गाचा अधिक भरणा आहे ते आपले हित करावयाचे सोडून गोरगरीब, कामगार व शेतकरी वर्गाचे खरे हित कधीही करणार नाहीत. तसेच दुसरा एक पक्ष कामगार वर्गात निर्माण झालेला आहे. या लाल बावट्याच्या चळवळीने श्रमजिवी वर्गाचे आजच्या परिस्थितीत हित होईल किंवा नाही याची मला शंका वाटते आणि म्हणून या नवीन स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना आपणाला करावी लागली आहे. आपल्या पक्षाच्या वतीने गेल्या मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या निवडणुकीत नाशिक जिल्ह्यातर्फे श्री. भाऊराव गायकवाड यांची आपल्या पक्षातर्फे उमेदवार म्हणून निवड केली होती आणि कॉंग्रेसबरोबर सामना दिला. या निवडणुकीचा जेव्हा निकाल लागला तेव्हा कॉंग्रेस पक्षाचा उमेदवार पहिला येऊन त्याला १६,९०० मते तर श्री. भाऊरावांना १६,६५० मते पडली. अवघ्या २५० मतांचे अंतर या उभय उमेदवारात पडले खरे ! पण माझ्या मते हा हिशोब चुकीचा आहे. कारण आमच्यातील एक इसम आयत्यावेळी विरूद्ध उठला. त्याचे नाव घेणेही याप्रसंगी योग्य वाटत नाही. त्याला ४,००० मते पडली. ही मते विभागली गेली नसती तर श्री. भाऊराव गायकवाडांनी कॉंग्रेसच्या उमेदवाराला ३,७५० मतांनी मारला असता. यावरून श्री. भाऊरावांची लायकी किती आहे, याची सहज खात्री पटेल. मला सांगावयास आनंद वाटतो की, कायदेमंडळात निवडून आलेली सर्व माणसे लायक आहेत आणि ज्या माणसांविषयी कायदे कौन्सिलमध्ये लोकांना आदर वाटतो त्यापैकी श्री. भाऊराव हे एक आहेत.

आपण स्थापन केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे हरेक स्त्री पुरुषांनी सभासद झाले पाहिजे. मी आपणास आव्हान देऊन सांगतो की मी या सर्व राजकारणाच्या बाबतीत चांगला अभ्यास केला आहे आणि या अभ्यासानुसार स्वतंत्र मजूर पक्षाचा कार्यक्रम आखला आहे. ज्यांना या कार्यक्रमाविषयी शंका वाटत असेल त्यांनी माझ्याकडे यावे. त्यांची संशयनिवृत्ती मी करीन. परंतु असे न करता लोकांची दिशाभूल करणारा मनुष्य खास लुच्चाच असला पाहिजे. असो. काँग्रेस ही विश्वामित्राची माया आहे. मायेविषयी मुक्तेश्वराने जे वर्णन केले आहे त्यात मुंगूस-सापाची मैत्री होती, उंदीर-मांजरीचे दूध पीत आहे, सिंह व हत्ती बंधुप्रेमाने राहात होते वगैरे गोष्टी आहेत. या गोष्टी सत्यसृष्टीत किंवा व्यवहारात कितपत पटतील ? तीच काँग्रेसची गोष्ट आहे. समाजाची अशी घटना झाली पाहिजे की तिचे प्रमुख पुढारी निधून गेले, दिवंगत झाले तरी समाजकार्य अव्याहत चालून ते चिरकाल टिकले पाहिजे आणि अशाच प्रकारच्या कार्याची योजना झाली तरच तो पक्ष किंवा समाज जगात वैभवशाली ठरेल.

डॉ. बाबासाहेबांचे भाषण संपल्यानंतर त्यांना व श्री. भाऊरावांना अनेक संस्थांतर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आले. या गोड मानपत्रसमारंभ प्रसंगी प्रि. दोंदे, ॲ. आर. डी कवळी, मँचेस्टर मिल चे मॅनेजर हेमीसाहेब, कास्टीलसाहेब, द. वि. प्रधान, भा. र. कद्रेकर, देवराव नाईक, वडवलकर, कमलाकांत चित्रे, उपशाम मास्तर, श्री. मडकेबुवा, निळे, गायकवाड, रामजी बोरीकर, श्री. कोतवाल, आरोळकर वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. शेवटी आभार प्रदर्शनानंतर हा समारंभ निरनिराळ्या मनोरंजक कार्यक्रमानंतर संपविण्यात आला.



## ११२

# अस्पृश्य समाजात एकी नाही ह्याचे कारण जातीभेद हेच आहे

गुरूवार ता. ३० डिसेंबर १९३७ रोजी रात्रौ मद्रास मेलने १० वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोरीबंदर स्टेशनवरून सोलापूर जिल्ह्यातील दौऱ्याकरिता निघाले. त्यांचेबरोबर नाशिकचे आमदार भाऊराव गायकवाड व श्री. कमलाकांत चित्रे हे होते. वाटेत दादर स्टेशनवर परिषदेस हजर राहाण्याकरिता नाशिकहून आलेली रामा पाला (भंगी समाजाचे एक पुढारी) वगैरे मंडळी येऊन मिळाली. दादर स्टेशनवर डॉक्टरसाहेबांस पुष्पहार अर्पण करण्यात आला. नंतर पुण्याच्या स्टेशनवर साताऱ्याचे आमदार श्री. खंडेराव सावंत गाडीत चढले व दौंड स्टेशनवर आमदार श्री. प्रभाकर रोहम व नगरची इतर मंडळी दौऱ्यात सामील झाली.

सोलापूर जिल्हा परिषद पंढरपूर मुक्कामी भरावयाची होती. त्याकरिता डॉ. बाबासाहेब व त्यांच्या बरोबरीची इतर मंडळी कुर्डुवाडी स्टेशनवर शुक्रवार तारीख ३१-१२-१९३७ रोजी पहाटेस साडेपाच चे सुमारास दाखल झाली. स्टेशनवर परिषदेचे स्वागताध्यक्ष आमदार श्री. जीवाप्पा ऐदाळे डॉ. बाबासाहेबांचे स्वागत करण्याकरिता सामोरे आले होते. त्यांनी व इतर जमलेल्या मंडळीनी त्यांचे प्रेमाने स्वागत केले व डॉ. बाबासाहेबांस पुष्पहार अर्पण केले.

कुर्डुवाडी स्टेशनचा प्लॅटफार्म माणसांनी अगदी भरून गेला होता. या स्टेशनवरील रेल्वे अधिकाऱ्यांचे वर्तन मात्र संतापजनक होते व त्यांना गरीब जनतेचा उत्साह व डॉ. बाबासाहेबांच्या लोकप्रियतेचा उत्कर्ष मुळीच सहन होत नव्हता असे कष्टाने म्हणावे लागते. उत्साहाच्या भरात डॉक्टरसाहेबांच्या दर्शनास उत्सुक झालेले काही थोडे लोक बिगर तिकीट प्लॅटफार्मवर गेले होते. त्या सर्वांजवळून त्यांनी दौंड स्टेशनपासूनच्या तिकिटाच्या डबल पैशाची मागणी केली. येथे जमलेले निर्धन लोक एवढे द्रव्य आणणार कोठून ? परंतु शेवटी स्टेशनमास्तरांच्या मध्यस्तीने हा प्रसंग कसाबसा टळला व अडकून राहिलेल्या मंडळीची सुटका झाली.

---

जनता : ८ जानेवारी, १९३८.

हा कटू प्रसंग येथे मुद्दाम नमूद करण्याचे कारण आपल्या लोकांनीही ध्यानात ठेवले पाहिजे की अस्पृश्यांची चळवळ साधारणतः बहुजन समाजाच्या डोळयात नेहमी सलत असते व आपल्याला कोणाकडून लहानसहान प्रमाणात देखील साहाय्य मिळेल अशी अपेक्षा न करता त्यांनी वागले पाहिजे, नाही तर अपमानकारक प्रसंग आल्याशिवाय राहणार नाहीत.

कुर्डुवाडीस डॉ. साहेबांकरिता एका स्पेशल मोटारीची व्यवस्था करण्यात आली होती व इतर पाहुणे व स्वयंसेवकांकरिता एक स्पेशल बस ठेवण्यात आली होती. या दोन गाड्या दिवस उजाडण्याच्या सुमारास पंढरपूरच्या मार्गास लागल्या. वाटेत माढे तालुक्यातील वावळे गावी गावातर्फे डॉ. बाबासाहेबांस व इतर आमदारांस हार अर्पण करण्यात आले. पुढे कर्कम गावाजवळ गाडी येताच गावातील अस्पृश्य समाज व स्वयंसेवक दल डॉ. साहेबांच्या स्वागतार्थ वाजंत्र्यांसह सामोरे आले व जमलेल्या मंडळीचे मिरवणुकीत रूपांतर झाले. गावात महार समाज व मातंग समाज यांनी मंडप उभारून बाबासाहेबांच्या स्वागताची तयारी केली होती. कर्कम गावातून मिरवणूक निघाल्यानंतर डॉ. साहेबांची मोटार व दुसरी स्वयंसेवकांची बस कर्कम गावाजवळील बादलकोट फॉरेस्ट मधील चंद्रभागेच्या काठावरील पडित जमिनी पहावयास निघाली. मोटारमध्ये आमदार गायकवाड, ऐदाळे, रोहम, सावंत व श्री. चित्रे इतकी मंडळी होती. ही पडित जमीन अस्पृश्य समाजातील लोकांना सवलतीने मिळावी म्हणून आमदार ऐदाळे यांनी सरकारजवळ प्रयत्न चालविला आहे. ती जमीन बाबासाहेबांच्या प्रत्यक्ष अवलोकनात यावी म्हणून श्री. ऐदाळे यांनी हा कार्यक्रम आखला होता. पडित जागेजवळ पोचण्याकरिता ३ मैलांचा पायी प्रवास करून ती बाबासाहेबांनी प्रत्यक्ष पाहिली व नदीच्या काठावर गावकऱ्यांनी आणलेला अल्पाहार ग्रहण करून डॉक्टरसाहेब परत कर्कम गावी आले. त्याठिकाणी गावातील महार समाजाने खास उभारलेल्या मंडपात त्यांचे प्रेमाने स्वागत केले व त्यांना दोन शब्द बोलण्यास विनंती केली. आपल्याला जे काही बोलावयाचे ते मातंग समाजाने स्वागताचा कार्यक्रम आखला आहे त्या ठिकाणी आपण बोलू असे सांगून बाबासाहेबांनी आमदार गायकवाड यास दोन शब्द बोलण्यास आज्ञा केली. नंतर भाऊराव गायकवाड यांनी थोडक्यात समयोचित भाषण केल्यावर डॉक्टरसाहेबांनी सर्वांनी स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हावे असे सांगून तो कार्यक्रम आटोपला. नंतर मंडळी मातंग समाजाने उभारलेल्या मंडपात दाखल झाली. येथे महार व मातंग समाजाचा मोठा लोकसमुदाय जमलेला होता.

त्या ठिकाणी डॉ. बाबासाहेबांनी लहानसे भाषण करताना सांगितले,

उद्या म्हणजे ता. १ जानेवारी १९३८ रोजी सोलापूर मुक्कामी मातंग समाजाची एक परिषद भरणार आहे. त्यावेळी मला आमंत्रणाने बोलावण्यात आले असल्यामुळे मी त्या प्रसंगी सविस्तर रीतीने बोलणार असल्याकारणाने मी या वेळेस दोनच शब्द बोलणार आहे आणि तं बोलण्याचा उद्देश हा की आपल्यापैकी काही इसम परिषदेस हजर राहाणार असले तरी काही मंडळी तेथे न जाणारीही असणार तेव्हा या लोकांना माझे म्हणणे ऐकावयास मिळावे. प्रथमतः अस्पृश्य समाजात मोडणाऱ्या महार, चांभार, भंगी वगैरे ज्या जाती आहेत त्यात एकी नाही हे आपणा सर्वांचे दुर्दैव होय. ही एकी नसण्याचे खरे कारण म्हणजे हिंदू समाजातील जातीभेद हेच आहे. ह्या जातीभेदाला महार, मांग, चांभार किंवा भंगी हे जबाबदार नाहीत. जातीभेद ही वरून वहात आलेली गटारगंगा आहे. हा आपलेकडे वहात येणारा नरक आहे आणि त्यामुळे जातीभेदाची कटू फळे व त्याचा दुष्परिणाम आपल्याला सोसावा लागत आहे आणि खेदाची गोष्ट ही की हे हिंदू लोक आपल्यातील जातीभेद तर दूर करीत नाहीतच उलट अस्पृश्यांतील अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांचा जातीभेद दृढ करावयास झटतात. मातंगांना हाती धरून महारांविरूद्ध उठवावयाचे, चांभारांना हाती धरून त्यांना महार-मांगांच्या विरूद्ध उठवावयाचे व आपली भेदनीती आमच्यात पसरवायची व आपली एकी होऊ द्यावयाची नाही. मात्र या जातीभेदाची मूळ जबाबदारी जरी हिंदू समाजावर असली तरी आपण आपली जबाबदारी विसरणे आत्मघातकी ठरेल. आपल्यातील जातीभेद नाहीसे करणे व आपल्यात भेदनीतीचा फैलाव न होऊ देणे हे आपले आद्य कर्तव्य आहे आणि आपण हे साधल्यांशिवाय आपला भाग्योदय कधीच होणार नाही. महार-मांगातील रोटी बंदी, बेटी बंदी अजिबात नष्ट झाली पाहिजे. प्रत्येक जात जर आपली शेखी मिरवण्याकरिता आपल्या जातीसच चिकटून राहील आणि महार महारच राहील व मांग मांगच राहील तर आपल्यावर होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार आपण करू शकणार नाही. महार किंवा मांग या नावात असे काय आहे की त्यात तुम्हाला अभिमान वाटावा ? या नावाने असा कोणता उज्ज्वल इतिहास तुमच्या डोळ्यांसमोर उभा राहतो की जुनी परंपरा चालू ठेवण्यास तुम्ही झटावे ? सर्व समाज या नावांना तुच्छ लेखीत आहे. तुम्हाला आज उकिरड्यावरील कचऱ्याची देखील किंमत नाही ; तेव्हा या नावाचा अभिमान न बाळगता आपले दोन्ही समाज एका वरवंट्याखाली चिरडले जात आहेत हे जाणले पाहिजे व दोघांनी एकजुटीने राहिले पाहिजे. या बाबतीत महार समाजापुरते जर सांगावयाचे असेल तर ते कोणताच जातीभेद मानावयास तयार नाहीत. मांग, चांभार किंवा भंगी यांच्याशी रोटी व्यवहार किंवा बेटी व्यवहार करावयास त्यांची तयारी आहे आणि जर महार लोक या गोष्टी करण्यास कचरत असतील तर त्यांना त्या करण्यास भाग पाडण्याची मी हमी घेतो.

दुसरी गोष्ट तुम्हास सांगावयाची म्हणजे तुम्ही सध्या कॉंग्रेस या संस्थेपासून दूर राहिले पाहिजे आणि याचे कारण एकच आहे. ते म्हणजे कॉंग्रेस ही मायावी सृष्टी आहे. मला तुम्ही असे सांगा की गावातील मारवाडी किंवा सावकार याने ४ आण्याची कॉंग्रेसची वर्गणी भरली किंवा गांधी टोपी डोकीवर चढविली म्हणजे देहस्वभाव कसा विसरू शकेल ? तो आपल्या गरीब कुळांकडून व्याज उकळल्याशिवाय कसा राहील ? तुमच्या माना मुरगळणे तो कसा सोडून देईल ? आणि आज कॉंग्रेस सांगत आहे की आम्ही सावकारांचे हित साधणार आहोत व गरिबांचेही हित साधणार आहो. मांजर व उंदीर या दोघांनाही ती एके ठिकाणी कशी वागवणार व मांजराच्या पुढ्यात उंदीर ठेवून उंदराचा जीव कसा बचावणार ? हे तुम्हीच पाहिले पाहिजे. आपल्याला मांजराशी काही कर्तव्य नाही. आपल्याला उंदराचा जीव वाचवायचा आहे. आपल्याला गरीब जनतेचे म्हणजे आपले स्वतःचे जिणे बचावाचे करावयाचे आहे. म्हणून आपण आपलीच शक्ती वाढविली पाहिजे आणि ती शक्ती वाढविणे म्हणजे तुमच्याच हिताकरिता अस्तित्वात आलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होणे हे होय. तुम्हाला ह्या पक्षात सामील होण्याकरिता वर्षाचे काठी फक्त ४ आणे द्यावे लागतील. तरी तुम्ही सर्वांनी स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद झाले पाहिजे. एवढेच तुम्हाला मला आज सांगावयाचे आहे. नंतर डॉक्टरसाहेबांस व इतर मंडळींना हारतुरे अर्पण करण्यात आले व चहापानानंतर दौऱ्यातील मंडळी पंढरपूरच्या मार्गास लागली.



## ११३

# जुलूम करणाऱ्यांसोबत दोन हात करण्याची तयारी ठेवा

दिनांक ३१ डिसेंबर १९३७ रोजी कर्कमहून पंढरपूरचा मार्ग आक्रमण करीत असता मोटार गाडीत आमदार मंडळी निरनिराळे विषय काढून आपल्या अलौकिक पुढाऱ्याच्या मुखातून वाहणाऱ्या अमृतधारांचे मनसोक्त पान करीत होती. थोडक्याच वेळात म्हणजे दुपारी बारा वाजण्याच्या सुमारास चंद्रभागेच्या ऐलथडीवर गाडी थडकली. या ठिकाणी स्त्री-पुरुषांचा अलोट समुदाय, मृत समाजात संजीवनी उत्पन्न करणाऱ्या लोकोत्तर विभूतीचे दर्शन घेण्याकरिता जमला होता. मोटार दृष्टीपथात येताच जयजयकारांचे ध्वनी घुमू लागले व लोकांचे थवेच्या थवे दर्शनोत्सुक होत्साते मोटारीपुढे धावत येऊ लागले व चंद्रभागेवरील पुलाचे तोंडाजवळ ज्या वेळेस गाडी आली त्या वेळेस मोटारीस पुढे जाण्यास वाव मिळेना.

संपादक महाराज, तुमचा बातमीदार काही पंढरपूरचा वारकरी नाही. साऱ्या हयातीत पंढरपुरास, त्याची ही पहिलीच भेट होय. पण '' पंढरपूरचा महिमा '' मात्र त्याने कानानी ऐकला आहे. विठोबाचे दर्शन घेण्यास अगणित जनसंमर्द पंढरीत प्रवेश करतो असे त्याने ऐकले होते. पण एका विभूतीचे दर्शन घेण्यास पंढरपूरवासी जनता चंद्रभागा ओलांडून व '' विठ्ठलास '' विन्मुख होऊन पंढरीच्या बाहेर पडते असे त्याने ऐकले नव्हते ; पण तुमच्या वार्ताहारास आज काय दृष्टीस पडत होते ? एक समाज विठ्ठल दर्शन घेण्यास पंढरीस प्रवेश करतो तर दुसरा समाज विठ्ठलाच्या महतीवर आघात करणाऱ्या विभूतीचे दर्शन घेण्याकरता पंढरीच्या बाहेर पडतो. ह्या दृश्यामुळेच वेड्या धार्मिक भावनेने अंध झालेला बहुजन समाज आपल्या दृष्टीवरील कृष्णपटल दूर करून हिंदमातेचा भविष्यकाल उज्ज्वल करील अशा आशेचे किरण क्षणभर तुमच्या बातमीदाराच्या मनात चमकले. ते काही असो. या दृश्यावरून एवढे स्पष्ट दिसत होते की, स्पृश्य समाज जो मार्ग आक्रमित आहे त्याच्या अगदी उलट दिशेस अस्पृश्य गणल्या गेलेल्या समाजाचा आजचा मार्ग आहे.

मोटारीचा पुढला मार्ग गणवेष धारण केलेल्या समता सैनिक दलाच्या स्थानिक पथकांनी खुला करून दिला व गाडी पुलावरून जाऊ लागली. गाडीच्या दुतर्फा लोकांची गर्दी, पुढे स्वयंसेवक, मागे अलोट घोळका अशी मिरवणूक दिसू लागली. मोटारची अगदी मंदगती झाली व पुढील कर्म्यक्रम आखल्याप्रमाणे पार पाडणे मुश्कीलीचे झाले. मोटार जलद चालली तर लोक समुदायही धावू

---

जनता : ८ आणि १५ जानेवारी १९३८.

लागे. असा क्रम काही काळ चालल्यावर एका नाक्यावर मिरवणूक आली. मिरवणुकीतून बाहेर पडल्याशिवाय पुढे जाणे शक्य नसल्यामुळे मोटार दुसऱ्या रस्त्यावर काढण्यात आली व लोकांना सभेस हजर राहावयास सांगून बाबासाहेब त्वरित डाक बंगल्यावर आपल्या उतरण्याच्या ठिकाणी दाखल झाले. या ठिकाणी देखील काही लोक अगोदरच येऊन बसले होते व बाबासाहेबांच्या आगमनानंतर आणखी लोक येऊ लागले. अनेक लोक गावकऱ्यांकडून होणारा त्रास डॉक्टरसाहेबांच्या कानावर घालीत होते व साहेबांचे दर्शन घेऊन व त्यांचे दोन शब्द ऐकून निरोप घेत होते. जेवणानंतर ३ वाजण्याचे सुमारास सोलापूर जिल्हा अस्पृश्य राजकीय परिषदेस हजर राहाण्याकरिता आपल्याबरोबरील मंडळीसह डॉक्टरसाहेब निघाले. डॉक्टरसाहेबांस भेटण्याकरिता पंढरपूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रा. ब. परिचारक आले होते. ते देखील परिषदेस हजर राहाण्यासाठी निघाले. परिषदेची जागा म्युनिसिपल धर्मशाळेत ठरविण्यात आली होती. त्या ठिकाणी बाबासाहेबांचे आगमन होताच जमलेल्या प्रचंड लोक समुदायाने त्यांचे टाळयांच्या कडकडाटात व जयघोषात स्वागत केले व ताबडतोब सभेच्या कामास सुरूवात झाली.

प्रथमतः मुलींचे स्वागतपर सुस्वर गायन झाले.

स्वागताध्यक्ष मे. जीवाप्पा ऐदाळे, एम. एल. ए. यांचे भाषण झाल्यावर परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास डॉ. बाबासाहेबांस विनंती करण्यात आली व त्या सूचनेस रीतसर अनुमोदन देण्यात आल्यावर त्यांचे खालीलप्रमाणे भाषण झाले.

ते म्हणाले,

वास्तविक या परिषदेचे अध्यक्षीय भाषण लिहून काढून ते आपल्यासमोर वाचावयास पाहिजे होते. परंतु वेळेच्या अभावी तसे मला करता आले नाही. याबद्दल दिलगीर आहे. तेव्हा उगाच पाल्हाळिक भाषण करण्याचे मला कारण नाही. आज मी प्रामुख्याने तीन प्रश्नासंबंधी बोलणार आहे. एक, आपल्याला हिंदू समाजात समतेचे स्थान मिळेल काय ? दोन, आपल्या आर्थिक परिस्थितीच्या बाबतीत आपल्याला विचार करावयाचा म्हणजे आपल्याला संपत्तीचा योग्य वाटा मिळाला आहे काय ? तीन, आपण आत्मोन्नतीची चळवळ केली तर आमचेवर जुलूम होतो, याचा प्रतिकार करण्यास आपण कसे समर्थ व्हावयाचे ?

पहिल्या प्रश्नाचा विचार आपण पूर्ण केलेला आहे. या प्रश्नाशीच धर्मांतराचा प्रश्न निगडित आहे. त्यासंबंधी मी आज या ठिकाणी जास्त बोलू इच्छित नाही. मात्र तुम्हास या पंढरपूर गावी मुद्दाम चोखोबाची स्मृती करून द्यावयाची आहे. मंगळवेढ्यास कूस बांधावयाचे होते आणि त्याकरता पंढरपुराहून महारास वेठीस धरले होते. त्यामध्ये चोखोबाही होता. काम चालू असता एक भिंत कोसळून पडली आणि त्यामध्ये चोखोबादेखील भिंतीखाली सापडून मृत्यू

पावला. नंतर चोखोबाची समाधी बांधावयाची होती त्याकरता चोखोबाची हाडे लोकांना पाहिजे होती. बरेच महार त्याठिकाणी मरण पावले असल्यामुळे त्या सर्वांचीच हाडे त्याठिकाणी पुरली गेली होती. त्यापैकी चोखोबाची हाडे कोणती हे कळणे शक्य नव्हते. तेव्हा लोक नामदेवास भेटले व त्यांनी याबाबतीत मार्ग काढण्यास नामदेवास विनंती केली. नामदेवाने सांगितले की चोखोबाची हाडे अनेक हाडातून हुडकून काढणे अवघड नाही. कारण चोखोबाची हाडे विठ्ठल नामाचा गजर करीत असणार, तरी ज्या हाडातून विठ्ठल विठ्ठल असा ध्वनी निघेल ती हाडे चोखोबाची असे समजून ती उचलून आणावी व त्यावर समाधी चढवावी. आता हाडातून ध्वनी निघण्याचा प्रश्न जरी बाजूला ठेवला तरी चोखोबाच्या योग्यतेसंबंधी एवढे निर्विवाद की त्याच्या निर्जीव अस्थीतूनदेखील विठ्ठल नामाचा उच्चार व्हावा ; इतकी त्याची महती होती. ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताबाई इत्यादी संतांच्या मालिकेत चोखोबाला स्थान प्राप्त झाले होते. पण त्याला देखील विठ्ठलाच्या मंदिरात प्रवेश करता आला नाही. त्याची समाधीदेखील मंदिरापासून दूर अंतरावर ठेवण्यात आली आहे व चोखोबाच्यावेळेस जी परिस्थिती होती ; त्याच्याकाळी ज्या रीतीने त्याच्या जातीबांधवांना वागविल्या जात होते त्याच रीतीने चोखोबाचा जन्म ज्या वर्गात झाला होता त्या वर्गास आज देखील त्याच हीन दर्जाने लेखले जात आहे. त्याच मापाने आज आपल्याला मोजले जात आहे. म्हणून ज्या धर्माची चोखोबाने कास धरली त्याच धर्माची आम्ही कास का धरावी ? त्या धर्मात आपल्याला नेहमी हीन लेखले जाणार ! याकरिता त्या धर्मापासून आपल्याला दूरच राहिले पाहिजे.

दुसरा प्रश्न म्हणजे आर्थिक प्रश्न-आपल्या पोटापाण्याचा प्रश्न. आज देशातील सर्व संपत्ती पांढरपेशा वर्ग बळकावून बसला आहे. त्याचा ऐषआराम चालू आहे. तर तुम्हाला पोटभर खायला नाही किंवा अंग झाकायला वस्त्र नाही. नुकतीच एक बाई मजजवळ तिच्या मुलाला आंगडे घेण्याकरिता दोन आणे मागत होती. ती जी बाईची स्थिती तीच आपल्या सर्व वर्गाची आहे. याचे कारण त्यांच्या वाट्यास संपत्ती आली आहे तर तुमच्या वाट्यास दारिद्र्य आले आहे. म्हणजेच संपत्तीची विभागणी न्यायाची झाली नाही आणि ती कशी करावयाची हाच आपला आज जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. गावाजवळील रानातील पडित जमीन आपणास कसण्यास मिळावी म्हणून आपण सरकारकडे मागणी केल्यास ती जमीन आमच्या गुराढोरांच्या चाऱ्याकरिता पाहिजे म्हणून ती आपल्याला देण्यात येऊ नये, असा प्रयत्न गावातील लोक करतात व ती जमीनदेखील आपल्याला लाभू देत नाहीत. ज्यावेळेस माझी व मुख्यमंत्री ना. खेर यांची भेट झाली होती त्यावेळेस याबाबतीत मी त्यांना विचारले की

गावातील लोकांच्या गाईम्हशींपेक्षाही आमचे जीव कमी किंमतीचे आहेत काय ? सरकारने आमच्या लोकांच्या जीवाकडे न पाहता गावच्या गुराढोरांच्या पोटापाण्याची व्यवस्था करावी का ? सरकारने प्रथम माणसांचा जीव वाचविला पाहिजे व नंतर जनावरांचे जीवित्व रक्षण केले पाहिजे. तुम्हाला सांगावयाचे म्हणजे एवढेच की आज तुमची किंमत जनावरापेक्षाही कमी आहे. आज शेठ सावकारांचे सर्व वाली आहेत. गरिबांचे वाली कोणी नाही. गरिबांचे वाली गरीबच आहेत आणि गरिबांना जर आपली स्थिती सुधारून घ्यावयाची असेल तर त्यांनी कायदे करण्याची जी राजकीय सत्ता ती हस्तगत केली पाहिजे. ते जर कायदेमंडळात निस्वार्थी लोक पाठविणार नाहीत तर त्यांची फसगत झाल्याशिवाय राहणार नाही. म्हणून आपल्याला कायदे मंडळात आपल्या हिताचे कायदे करून घेणारे लोक पाठविता आले पाहिजेत व त्याकरिता नेहमी संघटित राहिले पाहिजे. त्या करिताच स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना झाली आहे. आज कायदे करणारे सरकार काँग्रेसचे आहे. ती काँग्रेस म्हणजे एक विश्वामित्राची मायावी सृष्टी आहे, तेथे मुक्तेश्वराने वर्णन केल्याप्रमाणे उंदीर मांजरीचे दूध पीत आहे, वाघ शेळी एका शय्येवर झोप घेत आहेत, मुंगूस सापाचे पटापट मुके घेत आहे. तेथे शेठ सावकार लोक कुळांचे हित साधू म्हणून सांगत आहेत. भांडवलदार मजुरांचे कोटकल्याण करू म्हणून बरळत आहेत. ते बोलणे किती फाल आहे, ती जनतेची कशी फसवणूक आहे, हे गरीब लोकांना सांगण्याची आवश्यकता नाही. शेठ सावकार हे आपले हितशत्रू आहेत, याचे आपल्यास उपजत ज्ञान आहे. काँग्रेस लोकांची अशी फसवणूक करीत असल्यामुळे मी तिच्यात सामील झालो नाही आणि म्हणूनच तुम्हालाही सांगत आहे की तुम्ही काँग्रेसपासून अगदी दूर राहा.

तुमच्या हिताचे कायदे आणणे व त्याकरिता झगडणे हे माझे कर्तव्य आहे व ते मी करीन, असे मी तुम्हाला आश्वासन देतो. मी माझ्या कर्तव्यास जागेन पण त्याच वेळेस तुम्ही तुमच्या कर्तव्यास जागले पाहिजे, हे मला तुम्हास सांगावयाचे आहे. तुम्ही आपली चळवळ जोमदार केल्याशिवाय आपल्यास यश लाभणार नाही व आपले जीवित सुखाचे होणार नाही.

तिसरा प्रश्न आपण आपल्या उन्नतीचे कार्य करीत असता आपल्यावर जो जुलूम होतो त्याचे कसे निवारण करावयाचे ? तुम्हाला माहीत आहे की आपल्या विरुद्ध सर्व जग आहे आणि त्याला तोंड द्यावयाचे म्हणजे ते दोन प्रकाराने द्यावयास हवे. प्रथमतः आपण प्रत्येकाने आपल्या मनातील भीती नाहीशी केली पाहिजे. ज्या ज्या वेळेस आपल्यावर कोणताही जुलूम होईल त्यावेळेस जुलूम

करणाऱ्याशी दोन हात करावयास न डगमगता तयार झाले पाहिजे. काय व्हायचे असेल ते होईल, त्याला भिण्याचे कारण काय आहे ? तुमच्याजवळ आहे काय की ते हरपण्याची धास्ती वाटावी ? तुम्ही मरणास देखील भिता कामा नये. इतके तुम्ही निर्भय झालात तरच तुमच्यावरील जुलूमांचा तुम्हास प्रतिकार करता येईल. आपल्यातील तरूण माणसांनी आपल्या पेहेरावात देखील सुधारणा करावयास हवी. धोतराच्या ऐवजी आखूड तुमान व अंगात एक कुडते म्हणजे स्काउटचा ड्रेस केला पाहिजे. १८ वर्षापासून ४० वर्षापर्यंत प्रत्येकाने असा सुटसुटीत पोशाख केल्यास तुमच्या मनोवृत्तीत देखील बदल झाल्याशिवाय राहाणार नाही व तुमच्या मनातील भीती नाहीशी होईल. शिवाय अंतःशुद्धीस जोड म्हणून जुलूमापासून रक्षण करण्याकरिता आपल्याला एक फंड उभारला पाहिजे. त्या निधीतून कायदेशीर इलाज व पीडितांचे दुःख निवारण ह्या गोष्टी कराव्या लागतील.

मी सांगितलेल्या सर्व गोष्टी करण्यास तुम्ही आता सिद्ध झाले पाहिजे आणि तसे तुम्ही व्हाल अशी माझी खात्री आहे.

याप्रमाणे बाबासाहेबांचे १ तास पर्यंत अस्खलित भाषण झाल्यावर सभेपुढे तीन ठराव मांडण्यात आले. ते असे (१) महारकी वतन बिलास पाठिंबा (२) खोती पद्धत नष्ट करणाऱ्या बिलास पाठिंबा व (३) जनतेचे वर्गणीदार व स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होण्यास विनंती. शेवटी आभार प्रदर्शन झाल्यावर सभा विसर्जन करण्यात आली व बाबासाहेब व त्यांचे बरोबर असलेली मंडळी पंढरपूर म्युनिसिपालिटीचे हॉलमध्ये गेली. याठिकाणी म्युनिसिपालिटीचे सभासद जमले होते. म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रा. ब. परिचारक यांनी समयोचित भाषण करून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे स्वागत केले व त्यांना पुष्पहार अर्पण केला. नंतर इतर सभासदांची व बाबासाहेबांची ओळख करून देण्यात आली. डॉक्टरसाहेबांनी उत्तरादाखल भाषण केले व पंढरपूर म्युनिसिपालिटीचे आभार मानले.

नंतर मंडळी स्थानिक वकील श्री. पटवर्धन यांचे येथे निमंत्रणावरून चहापानाकरिता गेली व त्या दिवसाचा कार्यक्रम आटोपला.



## ११४

# राजकारणाचा गाडा ओढताना चाक अंगावर येणार नाही ह्याची खबरदारी घ्या

नव्या वर्षाच्या दिवशी म्हणजे १ जानेवारी १९३८ रोजी रा. बळवंतराव गायकवाड, रा. रामभाऊ पाटोळे व र. बी. शिंदे यांनी रे. गंगाधरराव जाधव यांच्या अध्यक्षतेखाली रा. ऐदाळे, एम. एल. ए. यांच्या साहाय्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे एक फार मननीय व्याख्यान सोलापूर येथील खिस्ती समाजास लाभू देण्याची व्यवस्था केली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रथम आपल्या चरित्रास शून्यापासून नव्हे परंतु उणे चिन्हापासून सुरवात होऊन हल्ली आहे त्या स्थितीप्रद कसे ते येऊन ठेपले आहेत ते दाखविले. यात त्यांचा हेतू इतकाच की, आपला समाज दुबळा म्हणून रे, रे, करीत काळ घालवू नये तर नवीन वर्षाच्या नवीन निश्चयाने त्याची प्रगती करण्यास झटावे. डॉ. बाबासाहेब पुढे म्हणाले,

आपल्या धर्मांतराची विटंबना चहूकडे चालली आहे, याचा मासला प्रि. अत्र्यांच्या वंदे मातरम् या नाटकातील एका प्रसंगावरून दर्शविता येईल. तथापि धर्मांतराच्या ध्येयापासून रेसमात्रही ढळण्यास तयार नाही. बाकी धर्मांतर करणाऱ्याचे कोणी गोडवे गाईलेले आहेत असे निदान आपल्या हिंदुस्थानात तरी दृष्टोत्पत्तीस आलेले नाही.

जगात उपलब्ध असलेल्या प्रमुख धर्माचे चांगले अध्ययन आध्यात्मिक दृष्टीने मी केले आहे व त्या सर्व धर्मात केवळ दोनच धर्म व त्यातील दोनच व्यक्ती माझ्या धर्मांतराचे दृष्टीसमोर आहेत. त्यापैकी पहिली व्यक्ती बुद्ध व दुसरा खिस्त. 'मनुष्याचे मनुष्याशी कर्तव्य काय आहे व मनुष्याचे देवाशी कर्तव्य काय आहे, मुलाने बापाशी कसे वागावे, सर्व माणसास समता, स्वतंत्रता ज्या धर्मात अनुभवावयास सापडेल असाच धर्म मला व माझ्या अनुयायांस हवा आहे.'

मिशनरींना वाटते की आपण मनुष्याला खिस्ती केले की आपले काम झाले पण त्याच्या राजकीय हक्कांची काही सोय ते पाहात नाहीत मला खिस्ती लोकात हा एक फार मोठा दोष दिसतो. कारण त्यांनी आजपर्यंत राजकारणात घालावा तसा हात घातला नाही कोणत्याही संस्थेला राजकीय आधार असल्याशिवाय ती

---

जनता : ५ फेब्रुवारी १९३८.

टिकणे फार कठीण आहे. आम्ही अस्पृश्य, अडाणी व अशिक्षित जरी आहोत तरी आम्ही चळवळ करीत आहोत, व त्यामुळेच आमच्या १५ जागा लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत आहेत. अस्पृश्य मुलांना सरकारी स्कॉलरशिपा मिळू लागल्या आहेत व आमच्या मुलामुलींकरिता सरकारने बोर्डिंग काढलेल्या आहेत. पण ख्रिस्ती लोकांच्या बाबतीत तसे काही नाही; एखादा अस्पृश्य मुलगा, तो अस्पृश्य आहे तोपर्यंत त्याला सरकारी स्कॉलरशिप मिळते पण तोच उद्या ख्रिस्ती झाल्यास ती बंद होते, म्हणजे धर्मांतर केल्याबरोबर त्याचे दारिद्र्य जात नाही. पण धर्मांतरामुळे त्याला ही आर्थिक हानी मात्र सोसावी लागते. तेच तुमचा राजकारणात हात असता तर ह्याच्या उलट परिस्थिती झाली असती.

तुमचा समाज शिकलेला आहे. शेकडो मुलगे व मुली मॅट्रिक झालेले आहेत, त्यांनी ह्या सार्वजनिक अन्यायाविरूद्ध अशिक्षित अस्पृश्यांसारखी कधीही चळवळ केलेली नाही. एखादी मुलगी नर्स झाली की ती आपल्याच धंद्यात डोके घालते व आपल्यापुरतेच पहाते. कोणी मास्तर झाला की तो आपल्या मास्तरकीत दंग होतो व सार्वजनिक कामात पडत नाही. कोणी कारकून किंवा कोणत्याही हुद्यावर असला तरी तो आपल्याच व्यापात असतो व सामाजिक अन्यायाकडे दुर्लक्ष करितो. तुमचा समाज इतका जरी सुशिक्षित आहे तरी तुमच्यातील कितीसे डिस्ट्रिक्ट जज्ज किंवा मॅजिस्ट्रेट आहेत? ह्याचे कारण तुमचे राजकारणाकडे असलेले दुर्लक्ष हे मी सांगतो कारण तुमच्या हितासाठी बोलायला व भांडायला सरकारात कोणीच नाही. राजकारणाचा गाडा ओढायला तुमच्यातील कोणी असल्यास जरी आपल्या इच्छेप्रमाणे तो चालत नसला तरी निदान त्याचे चाक आपल्या अंगावर न येऊ देण्याची तरी तुम्हास खबरदारी घेता येईल.

तुम्ही मुक्कामावर आहात व आम्ही मार्ग चालत आहोत, तुमच्या मुक्कामाच्या बऱ्यावाईटपणावरच आमचा त्या ठिकाणी मुक्काम येणार.



## ११५

# साप-मुंगूस, उंदीर-मांजर यांची कधी मैत्री जमेल का ?

सोमवार, ता. १० जानेवारी १९३८ रोजी मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या बैठकीस मुंबई कौन्सिल हॉलमध्ये सुरवात झाली. या बैठकीच्यावेळी असेंब्ली हॉलवर कोकण, सातारा, नाशिक वगैरे जिल्ह्यातील शेतकरी बांधवांनी आपला मोर्चा नेण्याचे आगाऊ जाहीर केले होते. त्याप्रमाणे हा शेतकऱ्यांचा मोर्चा संघटित व योग्यरीतीने यशस्वी करण्याकरिता स्वतंत्र मजूर पक्ष व इतर शेतकरी संस्थांनी सहकार्य करून एक '' मोर्चा कमिटी '' निवडून तिच्या नेतृत्वाखाली हा शेतकऱ्यांचा अपूर्व मोर्चा कौन्सिलवर नेण्याचे ठरविले होते. त्याप्रमाणे ता. १० रोजी वरील ठिकाणचे सर्व शेतकरी आपल्या मिरवणुकी घेऊन दुपारी दीड वाजता आझाद मैदानावर जमले. कोकणातून आलेले शेतकरी बांधव व्हिक्टोरिया डॉकमधून थेट बोरीबंदरपुढील मैदानावर आले. इतर शेतकऱ्यांचे गट परळ येथील कामगार मैदानावर जमून ते प्रचंड मिरवणुकीने आझाद मैदानावर आले. या मिरवणुकीबरोबर '' खोती पद्धती नष्ट करा '', '' सावकारशाहीला मूठमाती द्या '', '' शेतकऱ्यांचा विजय असो '' वगैरे आशयाच्या मोठमोठ्या पताका फडकत होत्या. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जयजयकारही करण्यात येत होता. अशा थाटामाटात ही मिरवणूक काळबादेवी मार्गाने येत असता येथील व्यापारी लोकांचे धाबे दणाणले. कॉँग्रेससारख्या अधिकारारूढ सत्तेविरुद्ध हे शेतकऱ्यांनी संघटित उभारलेले बंड पाहून त्यांना भीती व आश्चर्य वाटल्यास नवल नाही. ही मिरवणूक आझाद मैदानावर आली तोच चौपाटी मार्गाने मुंबईतील '' बालू '' लोकांची तिसरी मिरवणूक या शेतकऱ्यांच्या मिरवणुकीत सामील झाली. त्याशिवाय ठाणे-कल्याण वगैरे ठिकाणचे शेतकरी निरनिराळ्या मार्गाने आझाद मैदानावर येत होते. डॉ. भोईर यांच्या नेतृत्वाखाली ठाणे जिल्ह्यातील शेतकरी बांधव अगदी सकाळीच दादरवरून कामगार मैदानावर हजर झाले होतेच. अशा रीतीने हा जमाव वाढत वाढत वीस ते पंचविस हजारापर्यंत शेतकरी बांधव आझाद मैदानावर मिरवणुकीला तयार झाले. या प्रचंड मिरवणुकीची शिस्त राखण्यासाठी भाई चित्रे, याज्ञिक, परुळेकर, पोतनीस, प्रधान, मिरजकर, लालजी पेंडसे, सुरबा टिपणीस, मडकेबुवा जाधव, राजाराम भोळे, डॉ. भोईर वगैरे मंडळी हजर होती. त्यांनी जमलेल्या शेतकऱ्यांना आजच्या इतिहासप्रसिद्ध शेतकऱ्यांच्या मोर्च्याविषयी सविस्तर माहिती निवेदन केली.

---

जनता : १५ जानेवारी १९३८.

इतक्यात ही मिरवणूक कोणत्या मार्गाने व कशी न्यावी या विषयाचा पोलिस कमिशनरचा हुकूम घेऊन ए. डिव्हीजन पोलिस इन्स्पेक्टर आले. पोलिसांनी ही मिरवणूक कौन्सिल हॉलवरून नेण्यास व ती मध्ये कुठेही न थांबविता आझाद मैदानावर आणण्यास मिरवणुकीच्या कार्यकर्त्या मंडळींना कळविले. याविषयी शेतकऱ्यांच्या पुढाऱ्यांमध्ये बराच विचारविनिमय होऊन पोलिसांचे म्हणणे मान्य करणे भाग पडले. मात्र या मिरवणुकीपैकी निदान वीस प्रतिनिधींना ना. मुख्य प्रधानांना भेटून शेतकऱ्यांचे म्हणणे कळविण्याची परवानगी मागितली. ही परवानगी पोलिस कमिशनराने तात्काळ दिली. अशा रीतीने मेयो रोडच्या मार्गाने, कूपरेजजवळून कौन्सिल हॉलला वळसा देऊन म्युझिअमवरून ही २०-२५ हजार शेतकऱ्यांची प्रचंड मिरवणूक गगनभेदी जयघोष करीत पुन्हा संध्याकाळी पाच वाजण्याच्या सुमारास आझाद मैदानावर आली. या एवढ्या मिरवणुकीची शिस्त व संघटना पाहून कुणालाही कौतुक वाटल्यावाचून राहाणार नाही. आम्हाला वाटते की, सुव्यवस्था व कायदा खात्याच्या सर्वाधिकाऱ्यांनी मुंबईचे सारे पोलिस या मिरवणुकीच्या कडेकोट बंदोबस्तास ठेविले होते. अशाच प्रकारचा बंदोबस्त १९३१ साली कॉंग्रेसने पुकारलेल्या कायदेभंगाच्या चळवळीत नोकरशाही सरकारने ठेविला असताना कॉंग्रेसच्या नारिंगी वेषधारी देशसेविका हा पोलिसांचा कडेकोट बंदोबस्त पाहून " हे जुलमी सरकार नय रखना " म्हणून गीत गात असत आणि आता त्याच गीताचे सूत्रधार गोरगरिबांच्या शांततेच्या, योग्य व न्याय्य मागणीच्या मोर्चासाठी पोलिसांचा कडेकोट बंदोबस्त ठेवण्यास कारणीभूत झालेले पाहून कुणाही विचारी माणसांना आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. तसेच ही किसानांची प्रचंड मिरवणूक कौन्सिल हॉलवरून जात असताही या गोरगरिबांच्या कनवाळू म्हणविणाऱ्या कॉंग्रेस सरकारला त्यांच्याकडे सहानुभूतीने पाहण्याची देखील पर्वा वाटली नाही. ही कॉंग्रेसच्या मंडळींची वागणूक त्यांना वाटणाऱ्या शेतकऱ्यांच्या आस्थेविषयीची खात्रीने साक्ष पटवील.

शेवटी ही मिरवणूक पुन्हा आझाद मैदानावर आल्यावर, स्वतंत्र मजूर पक्षाचे नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली जाहीर सभा भरविण्यात आली. यापूर्वी ना. खेर यांनी शेतकऱ्यांच्या वीस प्रतिनिधींना सायंकाळी ७ वाजता मुलाखत देण्याचे आश्वासन दिले होते. आझाद मैदानावर शेतकऱ्यांच्या सभेत भाई चित्रे यांचे भाषण झाले. भाई चित्रेंप्रमाणे कॉ. याज्ञिक, द. वि. प्रधान, लालजी पेंडसे, मिरजकर, टिपणीस वगैरे पुढारी मंडळींची जोरदार भाषणे झाली. त्यांच्या भाषणानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भाषण करावयास उभे राहाताच त्यांच्या नावाचा जयघोष करण्यात आला. त्यांनी आपल्या भाषणात स्पष्टपणे सांगितले.

कष्टाळू लोकांची संघटना करावयाची झाल्यास त्यात जातिभेद, धर्मभेद यांना मुळीच थारा मिळता कामा नये. हा कष्टाळू वर्ग अगोदरच बिकट आर्थिक दडपणाने दडपला गेलेला आहे. अशा परिस्थितीत जी संघटना झाली आहे तीत मी म्हणत आहे त्याप्रमाणे विषमता दिसता कामा नये आणि आज मी म्हणत आहे अशा तऱ्हेचे सर्व जातींच्या कष्टाळू वर्गाचे हे संघटन पाहून मला आनंद होत आहे. म्हणूनच आजचा दिवस मी मोठ्या भाग्याचा समजतो. कारण की आजची आपली ही संघटना केवळ स्वार्थत्यागाच्या बळावर उभारलेली आहे. श्रमजिवी वर्गाने यासाठीच श्रीमंत वर्गाच्या म्हणजेच काँग्रेससारख्या पक्षाशी सहकार्य करून किंवा त्यांच्यावर विश्वास ठेवून उपयोगी नाही. आपणास माहितच आहे की या जगात ज्याचे घर पेटते, ज्याच्या घराला आग लावली जाते त्याचे व जो आग लावतो त्याचे कधी तरी संगनमत होईल काय ? आपण साधारणपणे प्राणीमात्राकडेही दृष्टी फेकली तरी साप व मुंगूस कधीतरी एकत्र होऊ शकतील का ? तसेच उंदीर-मांजराची मैत्री जमेल का ? अशारितीने निसर्गाविरुद्ध सृष्टी निर्माणं करणाऱ्याविषयी आपण कधी तरी विश्वास बाळगाल का ? आणि आपण त्याच दृष्टीने श्रीमंतांची पाठीराखी काँग्रेस हिच्याकडे पाहिले पाहिजे.

आपण मुंबई असेंब्लीमधील काँग्रेसच्या सभासदांकडे पाहा. बहुतेक सारे निवडून आलेले सभासद सावकार, जमीनदार, खोत आणि श्रीमंत असे लोक आहेत. ते आपल्या हिताविरुद्ध काँग्रेसला काहीच करू देणार नाहीत. त्यांच्यापैकी कित्येकांची सावकारी ५० हजारांच्या वर आहे आणि हे व्याजबट्ट्याने आपले धन वाढविणारे लोक आपणासारख्या श्रमजिवी वर्गाच्या कल्याणाची गोष्ट कशी करू शकणार ? तुम्ही आपल्या मनात पक्की खात्री ठेवा की हे असेंब्लीमध्ये काँग्रेसच्या कृपाप्रसादाने निवडून आलेले सभासद तुमच्या हितसंबंधाच्या कोणत्याही गोष्टी करणार नाहीत. आपण १९३७ साली या काँग्रेसच्या प्रतिनिधींना निवडून दिलेत त्यावेळी हे लोक आपली कशातऱ्हेने पायधरणी करीत होते, ही गोष्ट लक्षात ठेवा. तुमच्या हिताचा प्रश्न आम्ही प्रथम हाती घेऊ, तुमच्या सुखासाठी काँग्रेसने फकिरी पत्करली आहे, ही गोष्ट लक्षात घेऊन आपण काँग्रेसलाच मते द्या, असे म्हणणारे हे निवडून आलेले प्रतिनिधी तुमच्याकडे आता ढुंकूनही पाहावयास तयार नाहीत. म्हणून मी म्हणतो आपण या तोंडपुजे लोकांची यापुढे मुळीच पर्वा करू नका.

असल्या फसव्या लोकांची यापुढे खरी पूजा पायाच्या ठोकरीने केली पाहिजे आणि आपला खरा हितकर्ता कोण हे निवडताना यापुढे फार सावधगिरी बाळगा. तुम्हाला बुद्धी प्राप्त झाली आहे. त्या बुद्धीच्या बळावर तुम्ही सारासार विचारसरणीने तुमचे खरे हितकर्ते कोण, कोणता पक्ष तुमच्यासाठी प्राणाचीही पर्वा न करता झगडण्यास समर्थ आहे, याची तुम्हीच निवड करा.

खरे पाहिले असता जगात फक्त दोनच जाती आहेत. पहिली श्रीमंतांची व दुसरी गरिबांची. याशिवाय तिसरा वर्ग म्हटला म्हणजे मध्यम वर्ग होय. जगातल्या कोणत्याही उज्ज्वल चळवळीच्या नाशास हाच वर्ग कारणीभूत होत असतो. आपण कल्पना करा की आपल्या देशात कष्टाने आपले पोट भरणारे बांधव शेकडा ८० आहेत. या संख्येच्या मानाने इतर वर्ग किती अल्प आहेत याची कल्पना करा. परंतु केवळ अज्ञानामुळे आणि या वरिष्ठ म्हणणारांच्या हाती सत्ता असल्यामुळे आपणासारख्या बहुसंख्यांक जनतेला ते शह देऊ शकतात. परंतु आपण सर्व लोक जागृत झालात, तुम्हाला तुमचे हित कशात आहे हे संघशक्तीने आणि स्वावलंबनाने कळावयास लागले तर आपण एका चुटकीसरशी सर्व अधिकार आपल्या हाती घेऊ शकाल. आपण राष्ट्रीय काँग्रेसच्या मागील कायदेभंगाच्या चळवळीचे बारकाईने निरीक्षण केल्यास आपणास स्पष्ट कळून येईल की कष्ट करणाऱ्या लोकांच्या साहाय्यावरच काँग्रेसला आपला लढा इतक्या प्रभावाने लढविता आला. या कष्ट करणाऱ्या लोकांना या काँग्रेसच्या सत्ताधारी लोकांनी त्यावेळी पुष्कळ आशायुक्त वचने दिली होती. काँग्रेसच्या हाती राजकीय सत्ता आल्यावर काँग्रेस पहिल्या प्रथम गोरगरीब श्रमजिवी वर्गाच्या हितरक्षणाचा प्रश्न हाती घेईल, असे ती म्हणे. परंतु आज तुम्हास काय दिसत आहे ? आज काँग्रेसच्या हाती सत्ता आहे पण त्यांनी अजून कोणत्याही प्रकारची कामगिरी मोठ्या आस्थेने किंवा तातडीने केलेली नाही. आज त्यांचे प्रतिनिधी मुंबई असेंब्लीमध्ये बहुसंख्यांक असे आहेत. बहुमताच्या बळावर त्यांना तुमच्या हितसंबंधासाठी वाटेल ते कायदे करणे अशक्य नाही. आमच्या स्वतंत्र मजूर पक्षाचे अवघे १४-१५ सभासद आहेत. इतक्या थोड्या सभासदांच्या बळावर आम्हाला तुमच्या हितसंबंधाचे कायदे पास करून घेणे अशक्य आहे. म्हणून यापुढे लक्षात ठेवा की या काँग्रेसच्या भांडवलदार लोकांना आपली मते देऊन निवडून देऊ नका. आज जसे आपण संघटितपणे येथे आला आहात तसेच जातिभेद-धर्मभेद विसरून आपली संघटना जोरदार करा.

आपण कोकण प्रांतातली स्थिती पाहिली तर खोतादी सावकार लोक अवघे हजार किंवा दोन हजार असतील आणि तुम्ही काबाडकष्ट करणारे लोक १३ लक्षावर आहात. अशा परिस्थितीत आपण इतके दुबळे का, याचे मला मोठे आश्चर्य वाटते. आज हजार दोन हजार लोक आपणासारख्या १३ लक्ष लोकांवर हुकुमत चालवीत आहेत. याचे मूळ कारण आपली दारुण गरिबी होय. तुम्ही या मूठभर श्रीमंतांकडून पिळले गेला आहात. तुमच्यामध्ये या पिळलेल्या अवस्थेत प्रतिकार करण्याची शक्तीच राहिली नाही. यासाठी ज्यांनी तुमची अशी असह्य अवस्था केली त्या खोतादी श्रीमंतांना यापुढे कोणत्याही प्रकारचे

सहाय्य करू नका आणि ही सुद्धा गोष्ट लक्षात ठेवा की कॉंग्रेस या सर्व धनिकांना दुखवून तुमचे हित करणार नाही. तसेच तुम्ही येथे जमलेले निरनिराळ्या जातीचे लोक आजपर्यंत आपापल्या जातीच्या निरनिराळ्या संघटना करून कार्य करीत होता. त्यामुळे श्रमजिवी म्हणून एका वर्गाची एकत्रित अशी संघटना झाली नव्हती. परंतु ती संघटना यापुढे होण्याचे भाग्य दिसू लागले आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट होय.

श्रीमंत वर्गाला सहाय्य करणाऱ्या कॉंग्रेसला कोणत्याही प्रकारे सहाय्य करून आपले हित होणार नाही, हे आजची प्रत्यक्ष परिस्थितीच सांगत आहे. गेल्या असेंब्लीच्या निवडणुकीत आम्ही स्वतंत्र मजूर पक्षातर्फे कॉंग्रेसशी दोन हात करून जशा निवडणुकी लढविल्या व जे थोडेफार यश मिळविले तसेच जर कम्युनिस्टादी जहाल पक्षातील पुढाऱ्यांनी आचरण केले असते तर त्यांनाही निवडणुकीत थोडेफार यश मिळून त्यांचे सहाय्य आम्हाला आज असेंब्लीमध्ये झाले असते. परंतु त्यांनी यापुढे तरी आपले कर्तव्यकर्म बजावण्यास मुळीच कुचराई करता कामा नये. तसेच माझ्या कम्युनिस्ट मित्रांना दोन हिताचे शब्द सांगणे अयोग्य होणार नाही, असे मला वाटते. मी या कम्युनिस्टांच्या तत्त्वज्ञानाची येथील सर्व पुढाऱ्यांपेक्षा खात्रीने अधिक पुस्तके अगदी अभ्यासपूर्वक वाचली आहेत. त्या पुस्तकांवरून पाहता कम्युनिस्टांचे तत्त्वज्ञान कितीही सुंदर असले तरी त्याचा कितपत उपयोग करता येईल, हे पाहिले पाहिजे आणि त्या दृष्टीने कार्य केल्यास रशियन लोकांना जे यश मिळवावयास बरेच श्रम व कालावधी लागला तितका हिंदुस्थानातील परिस्थितीमुळे लागणार नाही, असे मला वाटते आणि म्हणून मला श्रमजिवी वर्गाच्या चळवळीच्या लढ्याबाबत कम्युनिस्ट तत्त्वज्ञान अधिक जवळचे वाटते. आपली परिस्थिती अशी आहे की आपणाजवळ आज धन नाही. आपल्या चळवळीचा सर्वत्र ठिकाणी प्रचार करण्याकरिता एखादे प्रभावी दैनिक वर्तमानपत्र नाही. सरकारचे सहाय्य मिळण्याची आशा नाही. म्हणून आपण आपली स्वतंत्र आणि संघटित अशी संघटना करा आणि आपला लढा सर्व प्रकारचे भेद विसरून लढविण्यास धैर्याने तयार व्हा, हीच विनंती.

## मुंबई सरकारपुढे सादर केलेल्या मागण्या

### मूलभूत मागण्या

(१) शेतकरी वर्गाला स्वतंत्रपणे व सुखासमाधानाने राहाता यावे म्हणून जमिनीची प्रत्यक्ष मशागत करणाऱ्यालाच त्याच्या मेहनतीचे फळ मिळाले पाहिजे.

(२) जमिनीची मशागत करून तीवरच जगणाऱ्या शेतकऱ्यांना न्याय द्यायचा असेल व त्यांच्या आर्थिक हिताची व्यवस्था व्हायची असेल तर खोत-इनामदारासारखे मध्यस्थ नसले पाहिजेत.

(३) जमीन कसणाऱ्या शेतकऱ्यांवर कर अगर पट्टी बसविण्यापूर्वी त्याला चरितार्थापुरती योग्य ती सोय करून देणे हे सरकारने आपले कर्तव्य मानले पाहिजे.

(४) त्याचप्रमाणे शेतकऱ्यांना किमान मजूरी देण्याची कायद्याने सोय करून त्यांच्या हिताला जपणे, हेही लोकमतवादी सरकारचे कर्तव्य आहे.

## तातडीच्या मागण्या

(१) ज्याप्रमाणे थकलेल्या शेतसारा बाक्या माफ करण्यात आल्या त्याचप्रमाणे आजपर्यंत थकलेल्या खंडाच्या बाक्याही ताबडतोब माफ करण्यात याव्यात.

(२) जमिनीचे किमान उत्पन्न ठरवून त्यापेक्षा कमी उत्पन्नावर सारा अजिबात माफ करावा व किमान उत्पन्नापेक्षा जास्त उत्पन्न असलेल्या जमिनीवर वाढत्या मानाने साऱ्याची आकारणी करण्याच्या दृष्टीने जमीन महसूल कायद्यात दुरुस्ती झाली पाहिजे. त्याचप्रमाणे बाजारभाव उतरले असल्यामुळे ही दुरुस्ती होईपर्यंतच्या मुदतीत ज्यांना सालिना ७५ रु. अगर त्यापेक्षा कमी शेतसारा द्यावा लागतो त्यांचा सारा ताबडतोब ५० टक्क्यांनी कमी केला पाहिजे.

(३) खोती पद्धती व इनामदार पद्धती या आर्थिकदृष्ट्या नुकसानकारक व सामाजिकदृष्ट्या जुलमी असल्यामुळे या पद्धती भरपाईसह अगर भरपाईशिवाय नष्ट करण्यासाठी कायदा करण्याची व्यवस्था ताबडतोब झाली पाहिजे. त्याचप्रमाणे कुळांकडून खंड वसूल करण्यासाठी व त्यांना छळण्यासाठी जमीनदार जे-जे मुदती दाव्यासारखे जुलमी उपाय योजतील अगर योजण्याचा बेत करतील ते-ते सर्व ताबडतोब बंद पडले पाहिजेत व सरकारने यासाठी योग्य ती व्यवस्था करावयास पाहिजे.

(४) (१) तीन वर्षे जमीन कसणाऱ्या कुळाला कायम कूळ समजले जावे, असा कायदा सर्व जमीनदारांच्या कुळांना लागू केला पाहिजे. या कायद्याला बगल देण्याची कारवाई जमीनदारांना करता येऊ नये म्हणून एक लँड कमिशन नेमण्यात यावे व या कमिशनच्या परवानगीखेरीज कुळाच्या अंगाखालील जमीन काढून घेतली जाता कामा नये. कूळ जोपर्यंत खंड देत आहे तोपर्यंत त्याजकडे तीन वर्षे असलेली जमीन कोणत्याही सबबीवर काढून घेतली जाता कामा नये.

(२) साऱ्याच्या मानाने फक्त तिसरा हिस्सा अधिक खंड घ्यावा. जास्त खंड कुळाकडून घेता येऊ नये.

(५) लहान शेतकऱ्यांची पाणीपट्टी ५० टक्क्यांनी कमी केली पाहिजे. बहुसंख्य लहानलहान शेतकरी व कुळे याना फायदेशीर होईल असे धोरण इरिगेशन खात्याने चालविण्याच्या दृष्टीने इरिगेशन कायद्यात दुरुस्ती केली पाहिजे.

(६) सर्व खेड्यांना मोफत चराई राने असावीत.

(७) कर्ज निवारणाचा योग्य तो कायदा सर्वत्र लागू होईपर्यंत कर्ज तहकूबी जाहीर करावी.

(८) शेतकऱ्यांच्या हातून सावकारांच्या हाती जमीन जाऊ नये या दृष्टीने सावकारीवर बंधने घालावी.

(९) शेतकऱ्यांच्या निर्वाहासाठी लागणारी किमान जमीन व त्याच्या चरितार्थाला लागणाऱ्या वस्तूंवर सावकारी जप्ती आणण्यास बंदी झाली पाहिजे.

(१०) वयात आलेल्या सर्व स्त्री-पुरुषास मताधिकार.

(११) वेठ-बिगार करून घेणे व बेकायदेशीर रीतीने पैसे उकळणे, हे फौजदारी गुन्हे ठरविले पाहिजेत.

(१२) जमीन महसूल खात्यातील सर्व मॅजिस्ट्रेटी अधिकार काढून घ्यावेत.

(१३) कसता येण्याजोगी सर्व पडित जमीन उपरी शेतमजूरांना मोफत वाटून द्यावी.

● ● ●

## ११६

# राष्ट्रीय ऐक्याच्या भावनेसाठी हिंदू-मुस्लिम विभक्तीकरण विनाशक

मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या बैठकीला मंगळवार ता. १८ जानेवारी १९३८ पासून सुरुवात झाली. ना. पाटील यांनी लोकल बोर्ड कायदा दुरूस्ती बिल असेंब्लीपुढे मांडले. या बिलात विशेषतः नॉमिनेशन पद्धत रद्द केली असून त्याऐवजी अस्पृश्य व स्त्री वर्गास संयुक्त मतदारसंघात राखीव जागा ठेवण्यात आल्या आहेत.

या ठरावाची बाजू मांडताना सांगण्यात आले की, आजपर्यंत सरकारनियुक्त सभासद निवडल्यामुळे, लोकशाहीच्या तत्त्वावर गदा आणली गेली होती. अशी राष्ट्रीय वृत्तीला अडथळा करणारी पद्धतच नष्ट करण्यात सरकारने पुढाकार घेतला आहे. ही अनिष्ट पद्धत नवीन कायदेमंडळातून नाहीशी केली आहे. तसेच तिचे स्थानिक स्वराज्यातून उच्चाटन झाले पाहिजे. सर अल्ली महंमद देहलवी यांनी आपल्या मुसलमान समाजासाठी स्वतंत्र मजूर संघाची का आवश्यकता आहे याचे महत्त्व प्रतिपादन केल्यानंतर स्वतंत्र मजूर पक्षाचे नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे दणदणीत भाषण झाले. डॉ. साहेबांच्या भाषणाच्यावेळी सभागृहात गांभीर्य प्राप्त झाले होते. तरीपण काँग्रेसचे बेळगावचे प्रतिनिधी श्री. गोखले यांनी मध्यंतरी काहीतरी वेडगळपणा केलाच. त्यांना एक सणसणीत टोला देऊन डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

या दुरूस्ती बिलात थोड्या, अगदी अल्प प्रमाणातल्या प्रगतीशिवाय विशेष राम आहे असे मला वाटत नाही. या बिलातील संयुक्त मतदानपद्धतीविषयी मला बोलायचे नाही. कारण मी पुणे कराराने संयुक्त मतदान पद्धतीला बांधला गेलो आहे. तरीपण या पद्धतीविषयी माझा दृष्टिकोन कोणता आहे हे मी स्पष्टपणे निवेदन करीत आहे. ही संयुक्त मतदान पद्धत मान्य केल्यावर विशेष काय घडून आले, इकडे दृष्टी देताना असे दिसून येईल की, फक्त निवडणुकीच्या दिवशी हिंदू व मुसलमान जाती एकत्र मतदानासाठी येऊ शकतील, मते देतील. पण त्यामुळे उभय समाजाच्या मनोवृत्तीत कोणता बदल होईल ? ज्या भावनेसाठी, ज्या राष्ट्रीय ऐक्याच्या भावनेसाठी ही संयुक्त मतदान पद्धत अमलात

---

जनता : २२ जानेवारी १९३८.

आणली जात आहे त्यादृष्टीने याने कोणता बदल घडून येणार ? निवडणुकीच्या दिवसानंतर या उभय समाजाचे विभक्तीकरण कायमच राहणार ! व्यवहाराच्या दृष्टीने पाहिले तर हे दोघे भिन्न धर्मांचे समाज बंधु एकाच चाळीत एकत्र कधीही राहू शकणार नाहीत. एकत्र सहभोजन करणार नाहीत. बेटी व्यवहार तर अशक्य कोटीतली गोष्ट. मग नुसत्या संयुक्त मतदारसंघाने या उभय समाजात एकी कशी होणार ? यासाठी आजची सारी सामाजिक बंधने ताडकन तोडून टाकली पाहिजेत आणि यासाठी प्रथम हिंदू समाजाने पुढाकार घेतला पाहिजे. याशिवाय असल्या बिलात असल्या राष्ट्रभावना जागृत करण्याच्या योजना योजून मुळीच कार्यभाग होणार नाही. या सर्वसाधारण दुरूस्ती बिलाविषयी स्पष्टपणे बोलायचे म्हणजे माझी निराशा झालेली आहे. या बिलात समाधान होण्यासारखे काय आहे असे शोधू लागल्यास ' दर्यामे खसखस ' अशीच अवस्था व्हायची.

● ● ●

## ११७

# चातुर्वर्ण्यामुळे हिंदुस्थानचा ऱ्हास व अध:पात झाला

ता. १२ फेब्रुवारी १९३८ शनिवार रोजी सकाळी ९ वाजता मनमाडहून निघून परिषदेसाठी सटाण्यास जात असता वाटेत चांदवड वगैरे ठिकाणी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पुष्पहार अर्पण करून स्वागत करण्यात आले. दुपारी ११ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर, श्री. देवराव नाईक, प्रधान, कवळी, गणपतराव निळे, रोकडे, भोळे, भाऊराव गायकवाड व नाशिक जिल्हा युवकसंघाच्या २० स्वयंसेवकांची एक मोटार या समवेत सटाण्यास पोचले. सटाण्याचे श्री. अभिमान पाटील, धर्मा तानाजी पाटील व प्रमुख मंडळी दोन मैल सामोरे आली होती. डॉ. बाबासाहेबांची मिरवणूक सटाण्याच्या प्रमुख रस्त्यानी काढण्यात आली होती. सर्व गावभर डॉ. बाबासाहेबांच्या स्वागतार्थ पताका वगैरे लावण्यात आल्या होत्या. गावाच्या वरच्या भागात यशवंतराव महाराजांच्या मंदिराच्या मागे नदीपात्रात मुद्दाम तयार केलेल्या भव्य मंडपात परिषदेची तयारी केली होती. परिषदेचे स्वागताध्यक्ष महंत नानकदास यांनी डॉ. बाबासाहेबांचे व जमलेल्या पाहुणे मंडळींचे स्वागत केल्यानंतर परिषदेचे अध्यक्षस्थान डॉ. बाबासाहेबांनी स्वीकारावे म्हणून ठराव मांडण्यात आल्यानंतर व त्यास रीतसर अनुमोदन मिळाल्यानंतर डॉ. बाबासाहेबांनी अध्यक्षस्थान स्वीकारले. परिषदेत श्री. भोळे, देवराव नाईक, भाऊराव गायकवाड वगैरेंची भाषणे झाल्यावर डॉ. बाबासाहेब प्रचंड टाळयांच्या कडकडाटात व जनतेच्या जयघोषात बोलण्यास उभे राहिले. डॉ. बाबासाहेब म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

मी रेल्वेकामगारांच्या मनमाडास भरणाऱ्या परिषदेसाठी या भागात आलो असता आपल्या भागात येण्याची जी संधी मिळाली त्याबद्दल मला आनंद होत आहे. माझ्या या दौऱ्यातील मुख्य हेतू आपले राजकारण लढविण्यासाठी निर्माण केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचा प्रचार करणे असा आहे. आजच्या प्रसंगी स्वतंत्र मजूर पक्षाच्या महतीपेक्षा दुसरे काही सांगण्याचे प्रयोजन मला दिसत नाही. आजच्या सभेत बरेच मानीव स्पृश्य बंधु हजर आहेत हे पाहून मला आनंद होत आहे. मागे आम्ही ज्या सभा भरवीत असू त्याही सभांना मानीव स्पृश्यांची काही मंडळी हजर राहत असत परंतु ती मंडळी आमच्या त्या सभात काय तमाशा चालला आहे हे पाहण्यासाठी जमत असत. आजची स्थिती तशी नसल्याने मीही

---

जनता : २६ फेब्रुवारी १९३८.

या सभेत जुजबी भाषण न करता जरा वेगळे करणार आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाचे सिंहावलोकन केल्यास हिंदुस्थानात आजपर्यंत प्रजासत्ताक राज्यपद्धती अंमलात आली नव्हती. अनेक ग्रंथांच्या वाचनाने मला जी माहिती मिळाली आहे त्यावरून स्पष्ट असे दिसून येते की, हिंदू राष्ट्राचा ऱ्हास व अधःपात हिंदुंना मान्य असलेल्या चातुर्वर्ण्यामुळेच झाला आहे. चातुर्वर्ण्याची प्रथा सुरू होऊन आज जरी अनेक शतके झाली असली तरी त्या प्रथेची पाळेमुळे हिंदू संस्कृतीत खोलवर जाऊन भिडली असल्याने तिचे अनेक दुष्परिणाम हिंदुस्थानास भोगावे लागले आहेत.

चातुर्वर्ण्याची शिकवणूक म्हणजे ब्राह्मणांनी विद्या शिकावी व शिकवावी, क्षत्रियांनी लढण्याचे काम करावे, वैश्यांनी व्यापार उदीम करावा व शूद्रांनी सेवा करावी. या पद्धतीमुळे आपल्या राष्ट्राचे कसे व किती नुकसान झाले हे चांगल्या शिकल्यासवरलेल्यांनाही अंजून नीट उमगत नाही. या देशातील बहुसंख्यांक असा वर्ग अजिबात बाजूला टाकून देण्यात आला. त्यामुळे राष्ट्राच्या स्वातंत्र्याला पोषक असा असलेला बहुसंख्यांक वर्ग निकामी ठरला तर हा देश नेहमीच परक्यांच्या पारतंत्र्यात लोळत राहिला असल्याचे दृश्य दिसेल. काही दिवस स्वातंत्र्य भोगिल्यानंतर ग्रिकच्या अलेक्झांडर राजाने हिंदुस्थानावर स्वारी करून हिंदुस्थानात आपली राज्ये स्थापिली. तद्नंतरच्या अल्प काळात थोडे स्वातंत्र्य मिळून मराठेशाही स्थापन होते न होते, पेशवे सर्व कारभार आपल्या हातात घेतात न घेतात तोच शेवटी सर्व देश इंग्रजांच्या गुलामगिरीत पुन्हा ढकलतात. आजच्या प्रसंगी जमलेल्या तुम्हा सर्वांना मी असे विचारतो की, या देशाला भाग्याचे दिवस सतत का लाभले नाहीत ? इतर देशाचे इतिहास आपण पाहिल्यास तेथे अशी स्थिती आपणास आढळणार नाही याचे कारण काय ? या गोष्टीचा आपण बारकाईने विचार केल्यास हिंदुंच्या धर्मगुरूंनी अर्थात ब्राह्मणांनी हिंदुस्थानावर लादलेल्या चातुर्वर्ण्याच्या चौकटीमुळेच हा अनर्थ ओढवून घेतला आहे.

तुम्हा सर्वांना एक गोष्ट सहज पटण्यासारखी आहे. कल्पना करा की एखाद्या गावावर पठाणांचा हल्ला आल्यास सर्व जातीचे लोक हातात शस्त्र धारण करून संघटनेने हा हल्ला परतवू लागले तर हल्ला परतविता येईल. ज्याच्या हातात तलवार आहे असे लोक आपल्यावरील जुलूमाचे हल्ले परतवितात. परंतु त्याऐवजी जर फक्त चार लोक तलवार हातात घेतील व इतरांना खुरप्यालाही हात लावण्यास धैर्याने मनाई करतील तर त्यामुळे राष्ट्राचे संरक्षण कसे करता येईल ?

हिंदुस्थानावर चढाई करून अलेक्झांडर आला अगर महंमद तघलक आला तरी मूठभर क्षत्रियांखेरीज दुसऱ्या कोणीच लढण्यास अगर राष्ट्राच्या संरक्षणास जाऊ नये ही चातुर्वर्ण्याची शिकवणूक. मूठभर ब्राह्मण त्यांना शस्त्र द्यावयाचे नाही. वैश्यांनी शस्त्र घ्यावयाचे नाही. शुद्रांनी हाती शस्त्र धरावयाचे नाही. या शिकवणुकीनेच हिंदुस्थानचा ऱ्हास व अधःपात झाला आहे. ज्याच्या मनगटात जोर आहे अशांना हातात शस्त्र धरण्याची जर मोकळीक असती तर झाला तसा विपरीत प्रकार झाला नसता. या सर्व क्लुप्त्या धर्मगुरू म्हणून मिरविणाऱ्या भटांनी आपल्या स्वतःच्या फायद्यासाठी जरी प्रथम केल्या असल्या तरी परिणामी त्या राष्ट्रविघातक झाल्या आहेत यात वाद नाही. अस्पृश्य मानलेल्या समाजाला आजवर जो अनन्वीत जुलूम व छळ सोसावा लागला आहे त्याचे मर्म यात आहे. जर अस्पृश्य मानलेल्या समाजाच्या पूर्वजांच्या हातात शस्त्र असते तर त्याच्या बापजाद्यांनी दोन हजार वर्षे अस्पृश्यतेचा व इतर अन्य तऱ्हेचा जुलूम गोडीगुलाबीने सोसला असता का ? चातुर्वर्ण्याच्या दुष्ट शिकवणूकीने बहुजन समाजाला शस्त्र व विद्या ही मुळी दिली नाहीत. त्यामुळे या देशाची काय स्थिती झाली आहे ? या प्रांतात एके काळी क्षत्रियांचे राज्य होते. क्षत्रियांच्या ऱ्हासानंतर पेशवाई उदयास आली. पेशवाईच्या अस्तानंतर इंग्रज अंमल सुरू झाला. एकेकाळी राज्य करणारे क्षत्रिय आज कोठे आहेत ? जर पाहाल तर राज्यकारभार ज्या क्षत्रियांनी हाकावा ते क्षत्रिय डोक्यावर तांबडी पगडी, गळयात पट्टा अशी चपराशांची कामे करताना बरेच दिसतील.

ब्राह्मणांनी वेदाध्ययन करून शिकावे व शिकवावे, क्षत्रियांनी लढावे, वैश्यांनी व्यापार उदीम करावा, शूद्रांनी सेवाधर्म आचरावा, हा मनू पालटत आहे. हिंदुस्थानात प्रजासत्ताक राज्य आज प्रथमच सुरू आहे. अशा प्रसंगी राष्ट्रहीत साधून हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य मिळविण्यासाठी झगडा सुरू करणाऱ्या कॉंग्रेसने आम्ही बहुसंख्यांक गोरगरीब शेतकऱ्यांचे, मजुरांचे पाठीराखे व कल्याणकर्ते आहोत असा कितीही टाहो फोडला तरी त्यामुळे भुलून जाण्याइतकी ही प्रजा दुधखूळी नाही. ज्या प्रजेच्या हितासाठी कॉंग्रेसने सात प्रांतात अधिकार ग्रहण केले त्याचे निरीक्षण केल्यास तुम्हास काय दिसते ? मुंबई कायदे मंडळात ११ अधिकाऱ्यांच्या जागांपैकी ६ जागा ब्राह्मणांनी बळकावल्या आहेत. मद्रास प्रांताकडे अगर बिहार प्रांतातील मंत्रिमंडळाकडे पाहिल्यास त्यात अर्धे ब्राह्मण आहेत. तीच स्थिती इतरही प्रांतात कॉंग्रेसने केली आहे. तेंव्हा थोडक्यात सांगावयाचे म्हणजे बहुसंख्यांक असलेल्या गोरगरीब शेतकरी व मजूर पक्षाच्या नावावर कॉंग्रेस ब्राह्मणांचे भूत आमच्या मानगुटीवर लादणार असल्यास आपण सर्वांनी वेळीच सावध होणे अत्यंत जरूर आहे.

ब्राह्मणेतरातील सुशिक्षितांनी काही दिवस सत्यशोधक नावाचा पंथ स्थापन केला. तो पंथ नावारूपास येण्यापूर्वीच त्यातील कार्यकर्ते आपला नाडामुडा गुडाळून कॉंग्रेसच्या मागे लागले आहेत. त्यांना त्यांची शुद्ध राहिलेली दिसत नाही. महात्मा गांधींच्या राजकारणाने त्यांच्या काळात जर सर्व राजकीय सत्ता ब्राह्मणांच्या हाती जाणार असली तर अशा राजकारणास आग लावली पाहिजे. महात्मा गांधी राजकारणाच्या गाड्याच्या नाड्या जर शेठजी भटजींच्या हाती देणार असले व ब्राह्मणांचे पिशाच्च पुन्हा जिवंत करणार असले तर त्या ब्राह्मणांचा नायनाट आपणच सर्वांनी करावयास हवा आहे. हे कार्य नुसते माझे नसून बहुसंख्यांक असलेल्या सर्व गोरगरीब शेतकऱ्यांचे, मजुरांचे व मराठ्यांचे आहे. या सर्वांना संघटित करून राजकारण लढविल्यास कायदेमंडळात जबाबदारीच्या ११ च्या ११ ही जागा ते काबीज करू शकतील. परंतु यथेच्छ जेवण झाल्यानंतर उरलेल्या खरकट्यांच्या पत्रावळी उकिरड्यावर फेकून दिल्या असता त्या चाटण्यात आनंद मानणाऱ्या कुत्र्यासारखी त्यांची स्थिती झाली आहे. जे काही थोडे मिळेल त्यातच ते समाधान मानीत आहेत. मला ते नको आहे. राजकारणात समानता उत्पन्न झाली पाहिजे. इतकेच नव्हे तर एखादा लायक भिल्ल असल्यास तो या प्रसंगी मुख्य प्रधान झाला पाहिजे. समाजात असलेला उच्च-नीच भेद कमी झाला पाहिजे. ही गोष्ट कॉंग्रेसच्या हातून होणे शक्य नाही व म्हणून मी कॉंग्रेसमध्ये सामील होत नाही.

अनेक वेळा असे सांगण्यात येते की, महात्मा गांधींच्या पुढे गेलेले विरोधक आपला विरोध विसरून विलग होत असतात. त्यांची बोबडी वळते असे सांगण्यात येते. परंतु माझा अनुभव त्यांच्या अगदी विरुद्ध आहे. मी दहा वेळा महात्मा गांधींना भेटलो आहे. पण म्हणतात त्याप्रमाणे कोणतीच भूत-बाधा मला झालेली नाही.

गोरगरीब, शेतकरी व मजूर वर्गाच्या हितरक्षणार्थ आम्ही '' स्वतंत्र मजूर पक्ष'' नावाचा पक्ष काढला आहे. या पक्षाबाबत फार पाल्हाळीक न सांगता या पक्षाच्या ज्ञानाची किल्ली, सांगेन एकाच बोली या साधुक्तीनुसार थोडक्यात सांगतो. राजकीय लढा लढविण्यासाठी कॉंग्रेस आज अस्तित्वात असताना दुसरा पक्ष काढण्याचे कारण काय ? म्हणून अनेकजण मला प्रश्न विचारतात. मला त्यांना इतकेच सांगावयाचे आहे की, कॉंग्रेस ही भांडवलवाल्यांची बटीक आहे. कारण कॉंग्रेसचे आजचे सर्व थेर कॉंग्रेसमधील भांडवलवालेच लागेल तो पैसा पुरवून माजवित आले आहेत. अर्थात भांडवलवाल्यांचा त्याच्या

बुडाशी एकच हेतू आहे की या काँग्रेसमार्फत आपले जितके हीत साधता येईल तितके साधावे. हे जरी खरे असले तरी काँग्रेसवाले बाहेरून आम्ही गोरगरीब शेतकऱ्यांसाठी व मजुरांसाठीच स्वराज्याचा लढा लढवीत आहोत, हे त्यांचे म्हणणे मानभावीपणाचे दिसते. कारण श्रीमंत भांडवलवाले व गोरगरीब, शेतकरी व मजूर यांचे हितसंबंध परस्पर विरोधी असे आहेत. तेव्हा गोरगरिबांसाठी श्रीमंत भांडवलवाले पदरमोड करून आपले स्वतःचे नुकसान करून घेतील, हे संभवनीय दिसत नाही. जसे व्यवहारात आपण नेहमी पाहातो की, मांजर आणि उंदीर, साप आणि मुंगूस, लांडगा आणि शेळी यांचे निर्सगतःच वाकडे असते तसेच श्रीमंत भांडवलवाले व गरीब शेतकरी व मजूर यांचे आहे. व्यवहारात जसे मुंगूस सापास चाटताना अगर उंदीर मांजरीस पिताना अगर शेळी लांडग्याच्या मांडीवर निर्विघ्नपणे झोप घेताना आढळावयाची नाही तद्वतच श्रीमंत भांडवलवाल्यांच्या मोहबतीवर गोरगरीब, शेतकरी व मजूर यांचे हित होईल या म्हणण्यावर कोणीही विश्वास ठेवून फसू नये. ही गांधींची माया आहे व म्हणून शेतकरी व मजूर यांनी भांडवलवाल्यांच्या काँग्रेस या संस्थेपासून जरा सावध राहावे इतकेच सांगावयाचे आहे, कारण जो मारवाडी गोरगरीब शेतकऱ्यास व मजूरास लुटून त्यावरच गब्बर होतो तो काय वर्षास चार आणे देऊन काँग्रेसचा सभासद झाल्याने आपला स्वभावधर्म एकदम बदलिल हे म्हणणे हास्यास्पद आहे. आज हरिपुरा येथे काँग्रेसचे ५१ वे अधिवेशन भरत आहे. त्यासाठी काही लाखांनी खर्च होणार असे म्हणतात. हा सर्व खर्च होणारा पैसा कोठून आला ? हा सर्व पैसा श्रीमंत शेठांनी दिला आहे. याबाबत एक अनुभवाची गोष्ट सांगतो. आमच्या कोकणात श्रीमंत मुसलमान लोक गोरगरीब लोकांच्या मुलांची लग्ने १० वर्षे त्यांच्या येथे काम करण्याच्या कराराने करून देतात. परंतु हे एकच लग्न नसून असल्या अनेक गरजू लोकांची लग्ने एकाच मुहूर्तावर करतात व शेवटी मुदतीनंतर आणखी एक वर्ष लोभाचे. या सर्व लोकांना सावकाराकडे काम करावे लागते. त्याचप्रमाणे काँग्रेस अधिवेशनासाठी लागणाऱ्या लाखो रुपयांच्या श्रीमंतांच्या कर्जापायी या हिंदुस्थानास आणखी किती दिवस श्रीमंतांच्या गुलामगिरीत काढावे लागतील ? तेव्हा हा लढा गोरगरीब मजूर व शेतकरी यांनी संघटित होऊनच लढविला पाहिजे. स्वतंत्र मजूर पक्षाचा आज मी जरी अध्यक्ष असलो तरी मला त्याचा मोठा हव्यास नाही. दुसरा कोणी अध्यक्ष होऊन ही जबाबदारी घेण्यास तयार असल्यास मला त्यात फार समाधान वाटेल. या राजकारणापासून मला असा काय लाभ आहे ? मी जर यापासून दूर असतो तर आज काही लाखांचा धनी खास झालो असतो. हिंगाला जसा वास आहे

तसा आम्हास अस्पृश्यतेमुळे लागला आहे. तेव्हा अस्पृश्येतर जरी त्यामुळे बिचकून या स्वतंत्र मजूर पक्षापासून दूर राहू लागले तर त्यांची मर्जी परंतु आपल्यातील दरेक वयात आलेल्या स्त्री-पुरुषांनी या स्वतंत्र मजूर पक्षाचे वर्षाकाठी चार आणे भरून सभासद व्हावे व स्वतंत्र मजूर पक्षाची शक्ती वाढवावी अशी विनंती करून आपली रजा घेतो. पुष्पहार अर्पण झाल्यानंतर 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय' च्या जयघोषात सभा विसर्जन पावली.

दुपारी ३ वाजता सटाण्याहून निघून वाटेत काझीसांगवी, ता. चांदवड येथे डॉ. बाबासाहेबांचे अभिनंदन करण्यात आले. सदर प्रसंगी सदर गावचे मराठा जातीचे प्रमुख पुढारी श्री. कारभारी बगाजी पाटील यांनी डॉ. बाबासाहेबांचे गुणवर्णनपर भाषण केले.

● ● ●

# स्वातंत्र्य, समता व बंधुभाव ह्या तत्त्वावर आधारलेली नवी पद्धती हे कामगार संघटनांचे ध्येय असावे

मनमाड येथे अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषद आयोजित करण्याविषयक भूमिका विशद करणारे रेल्वे अस्पृश्य कामगारांना उद्देशून पत्रक काढण्यात आले होते. ते येणेप्रमाणे–

" अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषद मु. मनमाड येथे या महिन्याच्या अखेरीस भरणार आहे. ही परिषद भरण्याचे ठरविण्यापूर्वी परिषदेच्या चालक मंडळींपैकी काही प्रमुख मंडळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना गेल्या महिन्यात भेटून गेली. ही परिषद भरविण्याचे खरे कारण आजकाल जिकडे तिकडे बिकट आर्थिक परिस्थितीमुळे हलाखीची अवस्था निर्माण झाली आहे. गोरगरीब कामगारांना या अवस्थेची तीव्र जाणीव भासत असून त्यात अस्पृश्य कामगारांच्या हालअपेष्टांना सीमाच राहिलेली नाही. स्पृश्य वर्गीय कामगारांपासून होणारा थोडाफार त्रास होतोच शिवाय अधिकारी वर्गाकडून होणाऱ्या त्रासाचे गाऱ्हाणे ऐकून घ्यावयास कुणी जबाबदार मंडळी नाही किंवा त्यांचे गाऱ्हाणे योग्य रीतीने अधिकारीवर्गापुढे मांडणारा खरा प्रतिनिधीही नाही. अंतःकरणाच्या खऱ्या जिव्हाळ्याशिवाय कार्य होत नसते ही सत्य गोष्ट अस्पृश्य वर्गीय कामगार बांधवांना आजपर्यंतच्या कटु अनुभवाने पूर्णपणे कळून आलेली आहे. रेल्वेचे राक्षसी काम रात्रंदिवस जिवापाड मेहनत करून करावयाचे आणि याचा मोबदला काय, तर एकवेळ पोटभर भाकरी मिळेल किंवा नाही इतके अल्प वेतन मिळावयाचे ! ही कामगिरी करताना स्वतःच्या कौटुंबिक प्रपंचाकरिता कर्जबाजारी होण्याची वेळ येते ती गोष्ट निराळीच. अशी बिकट परिस्थिती अस्पृश्यतेच्या कलंकाबरोबर अनुभवीत राहाणे दिवसेंदिवस कठिण होत आहे. या सर्व गोष्टींचा साधकबाधकरित्या विचार करून सर्व अस्पृश्य कामगारांना एकत्रित करून आपल्या यापुढील कार्याची रूपरेषा आखण्याकरिता काही कामगारातील प्रमुख मंडळींनी ही अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषद भरविण्याचे ठरविले आहे.

मनमाड येथे भरणाऱ्या या उपनिर्दिष्ट परिषदेचे अध्यक्षस्थान अस्पृश्य वर्गाचे सन्माननीय पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्वीकारण्याचे कबूल केले

आहे. अस्पृश्य वर्गाची सर्वांगीण उन्नती करून त्यांना राजकीय हक्क मिळविण्यासाठी डॉ. बाबासाहेबांनी केलेला आजपर्यंतचा स्वार्थत्याग जनतेच्या डोळ्यांसमोर आहे. हिंदुस्थानातील जी. आय. पी. रेल्वेवर अस्पृश्य वर्गीय कामगार पुष्कळ आहेत. यांची योग्य संघटना केल्यावर भांडवलदार व कारखानदार वर्गाविरूद्ध होत असलेल्या लढ्यासंबंधी योग्य चर्चा होऊन या परिषदेच्या अधिवेशनाने अखिल रेल्वे कामगारांच्या बऱ्याच हिताच्या गोष्टी घडल्याशिवाय रहाणार नाहीत. कामगारांचे जीवन किती कष्टमय असते याची कल्पना नुसत्या पुस्तकी विद्येने होणार नाही. त्या प्रत्यक्ष बिकट अशा जीवनकलहात समरस झाल्याशिवाय त्यांच्या असह्य परिस्थितीची कल्पना येणे कठीण आहे. रेल्वेसारख्या श्रीमान आणि बलाढ्य अशा व्यापारी संस्थेने आपल्या कामगारांविषयी योग्य काळजी घेणे किती आवश्यक आहे ही गोष्ट दुसऱ्याने सांगून उपयोगी नाही. त्याची जाणीव या धनिक लोकांना प्रथम होणे जरूरीचे आहे. ज्यांच्या श्रमावर आपण श्रीमंत होऊन ऐषारामामध्ये लोळत आहोत त्या कामगारांना निदान दोनवेळ पोटभर अन्न मिळण्याइतके वेतन देणे प्रत्येक कारखानदाराचे, धनिकाचे आणि भांडवलवाल्याचे पहिले असे कर्तव्यकर्म आहे. कामगारांचा लढा म्हणजे पोटाच्या प्रश्नाचा आहे. आपणास आणि आपल्या मुलांबाळांस दोनवेळ कशी मिठभाकर मिळेल याची विवंचना या कामगार बांधवांना लागलेली असते. अशा वेळी थोडीशी विश्रांती आणि ऐषाराम करण्याकडे त्यांची प्रवृत्ती होण्याइतकी मनःस्थिती स्थीर नसते. या सर्व परिस्थितीचा विचार करुन ही परिषद भरविण्याचे ठरले आहे.

ही परिषद यशस्वी करण्याकरिता मनमाड, भुसावळ, कल्याण, इगतपुरी, नांदगाव, दौंड, सोलापूर, ठाणे व मुंबई वगैरे ठिकाणच्या प्रमुख कार्यकर्त्या मंडळींनी डॉ. बाबासाहेबांबरोबर आगाऊ विचार विनिमय केलेला आहे. परिषदेची ही कल्पना प्रसिद्ध होताच मुंबई पासून दिल्ली, अलाहाबाद, लखनौ, कानपूर, जबलपूर, रायपूर वगैरे ब्रँच लाईन विभागातून ही परिषद यशस्वी करण्याबद्दल प्रत्यक्ष सहानुभूतीचा पाठिंबा मिळत आहे. अशा तऱ्हेने ही प्रत्येक प्रांतातील प्रतिनिधींची प्राथमिक स्वरूपाची खरी कॉन्फरन्स यशस्वी करण्याकरिता सर्व अस्पृश्य रेल्वे कामगारांनी परिषदेच्या चालक मंडळीला आपुलकीच्या प्रेमाने, कार्याच्या कळकळीने मदत करणे आवश्यक आहे. या परिषदेचे जनरल सेक्रेटरी श्री. आर. आर. पवार हे आहेत. यांच्या कार्याविषयी अस्पृश्य रेल्वे कामगारांना पूर्ण जाणीव आहे. तसेच परिषदेची इतर चालक मंडळीविषयी आमच्या अस्पृश्य रेल्वे कामगारांना माहिती आहे. शिवाय ही परिषद आपले

परमपूज्य पुढारी व स्वतंत्र मजूर पक्षाचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या खास अध्यक्षतेखाली भरणार आहे. परिषदेची विनंती पत्रके व वर्गणीसाठी पावत्या पुस्तके ठिकठिकाणच्या परिषदेच्या कार्यकर्त्यांकडे पाठविल्या आहेत. त्याप्रमाणे प्रत्येक अस्पृश्य रेल्वे कामगाराने परिषदेचे प्रतिनिधी झालेच पाहिजे. 'आपली संघटना स्वावलंबनाच्या मार्गाने केल्याशिवाय आपल्या कार्यास खरे यश प्राप्त होणार नाही.' हा डॉ. बाबासाहेबांचा संदेश प्रत्येक अस्पृश्य रेल्वे कामगारानी आपल्या अंतःकरणात जागृत ठेवावा. मनमाड येथे अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषद यशस्वी करण्यात आपल्या कामगार चळवळीच्या दृष्टीने विशेष महत्त्व आहे ही गोष्ट प्रत्येकाने पूर्णपणे लक्षात ठेवून ही परिषद तनमनधनाने विजयी करण्याचा आजच निर्धार करावा.''[१]

"वरील परिषद याच वर्षी मु. मनमाड येथे भरविण्याचे नक्की ठरले होते. परंतु परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना पूर्वी ठरलेल्या तारखांना इतर कामामुळे हजर राहाणे अशक्य झाले होते. आता ही परिषद मु. मनमाड येथे ता. २९ व ३० जानेवारी १९३८ रोजी नक्की भरणार आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी या तारखांना परिषद भरविण्यास परिषदेच्या चालकांना कळविताच ते परिषदेच्या तयारीस मोठ्या जोमाने लागले आहेत. रेल्वे किंवा गिरण्या अथवा मोठमोठ्या कारखान्यांत अस्पृश्य मानलेल्या कामगारांना किती त्रास होतो, त्यांना या अंगमेहनतीच्या कामात सुद्धा केवळ अस्पृश्यतेमुळे किती मानहानी सोसावी लागते, तसेच आर्थिकदृष्ट्याही अस्पृश्य कामगारांना अतोनात नुकसान सोसावे लागते. ही प्रत्यक्ष परिस्थिती एकदा जगाच्या निदर्शनास आणून आजच्या सुधारणेच्या काळातही अस्पृश्यतेचा कलंक अस्पृश्य कामगारांना कसा नडतो याची सहज खात्री पटविता येईल. अस्पृश्य कामगारांवर होणाऱ्या या अन्यायाचे निर्मूलन होण्याकरिता ही रेल्वे कामगारांची निराळी व स्वतंत्र अशी परिषद भरविणे परिस्थितीने भाग पाडले आहे. अस्पृश्य कामगारांना इतर कामगारांपासून कधीही विभक्त व्हावयाचे नाही. सर्व कामगारांच्या ज्या इतर मागण्या आहेत त्यात अस्पृश्य कामगार त्यांच्याशी सहकार्य करीलच. परंतु आज अस्पृश्य कामगाराला अस्पृश्यतेमुळे जी बिकट परिस्थिती प्राप्त झाली आहे, त्याचा विचारविनिमय करण्याकरिता व इतर कामगारांच्या हितसंबंधाच्या प्रश्नांसंबंधी नक्की धोरण ठरविण्याकरिता ही जी. आय. पी. रेल्वे कामगार परिषद भरविण्यात येत आहे.

---

[१] जनता : ८ मे १९३७.

या परिषदेचा वरीलप्रमाणे थोडक्यात खुलासा केलेला आहे. तरी अस्पृश्य रेल्वे कामगारांनी आपली संघटना करून ही मनमाडची परिषद यशस्वी करण्याचा प्रयत्न करावा. या परिषदेचे तरूण व उत्साही जनरल सेक्रेटरी श्री. आर. आर. पवार यांनी परिषद अपूर्व व यशस्वी करण्याचा संकल्प केला असून ते आपल्या सहकारी व कार्यकारी मित्र मंडळीच्या मदतीने हे कार्य करावयास लागले आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर अध्यक्षपदावरून रेल्वे कामगारांना मार्गदर्शक होईल अशा धोरणाचे भाषण करणार आहेत. ही परिषद अखिल भारतीय स्वरूपाची आहे. तिचे यश म्हणजे भारतीय रेल्वे अस्पृश्य कामगारांचे खरे हित होय. म्हणून सर्व कामगारांनी आपल्या प्रचंड शक्तीने ही परिषद जोमाने आणि अपूर्व विजयाने पार पाडण्यासाठी परिषदेच्या चालकमंडळीशी प्रत्यक्ष सहकार्याने मदत करावी. अस्पृश्य कामगार प्रसंग पडल्यास आपली चळवळ स्वावलंबनाच्या मार्गाने कशी यशस्वी करू शकतात हेही जगाला कळेल. आमचे जागृत झालेले रेल्वे अस्पृश्य कामगार आपल्या कर्तव्यकर्मास जागून या परिषदेची अलौकिक शक्ती सर्वांना दाखविल्याशिवाय राहाणार नाहीत अशी आम्हास खात्री वाटते. ''[1]

सदरहू परिषदेला हजर राहाण्याविषयीचे पत्र डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जनरल सेक्रेटरी यांना पाठविले. त्याप्रमाणे जनरल सेक्रेटरी यांनी बाबासाहेबांना पत्र पाठविले आणि जाहीर खुलासा प्रसिद्ध केला. सदरहू दोन्ही पत्र व खुलासा येणे प्रमाणे–

''राजगृह, हिंदू कॉलनी
दादर- मुंबई ता. १४-१-१९३८.

श्रीयुत रामचंद्रराव पवार, जनरल सेक्रेटरी, रेल्वे दलित कामगार मंडळ व कामगार लोक यासी :–

मनमाड येथे भरणारी रेल्वे दलित कागगार परिषद ही सर्व दृष्टीने अत्यंत महत्त्वाची अशी परिषद होणार आहे. या परिषदेस ता. २९ व ३० जानेवारी १९३८ रोजी मी हजर राहीन असे कबूल केले होते. परंतु अपरिहार्य कारणामुळे वरील तारखांना मला हजर राहाता येत नाही याबद्दल वाईट वाटते. सदरची तारीख फक्त १५ दिवसांनी पुढे वाढविल्यास सदर वेळी परिषदेस हजर राहण्यास मला भरपूर अवधी मिळेल. साठी सदर परिषद **ता. १२ व १३ फेब्रुवारी १९३८ शनिवार व रविवार** रोजी घेतल्यास ठीक होईल व तसेच अनेक दिवसांपासून

---

[1] जनता : २५ डिसेंबर १९३७.

नाशिक जिल्ह्याच्या पूर्व भागातील सटाणे व काझीसांगवी या गावांना मी भेट देण्याविषयी तिकडील लोकांची असलेली इच्छाही तृप्त करता येईल. साठी सदर परिषद वरील तारखेस घेण्याची कृपा करावी. आपल्यापैकी अनेकांना ता. २९ व ३० जानेवारी १९३८ रोजीची रजा व पास मिळविण्याबाबत बराच त्रास झाला असेल हे मला कबूल आहे. त्याबद्दल आपण मला माफ करावे.अशी विनंती आहे. क. लो. अ. ही वि.

आपला कृपाभिलाषी,
**भिमराव रा. आंबेडकर.**

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरणी शीर सा. दंडवत वि. वि.

आपले आज्ञेप्रमाणे रेल्वे दलित कामगार परिषद ता. १२ व १३ फेब्रुवारी १९३८ शनिवार व रविवार रोजी स्वागत मंडळाच्या विचारे ठेविली आहे. चरणी श्रुत होय.

आपला नम्र सेवक,
आर. आर. पवार.

## जाहीर खुलासा

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आज्ञेनुसार रेल्वे दलित कामगार परिषद ता. १२ व १३ फेब्रुवारी १९३८ शनिवार व रविवार रोजी घेण्याचे निश्चित ठरले असून लवकरच कार्यक्रम प्रसिद्ध करण्यात येईल.

आपला नम्र सेवक,
आर. आर. पवार,
जनरल सेक्रेटरी,
मनमाड रेल्वे दलित कामगार परिषद.'' [१]

[१] जनता : २२ जानेवारी १९३८.

## मनमाड येथील त्रिवेणी संगम

" शनिवार व रविवार ता. १२ व १३ फेब्रुवारी १९३८ रोजी मु. मनमाड येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरणाऱ्या अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषदेसाठी एक भव्य मंडप मनमाड स्टेशनजवळच मि. इब्राहिम ताजभाई शेठ यांच्या जागेत उभारून त्याला दलित कामगार नगर असे नाव देण्यात आले आहे. आजपर्यंत रेल्वेमध्ये नोकरी करणाऱ्या अस्पृश्य कामगारांवर जो अन्याय होत आहे, त्यांची चहूबाजूंनी जी एकप्रकारची कुचंबणा होत आहे, या सर्व हृदयद्रावक गोष्टींचा विचारविनिमय या परिषदेमध्ये प्रामुख्याने होईल. ' कामगार म्हटला की, त्याला जात नाही, धर्म नाही ' वगैरे उच्च तत्त्वे मान्य करूनही अस्पृश्य कामगारावर केवळ अस्पृश्यतेमुळे कसा अन्याय होतो हे या परिषदेच्या अधिवेशनामध्ये नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या भाषणात स्पष्टपणे सांगणार आहेत आणि कामगारांच्या खऱ्या लढाऊ लढ्याची दिशा कोणती याचेही योग्य रीतीने विवेचन करणार आहेत. तरी अशा महत्त्वाच्या परिषदेच्या अधिवेशनाला प्रत्येक अस्पृश्य मानलेल्या रेल्वे कामगाराने प्रतिनिधी होऊन अवश्य हजर रहावे.

### परिषदेचा कार्यक्रम

शनिवार ता. १२ फेब्रुवारी १९३८ रोजी सकाळी ८ ते ११ विषयक नियामक कमिटीची बैठक, दुपारी ३ वाजता स्वागताध्यक्ष श्री. पी. एन. बनकर यांचे भाषण, अध्यक्षांची सूचना, स्वागतपर पदे व पोवाडे, संदेश वाचन, रात्रौ भोजनानंतर जलसे.

रविवार ता. १३ फेब्रुवारी १९३८ रोजी सकाळी ९ वाजता अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण व इतर कार्यक्रम.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा मनमाड येथे शनिवार व रविवार या दोन्ही दिवशी मुक्काम आहे. शनिवारी रेल्वे परिषदेच्या कामकाजापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व काही निमंत्रित मंडळीकरिता मु. सटाणे व काझीसांगवी येथे जाहीर पानसुपारी निमित्त छोटे कार्यक्रम उरकून घेण्यात येतील.

## मुंबई इलाखा अस्पृश्य युवक परिषद

शनिवार ता. १२ रोजी रात्रौ ८ वाजता वरील युवक परिषदेचे अधिवेशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरणार आहे. या युवक परिषदेमध्ये स्वतंत्र मजूर पक्षाचा कार्यक्रम सर्व इलाख्यामध्ये जोमाने अंमलात

आणण्याविषयी विचारविनिमय होऊन पुढील कार्यक्रमाची दिशा आखली जाईल. आपल्या पक्षाचा कार्यक्रम युवकांच्याच मदतीने यशस्वी होणार असल्यामुळे या युवक परिषदेचे महत्त्व जाणून सर्व तरूणांनी या परिषदेस अगत्यपूर्वक हजर रहावे.

## महाराष्ट्रीय अस्पृश्य महिला परिषद

तरूणांच्या परिषदेप्रमाणेच ही अस्पृश्य महिलांची परिषद ' दलित कामगार नगरात ' रविवार ता. १३ फेब्रुवारी रोजी दुपारी तीन वाजता पुण्याच्या प्रमुख कार्यकर्त्या सौ. मैनाबाई शामराव भोळे यांच्या अध्यक्षतेखाली भरणार आहे. या परिषदेच्या स्वागताध्यक्षाच्या जागी सौ. वेणूबाई रविकांत जाधव यांची निवड केली आहे. या महिला परिषदेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे महिलांना आपल्या चळवळीच्या कामगिरी संबंधी संदेशात्मक भाषण होईल. याशिवाय इतर भाषणे, ठराव वगैरे कार्यक्रम होईल.

या दोन दिवसात मनमाड येथे हे होणारे प्रचंड कार्यक्रमाचे कार्य निर्विघ्नपणे यशस्वी करण्याची सारी व्यवस्था रेल्वे परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून ठेवण्यात येईल.

## करमणुकीचे कार्यक्रम

या दोन्ही दिवशी प्रमुख पाहुणे मंडळी, प्रतिनिधी व प्रेक्षक मंडळींची करमणूक करण्याकरिता निरनिराळे कार्यक्रम ठेवण्यात आले आहेत. या प्रसंगी नाशिक जिल्हा युवक संघाचा जलसा, मनमाड येथील जुनी रूढीविध्वंसक जलसा मंडळ, नाशिकरोड येथील सत्यवादी सामाजिक जलसा, याशिवाय चांदवड, जोपूळ इत्यादिकांचे जलसे ; शाहीर घेगडे यांचे पोवाडे, गायन, कातरगावकर व वडाळा येथील श्री. एस. आर. साळवे यांच्या मुलामुलींचा संगीत मेळा असे विविध कार्यक्रम होतील.

अशारितीने मनमाड येथे होणाऱ्या परिषदांचे कार्यक्रम वर नमूद केले आहेत. यामुळे या महत्त्वाच्या तीन परिषदांचा त्रिवेणी संगमाचा आलेला अपूर्व योगायोग डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली चाललेल्या स्वावलंबनाच्या व स्वातंत्र्याच्या चळवळीला विशेष पोषक होईल यात मुळीच शंका नाही. ही सारी जबाबदारीची कार्ये पार पाडण्याच्या कामी मे. आर. आर. पवार, बनकर, अहिरे, खरे, संसारे, पाटील, सरोदे, मोरे, पगारे व तेलुरे वगैरे मंडळी झटत आहेत हे त्यांना खरोखरच भूषणावह आहे.

या तिन्ही महत्त्वाच्या परिषदा यशस्वी करण्याच्या बाबतीत मुंबई इलाख्यातीलच अस्पृश्य बंधुभगिनींनी सहाय्य करून भागणार नाही, तर इतर प्रांतातील मंडळींनीही सहकार्य करावे. या तिन्ही परिषदांसाठी पुणे, मुंबई, औरंगाबाद, धुळे, जळगाव, नाशिकरोड, इगतपुरी, धानोरी, नागपूर वऱ्हाड प्रांतातून प्रतिनिधी हजर राहाणार आहेत.

## नागपूरच्या पाहुणेमंडळीशी विचारविनिमय

रविवार ता. १३ फेब्रुवारी १९३८ रोजी दुपारी १ ते २ वाजताच्या दरम्यान नागपूर वऱ्हाड प्रांतातून आलेल्या प्रतिनिधींबरोबर येथील चळवळी संबंधी डॉ. बाबासाहेब आंबेडकर विचारविनिमय करणार आहेत. परिषदेमधील करमणुकीच्या कार्यक्रमात वेळेनुसार फरक करण्यात येईल. या परिषदांसाठी चाळीसगाव येथून बँड येणार असून परिषदांच्या जाहीर कामकाजासाठी मंडपात लाऊड स्पीकरची योजना दोन्ही दिवसांकरिता केली आहे.

जनता पत्र व स्वतंत्र मजूर पक्ष यांच्यासाठी दोन स्वतंत्र ऑफिसे ठेवण्यात आली आहेत. जनता पत्राचे वर्गणीदार होणारांनी आपली वार्षिक वर्गणी येथे भरावी. तसेच स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होणारांनी या ऑफिसात आपली वर्गणी भरावी, याशिवाय या दोन्ही ऑफिसात आपल्या चळवळी संबंधी माहिती देण्याची व्यवस्था केली आहे.'' [१]

'' इतके दिवस गाजत असलेले अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगारांच्या परिषदेचे अधिवेशन गेल्या शनिवार व रविवार ता. १२, १३ फेब्रुवारी १९३८ रोजी यशस्वीरीतीने पार पडले. या परिषदेसाठी ' दलित-कामगार नगराची ' केलेली सजावट उत्कृष्ट होती. निदान २० हजार लोकसमुदाय बसेल अशी व्यवस्था परिषदेच्या चालकांनी केली होती. तसेच परिषदेतील भाषणे सर्वांना ऐकायला मिळावीत म्हणून खास ' लाऊड स्पीकर ' ची योजना केली होती. अध्यक्ष व कर्मचारी मंडळासाठी एक छोटेसे व्यासपीठ तयार केले होते. त्यावर कित्येक प्रमुख कार्यकर्त्यांचे फोटो व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा एक भव्य फोटो पुष्पहाराने मंडित केलेला होता. व्यासपीठाच्या उजव्या बाजूस स्त्रियांकरिता खास निराळी व्यवस्था केली होती आणि व्यासपीठाच्या आजुबाजूला स्वागत मंडळाचे प्रतिनिधी व निमंत्रित पाहुणे मंडळींची व्यवस्था ठेवण्यात आली होती.

---

[१] जनता : ५ फेब्रुवारी १९३८.

शनिवारी सायंकाळी परिषदेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या मित्रमंडळींसह ' दलित कामगार नगरात ' प्रवेश करताच त्यांचे बँडच्या सुस्वर वादनाने व त्यांच्या नावाच्या गगनभेदी जयजयकाराने मोठ्या उत्साहाने, प्रेमाने आणि आपुलकीने स्वागत करण्यात आले. ते व्यासपीठावर चढून बसेपर्यंत ' डॉ. आंबेडकरांचा जयजयकार असो ', ' डॉ. आंबेडकर झिंदाबाद ', ' कामगारांचा विजय असो ' वगैरे प्रकारच्या जयजयकाराने ते सारे वातावरण कित्येक मिनिटे दुमदुमून गेले होते. यानंतर स्वागत पदे व अभिनंदनाची गाणी लहान मुलामुलींच्या मेळ्याने सुस्वर आवाजात गाऊन दाखविली. याबाबतीत श्री. शंकरराव साळवे यांनी बरीच मेहनत घेतली होती. परिषदेच्या कामकाजास सुरवात होण्यापूर्वीच सारे ' दलित कामगार नगर ' स्त्री-पुरुषांच्या प्रचंड जमावाने फुलून गेले होते. त्यात नगराची लतापताकांनी आणि दिव्यांच्या प्रकाशाने केलेली रोशनाई विशेष मनोवेधक दिसत होती. कामगार नगरात पुन्हा शांतता उत्पन्न होताच स्वागताध्यक्ष श्री. पी. एन. बनकर यांनी आपले भाषण वाचून दाखविले. त्यांच्या भाषणानंतर परिषदेचे उत्साही जनरल सेक्रेटरी, श्री. रामचंद्रराव पवार यांनी परिषदेच्या कामकाजाचे, आमंत्रित मंडळींचे, प्रतिनिधींचे स्वागत केले आणि परिषदेसाठी आलेले संदेश वाचून दाखविले. संदेशांपैकी अस्पृश्य समाजाचे एक प्रमुख पुढारी मे. सुभेदार विश्राम गंगाराम सवादकर यांचा संदेश विशेष महत्त्वाचा व अस्पृश्य कामगारांच्या कर्तव्याची जाणीव करून देणारा असा होता. याशिवाय रत्नागिरी उत्तर विभाग स्वतंत्र मजूर पक्षाच्या शाखेचे अध्यक्ष व श्रमजिवी वर्गाचे पुढारी भाई अनंतराव चित्रे यांचा महाडहून एक संदेश आला होता. त्यांनी आपल्या संदेशात रत्नागिरी उत्तर भागातील शेतकरी वर्गातर्फे परिषदेचे यश चिंतले होते. शिवाय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी कामगारांच्या चळवळीला नवीन दिवस दाखविण्यासाठी या परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारल्याबद्दल अत्यानंद व्यक्त केला आहे आणि त्यांच्या अतुल पराक्रमाच्या आणि योग्य अशा नेतृत्वाखाली मजुरांच्या चळवळीचा खात्रीने भाग्योदय होईल आणि त्यासाठी आपण सर्वांनी आपली जोमदार संघटना करून प्रत्यक्ष कार्याला लागण्याचा आजच संकल्प करावा वगैरे, अशी कळकळीची विनंती केली आहे. याशिवाय इतर शुभ संदेश वाचल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची अध्यक्षपदी रीतसर निवड करण्यात आली. त्यांनी प्रचंड टाळयांच्या गजरात अध्यक्षस्थान स्वीकारताच त्यांना पुष्पहार अर्पण करण्यात आला.

डॉ. बाबासाहेबांनी अध्यक्षपद स्वीकारल्यानंतर छोटेसे प्रास्ताविक भाषण केले. त्यात त्यांनी आपल्यावर या परिषदेच्या कार्याची मोठीच जबाबदारी परिषदेच्या चालक मंडळीने टाकली असून त्यातून पार पाडण्यास आपण सर्वांनी साहाय्य

करावे असे निवेदन केले. तसेच आज येथे जमलेले हजारो कामगार बांधव आपली दु:खे वेशीवर टांगण्यासाठी इतक्या निर्भयपणे एकत्र जमलेले पाहून मला आनंद होत आहे. आपल्या सुख दु:खाचा विचार करून आपल्या असहाय अवस्थेतून आपणास कशारीतीने मार्ग काढता येईल यासंबंधी दुसरे दिवशी अध्यक्ष या नात्याने आपल्या भाषणात आपले विचार मांडण्याचे आश्वासन दिले. या परिषदेसाठी जी प्रमुख आमंत्रित मंडळी हजर राहिली होती त्यात श्री. देवराव नाईक, कमलाकांत चित्रे, द. वि. प्रधान, आर. डी. कवळी, भा. र. कद्रेकर, नागपूरचे मि. हरदास, एम. एल. ए., डॉ. एस. सी. जोशी, भाऊराव कृष्णराव गायकवाड, भंगी समाजाचे पुढारी श्री. रामा शिवा पाला, ठाण्याचे शिवराम गो. जाधव, विठ्ठलराव रणखांबे, गणपतराव निळे, युवक परिषदेचे स्वागताध्यक्ष, मुरलीधर पगारे, मनमाडचे माजी कौन्सिलर रामभाऊ जमधाडे, याशिवाय इतर प्रांतातील प्रमुख मंडळी हजर होती. आमदार मंडळींपैकी श्री. राजाराम भोळे, के. एस. सावंत, प्र. ज. रोहम, डी. जी. जाधव, वगैरे मंडळीही हजर होती.

रविवारी सकाळी विषयनियामक कमिटीचे कामकाज संपल्यावर परिषदेच्या दुसऱ्या दिवसाच्या कार्यक्रमास सुरवात झाली. आज परिषदेमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण होणार होते. परिषदेच्या कामाला थोडावेळ उशीराने सुरवात झाली होती. दलित कामगार नगरात ऊन पडू लागले होते तरी प्रचंड लोकसमुदाय डॉक्टर साहेबांचे भाषण ऐकण्यासाठी हजर होता. प्रथम काही मामुली कार्यक्रम झाल्यावर डॉ. आंबेडकरसाहेब टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उभे राहिले.'' [१]

ते आपल्या भाषणात म्हणाले,

'' मित्रांनो, जी. आय. पी. रेल्वेमध्ये काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांची ही परिषद आहे. यापूर्वी या प्रदेशात व इतर ठिकाणीही दलित वर्गाच्या अनेक परिषदा झालेल्या असून त्या विशिष्ट अर्थाने ही पहिली परिषद नव्हे. परंतु दुसऱ्या अर्थाने पाहिले तर अशा प्रकारची ही पहिलीच परिषद आहे. यापूर्वी दलित वर्गाने सामाजिक अन्यायाचे निवारण करण्यासाठी तत्त्वश: लढा दिलेला आहे. त्यांच्या आर्थिक तक्रारीसंबंधी दलित वर्ग प्रथमत:च या परिषदेच्याद्वारा एकत्र येत आहे. आजपर्यंत परियांची परिषद म्हणून ते एकत्र येत होते. परंतु आज तुम्ही कामगार या नात्याने एकत्र येत आहात. सामाजिक तक्रारी दूर करण्यावर आपण आजपर्यंत आपले प्रयास केन्द्रित केले यात आपली काही चूक झाली, असे मला म्हणावयाचे नाही. इतर लोक काहीही म्हणोत परंतु हे सामाजिक अन्याय

---

[१] जनता : ५ फेब्रुवारी १९३८.

आपली माणुसकी चुरगळून टाकणारे वरवंटे आहेत आणि आपल्या संघर्षाला कसलीच फळे आली नाहीत, असेही म्हणता येण्यासारखे नाही. आपण अस्पृश्यतेचा नायनाट करण्यात अजून यशस्वी होऊ शकलो नाही, हे खरे आहे. प्रत्येक मानवाला मिळालेच पाहिजेत अशा स्वरूपाचे काही अत्यंत मूलभूत स्वरूपाचे हक्क आपणाला अजूनही मिळाले नाहीत, हेही खरे आहे. परंतु राजकीय सत्ता मिळविण्यात आपण यश मिळविले आहे, हेही तितकेच खरे आहे. ज्यांच्याजवळ सत्ता असते त्यालाच स्वातंत्र्य असते, हा सिद्धान्त कोणीही नाकारू शकत नाही. स्वातंत्र्य मिळविण्याचे व सर्व अडचणीतून मुक्त होण्याचे एकमेव साधन सत्ता हेच असून धार्मिक व आर्थिक शक्ती इतकी नसली तरी राजकीय शक्तीही खरीखुरी शक्ती असून बरीच परिणामकारीही आहे. सांगण्यास दुःख वाटत आहे की दलित वर्गाला नवीन घटनेप्रमाणे जे राजकीय हक्क मिळालेले आहेत ते आपल्या शत्रुंनी आपल्या यंत्रणेद्वारे आणि आपल्यातील स्वार्थी, गरजू आणि दुराचारी लोकांच्या साहाय्याने कुचकामी करून टाकले आहेत. ज्या सत्तेमागे संघटनेची शक्ती नसते, ज्या सत्तेमागे सुजाणपणा नाही, ती सत्ताच नव्हे. एक दिवस–फार दुरच्या काळात नव्हे–दलित वर्ग संघटित होईल व त्यांना मिळालेल्या राजकीय सत्तेचे त्यांना महत्त्व कळून येईल आणि आपल्या सामाजिक मुक्तीसाठी त्याचा परिणामकारकपणे उपयोग करून घेतील, अशी मला आशा वाटते.

आपले प्रयत्न चुकीच्या दिशेने झाले असे जरी मला म्हणावयाचे नसले तरी आम्ही फारच लांब काळपर्यंत आपल्या सामाजिक समस्येइतक्याच तीव्र असलेल्या आर्थिक प्रश्नांकडे दुर्लक्ष केले असून आज आपण अस्पृश्य म्हणून नव्हे तर कामगार म्हणून एकत्र जमत आहोत याबद्दल मला आनंद होत आहे. हा नवीन मार्ग असून त्याची चर्चा करण्याची ज्यांनी ज्यांनी ही संधी उपलब्ध करून दिली त्यांचे मी अभिनंदन करतो. .

तथापि, असेही काही लोक आहेत की या आपल्या पावलाबद्दल अशुभ भावना बाळगून असून या परिषदेत भाग घेण्याबद्दल त्यांनी मला दोष दिलेला आहे. कामगार पुढाऱ्यांकडून ही टीका झाली नसती तर त्याची मी पर्वा केली नसती. ही दलित वर्ग कामगारांची वेगळी परिषद भरवून मी कामगारांमध्ये फूट पाडीत आहे, असे त्यांच्या तक्रारीचे सार दिसते. माझ्या मते या देशातील कामगारांना दोन शत्रूंशी तोंड द्यावे लागेल. हे दोन शत्रू म्हणजे ब्राह्मणशाही आणि भांडवलशाही हे होत. कामगारांना ज्यांच्याशी दोन हात करणे प्राप्त आहे अशा ब्राह्मणशाहीला शत्रू म्हणून ओळखण्यात अपयश आल्यामुळे ही टीका काही प्रमाणात उद्‌भवली आहे. ब्राह्मणशाहीशी शत्रुच्या नात्याने दोन हात करावे

लागतील, असे मी जे म्हणतो त्याचा चुकीचा अर्थ कोणी घेऊ नये, असे मला वाटते. ब्राह्मणशाही या शब्दाने ब्राह्मण जातीची सत्ता, हक्क व तिचे हितसंबंध मला सूचवायचे नाहीत. त्या अर्थाने हा शब्द मी वापरीत नाही. ब्राह्मणशाही या शब्दाचा स्वातंत्र्य, समता व बंधूभाव या तत्त्वांचा अभाव, असा अर्थ मला अभिप्रेत आहे. या अर्थाने त्याने सर्व बाबींमध्ये कहर माजविलेला असून ब्राह्मण तिचे जनक असले तरी आता हा अभाव केवळ ब्राह्मणांपुरताच मर्यादित राहिलेला नाही. या ब्राह्मणशाहीचा सर्वत्र संचार झालेला असून तिने सर्व वर्गाचे विचार व आचार नियंत्रित केले आहेत, ही निर्विवाद गोष्ट आहे. याशिवाय ही ब्राह्मणशाही काही विशिष्ट वर्गांना खास अधिकार देते ही सुद्धा दुमत न होणारी बाब आहे. ती काही इतर वर्गांना संधीची समानता सुद्धा नाकारते. ब्राह्मणशाहीचे दुष्परिणाम केवळ सहभोजन व आंतरजातीय विवाह या सारख्या सामाजिक हक्कापर्यंतच मर्यादित नाहीत.

जर इतकेच असते तर तिच्याकडे लक्ष देण्याची आवश्यकता नसती. परंतु केवळ इतकेच नाही. सामाजिक हक्कांपेक्षा वेगळया असलेल्या नागरी हक्कांपर्यंतही तिचा व्याप पसरलेला आहे. सार्वजनिक शाळांचा, सार्वजनिक विहिरी, सार्वजनिक वाहने, सार्वजनिक विश्रामस्थाने यांचा उपयोग करणे हे नागरी हक्कांचे विषय आहेत. सार्वजनिक फंडाद्वारे उभारण्यात आलेली किंवा सार्वजनिक फंडाद्वारे चालविण्यात आलेली प्रत्येक बाब प्रत्येक नागरिकाच्या उपयोगासाठी खुली असली पाहिजे. परंतु असे कोट्यावधी लोक आहेत की त्यांना हे नागरी हक्क नाकारण्यात आले आहेत. या देशात हजारो वर्षांपासून मोकाट सुटलेल्या व विजेच्या जिवंत प्रवाहाप्रमाणे अजूनही कार्यशील असलेल्या या ब्राह्मणशाहीचा हा परिणाम आहे. याबद्दल कोणाला शंका आहे काय ? ब्राह्मणशाही इतकी सर्वव्यापी आहे की आर्थिक संधीच्या प्रदेशावरही तिचा अंमल चालतो. दलितवर्ग कामगाराचे उदाहरण घ्या आणि इतर वर्गांच्या कामगारांबरोबर त्याची तुलना करून पाहा. रोजगार मिळविण्याच्या त्याला कोणत्या सुविधा उपलब्ध आहेत ? नोकरीची सुरक्षितता व तिच्यातील प्रगतीच्या दृष्टीने त्याचे भवितव्य काय आहे ? तो अस्पृश्य असण्यामुळे अनेक उद्योगांचे दरवाजे त्याच्यासाठी बंद आहेत, ही कुप्रसिद्ध गोष्ट आहे. या मुद्याशी संबंधित कापड कारखान्यात घडलेला प्रसंग कुप्रसिद्धच आहे. भारताच्या इतर भागात काय घडते, याची मला कल्पना नाही. परंतु मुंबई इलाख्यातील मुंबई व अहमदाबाद येथील कापड गिरण्यातील विणाई विभागाचे दरवाजे दलित वर्गासाठी बंद आहेत, एवढे मला निश्चितपणे माहीत आहे. ते फक्त सूतकताई विभागातच काम करू शकतात. या सूतकताई विभागात सर्वात कमी पगार

आहेत. त्यांना विणाई विभागातून वगळण्यात आले याचे कारण म्हणजे ते अस्पृश्य आहेत ! आणि इतर हिंदू कामगार मुसलमान कामगारांसोबत काम करण्यास तयार असले तरी अस्पृश्य कामगारांसोबत काम करण्यास तयार नाहीत!

रेल्वेचे उदाहरण घ्या. रेल्वेतील दलित वर्गाच्या कामगारांची स्थिती कशी आहे ? त्यांच्या नशिबात गँगमन म्हणूनच काम करणे आहे, हे कोणीही नाकबूल करू शकत नाही. दिवसेन्दिवस तो जन्मभर गँगमन म्हणून काम करीत राहातो आणि बढती होण्याची त्याला काही आशा नसते. त्याच्यासाठी वरच्या दर्जाची कोणतीच जागा खुली नाही. क्वचितप्रसंगीच त्याला पोर्टर नेमण्यात येते. त्याचे कारण असे की पोर्टर असल्यामुळे त्याला स्टेशनमास्तरच्या घरची घरकामेही आपल्या नोकरीचा एक भाग म्हणूनच करावयाची असतात. स्टेशनमास्तर हा बहुधा उच्च वर्गाचा हिंदू असतो व पोर्टर अस्पृश्य असल्यास या उच्चवर्णाच्या स्टेशनमास्तरच्या घरची घरेलू कामे करण्यास तो चालू शकत नसल्यामुळे दलित वर्गापैकी असलेला पोर्टर निरुपयोगी ठरतो, हे त्याचे कारण आहे. म्हणून हा स्टेशनमास्तर दलित वर्गातील माणसाला पोर्टर नेमण्याचे टाळतो. रेल्वेमध्ये कारकुनाची पात्रता ठरविणारी एखादी परीक्षा घेण्यात येत नसून मॅट्रिक परीक्षा पास नसलेलेच बहुधा या जागी नेमण्यात येतात. भारतातील ख्रिश्चन, अँग्लो-इंडियन आणि उच्च वर्णाच्या हिंदूंपैकी शेकडो नॉनमॅट्रिक कारकून रेल्वेमध्ये नेमण्यात आलेले आहेत. परंतु दलित वर्गापैकी शेकडो मुलांना या जागेसाठी पद्धतशीरपणे डावलण्यात आले असून कोणाला क्वचितच तशी संधी मिळते. अशीच स्थिती रेल्वे वर्कशॉपमध्येही आहे. मेकॅनिकच्या जागी दलित वर्गाच्या माणसाला क्वचितच नेमण्यात येते. मिस्त्रीची जागा दलित वर्गाच्या माणसाला देण्यात आली, असे उदाहरण मुश्किलीने आढळेल. त्याला वर्कशॉपमध्ये फोरमन किंवा चार्जमन क्वचितच करण्यात येते. तो फक्त हमाल आहे आणि हमालच राहतो. दलित वर्गाची रेल्वेतील अवस्था अशी आहे. ज्या उद्योगात त्याच्या पात्रतेनुसार काम मिळण्याची आशा असते तेथे त्याला खालच्या जागेवर नेमण्यात तर येतेच परंतु तो रिटायर होईपर्यंत त्याला तेथेच ठेवण्यात येते. त्याच्यासाठी उत्कर्ष नाही, त्याला प्रगतीची आशा नाही आणि बहुधा त्याच्यासाठी बढतीही नाही ! कामगारांची मागणी घटली नसली म्हणजे त्याच्याबाबतीत हे असे घडते, परंतु कामगारांची मागणी जर कमी झाली असेल तर सर्वप्रथम त्याला खडसावण्यात येते की नोकरी मिळण्यासाठी त्याचा आखरी क्रमांक आहे.

ज्या टीकाकारांनी तुमच्यावर व माझ्यावर दुष्ट हेतू असल्याबद्दल टीका केली त्यांना मी दोन अगदी साधे प्रश्न विचारू इच्छितो. हे आमचे गाऱ्हाणे खरे आहे की खोटे आहे ? दुसरा प्रश्न असा की, हे गाऱ्हाणे खरे असेल तर त्यापासून ज्यांना यातना भोगाव्या लागत आहेत त्यांनी त्यापासून मुक्त होण्यासाठी संघटित होऊ नये काय ? या दोन प्रश्नांचे उत्तर जर होकारार्थी असेल–कोणीही प्रामाणिक माणूस याला दुसरे उत्तर देऊ शकेल असे मला वाटत नाही–तर आमचा हा प्रयत्न पुरेसा न्याय्य आहे. आम्हाला दोष देणाऱ्या कामगार पुढाऱ्यांना एक विशिष्ट प्रकारचा भ्रम झालेला आहे. कार्ल मार्क्स वाचल्यामुळे त्यांना एवढेच माहीत आहे की समाजात फक्त कामगार आणि मालक असे दोनच वर्ग असतात. मार्क्स वाचून ते असे गृहीत धरतात की भारतात मालक आणि नोकर असे केवळ दोनच वर्ग आहेत आणि भांडवलशाही नष्ट करण्याची आपली मोहीम सुरू करतात. या दृष्टीत दोन ढोबळ चुका आहेत. जी बाब संभवनीय आहे किंवा आदर्श आहे तिला वास्तविक समजण्याची पहिली चूक ते करतात. कोणत्याही समाजात नोकर आणि मालक असे केवळ दोनच स्पष्ट वर्ग असतात, असे मार्क्सने कोठेही म्हटलेले नाही. सर्व समाजातील माणसे अर्थप्रवृत्तीचे किंवा बुद्धिवादी किंवा न्यायप्रिय असतात हे म्हणणे जसे खोटे आहे, तसेच सर्व समाजात केवळ दोनच वर्ग असतात, असे समजणेही खोटे आहे. मानवाची अर्थप्रवृती ही मूलभूत बाब समजून निष्कर्ष काढताना अर्थशास्त्रज्ञ नेहमीच एक शहाणपणाची सूचना देत असतात. ती ही की, जर इतर सर्व परिस्थिती समान राहिली तर माणसाची अर्थप्रवृत्ती स्पष्टपणे अस्तित्वात असते. कामगार पुढारी ही मूलभूत बाब विसरून गेले. मार्क्सने जे सांगितले ते युरोपच्या बाबतीत बरोबर होते, असे समजणेही चूक आहे, '' जर्मनीमध्ये गरीब व पिळवणूक झालेला माणूस आहे काय ? ते एकाच वंशाचे, एकाच देशातले, समान भूतकाळ व वर्तमानकाळ असलेले आहेत व त्यांचे भवितव्यही सारखेच राहाणार आहे. तर त्यांनी संघटित व्हावे ''. हा उपदेश मार्क्सच्या काळापासून भाषणातून देण्यात येत आहे. जर्मनीतील गरीब नाडलेला माणूस आणि फ्रान्समधील लुबाडलेला शेतकरी मग संघटित झाला काय ? १०० वर्षे लोटून गेली तरी ते संघटित होण्याचे शिकले नाहीत आणि मागील महायुद्धात ते उघडपणे परस्पराशी निर्दय शत्रुप्रमाणे लढले. भारताच्या बाबतीत तर हा विचार स्पष्टपणे चुकीचा आहे. भारतामध्ये असे सापेक्षपणे निश्चित असे दोन वर्ग अस्तित्वात नाहीत. सर्व कामगार एक असून त्यांचा एक वर्ग आहे, ही घोषणा आदर्शरूप असून ती प्रत्यक्षात उतरावयाची आहे म्हणून ती वस्तुस्थिती आहे असे समजून

चालणे, ही एक फार मोठी चूक आहे. कामगारांचे सैन्य अधिक मजबूत कसे करू शकू ? कामगारांमध्ये आपण ऐक्य कसे प्रस्थापित करणार आहोत ? कामगारांच्या एका गटाने दुसऱ्या गटावर अन्याय करून निश्चितच नव्हे, अन्याय झालेल्या गटाला संघटित होण्यास अडथळा करूनही नव्हे किंवा ज्यांच्यावर अन्याय झाला त्यांनी त्या अन्यायाविरुद्ध चळवळ उभारण्यास आडकाठी करूनही नव्हे! वंश आणि धर्मामुळे एक कामगार दुसऱ्याचा शत्रु बनत असल्यामुळे कामगारांच्या ऐक्यामध्ये आड येणारी ही कारणे नष्ट करणे हाच कामगार ऐक्याचा खरा मार्ग होय. एक कामगार दुसऱ्या कामगाराला हक्क देऊ शकत नाही, ते स्वतःसाठी मागण्याचा तुम्हाला अधिकार नाही, हे त्यांना सांगणे हाच खरा कामगारांच्या एकीचा उपाय होय. सामाजिक दृष्टीने उच्च, नीच भेदभाव मानणे व पाळणे हे तत्त्वतः चूक असून कामगारांच्या संघटनेला ते फार घातक आहे, हे कामगारांना सांगणे हाच कामगार ऐक्याचा खरा मार्ग होय. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे आपण ब्राह्मणशाही-असमानतेची कल्पना कामगारातून समूळ नष्ट केली पाहिजे. परंतु कामगारांमध्ये अशाप्रकारची स्फूर्ती निर्माण करणारे कामगार पुढारी कोठे आहेत ? भांडवलशाही विरूद्ध जोरजोराने भाषण देताना कामगार पुढाऱ्यांना मी ऐकले आहे. परंतु कामगारांमध्ये असलेल्या ब्राह्मणशाहीविरुद्ध बोलताना मी कोणत्याही कामगार पुढाऱ्याला ऐकलेले नाही. या उलट या मुद्यावरील त्यांचे मौन स्पष्टपणे दिसून येत आहे. ब्राह्मणशाहीवर श्रद्धा असल्यामुळे व कामगारांच्या ऐक्याशी त्यांचे काही कर्तव्य असो की नसो, ब्राह्मणशाहीचा कामगारांच्या बेकीशी काही संबंध आहे असे त्यांना वाटत नसल्यामुळे त्यांचे हे मौन असो की नसो किंवा केवळ कामगारांचे पुढारीपण मिरविण्याची हौस असल्यामुळे कामगारांच्या भावना दुखविल्या जाऊ नये म्हणून त्यांचे हे मौन असो की नसो, याची चौकशी करण्यासाठी मी खोळंबून राहात नाही. तथापि, मला हे सांगितलेच पाहिजे की ब्राह्मणशाही ही कामगारातील फुटीचे जर मूलभूत कारण असेल तर ती कामगारांमधून काढून टाकण्यासाठी जोरदार प्रयत्न झाला पाहिजे. हा साथीचा रोग केवळ दुर्लक्ष केल्यामुळे जाणार नाही किंवा त्याबद्दल मौन राहिल्यानेही जाणार नाही. त्याचा पाठपुरावा केला पाहिजे व त्याची मुळे खोदून काढली पाहिजेत. तरच कामगारांच्या ऐक्याचा मार्ग मोकळा होईल.

जोपर्यंत ब्राह्मणशाही ही एक प्रचलित जिवंत शक्ती आहे आणि जोपर्यंत लोक तिला आपापल्या अधिकाराच्या स्वार्थामुळे चिकटून आहेत व इतरांवर बंधने लादत आहेत तोपर्यंत यापासून ज्यांना यातना होतात त्यांना याविरुद्ध संघटित होणे भाग

आहे, अशी मला भीती वाटते आणि ते जर अशाप्रकारे संघटित झाले तर त्याने काय नुकसान होणार आहे ? या संघटनेवर जर मालक लोकांचे नियंत्रण असते तर या संघटनेविरुद्धच्या कांगाव्याला काही अर्थ आहे, असे मला वाटू शकले असते. आम्ही मालक लोकांच्या हातातील बाहुले आहोत किंवा आम्ही त्यांच्या कलाने वागत आहोत किंवा कामगारात फूट पाडण्यासाठी आम्ही मुद्दाम हे संघटन उभारीत आहोत, असे जर सिद्ध करण्यात आले असते तर या परिषदेची निंदा बरीचशी न्याय्य ठरली असती. निश्चितच, अशाप्रकारचे वर्तन म्हणजे विश्वासघातच ठरला असता. परंतु आमच्या या चळवळीवर मालक लोकांचे नियंत्रण असून ती मालकांना मदत करण्यासाठी आहे किंवा कामगारांच्या हिताचा नाश करण्यासाठी ती आहे, असे कोणीतरी म्हणू शकेल काय ? आमच्या कोणत्याही टीकाकाराला हे सिद्ध करण्याचे मी आव्हान देत आहे.

त्यामुळे ही परिषद भरविल्याबद्दल खजील होण्याचे किंवा कोणाची माफी मागण्याचे काही कारण नाही. आपला हेतू व त्यामागील कारणे पुरेशी न्याय्य आहेत. ही परिषद ज्यांना पसंत नाही अशा दलित वर्गापैकीही एक-दोन व्यक्ती आहेत. परंतु त्यात नवीन असे काहीही नाही. त्यांच्यापैकी काही दुसऱ्याच्या हातातील बाहुले असून पैसे चारून विरोधासाठी मुद्दाम तयार केलेले आहेत. तर काहींना पथभ्रष्ट करण्यात आले आहे. दलित वर्ग हा स्वतः इतका दुर्बल आहे आणि कामगारांचे ऐक्य हा शब्दच इतका आकर्षक आहे की आणि त्यातही एखाद्या प्रभावकारी प्रचारकाच्या तोंडून तो ऐकण्यात आल्यामुळे आपल्या लोकांना त्याची भुरळ पडल्यास नवल नाही. परंतु असे लोक हे विसरतात की ज्या गटांमध्ये इतक्या परस्परविरोधी भावना व वृत्ती प्रत्येक बाबतीत आहेत आणि त्यातील एक गट दुसऱ्याच्या हिताविरोधी होईल अशा हक्कांचा व अधिकारांचा स्वतःसाठी जेथे दावा करीत आहेत तेथे कामगारांचे खरेखुरे ऐक्य राहूच शकत नाही. यातील ऐक्य म्हणजे दुर्बल व पिळलेल्या लोकांना फसविण्यासाठी केलेले केवळ एक ढोंग-देखावा आहे. त्यांची या भोंदू लोकांकडून फूटपाड्या म्हणून निंदा करण्यात येते. फूट, खरेच ! ती फूट असेलही, परंतु ती अशी फूट आहे की जेथे खराखुरा विरोध व मतभेद अस्तित्वात आहे ! हा विरोध निर्माण होण्याचे साधे कारण असे की कामगारांचा एक गट दुसऱ्या कामगारांच्या म्हणजे दलितवर्ग कामगारांच्या विरोधात आपणाला खास हक्क आहेत, असा दावा करतो. कोणालाही केवळ मतभेदासाठी मतभेद निर्माण करण्याची खुशी नसते. आम्ही केवळ आधीच असलेली फूट नजरेस आणून देण्याचा प्रयत्न करीत असून आमच्यावर सुरू असलेल्या अन्यायाला आळा घालून या फुटीला पायबंध घालण्याचा आमचा प्रयत्न आहे.

जर तुम्हाला तुमच्यावरील अन्यायांचे परिमार्जन करावयाचे असेल तर त्यासाठी तुम्ही संघटन उभारू नये हा प्रश्नच उद्‌भवत नाही. पुढील प्रश्न असा की तुमच्या संघटनेला कोणते ध्येय साध्य करून घ्यावयाचे आहे ? तुमच्या उद्योगविषयक हेतूसाठी तुम्ही संघटन उभारले पाहिजे हे न सांगताही कळण्यासारखे आहे. परंतु प्रश्न असा की या हेतुसाठी तुम्ही वेगळे संघटन उभारावे की आधीच अस्तित्वात असलेल्या एखाद्या संघटनेत सहभागी व्हावे ? कार्यवाहीला प्रत्यक्ष सुरवात करण्यापूर्वीच तुम्ही या प्रश्नाचा गंभीरपणे विचार करावयास हवा.

भारतातील कामगार संघटनं हा एक खेदाचा विषय आहे. कामगार संघटनेचा मुख्य उद्देश पूर्णतः दृष्टिआड झालेला आहे. कामगार वर्गाच्या जीवनस्तराचे कमी होण्यापासून संरक्षण करणे हा कामगार संघटनांचा मुख्य उद्देश आहे. जन्मापासून व प्रशिक्षणामुळे जाणीव झाल्यामुळे युरोपातील प्रत्येक माणूस आपला जीवनस्तर समाधानकारकपणे योग्य स्थितीत ठेवण्याचा सतत प्रयत्न करीत असलेला दिसतो. तो कमी करण्याचा कितीही भयानक प्रयत्न झाला तरी त्याला तो प्रतिकार करतो. भारतीय कामगारात हा दृढनिश्चय आढळून येत नाही, ही एक सुप्रसिद्ध बाब आहे. केवळ जिवंत राहण्यासाठीच तो धडपडत असतो आणि मिलने दर्शविल्याप्रमाणे '' जेथे कोठे या निकृष्टतेकडे नेण्याच्या प्रयत्नांना निग्रही प्रतिकार करण्याची व समाधानकारक जीवनस्तर सांभाळण्याची लोकांची वृत्ती नाही तेथे मोठमोठ्या प्रगतीकारक राष्ट्रातही गरीब लोकांची अवस्था केवळ जीव धारण करण्याच्या स्थितीपर्यंत पोहोचते ''. माझ्या मते, जर कामगार संघटनांची नितांत आवश्यकता असणारा कोणता एखादा देश असेल तर तो भारत हाच होय. परंतु मी म्हटल्याप्रमाणे, भारतातील आजचे कामगार संघटन हे एक दुर्गंधीयुक्त सांडपाण्याचे डबके झालेले आहे. याचे प्रमुख कारण म्हणजे कामगारांचे नेतृत्व एक तर भित्रे, स्वार्थी किंवा पथभ्रष्ट आहे. त्यात काही असेही नेते आहेत की जे केवळ आरामखुर्चीवरचे तत्त्वज्ञानी आहेत किंवा केवळ वर्तमानपत्रात आपले वक्तव्य प्रसिद्ध करण्यातच खूष असणारे राजकारणी आहेत. कामगारांना संघटित करणे, त्यांना शिक्षित करणे आणि संघर्षांमध्ये त्यांना मदत करणे हा त्यांच्या कर्तव्याचा भागच नाही. ते केवळ कामगारांचे प्रतिनिधीत्व करण्यासाठी व त्यांच्यावतीने बोलण्यासाठी चिंतातूर तर आहेत, परंतु कामगारांशी प्रत्यक्ष संपर्क ठेवण्याचे मात्र ते टाळतात. कामगार नेत्यांचा दुसरा प्रकार असा की, ते केवळ स्वतःला सेक्रेटरी, अध्यक्ष किंवा असेच एखादे पद मिळविण्याच्या हेतुने कामगारांच्या संस्था उभारण्यात दंग राहातात. त्यांची ही पदे सांभाळण्यासाठी ते आपल्या संस्था नेहमी वेगळ्या व परस्परविरोधी ठेवण्याचा प्रयत्न करतात. कधी कधी तर असेही लज्जास्पद

व थक्क करून सोडणारे प्रसंग पाहण्यास मिळतात की, या विभिन्न संस्थातील लढाई, कामगार आणि मालक जर तसे असेल तर यांच्यातील लढाईपेक्षा फारच दुर्धर असते आणि हे सर्व कशासाठी, तर काही लोकांना कामगारांचा पुढारी म्हणून मिरवून घेण्याची व त्यावर सत्ता गाजविण्याची केवळ हौस असते एवढ्याचसाठी! तिसऱ्या प्रकारचे नेतृत्त्व कम्युनिझमच्या तत्त्वावर विश्वास असणाऱ्यांचे आहे. त्यांचा हेतू कदाचित चांगलाही असेल परंतु ते भलत्याच मार्गाला लागलेले आहेत आणि त्यांच्यापेक्षा कामगारांचा अधिक नाश दुसऱ्या कोणीही केला नाही, असे म्हणण्यास मी मुळीच कचरणार नाही. आज जर कोणत्या कारणाने कामगार संघटनेच्या पाठीचा कणा पूर्णतः तुटला असेल, जर आज मालक कोणत्या कारणाने वरचढ झाले असतील, जर आज कामगार संघटन ही एक शापित वास्तू होऊन बसली असेल तर त्याचे एकमेव कारण म्हणजे एकेकाळी कामगार संघटनेवर कम्युनिस्टांचा पूर्णतः कब्जा झाला होता व याचा त्यांनी दुरुपयोग करून घेतला हेच होय. कामगारांमध्ये कोणत्याच प्रकारचे असमाधान नाही, असे समजून त्यांच्यामध्ये असंतोष निर्माण करणे, हे त्यांचे ध्येय असावे, असे दिसते. कारण असंतुष्ट कामगार वर्गाच्या संघटनेद्वारे क्रांती घडवून आणता येईल व कामगारांचे राज्य स्थापन करता येईल, असा त्यांना विश्वास वाटतो. म्हणून कामगारात असंतोष निर्माण करण्याची व त्याद्वारे कामगारात संघटन बांधण्याची त्यांनी मोहीम उघडली आहे. क्रांती यशस्वी होण्यासाठी केवळ असंतोष पुरेसा नसतो. त्यासाठी कशाची आवश्यकता असेल तर न्याय्यतेची, गरजेची आणि सामाजिक व राजकीय हक्कांची गंभीर व परिपूर्ण जाणीवेची. क्रांतिकारक मार्क्सिस्टही जितकी रानटीपूजा संपाची करीत नाहीत इतकी रानटीपूजा सिंडिक्यॉलिस्ट (केवळ कार्यकारी मंडळ असलेले) कम्युनिस्टांनी मागील काळात केलेली आहे. क्रांतिवादी मार्क्सिस्टांनी संपांना कधीही ' क्रांतीचा पहिला पाठ ' मानलेला नसून सर्व उपाय थकल्यानंतर वापरावयाचे एक गंभीर व अंतिम साधन म्हणूनच मानले आहे. परंतु कम्युनिस्टांनी हे सर्व वाऱ्यावर भिरकावून देऊन कामगारांमध्ये असंतोष निर्माण करण्याचे एक दैवी साधन या दृष्टीने संपाकडे पाहिले. त्यांनी अधिक जास्त असंतोष निर्माण केला असो की नसो परंतु त्यांच्या शक्तीचा व सत्तेचा मुख्य स्त्रोत असलेल्या कामगार संघटनेचा मात्र निश्चितच सर्वनाश केला आणि सध्या ते भांडवलशाही संघटनांचा आश्रय शोधण्याच्या मार्गास लागलेले आहेत. अशाप्रकारच्या निरर्थक चळवळीपासून यापेक्षा अधिक काय अपेक्षा करता येण्यासारखी आहे. आगीचा भडका उडवून देण्याच्या प्रयत्नात आपल्या स्वतःच्या घराचीही काळजी न घेणाऱ्या आगलाव्यासारखाच कम्युनिस्ट माणूस सिद्ध झालेला आहे.

याचा परिणाम असा झाला की कामगारांनी जिच्यावर विसंबून राहावे अशी एकही संघटना अस्तित्वात राहिली नाही. मुंबईच्या कापड गिरण्यात जी अस्वस्थता पसरली आहे तिच्याबद्दल मी बोलत नाही. त्यासंबंधी जितके कमी बोलले जाईल तितके बरे. परंतु जी. आय. पी. रेल्वे कामगारांचे संघटन १९२० साली उभारण्यात आले. ते १९२२ ते १९२४ पर्यंत मृतप्रायच होते. त्याचे पुनरूज्जीवन १९२५ साली करण्यात आले. १९२७ मध्ये दुसरे एक संघटन ' जी. आय. पी. रेल्वेमेन्स युनिंयन ' या नावाने काढण्यात आले. १९३१ साली या दोन्ही संघटनांमध्ये ऐक्य करून ' रेल्वे वर्कर्स युनियन ' ही संस्था काढण्यात आली. १९३२ मध्ये या संस्थेत पुन्हा फूट पडली आणि ' रेल्वे लेबर युनियन ' या नावाने दुसरी एक संस्था काढण्यात आली. १९३५ मध्ये जुन्या ' जी. आय. पी. स्टॉफ युनियन ' चे पुनरुज्जीवन करण्यात आले आणि नवीन संस्था म्हणून सुरू करण्यात आली. ती आता मान्यता पावलेली संस्था असून रेल्वे कामगारांच्या हितासाठी जपणाऱ्या या संघटनांमध्ये जोरदार विरोध व शत्रुत्त्व आहे. कम्युनिस्ट पुढारी व कम्युनिस्ट नसलेल्या रेल्वे कामगार पुढाऱ्यांमध्ये नेतेपदासाठी चाललेल्या चढाओढीचा हा सारा परिणाम आहे. अशाच शत्रुत्त्वामुळे केन्द्रीय संघटनेमध्येही फूट पडलेली आहे ' ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस ' ही कामगारांची केन्द्रीय संघटना १९१९ साली स्थापन करण्यात आली. कामगारांच्या सर्व संघटना या कॉंग्रेसला १९२९ पर्यंत जोडून देण्यात आल्या होत्या. १९२९ साली नागपूरला फूट पडली आणि कम्युनिस्ट पुढाऱ्यांचे नेतृत्त्व नाकारणारे फूटून बाहेर पडले व त्यांनी ' नॅशनल ट्रेड युनियन फेडरेशन ' या नावाची नवीन संस्था स्थापन केली. या दोन संस्थांमध्ये तीव्र स्वरूपाचा शत्रुभाव कार्यरत आहे. १९३१ व १९३२ साली या दोन विरोधी संस्थांमध्ये एकी घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यात आला. परंतु तो अयशस्वी झाला. त्याबाबत आताही प्रयत्न होत आहेत. त्यातून काय निष्पन्न होणार आहे कोणास ठाऊक. अशा परिस्थितीत तुम्हाला काही उपदेश करणे माझ्यासाठी मोठे कठीण काम आहे. जर तुमच्याजवळ अशी संस्था सांभाळण्यासाठी माणसे असतील तर तुम्ही तुमचे स्वतःचे वेगळे संघटन उभारले असते तरीसुद्धा त्यात काहीही वाईट झाले नसते. अर्थात ही एक मोठी अट आहे. एखाद्या संघटनेची भरभराट व्हावयाची असल्यास तिने कार्य केले पाहिजे आणि कोणतीही संघटना जर समर्थ व्यक्तींची सेवा उपलब्ध करून देण्यास अपयशी ठरली तर ती कार्य करू शकत नाही. तुमचे संघटन चालविण्यासाठी अशी माणसे तुम्ही मिळवू शकाल काय ? जर तुम्हाला हे शक्य असेल तर तुम्ही स्वतःचे संघटन तयार करा. वस्तुतः तुम्ही जर असे केले तर अधिक चांगले होईल. कारण विभिन्न संघटनांचा परिणाम विभक्ततेच्या भावनेत किंवा दुर्बलतेत होतोच असे

नाही. ही तुमची संघटना एखाद्या कामगारांच्या समान उद्देशांच्या व समान कार्याच्या केन्द्रीय संघटनेशी तुम्ही जोडूनही देऊ शकता. जर तुमची स्वतंत्र संघटना तुम्ही उभारू शकत नसाल तर सध्या अस्तित्वात असलेल्या एखाद्या संघटनेत तुम्ही सहभागी होऊ शकाल. परंतु अशी संघटना आपल्या स्वतःच्या कार्यासाठी तुमचा दुरुपयोग करून घेणार नाही, याची काळजी घ्या. असे घडण्याचा धोका फारच मोठ्या प्रमाणात आहे. मुंबईच्या कापड गिरण्यात असेच घडले होते. तेथे विणकरांच्या हितासाठी लागोपाठ संप पुकारण्यात येत असे आणि त्या संपाला कताईवाले पाठिंबा देत राहिले. हे टाळण्यासाठी तुम्ही दोन शर्तींसाठी आग्रह धरला पाहिजे. प्रथमतः तुम्ही कार्यकारी मंडळामध्ये खास प्रतिनिधित्वाचा आग्रह धरावा. म्हणजे तुमच्या संबंधित खास प्रश्नांकडे संघटनेचे लक्ष तुम्हाला वेधून घेता येईल व पाठिंबाही मिळेल. दुसरी अट अशी की तुमच्या वर्गणीपैकी काही भाग आवश्यकता पडल्यास केवळ तुमच्या तक्रारी निवारण करण्यासाठी राखीव ठेवण्यात यावा, असा आग्रह तुम्ही धरला पाहिजे. जर तुम्ही तुमची स्वतःची संघटना उभारण्याचा निर्णय घेतला नाही व दुसऱ्या एखाद्या संघटनेत सामील होण्याचे ठरविले तर या दोन अटी तुम्ही मान्य करून घेतल्या पाहिजेत.

कामगारांच्या हितासाठी तुम्ही संघटन उभारले पाहिजे यात काही किन्तु नाही. परंतु तेवढेच पुरेसे नाही. तुम्ही राजकीय उद्दिष्टांसाठीही संघटित झाले पाहिजे. केवळ कामगार संघटनेच्या बळावर मालकांच्या विरोधात कामगार विजयी होऊ शकत नाहीत, हे अनुभवाने सिद्ध झालेले आहे. कामगार संघटनांनी राजकारणात शिरावे की शिरू नये याबद्दल आज दुमत असू शकत नाही. कामगार संघटनांनी राजकारणात शिरलेच पाहिजे कारण शासन सत्तेवाचून कामगारांच्या हितांचे रक्षण करणे अशक्य आहे. इतकेच नव्हे तर कमीतकमी मजुरीचे दर, कामाच्या वेळा, अन्य नियम इत्यादी सामान्य स्वरूपाच्या सुधारणा केवळ संघटनेच्याद्वारे घडवून आणणे अशक्य आहे. संघटनेच्या शक्तीला कायद्याच्या शक्तीची जोड मिळावयास हवी. तुमची संघटना उभारण्याच्या जोडीलाच तुम्ही देशाच्या राजकारणात भाग घेतल्याशिवाय हे घडू शकत नाही.

केवळ कामगार संघटनेच्या उद्दिष्टांचे रक्षण करणे हा एकच राजकारणामध्ये शिरण्याचा हेतू नसावा. तुम्ही आपला हेतू केवळ कामगार संघटनेच्या उद्दिष्टांपुरताच मर्यादित ठेवणे म्हणजे प्राप्त कर्तव्यालाच ध्येय समजण्यासारखे आहे. गुलामगिरी हा नशिबाचा खेळ असून कामगार वर्ग त्यातून सुटू शकत नाही, हे गृहीत धरून चालण्यासारखेच हे आहे. याउलट ही मजूरपद्धती बदलून

तिच्या जागी स्वातंत्र्य, समता व बंधूभाव या तत्त्वांवर आधारलेली नवी पद्धती स्थापन करणे हे तुमचे ध्येय असले पाहिजे. याचा अर्थ, समाजाची पुनर्रचना आणि अशाप्रकारची पुनर्रचना समाजात घडवून आणणे हे कामगार वर्गाचे प्राथमिक स्वरूपाचे कर्तव्य आहे. परंतु कामगार वर्ग हे ध्येय कसे साध्य करू शकेल ? राजकीय शक्तीचा परिणामकारक उपयोग झाल्यास याबाबतीत ते निश्चितच एक शक्तीशाली साधन ठरते. मग त्यांनी राजकीय शक्ती साध्य केली पाहिजे. कामगार संघटनेने राजकारणापासून अलिप्त राहणे याचा अर्थ कामगारांनी व्यक्तिशः राजकारणात भाग घेऊ नये, असा नव्हे. याउलट त्यांच्यापैकी अनेक राजकीय सभांना हजर राहतील, एखाद्या उमेदवाराच्या बाजूने मतदान करतील. कोणी नेहमी एखाद्या राजकीय पक्षात सहभागी राहील. कामगार संघटनांना ' राजकारण नको ' याचा अर्थ त्या संघटनेच्या कामगार सदस्यांना राजकारण नको असा नाही. ' राजकारण नको ' ही धोक्याची सूचना फक्त पक्षबद्ध राजकारणासाठी आहे. अशा स्थितीत प्रत्येक व्यक्ती आपल्या इच्छेनुसार आवडीप्रमाणे स्वतंत्ररीत्या राजकारणात भाग घेऊ शकते. जर त्याच्या कामगार बांधवांच्या सहकार्याने त्यांचे स्वतःचे संघटन उभारण्यात आले असेल तर त्याच क्षणी त्याला राजकारणातून बाहेर पडावे लागेल. अशाप्रकारे स्वतःच्या वर्गाच्या उद्दिष्टांसाठी त्याच्या व्यक्तिगत शक्तीला नियंत्रित करून राजकारणातून बाहेर पडावे लागेल. यामुळे ही कामगारांची संघटना निश्चितपणे भांडवलशाहीवादी राजकीय पक्षाचे कुरण ठरल्यावाचून राहणार नाही. तुम्हाला बहुतकरून माहीत असेलच की, कामगारांच्या नावाने बोलण्याचा अधिकार सांगणाऱ्या ट्रेड युनियन काँग्रेस आणि ट्रेड युनियन फेडरेशन या दोन्ही संघटना आता एका संघटनेत विलीन होण्याच्या मार्गावर आहेत. प्रत्येकीने आपल्या अर्ध्या धोरणाचा त्याग करून ऐक्य घडविण्याचे ठरविले आहे. ट्रेड युनियन काँग्रेसने, ट्रेड युनियन फेडरेशनची घटना स्वीकारली असून ट्रेड युनियन फेडरेशनने आपल्या नावाचा त्याग करण्याचे ठरविले आहे. मला असे कळले की, या ऐक्यामधील एक अट ही संघटना विशुद्धपणे कामगार संघटनेच्या स्वरूपाची असावी, अशी आहे. तिला राजकारणाशी कर्तव्य राहाणार नाही. जेव्हा मी हे ऐकले तेव्हा या सद्गृहस्थांना त्यांच्या म्हणण्याचा अर्थ खरोखर समजला की नाही याबद्दल मला नवल वाटले. स्वतःच्या हातातील राजकीय शक्तीचा उपयोग आपल्यावरील अन्यायाच्या निवारणासाठी वापरण्यावर बंधने घालण्याचा हा साधा प्रकार असून हा मोठा खेदजनक प्रकार आहे. जर या एकत्रित झालेल्या कामगार संघटनेला आपली एकत्रित राजकीय शक्ती वापरावयाची नाही तर ती कशासाठी एकत्रित आली, हेच मला कळत नाही. क्षुल्लक स्वरूपाचे मतभेद असले आणि ते जर दुसऱ्या

एखाद्या मोठ्या उद्देशासाठी मिटविले तर ' तडजोड ' या शब्दाला काही अर्थ प्राप्त होतो. परंतु जर एखाद्या मोठ्या प्रश्नाबद्दल लोकांमध्ये मतभेद असले तर त्यांचा त्याग करून केवळ क्षुल्लक बाबींच्या स्वीकारासाठी एक होण्यात ' ऐक्य ' या शब्दाला काही अर्थच उरत नाही. इतरांचा याबाबत कोणताही दृष्टिकोन असो परंतु मी असेच म्हणेन की कामगारांनी राजकारणापासून अलिप्त राहाण्याची जर संघटितपणे शपथ घेतली तर त्यांना तो एक अभिशापच ठरेल.

आपण मात्र यापुढे आपले प्रयत्न सामाजिक सुधारणेच्या एकाच दिशेने ठेवणे आवश्यक आहे, हे ओळखले पाहिजे आणि आजपर्यंत आपण आर्थिक सुधारणेसाठी प्रयत्न केला पाहिजे हे विसरून गेलो होतो किंवा फारच अल्प प्रयत्न केले. आपणाला जे अन्याय सहन करावे लागतात त्याचे मूळ एकच आहे व ते म्हणजे ज्यांच्या हातात सामाजिक व आर्थिक शक्ती आहे त्यांनी कामगारांचे राजकीय हक्कही हिरावून घेतलेले आहेत हेच होय.

राजकारणात शिरणे याचा अर्थ आपला पक्ष स्थापन करणे असा होतो. पक्षाचा पाठिंबा नसलेले राजकारण ही एक कल्पनेतील वस्तू होय. स्वतंत्रपणे राजकारण चालविण्याचा व आपली पोळी आपणच पकविण्याचा प्रयत्न करणारे अनेक राजकारणी पुरुष आहेत. जो राजकारणी असा स्वतंत्र राहाण्याचा प्रयत्न करतो त्याच्याबद्दल मी नेहमीच सतर्क असतो. जर एखादा राजकारणी माणूस कोणातही सहभागी न होण्याइतका स्वतंत्र असेल तर कोणत्याही राजकीय उद्दिष्टासाठी तो निरर्थक आहे. तो काहीच साध्य करू शकत नाही. त्याच्या एकाकी प्रयत्नाने गवताचेही पीक तो काढू शकत नाही. परंतु स्वतंत्रतेची हाव धरणारे राजकारणी पुरुष त्यांच्या बौद्धिक प्रामाणिकतेमुळे स्वतंत्र राहात नाहीत, तर जास्तीत जास्त मागण्या मागण्यासाठी ते तसे स्वतंत्रपणे राहातात. यामुळेच त्यांना पक्षशिस्तीच्या जाळ्यातून मुक्त राहावयाचे असते. ते काहीही असो, परंतु राजकारणात स्वतंत्र राहणाऱ्या अनेक राजकीय मुत्सद्यांबद्दलचा माझा अनुभव तरी असाच आहे. पक्षाशिवाय खरेखुरे आणि परिणामकारी राजकारण असूच शकत नाही.

प्रश्न असा की कोणत्या पक्षात तुम्ही सामील व्हावे ? अनेक पर्यायी पक्ष आहेत. काँग्रेस पक्ष आहे. काँग्रेसमध्ये तुम्ही सामील व्हावे काय ? कामगारांच्या उद्दिष्टांना ती मदत करील काय ? काँग्रेसपासून स्वतंत्र असा स्वतःचा वेगळा राजकीय पक्ष कामगारांनी स्थापन करावा, असा सल्ला देण्यास मला मुळीच हरकत वाटत नाही. या माझ्या मताला कामगार पुढाऱ्यांचा विरोध आहे, हे मला माहीत आहे. काँग्रेस सोशिऑलिस्टांचे

प्रतिनिधित्व करणारा एक गट असून समाजवादाच्या पूर्तीसाठी त्यांना कामगार संघटन हवे आहे परंतु ही संघटना काँग्रेसच्या अंतर्गतच राहिली पाहिजे, असे त्यांना वाटते. श्री. रॉय यांच्या नेतृत्वाखाली कार्यरत असलेला व स्वतःला कम्युनिस्ट म्हणवून घेणारा एक गट आहे. त्यांचा कामगारांच्या दुसऱ्या कोणत्याही संघटनेला जोरदार विरोध आहे, मग ती संघटना काँग्रेसच्या अंतर्गत असो की बाह्यगत असो. या दोन्ही गटांशी मी पूर्णतः असहमत आहे. श्री. रॉय हे मला जसे एक कोडे वाटते तसे पुष्कळांना वाटत असले पाहिजे. एक कम्युनिस्ट आणि स्वतंत्र कामगार संघटनेला विरोधी ! भयानकपणे विरोधी शब्द आहेत हे ! हा असा दृष्टिकोन आहे की, आपल्या थडग्यामध्ये लेनिननेही तडफडाट करावा. या विलक्षण दृष्टिकोनाचे स्पष्टीकरण एकच होऊ शकते. ते हे की, भारतीय राजकारणाचे सर्वात महत्त्वाचे ध्येय साम्राज्यशाहीचा नाश करणे हे आहे, असे रॉय यांना वाटत असले पाहिजे. श्री. रॉय यांनी जे मत स्वीकारले आहे त्याचा दुसरा कोणताही अर्थ निघत नाही. जर साम्राज्यशाही नष्ट झाल्याबरोबर भारतातील सर्व भांडवलदारांचे हितसंबंध नष्ट होणार असतील तरच हे मत बरोबर ठरू शकेल. परंतु इंग्रज या देशातून निघून गेले तरी या देशात जमीनदार, मिल मालक व सावकार कायम राहून लोकांची पिळवणूक चालूच राहाणार आहे आणि साम्राज्यशाही नष्ट झाल्यावरही आजच्याप्रमाणेच कामगारांना या भांडवलदारांशी संघर्ष करावा लागणारच आहे, हे समजण्यास फार मोठ्या बौद्धिक चातुर्याची गरज आहे, असे नाही. असे असल्यामुळे कामगारांनी आतापासूनच संघटित का होऊ नये ? संघटनेची वाढ करण्यामध्ये त्यांनी खोळंबून का राहावे ? मला तर याचे कोणतेच उत्तर दिसत नाही. काँग्रेस समाजवाद्यांना हे पूर्णपणे माहीत आहे की, कामगारांना साम्राज्यशाहीप्रमाणेच भांडवलशाहीशीही संघर्ष करावा लागणार आहे व म्हणून कामगारांनी संघटित झाले पाहिजे, हे त्यांना मान्य आहे. परंतु त्यांची अशी अट आहे की, कोणतीही कामगार संघटना काँग्रेसच्या अंतर्गतच असली पाहिजे. काँग्रेस आणि कामगार यांच्या या जबरदस्तीच्या समझोत्याची आवश्यकता किंवा मूल्य मला तरी काहीच दिसत नाही. काँग्रेस सोशिऑलिस्ट लोकांच्या म्हणण्याप्रमाणे देशात समाजवाद आणणे हे त्यांचे ध्येय आहे. ते समाजवाद कसा आणणार आहेत ? काँग्रेसचा उजवा हात होऊन ! काँग्रेसच्या बाहेर न पडण्याचे ते हे कारण देतात. त्यांचे मानवी स्वभावाविषयीचे ज्ञान ही इतकी कीव करण्यासारखी बाब आहे की त्याची कल्पनाही करणे कठीण आहे. जर त्यांचे उद्दिष्ट समाजवाद आणणे हे असेल तर त्याचा उपदेश लोकांना करून अपेक्षित कार्यासाठी त्यांना संघटित करणे गरजेचे आहे. उच्च वर्णियांची मनधरणी करून समाजवाद येणार नाही. काँग्रेसची उजवी बाजू समजणाऱ्या लोकांना समाजवादाची लहानशी मात्राही सहन होऊ

शकत नाही, ही वस्तुस्थिती असून दिवसेंदिवस ती अधिकाधिक स्पष्ट होत आहे. पंडित नेहरूंनी मागीलवर्षी समाजवादाचे वादळी आंदोलन उभारले होते. परंतु या गरीब बिचाऱ्या इसमाला लवकरच ताळ्यावर आणण्यात येऊन एखाद्या उनाड मुलाला लड्डूपेढ्यावर ताव मारण्यास घरी परत पाठवावे त्याप्रमाणे केवळ यापुढे चांगले वागण्याच्या करारा़वर घरात घेण्यात आले. आता हा पंडित पूर्णपणे पालटलेला असून आता इतका गरीब झाला आहे की, त्याने एकदा घुमविलेल्या व सध्या काँग्रेसचा उजवा हात म्हणून शापित असलेल्या लाल निशानालाही तो विरोध करतो. बिहारमधील या उजव्या बाजूने आपले खरे दात दाखविले आहेत. किसान पुढारी स्वामी सहजानंदानी काँग्रेस सोडलेली असून त्याचा सहकारी जयप्रकाश नारायण हाही तिचा त्याग करण्याच्या मार्गावर आहे. मला असे कळले की, ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या मुंबई येथील सभेत काँग्रेसच्या या उजव्या बाजूकडील लोकांनी सोशिऑलिस्टांच्या गैरशिस्त वर्तनाबद्दल निंदा केली आणि काँग्रेसच्या व्यासपीठावरून समाजवादाचा प्रचार करण्याचा आरोप लादून इंडियन पिनल कोडप्रमाणे प्रथम गुन्हा करणाऱ्याला जशी ताकीद देण्यात येते त्याप्रमाणे ताकीद देण्यात आली. काँग्रेसमधील समाजवाद्यांची अशी पोकळ दशा आहे.

साम्राज्यवादाच्या प्रतिक्रियेमुळे भारतीय राजकारण झाकाळून गेले आहे. कामगारांना त्यांच्या खऱ्या शत्रूंचा म्हणजे अधिकार बळकावून बसणाऱ्यांचा विसर पाडण्यात आला. रॉयवादी व काँग्रेसवादी हे दोन्ही प्रकारचे समाजवादी लोक विचारातील गोंधळामुळे दलदलीत रुतून बसलेले आहेत. एक सामान्य शत्रू म्हणून या साम्राज्यशाहीविरूद्ध संघर्ष करावयाचा असेल तरी सर्व वर्गांनी आपापल्या वर्गाच्या हिताकडे दुर्लक्ष केले पाहिजे व एका संघटनेत विलीन झाले पाहिजे, असा त्याचा अर्थ होत नाही. वेगवेगळया वर्गाच्या संघटनांची एक फळी उभारूनही या साम्राज्यशाहीशी लढाई करता आली असती. या हेतूसाठी सर्व संघटना बरखास्त करण्याची काहीच गरज नाही. सर्व संघटनांचा समावेश करून घेणाऱ्या संस्थेचीही काही आवश्यकता नाही. त्यासाठी सर्वांची मिळून एकच एक फळी उभारली म्हणजे पुरे झाले. काँग्रेसची ही उजवी बाजू साम्राज्यवादाच्या नावाने कोणतीही स्वतंत्र व वेगळी संघटना उभारण्याच्या आड येत आहे, हे पुष्कळांनी अजून ओळखलेले नाही, याची जाणीव करून देताना मला खेद वाटतो आणि ही चूक तुम्हीही कराल, अशी मी तुम्हास धोक्याची सूचना देत आहे. राजकारण हे वर्गहिताच्या जाणिवेवर उभारल्या जावयास पाहिजे. जे राजकारण वर्गहिताच्या पायावर उभे नसेल ते एक ढोंग आहे.

म्हणून जो पक्ष वर्गहिताच्या, वर्गजाणिवेच्या पायावर आधारलेला असेल अशा पक्षामध्ये तुम्ही सामील व्हावे. ही कसोटी लावून पाहिल्यास तुमच्या हिताच्या विरोधी नसलेला, मला माहीत असलेला पक्ष म्हणजे स्वतंत्र मजूर पक्ष हा होय. स्पष्ट कार्यक्रम असलेला तो एकच पक्ष असून कामगारांच्या हिताला तो सर्वोच्च स्थान देतो. त्याचे धोरण सुनिश्चित आहे. तो सामान्य परिस्थितीत कधीही असनदशीर मार्गाचा अवलंब करणार नाही परंतु तशी पाळी आणल्यास मागेपुढेही पाहाणार नाही. वर्गयुद्ध टाळण्याची त्याची इच्छा असली तरी वर्ग संघटनेच्या तत्त्वाचा त्याग करावयास तो तयार नाही. आज हा स्वतंत्र मजूर पक्ष (इन्डिपेन्डन्ट लेबर पार्टी) बालवयात आहे आणि तो केवळ मुंबई इलाख्यापुरताच मर्यादित आहे, हे खरे ; परंतु हा काही त्याच्याविरोधी युक्तिवाद नव्हे. प्रत्येक पक्ष एकेकाळी बालवयात असतोच. एखादा पक्ष किती वयाचा आहे, हा प्रश्न महत्त्वाचा नाही तर त्याची तत्त्वे काय आहेत, तो काय साध्य करू इच्छितो आणि त्याची सूप्त शक्ती काय आहे, या बाबीच महत्त्वाच्या आहेत. स्वतंत्र मजूर पक्षाचे घोषणापत्र वाचून पाहण्याची जो तसदी घेईल त्याला त्याची तत्त्वे काय आहेत व तो काय साध्य करू इच्छितो हे कळून येईल. या पक्षात फार मोठी सूप्त शक्ती आहे, हे स्पष्ट आहे. हा पक्ष मर्यादित नाही. जात आणि पंथ याचा विचार न करता सर्वांना तो खुला आहे. त्याचा कार्यक्रम काहीसा दलित वर्गाच्या गरजांवर भर देत असला तरी संपूर्ण कामगार वर्गाच्या गरजांचा समावेश होण्याइतका तो विस्तृत आहे. या स्वतंत्र मजूर पक्षाच्या भरभराटीच्या आड येणारी एक अडचण राजकीय नव्हे तर सामाजिक आहे. या पक्षाच्या केन्द्रस्थानी दलित वर्गाचे लोक सध्या आहेत. ही वस्तुस्थिती मुख्यतः या पक्षाच्या भरभराटीच्या व विस्ताराच्या आड येत आहे. दलित वर्गासारख्या कमी दर्जाच्या लोकांबरोबर सहकार्य करावयाचे नाही, अशी सर्वसाधारण भावना आहे. तिने उच्च वर्गाच्या हिंदुंना स्वतंत्र मजूर पक्षामध्ये भाग घेण्यापासून वंचित केले आहे आणि जे लोक या पक्षाच्या उण्यावर आहेत ते या भावनेचा दुरुपयोग करून घेऊन अडाणी व धर्मभोळ्या लोकांना या पक्षात सामील होण्यापासून परावृत्त करीत आहेत. परंतु स्वतंत्र मजूर पक्षाचे स्वच्छ व प्रामाणिक राजकारण सर्व कामगार वर्गाला आपल्या ध्वजाखाली खेचून आणण्यास लोहचुंबकाप्रमाणे उपयुक्त ठरेल आणि हिंदू समाज रचनेमुळे निर्माण झालेल्या विरोधी शक्तीला प्रतिकारक शक्ती ठरेल, अशी माझी खात्री आहे. आतापर्यंत ठाणा, कुलाबा आणि रत्नागिरी या तीन जिल्ह्यांमध्ये या पक्षाची पूर्णतः स्थापना झाली असून शेतकरी व कामगारात आपला पाया तिने

रचलेला आहे. या प्रांताच्या अन्य भागातही त्याचा जोरदार प्रसार सुरू आहे. मध्यप्रांत आणि वऱ्हाडातही हा पक्ष कार्यरत असून भारताच्या अन्य प्रांतातही तो आपली जागा पटकावील, अशी मला आशा वाटते. म्हणून कामगार वर्गाचा न्याय्य पाठिंबा मिळण्यास स्वतंत्र मजूर पक्ष हाच एकमेव पक्ष पात्र आहे.

कामगारांच्या संघटनांमधील दलित वर्गाचे लोक भारतातील संपूर्ण कामगार वर्गाला फार मोठी चालना देऊ शकतात. इंग्लंडमधील चार्टिस्ट चळवळीचा अभ्यास करणाऱ्या गॅमेज याने म्हटले आहे, '' सामाजिक प्रश्नावर आधारित असण्यावाचून एखादी राजकीय चळवळ आजतागायत कधी झाली असेल की नाही याबद्दल शंकाच आहे. मानव जातीचा मुख्य हेतू सामाजिक सुखोपभोगाची साधने हस्तगत करणे हाच आहे. या साधनांची मालकी त्यांना मिळाल्यास राजकीय भानगडीमध्ये रस घेण्याची त्यांची वृत्ती अगदीच कमी होते. सामान्य जनतेला राजकीय हक्कांचे महत्त्व तत्त्वशः पटवून देण्याचे कार्य जर कोणी करीत असतील तर ते समाजामध्ये अस्तित्त्वात असलेले दोषच होय. '' तुमचे सामाजिक दोष मोठेही आहेत आणि वास्तवही आहेत. त्यामुळे तुमचे राजकारणही अस्सल व वास्तव राहू शकते. हे जर तुम्ही समजून घेतले तर अस्सल राजकीय पक्षाच्या बाबतीत तुम्ही भारतातील संपूर्ण कामगार वर्गाला दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठराल. संपूर्ण कामगारांची दुसरीही एक सेवा तुम्ही करू शकता. विधानसभेत तुम्हाला प्रतिनिधीचा एक निश्चित वाटा मिळालेला आहे. या सुनिश्चित जागांचा उपयोग कामगार वर्गाला किती महत्त्वाचा आहे, याची जाणीव काही कामगार नेत्यांना असल्याचे दिसत नाही. निवडणूक हा एक प्रकारचा जुगार आहे. कोणत्याही पार्टीला विधानसभेत अमुक इतक्या जागा मिळतीलच अशी कोणत्याही निवडणुकीच्या पद्धतीने खात्री देता येण्यासारखी नसते. इतकेच नव्हे तर मतदारांच्या एखाद्या गटाला कोणत्याही निवडणूक पद्धतीने त्याच्या लोकसंख्येच्या प्रमाणात जागा मिळतील असेही नाही. निवडणुकीचे निकाल काही पक्षांना कधी कधी किती आश्यर्चकारक व विनाशकारी ठरले, हे इंग्लंडमधील निवडणुकीच्या इतिहासावरून दिसून येईल. बऱ्याचदा अल्पसंख्यांक मतदारांनाच बहुसंख्य जागा मिळतात. आपल्या येथे निश्चित जागा ठरलेल्या असल्यामुळे तशी भीती बाळगण्याचे कारण नाही आणि दलित वर्गाच्या राखीव जागांचा विचार करता त्या केवळ दलित वर्गाच्याच उपयोगाच्या आहेत, असे नसून त्या सर्व कामगार वर्गाला उपकारक आहेत. दलित वर्गाला निश्चित प्रतिनिधीत्व मिळण्याची खात्री असल्यामुळे

अन्य कामगार वर्गाला मदतीची आवश्यकता वाटल्यास त्यांच्या संघटनांच्या उभारणीमध्ये तो फार मोठ्या प्रमाणात साहाय्यभूत होऊ शकतो. कामगार वर्गाला राजकीय प्रतिनिधीत्व मिळविण्यासाठी दलित वर्गाचा किती उपयोग होऊ शकतो हे मागील निवडणुकीमध्ये सिद्ध झालेले आहे. स्वतंत्र मजूर पक्षाच्या तिकिटावर उभे राहणाऱ्या तीन हिंदूंना दलित वर्ग मुंबई विधानसभेसाठी निवडून आणू शकला आणि स्वतंत्र मजूर पक्षाच्या तिकिटावर उभे नसलेल्या परंतु दलित वर्गाचा पाठिंबा असलेल्या अनेक उमेदवारांना त्याने निवडून येण्यास मदत केली. ज्यांना आमच्या प्रयत्नांपासून हित साधून घ्यावयाचे असेल त्यांनी करून घ्यावे परंतु या देशाच्या राजकारणात दलित वर्ग महत्त्वाची भूमिका वठवू शकतो, ही वस्तुस्थिती शिल्लक राहतेच आणि ही भूमिका त्यांच्या स्वतःसाठी व कामगार वर्गासाठीही अत्यंत सहायक आहे.

तथापि, तुम्ही किती लवकर व किती उत्तमतऱ्हेने संघटित व्हाल यावर हे सर्व अवलंबून आहे. तुम्ही संघटित का व्हावे आणि संघटनेद्वारे तुम्ही काय करू शकाल हे मी तुम्हाला सांगितलेच आहे. आता तुम्हाला एवढेच सांगून मी भाषण संपवितो की, तुमची स्वतःची संघटना उभारण्याच्या कार्यात तुम्ही आता मुळीच विलंब लावता कामा नये. या परिषदेचे अध्यक्षपद स्वीकारण्याचे निमंत्रण देऊन तुम्ही माझा जो सन्मान केला त्याबद्दल मी आपला आभारी आहे. मी तुम्हाला सुयश चिंतितो. ''[१]



[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : मा. फ. गांजरे खंड-२, पुनर्मुद्रण १०-४-१९८६. पृ. १३२-१४८.

# ११९

# शील व सौजन्य नसेल तर शिक्षित माणूस हिंस्त्र पशुपेक्षाही क्रूर व भीतीप्रद

दिनांक ५ फेब्रुवारी १९३८ च्या ' जनता ' पत्रात जाहीर केल्याप्रमाणे मनमाड येथे दिनांक १२ आणि १३ फेब्रुवारी १९३८ ला आयोजित अखिल जी. आय. पी. रेल्वे अस्पृश्य कामगार परिषदेच्या भव्य मंडपात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई इलाखा अस्पृश्य युवक परिषद १२ तारखेला रात्री ८ वाजता घेण्यात आली. या परिषदेत श्री. मुरलीधर पगारे यांच्या भाषणानंतर निरनिराळे ठराव पास झाल्यावर डॉ. आंबेडकरसाहेब यांचे भाषण झाले.

डॉ. बाबासाहेब आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले,

आजच्या या युवक परिषदेचा मी युवक नसतानाही मला अध्यक्ष केले आहे. कारण माझ्या वयाची ४० वर्षे उलटून गेली आहेत व सर्वसाधारणपणे युवकांची आयुष्यमर्यादा ४० च्या आत असते. असो.

आजची ही परिषद जरी युवकांची असली तरी या ठिकाणी सबगोलंकार झाल्याचे आपणास आढळून येईल. कारण या युवकांच्या परिषदेत म्हातारे आहेत तर माझ्या उजव्या बाजूचा सर्व ब्लॉक भगिनींनी गडगच्च भरला आहे. तेव्हा आजच्या युवक परिषदेतील माझे भाषण युवकेतरांना जरा विसंगत वाटेल. तेव्हा मी आज जे बोलणार आहे ते फक्त युवकांना उद्देशूनच बोलणार आहे.

आजची ही युवक परिषद अत्यंत महत्त्वाची आहे. सर्वसाधारण लोकसंख्येत मोठा भाग तरुणांचा आहे. जी म्हातारी माणसे आहेत ती थोडी असून त्यापैकी बऱ्याच जणांच्या गोवऱ्या ओम्कारेश्वरी गेल्या आहेत. त्यांच्या लहानपणापासून ते ज्या परिस्थितीत वाढले आहेत, त्या परिस्थितीतून सुटण्यास त्यांच्यापैकी बरेच जण आज तयार नाहीत. ज्या परिस्थितीत ते वाढले असतील त्या परिस्थितीस चिकटून राहाण्याची त्यांची वृत्ती दिसते. त्यांच्या हातून दुसऱ्या एखाद्या कार्याची आपणास जरी अपेक्षा करता येत नसली तरी आपल्या चळवळीच्या चालत्या गाडीस ते आड न आले तरी त्यांचे आपल्यावर मोठे उपकार होतील.

---

जनता : २६ फेब्रुवारी १९३८.

प्रस्तुत भाषण १२ तारखेचे असले तरी परिषदेच्या वृत्तांतात खंड पडणे योग्य होणार नाही म्हणून १३ तारखेनंतर देत आहोत.—संपादक.

आजची ही युवकांची सभा युवक संघाच्या विद्यमाने व्हावयास पाहिजे होती. परंतु ती आज स्वतंत्र मजूर पक्षाच्या विद्यमाने होत आहे. ही परिषद युवकांनीच भरविली असती तर फार बरे झाले असते. परंतु युवकांच्यात किरकोळ मतभेद आहेत हे जरी खरे असले, नाशिक जिल्हा युवक संघाच्या विद्यमाने ही परिषद भरणार असे जरी पूर्वी जाहीर झाले असले तरी कार्याकडे लक्ष देऊन त्यांनी आपला हेका न धरीता युवकांची परिषद, मग ती कोणातर्फेही का होईना पण होवो, या उदात्त भावनेने मिळते घेतले ही अत्यंत अभिनंदनीय अशी गोष्ट त्यांनी केली आहे. सार्वजनिक कार्यात काम करू इच्छिणाऱ्यात जर ही भावना नसेल तर त्यांच्या हातून काहीही होऊ शकणार नाही. तेव्हा सार्वजनिक कार्यात पडलेल्यांनी अगर पडू इच्छिणाऱ्यांनी ही भावना सतत मनात बाळगण्यातच समाजहित आहे. युवक संघाच्या मंडळींनी घालून दिलेल्या या स्तुत्य व अनुकरणीय उपक्रमाबद्दल मी पुन्हा त्यांचे अभिनंदन करतो.

युवकांच्या परिषदेत मला जे सांगावयाचे आहे ते मी पुस्तकरूपानें प्रसिद्ध करू इच्छित होतो. तथापि, कामाच्या वाढत्या व्यापामुळे ते आज जरी शक्य झाले नसले तरी मी लवकरच ते सर्व पुस्तक रूपाने प्रसिद्ध करेन. आजच्या प्रसंगी मी फक्त महत्त्वाच्या एकदोन गोष्टी सांगू इच्छितो. माझी चाळीशी उलटून गेली असल्याने मी आता युवक नाही ही कबुली मी दिलीच आहे. मनुष्याने आपल्या आयुष्यात खाणे, पिणे व जगणे ही आयुष्यातील इतिकर्तव्यता मानता कामा नये. खाणे-पिणे हे जगण्याकरिता असावे व जगणे हे मानमरातबाचे व समाजास भूषणभूत होण्यासाठी समाजसेवेचे असावे. ' खाण्याला काळ व भूईला भार ' असे जगणे असले काय नि नसले काय सारखेच. या बाबतीत प्रसिद्ध नाटककार कै. गडकरी यांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, ' जोपर्यंत समाज आपली मानमान्यता ठेवतो तोपर्यंतच जगण्यात भूषण आहे ' नाही तर समाजास अप्रिय होऊन अगदी म्हातारा होऊन बिछान्यास खिळून अगर घरातील सुनामुलांच्या तिरस्कारास पात्र होऊन झिजून झिजून जगण्यापेक्षा त्या अगोदर आलेले मरण भूषणाचे असते.

मी एकेकाळी तरुण होतो तेव्हा माझ्या अनुभवाच्याच गोष्टी मी आपणास सांगू इच्छितो. तरुणांनी नेहमी आपल्यापुढे उदात्त ध्येय ठेवले पाहिजे. तरुणांनी एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे की कोणतीही चांगली गोष्ट संपादन करण्यासाठी तप करावे लागते. म्हणूनच आपल्यात एक म्हण रूढ आहे की, ' तपा अंती फळ. कार्य आत्मोन्नतीचे असो वा राष्ट्रोन्नत्तीचे असो कशाचेही का असेना

त्यासाठी सतत प्रयत्न करावयास हवे आहेत. माणसाने त्या कार्यास स्वतःस वाहून घेतले पाहिजे. मी अनेक अर्वाचीन तरुण पाहिले आहेत की, जे १५ मिनिटे टेबलावर सतत बसू शकत नाहीत, त्यांना घटकोघटकी विडी ओढावी लागते, चहा प्यावा लागतो, त्याशिवाय त्यांना कामच करता येत नाही. हे योग्य नाही. कोणीही इसम आपल्या उपजत बुद्धीवर पराक्रम करू शकत नाही. जगात खुळी माणसे फारच थोडी निपजतात तसेच बुद्धीचा विकास करणे ही दरेकाच्या हातची गोष्ट आहे. २४ तासापैकी २० तास सतत टेबलावर बसून काम करता आले पाहिजे. मी माझ्या विद्यार्थी दशेत येथे व परदेशातही सतत २० तास टेबलावर बसून काम केले आहे. ज्या कोणास आपल्या बुद्धीचा प्रभाव वाढवावयाचा आहे त्यांनी तप केले पाहिजे, श्रम केले पाहिजेत.

मनुष्य संकटात अगर दारिद्र्यात सापडला म्हणजे तो निराश होत असतो. आपणास यश मिळणार नाही अशी भावना त्याच्या मनात उत्पन्न होते. जर का या भावनेने मनूष्यास घेरले म्हणजे तो मनुष्य आयुष्यात कुचकामाचा ठरतो. हरेक तरुणाने आशा कधीच सोडू नये. ज्या दिवशी तो आशा सोडील त्या दिवशीच तो जगात जगला काय आणि मेला काय सारखाच होईल. हरेक तरुणात महत्त्वाकांक्षा असली पाहिजे. महत्त्वाकांक्षेशिवाय मनुष्य धडपड व प्रयत्न करूच शकत नाही. यासाठी अस्पृश्य मानलेल्या तरुणांमध्ये महत्त्वाकांक्षेचे बी प्रथम रुजले पाहिजे. आज आपण जेथे जेथे जाल मग ती मामलेदार कचेरी असो, कलेक्टरचे ऑफिस असो अगर कोर्ट असो, दर ठिकाणी या पांढरपेशा भटा-ब्राह्मणांचाच सुळसुळाट झालेला दिसेल. या सर्व परिस्थिती-वरून इतरेजणांना निराश होणे हे जरी स्वाभाविक असले तरी आज आपण निराश न होता मनात उच्च महत्त्वाकांक्षा धरुन त्या दृष्टीने प्रयत्नांची शिकस्त करावयास हवी आहे. मला जरी मुंबईचा गव्हर्नर केले तरी ते कमीच होईल असे मानणारा मी आहे. हे सांगण्याचा मतलब इतकाच की, आपल्यापैकी दरेकाने उच्च महत्त्वाकांक्षा बाळगून ती फलद्रूप करण्याचा कसोशीने प्रयत्न केला पाहिजे.

तरुण बंधुंनी आत एक बाहेर एक असली सवय लागू देऊ नये. सत्य सोडू नका. सत्याचा तात्कालिक जरी विजय होत नसला तरी शेवटी सत्याचाच विजय होतो. आपल्यात दुटप्पीपणा असता कामा नये. जगाला जर हा मनुष्य दुतोंडी आहे असे दिसले तर मग जग आपल्यावर विश्वास ठेवणार नाही.

आज विद्येची द्वारे आपणास मोकळी आहेत. आज शिक्षणाच्या ज्या सवलती आहेत त्या आमच्या वेळी मुळीच नव्हत्या. आम्हास त्या काळी कोणाचीच मदत नव्हती. मला येथील विश्वविद्यालयात असता माझे वडील व कुटुंबातील मंडळी, एक बकरी, सरपण, चूल, आठवड्याचा बाजार वगैरे सर्व सामान ८×८ च्या लांबी रुंदीच्या खोलीत राहून कॉलेजचा अभ्यास करावा लागत असे. तुमच्या सुदैवाने ही स्थिती आज बदलली आहे. साधनांच्या अभावी शिक्षण घेता येत नाही अशी जर आपण तक्रार केली तर ती निराधार ठरेल.

आपल्यापैकी दरेकाने सुविद्य व्हावे अशी माझी फार इच्छा आहे. परंतु त्याच बरोबर आज विद्येची मला मोठी भीती वाटते. शिकलेल्या माणसांची मला जशी भीती वाटते तशी ती सर्वांनी बाळगिली पाहिजे. कारण शिक्षण ही तलवार आहे, शिक्षण हे शस्त्र आहे. जर एखादा मनुष्य येथे तलवार घेऊन आला तर आपण सर्व जण त्यास घाबरून जाल. परंतु विद्येचे शस्त्र हे नेहमी वापरणाऱ्यावर अबलंबून असते. हत्याराने अबलांचे संरक्षण मनुष्य करू शकेल. चांगल्या माणसाच्या हातात शस्त्र असणे उत्तम परंतु वाईट माणसाच्या हातात शस्त्र असणे बरे नाही. शिक्षण घेतलेल्या माणसाच्या अंगी शील व सौजन्य नसेल तर तो हिंस्त्र पशुपेक्षाही क्रूर व भीतीप्रद समजण्यात यावा. अज्ञ जनतेस छक्केपंजे, डावपेच करता येत नाहीत. शिकल्या सवरलेल्यांना ते अवगत असतात. एखाद्याचे व्ह्यू असल्यास तेवढेच काढून त्यास कसा पेचात आणावयाचा याकडे बरेच लोक आपल्या शिक्षणाचा उपयोग करतात. दीनदुबळ्या, गरीब शेतकऱ्यांना शिक्षण नाही. त्यांच्या अज्ञानीपणाचा फायदा शिकले सवरलेले शेठजी, भटजी, वकील वगैरे सर्व लोक घेत आहेत. अशातऱ्हेने गरीब जनतेस नाडण्याकडेच जर या शिक्षणाचा उपयोग होणार असेल तर धिःकार असो अशा या शिक्षणाला. त्या दृष्टीने पाहता शिक्षणापेक्षा शील फार महत्त्वाचे आहे. अलिकडील तरुणात धर्माबद्दल औदासिन्य दिसते. धर्म हा गांजा आहे असे ते म्हणतात. परंतु माझ्यात ज्या काही चांगल्या गोष्टी असतील व माझ्या शिक्षणाचा जो काही जनतेसाठी उपयोग झाला असेल तो सर्व माझ्यात असलेल्या धार्मिक भावनेमुळेच होय. मला धर्म हवा आहे, परंतु धर्माचे ढोंग नको. हिंदू धर्म हा नरक आहे ही माझी समजूत अजूनही कायमच आहे. तेव्हा मला तुम्हाला एवढेच सांगावेसे वाटते की, शिक्षणापेक्षा शीलाला अधिक महत्त्व द्या. तसेच आपल्या शिक्षणाचा उपयोग आपल्याच दीनदुबळ्या जनतेच्या उद्धारार्थ न करिता जर शिकून आपली नोकरी भली आहे, आपली बायकामुले भली या भावनेने आजचे शिकलेले तरुण वागणार असले तर त्यांचा समाजाला काय उपयोग ? तरुणांवर

आज पडलेली जबाबदारी ओळखून त्यांनी त्या कार्यास लागावयास हवे आहे. जनतेच्या हाडीमासी भित्रेपणा खिळलेला दिसतो. आपले कायदेशीर हक्क बजावण्यास सुद्धा ते धैर्याने पुढे येऊ शकत नाहीत. सार्वजनिक विहिरीवर पाणी भरणे, सार्वजनिक राजरस्त्याने मिरवणुकी नेणे वगैरे लोक भित्रेपणामुळे करू शकत नाहीत. ही परिस्थिती फक्त तरुणच बदलू शकतील. परंतु त्यासाठी प्रथम कंबर कसली पाहिजे. त्यासाठी त्यांनी प्राणयज्ञदल संस्था ठिकठिकाणी स्थापन करावयास हव्या आहेत. निसर्गसिद्ध हक्क मिळविण्यासाठी त्यांनी जोराचे लढे लढविले पाहिजेत. याबाबत एक मनोरंजक व बोधप्रद अशी पौराणिक गोष्ट मला आठवली तेवढी सांगून मी माझे भाषण पुरे करणार आहे.

द्रोण हा अत्यत गरीब होता. तो श्रीमंतांच्या आळीत राहत असे. त्याला अश्वत्थामा नावाचा मुलगा होता. त्याच आळीतील श्रीमंतांची मुले सोन्याच्या वाटीतून दूध पीत असत हे अश्वत्थामाने पाहिल्यानंतर तोही या *



*यापुढील भाषण असलेला अंक मिळाला नाही.–संपादक.

१२०

# गरिबांच्या पोटावर पाय ठेवणाऱ्या सरकारने अधिकारत्याग करणेच इष्ट

यंदाच्या बजेट अधिवेशनाला तारीख २५ फेब्रुवारी १९३८ रोजी दुपारी २-०० वाजता ना. मावळणकर यांच्या अध्यक्षतेखाली सुरूवात झाली. आजच्या अधिवेशनाला बरीच मंडळी हजर होती. चालू अधिवेशनासाठी पॅनेल ऑफ़ चेअरमनच्या जागी (१) खान बहादुर अब्दुल्ला लतिफ, (२) स्वतंत्र मजूर पक्षाचे मि. राजाराम आर. भोळे, (३) मि.ब्रॉबल व (४) सर एस. टी. कांबळी यांची नेमणूक केल्याचे ना. स्पीकर यांनी जाहीर केले. प्रथम प्रश्नोत्तरे झाल्यावर असेंब्लीपुढे ना. लठ्ठे यांनी १९३७-३८ सालचे बजेट मांडताना आपले भाषण केले. हे भाषण जवळजवळ दोन तास चालले होते.

ना. लठ्ठे यांच्या भाषणानंतर शुक्रवारच्या बैठकीचे कामकाज संपले. शनिवार बजेटावरील चर्चेचा दिवस होता. परंतु त्यादिवशी मुस्लीम लीगच्या सभासद मिसेस सलिमा फैज तय्यबजी यांनी छोटेसे भाषण करून मुसलमान मुलींच्या शिक्षणाची योग्य तरतूद नवीन अंदाजपत्रकामध्ये केल्याबद्दल ना. फडणिसांचे अभिनंदन केले. यानंतर श्री. बाबूभाई पटेल यांनी अंदाजपत्रकाचे मामूली अभिनंदन केल्यानंतर या दिवशी दुसरे कोणीच सभासद बोलायला उभे राहिले नाहीत. म्हणून असेंब्लीची बैठक मंगळवारपर्यंत तहकूब ठेवण्यात आली होती. मंगळवारी प्रथम प्रश्नोत्तरे झाल्यावर बजेटावरील चर्चेला सुरूवात झाली. आजच्या बैठकीत श्री. जमनादास मेहता यांचे पहिले भाषण झाले. बुधवारच्या बैठकीला सुरुवात झाल्यावर २-३० वाजता स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे सडेतोड व परिणामकारक भाषण झाले.

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

मुंबई सरकारच्या नवीन बजेटावर काल परवा जी भाषणे झाली त्यामध्ये या बजेटाचे अभिनंदन करण्यात आले. परंतु या अभिनंदनात मी भाग घेणे अशक्य आहे असे खेदाने म्हणावे लागते. बजेटाकडे दृष्टी वळविताच प्रथम दर्शनीच बजेट निराशाजनक आहे असे वाटते. या अंदाजपत्रकाची अशा रीतीने योजना केलेली आहे की, श्रीमंतांच्या खिशाला बिलकूल चाट न देता गरिबांना हालअपेष्टेत

जनता : ५ मार्च १९३८.

दिवस काढण्यास भाग पाडले आहे. तसेच या बजेटाने भावी सुखकर परिस्थितीची अंधुकही जाणीव होत नाही किंवा आपल्या प्रांतास उज्ज्वल भविष्यकालाची प्रभात काल सुरू झाल्याचीही कल्पना होत नाही. पोकळ आश्वासनावर या बजेटाची सजावट केलेली आहे. तरी पण या बजेटातील पोलिस फोर्सबद्दल केलेली योजना फक्त काही अंशी अभिनंदनीय आहे. परंतु या योजनेचे श्रेय मी ना. फडणिसांपेक्षा ना. गृहमंत्र्यांनाच देऊ इच्छितो. याच पोलिसांच्या फोर्ससंबंधी विद्यमान अधिकारारूढ काँग्रेस व पूर्वीची काँग्रेस यांचे नाते कसे विसंगत होते याची जाणीव सर्वांना आहेच. मागे काँग्रेसच्या असहकारितेच्या चळवळीच्या काळात पोलिसांविषयी काँग्रेसला इतका आपलेपणा वाटत नव्हता. असंख्य अशा खादी टोपी घातलेल्या काँग्रेसवाल्यांच्या मुखातून ' पिवळी पगडी हाय हाय ' म्हणून निघणारी मुक्ताफळे ऐकणारांना आज त्याच अधिकारारूढ काँग्रेसला जादा ३६ हजार रुपयांची तरतूद याच पोलिस फोर्सकरिता करण्याची पाळी यावी ही जितकी अभिनंदनाची तितकीच आश्चर्याची गोष्ट होय. सध्याचे मुंबई सरकार असेंब्लीच्या अधिकाराचे अतिक्रमण करीत आहे असे वाटते. अजूनपर्यंत कोणत्याही सरकारने आपल्याच अधिकारात अंदाजपत्रकातील खर्चाच्या बाबतीत मोठ्याशा रकमा जमेला धरल्या नव्हत्या. तसेच या बाबतीत सरकारने प्रथम या खर्चाच्या योजनेसंबंधी असेंब्लीला आगाऊ जाणीव करून द्यायला पाहिजे होती. दुसरे असे की, अकाऊंटंट जनरलला ही रक्कम कशारीतीने उपयोगात यावयाची आहे याची कल्पना द्यायला पाहिजे होती. परंतु या सर्व गोष्टींकडे सत्तेच्या बळावर दुर्लक्ष करून मुंबई सरकार आज आपल्या कल्पनेच्या बळावर किंबहुना हवेतील बंगले बांधायच्या योजनेसाठी एकदम ३६ लाख रुपयांची रक्कम जमा करीत आहे. या बाबतीत असेंब्लीचे मत घेतलेले नाहीच आणि आपण विधायक असे कोणते कार्य करणार आहोत याचीही अंधुक कल्पना दिलेली नाही. तसेच या गृहाचे जे कायदे मंजूर करण्यात येतात त्या कायद्याखाली नियम करण्याचा या गृहाचा काहीच हक्क नाही असे ना. गृहमंत्र्यांचे प्रामाणिक मत आहे असे वाटते. ते आज यावेळी गैरहजर असल्यामुळे त्याच्यासंबंधी खुलासा मिळणे शक्य जरी नसले तरी या ना. गृहमंत्र्यांच्या सत्तेच्या दुरुपयोगाबद्दल मला येथे स्पष्टपणे इशारा देणे भाग पडत आहे.

नवीन लोकोपयोगी कामाची तरतूद करण्यासाठी सरकारने यासाठी १ कोटी १६ लक्ष रुपयाची योजना केल्याचे सांगण्यात येते. परंतु या सर्व आकड्यांची छाननी केली तर आपणास काय दिसून येईल ? या प्रचंड रकमेतून दरवर्षी

होणाऱ्या खर्चापैकी ४८ लक्ष ११ हजार रुपये व दारूबंदीच्या खर्चासाठी ३१ लक्ष रुपये राखून ठेवलेले आहेत. ते वजा केले म्हणजे या लोकोपयोगी कामासाठी ३७ लक्षच रुपये खरे जमेला धरलेले दिसून येतील. त्याप्रमाणे शिक्षण, पाणीपुरवठा, वैद्यकीय मदत वगैरेसाठी खर्च होणारी रक्कम परत मिळणे अशक्य असते किंवा त्या खाती खर्च केलेल्या रकमेतून उत्पन्न मिळणे अशक्य असते. तसेच प्रांतातील बेकारी निवारण, आजारीपणाचा विमा, म्हातारपणासाठी विमा, अपघाताचा विमा, स्त्रियांच्या बाळंतपणासाठी मदत वगैरे अनेक आवश्यक अशी लोकोपयोगी कार्य करण्याची आवश्यकता आहे. परंतु या बाबतीत मुंबई सरकारने शुद्ध मुग्धता स्वीकारलेली दिसते. आज वरील लोकोपयोगी कार्यासाठी जी रक्कम जमेस धरली आहे ती पुढीलवर्षी धरणे कठीण होईल, असे वाटते.

कामगारांच्या हितसंबंधाचे धोरण गेल्या ऑगस्ट महिन्यात याच अधिकारारूढ सरकारने कामगारांचे हितसंबंध रक्षण करण्यासाठी जे धोरण आखल्याचे जाहीर केले होते त्या योजनेनुसार या प्रांताला खर्च किती होईल याचा अंदाज ना. गृहमंत्र्यांनी दिला असता तर फार बरे झाले असते.

आपल्या प्रांताच्या लोकोपयोगी योजनेसाठी ना. फडणिसांची योजना थोडा वेळ दृष्टिआड ठेविल्यास माझ्या अल्पमतीप्रमाणे या योजनेला कमीत कमी २४ कोटी रुपये खर्च येईल. इतका खर्च करण्याची ज्या सरकारच्या अंगी धमक आहे तेच सरकार त्या प्रांताचा राज्यकारभार चालविण्यास लायक आहे, असे माझे मत आहे. परंतु इतकी रक्कम उभी करण्यासाठी आमचे प्रांतिक सरकार प्रयत्न करील काय ? इतर पाश्चिमात्य देशातील सरकार प्रत्येक माणसी किती किती खर्च करू शकते याचे प्रमाण असे दिसून येईल की, कॅनडा ९ पौंड व ८ शिलींग, साऊथ ऑस्ट्रेलिया १९ पौंड, न्युझिलंड २२ पौंड, आयरीश फ्रीस्टेट १० पौंड आणि मुंबईमध्ये ७ पेन्स पडतात. हे प्रमाण पाहिल्यावर आपल्या भिकार आर्थिक परिस्थितीचे चित्र किती भेसूर आहे याची चांगलीच कल्पना होते. आपल्या प्रांताच्या उत्पन्नाचा तपशील पाहिला असता पूर्ण निराशा होते. गेल्या १९२२ ते १९३५ सालात मुंबई प्रांतापेक्षा इतर प्रांतांची पुढीलप्रमाणे उत्पन्नाची वाढ झाली आहे. मद्रासमध्ये २६.५ टक्के, पंजाब २८ टक्के, संयुक्त प्रांत १६.५ टक्के, आसाम १४.५ टक्के, बंगाल ११.५ टक्के आणि मुंबईमध्ये अवघे ३ टक्के. या गेल्या १३-१४ वर्षात जादा कराच्या आकारणीने मिळालेले उत्पन्न जमेला धरले नाही तर मुंबईचे उत्पन्न ५.५ टक्के घटलेलेच दिसेल. अशा परिस्थितीत आपल्या सरकारने दारूबंदीची चळवळ हाती घेऊन उत्पन्नाच्या बाबीच्या दृष्टीने बुडत्याचा पाय खोलात अशी वृत्ती स्वीकारली आहे आणि ही योजना अंमलात आणताना दुसऱ्या कोणत्याही उत्पन्नाची रक्कम जमेस न धरता

उलट लॅन्ड रेव्हेन्यू कमी करण्याचे धोरण आखलेले आहे. सारा सूट देऊ नये असे माझे म्हणणे नाही. माझा कटाक्ष असा आहे की, दारूबंदी व सारा सूट करणे या दोन योजना हाती घेतल्यावर, या योजनेमुळे सरकारी तिजोरी रिकामी होईल, तिची भर करण्यासाठी काही विधायक योजना ना. फडणिसांनी केलेली आहे काय ?

गेल्या अंदाजपत्रकाच्यावेळी ना. फडणिसांनी आपल्या भाषणात जी आशायुक्त वचने दिली होती त्याचे वाचन केल्यावर आपणास आजच्या बजेटाच्या वेळी काय दिसून येत आहे ? त्यावेळी कबूल केलेल्या वचनांचा या नवीन बजेटात उल्लेख तर नाहीच उलट त्या बजेटाच्या वेळी बहुजन समाजाच्या हितसंबंधांच्या प्रश्नासंबंधी त्याने जे धैर्य दाखविले होते त्याचा या नवीन बजेटात बिलकूल मागमूस दिसत नाही. या बजेटात नवीन कर नाहीत म्हणून हे बजेट चांगले अशी जी स्तुतिस्तोत्रे गाईली जातात त्याचेच मला मोठे आश्चर्य वाटते. नवीन कर न बसविल्यामुळे श्रीमंतांच्या वरील खर्चाचे ओझे कमी केल्यामुळे गरिबांना हालअपेष्टा सोसाव्या लागणार याचा गरिबांची पाठीराखी म्हणविणाऱ्या काँग्रेसच्या या अधिकारारूढ मंत्रिमंडळाने चुकून तरी विचार केला आहे काय ? म्हणूनच मी स्पष्टपणे असे म्हणतो की, हे नवीन बजेट गरिबांचे नसून श्रीमंतांचे आहे यात तिळमात्र शंका नाही. खरे पाहिले असता कोणत्याही सरकारची मदत गरिबांना हवी. गरिबांसाठी झटणारे सरकार आपणास हवे. ज्या श्रीमंतांना वैयक्तिकरीत्या वाटेल त्या सुखसोयी आपल्या मुला-बाळांना व बाया-बापड्यांना देता येतील त्यांनाच एखादे सरकार अशा आणीबाणीच्या वेळी मदत करावयास तयार होणे हास्यास्पद नाही असे म्हणता येणार नाही. अशा रीतीने गरिबांच्या पोटावर पाय ठेविणारे सरकार अधिकारारूढ होण्यापेक्षा त्याने शक्य ते लवकर अधिकारत्याग करणेच इष्ट असे मला वाटते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण फारच परिणामकारक असे झाले. त्यांच्याइतके उत्कृष्ट, परिणामकारक, मुद्देशीर आणि अधिकारयुक्त असे भाषण आजपर्यंत मुंबई कायदेमंडळात झाले नव्हते असे सांगण्यात येते आणि आमचीही त्या बाबतीत खात्री पटते.

ना. लठ्ठे यांनी उत्तरादाखल केलेले भाषण विशेष समाधानकारक नव्हते. त्यांनी फक्त अर्ध्या तासात भाषण केले. त्यावरून त्यांना आपल्या विरोधकांना सरळ व मुद्देसूद उत्तर देणे किती अवघड झाले होते याची खात्री पटते. त्यांनी आपल्या भाषणाच्या अखेरीस आपण सर्व वर्गांच्या जनतेच्या हितसंबंधांकडे विशेष लक्ष देऊन प्रामाणिकपणे कार्य करीत असल्याचे सांगितले.

● ● ●

# १२१

# गुन्हेग़ार आरोपीला दिलेली शिक्षा तहकूब करणे म्हणजे कायद्याचे उच्छेदनच

जाधवजी गांधी व धीरजलाल या दोघा धनवंत परंतु अट्टल सटोडियांना मुंबई हायकोर्टाने जुगारीच्या आरोपावरून दिलेल्या कैदेच्या शिक्षा आपल्या अधिकारात तहकूब करून लोकशक्ती सर्क्युलर प्रकरणात मिळविलेल्या कुप्रसिद्धीवर कळस चढविणारी अशी न्यायदानाच्या कामात अक्षम्य ढवळाढवळ केली, याबद्दल मुंबई सरकारचे गृह मंत्री ना. मुन्शी यांच्याविरुद्ध निंदाव्यंजक अशी कामकाज तहकुबीची सूचना बॅ. जमनादास मेहता यांनी गेल्या सोमवारी मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत आणली होती.

या सुचनेच्या समर्थनार्थ स्वतःच बॅ. जमनादास मेहता व विख्यात कायदेपंडित आणि असेंब्लीतील स्वतंत्र मजूर पक्षाचे नेते बॅ. भी. रा. उर्फ बाबासाहेब आंबेडकर यांनी विस्तृत भाषणे केली.

डॉ. आंबेडकर आपल्या दि. ७ मार्च १९३८ च्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, मी या ठरावाला पाठिंबा देण्यासाठी उभा राहिलो आहे. चर्चेच्या अखेरीला ह्या ठरावावर मी बोलत असल्यामुळे आणि ना. गृहमंत्र्यांना उत्तर देण्यासाठी अवकाश मिळाला पाहिजे याची जाणीव असल्याने मला जे काही येथे सांगावयाचे आहे, ते अगदी थोडक्यात सांगतो.

स्वतःपुरतेच बोलावयाचे तर पहिली जी गोष्ट मला सांगावीशी वाटते ती ही की हा निंदाव्यंजक ठराव ज्या कृत्यामुळे आणला गेला आहे, ते कृत्य घडून यावे यात मला कसलाच विस्मय वाटत नाही.

चालू सरकारने अधिकार ग्रहण केल्यापासून कायदेभंगाच्या सदरात निःसंशय घालता येतील अशी जी अनेक कृत्ये हे सरकार करीत आले आहे, त्यांचा हे कृत्य म्हणजे कळसच होय, असे मी समजतो.

तथापि, हा झाला तरी या साऱ्या कृत्यांपैकी एक भाग आहे, चालू असलेल्या नाटकाचा एक अंक आहे, त्याचा शेवट कधी होईल, काही कळत नाही. त्यापैकी पहिले कृत्य सांगावयाचे म्हणजे ते अर्थातच बार्डोलीच्या शेतकऱ्यांच्या जप्त करण्यात आलेल्या जमिनी त्यांना पुन्हा मिळवून देण्याची सरकारने जी जोखीम अंगावर घेतली आहे, ते सांगता येईल. (एक सभासद मध्येच उठून बोलण्याचा प्रयत्न करतात.) माझा वेळ थोडा आहे, तेव्हा माझे भाषण नीटपणे ऐकून घेतले जावे, अशी मी विनंती करतो.

---

विविधवृत्त : १३ मार्च १९३८.

**अध्यक्ष.**– ऑर्डर, ऑर्डर, नामदार सभासद खाली बसतील काय ? (डॉ. आंबेडकर यांना) ह्या तऱ्हेने चर्चा चालू ठेवल्यास तिचे क्षेत्र अमर्याद वाढत राहील, अशी मला भीती वाटते. सरकारच्या गत कृत्यांबाबत ते दोषाला पात्र आहे किंवा नाही हा काही प्रस्तुतचा मुद्दा नाही, तर प्रस्तुत ठरावाचा विषय असलेले विशिष्ट कृत्य निषेधार्ह आहे किंवा नाही हाच वादाचा मुद्दा आहे. तातडीच्या सार्वजनिक महत्त्वाच्या ठरीव बाबींशी या ठरावाचा संबंध आहे आणि हा जो ठरीवपणा ठरावाला परवानगी मिळण्यास कारणीभूत झाला आहे, तो वादातही राखणे अवश्य आहे. म्हणून सभेपुढे असलेल्या ठरीव बाबींपुरतेच बोलण्याची नामदार सभासदांना मी विनंती करतो.

**डॉ. आंबेडकर.**– महाराज, मी आपल्यापुढे याबाबत हा मुद्दा मांडण्याची परवानगी घेतो की, तुलना करण्याकरिता एखाद्या गोष्टीचा निर्देश करणे आणि तिची युक्ता-युक्तता ठरविण्याच्या दृष्टीने तिचा खल करण्यासाठी तिचा निर्देश करणे या दोहोत फरक आहे. बार्डोलीच्या जप्त जमिनी परत करण्याबद्दलच्या युक्ता-युक्ततेबाबत मी चर्चा केली असती, तर आपला निर्णय मला खचित लागू झाला असता. तेव्हा सरकारच्या गत-कृत्यांचा कळस प्रस्तुतच्या कृत्याने झाला आहे, असे म्हटल्याने अथवा त्या कृत्यांपैकी एखाद्या कृत्याचा, त्याच्या युक्ता-युक्ततेबद्दलच्या वादात न शिरता निर्देश केल्याने मी नियमभंग केला, असे होत नाही.

**अध्यक्ष.**– ठरीव बाबीबद्दलचा प्रश्न सभेपुढे आहे, इतर गोष्टींचा निर्देश केल्यास दुसरे विषय चर्चेत उद्‌भवतील म्हणून स्थूलपणे देखील इतर विषयांबद्दलचा निर्देश करण्यास मुभा देणे, मला योग्य वाटत नाही.

**डॉ. आंबेडकर.**– असे असल्यास मला सभेपुढे असलेल्या विषयापुरतेच बोलणे भाग आहे. तेव्हा सभेपुढे असलेल्या ह्या विषयासंबंधी मला जे सांगावयाचे आहे ते हे की, प्रथमतः ह्या खटल्यासंबंधीच्या साऱ्या गोष्टी आपल्याला माहीत झालेल्या नाहीत. जे काही माहीत झाले आहे, ते केवळ वृत्तपत्रांवरूनच होय. ठरीव असा पुरावा आपल्यापुढे नाही आणि मला असे कळते की, ह्या खटल्याच्या सत्य गोष्टी काय आहेत त्या साऱ्या सभेपुढे ठेवण्याची ना. गृहमंत्र्यांना विनंती करण्यात आली होती पण त्यांनी तसे केलेले नाही, यामुळे मला व त्याचप्रमाणे सभेतील इतर सभासदांनाही ही मोठीच अडचण सोसावी लागत आहे. कदाचित ह्या सत्य गोष्टी ज्या वेळी अखेरीला उजेडात येतील, त्यावेळी प्रस्तुतची ही चर्चाही अनावश्यक अथवा अकालिक होती, असेही आढळून येईल. पण ही चर्चा अनावश्यक ठरल्याचे दिसून आलेच, तर त्याचा दोष सर्वस्वी गृहमंत्र्यांच्याच शिरावर पडेल यात किमपिही संदेह नाही, कारण सभेला आपल्या विश्वासात

घेऊन प्रस्तुत प्रकरणातील सारा इत्थंभूत प्रकार तिच्यापुढे मांडण्याचे त्यांनीच नाकारले आहे. त्यांनी जर हा प्रकार तसा मांडला असता, तर ठरावाच्या प्रवर्तकांनी तो बहुधा मागेही घेतला असता, नाही तर कदाचित इतर सभासदांनीही चर्चेत भाग घेण्याची आपली खुषी नाही, असे सांगितले असते. तथापि, गृहमंत्र्यांनी असे काही केले नसल्याने ही चर्चा जर व्यर्थ असल्याचे पुढे आढळून आले, तर त्याबद्दलच्या दोषाला मी वर म्हटल्याप्रमाणे गृहमंत्रीच पात्र होतील.

वृत्तपत्रांवरून जी काही माहिती आम्हाला समजली आहे, तेवढ्यावर विश्वासून या प्रकरणी विचार करता प्रमुख मुद्दा उद्‌भवतो तो असा की, गुन्हेगारांची शिक्षा थोपवून धरण्यास सभेला रास्त अतएव ग्राह्य वाटू शकेल, असे काही समर्थनीय कारण झाले आहे काय ? ना. गृह मंत्री यावर असे सांगतील की, हायकोर्टाला शिक्षा तहकुबीचा अधिकार नाही, सबब हायकोर्टाने शिक्षा तहकूब करण्याचे नाकारले, हे शहाणपणाचे झाले किंवा मूर्खपणाचे झाले, या बाबतीचा प्रश्न येथे उद्‌भवतच नाही, खरा प्रश्न तो नाही. मुद्याचा व महत्त्वाचा प्रश्न हा आहे की, कायदेशीरपणे शिक्षा झालेल्या गुन्हेगारांची शिक्षा कमी करण्याचे अथवा रद्द करण्याचे जे अधिकार गृहमंत्र्यांकडे सोपविले आहेत, त्यांची त्यांनी योग्य रीतीने अंमलबजावणी केली की नाही ? तारतम्य पाहण्याची जी सवलत खास हक्क म्हणून वाटेल तर त्यांना आहे ती त्यांनी रास्त रीतीने उपयोगात आणली किंवा नाही ? ना. गृहमंत्री यांनी आपल्या ह्या हक्कांची योग्यपणे अंमलबजावणी केली किंवा नाही हे अजमावण्यासाठी काही गोष्टी स्पष्ट करणे आवश्यक आहे.

वृत्तपत्रातील माहितीप्रमाणे या बाबतीतील पहिली गोष्ट चटकन लक्षात येते ती अशी की, हे प्रचंड प्रमाणावर जुगार खेळणारे लोक दरिद्री नव्हते, हे खास. पोटाला भाकर मिळविण्याचा काहीच अन्य उपाय नाही, म्हणून जुगारासारख्या या निंद्य कृत्याकडे वळणे त्यांना भागच पडले अशातली मुळीच गोष्ट नाही. प्रसिद्ध झालेल्या वृत्तांतावरून असे दिसते की, हे लोक श्रीमंत बनिया आहेत, त्यांच्यापाशी जंगी भांडवल आहे, अनेक कंपन्या त्यांच्या मालकीच्या आहेत, शहरातील निरनिराळया भागात व त्याचप्रमाणे हिंदुस्थानातीलही निरनिराळया विभागात त्यांच्या मुख्य कचेऱ्या आहेत, एकंदरीत फार प्रचंड प्रमाणावर त्यांचा व्यापार चालू आहे. यामुळे ह्या लोकांच्या बाबतीत, दारिद्र्यामुळे अथवा बिकट प्रतिकूल परिस्थितीमुळे जुगाराचा मार्ग त्यांना दुर्दैवेकरून अवलंबणे भागच पडले, असे खचित म्हणता येणार नाही. दिसून आलेली वस्तुस्थिती साफ विरुद्ध असल्यामुळे वरील प्रकारचे कारण या लोकांच्या

बाबतीत पुढे करता येणे शक्य झाले आहे. त्यामध्ये अथवा हायकोर्टापुढे जो अर्ज करण्यात आला होता, त्यातही ह्या लोकांची शिक्षा तहकूब करण्याचे अन्य काही कारण दाखविण्यात आले आहे असे मुळीच दिसून येत नाही. गुन्हेगार आजारी होते किंवा काही रोगाने त्यांना पछाडले होते असेही दर्शविण्यास काही पुरावा नाही किंवा त्यांच्यावर काही मोठी कौटुंबिक आपत्ती कोसळली होती की, ज्यामुळे त्यांच्या मुक्ततेची अगदी आवश्यकताच भासावी अशातलाही काही प्रकार दृष्टोत्पत्तीस येत नाही. आमच्यापुढे जी माहिती आली आहे, तीवरून असा प्रकार गृहीत धरण्याजोग्या काहीच बाबी आढळून येत नाहीत आणि म्हणून या बाबतचेही अनुमान बाजूला ठेवले पाहिजे. तिसरे एक संभवनीय कारण असे दाखविण्यात येईल की, वरील न्यायासनापुढे ह्या लोकांना अपील करावयाचे होते. ह्याविरुद्ध काय सांगावयाचे ते सर्वश्रुतच आहे, गृहमंत्र्यांना तर ते माझ्यापेक्षाही अधिक चांगले ठाऊक असेल. ते माझ्यापेक्षाही बडे वकील आहेत, त्यांना हे ठाऊकच आहे की, प्रिव्ही कौन्सिलने शेकडो खटल्यांमध्ये असा नियम घालून दिला आहे की, न्यायाच्या तत्त्वाचे उल्लंघन झाले आहे, असे दाखवून दिल्याखेरीज हिंदुस्थानातील फौजदारी कोर्टावर करण्यात आलेले अपील स्वीकारले जाणार नाही, क्रिमिनल प्रोसीजर कोडसारख्या सामान्य कलमांच्या भंगाबाबत ही मुभा देण्यात आलेली नाही. आपल्या न्यायबुद्धीनुसार प्रिव्ही कौन्सिलने फौजदारी अपीले स्वीकारण्याबाबतचे आपले अधिकारक्षेत्र फार मर्यादित करून घेतले आहे. प्रस्तुतच्या खटल्यामध्ये ज्यापुढे हा खटला चालला, ती चीफ प्रेसीडेन्सी मॅजिस्ट्रेट अथवा ज्यांच्यापुढे त्याबाबतचे अपील चालते ते हायकोर्ट, या दोघांनीही क्रिमीनल प्रोसीजर कोडाच्या कलमाचा अथवा सर्वसाधारण न्यायतत्त्वांचा कोणत्याही दृष्टीने भंग केला, असे दर्शविण्यास काडी इतकाही पुरावा नाही. अशा स्थितीत ह्या लोकांची शिक्षा थोपवून धरण्याजोगे काही सबळ कारण गृहमंत्र्यांना मिळू शकले असेल, असे ग्राह्य धरण्यास पुढे आलेल्या वस्तुस्थितीकडे पाहता मला काही एक पुरावा दिसत नाही.

त्याचप्रमाणे माझ्या माहितीप्रमाणे तरी, साध्या गुन्हेगारांची शिक्षा यापूर्वीच्या कोणाही गृहमंत्र्याने कोणत्याही कारणामुळे थोपवून धरल्याचा एकही दाखला कोठे सापडू शकत नाही. ह्या प्रांतातील सर्वश्रेष्ठ न्यायमंडळाने न्यायबुद्धीने दिलेली शिक्षा थोपवून धरण्यासाठी आजारीपणा अथवा खाजगी अडचणी ह्या सबबी कोणत्याही कोर्टाने आजपर्यंत पुरेशा मानलेल्या नाहीत. तेव्हा गृह मंत्र्यांनी हायकोर्टाच्या मताची कदर न करता त्याने केलेली शिक्षा थोपवून धरावी ह्या प्रकाराबाबतचे काही सबळ कारण पुढे आले नाही, तर झाला हा प्रकार अत्यंत

गर्हणीय, दुर्लौकिककारक झाला असेच मला म्हणावे लागेल. हायकोर्टापुढे आरोपीतर्फे ज्यांनी काम चालविले, त्या वकिलांनी, ह्या गुन्हेगारांना तुरुंगात खास सवलती मिळाव्या, त्यांना ब वर्गाचे कैदी म्हणून वागविण्यात यावे, अशा अर्थाचा अर्ज केला होता, ही गोष्ट गृह मंत्र्यांना माहीत आहे. निदान वर्तमानपत्रांवरून आम्हाला तरी ही गोष्ट कळून आलीच आहे. मला दुसरीही माहिती अशी मिळाली आहे की, आरोपीतर्फेच्या हायकोर्टातील वकिलांनी अपराधींची शिक्षा तात्पुरती थोपवून धरण्यात यावी असाही आणखी एक अर्ज केला होता. हे दोन्हीही अर्ज फेटाळून लावण्यात आले. पण हेच दोन्ही अर्ज, निदान ह्यापैकी एक अर्ज तरी गृह मंत्र्यांनी मान्य केला आहे. हे कृत्य करून गृहमंत्र्यांनी जो अपराध केला आहे, त्याइतके कायदा व सुव्यवस्था याबद्दलची उपेक्षा निर्माण करण्याचे कार्य दुसऱ्या कोणत्याही कृत्याने परिणामकारक रीतीने साधू शकेल असे वाटत नाही. माझे हे मत स्पष्ट बोलून दाखविण्यास मला कसलीच दिक्कत वाटत नाही. ना. गृहमंत्री यांना मी असे विचारतो की, ज्याची समर्थनीयता जनतेला पटवून देणारी कसलीही बाजू सकृतदर्शनीही दृष्टोत्पत्तीला येत नाही असे प्रस्तुतसारखे एखादे कृत्य राज्यकारभाराच्या सचोटीबद्दल व प्रामाणिकपणाबद्दल जनतेच्या मनात संशय उत्पन्न केल्याखेरीज राहील काय ? दुसराही एक प्रश्न मला विचारायचा आहे, पण तो ना. मुख्य प्रधान यांना उद्देशून आहे. तो असा की, ना. मुनशी यांनी जो हुकूम दिला, त्याची मुख्य प्रधानांना दखलगिरी होती काय ? हा हुकूम एकूण मंत्रिमंडळाच्या अनुमतीने काढण्यात आला होता काय ? की, तो हुकूम गृहमंत्र्यांनी केवळ आपल्याच मताने काढला होता ? हे प्रश्न विचारण्याला कारणही तसेच सबळ आहे. नव्या घटनेनुसार काँग्रेस मंत्रिमंडळ सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वानुरूप कारभार चालवीत आहे असे जरी, तसा निश्चित पुरावा नसला तरी, आम्ही मानून चालत आहो व त्यामुळे ही बाब एकूण मंत्रिमंडळापुढे अथवा कायदेशीर दृष्टीने प्रांताच्या कारभाराला जबाबदार असलेली व्यक्ती या नात्याने निदान मुख्य प्रधान यांच्यासमोर ठेवली होती, असे मानण्याला आम्हाला कसलीच हरकत नाही. हा उल्लेख करणे तसेच आताचे प्रश्न विचारणे मला भागच आहे. कारण प्रस्तुतची बाब माझ्या मते अत्यंत गंभीर स्वरूपाची आहे. गुन्हेगार आरोपीला दिलेली शिक्षा अंमल होण्यापासून तहकूब करणे म्हणजे कायद्याचे उच्छेदन करणेच होय. तेव्हा माझा निष्कर्ष असा आहे की, प्रांतिक सरकारचा कारभार व जनतेचे कल्याण यावर गंभीर स्वरूपाचे परिणाम घडवून आणणारे प्रस्तुतसारखे कृत्य मुख्य प्रधानांच्या जाणिवेवाचून झाले. मी काढलेला हा निष्कर्ष बरोबर आहे की नाही हे मला समजले पाहिजे. तेव्हा मंत्रिमंडळाकडून या प्रश्नांची उत्तरे देण्यात येतील, अशी मी आशा करतो.

● ● ●

१२२

# सत्याग्रहाच्या यशाचे फळ माझ्या एकट्याचेच नाही तर आपणा सर्वांचे

दिनांक १९ मार्च १९३८ रोजी सोमवंशीय हितकारी समाज आणि ताडवाडी येथील अखिल अस्पृश्य रहिवाशांच्या विद्यमाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर व डॉ. पी. जी. सोळंकी यांना मानपत्र व थैली अर्पण समारंभ आयोजित केला होता.

उपरोक्त समाजाच्या विद्यमाने महाड सत्याग्रहाच्या अकराव्या स्मृतिदिनाचे शुभप्रसंगी, अस्पृश्य वर्गाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि डॉ. पी. जी. सोळंकी यांना त्यांच्या सर्वश्रेष्ठ आणि बहुमोल कामगिरीबद्दल मानपत्र व थैली देऊन अभिनंदन करण्याचा जंगी जाहीर समारंभ, शनिवार ता. १९ मार्च १९३८ रोजी सुप्रसिद्ध ' विविधवृत्त ' साप्ताहिकाचे विद्वान संपादक मे. रा. का. तटणीस यांच्या अध्यक्षतेखाली उत्तमप्रकारे पार पडला. सभास्थान रंगीबेरंगी लतापताकांनी आणि फुलांच्या तोरणांनी शृंगारण्यात आले होते. आज महाड स्मृतिदिन असल्याने येथील कार्यकर्त्या मंडळींनी त्यानिमित्त समारंभापूर्वी झेंडा-वंदन करून सोमवंशीय हितकारी समाजाचे चेअरमन श्री. रामभाऊ रावजी बोरीकर यांच्या अध्यक्षतेखाली स्मृतिदिन साजरा केला. प्रथमतः श्री. करंदीकरांनी महाड सत्याग्रहाविषयी सविस्तर माहिती सांगितली., त्यानंतर श्री. मिठगावकर व श्री. डोळस वगैरे वक्त्यांची याच विषयावर भाषणे होऊन नंतर रात्रौ ९.३० वाजता मुख्य कार्यक्रमास सुरुवात झाली.

उच्चासनावर मुंबई लेजिस्लेटीव्ह असेंब्लीचे भाई चित्रे, भाऊराव गायकवाड, डी. जी. जाधव, खंडेराव सावंत, भातनकर, इत्यादी आमदार, ॲ.तळपदे, स्वतंत्र मजूर पक्षाचे सेक्रेटरीद्वय श्री. कमलाकांत चित्रे व एस. ए. उपशाम, नायगाव सेवामंडळाच्या मिस. चॉइल्डबाई, आर. सी. ए. मिशनच्या मिस डेसूरबाई व त्यांच्या सहकारीबाई तसेच अनेक संस्थांचे आणि अस्पृश्यवर्गीय कार्यकर्ते प्रामुख्याने हजर होते. डॉ. बाबासाहेब सभास्थानी येताच बँड वादनात समता सैनिक दलाने त्यांना लष्करी थाटात सलामी दिली. त्यांच्या आगमनाबरोबर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटाने आणि जयघोषाने सभोवारचे वातावरण निनादित झाले.

प्रारंभी सामाजिक पदे व पोवाडे झाल्यावर श्री. करंदीकर यांनी अध्यक्षांची थोडक्यात ओळख करून दिल्यावर त्यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. तिला श्री. आर. आर. ढसाळ यांनी अनुमोदन दिल्यावर, अध्यक्ष

---
जनता : ९ एप्रिल १९३८.

टाळयांच्या गजरात स्थानापन्न झाले. त्यांनी समारंभास आलेले भास्करराव जाधवादि थोर पुढाऱ्यांचे संदेश वाचून दाखविले. तसेच डॉ. पी. जी. सोळंकी हे प्रकृति अस्वास्थामुळे आपणाला मानपत्र स्वीकारण्यासाठी हजर राहता येत नाही, याबद्दल दिलगिरी व्यक्त करणारे त्यांचे पत्र वाचून दाखविण्यात आले. गायन मास्तर भामाजी यांच्या मेळयातील मुला-मुलींचे स्वागतपर पद्य गायन झाल्यावर, श्री. वि. का. उपशाम यांनी डॉ. पी. जी. सोळंकीसाहेब येऊ शकले नाहीत याबद्दल अत्यंत खेद प्रदर्शित करून नंतर डॉ. बाबासाहेबांचे मानपत्र वाचून दाखविले. त्यानंतर आमदार भाऊराव गायकवाड यांचे भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात डॉ. बाबासाहेबांची कामगिरी सर्वश्रेष्ठ आणि अवर्णनीय असल्याचे योग्य शब्दात सांगून स्वतंत्र मजूर पक्षाच्या संघटनेवर भर दिला. त्यानंतर ॲ. तळपदे यांनी डॉ. साहेबांच्या विषयी गुण गौरवपर भाषण केले आणि काँग्रेसच्या पक्षपाती कारवायांचे वर्णन करून स्वतंत्र मजूर पक्षाच्या असेंब्लीतील कामगिरीबद्दल धन्यवाद दिले. त्यावर भाई चित्रे यांनी आपल्या भाषणात महाड चवदार तळयावर आत्मोद्धारक चळवळीची मूहूर्तमेढ कशी रोवली गेली आणि आज तीच चळवळ अखिल गांजलेल्या शेतकरी–कामकरी वर्गाच्या, वर्गलढ्याच्या तत्त्वावर स्वतंत्र मजूर पक्षाचे रूपाने कशी संघटित आणि जोरदारपणे चालली आहे याचे मुद्देसूद विवेचन करून आमच्या स्वातंत्र्य युद्धात आम्हास कोणतीच पाशवी शक्ती प्रतिकार करू शकणार नाही, आम्ही अहिंसेची बेगडी जपमाळ ओढत बसून पोटभर मार न खाता, आता आमच्या आड येणाऱ्या हितशत्रूंना पोटभर मार देणार असे छातीठोकपणे सांगून आपले भाषण संपविले. त्यानंतर अध्यक्षांचे हस्ते श्री. गजोबा दगडूजी दूधावडे यांनी डॉ. बाबासाहेबांना चांदीच्या कास्केटमधून ' मानपत्र व १०१ रु. ची थैली ' अर्पण केली. हारतुरे घातल्यावर टाळयांचा गजर व जयघोष करून श्रोत्यांनी त्यांचा गौरव केला. त्यानंतर अध्यक्षांच्या आज्ञेवरून डॉ. पी. जी. सोळंकी यांचे मानपत्र श्री. वि. ल. डोळस यांनी वाचून दाखविले. डॉ. सोळंकी यांचे मानपत्र व १०१ रु. ची थैली त्यांना अर्पण करण्यासाठी, अध्यक्षांनी आपल्या हस्ते मेसर्स दुधावडे, बोरीकर, उपशाम, डोळस, करंदीकर व संस्थेचे सेक्रेटरी श्री. भवार इत्यादि कार्यकर्त्यांच्या स्वाधीन केली. त्यानंतर डॉ. बाबासाहेब टाळयांच्या गजरात बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

बंधु, भगिनींनो,

तुम्ही माझे भाषण ऐकण्याला आतुर झाला आहात. परंतु मी आज जास्त बोलू शकणार नाही, कारण प्रकृती स्वास्थ्यासाठी मी आज उपास केलेला आहे. शनिवार म्हणून माझा उपास नाही. माझा देवाधर्मावर बिलकूल विश्वास नाही. देवाधर्माच्या या खुळचट व वेडगळ कल्पनांविषयी एकदा मी

माझ्या हिंदू मित्राना शकराच्या पिंडीविषयी माहिती विचारली. त्यांना ती सांगता आली नाही. शंकराची पिंडी काय आहे ? येथे त्याचे जास्त स्पष्टीकरण करता येत नाही. थोडक्यात सांगायचे म्हणजे ते निव्वळ संभोगदृश्य आहे. त्याची धर्मश्रद्धाळू प्राण्यांनी खुशाल षोडशोपचारे पूजा करावी. त्याशी आपणाला काही एक कर्तव्य नाही. सांगावयाचा हेतू हा की, माझा उपास तशाप्रकारचा नाही. माझा उपास आज दुपारी सुरू होऊन तब्बल दोन दिवस दोन रात्री उपास धरून मी सोमवारी दुपारी अन्नप्राशन करितो. या दोन दिवसात मी पाणीदेखील पीत नाही. इतका हा खडतर उपास आहे. दुसरे लोक नवस-सायासानिमित्त उपास करतात. पण मला अपचनाच्या विकारामुळे डॉक्टरने आठवड्यातून दोन दिवस उपाशी राहावयास लावले आहे. शरीर स्वास्थ्यासाठी मला हा उपास करावा लागत आहे व अशा परिस्थितीत मी जास्त बोलू शकणार नाही. आज मला जे हे मानपत्र व थैली दिली आहे त्याबद्दल मी येथल्या मंडळीचा अत्यंत ऋणी आहे. दुसरे असे की, आजचे मानपत्र काही कोरडे नाही तर त्याबरोबर एक थैलीही आहे. मानपत्राचा आनंदाने स्वीकार करून सदर थैली स्वतंत्र मजूर पक्षास देणगीदाखल दिल्याचे जाहीर करितो.

या मानपत्रात, अस्पृश्य वर्गाच्या आतापर्यंतच्या चळवळीचे योग्य शब्दात दिग्दर्शन केल्याबद्दल मला अत्यंत समाधान होत आहे. माझ्या कामगिरीचे जे अलंकारिक वर्णन केले आहे ते माझ्या एकट्याच्याच श्रमाचे फळ नसून त्याला तुम्हा सर्वांचेच अविश्रांत परिश्रम कारणीभूत झालेले आहेत. त्यातल्यात्यात ज्या दोन महत्त्वाच्या गोष्टींमुळे आपली चळवळ जगाच्या निदर्शनास आली आणि यशोगिरीचा टप्पा गाठू शकली त्या दोन गोष्टी म्हणजे 'महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह व दुसरा नाशिकचा मंदीर-प्रवेश सत्याग्रह.' या दोन्ही प्रसंगी माझे मित्र अनुक्रमे भाई चित्रे व भाऊराव गायकवाड यांची धडाडी आणि अनेकविध संकटांना तोंड देऊन काम करण्याची चिकाटीच कारणीभूत झाली आहे.



# १२३

# श्रीमंतांच्या पैशावर पक्षाचे कार्य जर चालू लागले तर पक्षाचे वैशिष्ट्य नष्ट होईल

दि. २७ मार्च १९३८ रोजी नायगाव मुंबई येथे स्वतंत्र मजूर पक्षाची वार्षिक सर्वसाधारण सभा झाली. त्याप्रसंगी अध्यक्षीय भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आजच्या या स्वतंत्र मजूर पक्षाच्या मुंबई शाखेच्या वार्षिक सर्वसाधारण सभेस हजर राहण्यास मला आनंद वाटतो. आपले स्वतंत्र मजूर पक्षाचे कार्य शिस्तीने व नियमबद्धतेने चालू ठेवण्याकडे लक्ष देणे जरूर आहे. आजची सभा महत्त्वाची आहे. आज सकाळी मी स्वतंत्र मजूर पक्षाच्या मुंबई शाखेच्या ऑफिसला भेट दिली व दोन-अडीच तास तेथे राहून चाललेल्या कामाची तपासणी केली. त्यात तेथे जे पाहण्यास मिळाले ते पाहून मला आनंद व आश्चर्यही वाटले. आश्चर्य वाटण्याचे कारण हे की, स्वतंत्र मजूर पक्षाचे येथील कार्य अत्यंत व्यवस्थितपणाने व सुरळीत चालल्याचे मला दिसून आले आणि दुसरा कोणीही माणूस ऑफिसमध्ये जाऊन पाहील तर त्याच्याही मनाची खात्री झाल्याशिवाय राहणार नाही. ज्या कोणाला ऑफिसमध्ये जाऊन सदर काम पाहणे शक्य नसेल त्यांची मी खात्री करू शकतो की, एकंदर कामाची व्यवस्था चांगल्या तऱ्हेने चालली आहे. ऑफिसमध्ये काम करणारे जे स्वयंसेवक किंवा थोडासा मोबदला घेऊन काम करणारे ९-१० वर्कर्स आहेत त्यांनाही या कामाचे श्रेय दिले पाहिजे. आपला पक्ष गरिबांचा असल्यामुळे आपणाला त्यांना भरपूर मोबदला देता येत नाही. असे असून ते व्यवस्थित काम करतात. हे त्यास भूषणावह आहे. आता तुम्हाला जो जमाखर्चाचा अहवाल वाचून दाखविण्यात आला त्यावरून तुम्हाला दिसून आले असेल की, आतापर्यंत हजार बाराशे रुपयांचा खर्च झाला आहे व हजार बाराशे रुपये शिल्लक आहेत. या जमाखर्चाची काँग्रेसच्या जमाखर्चाशी तुलना केल्यास काँग्रेसच्या मिठमिरचीलाही ही आपली रक्कम पुरणार नाही एवढी थोडी आहे. आतापर्यंत कार्यकारी मंडळातील ४०-५० लोकांनी व बाहेरील २५-३० प्रचारकांनीच हे कार्य केले आहे. तुम्ही सर्वांनी जर मनावर घेतले तर यापेक्षाही मोठे कार्य घडून आल्याशिवाय राहाणार नाही. मुंबई शहरात अस्पृश्य वर्गाचीच लोकसंख्या एक लाखावर आहे. त्यापैकी आतापर्यंत स्वतंत्र मजूर पक्षाचे चार हजार सभासद झाले आहेत, ही लाजिरवाणी गोष्ट आहे. येथे लोकांची बसण्याची जी व्यवस्था केली आहे, त्यावरून स्त्रियांचे दोन गट व त्याप्रमाणेच पुरुषांचेही दोन गट असलेले मला दिसून आले. चौकशी केल्यावर

---

जनता : २ एप्रिल १९३८.

मला समजले की, स्त्रियांच्या अलिकडील गटातील सर्व स्त्रिया स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभासद आहेत व पलिकडील स्त्रियांचा गट सभासद न झालेल्या स्त्रियांचा आहे. या दोन्ही गटात सभासद न झालेल्या स्त्रियांचाच गट मोठा दिसतो. ज्या स्त्रियांना व पुरुषांना येथे सभेला येऊन काय कार्य चाललेले आहे हे ऐकावेसे वाटते त्यांना आठ आणे देऊन सभासद होण्याची बुद्धी का झाली नाही, याचे मला आश्चर्य वाटते. हा स्वतंत्र मजूर पक्षाचा एकंदर कारभार कोणाकरिता व कशासाठी आहे, याचा तुम्ही विचार केला आहे काय ? हा सर्व कारभार तुमच्या आमच्यावर जो इतरांचा जुलूम चालू आहे तो नाहिसा करण्याकरिता आहे. तेव्हा या कारभाराला मदत करणे, हे तुमचे कर्तव्य नाही काय ? या जमलेल्या स्त्रियांमध्ये पुष्कळांना पानसुपारी खाण्याची सवय असेल. त्यासाठी दरमहा त्यांचे रुपया दोन रुपये खर्च होत असतील ! असे असता स्वतंत्र मजूर पक्षालाच वर्षाकाठी आठ आणे देण्यास त्यांना जड का वाटावे ? माझी सर्व महार स्त्रियांवरच भिस्त आहे. त्या पुढे येऊन स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभासद होतील तर पुरुषांनाही त्यांचा कित्ता गिरविणे भाग पडेल. आतापर्यंत तुम्ही सर्व स्वतंत्र मजूर पक्षाचे आठ आणे देऊन सभासद झाला नाहीत याबद्दल मला खेद वाटतो. परंतु मला आशा आहे की, थोड्याच अवधीत तुम्ही सर्वजण स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हाल.

पुरुषांनाही मला हेच सांगावयाचे आहे की, तुमच्या हितासाठी स्वतंत्र मजूर पक्ष निघाला असून त्याचे आतापर्यंत चार हजारच सभासद व्हावेत ही गोष्ट अत्यंत लाजिरवाणी आहे. तुम्ही सर्वांनी या पक्षाचे सभासद का होऊ नये, हे मला कळत नाही. काँग्रेसच्या–श्रीमंतांच्या कैवारी संस्थेच्याविरुद्ध गोरगरिबांची दाद लावण्याचे कार्य हा स्वतंत्र मजूर पक्ष करीत आहे. आज असेंब्लीत काँग्रेसच्या झिंज्या उपटणारा व गरिबांचा कैवार घेणारा कोणता पक्ष असेल तर तो एकटा स्वतंत्र मजूर पक्ष हाच होय ! मला या पक्षासाठी काँग्रेससारखे श्रीमंतांकडून पैसे मिळणार नाहीत, असे नाही. मी प्रयत्न केला तर श्रीमंतांकडूनही या पक्षाला पुष्कळ पैसे मिळवून देवू शकेन. परंतु अशारीतीने श्रीमंतांच्या पैशावर जर या पक्षाचे कार्य चालू लागले तर मग या पक्षाचे वैशिष्ट्य नष्ट होईल. हा पक्ष श्रीमंत लोकांनी विकत घेतल्यासारखे होईल. मग या पक्षाला गरिबांच्या हितासाठी कसे झटता येईल ? म्हणून गरिबांच्या हितासाठी निघालेल्या या स्वतंत्र मजूर पक्षाला गरिबांनीच मदत केली पाहिजे. असे करण्यानेच तुमचे स्वातंत्र्य कायम राहील. गरिबांचा संसार गरिबांनीच चालविला पाहिजे हे जर तुम्हाला समजले असेल तर मला आशा आहे की, मुंबई शाखेच्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभासदांची संख्या चार हजारांची चाळीस हजार होण्यास वेळ लागणार नाही. देशाचे स्वातंत्र्य काँग्रेसचे शेठजी-भटजी मिळवणार नसून ते स्वतंत्र मजूर पक्षाचा श्रमजिवी वर्गच मिळवील ही गोष्ट लक्षात ठेवा.

❀ ❀ ❀

१२४

# बदललेली परिस्थितीच सामाजिक उन्नतीस कारण

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणे शुक्रवार ता. १ एप्रिल १९३८ रोजी रात्री मुंबई डेव्हिड मिल चाळीपुढील सैतान चौकीच्या मैदानावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. या ठिकाणी जवळ जवळ १५ ते २० हजारापर्यंतच्या समुदायाची भरलेली ही पहिलीच सभा होय. सभेच्या चालक मंडळींनी या जाहीर सभेसाठी ' लाऊड स्पीकर ' ची सोय केली होती. प्रथम धों. ना. गायकवाड व या सभेचे खरे कार्यकर्ते श्री. खैरमोडे यांची प्राथमिक भाषणे झाल्यावर आमदार के. एस. सावंत यांनी या सभेचे महत्त्व सर्वांना पटवून देऊन सभेच्या चालक मंडळीतर्फे डॉ. आंबेडकर साहेबांना बोलण्याची विनंती केली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहाताच त्यांच्या गगनभेदी जयजयकारात टाळयांचा कडकडाट झाला. ते आपल्या भाषणात म्हणाले,

येथे जमलेल्या हजारो बंधु भगिनींचे मी अभिनंदन करतो, आनंद व्यक्त करतो. माझी येथे सभेला येण्याची ही दुसरी वेळ आहे. परंतु गेल्या सात-आठ वर्षापूर्वी मी जेव्हा येथे सभेला आलो होतो तेव्हाच्या आणि आजच्या सभेत जमीन-अस्मानचे अंतर आहे. आजच्या सभेत त्यावेळच्या सभेपेक्षा कल्पनातीत फरक पडलेला दिसून येईल. मी ज्यावेळी पहिल्याने येथे सभेला आलो त्यावेळी साळुंके नावाच्या एका गोसाव्याचा कीर्तन सप्ताह येथे चालू होता. माझ्या भाषणापेक्षा येथील लोकांना त्याच्या कीर्तनाची उत्सुकता लागली होती. मी फक्त आठ-दहा मिनिटेच बोललो आणि निघून गेलो. आज त्याच जागेत येथे हजारांनी जमलेले लोक माझेच भाषण ऐकण्यास इतके आतूर झालेले पाहून मला एक प्रकारचे कौतुक व आश्चर्य वाटते. लोकांच्या मनावर गेल्या आठ-दहा वर्षात झालेला परिणाम किती परिणामकारक आहे, याची तत्काळ खात्री पटते. अशातऱ्हेने आपल्या गेल्या दहा वर्षाच्या स्वाभिमान व स्वावलंबनाच्या

---

जनता : ९ एप्रिल १९३८.

लढ्याच्या चळवळीचा परिणाम आपल्या अस्पृश्य बांधवांवर किती झालेला आहे ते पुन्हा सांगण्याची आवश्यकता नाही. आज येथील मंडळी माझ्या भाषणाशिवाय इतर कोणाही वक्त्याचे भाषण ऐकावयास तयार नाही. आज बदललेल्या परिस्थितीचे मूळ आणि मुख्य कारण म्हटले म्हणजे आपल्या समाजात सामाजिक, धार्मिक व आर्थिक उन्नतीच्या दिशेने झालेले यशस्वी प्रयत्नच आहेत.



# १२५

# सर्वांनी प्रथम भारतीय आणि शेवटीही भारतीय ही भूमिका घ्यावी

सोमवार तारीख ४ व मंगळवार तारीख ५ एप्रिल १९३८ रोजी फक्त बिन-सरकारी बिलांचे कामकाज होणार होते. आज कर्नाटक विभक्तीकरणाचा ठराव असेंब्लीपुढे यावयाचा असल्यामुळे स्पीकरच्या गॅलरीत कर्नाटकाचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. गंगाधरराव देशपांडे वगैरे मंडळी दिसत होती. प्रेक्षकांच्या गॅलरीतही कन्नड बांधवांचीच गर्दी दिसत होती. प्रथम प्रश्नोत्तरे झाल्यावर श्री. व्ही. एन. जोग यांनी आपला ठराव असेंब्लीपुढे मांडला.

श्री. व्ही. एन. जोग यांनी आणलेल्या मूळ ठरावात तात्त्विकदृष्ट्या फरक करून हा ठराव पुढीलप्रमाणे उपसूचनेसह असेंब्लीमध्ये सादर केला. '' प्रामुख्याने कानडी·भाषा बोलणारे सर्व विभाग एकत्र आणून त्यांचा एक स्वायत्त कर्नाटक प्रांत करण्याची शक्य तितकी लवकर व्यवस्था करावी, असे या असेंब्लीचे मत मुंबई सरकारने ब्रिटिश सरकारला कळविणे. '' आपल्या भाषणात श्री. जोग यांनी कर्नाटकाच्या विभक्तीकरणाची बरीच महती सांगितल्यावर असेंब्लीमधील कानडी सभासद श्री. दोडुसेटी, नलवडी, जकाती यांची कानडी, करंदीकर, कॉ. झाबवाला, एस. पी. पाटील यांची भाषणे झाल्यावर स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विरोधी भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात सांगितले,

या ठरावाचा प्रश्न माझ्या दृष्टीने अत्यंत गंभीर स्वरूपाचा आहे. हा ठराव म्हणजे भावनावश होऊन करावयाचे कार्य नव्हे. कर्नाटकाच्या विभक्तीकरणाचा प्रश्न सहजगत्या सोडविण्यासारखा नाही. आम्हा अस्पृश्यवर्गीय बांधवांना, आम्ही निरनिराळया प्रांतांचे असलो तरी, हा गुजराती, हा महाराष्ट्रीय किंवा हा कन्नडी असा भेदभाव मुळीच करत नाही. मी या प्रश्नाकडे भावनाविरहीत दृष्टीने पहात आहे. आपल्या मुंबई इलाख्याच्या संयुक्त कुटुंबात या तिन्ही प्रमुख प्रांतांतील लोक गेली ११५ वर्षे गुण्यागोविंदाने एकत्र राहात आहेत. सिंध प्रांत आपल्याबरोबर जवळ-जवळ ९० वर्षे होता. त्याचे विभक्तीकरण झालेले

जनता : ९ एप्रिल १९३८.

आहे. परंतु त्यामुळे आर्थिक परिस्थितीत या विभक्त सिंधची कशी बिकट परिस्थिती होत असेल याची कल्पना आपणास असेलच. कर्नाटकाचे विभक्तीकरण करण्याचे मुख्य कारण म्हटले म्हणजे कानडी भाषा बोलणारांचा एक निराळा प्रांत व्हावा असे आहे. परंतु हे यांचे एकीकरण कितपत साध्य होईल याची जबरदस्त शंका वाटते. कारण या कर्नाटकाचा बराच मोठा भाग संस्थानात आहे. कानडी संस्थानी मुलुख कर्नाटकात सामील करून घ्यायचा म्हणजे त्याच्या मोबदल्यात दुसरा भाग संस्थानांना द्यावा लागेल. तशात खालसा प्रांतातील लोक या मोबदल्यासाठी संस्थानात जावयास कधीही तयार होणार नाहीत. याचा काही विचार तुम्ही केलेला आहे काय ? तसेच आजच्या परिस्थितीत कर्नाटकाला अन्याय होत आहे या म्हणण्यात काही अर्थ आहे काय ? याचा आपण सूक्ष्मरीत्या विचार केला तर असे आढळून येईल की, नवीन राज्यघटनेनुसार या प्रांताला मिळालेले प्रतिनिधीत्व काय कमी आहे ? आपण भाषावार लोकसंख्या विचारात घेतली तर मराठी भाषा बोलणारांची लोकसंख्या ९८ लक्षावर, गुजराथी ३४ लक्ष व कर्नाटकी ३२ लक्ष अशारीतीने विभागलेली आहे आणि या लोकसंख्येच्या प्रमाणाप्रमाणे गुजराती लोकांना २७ व कर्नाटकींना २१ जागा मिळणे आवश्यक आहे. परंतु प्रत्यक्ष विभागणीमध्ये गुजरातला ३१ व कर्नाटकाला २८ जागा मिळाल्यामुळे महाराष्ट्रीयांवर अन्यायच झालेला आहे. मला प्रांतभेद पाळायचा नाही. परंतु आता कर्नाटक प्रांत विभागणीकरणाचा प्रश्न उपस्थित झाल्यामुळे ही प्रत्यक्ष स्थिती पुढे मांडणे भाग आहे. तीच गोष्ट अधिकारांच्या जागासंबंधी आहे. या जागांची विभागणी करण्यासही मराठी प्रतिनिधींवर अन्याय झालेला आहे. त्यांचे शेकडा प्रमाण ९.३, गुजरातीचे ३.६ व कानडीचे ३.१ असे आहे. पण अधिकाऱ्यांच्या जागांची वाटणी अनुक्रमे ६, ६ व ४ अशी केलेली आढळून येईल. यावरून कर्नाटकावर अन्याय झालेला नाही ही गोष्ट उघडपणे सिद्ध होते. बरे या प्रांताच्या आर्थिक परिस्थितीकडे पाहिले तर उत्पन्नाची अडीच कोटीपेक्षा अधिक तरतूद नाही. आमच्या मुंबई शहराचे वार्षिक उत्पन्न ४ कोटी असूनही या शहराच्या गरजा अजून भागत नाहीत आणि आधुनिक पद्धतीने प्रांताची व्यवस्था ठेवण्याच्या बाबतीत केवळ अडीच कोटीने कर्नाटकाला काय करता येणार आहे ?

दुष्काळाने नेहमी पिडलेल्या व लोकांची वस्त्र व अन्नामुळे होणारी अवहेलना पाहिल्यावर या अल्प उत्पन्नात या स्वतंत्र होऊ पाहणाऱ्या प्रांताचा खर्च कसा भागणार ? फार तर ज्या थोड्याशा लोकांना अधिकाराची सूत्रे हलविण्याची लालसा लागली आहे त्यांचेच थोडेसे समाधान होईल. यासाठी मी या प्रांताचे

विभक्तीकरण करण्यास केव्हाही मान्यता द्यावयास तयार नाही. तसेच विजापूर व वल्लारी यासारखे दुष्काळी जिल्हे आ पसरून समोर उभे असता, प्रांताच्या जमाखर्चाची तुम्ही कशी काय तोंडमिळवणी करणार ? आमच्या समाजाला या प्रांतात फक्त दोनच जागा आहेत. येथील असेंब्लीत आमच्या इतर प्रतिनिधींमुळे त्यांना पाठिंबा आहे परंतु या विभक्तीकरणाने त्यांची वरिष्ठ वर्ग कुचंबणा केल्याशिवाय रहाणार नाही. मी कोणत्याही प्रकारचा प्रांतभेद, इतकेच नव्हे तर महाराष्ट्रीय म्हणूनही घेण्यास भूषण मानीत नाही. तसेच भाषा, प्रांतभेद, संस्कृती वगैरे भेदभाव मी कधीच पाळू इच्छित नाही. प्रथम हिंदी नंतर हिंदू किंवा मुसलमान हेही तत्त्व मला पटत नाही. सर्वांनी प्रथम भारतीय, शेवटी भारतीय, भारतीय पलिकडे काही नको हीच भूमिका घ्यावी, हीच वृत्ती खऱ्या भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याला परिपोषक आहे. म्हणून मी या ठरावाला कसून विरोध करतो.



## १२६

# तुमची पवित्र मते विकू नका, ती सत्कार्यी लावा

गेल्या आठवड्यात बुधवार, ता. २० एप्रिल १९३८ रोजी, मु. इस्लामपूर व ओंड येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या प्रचंड अशा जाहीर सभा झाल्या. या दौऱ्यात डॉ. आंबेडकरसाहेबांबरोबर आमदार सावंत, ससाने मास्तर, मे. उबाळे हे होते. इस्लामपूरच्या सभेस सुरूवात करताच श्री. डी. एस. पवार यांच्या भाषणानंतर आ. सावंत, एम. एल. ए. यांचे प्रथम भाषण झाले. त्यात त्यांनी काँग्रेस व स्वतंत्र मजूर पक्ष यांच्या कामगिरीची तुलनात्मकदृष्ट्या कल्पना मोठ्या कुशलतेने मांडली. नंतर सत्यशोधक (ब्राह्मणेतर) पक्ष-काँग्रेसने कसा नष्ट केला हे सांगून याबाबत सातारा जिल्ह्यातील मराठा समाजास त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून दिली. तसेच येत्या जिल्हा बोर्डाच्या निवडणुकीसाठी आपल्या पक्षातर्फे वाळवे, तालुका इस्लामपूर गटातर्फे श्री. भाऊराव देवजी कांबळे हे उभे आहेत. तासगावतर्फे श्री. खंडनाक राजनाक इनामदार व खानापूरतर्फे श्री. धोंडी मालू साळवे हे उभे आहेत. त्यांना त्या त्या ठिकाणच्या मतदारांनी अवश्य निवडून द्यावे. त्यानंतर डॉ. आंबेडकरसाहेब टाळयांच्या प्रचंड कडकडाटात भाषण करावयास उभे राहिले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

या जिल्ह्यात पुढील महिन्याच्या २४ तारखेस जिल्हा लोकल बोर्डाच्या निवडणुका होणार आहेत. या निवडणुकांकरता स्वतंत्र मजूर पक्षाच्या वतीने जे उमेदवार उभे राहिले आहेत त्यांनाच आपण सर्व मतदारांनी मते देऊन निवडून आणा, असे सांगण्यासाठी मी उभा आहे. या सभेत मराठे व अस्पृश्य यांचा एकत्रित जमाव आहे. त्यामुळे मराठे मंडळींना मला जे निराळे सांगावयाचे आहे ते अशक्य दिसते. असो. या देशातील हिंदू समाजाची रचनाच अशी आहे की सर्व लोकांवर ब्राह्मण प्रभुत्व असणारच. कोणताही विधी ब्राह्मणाखेरीज होत नाही. तसेच इतर व्यवहारही त्यांच्याविना चालत नाही. हायकोर्टातील वरिष्ठ जागापासून तो खेडे गावातील तलाठ्यापर्यंत ब्राह्मणाशिवाय कुणीही दिसणार नाही. १९१९ पासून ते १९३८ पर्यंत कौन्सिलमध्ये अवघे चार पाच ब्राह्मण दिसत असत. पण आता या ब्राह्मण कौन्सिलरांची संख्या जवळ-जवळ

---

जनता : ३० एप्रिल, १९३८.

२७ आहे. माझ्या समजुतीप्रमाणे असेम्ब्लीमध्ये ज्या ११ जागा अधिकाराच्या आहेत त्यापैकी ६ ब्राह्मणांनी पटकावल्या आहेत. त्यात पाटलाची किंमत आहे काय ? १७५ सभासदात त्यांना कोणीही विचारीत नाही. खरे पाहिले असता या देशातले राजकारण ब्राह्मण जातीशिवाय चालले पाहिजे. आज राजकारणात भटजी, शेठजी, गुजर व सावकारांचे कडबोळे झालेले आहे. त्यात गरीब शेतकरी वगैरे श्रमजिवी वर्गाला वाव नाही. आजच्या या परिस्थितीचा विचार केल्यानंतर गांधीजींच्या पश्चात या राजकारणात गोंधळ माजल्याशिवाय राहणार नाही. आज आपण जो राजकारणात धुडगूस घालीत आहोत त्याला गांधींच्या पश्चात कोणी किंमत देईल काय ? याचा अजून कोणीही विचार केलेला नाही. म्हणून आपल्या हितासाठी देशाच्या स्वातंत्र्यासाठी स्वतंत्र चळवळ करा. मी माझ्या पक्षात येऊन मिळा असेच म्हणत नाही. पण आपल्या न्याय्य हक्कांचे संरक्षण होईल अशीच चळवळ करा. तुम्हा मराठे मंडळींना सांगायचे म्हणजे तुमच्या हितासाठी आमचे श्री. विचारे मास्तर यांनी एक शेतकरी पक्ष काढला आहे. त्याला तुम्ही मराठे मंडळींनी अवश्य मदत करावी. तसेच जेथे राखीव जागा नाहीत तेथील अस्पृश्य लोकांनी या नवीन शेतकरी पक्षातर्फे जे उमेदवार उभे आहेत त्यांना अवश्य मदत करावी. या लोकल बोर्डाच्या निवडणुकीच्या वेळी कोणी खोट्या थापा किंवा आमिष दाखविल त्याला तुम्ही भुलू नका. तुमची पवित्र मते विकू नका तर ती सत्कार्यी लावा.

डॉ. बाबासाहेबांच्या भाषणानंतर श्री. विचारे यांचे भाषण झाल्यावर पुष्पहार वगैरे अर्पणविधी झाला. नंतर डी. एस. पवार यांनी पाहुणे मंडळींना थाटाची मेजवानी दिली.



१२७

# दुसऱ्यावर विसंबून राहाणे म्हणजे पेशवाईतले गाडगे गळयात बांधून घेणे होय

दिनांक २० एप्रिल १९३८ रोजी दुपारी तीन वाजता मु. औंड येथे सभा भरविण्यात आली. या सभेला निव्वळ अस्पृश्य जनसमुदाय ६ हजारांवर होता. आमदार के. एस. सावंत यांनी औंड गावची व तेथील प्रमुख मंडळींची ओळख करुन दिल्यावर, स्वतंत्र मजूर पक्षाचे प्रत्येकाने सभासद होण्याची विनंती केली. यानंतर कराडचे श्री. थोरवडे यांनी जनता पत्र व स्वतंत्र मजूर पक्षाची माहिती सांगितल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उभे राहिले.

डॉ. आंबेडकरसाहेबांनी आपल्या भाषणात अस्पृश्यांची पूर्वीची व सध्याची स्थिती याची तुलनात्मकदृष्ट्या माहिती सांगितल्यावर ते म्हणाले,

आपणामध्ये आजच्यापेक्षा अधिक बळकट संघटना झाली पाहिजे. ही संघटना स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होऊन केल्यास आपल्या सर्व प्रकारच्या अडिअडचणींची योग्य रीतीने दाद लागेल. हाच पक्ष तुमच्या हितसंबंधांचे संरक्षण करील. तुम्ही दुसऱ्यावर कधीही अवलंबून राहू नका. दुसऱ्यावर विसंबून राहणे म्हणजे पेशवाईतले गाडगे गळयात बांधून घेणे होय.

यानंतर प्रत्येक गावातर्फे डॉ. आंबेडकरसाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात आले. येथील कार्यक्रम आटोपल्यानंतर वाटेत मु. शिवडे, तालुका कऱ्हाड येथे पानसुपारी समारंभ झाला. येथे गावकऱ्यांप्रमाणे मेघराजानेही आपल्या शुभ आगमनाने थोडावेळ डॉ. बाबासाहेबांचे स्वागत केले. या समारंभाच्यावेळी मे. उबाळे यांनी जमलेल्या मंडळीस विनंतीपूर्वक सांगितले की, ' प्रवासात डॉ. आंबेडकर साहेबांना बराच त्रास झाला आहे. तरी त्यांना आपण विशेष त्रास देऊ नये. ' तरी लोकांच्या आग्रहास्तव डॉ. साहेब भाषण करावयास उठले. त्यांनी सांगितले की, ' पुढील महिन्याच्या २४ तारखेस या जिल्ह्यातील डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डाच्या निवडणुकी होणार आहेत. या तालुक्यातर्फे आपल्या स्वतंत्र मजूर पक्षातर्फे श्री. गणपत भीकाजी वाघमारे हे उभे आहेत. तरी आपण सर्वांनी त्यांनाच निवडून द्यावे आणि मी सांगितल्याप्रमाणे आपण सर्व मतदार वागाल अशी आशा आहे. ' यानंतर डॉ. साहेब मोटारीने साताऱ्यास आले. तेथे मे. काशिनाथ कांबळे, भोसले, केरवा मेढेकर व बंदसोडे मास्तर वगैरे मंडळींनी डॉ. साहेबांना हारतुरे घातल्यावर ते पुढे पुण्यास निघून गेले.

---

जनता : ३० एप्रिल, १९३८.

## १२८

# दंग्यांना आळा घालण्यासाठी कडक उपाययोजना आवश्यक

गेले चारपाच दिवस गाजत असलेले ना. मुन्शी यांचे मुंबईच्या गुंडांना दंग्याच्या वेळी पकडून हद्दपार करण्याचा अधिकार पोलीस कमिशनरला देणारे बिल तारीख २६ एप्रिल १९३८ रोजी असेंब्लीमध्ये चर्चेला निघाले. ना. मुन्शी यांच्या मूळ दुरुस्ती बिलाला स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जोडलेली उपसूचना विशेष महत्त्वाची होती. या सूचनेमुळे मूळ बिलाचा उद्देश निश्चितपणे ठरविण्यात आला. डॉ. आंबेडकरसाहेबांच्या सूचनेचा आशय असा आहे की, '' मुंबई शहरात किंवा शहराच्या कोणत्याही विभागात निरनिराळया जातींमध्ये वैमनस्य उत्पन्न होऊन जर आणीबाणीची परिस्थिती (स्टेट ऑफ इमर्जन्सी) निर्माण झाली तर अशावेळी सरकारने तातडीचा जाहीरनामा गॅझेटच्याद्वारे प्रसिद्ध करुन या बिलातील अधिकार पोलिस कमिशनरला द्यावेत. या अधिकाराची अंमलबजावणी फक्त एक महिन्याची ठेवण्यात येईल. याहीपेक्षा या कायद्याची जरूरी असल्यास पुन्हा जाहीरनामा काढावा. तसेच पोलीस कमिशनरच्या हुकुमावर वीस दिवसांच्या आत प्रांतिक सरकारकडे अपील करण्याचा अधिकार ठेवण्यात आला आहे. '' या सूचनेमुळे मुंबई शहरवासीय नागरिकांच्या हक्कांचे योग्यरीत्या संरक्षण करण्यात आलेले आहे.

ही सूचना मांडण्यापूर्वी काही उपसूचना आल्यावर दि. २७ एप्रिल १९३८ रोजी डॉ. आंबेडकरसाहेब आपल्या सूचनेवर बोलावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

ज्या गुंडांच्या मवालीगिरीविषयी हे बिल सादर करताना ना. मुन्शी यांनी उद्गार काढले त्याविषयी मला पोलीस कमिशनर किंवा ना. मुन्शी यांच्यापेक्षा अधिक माहिती आहे. १९११ ते १९३३ सालापर्यंतचा माझ्या आयुष्यातील काळ मुंबई इंप्रुव्हमेंट चाळीत राहाण्यात गेलेला असल्यामुळे, गुंड किंवा मवाल्यांपासून गरिबांना कसा भयंकर उपद्रव होतो, याची मला माहिती आहे. तसेच ज्या दंग्यांसाठी ह्या कायद्याची उपाययोजना अंमलात आणण्यात येत आहे, त्याविषयीचा थोडा पूर्वइतिहास येथे नमूद करण्यास कोणतीच हरकत

---

जनता : ३० एप्रिल, १९३८.

नाही. १८५१ पासून ते १९३८ पर्यंत एकंदर भयंकर स्वरूपाचे असे जातीय दंगे मुंबईत ९ झाले. त्यातील पहिला दंगा १८५१ साली मुसलमान व पारशी यामध्ये झाला. दुसरा सुद्धा १८७४ साली पारशी व मुसलमान यांच्यामध्ये झाला. त्यानंतर झालेले दंगे १८९३, १९२९, १९३२, १९३३, १९३६, १९३७ व १९३८ यावर्षी झाले. हे सर्व दंगे मात्र हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये झालेले आहेत. या सर्व दंग्यात किती जखमी झाले याची आकडेवारी सांगितल्यावर डॉ. बाबासाहेब पुढे म्हणाले की, या दंग्यांच्या वृत्तीकडे पाहिल्यावर त्यांना आळा घालण्यासाठी काहीतरी कडक उपाय योजना अंमलात आणणे भाग आहे. दरसाल या सुधारणेच्या मार्गास लागलेल्या मुंबई शहरात रक्तस्नानाचे प्रकार घडावे ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय आणि याचा योग्य बंदोबस्त होण्याकरिता मी या बिलाला पाठिंबा देत आहे. तसेच या बिलामुळे पोलीस कमिश्नरला जे नवीन हक्क मिळणार आहेत त्यांच्यापासून नागरिकांच्या स्वातंत्र्याचे योग्य संरक्षण व्हावे म्हणून ही उपसूचना या बिलाला जोडीत आहे, म्हणूनच मी माझ्या उपसूचनेत आणीबाणीच्या वेळी अगोदर जाहीरनामा काढूनच उपाययोजना अंमलात आणावी असे सुचविले आहे. तसेच या अंमलबजावणीची मुदत एक महिन्याची ठेवावी, अशी जी सूचना मांडली आहे त्यामुळे पोलीस कमिश्नरच्या अधिकाराचे क्षेत्र फक्त या जातीय दंग्याच्या कालापुरतेच मर्यादित राहील. ना. मुन्शी यांनीही आपल्या भाषणात या कायद्याचा जातीय दंग्याशिवाय उपयोग करण्यात येणार नाही, असे स्पष्ट आश्वासन दिले आहे. डॉ. आंबेडकरांची सूचना बहुमतानी पास झाल्यावर या बिलाचे पहिले वाचन पास झाले.



# १२९

# निवडून दिलेली माणसे आपले कर्तव्य करतात की नाही यावर पाळत ठेवा

नागपूर मुक्कामी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मंगळवार, तारीख १० मे १९३८ ला सकाळी मेलने आले. ते एका क्रिमिनल खटल्याच्या निमित्ताने आले होते. ते नागपूरात आले हे कोणालाही पाहिल्याशिवाय खरे वाटेना. कित्येकांनी गिरण्यातून रजा काढून स्वनेत्रांनी त्यांना बघितल्यावर खात्री केली व अशारितीने जनसमुदाय त्यांच्या दर्शनाकरिता हजारोंनी जमू लागला. आज कचेरीचे काम नसल्यामुळे थोडा विचारविनिमय करण्यास थोडी संधी मिळाली. तिचा फायदा घेऊन आपल्या दर्शनाचा लाभ करून देण्याकरिता रात्रीच्या वेळी आपला अर्धा तास देण्याची त्यांना विनंती करण्यात आली. स्वतंत्र मजूर पक्ष, नागपूर नगर आणि समता सैनिक दल वगैरे बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली चालणाऱ्या संस्थांनी इंदोरा येथे ताबडतोब जाहीर सत्कार करण्याची व्यवस्था केली. समारंभाच्यावेळी जोराचा वारा, जोराचा पाऊस व विजेचा कडकडाट असताना देखील बाबासाहेबांच्या दर्शनास लोकसमुदायाचे थवेच्या थवे जमू लागले. सत्यप्रसारक जलसा मंडळ, इंदोरा यांच्यातर्फे भव्य व्यासपीठ उभारण्यात आले. समता सैनिक दलाचे सैनिक आपल्या गणवेषात हजर झाले. या सभेला निदान वीस हजारावर स्त्री-पुरुष, आबालवृद्ध जमले व बाबासाहेबांच्या आगमनाची उत्कंठतेने वाट पाहू लागले. तोच रात्री साडेनऊ वाजता डॉक्टरसाहेबांची मोटार येताच सैनिकांतर्फे प्रथम बँडची सलामी व गार्ड ऑफ ऑनर देण्यात आले. बाबासाहेब व्यासपीठावर विराजमान होताच टाळयांचा कडकडाट व त्यांच्या नावाच्या जयघोषाने सर्व पटांगण दुमदुमून गेले. तेव्हा व्यासपीठावर येऊन श्री. आर. आर. पाटील, सेक्रेटरी, मध्यप्रांत आणि वऱ्हाड दलित फेडरेशन यांनी जमलेल्या लोकसमुदायाला उद्देशून म्हटले, '' बंधु भगिनींनो ज्या देवाची एक तासापासून मोठ्या उत्कंठतेने वाट पहात आहा, तो देव आपल्या सर्वांच्यासमोर विराजमान झाला आहे. त्यांना हार अर्पण करण्यास आपण उत्सुक झाला आहात. मी ज्यांची नावे सूचवीन त्या अनुक्रमाने आपण येऊन बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करा. '' स्वतंत्र मजूर पक्ष, नागपूर नगर दलित

---

जनता : १४ आणि २१ मे, १९३८.

फेडरेशन व समता सैनिक दलातर्फे हार अर्पण केल्यावर भारतीय सत्यप्रसारक जलसा मंडळ, बेझनबाग, आंबेडकर सोशल क्लब लायब्ररी, साहित्य चर्चा मंडळ, अस्पृश्य महिला वसतीगृह, आंबेडकर सहाय्यक समाज, विजयी समाज, महार नवयुवक दल, भानखेडा, बालवीर वाचनालय, सिरसपेठ, समताविजयी समाज, कुंभारपुरा वगैरे असंख्य गटांकडून हार अर्पण करण्यात आले, त्यांची यादी देणे स्थलअभावी कठीण होईल. यानंतर एक लहानसा पोवाडा डॉक्टरसाहेबांच्या कामगिरीवर श्री. बाबू मेश्राम इंदोरा यांच्यातर्फे म्हणण्यात आला व बाबासाहेबांना दोन उपदेशपर गोष्टी सांगण्याबद्दल विनंती करण्यात आली. क्षणार्धात सुई पडेल तिचा आवाज ऐकू येईल इतकी शांतता झाल्यावर बाबासाहेब बोलण्यास उठत आहेत हे पाहून जोराचा टाळयांचा कडकडाट व त्यांच्या नावाचा जयघोष केल्यावर बाबासाहेब म्हणाले,

बंधु भगिनींनो,

इतक्या अल्पावधीत वारा, पाऊस व विजांच्या कडकडाटात माझ्या अपेक्षेच्या बाहेर जमलेला लोक समुदाय पाहून मी आपल्या सर्वांचे अभिनंदन करतो. दुसरे असे की, मी ज्या कामाकरिता येथे आलो त्या कामाची मंडळी माझ्या मुक्कामाच्या ठिकाणी माझी वाट पहात आहेत. अशावेळी त्यांना जास्त वेळ तिष्ठत ठेवणे हे देखील मला योग्य होणार नाही. तरी आपला जास्त वेळ न घेता एक दोन गोष्टींचा उल्लेख करून मी माझे भाषण संपवीन. तुमच्या प्रांतात झालेल्या बेकीचा विचार करण्याकरिता मला आता वेळ नसल्यामुळे त्याचा विचार मी पुढे कधीतरी करीन. तुम्हास माहीत असेल की तुमच्या प्रांतात ज्या २० जागा मिळविल्या आहेत, त्या किती त्रासाने व कष्टाने मिळविल्या आहेत. तेव्हा त्या राखणे तुमचे कर्तव्य आहे. अस्पृश्य समाज गरीब व निर्धन आहे. त्याला राजकीय सत्ता हाती ठेवणे महाकठीण आहे. त्यातल्यात्यात काँग्रेस सारख्या मोठ्यां संस्थेशी टक्कर देणे अत्यंत कठीण आहे. तेव्हा अशा कठीण वेळी ही तुम्हास मिळालेली राजकीय सत्ता राखणे अत्यंत कठीण आहे. तुम्ही निवडणुकीच्या वेळी निवडून दिलेली माणसे आपल्या हिताचे कार्य करतात किंवा नाही हे पाहणे तुमचे कर्तव्य आहे. त्यांच्या कामावर पाळत ठेवणे, कौन्सिलमध्ये जे कार्य होते त्यात आपल्या हिताचे प्रश्न, ठराव वगैरे मांडतात किंवा नाही, हे पाहणे तुमचे कर्तव्य होय. प्रत्येक सेशनच्या शेवटी या लोकांनी केलेल्या कामगिरीचा जाब आज भरविलेल्या सभेप्रमाणे सभा बोलावून त्या सभेत त्यांना विचारू शकता. जे तुमच्या हिताचे कार्य करीत नाहीत त्यांच्याविरुद्ध ते ज्या कॉन्स्टिट्युअन्सीमधून निवडून आले असतील त्या

कॉन्स्टिट्युअन्सीमध्ये त्यांच्याविरुद्ध प्रचार करणे हे तुमचे कर्तव्य होय. जसे निवडून देणे हे तुमचे कर्तव्य आहे तसेच त्यांच्या कार्यावर नजर ठेवणे हे तुमचे आद्यकर्तव्य होय. यांच्यावर अशारीतीने पाळत ठेवल्याने ते भीतीने तरी कौन्सिलमध्ये कार्य करतील. अशारितीने तुमचे कार्य चालल्यास तुमच्या हिताचे बरेच कार्य होईल. आज मला वेळ नसल्यामुळे माझे भाषण येथेच संपविणे बरे होईल. असे म्हणून डॉक्टरसाहेबांनी आपले भाषण संपविले. यानंतर डॉक्टरसाहेबांचे व जमलेल्या मंडळीचे आभार मानल्यावर डॉक्टरसाहेबांच्या जयघोषात समारंभ संपला.



## १३०

# . . . . . तर आपली स्वतंत्र युनियन स्थापावी

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे तारीख ११ मे १९३८ रोजी नागपूर येथे सकाळी ८ वाजता विद्यार्थ्यांतर्फे स्वागत करण्यात आले. त्याप्रसंगी विद्यार्थ्यांनी विद्याभ्यास संपल्यावर समाज कार्य हाती घ्यावे व समाजाची सेवा करावी वगैरे आशयाचे त्यांचे भाषण झाले. १० वाजता पासून ४.३० पर्यंत कचेरीत गेले व नंतर संध्याकाळी ६ वाजता कामठी मुक्कामी श्री. हरदास एल. एन. यांच्याबरोबर जाहीर स्वागत करण्यात आले. लोकसमुदाय फार मोठा होता पण दुष्ट पावसाला ही गोष्ट खपली नाही व लोकांचा उत्साह दाबण्याकरिता त्याने आपले उग्र स्वरूप धारण केले. यामुळे समारंभ थोडक्यातच संपवावा लागला. लोकांना हार अर्पण करण्याकरिता वेळ नसल्यामुळे शेकडो हार मोटारीवर वरून टाकण्यात आले.

याप्रमाणे कामठीचा समारंभ संपवून आल्यावर त्यांच्या मुक्कामी बरीच कार्यकर्ती मंडळी जमली. त्यांच्यातील चर्चा जनतेच्या हिताच्या असल्यामुळे खाली देणे अयोग्य होणार नाही.

प्रथम जी. आय. पी. रेल्वे कामगारांनी आम्ही रेल्वेच्या युनियनमध्ये सामील व्हावे किंवा नाही म्हणून प्रश्न केले. त्यावर डॉक्टरसाहेब म्हणाले युनियन तुमच्या हिताचे कार्य करीत असेल तर तिचे सभासद सर्वांनी व्हावे. जर ही संस्था तुमचे हिताचे कार्य करीत असेल, तुमच्या हिताकरिता तुम्ही दिलेल्या वर्गणीतून एक पंचमांश भाग तुमच्या हिताकरिता राखून ठेवणे, तुमच्या संख्येच्या मानाने तुमचे प्रतिनिधी घेणे वगैरे गोष्टी राखीव करून तुमच्या हिताकरिता ठेवत असतील तर जरूर सर्वांनी भाग घ्यावा, नाही तर आपली स्वतंत्र युनियन स्थापावी. (हा प्रश्न गिरण्यातील कामगारांना देखील लागू आहे.) यानंतर नागपूर येथील कार्यकर्त्यांकडे त्यांचा मोर्चा फिरला व यावेळेला एम. एल. ए. सेक्रेटरी, सि. स्टे. सं. कमेटी, म्यु. सभासद, श्री. आर. आर. पाटील, सेक्रेटरी, मध्यप्रांत आणि वऱ्हाड फेडरेशन व इतर काही विरोधी पक्ष याशिवाय बरेच नागरिक हजर होते. ही खाजगी चर्चा रात्रीचे साडेबारा वाजेपर्यंत झाली. तिचा मुख्य व त्रोटक वृत्तांत खाली दिला आहे.

---

जनता : २१ मे १९३८.

विरोधी पक्ष व डॉ. बाबासाहेबांचा पक्ष यांच्यातील एकमेकांच्या वैगुण्याविषयी बरीच चर्चा झाल्यावर यावर रामबाण उपाय डॉक्टरसाहेबांनी खालील प्रमाणे सुचविला.–

(१) स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद हजारोंनी करा व ह्या पक्षाचे एकोप्याने बल वाढवा.

(२) दलित फेडरेशनचे कार्य जातीय ऐक्यापुरते ठेवा. [Optional]

(३) समता सैनिक दलातर्फे सार्वजनिक विहिरी व स्थळे हस्तगत करा.

यानंतर पक्षाचे तुकडे पाडणारांचे बरेचसे समर्थनपर भाषण झाले. पण बाबासाहेबांच्या स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होऊन सर्वांनी याच पक्षाखाली नवीन प्रतिनिधी निवडून एकच पक्ष ठेवावा व स्वतंत्र मजूर पक्षाचेच कार्य जोराने चालवावे व बाबासाहेबांच्या भाषणाने इतर विरोधी पक्ष दिपून गेले व आता लोकनियुक्त कारभार चालल्यास आमची गती काय होईल हे त्यांनाच समजेनासे झाले. डॉक्टरसाहेबांच्या नावाचा उपयोग करून स्वतःला आंबेडकर पक्षीय म्हणविणाऱ्या इतर मंडळींना आमची सूचना आहे की, आतातरी बाबासाहेबांची ही आज्ञा शिरसावंद्य मानून स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हावे व आपापले प्रतिनिधी निवडून देऊन सर्व नागपूरात एकच एक डॉ. बाबासाहेबांचा स्वतंत्र मजूर पक्ष कायम ठेवावा अशी श्री. आर. आर. पाटील यांनी अपेक्षा व्यक्त केली.



## १३१

# न्याय्य हक्कांसाठी तरुणांनी मरणही पत्करले पाहिजे

गेल्या ता. १० जानेवारी १९३८ रोजी मुंबई येथील असेंब्ली हॉलवर कोकणातील शेतकऱ्यांनी आपला ' मार्च ' करून आपल्या संघटनेचे जे बल दाखविले त्याची स्मृती अजून मुंबईकरांच्या स्मरणातून गेली नसेलच. स्वतंत्र मजूर पक्षाच्या नेतृत्वाखाली शेतकऱ्यांनी शिस्तीने व संघशक्तीने आपला मोर्चा असेंब्लीवर नेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पुढारीपणाखाली एका शिष्टमंडळाच्या वतीने ना. खेरांची मुलाखत घेतली. या मुलाखतीत कोकणातील शेतकऱ्यांना खोतांपासून होणाऱ्या असह्य त्रासाची, जोरजुलुमांची हृदयस्पर्शी कैफियत शेतकऱ्यांच्या प्रतिनिधींनी ना. खेरांपुढे निवेदन केली होती. शाब्दिक आश्वासनापलीकडे या मुलाखतीमध्ये विशेष काही घडले नव्हते. शेतकऱ्यांना कॉंग्रेस सरकारच्या ह्या आश्वासनाविषयी बिलकूल विश्वास वाटत नव्हता. या परिस्थितीतून आपला मार्ग कशा रितीने शोधून काढावा याचा विचार कोकणातील गांजलेला शेतकरी वर्ग व त्यांचे स्थानिक पुढारी करीत होतेच. तसेच स्वतंत्र मजूर पक्षाचे सन्माननीय पुढारी व श्रमजीवी वर्गासाठी धडाडीने कार्य करावयास पुढे सरसावलेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर कोकणात दौरा काढून शेतकऱ्यांची प्रत्यक्ष परिस्थिती अवलोकन करणार ही बातमी कळताच येथील स्थानिक पुढाऱ्यांनी त्यांच्या दौऱ्याची रूपरेषा आखली आणि त्याप्रमाणे डॉ. आंबेडकरसाहेब आपले सहकारी मित्र मे. भाई चित्रे, सुरेंद्रनाथ टिपणीस, डी. व्ही. प्रधान वगैरे मंडळीसह या दौऱ्यासाठी गेल्या आठवड्यात कोकणात गेले.

कोकणातील लोकसंख्या जवळ जवळ १३ लाखांवर असून येथील कुणबी, महार, मराठेही ८ ते १० लाख शेतकरी जनता खोतीशाहीच्या जुलमी अंमलाखाली आपले आयुष्य कंठीत आहे. यासाठी या खोतांच्या जुलमी कारभारावर प्रकाश पाडण्यासाठी स्वतंत्र मजूर पक्षाने आखलेल्या या दौऱ्यातील मुख्य व मोठ्या सभा खोतांच्याच बालेकिल्ल्याच्या ठिकाणी घेण्यात आल्या.

### कणकवलीची पहिली प्रचंड सभा

या विभागात लॉऊड स्पीकर वगैरेच्या सहाय्याने अशा मोठ्या प्रचंड समुदायाच्या सभा भरल्याचे कधीच ऐकिवात नाही. परंतु कोकणातील महारादी अस्पृश्यांची पहिली प्रचंड सभा, ता. १४ मे १९३८ रोजी मु. कणकवली

---

जनता : शनिवार २८ मे आणि ४ जून १९३८.

येथे भरली. येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जे स्फूर्तिदायक भाषण केले ते अस्पृश्यांच्या अंगी नवचैतन्य उत्पन्न केल्याशिवाय राहिले नाही.

प्रथम डॉ. बाबासाहेबांनी आपल्याला एक दिवस येण्यास उशीर झाल्याबद्दल खुलासा करून सर्वांना एक दिवस तिष्ठत राहावे लागले याबद्दल खेद व्यक्त केला. नंतर ते म्हणाले,

या ठिकाणी मला निराळ्यातऱ्हेचे भाषण करावे लागणार आहे. ते असे की ज्या दिवसापासून मुंबईत इंग्रजांचा पाय पडला त्या दिवसापासून आपल्या महार समाजाला नशीब काढायला वाव मिळाला. इंग्रजांच्या राज्यामुळे आपल्याला नशीब काढण्याचा मार्ग मोकळा झाला. इंग्रज परदेशातून आले. त्यांच्याजवळ सैन्य शिपाई नव्हते व सैन्य उभे केल्याशिवाय राज्य मिळण्याची आशा नव्हती. पेशव्यांच्या राज्यात वरच्या वर्गांना मोठेपणा व सुखसंपत्ती मिळू शकत असल्यामुळे इंग्रजांच्या सैन्यात वरचा वर्ग जात नव्हता. अस्पृश्यादी पददलित वर्गाला पेशवाईत अगदी अमानुषपणे वागविले जात होते. मनुष्य म्हणून जगण्याचा त्यांना जणू काय हक्कच नव्हता. शूराची जात असून पददलितपणामुळे त्यांचे चीज पेशवाईत झाले नाही. इंग्रजांच्या सैन्य भरतीमध्ये शिरण्याशिवाय महार, मांग व चांभारांना गत्यंतर नव्हते.

हिंदुस्थानात इंग्रजांनी राज्य कमावले ते महार-मांग-चांभारादी अस्पृश्य वर्गीय शूर सैनिकांच्याच मदतीने. त्याला इतिहासाची साक्ष पटवून द्यायची म्हणजे कोरेगावला जो मनोरा बांधला आहे त्यावरून कळून येईल. नाहीतर इंग्रजांना या देशाचे राज्य कधीच मिळाले नसते. त्याचा परिणाम चांगला की वाईट हे आपणाला माहीत आहेच. पेशवाईच्या काळातील अशी गोष्ट सांगण्यात येते की महारांना राजरोसपणे रस्त्यातून फिरण्याची मुळीच मोकळीक नव्हती. एखादा महार रस्त्यावर थुंकला व त्यावर एखाद्या ब्राह्मणाचा पाय पडल्यास तो विटाळतो, त्याला पुन्हा स्नान करावे लागते. यासाठी महाराच्या गळयात मडके बांधीत असत. महार ओळखता यावा म्हणून त्याच्या हाताला काळा दोरा बांधावा लागत असे. कुत्र्या-मांजराइतकीसुद्धा किंमत महाराला नव्हती. परंतु इंग्रजांच्या सैन्यभरतीमुळे महारांच्या परिस्थितीत बदल झाला. त्यांना माणुसकीने वागविले जाते याचा अनुभव मिळाला. अशा इंग्रजांच्या राज्याच्या पहिल्या आमदानीत शे-सव्वाशे सुभेदार, त्याहुन कितीतरी जास्त जमादार-हवालदार होऊन गेले. पूर्वी गावातील मराठा ज्यांची सावली घेत नव्हता तोच सैन्यात दाखल झाल्यावर त्याच्याच गावच्या महार सुभेदाराला त्याला सलाम करावा लागत होता. हा सारा इतिहास आपल्या फुशारकीकरता किंवा बडेजावाकरता मी सांगत नाही. १८९६ साली इंग्रज सरकारने महार लोकांची सैन्यात भरती करणे

बंद केले. त्यामुळे हुद्यावर जाण्याची बंदी झाली. ज्या इंग्रज सरकारकरिता भात शिजवून देऊन पेज आपण खाल्ली, आपले रक्त सांडले त्यांनीच आम्हाला बंदी का केली, असा प्रश्न उभा राहतो. परंतु यात इंग्रजांचा काही दोष नसून तुमचा-आमचा आहे. महार जात ही अत्यंत दलित जात. या जातीला कोणत्याच प्रकारचा मानसन्मान नाही. अशाप्रकारचा इसम इंग्रज सरकारच्या अधिकारावर चढल्यास मराठा, क्षत्रिय अशा वरच्या वर्गातील लोकांना त्यांना सलाम करावा लागल्याने बंड-बेबंदशाही माजेल यामुळे त्यांना फलटणीत बंदी झाली. तेव्हापासून करंडी हाती घेऊन भीक मागण्याचा धंदा पत्करावा लागला आहे.

आज येथे आलेल्या सर्व तरुणांनी यापुढे आम्ही मेलेल्या गुरांना हात लावणार नाही व उष्टे खाणार नाही, अशी प्रतिज्ञा केली पाहिजे. बायांनी व तरुणांनी या गोष्टी अंमलात आणण्यासाठी प्राण गेला तरी हरकत नाही, अशी वृत्ती दाखविली पाहिजे. (टाळया.) वरिष्ठ वर्गाची याचना करण्याचा दीनवाणा कारभार यापुढे आपण बंद केला पाहिजे आणि यापुढे कायद्याने दिलेले हक्क आम्ही प्राण गेला तरी बजावण्यासाठी तयार असले पाहिजे. आज महारांची वीस लाख वस्ती आहे. यातील अधिकार गाजविण्यासाठी एक लाख माणसे मेली तरी काय बिघडले ? मला म्हाताऱ्यांना सांगण्यापेक्षा तरुणांना सांगावयाचे आहे की तुम्ही आज न्याय्य हक्कांसाठी मरणाचे द्वारी जाण्यास तयार राहायला पाहिजे.

आता शेवटची एक गोष्ट सांगावयाची आहे. या देशात नवीन राजकारण सुरू झाले आहे. या देशात इंग्रजांचे राज्य सुरू आहे ही भावना खरी नाही. १९३५ सालापर्यंत इंग्रजांची सत्ता होती. परंतु १९३५ सालच्या कायद्याने ती लोकांच्या स्वाधीन करण्यात आली आहे. या सत्तेचा फायदा कोणाला होईल हे ज्याच्या त्याच्या राजकारणपटुत्वावर अवलंबून आहे. काही काळापूर्वी तुम्ही प्रसंगानिमित्त कलेक्टरकडे, मामलेदाराकडे अर्ज केल्यास ते त्याचा विचार करीत असत पण आज तसा अर्ज केल्यास ते सांगतील ' आज सत्ता आमचे हातात नाही, कायदेकौन्सिलच्या हातात आहे. ' ही गोष्ट खरी आहे. कायदेमंडळाच्या कार्यावर बारकाईने लक्ष ठेवा. कोणता ठराव पास झाला, कोणता नापास झाला याची बारकाईने चौकशी करा. अस्पृश्य लोकांकरिता १५ जागा आहेत. हे लोक काय करतात याकडे लक्ष देऊन त्यांना आणखी जास्त लोक कसे येऊन मिळतील व बहुमत कसे होईल इकडे लक्ष दिले पाहिजे. जास्त लोक मिळविण्यासाठी मी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली आहे. तो आज जरी लहान असला, त्याची संख्या कमी असली तरी त्याची वाढ होण्यासाठी प्रयत्न करा. अत्यंत मोठी अशी एक प्रबळ संस्था आपल्या

इलाख्यात आहे. ती काँग्रेस होय. काँग्रेस कितीही मोठी असली तरी ती गोरगरिबांचे कल्याण करू शकत नाही, हे लक्षात ठेवा. कोणत्या वर्गापासून तुम्हाला हित होते ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ज्यांनी आपली माणूसकी हिरावून घेतली ते शेठजी-भटजी होत आणि आज आपल्याला अन्न मिळत नाही ते याच वर्गामुळे आणि याच वर्गामुळे आपण या स्थितीला पोहोचलो आहोत.

सर्व ब्राह्मणेतर कुणबी वर्गास सांगावयाचे आहे की, तुम्ही काँग्रेसमध्ये जाऊ नका. तुम्ही आम्ही त्रासले-गांजलेले लोक एक आहोत. तसेच एक होऊ या. काही लोक असे म्हणतात की, ' मी साम्राज्यशाहीविरुद्ध नाही. मला इंग्रज सरकारला घालवून देण्याची बिलकूल इच्छा नाही. ' पण ते बरोबर नाही. शेठजी-भटजी हे घरचे चोर आहेत. त्यांची लबाडी बंद केली पाहिजे. आपण आपल्या पायावर उभे राहिल्यास त्याला वेळ लागणार नाही. इंग्रज बोटीत बसून जाणार ! तेव्हा त्यांना घालविणे आवश्यक की खोत-सावकारांना ? या घरातील चोरांशी आपणाला लढा दिला पाहिजे. तुम्हाला इंग्रज सरकार नको असेल तर ते मलाही नको आहे.

ब्राह्मणेतर वर्ग आज जो काँग्रेसमध्ये सामील होत आहे त्या वर्गाच्या पुढाऱ्यांना माझे हे म्हणणे पटत नाही. त्यांना आज जरी नाही तरी येत्या पाच वर्षात ते पटून ते आमच्या पक्षात सामील होतील हे लक्षात ठेवा. (टाळया) खोती पद्धती ही एक गुलामगिरी आहे. याबाबतीत किती अन्याय होतात, किती दुःखे भोगावी लागतात हे तुम्हाला ठाऊक आहे. खोती नष्ट करण्याबाबत काँग्रेसने पुढाकार घेतला नाही. यावरून काँग्रेस कोणाची हे तुमच्या लक्षात येईल. काँग्रेसची बढती यापुढे होणार नाही. स्वतंत्र मंजूर पक्ष हे झाड आज लहान असले तरी ते झपाट्याने वाढणार आहे. तुम्ही त्याच्या छायेला बसणार असून सर्व ब्राह्मणेतर श्रमजिवी जनताही बसणार आहे .

वरील आशयाचे डॉ. आंबेडकरांचे भाषण झाल्यावर परिषदेपुढे (१) मेलेली गुरे न ओढण्याबद्दल, (२) पाण व बेले हे महारातील भेद नष्ट करण्याबद्दल, (३) खोती नष्ट करणे व महार वतन या बिलांना पाठिंबा देणे, (४) हॉटेल किंवा उपहारगृह यात स्पृश्य हिंदुप्रमाणे व्यवस्था न झाल्यास त्यावर बहिष्कार घालण्याबाबत, (५) महार सेवासंघाच्या ठिकठिकाणी संघ व शाखा निर्माण करण्याबाबत, (६) महारकीची कामे बंद पाडली गेली असतील ती दुसऱ्याने न करणे, (७) दर गावाने ८ आणे वर्गणी भरून संघाचे पाठबळ वाढविणे वगैरे सात ठराव पास झाले.

• • •

## १३२

# बहुसंख्यांक असा शेतकरी व कामकरी वर्ग या देशाचा खरा सत्ताधारी वर्ग बनला पाहिजे

दिनांक १४ मे १९३८ च्या कणकवली येथील परिषदेनंतर येथून १०० मैलांवर असलेल्या देवरूख येथे शेतकऱ्यांची सभा भरविण्यात आली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या प्रमुख पुढारी मंडळीसहित ता. १५ मे १९३८ रोजी दुपारी एक वाजता मोटारीने आले. येथे डॉ. आंबेडकरांचे स्वागत करण्याकरिता ४-५ हजार शेतकरी बांधव मोठ्या उत्सुकतेने त्यांची वाटच पाहात होते. या सभेत स्पृश्यास्पृश्य शेतकरी बांधवांबरोबर मुसलमान शेतकरी बांधवही हजर होते ही गोष्ट विशेष होय.

या सभेत भाई चित्रे, डी. व्ही. प्रधान, सुरबा टिपणीस, भास्करराव कोवळे, घाटगे वगैरे पुढारी मंडळींची जोरदार भाषणे झाली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या भाषणात स्पष्टपणे सांगितले की,

आपला उद्देश खोती बिल पास करणे व शेतकरी वर्गाची गरीब परिस्थिती सुधारणे हा आहे. शेतकऱ्यांनी आपला सनदशीर लढा लढावा व तो लढत असता सर्व बाजूनी शेतकऱ्यांनी आपली संघटना करावी. काँग्रेसने जर खोती बिल नामंजूर केले तर पुढे सत्याग्रहरुपी मोहीमेस शेतकऱ्यांनी सज्ज असावे. कुणबी वर्गाने याहीपेक्षा मोठ्या संख्येने स्वतंत्र मजूर पक्षाला येऊन मिळावे. कारण हाच पक्ष गरीब, कामकरी, शेतकरी वर्गाचे हित साधणारा आहे. उलट काँग्रेस ही सावकार, खोत व पांढरपेशे यांची आहे. कारण ती त्यांच्या पैशावर जगत आहे म्हणून तिच्या मार्फत शेतकऱ्यांचे भले होईल अशी आशा शेतकऱ्यांनी बिलकूल बाळगू नये. तेव्हा सर्व जाती, पंथ भेद दूर ठेऊन सर्व शेतकऱ्यांनी हा लढा जोराने व संघटीतपणे व शिस्तीने लढावा. आपला लढा खऱ्या तत्त्वाचा आहे. हिंदी राजकीय सत्ता शेठजी, भटजी, सावकार, जमिनदारादी भांडवलवाल्यांच्या काँग्रेसच्या हाती जाण्यापेक्षा खऱ्या श्रमजिवी वर्गाच्या हाती गेली पाहिजे. बहुसंख्यांक असा शेतकरी व कामकरी वर्ग या देशाचा खरा सत्ताधारी वर्ग बनला पाहिजे आणि याच दृष्टीने आमचा स्वतंत्र मजूर पक्ष धडाडीने कार्य करावयास पुढे सरसावला आहे.

---

जनता : २८ मे आणि ४ जून १९३८.

सभा ' जय आंबेडकर ' व ' खोतीशाही नष्ट हो ' ह्या जयघोषात बरोबर ५.३० ला बरखास्त झाली.

नंतर त्याच दिवशी संध्याकाळी अरवली, (ता. संगमेश्वर) येथे सायंकाळी ७ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर, आमदार घाटगे व आमदार चित्रे यांची शेतकऱ्यांना आपला लढा असाच सनदशीरपणे लढावा व स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हावे वगैरे विषयांवर भाषणे होऊन सभा ८ वाजता आटोपली. नंतर सर्व मंडळी डॉ. बाबासाहेबांसहीत चिपळूण येथे डाक बंगल्यात रात्री ९ वाजता पोहचली. तेथे नाईस्कर बंधूंनी सर्व पाहूणे मंडळीला सुग्रास जेवण दिले. नंतर १६ तारखेला सकाळी श्री. गडकरी वकील यांनी पाहुणे मंडळीला अल्पोहार दिला व सर्व मंडळी बाबासाहेबांसहीत स्वतंत्र मजूर पक्षाचे ऑफिस पहाण्यास गेली. स्वतः बाबासाहेबांनी चिपळूण शाखेची ऑफिस तपासणी केली व सर्व व्यवस्था नीट पाहून बाबासाहेब व पाहुणी मंडळी श्री. नाईस्कर यांच्या निवासस्थानी दुपारी जेवणास गेली. तेथे विश्रांती घेतल्यावर मंडळी १.३० ला गुहागर पेठा येथे जाण्यास निघाली. गुहागर येथे २.३० ला डाक बंगल्यात सर्व मंडळी पोचली. श्री. आसगोलकर, पोलीस पाटील यांनी ओले नारळ व आंबे यांचा पाहुणे मंडळीला अल्पाहार दिला. थोडी विश्रांती घेतल्यावर बाबासाहेब व पाहुणे मंडळी सभेच्या ठिकाणी ३.३० ला आली. सभेत आमदार घाटगे, भाई कोवळे, भाई टिपणीस यांची भाषणे झाली व डॉ. बाबासाहेब यांनी आपल्या भाषणात शेतकऱ्यांना आपली गरीब परिस्थिती कशी सुधारावी व सर्व शेतकऱ्यांनी संघटीत होऊन ह्या जूलमी खोती पद्धतीला समूळ नष्ट करून टाकले पाहिजे, तरच शेतकऱ्यांची ही दीन अवस्था बदलेल असे सांगून काँग्रेसने जर खोती बिल पास केले नाही तर पुढील लढा कसा लढावा ह्याबद्दल थोडक्यात सूचना दिली. सभा ' आंबेडकर घोषात ' व ' खोती पद्धती नष्ट होवो ' ह्या घोषात बरखास्त झाली. नंतर बाबासाहेब व पाहुणे मंडळी गुहागर पेठेतील श्री. खोत यांचे घरी अल्पोहारास्तव थांबली. थोडी विश्रांती घेतल्यावर मंडळी ६ वाजता गुहागरहून निघाली ती थेट चिपळूण येथे सभामंडपात ७.३० ला आली. प्रथमतः भाई कोवळे यांचे भाषण झाल्यावर आमदार घाटगे यांनी शेतकरी बंधुंना डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सध्या शेतकऱ्यांसाठी दौरा काढण्याचे महत्त्व समजावून दिले व शेतकऱ्यांनी याहीपेक्षा जास्त जमावाने सभेला हजर राहावे व स्वतंत्र मजूर पक्षाचे निशाणाखाली जमून खोती पद्धत नष्ट करण्यास डॉ. बाबासाहेबांस मदत करावी असे सांगितले. दुसऱ्या दिवशी सकाळी चहा घेतल्या नंतर सर्व मंडळी ८ वाजता चिपळूणहून निघाली, वाटेत परशराम देऊळ पाहाण्यास मंडळी गेली. देऊळ पाहून झाल्यावर देवळाचे ट्रस्टी यांचेयेथे डॉक्टरसाहेब व पाहुणे

मंडळी यास चहा, अल्पोहार देण्यात आला. नंतर ९.३० ला परशरामहून मुक्काम हलविण्यात आला तो थेट खेड येथे डाक बंगल्यात मंडळी येऊन पोहचली. श्री. जाधव यांनी पाहुणे मंडळीला चहा व अल्पोहार दिला. तेथे डॉक्टरसाहेब व पाहुणे यांनी २ वाजेपर्यंत विश्रांती घेतली व सभेचे ठिकाणी (खेड) सभामंडपात दाखल झाली. प्रथमतः श्री. खांबे, तालुका सेक्रेटरी व आमदार घाटगे यांनी भाषणास सुरुवात केली व शेतकऱ्यांना आपला लढा सनदशीर मार्गाने लढावा व डॉ. बाबासाहेबांच्याच नेतृत्वाखाली विजय मिळवावा, अशा तऱ्हेने थोडक्यात भाषण केल्यावर बाबासाहेबांनी भाषणास सुरवात केली. सभेत ' आंबेडकर की जय ' ' खोतीशाही नष्ट हो ' वगैरे जयघोष होऊ लागले. बाबासाहेबांनी शेतकऱ्यांना संघटित होण्यास व पक्षाची संख्या वाढवण्यास उपदेश केला व त्यांनी मांडलेले खोती बिल जर नापास झाले तर पुढे शेतकऱ्यांनी काय करावे याची त्यांना आगाऊ सूचना दिली व शेतकऱ्यांनी न्यायाने व सनदशीरपणाने वागून आपला सध्याचा लढा लढावा. कारण दुसऱ्या कोणत्याही मार्गानी शेतकरी वर्गाचा लढा यशस्वी होणार नाही. स्वतंत्र मजूर पक्षावर पूर्ण विश्वास असू द्यावा व हाच पक्ष तुम्हा शेतकरी वर्गाचे व गरीब जनतेचे हित करणार आहे. इतर कोणत्याही पक्षावर विश्वास ठेऊ नका. यानंतर श्री. चित्रे, टिपणीस, प्रधान यांनी आपल्या भाषणात शेतकऱ्यांनी संघटित व्हावे व डॉ. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली शेतकऱ्यांनी सध्याचा लढा लढावा अशी उपदेशपर भाषणे करून स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हावे असे सांगून आपली भाषणे संपविली. नंतर सभा संपून बाबासाहेब व पाहुणे मंडळी खेडहून दापोलीस जाण्यास निघाली. वाटेत फूरूस मुक्कामी (आमदार घाटगे यांचे घरी) सुभेदार घाटगे व गावपुढारी, स्काऊट व गावातील काही प्रमुख खोत डॉ. बाबासाहेबास सामोरा आली, पुढे ' आंबेडकर झिंदाबाद ' वगैरे जयघोषात फुरूस महारवाड्यात जेवण्यास आली. येथे श्री. सुभेदार घाटगे, पेन्शनर गणपत सोनु गमरे या वृद्ध पुढाऱ्यांनी पाहूण्यांची योग्य ती बडदास्त राखली व जेवण झाल्यावर डॉ. बाबासाहेब व पाहुणे फुरूस गावच्या आखाड्याचे मर्दानी खेळ पहाण्यास थांबले. नंतर डॉ. बाबासाहेब स्काऊट सहित रस्त्यापर्यंत चालत गेले व डॉ. बाबासाहेबांच्या ' जयजयकार ' व ' खोतीशाही नष्ट हो. ' अशा जयघोषानी फुरूस गावातील मुसलमान खोत फार हादरून गेले. कित्येक खोत बाबासाहेबांचे दर्शन दडून घेत होते. स्काऊटची व आखाड्याची व्यवस्था श्री. भी. गो. घाटगे व माधवराव फुरीसकर, गमरे यांनी उत्तम रीतीने राखिली होती. डॉ. बाबासाहेबांची दौऱ्यात प्रथमतः ओवाळणी मुक्काम फुरूस येथे सुहासीनी सुभेदारीण लक्ष्मीबाई घाटगे,

सौ. गंगुबाई गमरे व सौ. मुक्ताबाई घाटगे यांनी केली व नंतर कु. मुक्ताबाई घाटगे यांनी मंगल पद सुस्वर सुरात गाईले. ५.३० वाजता डॉ. बाबासाहेब व पाहुणे मंडळी फुरसाहून निघाली. जातेवेळी सुभेदार घाटगे व पेन्शनर गणपत गमरे यांनी सर्वास निरोप दिला. दापोलीला काळकाईचा कोड येथे डॉ. बाबासाहेबांची व पाहुणे मंडळीची उतरण्याची सोय करण्यात आली होती. तेथे चहा घेतल्यावर अध्यक्ष व पाहुणे मंडळी सभेच्या ठिकाणी ८ वाजता पोहोचली.

## दापोलीची जाहीर सभा

नंतर सभेस सुरवात झाली. प्रथमतः सेक्रेटरी श्री. खांबे यांनी थोडक्यात डॉ. बाबासाहेबांच्या दौऱ्याबद्दल माहिती देऊन सभेस सुरवात केली. डॉ. बाबासाहेब हे स्वतः भाषण करण्यास उठले. पण मागील सभेच्या भाषणामुळे त्यांचा गळा एवढा बसला होता की, शेवटी त्यांस बोलता न आल्यामुळे भाई चित्रे हेच आपल्याला मी जे काही सांगणार आहे तेच त्यांच्या तोंडून ऐकावे एवढे बोलून बाबासाहेब खुर्चीवर बसले. नंतर चित्रे ह्यांनी दौऱ्याची सविस्तर हकीगत सांगून डॉक्टरसाहेबांच्या प्रकृतीवर किती परिणाम झाला हे दर्शविले व डॉ. बाबासाहेबांना जे काही शेतकऱ्यांना सांगावयाचे होते ते त्यांनी उत्तम रीतीने जमलेल्या समुदायाला पटवून दिले. शेतकऱ्यांना होत असलेला खोतांचा जुलूम निदान खोती बिलाचा निकाल लागेपर्यंत तरी सोशीला पाहिजे. कारण आज काँग्रेस सरकार, अंमलदार, कोर्ट कचेरी सर्व खोतांच्या, शेठ सावकरांच्या बाजूला आहे. पण आपला हा लढा असाच नेटाने, एकीने लढंत ठेवावा व त्यासाठी वेळप्रसंगी प्राणांची आहुतीही देण्याचा प्रसंग आला तरीही मागे हटले न पाहिजे. हेही करून भागणार नाही तेव्हा काँग्रेसप्रमाणे आपणही आपले हक्क शाबीत करण्यासाठी तुरुंगही भोगला पाहिजे. शेवटी पावसाळ्यानंतर ह्या खोती बिलाचा काय निकाल लागतो त्यावर पुढील लढा अवलंबून राहील. तरी सध्या निराश न होता एकी व सहनशीलता ठेऊन सध्याचा लढा लढावा. नंतर भाई टिपणीस, प्रधान, चिटणीस व कोवळे यांची जोरदार व उपदेशपर भाषणे झाली. शेवटी आमदार घाटगे ह्यांनी आपल्या जबाबदारीवर दौरा पार पाडण्याची जबाबदारी उत्तम रीतीने पार पाडली. सर्व स्थानिक पुढारी व कार्यकर्ते ह्यांनी ह्या कामी त्यांना मदत केली. त्याबद्दल स्वतंत्र मजूर पक्षातर्फे भाई चित्रे यांनी सर्वांचे आभार मानले व आमदार घाटगे यांनी डॉ. बाबासाहेब व पाहुणे मंडळी यांनी आपला अमूल्य वेळ खर्चून या भागात दौरा काढला ह्याबद्दल आभार मानून अध्यक्षांना पुष्पहार घातला व भगिनी समाजातर्फेही अध्यक्षांना पुष्पहार घातला.

या सर्व सभांमध्ये १० ते १५ हजारांपर्यंत कुलवाडी महार, मुसलमान वगैरे सर्व जातीचे, धर्माचे शेतकरी बांधव मोठ्या प्रेमाने, उत्सुकतेने, आस्थेने आणि संघटनेने हजर राहिले होते. . प्रत्येक सभेत २०-२०, २५-२५ मैलांवरून कित्येक शेतकरी आलेले होते.



## १३३

# जीवनात सर्वोच्च स्थानप्राप्तीची महत्त्वाकांक्षा जोपासा

तारीख १६ मे १९३८ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे चिपळूण मुक्कामी अत्यंत स्फूर्तिदायक भाषण झाले. डॉ. साहेबांच्या भाषणापूर्वी श्रीमती रत्नाबाई हिचे भाषण झाले. ती म्हणाली, " आमच्यावर खोतांचा भयंकर जुलूम होत असून, आता तो असह्य झाला आहे. तुम्ही आता येथे सभा घेऊन खेड, दापोली येथे जाल व तेथून मुंबईस परत फिराल. आम्ही मात्र येथे कायमचेच राहाणार आहोत. तुम्ही गेल्यावर आमचा छळ कायम राहील. अशा स्थितीत तुम्ही आमच्यासाठी काय करीत आहा ? तरीपण मला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कामगिरीविषयी आशा वाटते " वगैरे. या भाषणानंतर कॉंग्रेस पक्षियांकडून कुत्सित अर्थाने टाळया वाजविल्या गेल्या.

उत्तर देताना बाबासाहेब म्हणाले,

खरोखर येथे तुम्हा शेतकऱ्यांजवळ राहून तुमची यथाशक्ती सेवा करण्यात मी धन्यताच मानली असती. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही की तुमच्याप्रमाणेच मलाही माझा व्यवसाय आहे व तो व्यवसाय केल्याशिवाय माझा पोटापाण्याचा प्रश्न सुटत नाही. माझा व्यवसाय मोठ्या दर्जाचा असला तरी मी बांधलेला आहे. माझा जन्म गरीब परिस्थितीत झाला. माझेवर वडिलांच्या ३-४ हजार रुपये कर्जाचा बोजा होता. सांगण्याचा हेतू की, मी गर्भश्रीमंत नाही. त्यामुळे माझ्या इच्छेविरुद्ध तुम्हाला सोडून माझ्या व्यवसायाकरिता मला मुंबईस जाणे भाग आहे.

आताच रत्नाबाईच्या भाषणानंतर काही गृहस्थांनी टवाळी करण्याच्या उद्देशाने टाळ्या वाजविल्या. त्यांच्या टाळयांचा अर्थ मी असा समजतो की त्यांच्या दृष्टीने आपल्या पक्षाची परस्पर ' हजामत ' झाली. परंतु मी विचारतो की या लोकांना टाळया वाजविण्याचा काय हक्क आहे ? आम्ही जरी मुंबईस राहांत असलो तरी हे बाराही महिने येथेच राहातात. त्यास काय तुमची दुःखे दिसत नाहीत ? त्यास तुमची दुःखे जरुर माहीत आहेत परंतु त्यास तुमच्याकरिता काहीही करावयाचे नाही. काही खोत कुळास म्हणतात की, ' तुझा आंबेडकर

---

जनता : २८ मे, १९३८.

काय करतो ते पाहून घेईन ' हे खोत त्यांची व माझी लायकी सारखी समजतात की काय ? कोणताही खोत माझेपुढे आल्यास बुद्धीने मी सहजासहजी त्याचा पाडाव करीन. ते माझी व त्यांची स्वतःची तुलना करीत असल्यास मी म्हणेन की कोठे मी हिमालय पर्वत व कोठे हा मुतखडा ! मी श्रीमंत नसलो तरी आतापर्यंतचे माझे आयुष्य अत्यंत निर्मळ असे आहे व माझे दृष्टीने तुमचे हितास आवश्यक वाटते ते मी करीत आलो आहे आणि करीत राहणार .

निवडणुकीचे वेळेस कॉँग्रेसने जी वचने दिली त्यापैकी कोणती पाळली आहेत ? कॉँग्रेसने आतापर्यंत जी बिले पास केली त्यात शेतकऱ्यांच्या हितसंबंधाचे काय आहे ? उलट खोती बिलासारखे महत्त्वाचे बिल गेले १० महिने कॉँग्रेस लांबणीवर टाकीत असून निवडणुकीचे वेळी दिलेल्या वचनास हरताळ फासत आहे. आज मी कॉँग्रेसमध्ये गेल्यास तेथे मला योग्य स्थान मिळणार नाही अगर तेथे माझी प्रतिष्ठा राहणार नाही, असे तुम्हास वाटते काय ? मी कॉँग्रेसमध्ये गेल्यास माझ्या बुद्धीचे जोरावर तेथेही माझी छाप पाडल्याशिवाय व मानाचे स्थान प्राप्त करून घेतल्याशिवाय राहणार नाही, अशी माझी खात्री आहे. गांधींचे प्राण कोणी वाचविले ? मी वाचविले. परंतु गांधींची ही कॉँग्रेस गरिबांच्या कल्याणाकरिता नाही, अशी माझी ठाम समजूत झाल्यामुळे मी कॉँग्रेसमध्ये जाण्यास तयार नाही. गांधींच्या व्यक्तित्वापुढे सुभाष बोस, पं. जवाहरलाल नेहरू यांनी आपली मान वाकविली, परंतु गांधींची माझेवर केव्हाच छाप पडली नाही. कॉँग्रेस ही आतापर्यंत 'भटजी शेठजींच्या' पैशावर पोसली जात असल्यामुळे ती त्यांची 'बटीक' होऊन राहिली आहे. जो ज्यांचे अन्न खातो तो त्यांचा मिंधा असतो. मग तुम्हीच सांगा शेठसावकारांच्या पैशावर पोसलेली ही कॉँग्रेस त्यांचे विरूद्ध कशी जाईल ? आजपर्यंत 'भटभिक्षुक' वर्गाने तुमचेकरिता काय केले आहे ? तुम्ही लोकांनी त्यांच्या घरची भांडी घासणे व त्यांच्या बायकांची लुगडी धुणे याखेरीज काय केले आहे ? आज सरकारी नोकरीत कोणते लोक आहेत ? आज कोठेही जा जज्ज, मामलेदार, मुनसफ, कलेक्टर हे सर्व पांढरपेशा वर्गाचे आहेत. आज तुमची संख्या शेकडा ८० पेक्षा जास्त असताना सरकारी नोकरीत तुमचे इतके थोडे लोक असावेत हे कशाचे निदर्शक आहे ? मला तुमच्यापैकी प्राईम मिनिस्टर झालेला पाहावयाचे आहे. मला या मूठभर भटजी शेठजीचे राज्य नको असून तुम्हा ८० टक्के लोकांचे राज्य हवे आहे.

आज तुम्ही खोतांच्या जुलूमामुळे भीरू व भेकड बनला आहात. खोताने नुसते तुमचेकडे पाहिल्यास तुमचे अंगाचा थरकाप होतो. परंतु आता ही भीती सोडून त्याने ' अरे ' म्हटल्यास तुमची 'कारे' म्हणण्याची तयारी झाली पाहिजे व त्याने काठीने मारल्यास तुमचीही काठी उचलण्याची तयारी पाहिजे. प्रत्येक मनुष्यास स्वसंरक्षणाचा कायदेशीर अधिकार असतो. हे मी तुम्हास बॅरिस्टर या नात्याने सांगतो. या सर्व गोष्टी तुम्हास स्वतःच करण्यास शिकले पाहिजे. कारण प्रत्येकाचे मदतीस आम्हास पोलिसशिपाई देता येणार नाहीत. आज तुम्ही सर्वांनी जातीभेद, धर्मभेद विसरून खोतशाहीस नामशेष केले पाहिजे. सर्व कुळांनी आपली एकच जात आहे, असे समजले पाहिजे. तसेच खोताने महार कुळाकडून जमीन काढली तर ती कुळवाडी अगर मुसलमान कुळाने करू नये. तसेच कुळवाड्याकडून काढल्यास महार अगर मुसलमान यांनी करू नये. मुसलमान कुळाकडून काढल्यास महार अगर कुळवाडी यांनी करू नये. आज खोत तुमच्यावर जुलूम करीत असले तरी ती त्यांची शेवटची धडपड आहे, हे विसरू नका. मनुष्य मरताना हातापायाची जास्त धडपड करीत असतो. स्वतंत्र मजूर पक्षाने तुमच्याकरिता खोती बील आणले आहे, हे तुम्हास माहीत असेलच. परंतु आज कायदे मंडळात काँग्रेसचे बहुमत असल्यामुळे हे ' खोती बिल ' पास होईलच, अशी हमी देता येत नाही. परंतु हे बिल पास झाले नाही तर माझ्याकडून हुकूम झाल्याबरोबर सर्व कुळांनी खोतास ' मक्ता ' देण्याचे बंद केले पाहिजे. तुम्हाला माहीतच आहे की तुम्ही खोतास ' मक्ता ' न घातल्यास तुमचेवर तो ' मदतदावे ' करून जप्ती वारंट आणवून तुमचेकडून धान्य वगैरे बेलिफाकरवी जप्त करून नेतो. परंतु रत्नागिरी जिल्ह्यातील सर्व शेतकऱ्यांनी खोतास ' मक्ता ' घालण्याचे बंद केल्यास सरकार वठणीवर आल्याशिवाय राहणार नाही. कारण साधारणपणे प्रत्येक तालुक्यात ५०-६० हजार शेतकरी असतात. या हिशेबाने तितकेच ' मदतदावे ' खोतास करावे लागतील व प्रत्येक तालुक्यात दोन-तीनच बेलीफ असल्यामुळे इतक्या शेतकऱ्यांकडून ' वसूल ' करणे अशक्य होईल व अशा प्रकारे या खोतशाहीस धक्का बसल्याशिवाय राहाणार नाही. या कारणास्तव तुम्हावर तुरुंगात जाण्याची पाळी आल्यास तयारी पाहिजे. मी येथे जाहीर करतो की तुमचेकरिता तुरुंगात जाण्यास मी प्रथम तयार आहे. त्याचप्रमाणे स्वतंत्र मजूर पक्षाचे कार्यकर्ते हेही वेळ पडल्यास तुमचे हिताकरिता तुरुंगात जाण्यास एका पायावर तयार आहेत. परंतु तुमचीही आत्मबलिदान करण्याची तयारी असली पाहिजे. तुरुंगात जाण्यात कोणताही कमीपणा नाही. कारण आजचे

अधिकारावर असलेले 'काँग्रेसचे सर्व दिवाण' तुरुंगात जाऊन आलेले आहेत. तुम्ही चोरी अगर इतर गुन्ह्याबद्दल तुरुंगात जाणार नसून एका तत्त्वाकरिता तुरुंगवास पत्करणार आहात, हे लक्षात ठेवा.

काँग्रेसचे काही प्रचारक स्वतंत्र मजूर पक्षाबद्दल भलताच गैरसमज पसरवीत असून असे भासवीत आहेत की स्वतंत्र मजूर पक्षाची चळवळ ही निव्वळ लबाडीची व अज्ञ शेतकऱ्यास फसविण्याची असून ती डॉ. आंबेडकर यांनी महारांकडून इतर जातीस बाटविण्यास व रोटीबेटी व्यवहाराची गल्लत करण्यास स्थापन केलेली आहे. अशी तुम्ही चुकीची समजूत करून घेऊ नका, असे माझे तुम्हास सांगणे आहे. आमच्या महारात काय चांगल्या मुली नाहीत की काय ? महार जातीवर माझा पूर्ण विश्वास असून ते कायमचे माझे मागे येतील असा मला भरवसा आहे. परंतु तुम्ही कुळवाडी व इतर लोक खोती बिल पास झाल्यावर स्वतंत्र मजूर पक्षाशी असलेला संबंध 'काम झाले रुजू, पगडी करा उजू' या म्हणीप्रमाणे तोडणार नाही, अशी माझी अपेक्षा आहे. तुम्ही पिढ्यान् पिढ्या स्वतंत्र मजूर पक्षाशी आपला संबंध कायम ठेवा. कारण खोती बिलानंतर इतर अनेक बिले स्वतंत्र मजूर पक्ष आणणार आहे. कारण स्वतंत्र मजूर पक्षाचे अंतिम ध्येय हेच आहे की शेतकरी व कामकरी यांचे हातात सर्व सत्ता जाऊन त्यांचे सरकार स्थापन व्हावे. अशा आशयाचे बाबासाहेबांचे १.३० तास विचारपरिप्लुत भाषण झाल्यावर भाई सुरेंद्रनाथ टिपणीस, भाई चित्रे, भाई कोवळे, भाई प्रधान वगैरे वक्त्यांची दणदणीत भाषणे होऊन 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय' या जयघोषात सभा समाप्त झाली.

● ● ●

# १३४
# खोती नष्ट करण्याचे मी हाती कंकण बांधले आहे

रत्नागिरी जिल्ह्यातील कार्यक्रम आटोपल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर विश्रांतीसाठी ता. १८ मे १९३८ रोजी महाड येथे आले. ता. २० मे १९३८ रोजी येथील प्रसिद्ध गाडीतळात रात्री ९ वाजता जाहीर सभा भरली होती. सुमारे दहा हजार शेतकरी मोठ्या उत्साहाने आले होते. सर्व विरोधी पक्षाचे लोकही मुद्दाम आले होते. अस्पृश्यांपेक्षा स्पृश्य शेतकऱ्यांचाच जमाव जास्त दिसत होता. शेठ, सावकार, जमीनदार वगैरे भांडवलदार लोक भीतीयुक्त मनाने आजुबाजूला उभे राहून गंमत बघत होते. स्वयंसेवकांच्या रांगांमधून डॉ. बाबासाहेब बरोबर ९ वाजता सभास्थानी आले. प्रथम श्री. नानासाहेब टिपणीस यांनी स्वतंत्र मजूर पक्षाने कुलाबा जिल्ह्यात शेतकऱ्यांकरिता काय केले याचे विस्तृत वर्णन केले. मुर्शी चांढोरे वगैरे गावच्या खोताचा कुळावर होत असलेला जुलूम दूर करण्याचे श्रेय स्वतंत्र मजूर पक्षालाच आहे वगैरे माहिती त्यांनी सांगितली. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळ्यांच्या कडकडाटात बोलावयास उभे राहिले. मुंबई प्रांतातील कॉंग्रेसचे राजकारण व खोती बिले या दोन विषयांवर सुमारे दीड तास डॉक्टरसाहेबांचे जोरदार भाषण झाले.

ते म्हणाले,

निवडणुकीपूर्वी कॉंग्रेसने शेतकऱ्यांना पुष्कळशी गोड आश्वासने देऊन त्यांची मते मिळविली. कॉंग्रेसने अधिकार स्वीकार करून अकरा महिने होऊन गेले तरी अद्याप तिजकडून लोकहिताचे एकही काम झालेले नाही. पदवीदान विरोध, लोकलबोर्ड वगैरे सारखी निष्फळ व निरुपयोगी बिले पास करण्यात कॉंग्रेस मंत्रीमंडळाने कसातरी वेळ काढून लोकांना झुलविले आहे. नाही म्हणावयास शेतकऱ्यांच्या मोर्च्यामुळे घाबरून कॉंग्रेस सरकारने शेतकऱ्यांची जमीन विकण्याला बंदी करणारे बील पास केले. त्यातसुद्धा म्हणण्यासारखा दम नव्हता. स्वतंत्र मजूर पक्षाने शेतकऱ्यांच्या हिताच्या मांडलेल्या अनेक उपसूचना सरकारने फेटाळून लावल्या. मोठ्या कष्टाने

---

जनता : ४ जून १९३८.

शेतीच्या उपयोगाचे दोन बैल जप्त न करण्याची उपसूचना मात्र त्यांनी मान्य केली. अशा तऱ्हेने कॉंग्रेसने शेतकऱ्यांची फसवणूक केलेली आहे. शेठसावकारांच्या पैशावर निवडून आलेले कॉंग्रेस सरकार आपल्या अन्नदात्याच्या विरुद्ध कायदे करून शेतकऱ्यांचे हित केव्हाच करू शकणार नाही, हे लक्षात ठेवा.

खोती नष्ट करण्याचे मी हाती कंकण बांधले आहे. कॉंग्रेस सरकार बिलाला पाठिंबा देईल किंवा नाही ते सांगता येणार नाही. परंतु वारा उलट दिशेने वाहत आहे. जर खोती बिल नापास झाले तर मी आणि माझ्या सहकाऱ्यांनी तुरुंगात जाण्याचा निश्चय केला आहे. तुम्ही आमच्या मागे आले पाहिजे. इतकी तयारी असल्यावर खोती नष्ट करण्याला अवधी लागणार नाही.

यानंतर शेतकऱ्यांचे आवडते पुढारी श्री. भास्करराव कोवळे बोलावयास उभे राहिले. आपल्या खड्या सुरात ते म्हणाले ''राष्ट्रगुरू डॉ. बाबासाहेब आंबेडकर सांगतील त्याप्रमाणे तुम्ही वागा व त्यांनी दिलेला मंत्र बरोबर पाळा. खोत सावकारांच्या थापांना भुलून आपसात फूट पाडू नका म्हणजे खोती नष्ट होण्याला वेळ लागणार नाही.'' रा. कोवळे यांचे भाषण संपल्यावर विरोधी पक्षांपैकी कोणाही दोघांना बोलण्याची परवानगी देण्यात आली.

● ● ●

## १३५
# आपल्या पक्षाचे सभासद व्हा आपल्या पक्षाचे बळ वाढवा

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जावळी तालुक्याला भेट द्यावी अशी जावळी तालुक्यातील जनतेची फार दिवसांपासून इच्छा होती. शनिवार तारीख २१ मे १९३८ रोजी सकाळी बाबासाहेब, सुभेदार सवादकरांना भेटण्याकरिता पांचगणी मुक्कामी येणार आहेत असे गुरुवार तारीख १९ मे १९३८ रोजी सायंकाळी समजताच एक दिवसाचे आत जावळी तालुका स्वतंत्र मजूर पक्ष परिषद अधिवेशन दुसरे मे. आमदार भाई चित्रे, बी. ए., एम. एल. ए. यांचे अध्यक्षतेखाली भरविण्याचे कार्यकर्त्यांनी जाहीर केले. शुक्रवारी सकाळपासून ते संध्याकाळपर्यंत सर्व कार्यकर्त्यांनी जाहीर पत्रके व प्रचारकार्य करण्याचे काम पांचगणीपासून आसपास सहा मैलातील खेडे गावात केले. शनिवारी सकाळी बरोबर साडे दहाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मे. आमदार भाई चित्रे, मे. रेवजी बुवा डोळस, मे. नानासाहेब सुरबा टिपणीस, मे. कोवळे व सरदार यांचेसह पांचगणी स्वतंत्र मजूर पक्ष शाखेचे ऑफिसात येऊन उतरले. ऑफिसात शाखेचे चेअरमन मे. डॉ. एस. एस. बंदिसोडे यांनी त्यांचे स्वागत केल्यावर थोड्या विश्रांतीनंतर तेथेच अल्पोपहार करण्यात आला. दुपारी १२ ला सर्व मंडळी डॉ. बिलिमोरियाच्या हॉस्पिटलमध्ये सुभेदार सवादकरांना भेटण्यास गेली. प्रथमतः काही कुशल प्रश्न वगैरे झाल्यानंतर बाबासाहेबांनी सुभेदार सवादकरांच्या प्रकृतीमानाची चौकशी केली, प्रकृती साधारण सुधारत असल्याचे पाहून बाबासाहेबांना समाधान वाटल्याचे दिसले. सुभेदारांना स्वतःच्या प्रकृतिपेक्षा इलाख्यात समाजकारण व राजकारण कसे काय चालले आहे याचीच चिंता लागून राहिली आहे, असे दिसले. त्यांनी एका मागून एक असे अनेक प्रश्न विचारण्यास सुरूवात केली व बाबासाहेबांनी आणि भाई चित्रे, टिपणीस वगैरे मंडळींनी त्यांची शांतपणे उत्तरे दिलीत. सुभेदार सवादकरांचे अंतःकरणात कसली तरी खळबळ उडून गेलेली त्यांचे चर्चेवरून दिसून येत होती. मधून मधून त्यांचे नेत्रातून एकदोन अश्रुबिंदूही चमकत होते. शेवटी बाबासाहेब म्हणाले, '' सुभेदार, प्रकृती उत्तम सुधारेपर्यंत अगदी हालचाल करू नका आणि डॉक्टर हुकूम देईपर्यंत हॉस्पिटलचे

---

जनता : ११ जून, १९३८.

बाहेर निघू नका.'' अशातऱ्हेने बरोबर दीड तास सुभेदार साहेबांच्या सहवासात घालवून जड अंतःकरणाने सर्वांनी सुभेदारांचा निरोप घेतला. सर्व मंडळींना पोचविण्याकरिता सुभेदारसाहेब काही अंतरापर्यंत रस्त्यावर आले होते. तेथून दोन वाजता सेंट लुकस नर्सिंग होमचे मेडिकल सुपरिन्टेन्डेन्ट डॉ. क्युलर यांचे निवासस्थानी डॉ. बाबासाहेब आंबेडकर व इतर सन्माननीय पाहुण्यांना थाटाची पार्टी झाली. त्यानंतर सर्व मंडळी जवळच असलेल्या परिषदेच्या भव्य तंबूकडे जाण्यास निघाली. बॅन्डचा सुस्वर आवाज चालू होता व खशीचे लेझिम खेळगडीही लोकांची करमणूक करीत होते. पांचगणीचे समता सैनिक दल आपापल्या युनिफॉर्ममध्ये हजर होते. परिषदेच्या चालकांना प्रचारकार्याकरिता जरी एकच पुरा दिवस मिळाला होता तरी जनसमूह दोन हजारापर्यंत जमला होता. परिषदेच्या द्वाराजवळ प्रथमतः सर्व स्त्रियांनी बाबासाहेबांना आरती घेऊन ओवाळले व पुष्पहार अर्पण केले. समता सैनिक दलाची व बँन्डची सलामी झाली. आंबेडकर जयनादाचा ध्वनी गगन भेदीत होता. अशा थाटात बाबासाहेब इतर पाहुण्यांसह स्टेजवर विराजमान झाले. टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. यानंतर स्वागताध्यक्ष श्री. बंदिसोडे व भाई अनंतराव चित्रे यांची भाषणे झाली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

आज नऊ दिवस झाले मी सारखा दौऱ्यावर आहे. रात्री मी महाडला दोन वाजेपर्यंत भाषण केलेले आहे व सकाळी पहाटेसच उठून हा पांचगणीचा प्रवास केला आहे. त्यामुळे मला येथे भाषण करण्याचे त्राण राहिले नाही. तुम्ही सर्वांनी जो माझा सत्कार केला आहे, त्याबद्दल मी ऋणी आहे. मी काहीतरी बोलावे अशी तुमची इच्छा आहे परंतु काय करू मला तुम्हाला यावेळी निरुत्साही करावे लागत आहे आणि तुम्ही त्याबद्दल रागावणार नाही, अशी मला आशा आहे. पुन्हा एकदा माझे येणे या बाजूला होईल त्यावेळी मला तुम्हाला जे काही सांगावयाचे आहे ते सांगेन. आज तूर्त एवढेच सांगतो की, सुदैवाने येथे स्वतंत्र मजूर पक्षाची शाखा स्थापन झालेली आहेच, तिचे सर्वांनी सभासद व्हावे व आपल्या पक्षाचे बळ वाढवावे. मला आणखी बोलता येत नाही म्हणून मी पुन्हा आपली माफी मागून रजा घेतो.

● ● ●

## १३६

# दुहीमुळे कार्यभाग साधत नाही

घोडे मुक्कामी आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणे पुणे जिल्हा वतनदार महार परिषदेचे अधिवेशन दुसरे, रविवार ता. २२ मे १९३८ रोजी दुपारी ४ वाजता अखिल भारतीय अस्पृश्यांचे एकमेव पुढारी परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली पार पडले. श्रोतृसमुदाय बराच मोठा जमला होता. डॉ. बाबासाहेब १००० मैलांचा प्रवास करून आमदार रा. रा. भोळे, के. रा. मधाळे, वयोवृद्ध पुढारी रेवजी दगडूजी डोळस यांच्याबरोबर आले व परिषदेस मुंबईहून अस्पृश्य समाजाचे कल्याणासाठी अहर्निश झटणारे प्रमुख पुढारी रामभाऊ रावजी बोरीकर, मे. शंकर मोहनजी मिस्त्री, मे. गजोबा दुधावडे वगैरे मंडळी व पुण्याहून वि. बा. भालेराव, डी. सी. मिशन, गायकवाड मास्तर व वाल्हेकर मंडळी हजर होती. बरोबर ४.३० वाजता डॉ. बाबासाहेब स्थानापन्न होऊन सभेस रीतसर सुरूवात झाली. मातंग समाजातील ना. स. व. शं. स. काळोखे यांनी सुस्वागतपर मे. डॉ. बाबासाहेबांचे नावे गायन केले. नंतर स्वागताध्यक्ष केशव राणूजी शिशूपाळ, ग्राम पंचायत चेअरमन यांचे स्वागतपर भाषण होऊन जमलेल्या लोकांचे आभार मानण्यात आले. नंतर मे. सटबाजी लक्ष्मण, किसन महादेव काळोखे, मे. मारूती शेबाजी गायकवाड, विठ्ठल का. उपशाम, के. टी. भोसले, मे. मधाळे, मे. धोत्रे वगैरे मंडळींची परिणामकारक व कळकळीची भाषणे झाली. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे टाळयांच्या गजरात बोलण्यास उभे राहिले. त्यावेळी जयजयकारांच्या घोषणा होत होत्या. डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

मी एक हजार मैलाचा प्रवास करून या परिषदेस हजर राहिलो. पुणे जिल्ह्याचे महार लोक हे सर्व जिल्ह्यांपेक्षा अगदी गबाळ आहेत. ते मृतमांस व खरकटे खातात, असे मी ऐकतो ! यांच्यात कायमची दुही चालू आहे. दुहीच्या योगाने यांचे कोणतेही काम नीट होत नाही. हे धर्मवेडे आहेत. माझा देवाधर्मावर बिलकूल विश्वास नाही. देवाधर्माच्या खुळचट व वेडगळपणाविषयी एकदा मी माझ्या 'हिंदू' मित्रांना शंकराच्या पिंडीविषयी माहिती विचारली. त्यांना ती सांगता आली नाही. शंकराची पिंडी काय आहे याचे येथे जास्त स्पष्टीकरण करता येत नाही. ते निव्वळ संभोगदृश्य आहे. या ठिकाणी धर्मश्रद्धाळू प्राण्यांनी वर्गणी गोळा करून एक दिवसाच्या यात्रेकरिता धर्मशाळा बांधणे हे केवळ स्वार्थ साधण्याचे उपाय आहेत. धर्मशाळेला १५०

---

जनता : ४ जून १९३८.

रुपये देऊ केलेत. तुम्ही दोनशे द्याल तर आम्ही तुम्हाला मते देऊ असे वाडे गटाचे म्हणणे होते. म्हणजे वाडे गटातील मंडळी किती नीच आहेत, हे लक्षात येते. जिल्हा बोर्डात एखाद्या दगडास उभा करून मानासाठी मोबदला मागणारा समाजाच्या नुकसानीस किती पात्र होतो याची तुम्हीच कल्पना करा. तेव्हा समाजाने अशांचा संबंध मुळीच ठेवू नये. जरी त्यांनी एखादा दगड मते देऊन निवडला तरी अखेर माझ्याशीच काम आहे. म्हणून स्वतंत्र मजूर पक्षातर्फे मी जे उभे केलेले उमेदवार श्री. केशव राणूजी शिशुपाळ व महादेव बाळाजी कोकणे यांनाच मते देऊन निवडून आणा म्हणजे मी तुमचा आभारी होईन. आजचे काँग्रेस सरकार मुंबई कायदे मंडळात असलेल्या अल्पसंख्यांक गटाचा मुळीच विचार न करता बहुमताच्या जोरावर धुडगूस घालीत आहे व त्यापासून शेतकरी, कामकरी व गरीब मजूर वर्गाची हानी होणार आहे. महारवतन बिलाची माहिती दिल्यावर सदरहू बिलाला या परिषदेने अंतःकरणपूर्वक पाठिंबा दिला व सर्वानुमते ठराव पास झाला. पुणे जिल्ह्यात बोर्डिंगे उघडावी व सर्व पुणे जिल्ह्यातील मंडळीने ती उघडण्याचा प्रयत्न करावा असा ठराव पास केला व जीवदया संस्थेस पूर्ण पाठिंबा देण्यास मंडळीस सांगून भाषण संपविले.

नंतर जीवदया संस्थेचे ऑ. न. निजमुदीन साहेब यांनी जीवदया संस्थेला पाठिंबा दिल्याबद्दल डॉ. बाबासाहेबांचे अंतःकरणपूर्वक आभार मानिले. दरसाल चार आणे देऊन स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होण्याचे ठरले. शेवटी करंदीकर मास्तर यांनी आभार मानल्यावर सभेचा कार्यक्रम समाप्त झाला. डॉ. बाबासाहेबांना चहापार्टी व हारतुरे देऊन स्वागत केले. नंतर डॉ. बाबासाहेब व बरोबर आलेली मंडळी सुमारे ६ वाजता जमलेल्या मंडळीच्या जयघोषात पुण्यास गेली.



# १३७

# राजकारणातील आपली प्रगती ब्रह्मदेवही थांबवू शकणार नाही

कोर्टाच्या कामासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर ता. १७ जून १९३८ रोजी सकाळच्या गाडीने धुळे येथे आले. स्टेशनवर प्रमुख मंडळी हजर होती. स्काऊट पथकांनी बाबासाहेबांना सलामी दिली. दुपारी कोर्टात तुफान गर्दी लोटली होती. अपील संपल्यानंतर वकील मंडळींच्या विनंतीला मान देऊन बाबासाहेबांनी बार लायब्ररीला भेट दिली. तेथे काकासाहेब बर्वे तर्फे चहा-पान झाले. संध्याकाळी बाबासाहेबांनी राजवाडे संशोधन मंदीराला भेट दिली. तेथे तात्यासाहेब भट वकील, भाऊराव कुळकर्णी वकील, काकासाहेब बर्वे वकील, रा. उपाध्ये, खरटमल, श्री. जाधव, बोराळे वगैरे मंडळी हजर होती. बराच वादविवाद झाल्यानंतर पाठक शास्त्री हे जातीने हजर झाले. भट वकील व शास्त्रीबुवा यांनी योग्य ती माहीती पुरविण्याचे अभिवचन दिल्यामुळे ते अभिनंदनास पात्र आहेत.

रात्री सुमारे आठ वाजता म्यु. शाळा नं. ५ च्या आवारात सभा घेण्यात आली. सभेला सुमारे ५-६ हजार मंडळींचा जमाव होता. प्राणयज्ञ दल संस्थेची मंडळी आपल्या लाल पोषाखात हजर होती. स्त्री समूहही भरपूर होता. बाबासाहेब, जाधव इत्यादी आल्याबरोबर टाळयांचा कडकडाट झाला. बाबासाहेबांच्या नावाच्या जयजयकाराने सर्व सभास्थान दुमदुमून गेले होते. श्री. यशवंतराव चिंतामण गायकवाड, सौ. कृष्णाबाई अहिरे, गोजाबाई बागले, अहिल्याबाई देवराव, कु. सावित्रीबाई सावंत, सौ. आनंदीबाई जाधव यांची स्फुर्तिदायक भाषणे झाली. त्यानंतर पश्चिम खानदेशचे भावी तरूण, उत्साही पुढारी श्री. पुंडलिकराव तुकाराम बोराळे यांचे भाषण झाले. या मंडळींची भाषणे झाल्यावर निरनिराळया संघातर्फे व महार सुशिक्षित स्त्री-पुरुषांकडून डॉ. बाबासाहेबांस सुमारे ४० हारतुरे अर्पण करण्यात आल्यावर डॉ. बाबासाहेब हे टाळयांच्या गजरात भाषण करण्यास उभे राहिले. ते म्हणाले,

प्रिय भगिनींनो आणि बंधुंनो,

या भागात बरेच दिवसांपासून येणे झाले नाही. मला निरनिराळया जिल्ह्यातील पत्रे आली आहेत. मध्यप्रांत, संयुक्त प्रांत, पंजाब वगैरे प्रांतातून अनेक लोकांची पत्रे आलेली आहेत. किंबहुना हिंदुस्थानातून मला बोलाविण्याविषयी पत्रे आलेली आहेत. सर्व हिंदुस्थानातून मला बोलाविण्याविषयी पत्रे येतात असे

---

जनता : २ आणि २३ जुलै १९३८.

म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. हा देश किती अफाट आहे ! एकट्या माणसाने कितीसा कामाचा बोजा न्यावा ? दुसरी गोष्ट माझी प्रकृती हल्ली बरी नाही. गेल्या दोन महिन्यात ३८ पौंड वजन कमी झाले आहे, तरीपण इतर भागांच्या मानाने या भागाकडे दुर्लक्ष झालेले आहे, याची भरपाई मी केव्हा तरी करीन इतकेच आश्वासन मी आज देऊ शकतो.

गेल्या दहा वर्षांपासून जे राजकारण व समाजकारण चालू आहे त्या चळवळीचा ओघ कोणत्या थराला जाईल याची मला भीती वाटते. एक गोष्ट मात्र खरी की राजकीय बाबतीमध्ये भीती बाळगण्याचे कारण नाही. डोकावून सुद्धा ज्यांची सावली लोक घेत नव्हते त्यांचीच १५ माणसे असेंब्लीत बसून अधिकाराने व हक्काने आपली गाऱ्हाणी सांगू शकतात. आज मुंबईच्या कायदे मंडळात काँग्रेससारखी प्रबळ संस्था आहे. एवढ्या मोठ्या संस्थेस स्वतंत्र मजूर पक्षाची भीती वाटते. (टाळ्या) ही गोष्ट अस्पृश्य समाजाच्या दृष्टीने काही कमी नाही. काँग्रेसमध्ये आज लाखो रुपये खर्च करणारे सावकार आहेत. शिक्षणामध्ये पारंगत झालेल्या ब्राह्मणांचा भरणा आहे. काही म्हटले तरी ४० वर्षांचा तिच्या पाठीमागे इतिहास आहे. स्वतंत्र मजूर पक्ष स्थापून अवघे एक वर्ष झाले आहे. तरी एका वर्षात कामगिरी इतकी मोठी झाली आहे की स्वतंत्र मजूर पक्षाचे नाव ठाऊक नाही असा एकही स्त्री-पुरुष आढळणार नाही. परंतु त्याची इतर पक्षास भीती वाटते हा राजकारणातील विलक्षण प्रकार आहे. मराठा अगर कुणबी यांना आपणाजवळ याचना करण्याची लाज वाटत होती ते लोक जाहीर रीतीने तिकीटावर उभे राहिले. स्वतंत्र मजूर पक्षात कायस्थ, मराठे वगैरे जातींचा समावेश आहे, ही गोष्ट हिंदुस्थानाच्या इतिहासात अपूर्व आहे. राजकारणातील आपली प्रगती ब्रह्मदेव जरी आड आला तरी थांबवू शकणार नाही. (टाळ्या) हा नदी नाला नाही, पण सिंधू नद आहे. धरण बांधले तरी फूटून जाईल. राजकारणातील हक्क मिळवून घेण्यास अडचण पडणार नाही. १५ माणसांनी काय केले ? - काहीही झाले तरी ते आजच सांगणे कठीण आहे. आज २००० वर्षांपासून रूढी मानगुटीवर बसली आहे. तिला समूळ नाहीशी करण्यास १०-२० वर्षे देणे अन्यायाचे होईल. राजकारणात ऐक्य व संघटना जितकी जास्त तितकी लवकर प्रगती होते. या बाबतीत आपल्या समाजाविषयी मला अभिमान वाटतो. इलेक्शनच्या वेळी जो प्रामाणिकपणा, धैर्य व संघटना दाखविली त्याच्या इतका प्रामाणिकपणा, धैर्य व संघटना या प्रांतामध्ये इतर कोणत्याही जातीने दाखविली नाही. आपण दारिद्र्याने व्यापलेले, दुःखाने गांजलेले आहोत, याचा विचार

तुम्ही त्यावेळी केला नाही. ज्याचे पोट उपाशी मरते, मारवाडी देईल ते खाईल, अशी ज्यांची स्थिती आहे त्या तुम्ही दाखविलेला प्रभाव प्रशंसनीय आहे. तुम्ही आम्ही खेड्यापाड्यांमध्ये विखरून राहिलेलो आहोत. आपली खेड्यात फक्त ५-२५ घरे, इतरांची १०० च्या वरती घरे आहेत. ' अमुक एक करा नाहीतर तुमची वस्ती हाकलून देऊ ' असे जर त्यांनी ठरविले तर ते सहज करू शकतील, अशी तुमची स्थिती होती.

आपल्या माणसांनी स्वतंत्र मजूर पक्ष बलवान केला पाहिजे. त्यांच्या सांगण्याच्या विरुद्ध काहीही जाता कामा नये. त्यात समाजाच्या हिताच्या दृष्टीने तुमचाच फायदा आहे. मला सांगण्यास आनंद वाटतो की काँग्रेसचे अध्वर्यू श्री. वल्लभभाई पटेल यांनी आपल्या शिस्तीचे असे वर्णन केले आहे, ' संघटना असावी तर डॉ. आंबेडकरांच्या संघटनेसारखी ! ' (टाळया) तुम्ही या संघटनेमध्ये बिघाड होऊ देऊ नका. हंडाभर दूध नुसत्या मिठाच्या खड्याने नासते. पुष्कळसे अमृत विषाच्या नुसत्या थेंबाने बिघडते. त्याचप्रमाणे स्वार्थी, दुर्गुणी लोक आपला स्वार्थ साधण्यासाठी प्रवृत्त असतात. त्यांची स्वार्थाकडे विचारसरणी असते. अशी माणसे निर्माण होतील, हाच काळ कायम राहील, असे वाटत नाही. धान्य निवडताना खडा आपण फेकून टाकतो त्याप्रमाणे कंटक-स्वार्थी माणसाला खड्यासारखे निवडून टाकले पाहिजे. (टाळया) महार जातीत तरी कोणताही मनुष्य स्वतंत्र मजूर पक्षाच्या विरूद्ध निर्माण होऊ नये. राजकारणात संघटना व संघशक्ती केल्याखेरीज काही एक साधता यावयाचे नाही. संघ शक्ती निर्माण करण्याकरिता पैसा पाहिजे. घरामध्ये संसाराला पैसा लागतो. मीठ, मिरचीसाठी पैसा लागतो. पैशाशिवाय काही चालत नाही. त्याप्रमाणे सार्वजनिक कार्याला पैसा लागतो. काँग्रेसजवळ राजकारण खेळण्यासाठी पैसा आहे. मला असे कळले की नुकत्याच झालेल्या डिस्ट्रीक्ट लोकल इलेक्शनमध्ये एका काँग्रेसच्या उमेदवाराने ३००० रू. खर्च करुन यश मिळविले. पैशाशिवाय राजकारणाचा गाडा हाकता येत नाही. दुसऱ्याच्या अंकित न राहता स्वतःच्या पायावर आपण उभे राहण्यास शिकले पाहिजे. यावेळी मी आपणाला महाभारतातील एका गोष्टीची आठवण देतो. भीष्म आणि द्रोण कौरवांच्या बाजूला होते. कौरवांची बाजू खोटी व पांडवांची बाजू खरी, असे त्यांना माहीत होते. ' राज्यच काय पण सुईच्या अग्रावर मावेल इतकी मातीही पण मिळणार नाही ' असे कौरवांनी पांडवांना सांगितले होते. खरी खोटी बाजू न जाणता भीष्म आणि द्रोण कौरवांच्या बाजूने लढले. सत्याने युक्त अशा पांडवांच्या बाजूने का लढले नाहीत, असे विचारले असताना ' आम्ही कौरवांचे अन्न खातो ' म्हणून सांगितले.

जो दुसऱ्याच्या मदतीवर जगतो अगर जिवंत राहतो तो दुसऱ्याचा गुलाम अगर अंकित झाल्याशिवाय राहणार नाही. मी काँग्रेसच्या हरिजन सेवक संघाचा फंड घेतला नाही. त्यांचे ८-१० लाख रुपये घेतले असते तर मी त्यांचा गुलाम म्हणून राहिलो असतो व मला तुमच्याकरता काही करता आले नसते. त्यांच्या हजारो रुपयांपेक्षा तुमची पावली मला लाखाची आहे. (टाळ्या) तुमचा संसार तुम्ही स्वतःच्या शिरावर घ्या. त्यात तुमचाच फायदा आहे. आपणास काँग्रेसचा पैसा नको. काँग्रेसचे प्रचारक दरमहा ३०-४० रुपये घेऊन काम करतात. आपले सेवक नुसते दरमहा १० रुपये घेऊन काम करण्यास तयार होतील. स्वतंत्र मजूर पक्ष तुमचा आहे. त्यास तुम्ही मजबूत केले पाहिजे.

मी २० वर्षांचा असताना बी. ए. झालो. मला २००० वर पगार सांगून आले आहेत. माझ्या बरोबरीचे मुलगे डिस्ट्रिक्ट जज्ज आहेत. यात मला काय फायदा आहे ? मोटारीतून हिंडतो. बॅरिस्टर म्हणून को'णता लाभ आहे ? तुम्ही पडला गरीब. तुमच्या तक्रारी थोड्याच माझ्याकडे येणार आहेत ! तंटे स्पृश्य वर्गाचे. तेच धनवान लोक ! मला पैसा मिळण्याचा संभवही त्याच लोकांकडून आहे. पण मी तुमच्या फायद्यासाठी त्यांच्याशी झगडतो. म्हणून त्यांना माझी भीती वाटते.

माझ्या पश्चात कोण माणसे किती जबाबदारीने काम करू शकतील ? व माझी जबाबदारी कोण घेईल ? मला आशा आहे की काही जबाबदार तरुण निपजतील व ही जबाबदारी ते आपल्या शिरावर घेतील. नाहीतर चढणीवर चढलेली गाडी डोंगराच्या माथ्यावर गेल्यानंतर बैलाच्या अभावी घसरून पडते तशी आपली स्थिती होईल. याबद्दल मला मोठी भीती आहे. आज आपण पर्वताच्या उतरणीवर आहोत. चढण चढू लागलो आहोत. आपला अंतिम हेतू अद्याप साधला नाही. यात्रेसाठी निघालो आहोत परंतु अजून देवाला पाहिले नाही. यात्रा संपेपर्यंत आपण सर्वांनी पीठ, मीठ वगैरे सामुग्री बरोबर घेऊन चालावयास पाहिजे. आज राजकारणाची भीती वाटत नाही. परंतु राजकारणाच्या धुळवडीमध्ये जो प्रश्न आम्ही हाती घ्यावयास पाहिजे तो प्रश्न मागे राहिला आहे. आपल्या स्वतःच्या दुष्कृत्यामुळे आपणास जनावराचीही किंमत नाही. कारण तुम्ही गावातील तुकडे मागून खाता व मेलेल्या जनावराचे मांस फाडून खाता. आज राजकारण लढविले तरी त्याचा काय उपयोग ? देऊळ बाहेरून मढविले तर त्याची काय शोभा ? तुम्ही मृतमांस खाणे सोडून दिले तर कोण खाईल ? ते मेलेले जनावर गिधाड व कुत्रा खाईल. यात तुमची काय किंमत आहे ? त्याची तुम्हास लाज कशी नाही ? समजा उद्या जाधव मुख्यप्रधान झाला ही काही अशक्य कोटीतली गोष्ट आहे असे नव्हे, तर त्याला स्पृश्य लोक मान देतील काय ? सध्याप्रमाणे ते आरती ओवाळतील काय ? जे जीवन तुम्ही आज व्यतीत करीत आहात ते जीवन तुम्ही बंद केले पाहिजे व स्वच्छतेने नीटनेटके राहावयास पाहिजे.

'' तुम्ही जर आमचे मृत मांस व तुकडे खाण्याचे बंद करता तर मग आम्ही काय खाणार ? '' असा प्रश्न काही लोक विचारतात, त्यांना मला असे सांगावयाचे आहे की, समजा या जवळ असलेल्या चितोड गावच्या दोन मुली ते गाव सोडून मुंबईला गेल्या. त्यापैकी एकीने संसाराला फाटा दिला व वेश्येचा धंदा पत्करला. तिला घडीचा पलंग, तक्या, गाद्या, खुर्च्या, टेबल वगैरे आहे. एक नोकर आहे. इराण्याच्या दुकानावरुन ती मस्कास्लाईस, खिमा, रोटी माडीवरून मागविते, दिवसातून चार पितांबर नेसते, पावडर लावते, किती सुबक जीवन नाही ? दुसरी मुलगी ७ रुपये पगारावर काबाडकष्ट करते. नवऱ्याला एक किंवा दीड रुपया मिळेल त्याच्यावर गुजराण करते, कथलाच्या गोटाशिवाय तिजजवळ दुसरा दागिना नाही. मीठ भाकरी खाऊन कैक वेळा उपाशीही राहते. तेव्हा या दोन मुलींपैकी तुम्ही कोणत्या मुलीला मान द्याल ? देह विक्रय करुन पितांबर नेसते तिला की जी गरीबीने, दुःखाने गांजलेली व अन्नाला मौताज झाली तिला ? मला वाटते सर्व न्यायी माणसे पतिव्रता स्त्रीलाच मान देतील.

तेव्हा तुमची पोटाची खळगी भरो न भरो तुम्ही चांगल्या रीतीनेच वागावयास पाहिजे. स्वाभिमान, धैर्य, नीती काही आहे किंवा नाही ? आम्ही जे करतो ते बरे, वाईट, न्याय, इभ्रत याच्याकडे लक्ष देऊन आपण करतो किंवा नाही याकडे लक्ष दिले पाहिजे. तुम्ही येथून सभेतून गेल्यावर नवीन कार्यक्रमास सुरवात करावी. (स्त्रियांस उद्देशून) इतर स्त्रियांप्रमाणे तुम्हीही आहात. आम्ही तुमचे दूध पिऊन वाढलो आहोत. इतर स्त्रियांची मुले मामलेदार, हायकोर्ट जज्ज आहेत आणि तुमची मुले गुराखी आहेत. याचे कारण तुम्ही नरकात गुंतला आहात. हे तुमचे पाप आहे. तुमचे वर्तन असेच अशुद्ध राहिले तर तुमची मुले ही अशीच राहतील ' नर करनी करे तो नर का नारायण बने. ' इतर स्त्रिया काही देवावतार नाहीत. त्याही स्त्रियाच आहेत, त्यांना वाव आहे. तुम्हाला वाव नाही. म्हणून तुम्ही सर्वांनी स्वाभिमानाने व धैर्याने वागावयास शिका. आपले अंतिम ध्येय गाठण्यासाठी कसोशीने प्रयत्न करा.

असे उपदेशपर दीड तास डॉ. बाबासाहेबांचे भाषण झाल्यावर श्री. पुनाजीराव लळिंगकर यांनी सर्वांचे आभार मानल्यावर सभा ' डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय ! ' अशा गजरात बरखास्त झाली.



## १३८

# जो दुसऱ्यावरी विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला

तारीख १७ जून १९३८ रोजी सकाळी ५ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे चाळीसगाव स्टेशनवर उतरले तेव्हा त्यांच्या स्वागताकरिता प्रचंड लोकसमुदाय जमला होता. जयघोषांची एकसारखी गर्जना चालली होती. डॉ. बाबासाहेब गाडीतून उतरताच अस्पृश्योद्धारक बोर्डिंगचे सेक्रेटरी श्री. डी. एम. मागाडे यांनी बोर्डिंगतर्फे हार अर्पण केला. नंतर डॉ. बाबासाहेब धुळयाच्या गाडीत बसले. स्त्रियांतर्फे कु. शांताबाई दिवाण चव्हाण यांनी व पिंपरखेड येथील क्रेडीट सोसायटीतर्फे सोमा संसारे यांनी हार अर्पण केले. स्टेशनवर मे. डी. जी. जाधव, बी. ए., एम. एल. ए., शामराव कामाजी जाधव, डिस्ट्रीक्ट लोकल बोर्ड मेंबर, जळगाव, श्रावण धर्माजी जाधव, म्युनिसीपल कौन्सिलर, चाळीसगाव, दिवाण सीताराम चव्हाण, धावजी पहिलवान, भापु मुकादम, उबाळे, आडंगळे, तात्याबा पवार, श्रीपत पवार, सीताराम आव्हाड वगैरे मंडळी व खेड्यातील जनता जमली होती.

डॉ. बाबासाहेब साडेसहा वाजता धुळयास कोर्टाच्या कामाकरिता रवाना झाले. त्यांच्याबरोबर तरुण उत्साही व डॉ. बाबासाहेबांचे एकनिष्ठ सेवक श्री. डी. जी. जाधव व बोर्डिंगचे सेक्रेटरी डी. एम. मागाडे हे गेलेले होते. कोर्टाचे काम आटोपल्यावर डॉ. बाबासाहेब तारीख १९ जून १९३८ रोजी रात्री साडे आठ वाजता चाळिसगावास उतरले. डॉ. बाबासाहेब येताच अतोनात गर्दी झाली. लोकसमुदाय ३-४ हजार जमला होता. डॉ. बाबासाहेब यांनी जेवण घेतल्यानंतर, बोर्डिंग पाहिल्यानंतर बोर्डिंगच्या समोर सभेस सुरवात झाली. कवी बना सखाराम साळुंके यानी पद म्हटल्यावर कु. शांताबाई चव्हाण यांनी भाषण केले. त्यानंतर श्री. दिवाण सीताराम चव्हाण यांनी आपल्या भाषणात सांगितले की, " आजची संस्थेची स्थिती समाधानकारक होण्यास डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हातचे अमृताचे थेंब हे होत. आज ग्रँट १११० रुपये व जागाही मिळून ३५०० रुपयापर्यंत इमारत बांधली गेली आहे. लवकरच शेते बोर्डिंगास मिळणार आहेत. अशी संस्थेची भरभराट ज्यांच्या अमृताच्या थेंबाने झाली आहे, त्यांच्याच हस्ते बोर्डिंगचा उद्घाटन समारंभ पार पाडण्याविषयी आमच्या मंडळाचा विचार ठरला आहे. डॉ. बाबासाहेब लवकरच आम्हास तारीख देतील अशी विनंती

---

जनता : १६ जुलै, १९३८.

आहे. इतके बोलून मी भाषण संपवितो.'' नंतर श्री. डी. एस. मागाडे यांनी भाषण केले. त्यांनी आपल्या भाषणात सन १९२७ पासूनची एकंदर परिस्थिती निवेदन केली. नंतर श्री. एस. के. सोनवणे, बी. ए. ऑनर्स व श्री. डी. जी. जाधव यांचे भाषण झाल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करण्यास उठले. टाळयांचा एकच कडकडाट झाला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या भाषणातील सारांश, '' आज मला भाषण करण्याची पाळी येईल अशी माझी कल्पना नव्हती. आपण पुष्कळ लोक जमले असल्यामुळे दोन शब्द बोलतो. आपणावर जे सध्या सरकार राज्यकारभार करते ते ब्रिटिश सरकार नसून काँग्रेस सरकार आहे. ब्रिटिश सरकारचा मला ११ वर्षांचा अनुभव आहे व काँग्रेस सरकारचा ११ महिन्यांचा अनुभव आला आहे. काँग्रेस अधिकारारूढ होण्यापूर्वी मला जास्त आशा होती, परंतु ती फोल ठरली आहे. ब्रिटिश सरकारच्या वेळेस पोलिस खात्यात अस्पृश्यांना शिरकाव नव्हता. मी असेंब्लीत २ वर्षे भांडण करून शिरकाव करून घेतला. ब्रिटिश सरकार काही तरी देत असे. ब्रिटिश सरकार पडित जमिनीबद्दल अस्पृश्यांच्या अर्जाचा अगोदर विचार करीत असे व तसे त्यांच्या दप्तरीही आहे. ते कचेरीत सापडू शकेल. पोलिस खात्यात अस्पृश्यांच्या अर्जाचा अगोदर विचार करावा. ब्रिटिश सरकारने आमच्याकरिता काहीही राखून ठेवलेले नाही असे दिसून येईल. सगळयांच्या बरोबर काही लाभ झाला तर तुम्ही घ्यावा. एका आईच्या पोटी जन्मास आलेल्या चार मुलांपैकी मोठ्या मुलास भाकरीचा मोठा भाग मिळतो. आई लहान मुलाकरीता भाकरी लपवून ठेवते तसे आपल्याकरिता काँग्रेसने काय राखून ठेवलेले आहे ? काँग्रेस आमच्याकरिता काहीच राखून ठेवत नाही. मग ती माय कशी होऊ शकेल ? आम्हाला मायेच्या लोभाव्याची जरूर नाही. आम्ही मरू व मनगटाच्या जोरावर मिळवू. आम्ही डरणार नाही व टोपली घेऊन दुसऱ्याच्या दारीही जाणार नाही. मायेच्या काँग्रेसचे काय आहे. मी गांधींचा शत्रु नाही. ज्याला जे सत्य वाटते तो ते करतो. मी गांधींच्या कार्याची पर्वा करीत नाही. गांधींच्या हातात काँग्रेस आहे. ' राजा बोले आणि दल हाले ' गांधी बोलतो व काँग्रेस करते. गांधींच्या मनात आले, अस्पृश्यांना सवलती देण्याचे ठरवले तर त्यास खावयास मिळेल. गांधींच्याविरूद्ध कोणीही जाणार नाही. ' कळवळयाच्या याती आणि लोभाविन प्रिती. ' आईचे प्रेम सर्व मुलांवर सारखे असते. करंट्या मुलावर सुद्धा जास्त असते. काँग्रेसची व तुमची आई गांधी आहे. अर्थात गांधींचे प्रेम तुमच्यावर जास्त असले पाहिजे, तसे मुळीच दिसत नाही. करिता दुसऱ्यावर विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला याप्रमाणे आपले कार्य आपणच करावयास पाहिजे. आपल्यावर फारच मोठे संकट आहे. ते तुम्हास दिसत नाही. २००० वर्षांची परिस्थिती तुमच्या

अंगवळणी पडली आहे. धुळ्याची गोष्ट सांगतो. धुळ्याचे पाठक शास्त्री हिंदुधर्म-शास्त्रज्ञ आहेत. 'अस्पृश्यांची पूर्वोक्ती' म्हणून पुस्तक लिहिले आहे. काही कामाकरिता शास्त्रींची भेट घेण्याचा निश्चय केला. पाठक शास्त्रींना मी ९, १० वाजता आपणाकडे भेटावयास येईन असा निरोप पाठविला. मी मोटार घेऊन पाठक शास्त्रींकडे गेलो. एका इसमाजवळ, मी आलो आहे, येऊ काय असे सांगितले. तेथे जेवण चालले होते. शास्त्रींचा निरोप आला नाही. ते धावत बाहेर आले. मी त्यांना सांगितले की, आपल्याशी चर्चा करावयाची आहे. पाठशाळेत चला. त्यांनी सांगितले की, आपण मोटारीतच चर्चा करू. धुळ्याचे रस्ते अरूंद त्यामध्ये जास्तवेळ मोटारीत बसून चर्चा करणे योग्य नाही म्हणून पुष्कळ आग्रह केला. पण उपयोग झाला नाही. नाइलाजास्तव बंगल्यात जाऊन चर्चा करणे भाग पडले. त्याने चांगली चर्चा केली. माझ्यासारखे शिक्षण घेणारी माणसे थोडी असतील. परंतु माझ्या सारख्यांना शास्त्रींच्या पाठशाळेत शिरकाव करता आला नाही. किती अपमान! माझ्या हृद्याला घरे पडतात. तुम्हाला त्याची जाणीव नाही. आपणाला जे काही मिळवून घ्यावयाचे असेल ते झगडा करून मिळेल. काँग्रेस, गांधींचे धोरण ११ महिन्यात चांगलेच दिसले आहे. याचा प्रत्यक्ष पुरावा नागपूरचे ना. शरीफ याचे प्रकरणच देईल. यासाठी आपण सर्वांनी संघटना करून सामर्थ्य एकवटून तोंड दिले पाहिजे. काँग्रेस ही ५० वर्षांची आहे. स्वतंत्र मजूर पक्ष दीड दोन वर्षाचा आहे. काँग्रेसला जर कोणाची भीती वाटत असेल तर ती स्वतंत्र मजूर पक्षाची होय. आम्ही १५ माणसे काँग्रेसला भंडावून सोडतो. १५ च्या ऐवजी ३० अगर ४५ माणसे असती तर आपलेच राज्य आले असते. १०-१५ वर्षात एकी केली तर खात्रीने सांगतो की, आपलेच राज्य होईल. तुम्ही सर्वजण मला देव म्हणता. मी देव नसून महार आहे. तुमचा स्वतंत्र मजूर पक्षच देव आहे. धोंड्याला शेंदूर लावला म्हणजे देव होतो तसा मी आहे. तुमचा खरा देव स्वतंत्र मजूर पक्ष आहे. सर्वांनी स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद व्हावे. वर्षाचे ४ आणे देण्यास जड नाहीत. मी पुष्कळ बोललो आहे. इतके भाषण झाल्यानंतर डी. एम. मागाडे यांनी बोर्डिंगतर्फे हार अर्पण केला. धावजी याने व्यायाम शाळेतर्फे हार अर्पण केला. हरिभाऊ कन्नडकर यांनी निजामस्टेटतर्फे हार अर्पण केला. भगिनीतर्फे कु. शांताबाई चव्हाण हिने हार अर्पण केला. शेवटी डी. एम. मागाडे यांनी सर्वांचे आभार मानून सभा बरखास्त करण्यात आली. नंतर सकाळच्या गाडीने डॉ. बाबासाहेब मुंबईस रवाना झाले.

● ● ●

## १३९

# महाराष्ट्रीयांची पीछेहाट का ?

गेल्या ता. ४ ऑगस्ट १९३८ रोजी मध्यप्रांताचे माजी मुख्यप्रधान डॉ. खरे यांचे स्वागत करण्यासाठी त्यांच्या काही चाहत्या मित्रांनी येथील भारत सेवक समाजाच्या दिवाणखान्यात एक मेजवानीचा प्रसंग घडवून आणला. या स्वागतप्रसंगी समारंभाचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जे विचारपरिप्लुत भाषण केले व लोकशाहीच्या खऱ्या कल्पनांची व तत्त्वांची जी उत्तमप्रकारे फोड करून सांगितली तिचे सध्याच्या काळी प्रत्येक व्यक्तीने मनन करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे श्री. तुळजापूरकर व डॉ. खरे यांचीही या प्रसंगी भाषणे झाली.

या समारंभाला श्री. ना. म. जोशी, डॉ. गोपाळराव देशमुख, डॉ. वाड, डॉ. बालिमा व मुंबईतील प्रतिष्ठित डॉक्टर्स, वकील व नागरिक हजर होते. मेजवानीनंतर सभेच्या कामाला सुरवात करून डॉ. आंबेडकर यांचे नाव अध्यक्षपदाकरिता सुचविताना श्री. दाजीसाहेब तुळजापूरकर यांचे भाषण झाले.

यानंतर श्री. दळवी यांनी अध्यक्षपदाच्या सुचनेला पाठिंबा दिल्यानंतर डॉ. आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारुन आपल्या भाषणास प्रारंभ केला. ते म्हणाले,

आपण जे आज येथे जमलो आहोत, ते खरे यांचे स्वागत करण्याच्या उद्देशाने हे सर्वांना ठाऊकच आहे. हे स्वागत करण्यास आपण कोणत्या कारणांनी व हेतुंनी उद्युक्त झालो याचे थोडेसे सविस्तर स्पष्टीकरण करणे जरुर आहे. आजच्या या सभेतील मंडळींकडे नजर फेका. आपण सर्व एकाच भावनेने अथवा एकाच कारणाने ह्या स्वागतासाठी येथे जमा झालो आहो असे वाटत नाही. राजकारणातील मतांच्या दृष्टीने फार तर आजचा हा जमाव अनेक जिनसीच असलेला दिसून येत आहे. काहींनी तर विशिष्ट पक्षाच्या, काँग्रेसच्या राजकीय विचारसरणीची खूण पटविण्याचा पोषाखही केला आहे. हिंदुस्थानातील पुष्कळ हिंदूंना हाच फक्त एक जगन्मान्य पंथ वाटत आहे. इतर काही लोक जे येथे आले आहेत ते माझ्याप्रमाणे देशातल्या आजच्या त्या अग्रगण्य पक्षाचे सदस्य नाहीत. उलट त्यांचा त्या पक्षाला विरोधच आहे. याखेरीज हे इतर काही जण येथे उपस्थित

---

विविध वृत्त : १४ ऑगस्ट १९३८.

झाले आहेत ते राजकारणाच्या बाबतीत उदासीनच आहेत. हे लोक जातीप्रेमामुळे अथवा तशाच स्वरुपाच्या काही कारणांमुळे आलेले असतील. हे कसेही असो. डॉ. खरे तरी आपल्यापुढे आज तीन भिन्न स्वरुपात उभे आहेत, यात शंका नाही. पहिली गोष्ट म्हणजे ते महाराष्ट्रीय आहेत, दुसरी गोष्ट म्हणजे ते कॉंग्रेसवाले आहेत आणि तिसरे त्यांचे स्वरुप म्हणजे मध्यप्रांतातील पदच्युत केलेले मुख्यप्रधान या नात्याने ते येथे उभे आहेत. आजच्या प्रसंगी येथे येऊन अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मी का उद्युक्त झालो असेन असे आपल्याला वाटते ? डॉ. खरे यांची व माझी भेट होण्याचा योग पूर्वी कधीही आला नव्हता. काल अगदी एका समस्नेह्याच्या कचेरीत गाठ पडली व तेथेच डॉ. खऱ्यांची व माझी प्रथम ओळख झाली. अर्थात त्यांच्या राजकारणाने आकृष्ट होऊन मी काही येथे आलेलो नाही. ही गोष्ट स्पष्टच आहे. राजकारणाच्या बाबतीत आम्ही अनेकांना भिन्न व विरोधीच आहोत.

डॉ. खरे महाराष्ट्रीय आहेत ही गोष्टही महत्त्वाची आहे. त्यांच्या बाबतीतील अन्यायामुळे बऱ्याच महाराष्ट्रीयांची मने विशेष क्षुब्ध व्हावयाला ही गोष्ट कारणीभूत झाली आहे हे निःसंशय होय आणि तसे होणे स्वाभाविक आहे. हिंदी राजकारणातील महाराष्ट्रीयांचा वाट्याचा इतिहास पाहिला तर महाराष्ट्रीय त्यात मागे पडत चालले आहेत ह्या गोष्टीबद्दल मला तरी निदान शंका वाटत नाही. महाराष्ट्रीय लोक व्यापारात आतापर्यंत कधीच पडलेले नाहीत. त्यामुळे विपुल द्रव्य अथवा पैसाही त्यांनी कधी केला नाही. ज्यावेळी इतर भागातले हिंदी लोक परकीयांच्या जुलुमाखाली पीडले जात होते, त्यावेळी महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांनी आपले सारे आयुष्य स्वराज्याचा कारभार हाकण्यात घालविले. त्यांचे रक्त त्यापायी खर्ची पडले. महाराष्ट्रीयांची पिछेहाट का होत चालली आहे याबद्दलही परवाच एका कॉंग्रेस पुढाऱ्याने मुंबईतील आपल्या एका भाषणात मीमांसा केली. महाराष्ट्रीयांना व्यवहारज्ञान कमी म्हणून ते मागे पडत आहेत असे त्यांचे म्हणणे आहे. पण मला ही गोष्ट मुळीच पटत नाही. माझ्या मते महाराष्ट्रीयांइतकी व्यवहारबुद्धी हिंदुस्थानातील इतर कोणाही प्रांतीयात आढळू शकणार नाही. महाराष्ट्रीयांचा ऱ्हास इतर कोणत्याही कारणाने झालेला असो, पण व्यवहारबुद्धीच्या अभावामुळे मात्र तो खचित झालेला नाही. महाराष्ट्रीयांची पिछेहाट का झाली याचे कारण त्यांचे जीवित महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी कामी आले, राजकारण खेळविण्यात, राज्यकारभार

हाकण्यात त्यांचा काळ निघून गेला. माझ्या या म्हणण्याची इतिहासच साक्ष देत आहे. धनाढ्य श्रेष्ठीचे नाव महाराष्ट्राच्या इतिहासात तुम्हाला ऐकू येणार नाही पण सेनानी, मुत्सद्दी, राजकारणी पुरुष यांची नावे घडोघडी तुम्हाला सापडू शकतील. जगातील कोणत्याही देशाला अभिमान वाटावा अशी ही नावे आहेत.

महाराष्ट्राची पिछेहाट झाली याचे कारण हेच की, त्यांनी इतरांप्रमाणे व्यापाराचा मार्ग स्वीकारला नाही, लक्ष्मीची कृपा संपादण्याचा प्रयत्न केला नाही, तिच्या मागे ते लागले नाहीत. आज कशाला किंमत असेल, तर ती एका पैशाला ! पैशाने बुद्धी काबीज केली आहे, निदान बुद्धी व शील या दोहोंवर त्याने मात केली आहे हे तरी खासच होय !

एका काळी आपण राजकारणात अग्रभागी होतो. टिळक, गोखले व रानडे या तीन महाबुद्धिवान व राजकारण धुरंधर व्यक्ती आपल्यामध्ये होत्या. ह्या व्यक्तींचे राजकारण आजच्यासारखे खळबळींचे नसेल अथवा आजच्यासारखे औत्सुक्यपूर्णतेचे नसेल. पण ते आजच्यापेक्षा अधिक प्रामाणिक व अधिक विचारप्रवर्तक खास होते ! पण या बाबतीतील देखील पुढारीपण आमच्याकडे राहिलेले नाही. आजची स्थिती अवलोकन करता कारकून व मजूर ह्या पेशापलिकडे काहीच कर्तृत्व नसलेले लोक अशीच महाराष्ट्रीयांची अवस्था होत चाललेली अधिकाधिक दिसून येत आहे. ही घसरगुंडीची गोष्ट लक्षात घेता, ज्या काही थोड्या महाराष्ट्रीयांना या घसरगुंडीतूनही राजकारणात काही तरी स्थान मिळविता आले आहे त्यांचीही तेथून उचलबांगडी व्हावी ही गोष्ट महाराष्ट्रीयांना विशेष बोचू लागल्यास त्यात नवल नाही, परंतु ह्या कोत्या व दुसऱ्या बाजूने पाहिल्यास सद्‌बुद्धीच्या अशा दृष्टीकोनाने, डॉ. खऱ्यांच्या लढ्याकडे पाहून तो लढविणे आपल्यापैकी कोणालाही मुळीच प्रशस्त वाटणार नाही याबद्दल मला खात्री आहे आणि याच कारणामुळे डॉ. खरे यांच्या स्वागताकरिता मी जो येथे आलो आहे तो महाराष्ट्रीय या नात्याने नव्हे, अर्थात महाराष्ट्रीय म्हणून म्हणवून घेण्यात मला अभिमानच वाटतो. माझ्या महाराष्ट्रीयत्वाचा मला फार फार अभिमान आहे ही गोष्ट मी येथे ठासून सांगतो. महाराष्ट्रीयात असे काही गुण आहेत की, जे इतर प्रांतीयात तुम्हाला दिसून यावयाचे नाहीत. लंडनसारख्या परक्या ठिकाणी सर्व प्रांतीयांचा मेळावा जमलेला असतो त्यावेळी हा फरक सहज लक्षात येऊ शकतो. कोणाचे कसे गुणदोष आहेत हे त्यावेळी ओळखणे सहज शक्य होते.

डॉ. खरे महाराष्ट्रीय आहेत त्यामुळे जसा मी येथे आलो नाही, तसाच ते काँग्रेसवाले आहेत यामुळेही आलेलो नाही. डॉ. खऱ्यांनी काँग्रेसचे अनुयायित्व

पत्करले आहे. त्या संस्थेचे जे काय नियम असतील अथवा जी काय शिस्त घालून देण्यात आलेली असेल ती पाळण्याचेही त्यांनी पत्करले आहे हे सरळच आहे. या शिस्तपालनाबाबत त्यांच्या संस्थेशी त्यांचा काही वाद असला तर त्यात आमच्यासारखे जे कॉंग्रेसच्या बाहेर आहेत त्यांच्याकडून त्यांना साहाय्य होणे शक्य नाही. मी येथे आलो याचे कारण हेच की मुख्यप्रधानाच्या हक्काचा लढा डॉ. खरे हे आज लढवीत आहेत. मुख्यप्रधानाचे हे हक्क मला जनतेच्या, मतदारांच्या व जबाबदार राज्यपद्धतीच्या दृष्टीने अत्यंत बहुमोलाचे वाटत आहेत आणि यासाठीच डॉ. खऱ्यांचे स्वागत करण्याकरिता मी येथे उपस्थित झालो आहे.

मुख्यप्रधान हा जबाबदार राज्यपद्धतीच्या कमानीतला खिळीचा दगड होय असे मी म्हटले होते तेच मला पुन्हा एकदा येथे फिरून सांगावेसे वाटते. माझ्या मते जबाबदार राज्यपद्धतीला दोन गोष्टींची मुख्य आवश्यकता असते, पहिली गोष्ट म्हणजे आपल्या प्रतिनिधींच्या कृत्यावर डोळ्यात तेल घालून नजर ठेवणारी जनता व दुसरी गोष्ट म्हणजे जनतेच्या मताचा कौल ज्यांनी घेतला नाही अशांना नव्हे, तर ज्यांनी हा कौल घेऊन स्वतःला निवडून दिले आहे अशांनाच फक्त जबाबदार राहणारा मुख्यप्रधान. मुख्यप्रधानाच्या कृत्याची रास्तारास्तता जोखण्यास जनता आपल्याकडे अखेरचा निर्णायक हक्क घेऊन बसलेली असते. तो हक्क तिचा आहे. कॉंग्रेस वर्किंग कमिटीने आपला जो हक्क सांगितला आहे, त्यामुळे जबाबदार राज्यपद्धतीची माझ्या मते सारीपुरी विटंबनाच होत आहे !

कॉंग्रेस वर्किंग कमिटीने दोन तत्त्वे अंमलात आणली आहेत. ही तत्त्वे माझ्या मते अत्यंत विघातक व कोणत्याही लोकशाही राष्ट्रात असम्मत ठरणारी आहेत. वर्किंग कमिटीने पहिले तत्त्व असे सांगितलेले दिसत आहे की, मुख्य प्रधानाला आपल्या सहकाऱ्यांची निवड करण्याचा हक्क पोचत नसून हे त्याचे सहकारी मंत्री, मतदारांना अथवा कायदेमंडळाशी जबाबदार नसलेल्या अशा एखाद्या बाह्य संस्थेनेच निवडले पाहिजेत ! मंत्रिमंडळाच्या सामुदायिक जबाबदारीचे तत्त्व प्रस्थापित करून घेण्यासाठी गोलमेज परिषदेत आम्ही किती झगडलो आहोत याची, गृहस्थहो, तुम्हाला कल्पना नाही ! सायमन कमिशनने या बाबतीत आपल्या रिपोर्टात अशी शिफारस केली होती की, प्रांतातील राज्यपद्धती पूर्ण जबाबदारीची असावी असे जरी ठरविले असले आणि कायदा व सुव्यवस्था हे खाते जरी राखीव असू नये असे मान्य केले गेले, तरी ते खाते गव्हर्नरकडून नेमण्यात आलेल्या मंत्र्यांच्या बरोबरीने मंत्रिमंडळात समाविष्ट करावे. ही शिफारस हाणून पाडण्यासाठी साऱ्या हिंदी प्रतिनिधींनी एकजुटीने

कसा झगडा केला याबद्दलची साक्ष येथे हजर असलेले डॉ. मुंजे हेही देऊ शकतील. सदर शिफारशीने सामुदायिक जबाबदारीचे तत्त्व नष्ट होऊन जाईल असे आमचे म्हणणे होते. सामुदायिक जबाबदारीचे हे तत्त्व मुख्यप्रधानाच्या राज्यघटनेतील स्थानावर अवलंबून आहे. मुख्यप्रधानाच्या स्थानाचे महत्त्व आहे ते येथेच. ह्या तत्त्वाच्या अंमलबजावणीसाठी दोन गोष्टींची जरुरी असते. ह्या विषयाचा मी थोडासा अधिक अभ्यास केला असल्याने अधिकारवाणीने बोलण्याचा थोडासा हक्क मला पोचू शकतो. सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वासाठी पहिली जी गोष्ट आवश्यक असते ती म्हणजे मुख्यप्रधानाला आपले सहकारी निवडण्याचे पूर्ण स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. सामुदायिक जबाबदारीचे तत्त्व नांदवावयाचे असेल तर हा अधिकार इतर कोणालाही मिळता कामा नये. दुसरी आवश्यक गोष्ट ही की, एखादा मंत्री आपल्याला नको असेल तर त्याला घालवून देण्यास सांगण्याचा अधिकार मुख्यप्रधानाला असला पाहिजे. मुख्यप्रधानामुळे आपण अधिकारपदावर आरूढ झालो आहोत व आपल्याला अधिकारच्युत करणेही त्याच्याच हातात आहे, ह्या गोष्टी साऱ्या मंत्र्यांच्या मनावर बिंबवल्याखेरीज सामुदायिक जबाबदारीचे तत्त्व नांदणे कदापि शक्य होणार नाही. प्रत्येक मंत्र्याला ती जाणीव असेल तरच फक्त हे महत्त्वाचे तत्त्व चालू शकेल.

मंत्रिमंडळातील मंत्र्यांची निवड करण्याचा हक्क, अधिकार व काम मुख्यमंत्र्यांचे नसून तो अधिकार आपला आहे असे जे तत्त्व वर्किंग कमिटीने घालून दिले आहे ते सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वाला सर्वस्वी विसंगत असे तत्त्व आहे. दुसरा जो हक्क वर्किंग कमिटीने आपला म्हणून सांगितला आहे तो म्हणजे मंत्र्याच्या शासनाबाबतचा होय. एखाद्या मंत्र्याला शासन द्यावयाचे किंवा नाही हे ठरविण्याचा अधिकार वर्किंग कमिटीसारख्या बाहेरच्या संस्थेला आहे असे तिचे म्हणणे आहे.

गृहस्थहो, आपल्याला हे ठाऊकच आहे की, जबाबदार राज्यपद्धतीचे मुख्य तत्त्व हेच की, ज्यांनी आपल्याला निवडून दिले, त्याखेरीज इतर कोणालाही मंत्र्याने जबाबदार राहावयाचे नसते. पण वर्किंग कमिटीने ह्या मतदारांना तर पुरेच धाब्यावर बसविले आहे.

मतदार म्हणजे कोणीच नव्हे अशीच वर्किंग कमिटीची वृत्ती दिसते. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे एखाद्या यःकश्चित् उंदराइतकीच वर्किंग कमिटीने मतदारांची किंमत केली आहे. एखाद्या ठराविक दिवशी त्याने यावे,

ताकीद दिल्याप्रमाणे मत नोंदावे आणि मग लाथेच्या ठोकरीसरशी परत पिंजऱ्यात जाऊन पडावे एवढेच त्याचे काम. वर्किंग कमिटीने पुकारलेल्या तत्त्वांचा अर्थ हा असा आहे.

मुख्यप्रधानाच्या मूलभूत हक्कांसाठी डॉ. खरे भांडत आहेत म्हणूनच त्यांचे स्वागत मी करीत आहे आणि या त्यांच्या लढ्यात त्यांना सर्वांनी पाठिंबा देणे कर्तव्यच आहे. आता शेवटी एकदोन सर्वसाधारण मुद्याच्या गोष्टी सांगून मी आपले भाषण पुरे करणार आहे. ह्या गोष्टी सांगताना डॉ. खऱ्यांच्या काही विधानांचा मला उल्लेख करावा लागणार आहे. त्याबद्दल ते मला क्षमा करतील अशी आशा आहे. '' आपण काँग्रेसमध्येच राहणार आहोत, काँग्रेसमध्येच राहून आपल्याला ज्या टोळक्याने इतक्या नीच रीतीने वागविले त्या टोळक्याशी आपण दोन हात करणार आहोत. '' असे डॉ. खरे सांगत आहेत. अर्थात त्यांनी तसे केले तर आमचे काही म्हणणे आहे अशातली मुळीच गोष्ट नाही, पण या कामात त्यांना कितीसे यश मिळेल याची मात्र मला शंकाच वाटते. डॉ. खरे प्रधानमंत्री होते त्या वेळी त्यांच्या हातात अधिकार होता, मध्यप्रांताचे मुख्यप्रधान म्हणून जनतेच्या दृष्टीने मानाचे वैभव त्यांना प्राप्त झाले होते, पण इतक्या गोष्टी हाताशी असता त्या वेळीही वर्किंग कमिटीच्या विरूद्ध त्यांना काही करता येणे शक्य झाले नाही. मग आता केवळ एक काँग्रेस पक्षाचा सामान्य सभासद म्हणून राहून त्यांना तीच गोष्ट साध्य करून घेता येणे कसे शक्य होईल हे मला समजत नाही. पण काही लोक असे असतात की, अधिकार स्थानावर असल्या वेळेपेक्षा स्थानभ्रष्ट झाल्यावेळीच त्यांचे धैर्य द्विगुणित होत असते. डॉ. खरे हेही अपवादात मानलेल्या व्यक्तिपैकी असू शकतील.

मी येथे राजकीय प्रचारासाठी बोलत नाही अथवा आमच्या स्वतंत्र मजूर पक्षासाठी सभासद मिळविण्यासाठीही मला प्रचारकार्य करावयाचे नाही. तथापि, एक गोष्ट मात्र मला अगदी स्पष्ट व मनःपूर्वक सांगाविशी वाटते ती ही की, तुम्हाला जर लोकशाही हवी असेल तर दोन गोष्टी तुम्हाला केल्या पाहिजेत.

लोकशाहीला जरुर असलेली पहिली गोष्ट पक्षपद्धती ही होय. यापैकी एक पक्ष अधिकारारूढ तर दुसरा विरोधी असला पाहिजे. विरोध करणारा पक्ष अस्तित्त्वात नसेल, तर देशाच्या कारभारात जनता लक्ष घालू शकणार नाही.

प्रत्येक गोष्टीला दोन बाजू असतात. एवढेच नव्हे, पण परवाच स्टेट्स्मन नावाच्या एका इंग्लिश मुत्सद्याने असे म्हटल्याचे मला आठवते की, एखाद्या प्रश्नाला दोन बाजू आहेत असे दाखविणे हेच राजकारणी पुरुषाचे काम किंबहुना

कर्तव्यच असते, मग त्या प्रश्नाला दोन बाजू खरोखरच असोत किंवा नसोत. प्रत्येक प्रश्नाला दुसरीही एक बाजू आहे हे कळून घ्यावयास पाहिजे. काँग्रेस जी सांगते तीच त्या प्रश्नाची एकच एक बाजू होय. दुसरी बाजू तिला नाही असे मानता कामा नये.

दुसरी एक गोष्ट आपण शिकावयास पाहिजे ती ही की, सरकारची नेहमीच कसोटी घेत राहिल्या खेरीज लोकशाही सुरक्षित राहणे शक्य नाही. सुलतानशाही अथवा एकसत्ता आणि लोकशाही अथवा लोकसत्ता यामधला फरक काय ? राज्यशास्त्राचे पंडित याची व्याख्या काय देतील हे मला ठाऊक नाही, पण राजकारणी इसम या नात्याने मला त्यामध्ये हाच एक खरा फरक दिसतो की, सुलतानशाहीमध्ये सरकारची कसोटी अथवा चौकशी कधीच होऊ शकत नाही. एकदा स्थापना झाली की, ती अव्याहत चालूच राहाते. मग ती हिंदी संस्थानातल्याप्रमाणे वंशपरंपरेने चालो, अथवा कांही युरोपियन देशातल्याप्रमाणे एका डिक्टेटरशाहीच्या चाकोरीतून चालो, कशीही ती चालली, तरी एक गोष्ट स्पष्ट आहे ती अशी की, लोकशाहीमध्ये सरकारची कसोटी दरक्षणी लागत असते. आपल्या अस्तित्त्वाचे समर्थन प्रत्येक दिवशी सरकारला पटवून द्यावे लागते. आपल्या प्रत्येक कृत्याच्या रास्ततेबद्दलचा जाब द्यावा लागतो. तशी स्थिती सुलतानशाहीत नसते. सुरक्षितता तुम्हाला हवी असेल, प्रगती व्हावी अशी इच्छा असेल, तर सर्वचजण एकाच संस्थेला चिकटून राहू नका ! मग, इतर लोक काय वाटेल ते म्हणू द्या. त्याची पर्वा करू नका. मी काँग्रेसमध्ये जात नाही याचे कारण मला माझ्या कर्तृत्वाला व बुद्धीला साजेलशी जागा मला तेथे मिळू शकणार नाही हे नव्हे. मला तेथे दडवून टाकता येणे कोणालाही शक्य होणार नाही. काँग्रेसमध्ये मी जात नाही याला तसेच कारण आहे आणि ते कारण हेच की, त्या संस्थेबाहेर राहणे हेच मला अधिक व अत्यंत आवश्यक वाटते. टीकाकाराची भूमिका स्वीकारुन प्रत्येक प्रश्नाची दुसरी बाजू उलगडून दाखविणे हेच मला अधिक श्रेयस्कर वाटते आणि जनतेची फसवणूक करता येऊ नये म्हणूनच ही भूमिका मला पत्कराविशी वाटत आहे.

आपल्या लोकांच्या अंगचे वैशिष्ट्य सध्या व्यक्त होऊ लागल्याची जाणीव मला सध्या होऊ लागली आहे. इंग्लंडमध्ये चालू असलेल्या जबाबदार राजसत्तेसारखी सत्ता आपल्या देशात स्थापन करण्यासाठी आपण झगडलो आणि आमच्या राज्यघटनेत तिचा अंतर्भाव करण्यास भाग पाडले, पण त्या राजसत्तेला निराळेच विशिष्ट स्वरूप प्राप्त होत चालल्याचे जाणवू लागले आहे. जबाबदार राज्यपद्धतीला आज वर्षानुवर्षे आपण पारखे झालो आहोत. आतापर्यंत

सुलतानांचीच सत्ता आपल्यावर चालत आली. आपले भवितव्य इतरांच्या हातात देऊन स्वस्थ बसणे हे आपले आतापर्यंतचे वैशिष्ट्य. आपले धनी हा आपला देव आणि त्याची पूजा करीत राहणे हाच आपला धर्म. हेच वैशिष्ट्य सध्याही प्रस्थापित होऊ पाहत आहे. मालकाचेच म्हणणे खरे, त्याच्याविरूद्ध टीका करणे आपले काम नव्हे, अशी मतदारांची वृत्ती व्हावयासही हेच वैशिष्ट्य कारण आहे. पण अशा अंधभक्तीने जबाबदार राज्यपद्धतीला मात्र गोड फळे कदापि येऊ शकणार नाहीत. पण जबाबदार राज्यपद्धती नांदावयाची तर सरकारची कसोटी पाहण्यासाठी एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे सहजपणे वळण्याची तयारी असलेल्या लोकसमुदायाची प्रथमतः गरज असते. असा लोकसमुदाय निर्माण झाला नाही, तर असा प्रकार घडून येईल की, ब्रिटिशांकडून जी काही सत्ता आपण मिळवू शकू, ती बहुजन समाजाच्या हाती न जाता एखाद्या टोळक्याच्या हाती जाईल आणि पूर्वीपेक्षाही वाईट परिस्थिती ओढवल्याचे प्रत्ययाला येईल. ह्यापेक्षा आणखी अधिक बोलण्याची माझी इच्छा नाही. शेवटी मी डॉ. खऱ्यांना एवढेच सांगतो की, आम्ही आज येथे बहुजनसमाजाला राजकीयदृष्ट्या अत्यंत जिव्हाळ्याच्या व महत्त्वाच्या असलेल्या अशा ह्या प्रश्नाबाबत त्यांना शक्य त्या प्रकारे पाठिंबा देण्यासाठी जमलो आहोत. पक्षविशिष्ट राजकारणाच्या कक्षेबाहेरचा सर्वसामान्य असा हा प्रश्न आहे व म्हणून साऱ्यांचा त्याशी संबंध पोचत आहे. डॉ. खरे यांच्या या लढ्यात त्यांना पूर्ण यश मिळो असे मी इच्छितो.

डॉ. आंबेडकरांच्या भाषणानंतर डॉ. खरे यांनी उत्तरादाखल भाषण केले.

यानंतर श्री. ना. म. जोशी यांनी छोटेसे भाषण करून आभारप्रदर्शन केल्यानंतर समारंभ समाप्त झाला.

● ● ●

## १४०

# घाण ज्यांनी केली, त्यांनीच ती काढली पाहिजे

मध्यप्रांताचे माजी मुख्यप्रधान डॉ. खरे यांच्या मुंबईच्या मुक्कामात त्यांचा जाहीर सन्मान करून त्यांच्या धोरणाला पाठिंबा देण्यासाठी ज्या जाहीर सभा व सत्कारसमारंभ झाले, त्या समारंभापैकी डॉ. खरे यांच्या चाहत्यांनी तारीख ४ ऑगस्ट रोजी त्यांना सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या दिवाणखान्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली मेजवानी दिली. अशाच-प्रकारचा डॉ. खरे यांचा दुसरा जाहीर सत्कार तारीख ५ ऑगस्ट १९३८ रोजी परळ येथे श्री. जमनादास मेहता यांच्या अध्यक्षतेखाली एक प्रचंड सभा भरवून करण्यात आला.

सभेला सुरवात झाल्यावर प्रारंभी डॉ. खरे यांनी भाषण करून आपला झगडा व्यक्तीसाठी नसून लोकशाहीच्या तत्त्वासाठी आहे, हा मुद्दा स्पष्ट केला व मध्यप्रांतातील कारस्थानांचा पाढा वाचला. त्यानंतर डॉ. आंबेडकर हे भाषण करण्यास उठले. आपल्या भाषणात ते म्हणाले,

आजच्या प्रसंगी मला भाषण करण्याचे काही प्रयोजन आहे असे वाटत नाही. कालच सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या दिवाणखान्यामध्ये माझ्या अध्यक्षतेखाली एक सभा झाली. तीत माझे सर्व म्हणणे मी सांगितले होते. कालचे माझे भाषण इंग्रजीत झाले. परंतु मराठी वृत्तपत्रांचेही जासूद त्या वेळेला हजर होते. त्यांनी माझ्या भाषणाचा तरजुमा योग्य तोच दिला असेल असे मला वाटते.

मी कॉंग्रेसचा सभासद नाही हे तुम्हाला परिचित आहे. डॉ. खरे यांनी जी कहाणी सांगितली ती त्यांच्या भाऊबंदकीच्या वादापैकी एक आहे. मी अर्थातच तिऱ्हाईत आहे. या वादात मी का पडावे हा प्रश्न मला कोणी विचारला तर त्यात वावगे काही आहे असे मला म्हणता येणार नाही. माझ्या पक्षातील माणसांनी घरच्या भाकरी खाऊन या उचापती का करता असा प्रश्न करणे साहजिक आहे. म्हणूनच माझा आज भाषण करण्याचा अधिकार नाही. परंतु तिऱ्हाईत असलो तरीहीं व्यापक अर्थाने डॉ. खरे यांचा शेजारी आहे. एकाच वातावरणात आम्ही जीवन कंठीत आहोत. शेजारच्या घरी आग लागली म्हणजे माझे घर सुरक्षित आहे, त्याला आग लागली नाही म्हणून कोणी स्वस्थ बसत नाही, कारण

---

विविध वृत्त : २० ऑगस्ट १९३८.

एकदा आग लागली म्हणजे तिची धग कुणाला लागेल हे सांगता येणार नाही. शिवाय आपणास माहितच आहे की, मुंबई असेंब्लीमध्ये माझी स्थिती पिल्ले पंखाखाली घेऊन त्यांना ऊब देत बसणाऱ्या कोंबडीसारखी आहे. १०-१२ पोरे घेऊन मी असेंब्लीत विरोधी पक्षाला बसलेला असतो. ही मुले हळूहळू मोठी होतील. न जाणे, त्यांची संख्याही हळूहळू वाढेल व कोणी सांगावे मला देखील प्राईम मिनिस्टर होण्याचा योग येईल. डॉ. खरे यांच्यावर आलेल्या आपत्तीविषयी मी जर मुग्ध राहिलो, तर जी आपत्ती डॉ. खरे यांच्यावर आलेली आहे तीच कदाचित् माझ्यावर येणे शक्य आहे. पुढच्या काळाकडे लक्ष देऊन या वादात तिऱ्हाईत म्हणून स्वस्थ न बसता माझे म्हणणे काय आहे हे आपणापुढे मांडावे व डॉ. खऱ्यांशी मैत्री जोडावी असे मला वाटते आणि म्हणून आज मी बोलावयास उभा राहिलो आहे. तथापि या नाटकातील मुख्य पात्र डॉ. खरे रंगभूमीवर येऊन गेल्यावर माझ्यासारख्या दुसऱ्या पात्राच्या बोलण्यात काहीच स्वारस्य नाही, हे मी जाणून आहे.

डॉ. खरे यांच्यावर प्रसंग गुदरल्यानंतर ते आपल्या प्रांतात आले आहेत. त्यांनी जी भाषणे केली ती मी मन लावून वाचली आहेत. प्रतिपक्षातील आपापसातील भांडणे वाचणे किंवा ऐकणे मनोरंजक तर खरेच, पण मी त्यांची भाषणे त्या दृष्टीने वाचली नाहीत. या वादात उत्पन्न झालेले काही मुद्दे अत्यंत महत्त्वाचे आहेत व त्याकडे आपण लक्ष दिले पाहिजे.

या वादामध्ये उत्पन्न झालेली मुख्य तत्त्वे अशी आहेत. हल्लीच्या राज्यघटनेत प्राईम मिनिस्टरचे अधिकार काय आहेत ? डॉ. खरे यांचे म्हणणे असे आहे की, मंत्रिमंडळातील सर्व मंत्री मुख्यप्रधानांनी निवडावयाचे असून बाहेरच्या कोणत्याही व्यक्तीने त्यासंबंधात ढवळाढवळ करता कामा नये व मंत्रिमंडळातील एखादा मंत्री नालायक, लुच्चा किंवा भांडखोर ठरला तर त्याला काढून टाकण्याचा अधिकार मुख्यमंत्र्याचा आहे हे डॉ. खरे यांचे म्हणणे आहे. कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे म्हणणे याच्या अगदी उलट आहे. मिनिस्टर कोणाला नेमावयाचा, त्याला कधी काढावयाचा, हा अधिकार आपला आहे, प्राइम मिनिस्टरचा नाही, असे वर्किंग कमिटीचे म्हणणे आहे.

मुख्य प्रश्न असा येतो की, मंत्रिमंडळाचा कारभार जर व्यवस्थित होत नसेल, तर त्यांना शासन करण्याचा अधिकार कोणाचा ? मला असे वाटते की, मंत्रिमंडळाला शासन करण्याचा हक्क ज्यांनी त्यांना निवडून दिले त्यांचा आहे. म्हणजे ज्या हजारो मतदारांनी त्यांना निवडून दिले त्यांचा आहे. वर्किंग कमिटीचे म्हणणे असे की, मंत्रिमंडळाचे शास्तेपण मतदारांकडे नसून ते तिच्याकडे

आहे. वल्लभभाईंनी गेल्या असेंब्लीच्या निवडणुकीत जे लोक उभे केले ते सर्व दगड आहेत, त्यांना काही हक्क नाही, अधिकार नाही. वल्लभभाई पटेल, गांधी, बजाज, राजेंद्रप्रसाद, जवाहरलाल नेहरु हे लोक निवडणुकीत उभे राहिले नाहीत, मतदारांनी त्यांना कसला अधिकार दिला नाही. हे सर्व उपटसुंभ आहेत. सर्व जबाबदार राज्यपद्धतीचा एकच अर्थ आहे की, न्याय देणारी शेवटची संस्था म्हणजे मंत्रिमंडळाला निवडून देणारा मतदारसंघच होय. या दृष्टीने पाहू गेले म्हणजे असे आढळून येते की, न्याय आणि सत्य हे डॉ. खरे यांच्याकडे असून वर्किंग कमिटीकडे न्यायही नाही व सत्यही नाही.

हे सर्व ठीक आहे. पण पुढे काय हाच प्रश्न मला महत्त्वाचा वाटतो. डॉ. खरे यांचे पुढे काय होणार, या प्रश्नाने माझ्या मनात काहूर उठले आहे. या वेळी मला माझ्या लहानपणच्या एका गोष्टीची आठवण होते. ज्या गावी आम्ही राहत होतो, तेथे आमच्या शेजारी एक कुटुंब राहत असे. त्यांना १०-१२ वर्षांची एक मुलगी होती. मुलगी लग्नाची झाल्यानंतर तिच्या आईबापांनी एक चांगलासा मुलगा पाहून तिचे लग्न केले. मुलगी नंतर सासरी राहावयास गेली, व ती तेथे आनंदात आहे या समजुतीवर तिचे आईबाप आपल्या गावी स्वस्थ राहिले. लग्न झाल्याला काही १०-१२ महिने झाले असतील, एके दिवशी चिठीचपाठी न पाठविता कोणा शेजाऱ्याबरोबर ती मुलगी आपल्या आईबापांच्या दारी दत्त म्हणून उभी राहिली व अगदी वरच्या सुरात ओक्साबोक्शी मोठमोठ्याने रडू लागली. आईबापांना वाटले की मुलीला झाले आहे तरी काय ? चांगला शिकला सवरलेला मुलगा पाहून दिला, घरदार चांगले बघून दिले, मग अचानक ही काय भानगड झाली ? मुलीच्या आईने आपल्या मुलीला पोटाशी धरली व काय झाले ते विचारू लागली. मुलीने आपल्याला सासुरवाडीस मारहाण, हाल-जाच कसे होतात या दुःखाचा पाढा वाचला. अंगावरून हात फिरवून पाहता मुलीच्या डोक्यात मोठी खोक पडलेली दिसली ! आईने मुलीची चोळी काढून पाहिली तो असे दिसून आले की, मुलीचे अंग मारामुळे चांगलेच सुजून आले आहे व पाठीवर मारामुळे मोठे वळही उठले आहेत. बिचारीने मुलीच्या पाठीला तेल-हळद लाविली. काही दिवसांनी ती मुलगी म्हणू लागली की, ज्या चुलीला आपण मला लाविली आहे तेथे माझे काही बरे वाईट व्हावयाचे असेल ते होईल. मला आपली सासरी पाठवा, असे म्हणून त्या मुलीने हट्ट धरला. आई-बाप यांनी मुलीला चोळी बांगडी केली. कपाळाला शेष भरली, ओटीत नारळ घातला आणि मुलीला लावून दिली. मुलगी पुन्हा सासरी नांदावयास गेली. नवऱ्याकडील माणसे म्हणू लागली की, मुलगी पाहा किती सालस, ती आमच्याकडे नांदावयास कबूल. पण तिचे आई-बापच काही तरी तिला शिकवितात व अशातऱ्हेने मुलगी सासरी झाली गोड आणि तिला तिच्या

संकटाच्या वेळी आश्रय देणारे आई-बाप झाले शत्रु. परंतु मुलीची सासू होती कजाग, तिचा एळकोट जाईना. दुर्दैवाने ह्या मुलीला मूल होईना. झाले निमित्त. एक दिवस ती मुलाला म्हणाली की, तू आता दुसरे लग्न कर. मुलीच्या आई-बापांना मोठा प्रश्न पडला. मुलीला पुन्हा आपल्याकडे आणावी तर ती इतकी बेवकूब की, पुन्हा म्हणणार मी जाते आपल्या सासरी. म्हणून त्यांनी तिच्याकडे लक्ष पुरविले नाही. नवऱ्याने दुसरे लग्न केले. मागल्या बाईला मूल झाले. सगळ्यांचे लक्ष अर्थात तिच्याकडे. हिची हेळसांड होऊ लागली. शेवटी तिला क्षय झाला आणि काही दिवसांनी झिजून मेली. डॉ. खऱ्यांची परिस्थिती काही अंशी आमच्या शेजारच्या मुलीसारखीच आहे. त्यांना काँग्रेसमध्ये जाच झाला, त्यांना अन्याय झाला म्हणून ते महाराष्ट्रात त्यांच्या सगेसोयऱ्यांकडे आपले गाऱ्हाणे घेऊन आले आहेत व इतका अन्याय झाला असतासुद्धा ज्याप्रमाणे ती मुलगी सासरीच नांदावयास कबूल, त्याप्रमाणे डॉ. खरे म्हणतात, ' मी आपला काँग्रेसमध्येच राहाणार ! ' या मुलीप्रमाणे त्यांना झिजवून मारण्याचा प्रसंग येऊ नये म्हणजे झाले !

डॉ. खरे यांना झालेला अन्याय पुसून काढता येत नाही. लोकशाहीची तत्त्वे अशी पुसली जाऊ नयेत हाच विचार या प्रसंगानंतर सर्वांनी केला पाहिजे. ज्या दगडांनी किंवा देवांनी डॉ. खऱ्यांचा बळी घेतला, ते दगड आणखी बळी घेणार नाहीत कशावरून ? डॉ. खऱ्यांचे म्हणणे की, सर्वांनी काँग्रेसमध्ये यावे. काँग्रेसमधीलही काहींचे म्हणणे असे आहे की, काँग्रेसमध्ये घाण आहे ती तुम्ही काँग्रेसला मिळून उपसून टाका. यावर माझे म्हणणे असे आहे की, घाण करणार तुम्ही ! अर्थात तुम्ही केलेली घाण तुम्हीच काढली पाहिजे. मी माझ्या स्वच्छ कपड्यांनी येऊन ती घाण का काढू ? तुमची घाण तुम्ही उपसून टाका म्हणजे मग माझ्या स्वच्छ कपड्यांनी काँग्रेसमध्ये यावयाचे किंवा नाही हे मी पाहून घेईन. यातून असा मुद्दा उपस्थित होतो की, एकच राजकीय पक्ष असणे इष्ट आहे काय ? सर्वांनी आपली शेंडी काँग्रेसच्या हातात अडकावी हे चांगले आहे काय ? मला असे प्रामाणिकपणे वाटते की, देशामध्ये एकच पक्ष असणे हे देशाच्या उन्नतीला हितावह नाही. ज्या देशामध्ये एकापेक्षा अधिक राजकीय पक्ष नाहीत, तेथे बुद्धीची वाढ होणे शक्य नाही व जेथे बुद्धीची वाढ नाही, तेथे स्वातंत्र्य मिळणे अशक्य आहे.

शेवटी डॉ. खरे यांना मी एक विनंती करणार आहे. कोणी तरी मला सांगितले की, मुंबईच्या प्रभात पत्रात मध्यप्रांत मंत्रिमंडळाविषयी लिहिताना असे लिहिले आहे की, डॉ. खरे हे जात्यात असून मुंबईचे मुख्यप्रधान बाळासाहेब

खेर हे सुपात आहेत. मला वाटते, आमचे बाळासाहेब हे कधीच सुपात येणार नाहीत. एखादी चांगली सून असली म्हणजे तिला आपण (Ideal) सुलक्षणी सून म्हणतो. बाळासाहेब खेर यांचे वर्तन सुलक्षणी सुनेप्रमाणे आहे. ज्या प्रमाणे (Ideal) सून दीर आला कर नमस्कार, सासरा-सासू आली कर नमस्कार, नणंद आली कर नमस्कार, जाऊ आली कर नमस्कार, सगळयांशी गोड बोलणारी, कोणाला कधी पाय लावायचा नाही, खाली वाकली तर पायाची पोटरी उघडी पडली आहे की काय हे पाहून मग वाकणारी, दररोज नवऱ्याच्या नावाने कुंकू लावणारी, हे काही शांता आपटेंचे कुंकू नव्हे, त्याला यश चिंतणारी, जन्मोजन्मी हाच नवरा मिळो म्हणून सावित्रीसारखी इच्छा करणारी, बाहेरच्या माणसांना सासरच्या माणसांनी शिव्या दिल्या तर त्याबद्दल कष्टी न होणारी अशी असते. आमचे बाळासाहेब खेर हुबेहुब असे वर्तन करीत आहेत आणि म्हणून मला असे वाटते की, १२ महिनेच काय १२ वर्षे देखील आमचे बाळासाहेब काँग्रेस अधिकारात राहिले तर मुख्यप्रधान राहतील. अर्थात् सुपात किंवा आंधणात पडण्याची त्यांना कधीच वेळ येणार नाही. एक मुलगी हिंदी घरात दिली, तिचे असे झाले, एक मुलगी गुजरातेत दिली तिचे बरे चालले हे पाहून दुःखात सुख म्हणून समाधान वाटते. पण काळाची गती फार विचित्र आहे. आमचे बाळासाहेब खेर कदाचित कधी काळी जात्यात पडतील. तसे जर घडले तर जसे डॉ. खरे मुंबई-पुण्याकडे आले, तर कदाचित आमचे बाळासाहेब खेर नागपूरास जातील. अशा प्रसंगी डॉ. खरे यांनी त्यांच्या पाठीवर मायेचा हात फिरवावा अशी माझी त्यांना विनंती आहे. (प्रचंड हंशा व टाळयांचा कडकडाट.)

यानंतर डॉ. मुंजे व रा. वर्दे यांची भाषणे झाली व नंतर अध्यक्ष श्री. जमनादास मेहता यांनी भाषण केल्यावर सभेचे काम संपले.

डॉ. खरे यांना ठगांच्या टोळीत न्याय मिळाला नाही याबद्दल आपणास नवल वाटत नाही अशा अर्थाचे श्री. जमनादास मेहता यांनी उद्गार काढले. लोकशाही विरुद्ध कारस्थान करणाऱ्या कंपूला डॉ. खरे यांनी अटक करणे जरूर होते. असाही अभिप्राय त्यांनी प्रकट केला.



## १४१

# दीर्घोद्योग व कष्ट करण्यानेच यशप्राप्ती होते

" पुणे येथील अस्पृश्य विद्यार्थ्यांचे ११ वे संमेलन रविवार ता. ११ सप्टेंबर १९३८ रोजी, पुणे येथे डी. सी. मिशनच्या हॉलमध्ये भरवण्यात आले. संमेलनाचे अध्यक्ष व मुख्य वक्ते म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची निवड करण्यात आली होती.

संमेलनाच्या पूर्वी शनिवारी व रविवारी, विद्यार्थ्यांचे मर्दानी व मैदानी खेळ, एक नाट्य प्रयोग, वक्तृत्व कलेची चढाओढ व भोजन वगैरे कार्यक्रम मोठ्या उत्साहाने पार पडले होते. या कामी मि. टी. बी. भोसले, संमेलन सेक्रेटरी व त्यांच्या सहकारी मित्रमंडळींनी बरीच मेहनत घेतली होती. संमेलनाचे चेअरमन श्री. राजाराम भोळे, एम. एल. ए. यांनी संमेलन चालक मंडळीस जे उत्तेजन व सहाय्य केले त्यामुळे, या वर्षाचे संमेलन विशेष यशस्वी झाले असे म्हटल्यास अतिशयोक्ती नाही. यंदाच्या संमेलनाच्या चिटणीस मंडळीत कु. घटकांबळे या विद्यार्थीनीने सहकार्याने काम केले होते. कॉलेज विद्यार्थिनींमध्ये त्या पहिल्याच विद्यार्थिनी होत.

संमेलनाचे मुख्य चिटणीस मि. भोसले यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात गेल्या १० संमेलनाचे महत्त्व निवेदन केले. या संमेलनाला आमदार भाऊराव गायकवाड, डी. जी. जाधव. के. एस. सावंत, रोहम, वराळे, काळे, बॅकवर्ड क्लास ऑफिसर श्री. देवधर, भा. र. कद्रेकर, सौ. गीताबाई गायकवाड, श्री. बाबुराव भातनकर, गंगाधर घाटगे, सुपरवायझर श्री. ढिखळे, के. आर. मधाळे वगैरे मंडळी प्रामुख्याने हजर होती. "[१]

या ११ व्या अस्पृश्य विद्यार्थी संमेलनात डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले,

" आजचे हे संमेलन जरी विद्यार्थ्यांचे असले तरी येथे बसलेल्या समूहाकडे पाहिल्यास येथे विद्यार्थ्यांपेक्षा विद्यार्थ्येतर अधिक आहेत असे दिसून येईल. जसे भाताच्या खिचडीत तांदळापेक्षा डाळच जास्त पडावी तशी स्थिती या संमेलनाची झाली आहे. ज्याअर्थी हे विद्यार्थी संमेलन आहे त्याअर्थी विद्यार्थ्यांना उपदेशपर दोन शब्द सांगणे मी माझे कर्तव्य समजतो. कारण मी जो आज येथे आलो आहे तो विद्यार्थ्यांच्या संमेलनासाठी आलो आहे. आजच्या

---

[१] जनता : १ ऑक्टोबर १९३८.

संमेलनाचे अध्यक्षपद स्वीकारताना मी कार्यकारी मंडळास काही अटी घातल्या. त्या सर्व विद्यार्थी मंडळाने मान्य केल्या असल्यामुळे आजच्या या संमेलनाचे वैभव व शोभा थोडी कमी झाली असेल. माझे भाषण मुख्यत: विद्यार्थ्यांकरिताच असल्याने इतरेजनास ते जरी नीरस वाटण्याचा संभव आहे, तथापि, ते विद्यार्थ्यांना आवडेल असे मला वाटते. विद्यार्थ्यांनी मला ही संधी दिल्याबद्दल त्यांना धन्यवाद देणे हे माझे कर्तव्य समजतो.

माझे आयुष्य सध्या खेड्यापाड्यातील अशिक्षित, अडाणी, जुलूमाने त्रस्त झालेल्या अशा लोकांची गाऱ्हाणी ऐकून ती निवारणार्थ खटपट करण्यात व त्यांच्या विवंचनेत जात आहे. त्यामुळे विद्यार्थी वर्गाकडे जितके द्यावयास पाहिजे तितके लक्ष देण्यास अवसर सापडत नाही. त्यामुळे मी विद्यार्थ्यांकडे दुर्लक्ष करतो असा काहींचा समज झाला असून कधी कधी तसा सूरही निघत असल्याचे मी ऐकले आहे. परंतु एक गोष्ट प्रथम मी तुम्हास सांगू इच्छितो ती ही की, एकटा मनुष्य आपल्या आयुष्यात विविध प्रकारची कार्ये उत्तमतऱ्हेने पार पाडू शकत नाही. या बाबत एका ग्रंथकर्त्याचे सुभाषित मला आठवते. If you want success you must be narrow minded. वरील म्हणण्यात फार मोठा अर्थ भरलेला आहे. कारण एकटा मनुष्य सर्वच गोष्टी करू म्हणेल तर तसे करणे त्याला अशक्य होईल. तेव्हा एक ना धड भाराभर चिंध्या यासारखे कोणतेही एक कार्य धड न करता अनेक कार्यांना हात घालणे योग्य नाही. आपल्या समाजाच्या दृष्टीने विचार केल्यास आपणास उपलब्ध असलेली साधन सामुग्री फारच अल्प आहे. तेव्हा माणसाने लहान लहान कार्ये हातात घेऊन ती पार पाडण्याचा प्रयत्न करावा हे उत्तम आणि म्हणूनच दीनदुबळया, स्पृश्य समाजाच्या जुलूमाने त्रस्त झालेल्या अडाणी समाजाच्या कार्याचा बोजा मी शिरावर घेतला आहे आणि त्या कार्यामुळे विद्यार्थ्यांकडे जितके लक्ष द्यावयास हवे तितके देता येणे शक्य नाही. अर्थात त्याचा अर्थ मी विद्यार्थ्यांच्या विरूद्ध आहे असे नाही. उलट मी जरी राजकारणात, समाजकार्यात पडलो असलो तरी मी आजन्म विद्यार्थी आहे. तेव्हा विद्यार्थ्याला विद्यार्थ्याविरूद्ध कसे राहता येईल ? मला अभ्यासासाठी लागणारी पुस्तके वारंवार घ्यावी लागतात. आज मजवर रु. १००० (एक हजार) पुस्तकांच्या खरेदीचे देणे आहे. असे जरी असले तरी माझी पत दांडगी आहे. ती अजून गेली नाही. मुंबईतील कोणत्याही पुस्तकाच्या दुकानातून मी पुस्तके उधार आणू शकतो. परंतु माझ्या विद्यार्जनाच्या कार्यात खंड पडू देत नाही, कारण विद्यार्जन हे माझे दांडगे व्यसन होऊन बसले आहे. तेव्हा विद्यार्थ्यांच्या विरूद्ध मी कसा राहीन ?

विद्यार्थ्यांनी विद्यार्जनानंतर गृहस्थाश्रमात प्रवेश केल्यानंतर कसे वागावे या बाबत उपदेश करण्यास मी अपात्र आहे. त्यांना कोणत्या प्रकारचा उपदेश करावा म्हणून मी बुचकळयात पडलो आहे. कारण माझा गृहस्थाश्रम फुकट

गेला आहे. तथापि, त्यांनी विद्यार्थीदशेत कसे वागावे या बाबत माझ्या स्वानुभवाने काहीनाकाही सांगू शकेन. ज्या समाजात गेली हजारो वर्षेपावेतो कसलेही शिक्षण नव्हते त्या समाजातील पुष्कळ लोक अलिकडे बी.ए. व एम.ए. वगैरे विद्यापीठाच्या पदव्या घेऊन बाहेर पडताना पाहून कोणास समाधान वाटणार नाही ? मागे आपल्या समाजात बी. ए. चा पदवीधर औषधालासुद्धा मिळत नव्हता. मागे कृष्णा जिल्ह्यात आपल्या समाजातील एक इसम प्रथम बी. ए. झाला होता. त्यामुळे तो इतका प्रसिद्धीस आला की नुसते त्याचे नाव लिहून पुढे बी. ए. लिहिल्यास पोस्टमन ते पत्र त्यासच नेऊन देत असत. इतका तो बी. ए. झाल्यामुळे प्रसिद्धीस आला होता. आज तर आपल्या समाजात अनेक बी. ए. झाले आहेत. इतकेच नव्हे तर विनोदाने बोलावयाचे झाल्यास येथे असलेल्या लोकात जर खडा फेकला तर तो बी. ए. झालेल्यासच लागेल. बी. ए. झालेले जरी काही लोक आज असले तरी त्यांनी एक गोष्ट ध्यानात ठेवावयास हवी आहे की, आपणास ज्या लोकांशी टक्कर द्यावयाची आहे ते लोक पुढारलेले आहेत. आजच्या जीवनकलहाच्या दंगलीत पुढारलेल्या लोकांपेक्षा आम्ही नीरस ठरल्यास आमची धडगत होणार नाही. कारण आज सर्व सत्ताधारी म्हणून पुढारलेलेच वर्ग आहेत. नोकरी मागण्यास कोणत्याही ऑफीसात गेल्यास तेथे असलेले वरिष्ठ अधिकारी आपल्याच गोतावळयाचा भरणा करतात हे उघडे नागडे सत्य आहे. नुसत्या बी. ए. होण्यामुळे तुम्हास नोकरी मिळणार नाही. पुढारलेल्या जातीच्या लोकांशी स्पर्धा करून तेथे बुद्धीचा प्रभाव पाडल्याशिवाय नुसत्या शिक्षणाचे चीज होणार नाही. अगर पुढारलेल्या जाती आपणास दबणार नाहीत. उलट आज शेकडो वर्षे जसे आपणास व आपल्या बापजाद्यांना त्यांनी दाबले तसेच ते तुम्हास दाबल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणून तुम्ही जे शिक्षण घेता ते असे घ्या की त्यामुळे आपले सर्व विद्यार्थी सरस झाले पाहिजेत. अडाणी आईबापांच्या पोटी जन्म घेऊन जर बी. ए. झालात तर त्याबद्दल दुराभिमान बाळगू नका. आपल्या कर्तव्याची जाणीव ठेवून झटून अभ्यास करा. मी प्रथम बॅरिस्टर होऊन आल्यानंतर महारडा बॅरिस्टर म्हणून मला हिणवणीने पुढारलेल्या वर्गाचे बॅरिस्टर म्हणत असत. परंतु मी आपल्या कर्तबगारीने त्यांची तोंडे बंद केली आहेत.

आपणास चांगले दिव्य केल्याशिवाय महत्त्व येत नाही. इतर समाजाचे तसे नाही. ज्यावेळी आपण सोन्याच्या मोलाचे कार्य करू तेव्हा कोठे इतर वर्गाचे लोक त्याला कथलाच्या कार्याच्या मोलाचे समजतील आणि त्यांनी कथलाच्या मोलाचे कार्य केले तरी त्यास सोन्याच्या मोलाची किंमत येत आहे. हा तर आज व्यवहार होऊन बसला आहे. आपण असे पहा की जर एखाद्या महारीन अगर मांगीन अगर चांभारीन बाईने सोन्याचें दागिने जरी वापरले तरी ते नकली व खोटे असा समज उच्च म्हणविणारे वर्ग करून घेत असतात. तद्वतच

पुढारलेल्या लोकांच्या स्त्रियांनी पितळेचे दागिने वापरल्यास ते सोन्याचेच असावेत हा समज दृढ झाला आहे. तद्वतच इतर बाबतीतही आपले झाले आहे. आपण कोणतेही कार्य जेव्हा त्यांच्यापेक्षा शतशः चांगले करू तेव्हा कोठे त्यांच्या बरोबरीचे म्हणून आम्ही गणले जाऊ. हे सर्व करण्यासाठी आमच्यात आत्मविश्वास निर्माण केला पाहिजे.

आत्मविश्वासासारखी दुसरी दैवी शक्ती नाही. आम्ही आमच्यातील आत्मविश्वास गमावता कामा नये. उदाहरणार्थ, कुस्ती खेळण्यासाठी आखाड्यात उतरलेल्या पहिलवानाने दुसऱ्याच्या ठणठणीत दंड थोपटण्याने घाबरून गर्भगळीत झाल्यास त्याच्या हातून काहीतरी होणे शक्य आहे काय ? मी तर नेहमी असे म्हणत असतो की मी जे करीन ते होईल. अर्थात, मी हे सर्व आत्मविश्वासावर अवलंबून म्हणत असतो. माझ्या या म्हणण्यामुळे काही लोक मला घमेंडखोर, प्रौढीबाज वगैरे दूषणे देतील. परंतु ही प्रौढी अगर घमेंड नसून आत्मविश्वासामुळेच मी हे म्हणू शकतो. मी मनात आणीन तर सव्वा लाखाची गोष्ट सहज करीन. मी सुद्धा तुमच्या सारखाच एका महारीन बाईच्या पोटी जन्मास आलो आहे. गरिबीच्या दृष्टीने विचार करिता आजच्या गरिबातील गरीब विद्यार्थ्यापेक्षा माझी त्यावेळी मोठी चांगली सोय अगर मला इतर अनुकूलता होती असे नाही. मुंबईच्या डेव्हलपमेंट डिपार्टमेंटच्या चाळीत दहा फूट लांब व दहा फूट रुंद अशा खोलीत आई-बाप, भावंडे यांच्यासह राहून एका पैशाच्या घासलेट तेलावर अभ्यास केला आहे. इतकेच नव्हे तर अनेक अडचणींना व संकटांना त्याकाळी तोंड देऊन मी जर एवढे करू शकलो तर तुम्हास आजच्या साधन-सामुग्रीने सज्ज असलेल्या काळात अशक्य का होईल ? कोणताही मनुष्य सतत दीर्घोद्योगानेच पराक्रमी व बुद्धिमान होऊ शकतो. कोणीही मनुष्य उपजत बुद्धिमान अगर पराक्रमी निपजू शकत नाही. मी विद्यार्थी दशेत इंग्लंडमध्ये असताना ज्या अभ्यासक्रमास ८ वर्षे लागतात तो अभ्यास मी २ वर्षे ३ महिन्यात यशस्वीतऱ्हेने पुरा केला. हे करण्यासाठी २४ तासापैकी २१ तास अभ्यास करावा लागला आहे. जरी माझी आज चाळीशी उलटून गेली असली तरी मी २४ तासापैकी सारखा १८ तास अजूनही खुर्चीवर बसून काम करीत असतो. अलिकडच्या तरुणाला तर अर्धा तास तो सारखा बसला की चिमट्याच्या चिमट्या तपकीर नाकात कोंबावी लागते. नाही तर सिगारेटस् ओढीत हातपाय ताणून काही काळ पेंगल्याशिवाय उत्साह येत नाही. मला या वयातसुद्धा यापैकी कशाचीही गरज भासत नाही.

दीर्घोद्योग व कष्ट करण्यानेच यशप्राप्ती होते. नुसत्या पदव्या मिळविण्याने काही होणार नाही. कारण पदव्या म्हणजे ज्ञान नसून शिक्षकाच्या मदतीशिवाय ज्ञानार्जन करण्यास जमविलेली साधन सामग्री होय. विश्वविद्यालयाच्या पदव्या

व बुद्धिमत्ता याचा काही संबंध नाही. या बाबतीत एक मननीय उदाहरण आपल्या माहितीसाठी देईन. मरहूम ७ वे एडवर्डच्या नंतर पंचम जॉर्ज हे जेव्हा १९११ साली गादीवर बसले त्यावेळी ते हिंदुस्थानात येऊन गेल्यानंतर हिंदुस्थानातील विश्वविद्यालयांना अनेक लाखांची ग्रँट दिली. अर्थात् त्या ग्रँटच्या रकमेतून गणितशास्त्रात पारंगत असलेला प्रोफेसर बोलावून त्याचा लाभ आपल्या देशास देण्याचे ठरले व त्याप्रमाणे त्यास बोलावण्यात आले. येथे आल्यानंतर जे एम. ए. असतील त्यांनीच त्याच्या क्लासला हजर राहावे असे ठरले. त्यावेळी मद्रास येथे रामानुज नावाचा रेल्वेच्या ऑफिसात दरमहा रु. २० वर काम करणारा एक कारकून होता. त्यास आपले काम सांभाळून या गणित पारंगताची व्याख्याने ऐकण्याची इच्छा अनावर झाली. त्याने आपल्या व्याख्यानाला मला हजर राहाण्याची परवानगी असावी म्हणून विनंती केली. परंतु रामानुज हा नुसता मॅट्रिकच असल्याने तो या वर्गात आला असता त्यास काही समजणार नाही असे प्रथम या गणित पारंगतास वाटले. तथापि रामानुजास यायचे असल्यास त्याला वर्गात हजर राहाण्याची परवानगी देण्यात आली. रामानुजाने त्या प्रोफेसराची पाचसहा व्याख्याने ऐकली. परंतु दर व्याख्यानाच्या वेळी तो गणितशास्त्रात पारंगत असलेल्या प्रोफेसरची भाषणे ऐकण्याऐवजी आपल्या वहीवर दुसरे काहीतरी लिहित बसत असे. त्यामुळे प्रोफेसर मजकूर संतापून त्यांनी त्यास खूप दोष दिला. दिलेल्या संधीचा तू दुरुपयोग करीत आहेस म्हणून म्हटले, त्यावर रामानुजाने सांगितले की, ' महाराज, आपण आज शिकवीत आहात ती गणिताची प्रमेये मी विद्यार्थी दशेतच सोडविली आहेत. त्यात नवीन असे मला काहीच आढळत नाही. इतकेच नव्हे तर ही पुढीलही प्रमेये मी ज्या वहीवर सोडवून ठेवली आहेत ती मजजवळ आहेत. ' प्रोफेसर मजकूर यांनी त्याच्या वह्या तपासल्या, त्याने गणित शास्त्राचे मोठमोठे अजब प्रॉब्लेम्स सोडविले होते. ते पाहून प्रोफेसर मजकूर यांनी गव्हर्नमेंट ऑफ इंडियास लिहून कळविले, जो इसम गणित शास्त्रात इतका पारंगत आहे त्यास खर्डे घासण्यास दरमहा रु. २० पगारावर ठेवण्यात आले असल्याने खेद प्रदर्शित करण्यात आला. इतकेच नव्हे तर सदर प्रोफेसरांनी त्यास विलायतेस बोलावून त्याच्या ज्ञानाचा फायदा घेण्यासाठी त्यास बड्या पगारावर, गणितशास्त्रात पारंगत असल्याने, तिकडील लोकांना गणित शिकविण्यासाठी नेले व आपण स्वतः त्याचा विद्यार्थी झाला. परंतु रामानुज हा ब्राह्मण असल्याने त्याचे ब्राह्मण्य आड आले. त्यानी विलायतेला जाताना आपल्याबरोबर लागणारी स्वयंपाकाची सारी सामग्री नेली होती. विटाची चूल करून त्यावरच स्वतः स्वयंपाक करून तो जेवीत असे. युरोपियन्स हे यवन आहेत तेव्हा त्यांना स्पर्श झाल्यामुळे सकाळ संध्याकाळ त्यास थंड पाण्याने स्नान करावे लागे. इंग्लंडमध्ये कडाक्याच्या

थंडीमध्ये जेथे युरोपियन लोक फार झाले तर शुक्रवार खेरीज स्नान करीत नसत तेथे हा पठ्ठा दररोज सकाळ संध्याकाळ थंड पाण्याने स्नान करीत असे. स्नानाने त्यास निमोनिया झाला व त्यातच त्याचा अंत झाला. तसेच लिबरल पक्षाचे श्री. चिंतामणी हे अत्यंत बुद्धिमान, हुषार म्हणून त्यांचा बोलबाला आहे. इतकेच नव्हे तर सबंध हिंदुस्थानात पहिल्या दर्जाचा संपादक व लेखक म्हणून त्यांची ख्याती होती. आपल्या विद्यार्थ्यांची अशी समज झालेली दिसते की, बी. ए. पदवीधर झाला की आता पुढे काहीच शिकावयाचे राहिले नाही, परंतु ख़रे पाहाता बी. ए. झाल्यावर फार झाले तर शिक्षकाशिवाय स्वतंत्रपणे अभ्यास करता येईल. म्हणजेच जे शिकायचे आहे ते पुढेच असते. माणसाने जन्मभर जरी शिकायचे मनात आणले तरी विद्यासागराच्या कडेला असलेल्या गुडघाभर ज्ञानात फार झाले तर जाता येईल.

विद्येबरोबरच आमच्यात शील पाहिजे. शीलाशिवाय विद्या फुकाची आहे. कारण विद्या एक शस्त्र आहे. एखाद्याजवळ विद्येचे शस्त्र असेल व तो शीलवान असेल तर त्यायोगे तो एकाचे संरक्षण करील, तर तोच इसम शील नसेल तर विद्येच्या शस्त्राने दुसऱ्याचा घात करील. विद्या ही तरवारीसारखी आहे परंतु तिचे महत्त्व तिला धारण करणाऱ्यावर अवलंबून राहील. कारण अडाणी मनुष्य कोणास फसवू शकत नाही. फसवावे कसे हेच त्याला उमगत नाही. परंतु शिकल्या सवरलेल्या लोकांच्या ठिकाणी कोणास कसे फसवावे व त्या फसविण्यासाठी लागणारा युक्तिवाद असल्याने खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे ते भासवू शकतात. दरेक खेडेगावात तेथे असलेले ब्राह्मण, वाणी व इतर शिकले सवरलेले गावगुंड लबाड्या करून कसे फसवितात हे आपण पाहिले असेलच. लबाडी करण्यास चातुर्य व बुद्धी लागते. परंतु चातुर्य व बुद्धी हिला सदाचाराची अर्थात शीलाची जोड मिळाली तर तो लबाडी अगर फसवाफसवी करू शकणार नाही आणि म्हणून शिकल्यासवरलेल्या लोकात शीलाची अत्यंत जरुरी आहे. शीलाशिवाय जर शिकले सवरलेले लोक निपजू लागले तर त्यांच्या शिक्षणातच समाजाचा व राष्ट्राचा नाश आहे. तेव्हा शीलाची शिक्षणापेक्षा किती अधिक किंमत आहे हे तुमच्या ध्यानी आले असेलच आणि म्हणून प्रत्येक इसमात प्रथम शील असले पाहिजे.

माझे भाषण संपविण्यापूर्वी राजकारणाविषयी दोन शब्द सांगणे या ठिकाणी मी माझे कर्तव्य समजतो. सर्वसाधारणपणे आपल्यातील लोक गरिबीमुळे विद्येचा उपयोग पोट भरण्यापलिकडे करीत नाहीत. मी त्यांना त्याबद्दल दोष देत नाही. शिकल्यासवरलेल्या लोकांपुढील अडीअडचणी तुम्ही दृष्टीआड

करून चालणार नाही. आज अधिकारारूढ असलेला स्पृश्य समाज आहे. त्यामुळे स्पृश्य मानलेल्या समाजाची स्थिती फार समाधानकारक आहे, त्यांचा मार्ग सर्व दृष्टीने सुकर आहे. परंतु त्याच्या उलट तुमचा मार्ग कंटकमय आहे. कोणत्या उपायांनी तो मार्ग सोपा होऊ शकेल याचा तुम्ही सर्वांनी एव्हापासूनच विचार करावयास पाहिजे. आपल्या समाजाची सर्वच बाजूने कुचंबणा होत आहे. तिचा पाढा या ठिकाणी वाचणे अशक्य आहे. आपण अल्पसंख्यांक आहोत. संख्येच्या बळावर स्पृश्य मानलेला समाज वाटेल तो जुलूम सध्या करीत आहे. आज जर आपण कोर्टकचेऱ्यात प्रवेश केला तर आपणास काय दिसेल ? मॅजिस्ट्रेट ब्राह्मण, कारकून ब्राह्मण, सर्कल इन्स्पेक्टर ब्राह्मण, तलाठी ब्राह्मण, मुन्सफ ब्राह्मण, फौजदार ब्राह्मण. अशास्थितीत जर आपले खटले अशा कोर्ट कचेऱ्याकडे न्यायासाठी गेले तरी तेथे न्याय मिळतो काय ? मुळीच नाही. कित्येक खटल्यांच्या निवाड्यात मॅजिस्ट्रेट लोकांनी महारांच्या बाजूने महार साक्षीदार आहेत सबब त्यांच्यावर विश्वास ठेवता येत नाही, असे म्हटले आहे. परंतु स्पृश्य जातींच्या बाजूने स्पृश्य जाती साक्षीस असल्या तरी मॅजिस्ट्रेटास ते चालते. फार कशाला आजचे काँग्रेसचे दिवाण हे सुद्धा जो कोणी काँग्रेसवाला असेल त्यासच मदत करण्यास तयार असतात. तेव्हा अशा परिस्थितीत मान्याच्या जागा आपल्या ताब्यात आल्याशिवाय होत असलेला जोरजुलूम थांबणार नाही. परंतु या जागा कशा मिळू शकतील, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आज तर चोर व लबाड अशांच्या गट्टी सारखी गट्टी, या स्पृश्य मानलेल्या काँग्रेसच्या लोकांची आहे. त्यांच्या गट्टीत जे सामील होतील त्यांच्याकडे ते जरा सहानुभूतीने पाहतील. जे लोक त्यांना सामील नाहीत त्यांच्याकडे खुनशीपणाने ते पाहत असल्याची प्रचिती आपणास आहेच. तेव्हा त्यासाठी मी आपणास दोन गोष्टी सांगू इच्छितो. पहिली गोष्ट अशी की, आपण सर्वांनी संघटन केले पाहिजे. आपण जर सर्व अस्पृश्य मानले गेलेले लोक एकत्रित झालो तर या भेदांच्या नगरीच्या किल्ल्यास कोठेतरी चीर गेल्याशिवाय राहणार नाही. लोक अडाणी आहेत. ते वाचू अगर विचार करू शकत नाहीत. गावातील शिरजोर लोकांच्या सांगण्याप्रमाणे अगर इच्छेप्रमाणे ते वागावयास तयार होतात. भीतीमुळे माणसे फुटून जाण्याचा फार संभव असतो. या जुटीसाठी विद्यार्थी वर्ग काय करावयास तयार आहे ? विद्यार्थी वर्ग ही एकजूट कशी सांभाळील याबद्दल मोठी शंका आहे. विद्यार्थ्यांनी आपल्या विद्यार्थीदशेत विद्या प्राप्त करण्यासाठी कसून झटावे ही उत्कृष्ट समाधानाची गोष्ट आहे. परंतु त्याचबरोबर या संघटनेच्या कार्याची अंशतः धुरा त्यांनी आपल्या खांद्यावर घेतलीच पाहिजे. आपल्या साऱ्यांच्या इच्छा तृप्त करण्याचे सामर्थ्य आपल्या कोणातच नाही आणि म्हणून ज्यांनी त्यांनी आपल्या वैयक्तिक मनिषा

अगर आकांक्षा पुऱ्या न झाल्या तर लगेच फटकून वागण्यात आपण आपला आत्मनाश करून घेत आहोत. तेव्हा या गोष्टी डोळयांपुढे ठेऊन स्वार्थास फाटा देऊन संघटना करण्यासाठी आपण सर्वांनी झटावे. व्यक्तीगत स्वार्थापेक्षा समाजाच्या फायद्याकडे आपण अधिक लक्ष दिले पहिजे.

दुसरी गोष्ट अशी की, आपला उद्धार करण्यासाठी हरिजन सेवक संघासारख्या हजारो संस्था स्थापन झाल्या आहेत. परंतु त्यांचे अंतिम ध्येय काय आहे ते उमगत नाही. त्यांचे कार्य कर्तव्य करण्याच्या इराद्याने सुरू आहे की कोंबडीस दाणे टाकून कापण्यासाठी पकडण्याच्या स्वार्थी बुद्धीचे आहे ? या संस्थांच्या लाभाचा काय परिणाम होईल, हा मोठा विचार करण्यासारखाच प्रश्न आहे. या ब्राह्मणी संस्थेपासून आपल्या विद्यार्थ्यांनी फायदा उचलल्यास 'ज्याचे मीठ खावे त्यास बेईमान होऊ नये ' या अनेक वर्षांच्या शिकवणुकीने आम्ही आमचे स्वत्व विसरण्याची मोठी भिती वाटते. या बाबत द्रोण व भीष्माचार्य यांची उदाहरणे आपल्या डोळयांपुढे आहेतच. पांडवांचा प्रश्न जरी न्यायाचा असला तरी तुम्ही त्यांच्याविरुद्ध कसे लढता असा प्रश्न भीष्मास विचारला असता त्यांनी उत्तर दिले की 'अर्थस्य पुरुषो दासः.'

' ज्यांचा मी भात खातो त्यांच्या बाजूने मला लढले पाहिजे. ' या उत्तरात मनुष्याच्या सर्वसाधारण स्वभावाचे चित्र रेखाटले आहे आणि म्हणून स्पृश्य वर्गांनी काढलेल्या या संस्थांचा फायदा घेण्यापूर्वी तो आम्ही घ्यावा की नाही हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. अर्थात याबाबत मला एक गोष्ट सांगावयाची आहे ती ही की, पुरातन काळी देव व राक्षस यांचे युद्ध चालले होते. युद्धात राक्षसाचा गुरु शुक्राचार्य यास संजीवनी विद्या अवगत असल्याने लढाइत मेलेल्या राक्षसांना तो या जोरावर पुन्हा जिवंत करीत असे. परंतु देवांच्या बाजूने लढाईत मेल्यास त्यांना काही जिवंत करता येत नसे. त्यामुळे दिवसानुदिवस देवांचे सैन्य कमी होऊ लागले. तेव्हा सर्व देवांनी एकत्र बसून याचा खूप खल केल्यानंतर असे ठरविले की, देवांच्या गुरुचा मुलगा कच यास राक्षसांच्या गुरुकडे संजीवनी विद्या शिकविण्यासाठी पाठवावे. त्याप्रमाणे कच शुक्राचार्याकडे विद्या शिकण्यास गेला. परंतु राक्षसांना देवांचे हे कारस्थान समजताच त्यांनी कचास ठार मारले व त्यास जाळून त्याची रक्षा शुक्राचार्यास दारुमध्ये मिसळून पिण्यास दिली. हेतु हा की, या कचाने शुक्राचार्यांच्या देवयानी नावाच्या मुलीशी प्रेमसंधान जुळवून तिला आपलीशी केले होते व त्याला संजीवनी विद्या शिकवावी असा हट्ट ती आपल्या बापाजवळ धरून बसली. तिच्या आग्रहावरून जर शुक्राचार्यांनी कचास संजीवनी विद्या शिकविलीच तर मग आपली धडगत नाही, या भीतीने व शुक्राचार्यांच्या पोटात दारुद्वारे त्याची राख गेल्यास त्याला जिवंत करावयाचे झाल्यास शुक्राचार्यांना मरावे लागेल व अशा स्थितीत देवयानी भलता

हट्ट धरणार नाही असे राक्षसांना वाटून त्यांनी हे सर्व केले. परंतु हे सर्व कारस्थान जेव्हा देवयानीस कळले तेव्हा तिने शुक्राचार्यांच्या पोटात असलेल्या कचास प्रथम संजीवनी विद्या शिकविण्यास देवयानीने हट्ट धरला. त्यामुळे शुक्राचार्याने पोटात असलेल्या कचास ती संजीवनी विद्या शिकविली व नंतर मंत्रोच्चार करताच शुक्राचार्यांचे पोट फाडून कच बाहेर पडला व त्यास अवगत झालेल्या विद्येच्या जोरावर त्याने शुक्राचार्यास पुन्हा जिवंत केले. अशी आख्यायिका आहे. परंतु देवयानीस तुझ्याशी लग्न करीन अशी जरी कबूली असली तरी आपले कार्य फत्ते होताच ते तो सर्व विसरला व देवायानीशी लग्न न करताच तडक आपल्या गोटात निघून गेला. कचाच्या या कृत्यास अनेक लोक कृतघ्न म्हणतात. परंतु मी मात्र त्याचे ते कृत्य कृतघ्नपणाचे मानीत नाही. त्याचप्रमाणे आमच्या विद्यार्थ्यांनी अनुकरण केल्यास मला त्यात वाईट वाटणार नाही. या बाबत इंग्रजीत असलेले सुभाषित मला आठवते.

" No man can be grateful at the cost of his honour, no woman can be grateful at the cost of her chastity and no nation can be grateful at the cost of its liberty "

गांधींच्या आजच्या सत्य आणि अहिंसा या म्हणण्याचा मला अजून अर्थच कळला नाही. सत्य कोणास व केव्हा सांगावे याचे उत्तर गांधींनी अजून दिलेले नाही. कल्पना करा की माझ्या शेजारी एक श्रीमंत गृहस्थ आहे. तो माझा स्नेही असल्याने त्याची ठेव तो कोठे ठेवतो हे मला माहीत आहे. तेव्हा जर काही चोर आले व म्हणाले की तुमच्या शेजाऱ्याची ठेव कोठे असते ते सांगा. तर अशा वेळी मी सत्य सांगून स्नेह्याचा घात करावा किंवा खोटे सांगून मित्राला वाचवावे ? अशी एक ना शंभर उदाहरणे देता येतील. असो.

शेवटी मला आपणास एवढेच सांगावयाचे आहे की, जर आपण एकजुटीने वागाल तर काहीतरी करू शकाल. आपल्या समाजावर हजारो वर्षांपासून होत असलेला जोर जुलूम व अन्याय निवारण करण्याचे कार्य आजच्या पिढीने स्वखुशीने आपल्या शिरावर घ्यावयास हवे आहे. आपल्या समाजात ऐक्याची अत्यंत जरूरी आहे व ऐक्यामुळेच आपण हे कार्य करू शकू अशी माझी खात्री आहे.

या बाबतीत शिस्त अत्यंत कठोरपणे पाळली तरच काहीतरी होऊ शकेल. नाहीतर सर्वत्र बजबजपुरी माजून समाजनाश व निःसंघटना होईल. तरी अशा वेळी योग्य ती खबरदारी सर्वांनी घ्यावी. शेवटी आपल्यात संघटना, शील व शिस्त वाढवा व समाज उन्नतीस त्याचा फायदा द्या, एवढे सांगून आपली रजा घेतो. ''[१]

● ● ●

---

१. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : -संपा. मा. फ. गांजरे, खंड–१–पृ. ५९-६७.

# १४२

# कामगारांवर गुलामगिरीची बंधने लादणे हे लोकशाहीचे विडंबन

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी काँग्रेस सरकारने मुंबई कायदे मंडळात आणलेल्या कामगारांच्या नागरिक स्वातंत्र्यास विघातक अशा ट्रेड डिस्प्यूट बिलावर बिलाच्या पहिल्या वाचन प्रसंगी अत्यंत जोराचे व मुद्देसूद असे भाषण १५ सप्टेंबर १९३८ रोजी केले. यावेळी डॉ. आंबेडकर जवळ जवळ तीन तास बोलत होते. ते म्हणाले,

या बिलाच्या निरनिराळया कलमांवर टीका करताना पूर्वी पास झालेल्या अशाचप्रकारच्या कायद्यांचाही विचार यावेळी होणे जरूर आहे. कारण या बिलाच्या कलमांची तुलना पूर्वीच्या कायद्याच्या कलमांबरोबर केल्याशिवाय या बिलाची कलमे पाहिजे तितकी स्पष्ट होणार नाहीत. ह्या बिलातील शेवटच्या कलमावरून असे दिसते की हे बिल १९३४ सालच्या संप बंदी बिलाची ( ट्रेड डिस्प्यूट कन्सिलीएशन बिल ) जागा भरून काढण्याकरता आणलेले आहे. १९३४ चा संप बंदी कायदा, तडजोड घडून आणणारी एखादी संस्था स्थापण्याकरिता पास करण्यात आला होता. १९३४ च्या कायद्याने तडजोड ही ऐच्छिक केली होती परंतु आजच्या बिलाने मात्र तडजोड सक्तीची होणार आहे. इतकाच फरक प्राधान्येकरून १९३४ च्या कायद्यात ह्या बिलाने घडणार आहे. १९३४ च्या कायद्याने स्थापलेली ऐच्छिक तडजोड जारीची करण्याची जरूरी आज का भासावी ?

ऐच्छिक तडजोड जारीची करण्याची जरूरी आज खरोखरच आहे किंवा नाही हे पाहाण्यापूर्वी आपण जर १९३४ च्या वेळची परिस्थिती लक्षात घेतली तर आपणास काही महत्त्वाच्या गोष्टी आढळून येतील. सर रॉबर्ट बेल ह्यांच्या बिलात प्रथमतः सक्तीच्या तडजोडीचेच ( Compulsory Conciliation ) तत्त्व होते, परंतु १९३४ सालची परिस्थिती विचारात घेतल्यानंतर सक्तीच्या तडजोडीची काही एक जरूरी नाही असे सर रॉबर्ट बेल ह्यांना वाटल्यामुळे बिलाच्या

---

जनता : १, ८ आणि १५ ऑक्टोबर १९३८.

वाचनाच्या वेळी त्यांनी ' मी सक्तीच्या तडजोडीच्या ऐवजी ऐच्छिक तडजोडच योजणार आहे ' असे स्पष्ट करून सांगितले. यावरून असे दिसते की सर रॉबर्ट बेल ह्यांना देखील १९३४ साली जारीच्या तडजोडीची काही जरूरी भासली नाही. त्यावेळी मि. सकलातवाला हे हजर होते व त्यांनाही जारीच्या तडजोडीची जरूरी त्या वेळेस भासली नाही. त्यांना जारीच्या तडजोडीची जरूरी भासली नाही, इतकेच नव्हे तर त्यांनी अशाप्रकारच्या कायद्यांची काही एक जरूरी नाही असे स्पष्टपणे सांगितले.

१९३४ साली जर सक्तीच्या तडजोडीची गरज भासली नाही तर हल्ली अशी काय परिस्थिती झाली आहे की त्यामुळे सरकारला तो कायदा बदलून जारीची तडजोड प्रस्थापित करण्याची जरूरी भासवी ? जारीच्या तडजोडीचे समर्थन करताना मुख्यप्रधानांनी काही संपाचे आकडे देऊन असे दाखविले की, सध्या हिंदुस्थानात वारंवार व गंभीर स्वरूपाचे असे संप होत असल्यामुळे ऐच्छिक तडजोडी ऐवजी सक्तीच्या तडजोडीची योजना करण्याची जरूरी उत्पन्न झाली आहे. परंतु मी, संपाचे आकडे, त्यांच्यात भाग घेतलेल्या कामकरी लोकांची संख्या व फुकट गेलेल्या कामाचे दिवसांची संख्या ह्यांचा अभ्यास काळजीपूर्वक केला असल्यामुळे मला मुख्यप्रधानांचे समर्थन पटत नाही. लेबर ऑफिसने प्रसिद्ध केलेल्या लेबर गॅझेटमध्ये मुंबई प्रांतात झालेल्या संपाचे आकडे दिले आहेत. त्यात १९२१ ते १९३७ पर्यंतच्या काळात झालेले संप, त्यात भाग घेतलेल्या कामकऱ्यांची संख्या व फुकट गेलेल्या दिवसांची संख्या इत्यादी गोष्टी सविस्तरपणे दिलेल्या आहेत. ह्या आकड्यांवरून दृष्टी फिरवली असता, संपाची संख्या प्रत्येक वर्षी कमी कमी होत चालली आहे असेच कोणलाही दिसून येईल. १९२१ साली मुंबई प्रांतात एकंदर १०३ संप झाले, १९२२ ला संपाची संख्या १४३ होती व १९२३ ला १०९ होती, त्यानंतर १९२४ व १९२७ ह्या काळात संपाची संख्या ५० पर्यंत खाली उतरली. म्हणजे संख्येच्या दृष्टीने संपाची संख्या शेकडा ५० ने कमी झाली. १९२८ साली संपाची संख्या ११४ पर्यंत गेली व १९२९ ते १९३७ ह्या काळात संपाची संख्या ८८ ते ५३ च्या दरम्यान होती. उद्योगधंद्यात उत्पन्न झालेली क्षुब्धता संपाच्या संख्येवरूनच बरोबर मोजता येणार नाही. संपाची संख्या जरी लहान दिसत असली तरी संप करणाऱ्या कामकऱ्यांची संख्या व फुकट गेलेल्या दिवसांची संख्या तुलनात्मक दृष्टीने मोठीच आहे, हे ह्या कोष्टकात दिलेल्या आकड्यांवरून आढळून येते. संपाचे दिवस व कामगारांची संख्या यावरूनच उद्योग धंद्यातील अस्वस्थतेचे मापन केले पाहिजे. या दृष्टीने १९२८ हे सर्वात वाईट गेलेले वर्ष होते.

कारण त्यावर्षी फुकट गेलेल्या दिवसांची संख्या २४,०००,००० होती. दुसरे वाईट वर्ष म्हणजे १९२५ चे होय त्यावर्षी ११,०००,००० दिवस फुकट गेले. तिसऱ्या वाईट वर्षी म्हणजे १९२९ साली ८,०००,००० इतके दिवस फुकट गेले. त्यानंतर १९३४ सालाशिवाय इतर वर्षातील फुकट गेलेल्या कामाच्या दिवसांची संख्या व संपात भाग घेतलेल्या कामकऱ्यांची संख्या अगदीच क्षुल्लक प्रमाणात आहे. संप विरोधी कायदा १९३४ मध्ये पास झाला. १९३४ सालानंतरच्या वर्षातील फुकट गेलेल्या दिवसांची संख्या व संपात भाग घेतलेल्या कामकऱ्यांची संख्या जर लक्षात घेतली तर कुठच्याही राजकारणी मुत्सद्याला अगर एखाद्या सरकारी अधिकाऱ्याला उद्योगधंद्याची परिस्थिती बिकट होती असे वाटण्यास मुळीच जागा नाही. १९३७ हेच फक्त वाईट वर्ष होते असे दिसते व त्यावर्षी फुकट गेलेल्या कामाच्या दिवसांची संख्या अवघी ८९७ आहे. मागील वर्षातील फुकट गेलेल्या कामाच्या दिवसांच्या संख्येबरोबर तुलना केली तर ही संख्या अगदीच क्षुल्लक आहे असे म्हणावे लागेल. हे दिवस फुकट जाण्याचे मुख्य कारण म्हणजे अहमदाबाद शहरातील सार्वत्रिक संप १५ दिवस टिकला हे होय.

यावरून मला असे स्पष्ट करावयाचे आहे की, सरकारने किंवा मुख्यप्रधानांनी असे कोणतेही मुद्दे पुढे मांडले नाहीत की, ज्यावरून ऐच्छिक तडजोडी ऐवजी जारीची तडजोड आणून १९३४ चा कायदा आमूलाग्र बदलून टाकणारा फरक करण्याची सरकारला जरूरी भासली अशी खात्री ह्या सभेची होईल.

यानंतर डॉ. आंबेडकरांनी काही ठराविक संप बेकायदा ठरवणाऱ्या कलमांचा समाचार घेतला. प्रथम त्यांनी बिलातील संप बेकायदा ठरवणारे ६२ वे प्रकरण वाचून दाखविले.

'' ही कलमे न्याय्य आहेत असे दाखविण्याकरता असे सांगण्यात आले की, ' संप करणे ' हा हक्कच मुळी कुणालाही असू शकत नाही. कामगारांना संप करण्याचा हक्क नसल्यामुळे कामगारांना त्याबद्दल शिक्षा करणे ही गोष्ट नीतिच्या अगर कायद्याच्या विरूद्ध नाही.'' माझ्या भाषणात मला या म्हणण्याचे खंडन करावयाचे आहे.

आपण प्रथम ' संप ' ह्या शब्दाचा अर्थ लक्षात घेऊ. सर्वसाधारणपणे संप म्हणजे ' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडणे असे समजण्यात येते. जेव्हा कामगार संप करतात त्यावेळेस ते नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट मोडण्यापलिकडे जास्त काही करीत नाहीत. नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट मोडण्याच्या गुन्ह्यास हिंदुस्थानातील कायद्याने

कोठची शिक्षा सांगितली आहे ते आपण पाहू. हिंदी कायदा संप करण्याचा हक्क कामकऱ्यांना आहे हे तत्त्व मान्य करतो काय ? व मान्य करित आला तर तो ती गोष्ट कुठच्या तऱ्हेने करितो व तो जर संप करण्याबद्दल कामकऱ्यांना शिक्षा करीत असला तर तो कायदा कुठच्या तऱ्हेने ती शिक्षा ठोठावतो ? मी आपल्या पुढे अगदी प्राथमिक कल्पना मांडतो. एखादे कृत्य दिवाणी स्वरूपाचा अपराध असू शकेल, अथवा फौजदारी स्वरूपाचा गुन्हा असू शकेल. आता प्रश्न असा आहे की ' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडणे हा फौजदारी स्वरूपाचा गुन्हा होऊ शकेल काय ? अर्थातच नाही. ' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडणे हा दिवाणी स्वरूपाचाच गुन्हा ठरेल. तेव्हा ' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडणे हा दिवाणी स्वरूपाचा गुन्हा असेल तर ज्या मनुष्याचे ह्या गुन्ह्यामुळे नुकसान होते त्याला कायद्याने नुकसान भरपाईच मिळेल. जास्त काही मिळणार नाही.

' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडणे हा फौजदारी स्वरूपाचा गुन्हा आहे असे धरले तर त्या गुन्ह्याला हिंदी कायद्याने कुठची शिक्षा ठेवली आहे हे आपणास पाहिले पाहिजे. आपल्या हिंदी कायद्याने हा गुन्हा कसा मानला आहे हे नीट समजण्याकरिता आपण जरा इतिहासाकडे वळू या. नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट मोडणे ह्या विषयी पहिल्यांदा १८५९ साली कायदा झाला. त्याला Breach of Contract Act असे नाव देण्यात आले होते. ४९०, ४९१ व ४९२ ही इंडियन पिनल कोडमधील कलमे ' नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट ' मोडण्यास बंदी आहेत. १८५९ मध्ये पास झालेला कायदा फक्त कारागीर लोकांनाच लागू होता. त्या कायद्याची त्यावेळेच्यां परिस्थितीमुळे जरूरी ब्रिटिश सरकारला भासली. त्यावेळेस ब्रिटिश साम्राज्यशाहीच्यापुढे बंडाचा मोठा प्रश्न उभा राहिला होता. कारागिर लोकांना सैन्याला जरूरीच्या गोष्टी पुरविण्याकरिता आधीच पैसे दिलेले होते. परंतु भीतिमुळे अगर काही कारणामुळे हे कारागिर लोक आपआपल्या गावांना, जरी त्यांनी आधी पैसे घेतले होते तरी, निघून गेले. अशा परिस्थितीत हा कायदा करण्यात आला होता परंतु जरी हा कायदा करण्यात आला होता, जरी ह्या कायद्याने नोकरीचे कॉन्ट्रॅक्ट मोडणे हा गुन्हा करण्यात आला होता तरी हा कायदा फारच थोड्या वेळा उपयोगात आणला जात असे. ज्या कायद्यान्वये लोकांना शिक्षा होईल असा तो कायदा नव्हता. त्या कायद्याचा नंतरचा इतिहासही फार मनोरंजक आहे. हा कायदा केव्हाही उपयोगात आणला जात नव्हता. त्याच्यात १९२० साली सुधारणा करण्यात आली. त्या सुधारणेमुळे ह्या कायद्यात दोन तत्त्वे घालण्यात आली. एका तत्त्वामुळे असे ठरविण्यात आले की, नोकरीचा करार मोडण्याबद्दल एखाद्या कामगारास शिक्षा करण्याच्या वेळी मॅजिस्ट्रेटने तो

करार योग्य होता की अयोग्य होता ह्याचा विचार करावा. जर करार अयोग्य होता असे मॅजिस्ट्रेटचे मत पडले तर कारागिराला जरी त्याने मालकापासून आधी पैसे घेतले असले तरी शिक्षा होऊ नये. दुसऱ्या तत्त्वामुळे जो मालक आपल्या कामगारांविषयी खोट्या तक्रारी आणतो त्याला शिक्षा करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटला मिळाला.

इण्डियन पिनल कोडातील ४०० वे क़लम ' प्रवासावर असताना नोकरीचा करार मोडणे ' ह्या गुन्ह्याविषयी आहे. सर्व तऱ्हेच्या नोकरीच्या करारांना हा कायदा लागू पडत नाही. ह्या कायद्याने, फक्त मालकाबरोबर प्रवास करीत असता एकाद्या नोकराने नोकरीचा करार मोडला, तर त्या नोकराला शिक्षा करता येते. इण्डियन पिनल कोडाचे ४९१ वे कलमाने, असहाय्य माणसाला मदत करावयास नेमलेल्या नोकराने जर नोकरीचा करार मोडला तर त्याला शिक्षा करता येते. एखाद्या नोकराला मालकाने आपल्या खर्चाने दूर देशाला पाठविला असताना जर त्या नोकरांने त्या ठिकाणी नोकरीच्या कराराचा भंग केला तर त्या नोकराला त्याच्या ह्या गुन्ह्याबद्दल इण्डियन पिनल कोडाच्या ४९२ कलमान्वये शिक्षा देता येते. परंतु मध्यवर्ती कायदे मंडळाने १९२५ साली ४९० व ४९२ ही कलमे रद्द केली. ही कलमे हल्ली उपयोगात आणली जात नाहीत व जी कृत्ये कलमान्वये गुन्हे धरले जात होती ती हल्ली गुन्हे धरले जात नाही. अशारितीने ' नोकरीचा करार भंग करणे ' हा फौजदारी स्वरूपाचा गुन्हा आहे असे धरून त्या गुन्ह्याला ज्या कलमाने शिक्षा देता येईल असे हिंदी कायद्यात एकच कलम आहे व ते म्हणजे इण्डियन पिनल कोडचे ४९१ वे कलम होय. हे कलम फक्त असहाय माणसाच्या बाबतीत काही गैरसोय होऊ नये ह्याचकरिता केवळ राखून ठेवण्यात आले आहे. त्यात दुसरा काहीही उद्देश नाही.

वरील विवरणावरून असे स्पष्ट होईल की, ' नोकरीचा करार भंग करणे ' हा काही फौजदारी स्वरूपाचा गुन्हा नाही व त्याबद्दल हिंदी कायद्यातील ४९१ कलम खेरीज करून इतर कुठच्या कलमाने शिक्षा करिता येत नाही. तो फक्त दिवाणी स्वरूपाचा अपराध आहे. गुन्हा नाही व त्याबद्दल मालकांना फक्त नुकसान भरपाईच मिळेल. जास्त काही मिळू शकणार नाही. हिंदी कायद्याने नोकरीचा करार भंग करणे हा गुन्हा ठरविला नाही तर तो दिवाणी स्वरूपाचा अपराध धरला आहे. ह्याचे कारण म्हणजे नोकरीचा क़रार मोडण्याला फौजदारी गुन्हा ठरविणे म्हणजे एखाद्याला त्याच्या मनाविरुद्ध नोकरी करावयास लाविणे होय व त्या मनुष्याला त्याच्या मनाविरुद्ध चाकरी करावयास लाविणे म्हणजे त्याला गुलाम बनविणे होय, असे हिंदी कायदे मंडळाला वाटते हेच आहे. गुलामगिरी

म्हणजे काय ? युनायटेड स्टेट्स्च्या राज्यघटनेत ' गुलामगिरी म्हणजे सक्तीची मनाविरूद्ध करावी लागणारी नोकरी ' अशी गुलामगिरीची व्याख्या सापडते. संपाकरिता कामगारांना शिक्षा करणे म्हणजे त्यांना गुलाम असे मी म्हणतो. संप बेकायदा ठरविणे म्हणजे त्यांना त्यांच्या मनाविरूद्ध काम करावयास लावणे. एखाद्याला मनाविरूद्ध काम करावयास लावणे म्हणजेच त्याला गुलाम बनविणे हे नीतितत्त्वांच्या विरूद्ध आहे. ते कायद्याच्या विरूद्ध आहे. जेव्हा ४९०, ४९१, ४९२ ही कलमे बनविण्यात आली, त्यावेळेस कामगारांच्या स्वातंत्र्यावर ही बंधने जरी क्षुल्लक स्वरूपाची होती तरी ती घालणाऱ्यांना आपण करतो ते बरोबर आहे किंवा नाही याची शंका वाटत होती.

कामगारांना संप करण्याचा हक्कच मुळी नाही असे सांगण्यात येत आहे परंतु ह्याला माझे उत्तर असे आहे की, जो मनुष्य असे म्हणू शकतो त्याला संप म्हणजे काय हेच कळले नाही. संप म्हणजे नोकरीचा करार भंग करणे असा जर अर्थ धरला तर संप हे स्वातंत्र्याच्या हक्कालाच दिलेले दुसरे नाव आहे असे कबूल करावे लागेल. तुम्ही जर प्रत्येक मनुष्याला स्वातंत्र्याचा हक्क आहे असे कबूल करता तर प्रत्येक कामगाराला संप करण्याचा अधिकार आहे हे तुम्हाला कबूल केले पाहिजे. स्वातंत्र्याचा अधिकार हा दैविक अधिकार आहे असे जर आपण कबूल करता तर मग संप करण्याचा प्रत्येक कामगाराचा अधिकार दैविक आहे हे तुम्हाला कबूल करावे लागेल.

कॉंग्रेस सरकारचा ट्रेड्स् डिस्प्यूट बिल आणण्यात संप बेकायदेशीर करून ' संप करणे ' हा गुन्हा ठरविण्याचा प्रयत्न आहे व यापूर्वीच्या कोणत्याही कायद्याने संप बेकायदेशीर ठरू शकत नाहीत हे दाखविताना डॉ. आंबेडकर पुढे म्हणाले,–

" कामगारांचा संप हा कोणत्याही कायद्याने बेकायदेशीर ठरू शकत नाही. अशा वेळी मला इं. पि. कोडच्या १२०-अ कलमाची आठवण करून देण्यात येईल. १२०-अ हे कट करणाऱ्यास शिक्षा सांगणारे कलम आहे. संप म्हणजे कामगारांच्या संघाने केलेला एक कट आहे असे धरून चालून ह्या कलमाच्या आधारे कामगारांना संप करण्याचा हक्क नाही, असे दाखविण्याचा प्रयत्न विरूद्ध पक्षातील काही जणांकडून होण्याचा संभव आहे. तेवढ्याकरता त्यांना ' संप करणे ' म्हणजे ' कट करणे ' होय असे प्रथम सिद्ध करावे लागेल परंतु ' संप ' हा ' कट ' ठरूच शकत नाही.

१२०-अ या कलमाखाली ' संप ' गुन्हा ठरविण्याचा प्रयत्न केल्याची केस हिंदुस्थानात घडलेली नाही. परंतु माझ्या ह्या म्हणण्याला इंग्लिश कायद्यात आधार मिळतो.'' यानंतर डॉ. आंबेडकरांनी ' दी लिगल पोझिशन ऑफ ट्रेड युनियन्स ' ह्या पुस्तकातील संपाला कट ठरविण्याच्या एका इंग्लिश केसमधील जजमेन्टचा एक उतारा वाचून दाखविला. या जजमेन्टमध्ये कोणत्याही सामान्य कायद्याने संप बेकायदेशीर ठरू शकत नाही व संप करणे म्हणजे कट करणेही नव्हे, असाच निकाल देण्यात आलेला होता.

'' १२०-अ या कलमान्वये देखील कोणाचे तरी नुकसान करण्याच्या हेतुने संप करण्यात आला असे सिद्ध झाल्याशिवाय ' संप करणे ' हा गुन्हा ठरू शकत नाही. संपामुळे नुकसान होण्याचा संभव आहे, परंतु नुकसान करणे हा संपाचा हेतु कधीच नसतो. कामगारांच्या मागण्या मिळविण्याच्या सद्हेतुनेच संप करण्यात येतो.'' अशा तऱ्हेने अस्तित्वात असलेल्या कोणत्याही कायद्याने संप बेकायदेशीर ठरू शकत नाही असे दाखविल्यावर डॉ. आंबेडकर म्हणाले की,

ह्या बिलाने संप करणे हा गुन्हा ठरवून कॉंग्रेस सरकारने कामगारांवर गुलामगिरीच लादली आहे.

माझ्या दृष्टीने या बिलाला ' कामगारांचे नागरिक स्वातंत्र्य हिरावून घेणारा कायदा ' हेच नाव शोभून दिसेल.

तडजोडीचे सर्व प्रयत्न संपेपर्यंत दोन महिनेच काय ती कामगारांना या बिलाने संप करण्याची बंदी केलेली आहे व त्यानंतर त्यांना संप करण्याची पूर्णपणे मुभा ठेवलेली आहे अशीच कित्येकांची या बिलाविषयी चुकीची समजूत असण्याचा संभव आहे. परंतु ह्या बिलात अशी काही कलमे आहेत की ती अंमलात आल्यास कामगारांवर कायमचीच गुलामगिरी लादली जाईल व संप करणे कामगारांना कधीच शक्य होणार नाही. कारण कालापव्यय करून संप लांबणीवर टाकण्याची पूर्ण तरतूद या बिलाने करून ठेवलेली आहे.

पहिल्या प्रथम हे बिल अंमलात आल्याबरोबर एक वर्षपर्यंत कोणत्याही संपास पूर्णपणे बंदी केलेली आहे. ह्या कलमांना कामगारांकडून मान्यता मिळण्यासारखी परिस्थिती असो अगर नसो कामगारांवर एक वर्षाची गुलामगिरी पूर्णपणे

लादली जाणार हे निश्चित. कामगारांना यातून कोणत्याही तऱ्हेची सुटका मिळण्याची आशा नाही. ही एक वर्षाची गुलामगिरी संपल्यानंतर काय ?

यानंतर कामगारांना संप करायचा असल्यास त्यांनी तशी अगोदर नोटीस दिली पाहिजे. म्हणजे प्रथम नोटीस देण्यात काही काळ निघून जाणार. त्यानंतर संपाच्या नोटीसीला उत्तर मिळेपर्यंत काही काळ जाणार. नोटीस देण्याच्या व उत्तर येण्याच्या या काळात कामगारांना संप करण्यास पूर्ण बंदी आहे. यानंतर तडजोडीचे प्रयत्न सुरू होणार. तडजोडीची बोलणी दोन महिने चालणार. ही बोलणी दोन महिन्यात संपलीच पाहिजे असे नाही. कामगारांचा पक्ष व मालक या दोघांची म्हणणी उभयपक्षी पटणारी असली तर कामगारांचे सुदैव, नाही तर तडजोडीच्या प्रयत्नांची मुदत चार महिनेपर्यंत वाढविण्याची तरतूद या बिलाने करून ठेवलेलीच आहे. म्हणजे कामगार व मालक यांच्यामध्ये वितुष्ट आल्यापासून चार महिने व आणखी वर पंचवीस दिवस. इतक्या मुदतीत कामगारांनी कोणत्याही प्रकारची हालचाल करता कामा नये.

या काळात कामगारांनी प्रचार करायचा नाही, संघटना करायची नाही, सभा नाही, मिरवणूका नाही, भाषणे नाही, काही नाही. या काळात कोणत्याही तऱ्हेची तयारी करण्यास या बिलाने कायद्याने कामगारांना बंदी केली आहे, कायद्याने शिक्षा ठेवलेली आहे आणि समजा या चार महिने पंचवीस दिवसाच्या दीर्घ काळात (Period of Gestation) कोणत्याही तऱ्हेची तडजोड यशस्वी झाली नाही तर कामगारांनी काय करायचे ? तडजोडीचा हा काळ संपल्यानंतर कामगारांना संप जाहीर करण्यास फक्त दोनच महिन्यांची मुदत ठेवलेली आहे. तडजोडीचा लांबलचक काळ व्यर्थ गेल्यानंतर असंघटित व विस्कळीत बनलेल्या कामगारांना प्रत्यक्ष प्रतिकाराची फिरून तयारी करण्यास दोन महिन्यांचा हा अल्प काळ पुरेसा आहे अशी सरकारची समजूत आहे की काय, हे मला समजत नाही.

कामगार चळवळीत विशेष असा मी भाग अद्यापि घेतलेला नसल्यामुळे संपाकरता कामगारांचे संघटन करण्यास कामगार पुढाऱ्यास प्रत्यक्ष कोणत्या

अडचणींना तोंड द्यावे लागते याची मला तितकीशी कल्पना नाही. परंतु मुंबई शहरातील कामगार चळवळीच्या माझ्या अभ्यासावरून मी असे खास सांगू शकतो की, चार महिन्यांच्या वर कामगारांना डांबून ठेवल्यानंतर, संपाच्या तयारीसाठी परत संघटना करण्यास दोन महिन्यांचा अवधी अगदीच अपुरा आहे. यामुळे दोन महिन्यांच्या आत कामगारांनी संप न पुकारल्यास त्यांची स्थिती अगदीच चमत्कारिक होणार आहे. कारण संप न केल्यास त्यांना अमान्य असलेल्या तडजोडीच्या अटी अप्रत्यक्षपणे त्यांनी मान्य केल्यासारखेच होणार आहे. यानंतर जर कामगारांनी आपली चळवळ सुरू केली व आपल्या मागण्या परत मांडल्या तर फिरून त्यांना चार महिने पंचवीस दिवस वाटाघाटीकडे डोळे लावून स्वस्थ बसावे लागणार. वाट पहा आणि स्वस्थपणे चार महिने पंचवीस दिवस वाटाघाटीकडे पहा, यानंतरही काही झाले नाही तर जरूर वाटल्यास, शक्य असल्यास दोन महिन्यांच्या आत संप करा नाही तर नवीन गाऱ्हाणी निघाल्यास परत चार महिने पंचवीस दिवस वाटाघाटीचे चक्र चालूच आहे. अशा तऱ्हेचे हे वाटाघाटीचे काळचक्र कामगारांना कायमच्या गुलामगिरीत ढकलून देणार नाही असे कोणाला म्हणता येईल काय ? हे बिल जर कामगारांवर गुलामगिरी लादण्यास पुरेसे नसेल तर दुसरा कोणत्या प्रकारचा काळा कायदा कामगारांवर गुलामगिरी लादेल हे कळणे अतिशय मनोरंजक होईल.

या बिलातील संपाविषयीच्या कलमांवर इतके विवेचन पुरेसे आहे असे मला वाटते.

आता, या बिलातील व १९२९ च्या ट्रेड डिस्प्यूट ॲक्ट मधील संप विषयक कलमांची तुलना करणे आवश्यक व उपयुक्त ठरेल असे मला वाटते. १९२९ च्या कायद्यानेही कामगारांच्या संप करण्याच्या हक्कावर काही नियंत्रणे घातलेली आहेत. तेव्हा या दोन कायद्यांच्या कलमांची तुलना आपण स्वातंत्र्याच्या मार्गावर आहो की गुलामगिरीच्या, दास्याच्या दिशेने रखडत आहोत हे ओळखणे अत्यंत बोधपरच ठरेल व असेंब्लीच्या सभासदांनाही आपण कोठे आहोत याची जाणीव होईल.

१९२९ च्या कायद्यातील एका कलमाने राजकीय प्रश्नामुळे करण्यात आलेले सार्वत्रिक संप बेकायदेशीर ठरविले आहेत व दुसऱ्या एका कलमाने नोटीस

दिल्याशिवाय केलेला संप बेकायदेशीर ठरविला आहे. • १९२९ च्या कायद्यातील या दुसऱ्या कलमाशी आजच्या बिलाचे नोटीसीशिवाय केलेले संप बेकायदेशीर ठरविण्यापुरते साम्य दिसते. परंतु एवढी एकच गोष्ट वगळल्यास ही दोन बिले एकमकांपेक्षा अजिबात निराळी अशी आहेत. आजचे बिल अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचे आहे व या बिलाचा निर्माता १९२९ च्या कायद्याच्या निर्मात्यापेक्षाही अत्यंत प्रतिगामी वृत्तीचा मनुष्य आहे असे म्हणण्यास काही हरकत आहे असे मला वाटत नाही.

१९२९ च्या कायद्यातील कलम फक्त लोकोपयुक्त (Public utilities) धंद्यासच लागू करण्यात आलेले होते. त्या कायद्याने फक्त पब्लिक युटीलीटीज मधील संपच काय ते बेकायदेशीर ठरविण्यात आले होते, परंतु आजचा कायदा सर्वच धंद्यातील संप बेकायदेशीर ठरवू पहात आहे. हा माझ्या मते या दोन कायद्यातील अत्यंत महत्त्वाचा असा फरक आहे. अशा तऱ्हेचा फरक आज घडवून आणणे न्याय्य ठरेल काय ?

अशावेळी, १९२९ साली सेंट्रल असेंब्लीत काँग्रेस पक्षाने या कायद्यासंबंधी कोणते धोरण स्वीकारले होते हे पहाणे रास्तच ठरेल.

यानंतर डॉ. आंबेडकरांनी त्यावेळेच्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टातील काँग्रेस पक्षाच्या सभासदांनी लिहिलेला भाग वाचून दाखविला व असे स्पष्ट करून दाखविले की त्यावेळी काँग्रेसने १९२९ च्या कायद्यातील संप बेकायदा ठरविण्याच्या कलमास विरोध केला होता व पब्लिक युटीलीटीज सर्व्हिसेसची व्याख्या ठरविण्याचा आग्रह धरला होता. सरकार त्यावेळेस पब्लिक युटीलीटीजची व्याख्या ठरविण्यास नाखूष होते व नोकरशाहीच्या लहरीवर काहीही अवलंबून राहू नये म्हणून ' पब्लिक युटीलीटीज ' ची स्पष्ट व्याख्या करण्यात यावी असे काँग्रेस पक्षाचे म्हणणे होते. शिवाय ' पब्लिक युटीलीटीज ' च्या कक्षेत अनेक धंदे येऊ शकतील व नोकरशाही स्वतःचे हेतु साध्य करण्याकरता वाटेल त्या धंद्यातील संप ' पब्लिक युटीलीटीज ' च्या नावाखाली बेकायदा ठरवू शकेल म्हणून हा कायदा फक्त ' सोशल सिक्युरीटी सर्व्हिसेस ' पुरताच लागू करण्यात यावा असे काँग्रेस पक्षाचे म्हणणे होते. पण आजमात्र तीच काँग्रेस सत्ता हाती आल्यावर तोच कायदा सर्वच धंद्यांना कशी लागू करू पहाते हे डॉ. आंबेडकरांनी उघड करून दाखविले.

ज्या उद्योगधंद्यांवर समाजाचे जीवितच अवलंबून आहे त्या उद्योगधंद्यापुरतेच नोटीसीविना झालेले संप बेकायदा ठरविण्यात यावे, असे त्यावेळेस कॉंग्रेस पक्षाचे म्हणणे होते. परंतु ह्या बिलाने प्रत्येक उद्योगधंद्यातील संप बेकायदा ठरविण्यात येत आहे.

समजा उद्या हिंदी स्त्रियात ओठ रंगविण्याची फॅशन जोरात सुरू झाली व एखाद्या कारखानदाराने लिपस्टिक्सचा कारखाना काढला, या कारखान्यातील कामगार जर नोटीस दिल्याशिवाय संपावर गेले तर तो संप कायद्याने बेकायदेशीर ठरेल. स्त्रियांच्या ओठाला रंग लावण्याच्या सौख्यात या संपामुळे खंड पडेल म्हणून लिपस्टिक्स बनविण्याचा कारखाना लोकांच्या जीवितास उपयोगी असा ठरवून संप करणाऱ्या कामगारांच्या हक्कांवर नियंत्रण घालावे असे कोणीही म्हणू शकणार नाही !

' सोशल सर्व्हिस सिक्युरिटीज् ' पुरतेच कामगारांच्या संप करण्याच्या हक्कावर नियंत्रण घालण्यात यावे अशा तऱ्हेचे आपले १९२९ सालचे धोरण कॉंग्रेसने आज सोडलेले दिसत आहे. इतकेच नव्हे तर १९२९ च्या कायद्याच्या कलमांच्याही पलिकडे जाऊन कॉंग्रेसने आज नोकरशाहीला मागे सारले आहे.

पूर्वीच्या नोकरशाहीने शहाणपणा दाखवून व जबाबदारी ओळखून, संप करणे कामगारांचा महत्त्वाचा हक्क आहे असे जाणून लोकोपयोगी धंद्यातील संपच फक्त बेकायदा ठरविले, परंतु आजच्या सरकारला तेवढीही जबाबदारी ओळखता आली नाही. कॉंग्रेसच्या बिलाने लिपस्टिक्सच्या कारखान्यात झालेला संपही शिक्षेस पात्र ठरविण्यात येणार आहे.

आणि हे सर्व कशाकरता ? ह्या चौकशांचा व वाटाघाटींचा कामगारांना प्रत्यक्ष उपयोग काय होणार ? मला यात एवढेच दिसते की कामगारांनी या बिलान्वये तडजोडीकरता नेमण्यात आलेल्या चार सद्गृहस्थांच्या तोंडाकडे पहात चार महिने पंचवीस दिवस स्वस्थ बसण्यापलिकडे कामगारांना काहीच मिळणार नाही. यापेक्षा कॉंग्रेस सरकारने असे सरळ आणि उघडपणे म्हणायला पाहिजे होते की, ' तुम्हाला मान्य असो अगर नसो आम्ही तुमच्यावर तडजोड सक्तिने लादणार ' म्हणजे निदान तडजोडीच्या काळानंतर काहीतरी निकाल लागणार असे गृहीत तरी धरता आले असते.

परंतु ह्या बिलामुळे रजिस्ट्रार, कन्सिलिएटर, कन्सिलिएटर्स बोर्ड इत्यादी टप्प्यांतून कामगारांना प्रथम जावे लागणार. ह्या सर्व खटाटोपातून निरनिराळ्या लोकांना व भुकेने त्रस्त झालेल्या मजूरांना गोड गोड थापा मारणाऱ्या तडजोड

घडवून आणणाऱ्या गृहस्थांच्या पुढे नुसते मागण्यांचे प्रदर्शन करण्यापलिकडे काही निष्पन्न निघेल असे मला वाटत नाही. ह्या निरनिराळ्या टप्प्यांमुळे कोणताही निश्चित निकाल लागणे शक्य नाही. संप करण्यास तयार झालेल्या मजुरांना ' शांत ' करण्याचा हा मार्गच नव्हे. यामुळे कामगारांच्या दृष्टीने इतकाच परिणाम होणार की, चार महिने पंचवीस दिवस विलंब लागल्यामुळे कामगारांच्या संघटनेचा विचार होऊन कामगार मात्र संप करण्यास असमर्थ ठरतील !

१९३४ च्या कायद्यात व आजच्या बिलात असलेला एक महत्त्वाचा फरक मी येथे आपल्या नजरेस आणू इच्छितो. १९३४ च्या कायद्यावर वादविवाद चालू असताना तडजोडीच्या काळात संपास बंदी असावी अशी सूचना आणण्यात आली होती. संपास बंदी न केल्यास निदान पिकेटींगला तरी बंदी असावी अशीही सूचना आणण्यात आली होती. परंतु ह्या दोन्ही सूचनांना ऑनरेबल सर रॉबर्ट बेल यांनी मान्यता दिली नाही.

यावेळी एका सभासदाने डॉक्टरांच्या वरील म्हणण्याला हरकत घेतल्यामुळे डॉक्टरांनी रॉबर्ट बेल यांच्या त्यावेळच्या भाषणातील एक उतारा वाचून दाखविला.

माझे असे ठाम मत आहे की, कामगारांना वाटाघाटीच्या काळात संप करण्यास बंदी नसेल तरच तडजोड यशस्वी होणे शक्य आहे. मालकांना आपले सामर्थ्य एकवटण्याकरता चार महिने पंचवीस दिवस असताना, या चार महिने पंचवीस दिवसांच्या काळात कामगारांना संपाकरिता कोणत्याही तऱ्हेची संघटना व तयारी करणे शक्य नाही व वाटाघाटीचा काळ संपल्यानंतरही दोन महिन्यांच्या आत संप करण्याचे कामगारांवर नियंत्रण आहे. ह्या सर्व गोष्टी माहीत असताना मालकांनी तरी योग्य अशी तडजोड घडवून आणण्यास तयार का व्हावे ? तडजोडीच्या कामगारांच्या अटी मालकांना स्वीकारण्यास भाग पडेल असे कोणत्याही तऱ्हेचे दडपण मालकांवर नाही. संपाचे दडपण असल्याशिवाय मालक तडजोडीस कधीच तयार होत नसतात.

आपण योजलेल्या व्यवस्थेपासून मालकांच्या बरोबर कामगारांचाही फायदा व्हावा अशी हे बिल आणणारांची खरोखरच जर इच्छा होती तर त्यांनी रॉबर्ट बेल ह्यांच्याच धोरणाचा अवलंब करून वाटाघाटीच्या काळात कामगारांना संप करण्याची बंदी ठेवायला नको होती. परंतु पूर्वीच्या नोकरशाहीनेही मान्य केलेले तत्त्व आजचे काँग्रेसचे ' लोकप्रिय ' व स्वतःस ' मजुरांचेही प्रतिनिधी ' म्हणून

मिरवणारे सरकार लाथाडीत आहे. काँग्रेस सरकार अशा तऱ्हेचीच लोकशाही स्थापन करणार काय ? ही तुम्हाला लोकशाही वाटत असेल मला मात्र तसे वाटत नाही. कामगारांच्या लोकशाहीच्या मूलभूत हक्कांवर जिथे घाला घालण्यात येतो ती लोकशाहीच नव्हे.

ज्या लोकशाहीत, जिविताची साधने हाती नसलेल्या संघटनेच्या दृष्टीने विस्कळीत असलेल्या अशिक्षित व बुद्धिहीन अशा कामगार वर्गावर अशा तऱ्हेची गुलामगिरीची बंधने लादण्यात येतात ती लोकशाहीच नव्हे. ते लोकशाहीचे विडंबनच होय.

यानंतर डॉ. आंबेडकरांनी बिलातील युनियन संबंधी कलमांचा समाचार घेतला. या कलमांनी कामगारांच्या युनियन्सचे क्वालीफाईड युनियन्स रजिस्टर्ड; रिप्रेझेन्टेटीव्ह युनियन्स वगैरे निरनिराळे प्रकार पाडले आहेत. निरनिराळया प्रकारच्या युनियन्स कोणत्या अटींवर व कोणत्या पद्धतीने रजिस्टर कराव्यात व या रजिस्टर युनियन्स कोणत्या अटीं्वर रिप्रेझेंटेटीव्ह युनियन्स कराव्यात, रजिस्टर युनियन्सचे प्रतिनिधीत्व कोणत्या तत्त्वावर रद्द करावे वगैरे गोष्टी या कलमांनी ठरविल्या आहेत. पुढे डॉ. आंबेडकर म्हणाले,

सक्तीची तडजोड व वाटाघाटीच्या काळात संपास बंदी ह्या बिलातील मुख्य कलमांशी, ह्या कलमांचा कसा काय संबंध पोचतो हे मला समजत नाही. ही कलमे हेतुपुरःस्सर ह्या बिलात घुसडून दिल्यासारखी वाटतात. ह्या बिलाच्या नावावरून ' उद्योगधंद्यात झालेले तंटे शांतपणे तडजोडीच्या मार्गाने सोडविण्याकरता व दुसऱ्या काही कारणांकरता आणलेले बिल ' असा या बिलाचा हेतू सांगण्यात आला. ही दुसरी कारणे म्हणजे कोणती कारणे ? या दुसऱ्या कारणांचा निर्देश बिलाच्या नावात केलेला नाही तो का ? त्यात काही लाजिरवाणे वाटण्यासारखे आहे काय? बिलातील या दोन भागांचा संबंध स्पष्ट करून दाखवायला पाहिजे व तसा संबंध नसेल तर दुसऱ्या भागातील कलमे सरळ गाळून टाकण्यात आली पाहिजेत.

बऱ्याच विचारांती मला असे आढळून आले की या दोन भागांचा अत्यंत महत्त्वाचा संबंध आहे. हा संबंध बिलातील ७५ व्या कलमाने स्पष्ट होण्यासारखा आहे. या कलमाप्रमाणे कामगारांच्या प्रतिनिधीशिवाय इतर कोणालाही ह्या कायद्याप्रमाणे वाटाघाटीत भाग घेता येणार नाही. हे कलम अत्यंत महत्त्वाचे आहे कारण हिंदी ट्रेड युनियन चळवळीला हे कलम अत्यंत विघातक असे ठरणार आहे.

आता, कामगारांचे प्रतिनिधी कोण व वाटाघाटीत कामगारांचे प्रतिनिधी म्हणून भाग घेण्याचा आधिकार कोणाला, ह्या गोष्टी या कलमांनी ठरविल्या आहेत. ह्या बिलान्वये करण्यात आलेल्या कामगार प्रतिनिधीच्या व्याख्येत जो येत नाही अशा कोणाही मनुष्याला तडजोडीसंबंधी चाललेल्या वाटाघाटीत कामगारांच्या वतीने भाग घेता येणार नाही. तो मनुष्य कामगारांचा खरा व लायक व कामगार चळवळीतील अनुभवी असा पुढारी असला तरी या व्याख्येने प्रतिनिधी ठरू शकणार नाही.

ज्यांना स्वतःस मजुरांचे प्रतिनिधी म्हणवून घेता येईल अशा युनियन्सचे दोन प्रकार करण्यात आले आहेत, पहिल्या प्रकारात म्हणजे कामगारांपैकी शेकडा २० सभासद असलेल्या व मालकांची मान्यता असलेल्या युनियन्स येतात व दुसऱ्या प्रकारच्या युनियन्समध्ये शेकडा ५० सभासद असलेल्या युनियन्स मोडतात. ह्या दोनही प्रकारच्या युनियन्सना प्रातिनिधीक ( Representative) युनियन्स म्हणून ओळखण्यात येईल. परंतु दोन परस्पर विरूद्ध अशा युनियन्सना एकाच नामावळीत कसे घालता येईल ? माझ्या मते ह्या दोन प्रकारच्या युनियन्सना गुलाम युनियन्स व स्वतंत्र युनियन्स म्हणून संबोधणे योग्य ठरेल. ज्या युनियन्सचे कायदेशीर अस्तित्व, प्रतिनिधीत्वाचे अधिकार व मताधिकार वगैरे सर्व मालकांच्या मर्जीवर अवलंबून आहे, त्या युनियनला ' गुलाम युनियन ' म्हणणे अतिशयोक्तिचे ठरेल असे मला वाटत नाही. ' मालकांची मान्यता ' या ऐवजी ' मालकांची पसंती ' असा शब्दप्रयोग या युनियन्सच्या बाबतीत वापरला असता तर बरे झाले असते म्हणजे या युनियन्सचे गुलामी स्वरुप स्पष्ट झाले असते.

युनियनला प्रतिनिधीत्व देण्यापूर्वी ती रजिस्टर झालेली असली पाहिजे अशी अट घालण्यात काय हेतू आहे हे मला समजत नाही. ह्या बिलाने १९२६ साली पास झालेला मध्यवर्ती सरकारचा ट्रेड युनियन्स ॲक्ट रद्द ठरविलेला नाही. हा कायदा कायम आहे असेच या बिलाने ठरविले आहे. कोणतीही युनियन ह्या बिलाने रजिस्टर होण्यापूर्वी जुन्या कायद्याने रजिस्टर झालेली पाहिजे असे का ठरविण्यात आले आहे ? ह्यामुळे प्रत्येक युनियन दोनदा रजिस्टर करावी लागणार आहे. प्रथम १९२६ च्या कायद्याने व नंतर या नवीन बिलाने युनियन रजिस्टर झाली पाहिजे.

१९२६ च्या कायद्याप्रमाणे रजिस्टर झालेल्या युनियनला काय फायदे मिळतात हे प्रथम पाहिलेले बरे. कारण त्यामुळे हे बिल ट्रेड युनियन्सना काही नवीन सवलती देत आहे की पूर्वीच्या सवलती काढून घेत आहे हे आपणास कळेल. १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेली युनियन ही जिच्यावर फिर्याद करता येईल व जिला फिर्याद करिता येईल अशी एक संस्था बनते. ती संस्था असल्यामुळे तिच्या सभासदांच्या प्रतिनिधीत्त्वाचा तिला अधिकार आहे. १९२६ च्या कायद्याखाली रजिस्टर झालेल्या युनियनला राजकीय प्रतिनिधीत्त्वाचे अधिकार मिळतात. म्हणजे त्या युनियनला प्रांतिक असेंब्लीला पाठविण्यात येणारे सभासद निवडण्याचा अधिकार आहे. १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेल्या युनियनला मुंबई कार्पोरेशनमध्ये सभासद पाठविण्याचा अधिकार आहे. अशा रितीने कामगारांचे प्रतिनिधी म्हणवून घेण्याचा अधिकार १९२६ च्या कायद्याखाली रजिस्टर झालेल्या युनियनला जर मिळतो तर ह्या बिलान्वये त्या युनियनला परत पुन्हा एकदा रजिस्टर करण्याची जरूरी काय आहे ? दुसरी एक विलक्षण गोष्ट ह्या बिलामुळे होणार आहे ती अशी की, १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेल्या युनियनला ह्या बिलाप्रमाणे लवाद मंडळापुढे कामगारांचे प्रतिनिधी म्हणून उभे राहाता येणार नाही. दुसरी एक नियमाविरुद्ध गोष्ट आपल्या नजरेसमोर आणू इच्छितो ती म्हणजे ही की, १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेल्या युनियन्सना कायदेमंडळात मजुरांचे प्रतिनिधी म्हणून जाता येईल परंतु त्यांना लवाद मंडळापुढे कामगारांचे प्रतिनिधी म्हणून उभे राहता येणार नाही.

ही नियमबाह्यता का असावी ? १९२६ च्या कायद्याखाली रजिस्टर झालेल्या युनियन्स जवळून हा एक मोठा महत्त्वाचा अधिकार हिसकावून घेतला आहे असे मला वाटते.

१९३४ च्या कायद्याने तडजोडीच्या वाटाघाटीत कामगारांच्या प्रतिनिधींनी भाग घ्यावा असे ठरविण्यात आले व कामगारांच्या प्रतिनिधीत्त्वाचा अधिकार १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेल्या युनियन्सना देण्यात आला. १९२६ च्या कायद्यान्वये रजिस्टर झालेल्या युनियन्स एक संघटीत संस्था असल्या कारणाने तिचा मजुरांच्या प्रतिनिधीत्त्वाचा अधिकार १९३४ च्या कायद्याने मान्य केला होता. १९३५ च्या कायद्याने ट्रेड युनियन्सना कायदे मंडळात आपले सभासद पाठविण्याचे अधिकार मिळाले व मुंबई कायदे मंडळाने पास केलेल्या १९३४ च्या कायद्याने लवाद मंडळापुढे आपले प्रतिनिधी पाठविण्याचा ट्रेड युनियन्सच्या अधिकाराला मान्यता दिली. युनियन्सना सध्या असलेला हा अतिशय महत्त्वाचा अधिकार युनियन्सकडून काढून घेऊन तो हे बिल फक्त गुलाम युनियन्सना देणार

आहे हे मी आपल्याला स्पष्ट करुन दाखविणार आहे. ह्या बिलान्वये रजिस्टर झालेल्या युनियन्स १९२६ च्या कायद्याखाली रजिस्टर झालेल्या असल्या पाहिजेत असे ठरविण्यात लवाद मंडळापुढे प्रतिनिधी पाठविण्याच्या युनियन्सच्या अधिकाराबरोबर त्यांना कायदेमंडळात सुद्धा सभासद बनविण्याचा अधिकारही मिळावा हा हेतू असावा असे मला वाटते. अशा तऱ्हेचे धोरण ट्रेड युनियन्सना अतिशय विघातक असे ठरणार आहे. ह्या सर्व अटी व शर्ती गुलाम युनियन्सच्या फायद्याकरिता आहेत अशी माझी ठाम समजूत आहे.

ट्रेड युनियन्स मालकांच्या लहरीवर अवलंबून असाव्या असे जर स्पष्ट मत काँग्रेस मंत्र्यांचे असेल तर त्यांच्याबरोबर वादविवाद करण्याची माझी इच्छाच नाही. गुलाम मनुष्य हाच स्वतंत्र मनुष्य आहे असे जर काँग्रेस पक्षाला वाटत असेल तर त्यांची मर्जी. ज्याप्रमाणे हे बिल कामगारांना संप बंदी करून बांधून टाकणार आहे, त्याप्रमाणे मालकांनी कामगारांना गुलाम युनियन्सतर्फे शृंखलाबद्ध करावे असे जर काँग्रेस मंत्र्यांचे मत असेल तर त्यांच्याबरोबर विचारविनिमय कोण करू शकणार ? मला ही विचारसरणी मान्य नाही. ज्या शांततेच्या स्वीकारार्थ हे बिल आणले आहे तसली शांतता आम्हाला नको. जी शांतता श्रमजिवी वर्गाचे नुकसान करीत आहे त्या शांततेचा मी निषेध करतो.

ज्याचे पोट व्यवस्थित भरले जात आहे त्याच्याकरिता ही शांतता ठीक आहे, ती भुकेकंगाल अशा श्रमजिवी वर्गाच्या हिताची ठरणार नाही. हिंदुस्थानात ट्रेड युनियन्स चळवळ असावी तितकी जोरदार नाही हे कदाचित खरे असेल. काही लोक ट्रेड युनियन्सना विघातक ठरवत असतील. परंतु जे काँग्रेसचे सभासदच होते, ज्यांना अहिंसा वगैरे काँग्रेसची तत्त्वे मान्य झालेली होती असे कम्युनिस्टादी पुढारी मजुरांच्या हिताला विघातक ठरतील अशी भीती काँग्रेस मंत्र्यांना वाटावी ह्याचे मला फारच आश्चर्य वाटते.

गुलाम युनियन्स काही काळानंतर स्वतंत्र बनणे शक्य आहे असे सरकारने सिद्ध केले तर मी माझे विचार बदलीन. परंतु मला असे वाटते की, गुलाम युनियन्स कधीही स्वतंत्र बनणार नाहीत. कारण स्वतंत्र युनियन्सवर घालण्यात आलेल्या अटी अशक्य कोटीतील आहेत. त्या कधीच पुऱ्या करता येणार नाहीत. एखादी युनियन स्वतंत्र होण्याला त्या युनियनचे एकंदर कामगारांपैकी शेकडा ५०.१ सभासद असावे लागतील. ही योग्य अट आहे काय ? मजुरांना मालकांच्या मान्यतेची गुलामगिरी टाळून स्वतंत्र व्हावयाचे तर त्यांच्यापैकी, शेकडा ५० कामगार ट्रेड युनियन्सचे सभासद असले पाहिजेत ही अट शक्य कोटीतील आहे काय ?

आपणास काँग्रेस मंत्र्यांनी अहमदाबाद येथील नमुनेदार परिस्थितीकडे दृष्टी वळविण्यास सांगितले आहे. अहमदाबाद येथील परिस्थिती आपल्यापुढे नमुना म्हणून ठेवून आपण त्याप्रमाणे वागावे असा सरकारने आपणास उपदेश केला आहे. मला हे सर्व कबूल आहे. परंतु मी असे विचारतो की, ह्या बिलान्वये 'अहमदाबाद मजूर महाजन' ही संस्था सुद्धा स्वतंत्र युनियन होवू शकेल काय ? ती युनियन स्वतंत्र कामगारांची युनियन होवू शकेल अशी मला शक्यता दिसत नाही. अहमदाबादमधील थोडे मुसलमान सोडून सर्व गिरणी मालक व गिरणी कामगार एकाच धर्माचे आहेत व ते एकच भाषा बोलतात. त्यामुळे मालक व कामगार ह्यांच्यामध्ये वितुष्ट येण्याची कारणे थोडी कमी होतात. शिवाय गुजरात हे महात्मा गांधींचे निवासस्थान असल्यामुळे त्यांच्यापुढे मालकांना व कामगारांना आपली गाऱ्हाणी मांडता येतात व त्यांनी दिलेला निकाल दोघांनाही निमूट मान्य करावा लागतो. अशा परिस्थितीत 'मजूर महाजन' ही युनियन वाढलेली आहे. ती निदान वीस वर्षे टिकाव धरुन आहे, असे मला सांगण्यात आले. माझ्याजवळ येथे १९३८ सालचे लेबर गॅझेट आहे. त्यावरुन असे समजते की अहमदाबाद येथे कापसाच्या गिरण्यात एकंदर ९०,००० कामगार काम करितात. ह्या ९०,००० पैकी किती कामगार युनियनचे सभासद आहेत ? 'मजूर महाजन' ही संस्था पाच निरनिराळ्या युनियन्स मिळून झालेली आहे व ह्या संयुक्त युनियनमध्ये एकंदर २२,००० कामगार आहेत म्हणजेच एकंदर कामगार वर्गापैकी फक्त शेकडा २९ ह्या युनियनचे सभासद आहेत, असे असताना अहमदाबाद मजूर महाजन ही मालकांच्या संमतीवाचून ह्या बिलान्वये रजिस्टर होण्यास पात्र होईल काय ?

अहमदाबाद सारख्या इतक्या सुखदायक अशा परिस्थितीत असलेल्या 'मजूर महाजन' ह्या युनियनला सुद्धा स्वतंत्र युनियन होता येत नाही कारण हिला रजिस्टर होण्याकरिता मालकांच्या संमतीवरच अवलंबून राहावे लागणार.

म्हणूनच ह्या बिलाने घातलेली अट अशक्य आहे. उद्योगधंद्यात पुढे गेलेल्या अशा इंग्लंड देशातसुद्धा ही अट अशक्यच ठरेल असे मला वाटते. मि. वाल्टर यांच्या पुस्तकावरुन असे समजते की, इंग्लंडमध्ये एकंदर १८,०००,००० कामगार आहेत व त्यापैकी ५,५३१,००० कामगार युनियन्सचे सभासद आहेत. जवळ जवळ शेकडा ३० कामगार इंग्लंडमध्ये युनियनचे सभासद आहेत. ज्या देशातील कामगार संघटित आहेत व उद्योगधंद्यांची वाढ जेथे अतिशयच झालेली अशा इंग्लंड देशात ही स्थिती, मग आपल्या मागासलेल्या हिंदुस्थानात ट्रेड युनियन्सची स्थिती काय असेल ? कोणतीही युनियन एकंदर कामगार

वर्गापैकी शेकडा ५०.१ कामगार आपले सभासद करू शकणार नाही. ह्याचा परिणाम असाच होईल की मालकांच्या संपत्तीवर अवलंबून असलेल्या गुलाम युनियन फक्त मजूरवर्गातर्फे तडजोडीच्या वाटाघाटीत भाग घेऊ शकतील.

एका उद्योगधंद्यात अगर एका विविक्षीत स्थळी असलेल्या धंद्यात एकच युनियन असावी असे ह्या बिलाने ठरविण्यात येणार आहे. ह्या कलमामुळे हिंदी ट्रेड युनियन्सची वाढ खुंटेल असे मला वाटते, हे तत्त्व जगात कुठच्यातरी देशात लावण्यात आले आहे काय ? इंग्लंडमधील ट्रेड युनियन्सचा मी अभ्यास केला आहे व खात्रीलायक पुराव्यानिशी असे मी सांगू शकतो की, वरील तत्त्व इंग्लंडमध्ये लावण्यात आलेले नाही. कोणत्याही तत्त्वावर व धोरणावर मजूरवर्गाने आपली संघटना करावी अशी परवानगी इंग्लीश कायद्याने दिली आहे. एका उद्योगधंद्यात अगर एका धंद्यात एकच युनियन असावी हे तत्त्व इंग्लंडमध्ये व्यवहारात आणलेले नाही.

ह्या वरील मुद्याच्या समर्थनाकरीता डॉक्टरांनी 'The Employment Exchange of Great Britain' ह्या पुस्तकातील एक भाग वाचून दाखविला.

इंग्लंडमध्ये सार्वत्रिक युनियनला पूर्ण मान्यता आहे. निरनिराळया उद्योगधंद्यात असलेल्या कामगार लोकांना संघटित होऊन, एक युनियन स्थापन करता येते. सार्वत्रिक युनियनचे (General Union) सभासद एकाच उद्योगधंद्यातील निरनिराळया उद्योगधंद्यात नोकरीला असतात. म्हणजे निरनिराळया उद्योगधंद्यात असलेल्या मजुरांना एकाच युनियनचे सभासद होता येते. कोणत्या प्रकारे मजुरांनी आपली संघटना करावी, हे इंग्लंडमध्ये मजुरांवरच सोपविलेले आहे. अशी स्थिती इंग्लंडसारख्या पुढारलेल्या राष्ट्रात असता हिंदुस्थानसारख्या मागासलेल्या राष्ट्राला अशा प्रकारच्या कायद्याची काय जरूरी आहे, हे मला समजत नाही.

---

यापुढील भाषण असलेले अंक उपलब्ध झाले नाहीत.–संपादक.



# १४३

# भांडवलदारांच्या कृपेवर श्रमजीवी वर्गाचे कल्याण अशक्य

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणे गेल्या रविवारी, दिनांक १६ ऑक्टोबर १९३८ रोजी सायंकाळी साडेसहा वाजता, मुंबईतील प्रमुख कामगार संस्थांच्या विद्यमाने, विशेषतः स्वतंत्र मजूर पक्ष व ट्रेड युनियन काँग्रेसतर्फे कामगारांची एक संयुक्त परिषद परळच्या कामगार मैदानावर भरली होती. या परिषदेचे अध्यक्षस्थान बॅ. जमनादास मेहता यांनी स्वीकारले होते. मुंबई प्रांतिक असेंब्लीमध्ये काँग्रेस मंत्रिमंडळाने कामगारांच्या हितरक्षणाच्या नावाखाली जे ट्रेड डिस्प्यूट बिल मांडले आहे त्याचा निषेध करण्यासाठी ही ५० हजार कामगारांची प्रचंड परिषद भरली होती. तसेच या परिषदेमध्ये तारीख ७ नोव्हेंबर १९३८ रोजी मुंबई इलाख्यात एक दिवसाचा सार्वत्रिक संप पुकारून कामगारांचा या सरकारी बिलाला किती तीव्र विरोध आहे हे जाहीररित्या सरकारच्या निदर्शनास आणण्याचा निश्चय कामगारांनी या परिषदेमध्ये जाहीर केला.

गेल्या रविवारी, या परिषदेच्या प्रचार कार्यासाठी काही कामगार व त्यांचे पुढारी कामगारांच्या वस्तीतून मोटार लॉरीतून फिरत होते. घोडपदेवच्या बाजूने ही मोटार लॉरी जात असताना, आजूबाजूच्या माऱ्याच्या जागेचा आश्रय धरून काही गुंडांनी कामगारांच्या लॉरीवर दगडफेक केली. या अवचित व बेसावधपणे आलेल्या दगडधोंड्यांच्या माऱ्यात १०-१२ कामगारांना जबर दुखापती झाल्या. त्यांचे रक्ताने माखलेले कपडे बॅ. मेहता यांनी सभेत सर्वांना दाखविले. त्यावेळी कामगारांनी काँग्रेसच्या या गुंडगिरीचा जाहीररित्या निषेध केला. काँग्रेसच्या या हिंसावादी वर्तनाचा कडक भाषेत बॅ. जमनादास मेहता यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात समाचार घेतला.

यानंतर कॉ. मिरजकर यांनी ठरावाचा मसूदा वाचून दाखविल्यावर, आमदार खेडगीकर, ॲ. जोशी, शामराव परूळेकर, बी. टी. रणदिवे, जोगळेकर, सौ. उषाबाई डांगे, ओक, पाटकर, कॉ. निमकर, जे. बुखारी, स्वतंत्र मजूर पक्षाचे सेक्रेटरी भाई डी. व्ही. प्रधान, आमदार भोळे, मध्यप्रांताचे कामगार पुढारी

---

जनता : २२ ऑक्टोबर १९३८.

श्री. दशरथ पाटील, भाई जयवंत वगैरे पुढारी मंडळींची भाषणे झाल्यावर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण सुरू झाले.

त्यांनी प्रथम जमलेल्या असंख्य कामगारांच्या एकजुटीबद्दल आनंद प्रदर्शित केला आणि ते पुढे म्हणाले,

आज येथे येऊन कामगार पुढाऱ्यांपुढे व माझ्या कामगार बंधुभगिनींपुढे बोलण्याचा जो हा योगायोग आला आहे तो माझ्या दृष्टीने अपूर्व असा आहे. ज्या बिलाचा जाहीर निषेध करण्याकरिता आपण सर्वजण जमला आहात त्या बिलासाठी मी असेंब्लीमध्ये एकदा माझे मत जाहीर करून या अन्यायमूलक कायद्यासंबंधीच्या कॉंग्रेस सरकार धोरणाचा चांगलाच समाचार घेतला आहे. त्यानंतर या बिलाबाबत मला अधिक वेळ खर्च करून असेंब्लीमध्ये कार्य करता आले नाही. मला खरोखरच खेद वाटतो. परंतु ती सारी लढाऊ स्वरूपाची कामगिरी माझे मित्र बॅ. जमनादास मेहता यांनी योग्यरितीने बजावल्यामुळे, या परिषदेमध्ये मी त्यांचे जाहीर अभिनंदन करतो. हे बिल कामगारांच्या स्वातंत्र्यावर व एकंदर हितसंबंधावर कसे गदा आणणारे आहे, हे चालू असेंब्लीमध्ये या बिलाच्या चर्चेच्यावेळी कामगार प्रतिनिधींनी कॉंग्रेसच्या नजरेस आणण्याचा कसून प्रयत्न केलेला आहे.

आजच्या परिषदेच्या कार्यकर्त्यांनी या बिलाविषयी असंतोष व्यक्त करण्याकरिता जो एक दिवसाचा सार्वत्रिक संप पुकारण्याचा संकल्प केला आहे, त्याला माझी पूर्णपणे अनुमती आहे. अशारितीनेच कामगारांनी स्वतःच्या संघशक्तीच्या बळावर या घातुक बिलाला हाणून पाडण्याचा प्रयत्न करणे केव्हाही हिताचेच ठरेल. या देशात सन १८५० पासून गिरण्या, कारखाने वगैरे प्रकारच्या धंद्यास सुरूवात झाली. त्यावेळेपासून हजारो संप झाले. त्यावेळी त्यांच्या या न्याय्य शस्त्राविषयी कुणीही आडकाठी उत्पन्न केली नाही. गुलामगिरीवर प्रकाश पाडणारे संपासारखे हत्त्यार अधिकाराच्या बळावर नोकरशाहीने सुद्धा काढून घेण्याचा प्रयत्न केला नाही आणि आज कामगारांची पाठीराखी म्हणविणारी, गुलामगिरीचा धिक्कार करून स्वतःची वल्गना करणारी कॉंग्रेस तिच्या मुंबई असेंब्लीच्या मंत्रिमंडळाकडून या उज्ज्वल तत्त्वास काळीमा फासून ट्रेड डिस्प्यूट बिलासारखा काळा कायदा कामगारांच्या मानेवर ठेवीत आहे. कोणत्याही सरकारने जनतेला न आवडणारे कायदे केले तर त्यांचा प्रतिकार करण्यासाठी असहकारितेसारखा लढा लढविणे आवश्यक आहे, अशी कॉंग्रेसचे पंचप्राण गांधीजी यांनी जी शिकवण या देशातील बांधवांना दिली आहे तिचा

' गुरूची विद्या गुरूस फळली ' या न्यायाने कामगारांना उपयोग करणे भाग पडले आहे. मी आतापर्यंत या प्रश्नाचा शांतपणे विचार केला आहे, त्यावरून नुसत्या सार्वत्रिक संपाने, निषेधकारक प्रचंड सभांनी किंवा मिरवणुकींनी श्रमजीवी वर्गाच्या सर्वांगीण उन्नतीच्या हितसंबंधाचा प्रश्न सोडविला जाईल, असे वाटत नाही. त्याहीपेक्षा काही अधिक कार्य केल्याशिवाय भागणार नाही, - ते कार्य करण्यासाठी कामगारांनी दुसऱ्या कोणत्याही पक्षाच्या छायेखाली आपली चळवळ चालविण्यापेक्षा अगदी स्वतंत्र पक्षाची स्थापना करणेच खरे हितावह आहे. माझे अनेक मित्र मला काँग्रेसमध्ये सामील होण्याचा कळकळीचा उपदेश करीत आहेत. परंतु आपला लढा स्वतःच्या पायावर उभारूनच लढविला पाहिजे. दुसऱ्याकडे भिक्षा मागून कुणाचा केव्हाही कार्यभाग होणार नाही. स्वतःची हिम्मत हीच खरी मार्गदर्शक असते आणि म्हणून भांडवलदारांच्या कृपेवर जगणाऱ्या काँग्रेसच्या हातून श्रमजिवी वर्गाचे कधीही कल्याण होणार नाही. यासाठी कामगारांनी सारी राजकीय सत्ता काबीज करण्यासाठी स्वतंत्र पक्षाच्या निशाणाखाली लढाऊ वृत्तीने लढणेच जरूरीचे आहे.



## १४४

# माझी महात्माजींची भेट झाली तेव्हा–

डॉ. बाबासाहेब आंबेडकर अहमदाबादेस येणार हे कळल्याबरोबर अहमदाबादच्या काही काँग्रेस श्रेष्ठींच्या अंतःकरणाची तगमग होऊ लागली आणि वाटेल ते करून त्यांच्या येण्याला प्रतिबंध करण्यासाठी म्हणून टेलिग्राम-टेलिफोनद्वारा मुंबईशी बरीच गुफ्तंगू झाली. त्याचा काहीच उपयोग न होता ते येणारच असे पाहिल्यावर खुद्द अहमदाबादेत त्यांचा धिःकार आणि निषेध करण्याचे निष्फळ प्रयत्न झाले.

ता. २२-२३ ऑक्टोबर १९३८ या दोन दिवसांच्या अहमदाबाद येथील मुक्कामात डॉक्टरांच्या सत्कारांचे आणि व्याख्यानांचे निदान पंधरा तरी समारंभ झाले असतील. त्यांचे सगळेच कार्यक्रम चढाईचे दणदणीत झाले. गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटीच्या प्रेमाभाई हॉलमधला समारंभ चालू राजकारणाच्या दृष्टीने फार महत्त्वाचा झाला. त्या ठिकाणी दलित नवयुवक मंडळाच्यावतीने मिळालेल्या मानपत्राला उत्तर देताना त्यांनी जे भाषण केले ते अतिशय जोरदार, कळकळीचे आणि अत्यंत उद्‌बोधक होते. त्यातला काही भाग नमूद होऊन सर्वांच्या वाचण्यात येणे फार महत्त्वाचे आहे.

आपण गांधींचे विरोधी आहो आणि आपण काँग्रेसला येऊन मिळत नाही या दोन आरोपांना उत्तरे देताना ते म्हणाले,

माझ्यावर असा आरोप आहे की, मी गांधींचा विरोधक आहे. मी त्यांना मानीत नाही. अगदी खरे आहे. मी गांधींचा विरोधकच आहे आणि ही गोष्ट मी गुजरातच्या या पाटनगरात, गांधीवादाच्या बालेकिल्ल्यात आपणा सर्वांच्या समक्ष जाहीर रीतीने सांगतो. हे सांगताना मला बिलकूल दिक्कत वाटत नाही. मला हे ठाऊक आहे की, गांधींच्या विरूद्ध बोलणे ही गोष्ट हलक़ी-सलकी नाही. आज कोट्यावधी लोक त्यांना अवतारी पुरूष मानीत आहेत. जगापुढे ते हिंदुस्थानचे एकमेव प्रतिनिधी म्हणून मिरवीत आहेत. ते साधू , महात्मा समजले जात आहेत. गांधींच्या पायाशी गोंडा घोळून त्यांच्यापुढे ' जी हुकूम ' करण्यात काय फायदा होतो हे काय मला ठाऊक नाही ? सुभाष बोसकडेच

---

चित्रा : ६ नोव्हेंबर, १९३८.

पहा. १९३२ साली विठ्ठलभाई पटेलांच्या हाताला हात लावून यांनी गांधींबद्दल काय म्हटले होते ?

महात्मा गांधींनी कायदेभंगाची चळवळ तहकूब केल्याचे ऐकून आश्चर्य वाटले. म. गांधींनी आजपर्यंत राष्ट्राकडून झालेल्या भरीव कार्यावर लेखणीच्या एका फटकाऱ्याने काळीमा फासला आहे. गेल्या १३ वर्षात विलक्षण स्वार्थत्याग व आत्मयज्ञ करून हिंदी राष्ट्राने आपल्या चळवळीची कमावलेली किर्ती व इभ्रत महात्माजींच्या या चळवळ तहकुबीच्या खुलाशाने पार घालविली आहे. त्यांना अशा चळवळी मध्येच तहकूब ठेवण्याचा काय हक्क आहे हे अजूनही मला समजलेले नाही. एकदा नेपोलियनने आय ॲम दी स्टेट (I am the State) असे उद्‌गार काढले होते. आज गांधी आय ॲम दी काँग्रेस (I am the Congress) असे लोकांना अप्रत्यक्ष रीतीने सांगत आहेत. सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब ठेवणे म्हणजे सध्याचा काँग्रेसचा कार्यक्रम अयशस्वी झाला अशी कबुली देण्यासारखे आहे. महात्मा गांधी राजकीय पुढारी या दृष्टीने अयशस्वी ठरले आहेत असे आमचे व्यक्तिशः मत आहे. गांधींना अशा शिव्या देणारे हे गृहस्थ आज राष्ट्रभक्त आहेत. हा कायापालट होण्याचे कारण त्यांनी मागाहून पांघरलेली गांधी भक्तीची झूल. वर्गणीचे चार आणे आणि पांढऱ्या टोपीचे दोन आणे खर्चून मी काँग्रेसमध्ये जाईन तर मी मागेन तो मान मला मिळेल हे मला ठाऊक आहे. पण असला मान मी ठोकरेने उडवतो. मी गांधींचा विरोध का करतो ? मी गांधींचा विरोध करतो तो माझ्या स्वार्थासाठी करीत नाही. हा महात्मा विश्वासघातकी आहे म्हणून मी त्याला विरोध करतो. त्यांच्या विश्वासघातकीपणाचा माझ्याजवळ भरपूर पुरावा आहे. त्याचा मला माझ्या कार्यात प्रत्यक्ष अनुभवही आलेला आहे, म्हणून मी त्यांना विरोध करतो आणि करीत राहीन.

गांधींना मी विश्वासघातकी का म्हणतो हे मी तुम्हाला सांगतो. राऊंड टेबल कॉन्फरन्ससाठी हिंदुस्थानातील दलितवर्गाचा प्रतिनिधी म्हणून इंग्लंडला जाण्यापूर्वी मी गांधींना भेटलो होतो. त्यावेळी ते म्हणाले होते की अस्पृश्यांना स्वतंत्र जागा देण्याच्या मी विरूद्ध आहे. तथापि, अधिक बोलणे झाल्यावर त्यांनी कबूल केले की इतर अल्पसंख्य गटांच्या प्रतिनिधींनी अस्पृश्यांच्या मागण्या मान्य केल्या तर आपण त्यांच्या आड येणार नाही. पुढे आम्ही विलायतेत गेलो. दुसऱ्या वर्तुळ परिषदेला गांधीही आले. मी ज्या कामासाठी गेलो होतो त्यासंबंधी चर्चा चालल्याच होत्या. एक दिवस सरोजिनीबाईंनी मला गांधींच्याकडे नेले. त्यांना अस्पृश्यांचे म्हणणे काय आहे ते समजून घ्यायचे होते. वेळ रात्री १० ची होती. आम्ही पोचलो तेव्हा गांधी चरखा फिरवीत बसले होते. मला

काही सांगावयाचे होते ते मी सांगितले. माझे बोलणे चालू होते, गांधींचा चरखा चालू होता. मी दीड तास तिथे होतो. तेवढ्या अवकाशात गांधी एक शब्दही माझ्याशी बोलले नाहीत. शेवटी त्यांचे चरख्याचे चक्र थांबल्यानंतर आम्ही उठलो. तेव्हा गांधी मला एवढेच म्हणाले, ' मी तुमचे बोलणे ऐकले आहे. मी त्याचा जरूर विचार करीन. ' मी निघून आलो.

पुढे एकदा निरोप आला की गांधींनी सर्व अल्पसंख्य प्रतिनिधींना बोलावले आहे. आम्ही सगळे गोळा झालो. तिथे मग नामदेवाच्या लग्नात जरी एकाने व्याह्याकडच्या प्रत्येक माणसाला विचारले होते, ' तुम्हाला काय पाहिजे ' ' तुम्हाला काय पाहिजे ' तसे गांधींनी आमच्यापैकी प्रत्येकाला विचारले. ज्यांनी त्यांनी आपल्या मागण्या त्यांच्यापुढे मांडल्या. सगळे ऐकून घेऊन गांधी संथपणे म्हणाले. ' मी तुमचे म्हणणे ऐकले आहे, मी सगळया गोष्टींचा नीट विचार केला आहे. मला अस्पृश्यांना काही द्यायचे नाही. '

अल्पसंख्य प्रतिनिधींची (मायनॉरिटी कमिटीची) रीतसर बैठक भरली. रॅम्से मॅक्डोनाल्ड अध्यक्षस्थानी होते. कामकाजाला सुरूवात व्हायच्या आधी मुसलमानांनी तहकुबीची सूचना आणली. कारण काय तर त्यांना गांधींशी काही खाजगी चर्चा करायची होती. मी आश्चर्याने स्तंभित झालो. मला या घटनेचा अर्थच कळेना. मी उठलो आणि तहकुबीला विरोध केला. मी म्हटले, '' जर ही चर्चा अल्पसंख्यांकांच्या हक्कासंबंधी असेल तर ती एकट्या गांधींशी खाजगी काय म्हणून ? तीत आम्हाला बोलावणे का नाही ? खाजगी भेटी-गाठी यापूर्वीही झालेल्या आहेत. जर ही चर्चा अस्पृश्यांच्या मागण्यासंबंधी असेल तर ती आम्हाला वगळून का यासंबंधी गांधींनी आपले म्हणणे स्पष्ट केले पाहिजे. '' त्यावर अध्यक्षांनी गांधींना त्यांचे यासंबंधी काय म्हणणे आहे असे स्पष्ट विचारले तेव्हा गांधी म्हणाले, '' मला स्वतःला अस्पृश्यांना काहीही द्यायचे नाही. पण इतर अल्पसंख्य प्रतिनिधींनी जर अस्पृश्यांच्या मागण्या मान्य केल्या तर त्यांना मी विरोध करणार नाही. '' या गोष्टी मी आपल्या मनाच्या सांगत नाही. राऊन्ड टेबल कॉन्फरन्सच्या प्रोसिडिंग्ज् मध्ये त्या नमूद आहेत. त्या वाटेल त्याला पहायला मिळतील. शेवटी माझ्या विरोधाचा उपयोग न होता सभा तहकूब झाली.

त्यानंतर ज्या काही गोष्टी घडल्या, त्यानंतर गांधींनी ज्या काही गोष्टी केल्या त्या माझ्या काळजावर डागल्या गेल्या आहेत आणि त्यामुळेच माझी खात्री पटली की गांधी विश्वासघातकी मनुष्य आहे.

अल्पसंख्य समितीच्या सभेत वरील प्रकारचे भाषण केल्यानंतर या महात्म्याने काय केले असेल ? आपलाच हेका तडीस नेण्यासाठी त्यांनी आपल्या मते एक नामी युक्ती शोधून काढली. त्यांनी एक कुराणाची प्रत मिळविली, तिची पाने चाळली आणि एक मनाशी ठरवून रिट्झ हॉटेलमध्ये ना. आगाखानांच्या मुक्कामी मुसलमानांची खाजगी सभा चालली होती तिथे ते गेले आणि कुराणाची प्रत त्यांच्यासमोर धरून ते म्हणाले, '' हे पहा तुमचा धर्मग्रंथ काय सांगतो. कोणत्याही समाजात फूट पाडणे पवित्र इस्लाम धर्माला विहित आहे काय ? '' ते म्हणाले ' नाही. ' गांधी म्हणाले, '' तर मग तुम्ही एक फार मोठे अधर्म्य कृत्य करीत नाही काय ? अस्पृश्यांच्या मागण्यांना मान्यता देऊन तुम्ही हिंदुसमाजात फूट पाडीत आहात हे तुमचे कृत्य इस्लाम धर्माच्या विरूद्ध आहे '' ते लोक म्हणाले, '' पण गांधीजी, यात धर्माचा संबंध काय ? हा प्रश्न राजकीय हक्कांचा आहे. आम्ही अस्पृश्यांपेक्षा अधिक संपन्न, अधिक सुस्थित, अधिक प्रगत असून काही राजकीय हक्कांकरता झगडत आहो. आम्हाला आणि इतर अल्पसंख्य समाजांना जे हक्क मागण्याचा आणि मिळवण्याचा अधिकार आहे ते हक्क अस्पृश्यांना देणे रास्त आणि सरळ आहे. यात अधर्म्य ते काय ? ''

कुराणाच्या मागे दडून केलेला हा वार फुकट गेलेला पाहून गांधींनी दुसरा आणि अधिक बेशरम प्रयोग केला. ते म्हणाले, ' बरं असो. तुमच्या चौदा मागण्या तुम्हाला तर हव्या आहेत ना ? ' ' अलबत. हव्या आहेत. ' मग मी त्या तुम्हाला मिळवून देतो. मात्र तुम्ही माझे काम केले पाहिजे. तुम्ही जर कमिटीच्या सभेत अस्पृश्यांच्या मागण्या नाकाराल तर मी तुमच्या चौदाच्या चौदा मागण्या स्वीकारल्या जातील असे करीन.

अस्पृश्यांना काहीही द्यायचे नाही ही आपली बैठक धरून बसण्याकरिता हा महात्मा कोणत्या थरापर्यंत जाऊ शकतो हे पाहिल्यानंतर त्यांच्यावर कोणाचाही विश्वास बसेल काय ? मुसलमानांशी त्यांनी केलेल्या या कराराचा मसुदा माझ्याजवळ आहे. तो मी माझ्या पुस्तकात प्रसिद्धही करणार आहे. मी नुसत्या वाऱ्यावरच्या गोष्टी बोलत नाही.

माझ्यावरचा आणखी एक आरोप म्हणजे मी काँग्रेसला मिळत नाही. गोष्ट खरी आहे. काँग्रेसला जाऊन मिळण्याने काय काय लाभ होतात याची थोडीशी कल्पना मी दिली आहे. मी काँग्रेसला मिळावे यासाठी प्रयत्नही करण्यात आलेले आहेत. त्यापैकी एकासंबंधी मी सांगतो. म्हणजे काँग्रेसला जाऊन मिळण्याचे रहस्य काय असते ते तुम्हाला कळून येईल. १९३५ साली एकदा माझ्या एका

मित्राने मला आग्रह करून गांधींकडे वर्ध्याला त्यांचा माझा सलोखा घडवून आणण्यासाठी नेले. मला माहीत होते की या जाण्याचा काही उपयोग होणार नाही. पण मित्राच्या भिडेखातर मी गेलो. * शेगावला गांधींची भेट झाली आणि माझाच अंदाज खरा ठरला. आम्ही परत वर्ध्याला शेठ जमनालालजीकडे आलो. त्याठिकाणी पुन्हा काही मंडळी माझे मन वळवण्याचा प्रयत्न करू लागली. जमनालालजी म्हणाले,––

'' देखो डॉक्टरसाब, आप बडी भूल कर रहे हो. ''

मी म्हटले, '' ते कसे काय ? ''

ते म्हणाले. '' पहा, काँग्रेसला येऊन मिळून तुमचे किती हित होईल ते. अस्पृश्योद्धाराची चळवळ आम्ही तुमच्या हाती देऊ. तुम्हाला माहिती आहे पूर्वी आमच्या मारवाडी समाजाबद्दल लोक काय म्हणत असत ? हे लोक समाजाच्या जळवा आहेत. कुळांच्या घरादारांवरून नांगर फिरवणारे, उलट्या काळजाचे बदमाश आहेत. पण आज ! आज मारवाडी राष्ट्रपुरूष आहेत. जिथे तिथे त्यांची शेखी आहे. याचे कारण काय ? याचे कारण आज आम्ही काँग्रेसला मिळालो आहो. तुम्ही काँग्रेसला मिळा. तुम्हीही राष्ट्रपुरूष व्हाल. ''

मी म्हटले '' हे कसे शक्य आहे ? माझा गांधींवर विश्वास नाही, त्यांच्या कार्यावर विश्वास नाही. माझे त्यांच्याशी मतभेद आहेत. मी काँग्रेसमध्ये येऊन त्यांच्याबरोबर कसे काम करणार ? ''

'' यह कोई बडी बात नही. मतभेद असला म्हणून काय झाले ? जवाहरलाल नेहरू पहा. त्यांचेही गांधींशी मतभेद आहेत. पुष्कळ बाबतीत त्यांच्या झटपटीही होतात. पण ते मधूनमधून ' गांधी माझे गुरू आहेत ' असे म्हणत असतात. तसेच तुम्हीही केलेत म्हणजे झाले. फिर सब बात ठिक होयेगी. ''

मी हसून म्हणालो, '' एखाद्यावर आपला विश्वास असला म्हणजे मतभेद असला तरी त्यांच्याबरोबर काम करीत राहाता येते. पण माझा गांधींवर विश्वासच नाही. मग मधूनमधून तरी त्यांना गुरू कसे म्हणणार आणि त्यांच्याबरोबर काम कसे करणार ? ''

त्यावरच बोलणे थांबले. मग परत गांधींचा निरोप घ्यायला म्हणून आम्ही शेगावला गेलो. तिथे गेल्यावर मी पाहातो तो माझ्या आधीच वर्ध्याच्या

---

* शेगाव हा सेवाग्रामसाठी आला आहे.

संभाषणाची हकीकत शेगावला पोचलेली ! मी तिथे पोचून गांधींच्या समोर जाताच महादेव देसाई गांधींना म्हणाले,––

" खबर छे बापूजी, डॉक्टरसाहेब सूं कहे छे. "

" काय ? काय म्हणतात ? " गांधीनी विचारले.

गांधींच्या समोर मी माझे त्यांच्यासंबंधीचे मत सांगायला कचरेन असा भाव दाखवून महादेव देसाई म्हणाले,––

" ते म्हणतात की तुमच्यावर त्यांचा विश्वास नाही म्हणून ते तुमच्याबरोबर कार्य करायला तयार नाहीत. "

गांधींनी माझ्याकडे प्रश्नार्थक दृष्टी टाकली. मी म्हणालो, " खरे आहे अगदी. माझा तुमच्यावर मुळीच विश्वास नाही. "

आज काँग्रेस पैसेवाल्यांची मिंधी झालेली आहे आणि तिच्याकडून खरोखर लोकहिताची कामे होणे अशक्य आहे. आजच्या परिस्थितीत काँग्रेसमध्ये शिरून कोणताही चढाईचा किंवा लढाईचा कार्यक्रम हाती घेता येणार नाही. म्हणून आपण तीत शिरत नाही.



# १४५
# राजकारणात बोललेलं जेव्हाच्या तेव्हा विसरलं पाहिजे

दिनांक २६ ऑक्टोबर १९३८ रोजी मध्यप्रांत वऱ्हाड प्रांतातील कार्यकर्त्यांचे शिष्टमंडळ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना त्यांच्या राजगृहात भेटले होते. कार्यकर्त्यांचे म्हणणे ऐकल्यानंतर डॉ. आंबेडकरांनी कार्यकर्त्यांना उद्देशून जो हितोपदेश केला होता, तो खाली दिला आहे. लेखक स्वतः त्या कार्यकर्त्यांच्या शिष्टमंडळात त्या प्रसंगी उपस्थित होते आणि डॉ. आंबेडकर जे काही बोलले ते लेखकाने नमूद करून ठेवले असल्यामुळे ते उद्धृत केले आहे.

कार्यकर्त्यांनी सकाळी ७ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भेट घेतली. त्यावेळी ते गंभीर व शांत दिसत होते. मुद्रेवर करारी बाणा दिसत होता. कार्यकर्त्यांबरोबर झालेल्या चर्चेनंतर आम्हाला उद्देशून ते बोलू लागले. त्यावेळी त्यांच्या भाषणातून कळकळीचे करारी उद्गार बाहेर पडताहेत असे आम्हास वाटत होते.

डॉ. आंबेडकर म्हणाले,

तुमच्या मध्यप्रांत वऱ्हाडच्या कौन्सिल इलेक्शनला जवळजवळ दीड वर्ष झाले. इतक्या दिवसात आपण काहीच करू शकलो नाही. तुम्हाला २० जागा मिळवून दिल्या. त्यापैकी फक्त ७ जागा मिळाल्या. १३ जागांचे काहीच करता आले नाही. सात माणसात सुद्धा कधी आपलेपणा दिसून आला नाही, कधीच एकीचा संबंध राहिला नाही. आमच्या मुंबईत पहाल तर आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे काँग्रेसपेक्षाही उत्तम ऑर्गनायझेशन आहे. लोकजागृती आणि राजकारणातील संघटन हे दोन्ही कार्य निराळे.

इलेक्शन झाल्यानंतर आपण काय सभासद बनवले ? मागे मी केसच्या वेळेस आलो असताना चौकशी केली, तेव्हा पक्षाचे कोणी सभासद झाल्याची बातमी मिळाली नाही. तेथे स्वतंत्र मजूर पक्षाचे ऑफिस नाही. त्यात कोणी मनुष्य काही दाद मागण्याकरिता आला, त्याची काही तक्रार असेल, त्याची व्यवस्था करण्याची काहीच सोय नाही. तुमच्या जवळ पैसा नाही. पैशाशिवाय

---

विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : एच. एल. कोसारे पृ. ५१७, ५१८.

राजकारण कसं चालणार ! केवळ एखाद्या माणसावर पैशाकरिता अवलंबून राहिल्याने राजकारण चालू शकत नाही. आम्ही जे सभासद केले आहेत त्यात बरेच कायम सभासंद आहेत, म्हणूनच राजकारण आहे. तुम्ही असं काहीच केलेलं नाही आणि मी सांगतो ते तुम्ही काही करीत नाही. मी फक्त मुंबईची जबाबदारी घेईल. मला मध्यप्रांत वऱ्हाडबद्दल काय करायचं आहे. तुम्हाला जर काही कार्य करायचं नाही तर मला तुमच्या प्रांताबद्दल काही कर्तव्य नाही. तुमच्या प्रांतात काही स्वार्थी, काही गोड बोलणारेही आहेत. काही कार्य करणारेही आहेत. परंतु आतापर्यंत काहीच झालं नाही. ते कार्य तुम्हास केलं पाहिजे. तुम्हास कोणती तरी एक गोष्ट केलीच पाहिजे. एक तर मी सांगतो त्याप्रमाणे केलं पाहिजे किंवा दुसरी गोष्ट मी जे केलं आहे त्याप्रमाणे वागलं पाहिजे. भाई जयवंतला ऑर्गनायझर नेमलं आहे. तेव्हा त्यांच्याबरोबर सहकार्य करून तुम्ही कार्य केलं पाहिजे. मग तुम्ही त्याला विरोध का करावा ? आपल्यात एक दोष आहे की एकदा भांडण झालं की ते भांडण पिढ्या न पिढ्या चालावं. राजकारणात बोललेलं जेव्हाच्या तेव्हा विसरलं पाहिजे. हरदास बद्दल मला आदर आहे. परंतु त्यांच्यात काही दोषही आहेत. हरदासने पाटलास तिकीट दिली नाही म्हणून पाटलांनीसुद्धा असं करायला नको.

आपण अल्पसंख्यांक लोक आहोत. बेडकी फुगली तरी बैलाएवढी होऊ शकत नाही. तेव्हा कोणाच्या जोडीला जोड लावल्याशिवाय राजकारण आपल्या हाती येऊ शकत नाही. पूर्वीची चळवळ आपल्या पुरतीच होती. आपणास ब्रिटिश सरकारकडून त्यावेळेस मिळवायचं होतं. आता ब्रिटिश सरकार उरलं नाही. आजचं राजकारण बहुमतानं चालणार आहे. बहुमत असल्याशिवाय राजकारण आपण काबीज करू शकत नाही. करिता बहुमत वाढवलं पाहिजे. जयवंतबद्दल एवढा बाऊ का करता ? जयवंत काही कोणी राजा नाही. कोणीही उत्तम कार्य करत असतील तर उत्तम आहे. जर कोणी विरुद्ध कार्य करू लागले तर त्याला मी एका शब्दासरशी काढू शकेन. कोणीही स्वतंत्र मजूर पक्षाचा सभासद असल्यावर दुसऱ्या कोणत्याही राजकीय पक्षाचा सभासद राहू शकत नाही. राजकारणाशिवाय समाजकार्य, धर्मकार्य वगैरे करू शकतात. अधिकारावर कोणी राहावं हे ठरवणं लोकांचं कर्तव्य आहे. सभासदांवर देखरेख करणारा लायक मनुष्य नाही म्हणून असा गोंधळ होत असावा. माझ्या हातून जर काही कमी जास्त झालं तर मला येथील लोक विचारावयास येतात.

सत्याग्रह आपण करतो तो ज्या मनुष्यावर आपलं प्रेम आहे त्या विरुद्ध. मूल आईच्या विरुद्ध सत्याग्रह करते. डॉ. खरे यांच्या कडून मी कबूली जबाब लिहून घेतला आहे. '' हे लोक (अस्पृश्य) अज्ञानी आहेत. त्यांना महत्त्वाकांक्षा नाहीत. मला, अस्पृश्य मिनिस्टर घेतला असता, का घेतला ? व एक मिनिस्टर घेऊन त्यांच्या मनात तुम्ही महत्त्वाकांक्षा उत्पन्न केली.'' असे म. गांधी म्हणाले.

तुम्ही सत्याग्रह केला होता त्यावेळेस अग्निभोज याने थोडा तरी भाग घेतला होता काय ? तो जर केवळ आपल्या हक्काकरिता भांडायला तयार नाही तर तुम्ही गांधींविरूद्ध सत्याग्रह का केला ? जो मनुष्य भांडायला तयार आहे त्याच्याकरिता भांडायला तयार होणं हे कर्तव्य ठरतं.

तेथे जे स्वतंत्र मजूर पक्षाचे कार्य करण्यात येईल त्या ब्रँचवर हेड ऑफिसचा कंट्रोल असायला पाहिजे. मी शिस्तीचा भोक्ता आहे आणि मी जवळ जवळ एक प्रकारचा डिक्टेटर आहे. पैशाच्या बाबतीत आपण अत्यंत प्रामाणिक असलं पाहिजे.

दरेक जिल्ह्याचे पाच पाच सभासद आणून त्यांची सभा घ्या. त्यात सातही एम. एल. ए. लोकांना बोलवा व सर्वांमिळून स्वतंत्र मजूर पक्ष स्थापन करा.

कॉंग्रेस ही भरभक्कम पायावर उभारलेली संस्था आहे. त्यापुढे आपले काहीच चालत नाही. त्यांचे बहुमत असल्यामुळे आपणास काहीच करता येत नाही. म्हणून त्यांच्यात फूट पाडणं आपलं कर्तव्य आहे. डॉ. खरे हा शत्रु पक्षाचा एक दगड आहे. तो पाडण्याचा मी प्रयत्न केला.

पक्षाच्या सभासदांचे पैसे एका माणसाजवळ ठेवू नये. पैसा दोन किंवा पाच माणसांच्या नावाने बँकेत ठेवायला पाहिजे. पक्षाच्या कामाकरिता एक सेक्रेटरी नेमा ! (हे काम तर झालंय) ऑफिस करिता एक घर. घ्या. जो फॉर्म आहे त्यावर महिन्यास जी वर्गणी होईल ती लिहून पाठवा. तुम्ही सुरळीत कार्य सुरू केलं की जनता पत्रात सी. पी. व बेरार करिता दोन पाने रिझर्व ठेवू. आताची एक तात्पुरती कमेटी नेमा आणि नंतर इलेक्शन होईल. प्रचारकाच्या कामाकरिता निरनिराळया लोकांकडे निरनिराळे विभाग द्यावे. स्वतंत्र मजूर पक्षाच्या राजकारणाकरिता सभासद जास्त वाढवून संघटन करणं अत्यंत आवश्यक आहे.

ज्या माणसाच्या हाती सत्ता जाते तो मनुष्य उत्तम निवडून दिला पाहिजे. समाजकार्य कशात आहे, समाजाचे हित कशात आहे, कोणत्या गोष्टीची समाजाकरिता आवश्यकता आहे, ही जाणीव त्याला असली पाहिजे. कार्य करणारे अव्वल दर्जाचे लोक निवडून न देता त्या ठिकाणी जर कोणी आपले नातलग म्हणून भरती करू लागले तर काहीही कार्य होणार नाही. जाहीर सभेत आपल्या मनुष्याबद्दल मतभेद जरी असला तरी सुद्धा आपला पक्ष लंगडा पडू शकणार नाही असं प्रत्येक सभासदाचं वर्तन असलं पाहिजे.

पक्षाचे सभासद बनवा व एक मध्य प्रांताचा नकाशा काढून मला पाठवा . त्या नकाशात जिल्ह्या जिल्ह्याचे विभाग दाखवून त्यात आपले मतदार किती व सर्वसाधारण मतदार किती, कोठे जागा रिझर्व आहेत व कोणत्या ठिकाणी इलेक्शन लढवावे लागतात, ही सर्व माहिती त्यात भरून मला पाठवा, म्हणजे पुढील व्यवस्था कशा तऱ्हेची असावी हे ठरवावयास अगदी सुलभ जाईल.

● ● ●

# १४६

# मालक-मजूर तंटा निवारण कायदा, मजुरांच्या माना कापणारा

रविवार ता. ६ नोव्हेंबर १९३८ रोजी संध्याकाळी परळच्या कामगार मैदानावर एक लाखापेक्षा अधिक अशा जमावाने कामगार जाहीर सभेला हजर होते. ही कामगारांची विराट सभा पाहाणारांची आधीच खात्री झाली होती की तारीख ७ नोव्हेंबरचा कामगारांचा एक दिवसाचा सार्वत्रिक संप पूर्णपणे यशस्वी होणार. त्या दिवशी सभेचे अध्यक्ष बॅ. जमनादास मेहता तसेच शामराव परूळेकर, भाई याज्ञिक, एस. ए. डांगे, मिरजकर यांची भाषणे झाली. त्या सभेतील विराट जनसमुहापुढे भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आज आपण या ठिकाणी मुंबई सरकारने लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत ' ट्रेड डिस्प्यूट बिल ' या नावाचे जे बील आणले आहे त्याचा निषेध करण्याकरिता जमलो आहो, हे आता माझ्या पूर्वीच्या वक्त्यांनी आपणास सांगितले आहेच. या बिलाला ' ट्रेड डिस्प्यूट बिल ' अथवा ' मालक मजूर तंटा निवारण्याचा कायदा ' असे संबोधण्यात येत आहे. या बिलाने कामगार वर्गाची मान किती सफाईदार रीतीने कापली गेली आहे, याची चर्चा मी आता करीत नाही. कारण ही चर्चा माझ्या पूर्वीच्या वक्त्यांनी व असेंब्लीतील आपल्या सभासदांनी गेले दोन अडीच महिने अखंड उत्साहाने आणि कर्तव्य तत्परतेने केलेली आहे. आपण ती वर्तमानपत्रात वाचलेली आहे. आज मला आपणाला एवढेच सांगावयाचे आहे की, काँग्रेस सरकार अधिकारावर आल्यावर मजुरांच्या संबंधाने इतका अन्याय कायदा संख्या बळाच्या जोरावर पास करून घेऊन त्या अन्यायांचा परिस्फोट करणारांविरूद्ध खोटानाटा, निंद्य आणि बेशरमपणाचा प्रचार करण्याइतकी काँग्रेसची सत्य-अहिंसा वृत्ती आज अधोगतीला गेली आहे, ही गोष्ट आपणाला विसरता येणार नाही.

' मजुरांचे पुढारी स्वार्थसाधू आणि लबाड आहेत ' असे हवे त्या उपन्या भाडोत्री खादीवाल्यापासून तो थेट पट्टीच्या काँग्रेस जंबुकापर्यंत सर्वांनी खुशाल बरळत सुटावे ! मी तुमच्यापुढे आज स्पष्ट सवाल टाकतो की, पूर्वी १९३०-३४ साली काँग्रेसने मजुरांच्या हितसंबंधाचे धोरण स्पष्ट जाहीर केले असता त्याला मूठमाती देऊन मजुरांच्या माना कापणारा कायदा तयार करणारे काँग्रेसचे पुढारी लबाड की सत्तामदांध काँग्रेस पक्षाकडून होणारा अपमान सहन करून कामगारांची बाजू

---

जनता : १२ नोव्हेंबर १९३८.

असेंब्लीत निर्भीडपणे मांडणारे मजूर पुढारी लबाड, याचा निर्णय आपणच द्यावा. ' देशहिताचा आणि देशभक्तीचा सारा मक्ता काँग्रेसवाल्यांकडे वारशानेच येतो, डॉ. आंबेडकर जातीनिष्ठ ! डॉ. आंबेडकर देशद्रोही, कारण ते तुरुंगात गेले नाहीत ! ' केवळ तुरुंगात जाऊन मनुष्य देशभक्त कसा बनतो ते मला समजत नाही. मी तुरुंगात गेलो नाही ही गोष्ट सत्य आहे. माझ्या तुरुंगात जाण्याचा उपयोग काय ? मी तुरुंगात गेलो असतो तर मला खात्रीने ' ए ' क्लास मिळाला असता आणि ' ए ' क्लासात ऐष आरामात तुरुंगवास भोगून आपल्या अनुयायांना चकविण्याइतका दांभिकपणा माझ्याजवळ नाही, हे मी प्रांजळपणे कबूल करतो. आजच्या काँग्रेसवाल्यांनी नावाचा तुरुंगवास भोगला आहे. खरा तुरुंगवास भोगला लोकमान्य टिळकांनी आणि इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनी !

एकांगी आणि खोडसाळ प्रचारामुळे काही थोड्या लोकांची दिशाभूल झाली तरी या प्रचाराचा फोलपणा निष्पक्षपाती माणसाला पटल्यावाचून राहणार नाही. काँग्रेसवाल्यांचे गुरू महात्मा गांधी दुसऱ्या वर्तुळ परिषदेला गेले त्यावेळी तेथे हिंदुस्थानचा एकमेव प्रतिनिधी म्हणून आपण गांधींचा मोठा जयजयकार केला. माझे गांधींच्या भक्तांना आणि अभिमान्यांना असे स्पष्ट आणि जाहीर आव्हान आहे की, त्यांनी राऊंड टेबल कॉन्फरन्समधील माझी आणि गांधींची सर्व भाषणे जी राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या प्रोसिडिंग्जमध्ये सुरक्षित आहेत ती पुस्तक रूपाने एकत्र करावी. डॉ. आंबेडकरांची भाषणे खंड १, महात्मा गांधींची भाषणे खंड २, अशी ती भाषणे एकत्र छापावी आणि ती वाचून देशद्रोही कोण याचा निर्णय आपण द्यावा. कोणत्याही निर्भिड आणि निस्पृह न्यायाधिशाने हा ,निकाल द्यावा, मी तो मान्य करावयास तयार आहे, हे मी या सभेत जाहीर करतो.

उद्याचा संप खरे म्हटले असता संप नव्हेच. आज तरी आपले भांडण मालकाजवळ नाही. मुंबई सरकारने दुराग्रहाने आणि मालकांना खूष करण्याच्या इराद्याने कामगारांची कत्तल करणारे बील पास केले आहे. असेंब्लीत ते बील पास झालेच. कौन्सिलात पास होण्यास वेळ लागणार नाही. त्याच्याबद्दल आपली साऱ्या कामगार व मजूर वर्गाची नापसंती व्यक्त करण्याकरिता आपण उद्या एक दिवसाचा सार्वत्रिक संप घडवून आणणार आहो. या एका दिवसाच्या शांततेने पार पडणाऱ्या संपाच्या रूपाने कामगार आणि मजूर वर्गाच्या विराट शक्तीचे स्वरूप आपण जगाच्या निदर्शनास आणून देणार आहोत.

आपण सर्वांनी संपात भाग घ्यावा आणि तो यशस्वी करून दाखवावा, अशी माझी इच्छा आहे. परंतु मी सांगतो अथवा इतर मजूर पुढारी सांगतात म्हणून आपण या संपात सामील व्हावे, असे मला वाटत नाही. ज्या बिलाविरूद्ध निषेध म्हणून हा संप पुकारला जात आहे त्या बिलाचे हिडीस स्वरूप आणि त्यासंबंधीचे आपले कर्तव्य यांचा मनोमन विचार करून संपात जाणे योग्य वाटले तरच आपण संपात सामील व्हावे, असे माझे आपणास सांगणे आहे.

उद्याचा संप यशस्वीरीतीने पार पडला म्हणजे संपले, असे मात्र समजू नका. तुम्हाला पुढे झगडाव्या लागणाऱ्या झगड्यांपैकी एकाची ही मुहूर्तमेढ आहे, हे ध्यानात असू द्या. आपण हजारोंनी या सभेला हजर राहिल्याबद्दल आपल्याला धन्यवाद देऊन मी आपली रजा घेतो.

डॉ. बाबासाहेबांनी सार्वत्रिक संपाबाबत केलेले भाषण कामगारांच्या मनावर पूर्णपणे बिंबलेले दिसत होते. इतक्या दिवसांच्या प्रचारकार्याने कामगारांची एकजूट अपूर्व अशी झालेली दिसत होती.

सभेनंतर कामगारांची, प्रत्येक कामगार मोहल्ल्यातून वरळीपर्यंत निघालेली प्रचंड मिरवणूक संपाच्या यशाची खात्री पटवीत होती. ही रात्रीची हजारो कामगारांची मिरवणूक इतक्या शिस्तीने आणि शांततेने चालली होती की तिचे कोणीही कौतुकच केले असते. संपाच्या प्रचारार्थ एवढी मोठी मिरवणूक पूर्वी कधीच निघाली नव्हती. या मिरवणूकीची स्वतंत्र मजूर पक्षाच्या समता सैनिक दलाने ठेवलेली शिस्त विशेष अभिनंदनीय होती. स्वतंत्र मजूर पक्षाच्या कार्यकर्त्यांनी ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या सहकार्याने संप यशस्वी करण्याची जबाबदारी पार पाडण्यासाठी केलेल्या प्रयत्नांची प्रशंसा करणे शक्तीबाहेर आहे. संपाच्या रात्री सर्व कामगार पुढारी संपाची जय्यत तयारी करीत होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, बॅ. जमनादास मेहता, डी. व्ही. प्रधान, डांगे, निमकर वगैरे मंडळी रात्रभर कामगार विभागातून फिरत होते.



## १४७

# कोणत्याही परिस्थितीत मजुरांच्या प्रतिनिधींना निवडून दिले पाहिजे

ता. ७ नोव्हेंबर १९३८ रोजीच्या मुंबई कामगारांचा प्रचंड संप यशस्वीरित्या पार पडल्यानंतर दीड लाख कामगारांची कामगार मैदानावर संध्याकाळी सभा झाली. कामगारांनी संपापासून कोणता धडा शिकावा व या पुढचे आपले ताबडतोबीचे धोरण काय असावे व प्रत्यक्ष लढ्याच्या जोडीला कामगारांचे संप, लढे व स्वातंत्र्याचा लढा यशस्वीरित्या पार पाडण्याकरिता, कायदे कौन्सिले, म्युनिसिपालट्या, लोकल बोर्ड वगैरे ज्या ज्या ठिकाणी म्हणून जी काही राजकीय सत्ता आहे ती कामगारांच्या, शेतकऱ्यांच्या व जनतेच्या खऱ्याखुऱ्या प्रतिनिधींच्या हाती येणे किती आवश्यक आहे, हे डॉ. आंबेडकरांनी आपल्या मुद्‌देसूद व सडेतोड भाषणात समजाऊन दिले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आजच्या सायंकाळच्या वर्तमानपत्रात काय आहे ते पाहा. म्हणजे विचित्र लीला दिसून येईल. त्या वर्तमानपत्रात ज्या हकीकती प्रसिद्ध झाल्या त्या आश्चर्यजनक आहेत. एक म्हणतो, मजुरांचा संप यशस्वी झाला नाही आणि सर्व मजूर कामावर आहेत. ही गोष्ट खरी की खोटी मी सांगत नाही. मात्र मुंबईतील वर्तमानपत्रे मुंबई मंत्रीमंडळ व भांडवलदार यांनी विकत घेतली आहेत, असे दिसून येईल. अत्यंत यशस्वी संप झाला असताना असली खोटी व विपर्यस्त परिस्थिती चितारावी हे निषेधार्ह आहे. काय लिहून आले याची तुम्ही चिंता करू नका. समोर काय आहे ते पाहा व धीर धरा.

आज तुम्ही सव्वालाख कामगारांनी एकत्र येऊन पोटाची फिकीर न करता रोजची कमाई बुडवून या बिलाला असलेला विरोध दाखवून दिलेला आहे. काँग्रेसने जो कायदा केला त्याला आपण विरोध केला. या बिलाला वरच्या कौन्सिलमध्ये देखील असाच विरोध माझे मित्र ॲ. जोशी करणार असले तरी त्यांना मदत नाही. म्हणून हा कायदा आपल्या छातीवर बसणार. काँग्रेसने हा कायदा करावा आणि आपण विरोध करावा, हेच आपण करणार काय ? जर नुसते बावटे फडकवाल, स्लोगन्स ओरडाल आणि स्वस्थ बसाल तर तुमच्यासारखे महामूर्ख दुसरे कोणीही नाहीत, असेच मी म्हणेन. ज्या काँग्रेस सरकारने

---

जनता : १२ नोव्हेंबर १९३८.

घोड्यावर बसून आपल्या तोंडात लगाम घातला त्या काँग्रेस सरकारला उडवून देणे हे शहाणपणाचे आहे. शत्रुच्या हाती कायदा करण्याची जरादेखील संधी देऊ नका, जर आपण शहाणपणा अगोदर पाळला असता, अधिक मजूर पुढारी निवडून दिले असते तर हा कायदा पास झाला नसता. आज काँग्रेसचे मताधिक्य आहे. म्हणूनच हा कायदा काँग्रेस पास करू शकेल. आज जेथे सत्ता आहे ती जागा काबीज केली तरच तुमचा बचाव होईल.

म्युनिसीपालिटी, लोकल बोर्ड, कायदे कौन्सिले जेथे जेथे राजकीय सत्ता आहे, ती सर्व स्थाने मजुरांनी काबीज केली तर आजचा कार्यक्रम यशस्वी झाला, असे म्हणता येईल.

येत्या म्युनिसीपल निवडणुकीत मजूर पक्षाचे पुढारी उभे राहाणार आहेत. त्यांनाच तुम्ही आपली मते द्या. काँग्रेसने गेल्या ५० तर्षात जी अब्रू कमाविली ती गेल्या १५ महिन्यात घालविली आहे.

काँग्रेसने आज खरोखरच साम्राज्यशाही विरुद्ध निकराचा लढा सुरु केला तर मी स्वातंत्र्याकरिता माझी सर्व शक्ती काँग्रेसच्याच बाजूला टाकीन. परंतु काँग्रेसची आजची साम्राज्यशाही विरोधाची भाषा जनतेची शुद्ध दिशाभूल करण्याकरिताच वापरली जात आहे. परंतू मी अजूनही असे सांगतो की जर खरोखरच मला असे आढळून आले की काँग्रेस आज प्रामाणिकपणे स्वातंत्र्याकरिता युद्ध करीत आहे तर मी माझी आजची भूमिका सोडून काँग्रेसला स्वातंत्र्याच्या लढ्यात पाठिंबा देण्यास तयार आहे.

आणि म्हणूनच मी तुम्हाला परत असे सांगतो की तुम्ही कोणत्याही निवडणुकीत मजुरांच्याच प्रतिनिधींना निवडून दिले पाहिजे. सरकारने कायदा करावा आणि तुम्ही त्याला नुसता विरोध प्रदर्शित करावा हा काही खरा लढा नव्हे. तुम्हाला नको असणारे, तुमच्या अहिताचे कायदे करणाऱ्या काँग्रेसवाल्यांना तुम्ही का निवडून देता ? मुंबई म्युनिसीपालिटीच्या निवडणुका जवळ आल्या आहेत. या निवडणुकीत तुम्ही वाटेल त्याला मते द्या पण काँग्रेसला मते देऊ नका. असे न केलेत तर तुमचा लढा योग्य मार्गाने जाणार नाही, हे लक्षात ठेवा.



## १४८

# स्वतंत्र मजूर पक्षाचा प्रभाव

रविवार ता. ३ डिसेंबर १९३८* रोजी रात्रौ १० वाजता मुंबई फोरास रोड म्युनिसीपल सिमेन्ट चाळ नं. १८ येथील मंडळीच्या विद्यमाने लोकाग्रणी आणि मजूरांचे नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली इमारत फंडाला मदत देण्याकरिता जंगी जाहीर सभा घेण्यात आलेली होती. सदर प्रसंगी मेसर्स प्रि. दोंदे, के. व्ही. चित्रे, भाई प्रधान, आमदार डी.जी. जाधव, सी. एन. मोहिते, दादासाहेब गायकवाड, टी. एम. गुंडेकर, मडके बुवा, रेवजी डोळस, एस. पी. धोत्रे, वडवलकर आणि केशवराव आडेकर वगैरे सद्गृहस्थ उपस्थित होते. लोक समुदाय तीन, चार हजारावर होता. बरोबर १० वाजता नियोजित अध्यक्ष बाबासाहेब आणि इतर युरोपियन पाहुणे मंडळी यांचे सभास्थानी आगमन होताच लोकांनी टाळयांच्या कडकडाटात त्यांचे हार्दिक स्वागत केले. नंतर सी. एन. मोहिते मास्तर नियोजित अध्यक्षाची सूचना आणण्यास उभे राहिले. त्यांनी इमारतीची किती आवश्यकता आहे हे लोकास समजाऊन सांगितले. फोरास रोड म्युनिसीपल चाळ नं. १८ येथील हेल्थ डिपार्टमेन्ट मधील काम करणाऱ्या लोकांकडून आज २३५ रूपये रोकड जमा करण्यात आलेले आहेत हे विशेष होय. तद्नंतर के. डी. शिर्के यांनी अनुमोदन दिल्यावर बाबासाहेब अध्यक्षस्थानी स्थानापन्न झाले. प्रथम मडके बुवा, रेवजी डोळस आणि प्रि. दोंदे साहेब यांची समयोचित भाषणे झाली.

मग डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बोलावयास उभे राहिले. त्यांनी बायबल मधील जुन्या करारातील ज्यू लोकांची हृदयविदारक व गुलामगिरीची कहाणी सांगितली. तीत ज्यू लोकांची गुलामगिरी व अस्पृश्यांची परिस्थिती यांच्यात किती फरक आहे हे समजाऊन सांगितले. नंतर महाडच्या सत्याग्रहापासून आजतागायतच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीचे सिंहावलोकन केले. इमारत फंडासंबंधी बोलताना ते म्हणाले, प्रत्येक चाळीतील लोकांनी आपल्यातर्फे पाच माणसांची कमिटी नेमून चाळीतील अठरा वर्षावरील स्त्री, पुरूषांची खानेसुमारी करावी. म्हणजे त्या चाळीतील लोकांकडून किती रुपये मिळाले पाहिजेत हे

---

जनता : १० डिसेंबर १९३८.

* तारीख ४ डिसेंबर १९३८ असावी—संपादक.

मला समजेल. प्रत्येक मनुष्याने व्यक्तीशः १ रुपया पेक्षा अधिक आपल्या ऐपतीप्रमाणे पैसे द्यावेत. मुंबई स्कूल कमिटी खात्यातील प्रत्येक शिक्षकाकडून अर्धा पगार घेणार आहे. आज आपल्या कार्याचा व्याप जास्त प्रमाणात वाढल्यामुळे समाज व राजकारण यांची सूत्रे हलविण्याकरता स्वतःची इमारत असणे अत्यंत आवश्यक होय. आता दुसरी गोष्ट म्हणजे येती म्युनिसीपल निवडणूक होय. मी स्वतंत्र मजूर पक्षातर्फे सध्या नऊ उमेदवार उभे केलेले आहेत. त्यांना आपली सर्व मते देऊन निवडून आणले पाहिजे. सर्व राजकीय पक्ष काँग्रेसपुढे अगदी फिके पडलेले आहेत. काही नामशेष झालेले आहेत. पण आज एकटा स्वतंत्र मजूर पक्ष काँग्रेस विरोधी म्हणून उभा राहिलेला आहे. हा पक्ष गोरगरीब मजूरांचा आहे. तेव्हा तो पक्ष या म्युनिसीपल इलेक्शनमध्ये पूर्ण यशस्वी झाला पाहिजे. बरे असो. ज्या लोकांनी इमारत फंडाला २३५ रुपये दिले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. इमारत फंडाला वर्गणी देणाऱ्यांची नावे जनता पत्रातून प्रसिद्ध करण्यात येतील. याप्रमाणे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुमारे २ तास अस्खलित, कळकळीने आणि अधिकार वाणीने भाषण केले. नंतर मोहिते मास्तर यांनी अध्यक्षांचे, जमलेल्या मंडळींचे आभार मानल्यानंतर पुष्पहार अर्पण करण्यात आले. साडेबारा वाजता सभेचे काम बरखास्त करण्यात आले. नंतर श्री. करडकर यांच्या जलशाचा कार्यक्रम करण्यात आला. हा इमारत फंडाचा समारंभ घडवून आणण्यात श्री. राजाराम हिराजी माटवणकर आणि कृष्णा काळू कुंभवडेकर यांनी अतिशय मेहेनत घेतली. तसेच गंगाबाई सातारकर यांनी सुद्धा कार्य पार पाडण्यात मदत केली.

● ● ●

# १४९

# माझ्या पुस्तकाला बेलिफाने हात लावला तर त्याला गोळी घालून ठार करीन

मुंबई येथे अस्पृश्य विद्यार्थ्यांतर्फे भरविण्यात येणारे " मुंबई अस्पृश्य विद्यार्थी संमेलन " तारीख १०, ११, १२ डिसेंबर १९३८ या तीन दिवशी अगदी यशस्वी रीतीने पार पडले. संमेलनाच्या अध्यक्षपदावरून सोमवार तारीख १२ डिसेंबर रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी विद्यार्थ्यांना उपदेश केला. टाळ्यांच्या कडकडाटात आणि स्त्रियांच्या गॅलरीतून विद्यार्थिनींकडून होणाऱ्या पुष्पवृष्टीमध्ये डॉ. बाबासाहेब भाषण करावयास उठले. ते म्हणाले,

आज तुम्ही मुंबईमध्ये अस्पृश्य विद्यार्थ्यांचे संमेलन घडवून आणले आहे आणि ते सर्व परीने यशस्वी झाले आहे. या कार्यक्रमाबद्दल तुमचे व ज्या विद्यार्थ्यांनी हे संमेलन पार पाडण्यात भाग घेतला आहे, त्यांचे मी अभिनंदन करतो. मी शनिवारी व रविवारी नाशिकला होतो. प्रवासातील दगदगीमुळे माझी प्रकृती बिघडली आहे. माझ्यात काही त्राण नाही व भाषण करण्याची ताकद नाही. मी इतके सांगू इच्छितो की आजच्या प्रसंगी हजर राहता आले याबद्दल मला आनंद व धन्यता वाटते.

अशाप्रकारची संमेलने फार होतात. त्याप्रसंगी कोणी अध्यक्ष आला–मी नेहमी पाहतो–त्याने भाषण केले की त्यात विद्यार्थ्यांना एक टोमणा मारलेला असतो. तुम्ही शिकून काय करणार ? सरकारी नोकरी ? त्यांना देशसेवा करण्याचाही उपदेश करण्यात येतो. पण यात काही हशील नाही. विद्यार्थ्यांसंबंधी मी जो काही विचार केला आहे त्यावरून मी असे सांगू इच्छितो की हा उपदेश खोटा आहे आणि मी तसाच उपदेश करणार नाही. विद्यार्थ्याने शिकून नोकरी केली तर त्यात काय पाप ? त्याला आयुष्य आहे, त्याला भावना आहेत. प्रत्येक मनुष्याचे अंतिम ध्येय काय आहे ? आपल्या अंगी वसत असलेल्या गुणांचा परिपोष होऊन त्यास गोड फळे यावीत, हेच ध्येय आहे. म्हणून मी तुम्हाला तो उपदेश करीत नाही. तुम्ही सरकारी नोकऱ्या मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न करा. मला असा अनुभव आला आहे की, सरकारी नोकरी हल्ली एका जातीचा मक्ताच होऊन बसली आहे. कलेक्टर ऑफिसात किंवा इतर प्रत्येक ऑफिसात एकाच जातीची माणसे आहेत. पुष्कळ माणसे सांगतात, तुम्ही नोकरीसाठी का भांडता ? लायकी असली की

---

जनता : १७ डिसेंबर, १९३८.

नोकरी मिळते, त्यात जातीचा कशाला प्रश्न ? परंतु आपल्या सामाजिक परिस्थितीचा विचार केल्यास नोकरी केल्यावर काय फायदा आहे, असे विचारणे मूर्खपणाचे आहे. या देशात जातिभेदाचे प्रस्थ फार आहे. आज ज्याच्याजवळ पैसा आहे त्याच्याच हाती खरी सत्ता आहे. तो तिचा सद्‌भावनेने उपयोग न करता आपल्याच पोळीवर तूप ओढून घेतो. नोकरीमुळे पगार हातात येतो. ज्या समाजाला सरकारी नोकऱ्या नाहीत, जो समाज अधिकाराच्या जागेवर नाही, त्याची ऊर्जितावस्था होणार नाही. ब्राह्मणसमाज सरकारी नोकरीत गुंतलेला आहे. त्यामुळे त्यात सामर्थ्य आहे व तो आपले वर्चस्व गाजवू शकतो. म्हणून तुम्ही सरकारी नोकऱ्या मिळविण्याचा पिच्छा पुरविल्यामुळे समाजाची उन्नती होईल. याचा तुम्ही कसोशीने प्रयत्न करा.

शिकलेल्या माणसात काही दोष असतात–शिकल्यावर नोकरीच्या पाठीमागे लागणे हा दोष नव्हे–ते दोष व ते अवगुण तुमच्या अंगात शिरणार नाहीत याची खबरदारी घ्या. पहिली गोष्ट शिक्षण पुरे झाल्यावर मनुष्य स्वार्थी बनतो. मनुष्य स्वार्थी असणे हे स्वाभाविकच आहे. परंतु शिकलेला मनुष्य स्वतःचे हित पाहतो, समाजाचे पाहात नाही. तो आपल्या बायको-पोरांची व स्वतःच्या हिताचीच काळजी घेतो. मॅझिनी म्हणतो की '' लोकात पारतंत्र्य पसरले, माणसे शिकली तरी त्यांच्यात कर्तव्यापेक्षा हक्कांची जाणीव जास्त उत्पन्न होते '' आपले कर्तव्य कोणते, याची भावना जागृत होत नाही हा एक शिकलेल्या माणसाचा दोष आहे.

मला खेद वाटतो की शिकलेल्या मनुष्यास पदवी मिळाली आणि त्याला नोकरी लागली की त्याचा विद्यार्जनाचा मार्ग साफ तुटतो. विद्येचे महत्त्व खुंटले जाते. मी प्रवास करीत असता मजजवळ नेहमी चार पुस्तके व वर्तमानपत्रे असतात. परंतु प्रवासात जी शिकलेली माणसे दिसतात त्यांच्या हातात पुस्तके, वर्तमानपत्रे यांच्याऐवजी सिगारेटच्या पेट्या मात्र दिसतात. मनुष्य बी. ए. झाला म्हणजे त्याला अधिक शिक्षणाची गरज नाही काय ? बी. ए. किंवा एम्. ए. झाला म्हणजे त्याने सर्व ज्ञान संपादन केले, ही भावना चुकीची आहे. अगस्ती मुनीने ज्याप्रमाणे समुद्र प्राशन केला त्याप्रमाणे शिकून एखादी पदवी मिळाली म्हणजे आपण सर्व विद्या हस्तगत केली असे शिकलेल्या लोकांना वाटते ! बडोदे संस्थानात एक गृहस्थ होता. तो बी. ए. झाला होता. महाराजांनी त्याची नेमणूक एका खेडेगावात केली होती. त्यावेळी बडोदे संस्थानचे दप्तर गुजरातीतून चालत असे, इंग्रजीतून चालत नसे. मनुष्य फार आळशी ! कधी चूकून टाईम्सदेखील वाचीत नसे. याचा परिणाम असा झाला की काही वर्षानंतर त्यास ए. बी. सी. ची देखील ओळख राहिली नाही. हे अगदी सत्य आहे. माझासुद्धा असाच अनुभव आहे. पीएच. डी. ही पदवी मिळविण्याकरिता फ्रेंच व जर्मन भाषा अवगत करण्याचा निर्बंध असे. त्यावेळी त्या भाषा मला अवगत होत्या. परंतु आता त्या भाषांचा व्यासंग नसल्यामुळे त्या

भाषातून बोलणे मला कठीण जाते. अलिकडे मी फ्रान्स व जर्मनीत जेव्हा गेलो तेव्हा त्या भाषेतून बोलण्याचा मला त्रास पडू लागला. म्हणून विद्येचा व्यासंग नेहमी केला पाहिजे. ज्याप्रमाणे माणूस एकदा दारू प्यावयास लागल्यावर तो ती जन्मभर पीत राहतो त्याचप्रमाणे विद्यार्जनाच्या बाबतीत झाले पाहिजे. विद्येची खरी गोडी कोणाला लागली ? परिक्षेनंतर जो आपली पुस्तके नळबाजारात विकतो त्याला ? बायकोपेक्षा, पोरापेक्षा ज्याचे विद्येवर जास्त प्रेम आहे त्यालाच विद्येची गोडी लागली, असे मी म्हणेन. माझ्या घरावर सावकारीबद्दल जर जप्ती आली व बेलिफाने जर माझ्या पुस्तकाला हात लावला तर त्याला मी गोळी घालून जागच्याजागीच ठार करीन. मी तरी पाहतो तुम्हा शिकलेल्या मुलात सौंदर्याची गोडी दिसते. लग्नात मुलगी सुंदर आहे काय ? ती आपणास पसंत आहे काय ? वगैरे गोष्टी तुम्ही पाहता. पण तोच हक्क मुलींना द्या. बऱ्याच सुंदर स्त्रिया कुरुप माणसाच्या स्वाधीन झालेल्या मी पाहिल्या आहेत. या देशाचा मला कंटाळा आलेला आहे. परंतु मला माझ्या कर्तव्याची जाणीव आहे म्हणून मला येथे राहणे भाग पडले. यातील धर्म, सामाजिक रचना, सुधारणा व संस्कृती यांचा मला फारच कंटाळा आलेला आहे. I am at war with civilization येथील कोट्याधीश मारवाड्यांच्या घरात काय दिसेल ? त्यांच्या घरात स्टॅच्यू, फर्निचर, पेंटिंग व पुस्तके यापैकी एकही वस्तू दिसणार नाही. हीच गोष्ट ब्राह्मणांची. एखाद्या ब्राह्मण कारकुनास पगार झाल्यावर तो आपल्या बायकोस एखादी सोन्याची पुतळी करण्याच्या गडबडीत असतो. कारण सोने संकटसमयी उपयोगी पडते ना ! जगात फक्त जगणे हेच जर ध्येय असेल तर पशु आणि माणूस यात फरक काय ? मनुष्य सौंदर्याची साठवण करू शकतो, पशुला ते करता येत नाही. नुसती कॉलर ताठ करून आणि नेकटाय बांधून सौंदर्य वाढत नाही. मी आतापर्यंत दहा-अठरावेळा विलायतेस गेलो. माझ्याबरोबर बरेच लोक विलायतेस आले होते. त्यांना आता मी पाहतो तो काय, त्यांना वर्णाश्रम धर्म मान्य ! त्यांच्यावर काहीएक परिणाम झालेला आढळत नाही. काय त्यांचा जन्म ! हिंदू धर्मातील सर्व घाण त्यांना मान्य ! तुम्ही घाणीत पडलेली रत्ने आहात. अत्यंत घाणेरड्या पाण्यात अत्तराचा थेंब पडावा त्याप्रमाणे तुमची स्थिती आहे. तुमच्या आईबापांना शिक्षण नाही. अठराविश्वे दारिद्र्य. तेव्हा हा मैल साफ करणे हे तुमचे कर्तव्य आहे. बायबलात मी वाचले आहे की मीठच जर अळणी झाले तर बाकी पदार्थांना चव कशी येणार ! कोणतेही कार्य करण्याकरिता आपल्या अंगचे गुण स्थिरावले पाहिजेत आणि ते स्थिरावण्याकरिता निदान एक पिढी तरी लोटली पाहिजे. स्वतः सुधारल्याशिवाय इतरांना तुम्ही काय शिकविणार ? सुधारणेचे मूळ वंशपरंपरा रुतले गेले पाहिजे. तुमच्यात या गुणांचा जर अभाव असेल तर आटोकाट प्रयत्नाने ते मिळवा.

तुमच्यापैकी बहुतेक अविवाहित असतील. कित्येकांची लग्नेही झालेली असतील. पण लग्नानंतर तुम्ही काय करणार आहात ? या बाबतीत तुम्हावर फार मोठी जबाबदारी आहे. मी तुमच्या वडिलांचे उदाहरण न घेता माझ्याच वडिलांचे उदाहरण घेतो. त्यांना एकंदर चौदा मुले झाली आणि त्यातले मी चौदावे रत्न. परंतु मी एलफिन्स्टन कॉलेजमध्ये असताना माझी काय दशा होती ? माझ्या पायात वहाणा नव्हत्या ! अंगात माजरपाटाचे शर्ट आणि वडिलांचे फाटके कोट !! तुम्ही एलफिन्स्टन कॉलेजात गेलात म्हणजे तुम्हाला तेथे मुल्लर साहेबांची तसबीर दिसेल. त्यांनी मला शेवटच्या दोन वर्षात शर्ट्स् पुरविली. मी विचार करीत असे, माझ्या वडिलांना चौदा ऐवजी चारच मुले असती तर माझी किती चंगळ झाली असती. माझ्या या दुःखाला माझे वडिलच कारणीभूत होते. एकदा मी कॉलेजमध्ये जात असता रेल्वेचा पास घरी विसरलो आणि त्याच दिवशी पासाची तपासणी होती. तिकीट घेणाऱ्या मास्तरने मला अडविले. जवळ तर दिडकी नव्हती. चार वाजेपर्यंत चर्चगेटच्या स्टेशनावर बसून राहिलो होतो. नंतर कैकिणी नावाचा माझ्या वर्गातील विद्यार्थी तेथे आला. त्याने विचारले ; ' काय रे, येथे का बसलाय ? ' मी त्याला सर्व हकीगत सांगितली. त्याने चार आणे भरून माझी सुटका केली व त्याच पैशाने तिकीट काढून त्याने मला घरी पाठवून दिले. तेव्हा या बाबतीत मी माझ्या वडिलांना दोष देतो. कारण त्यांनी आपली जबाबदारी ओळखली नाही. वडिलांचे चुकत असता त्यांना हे सांगणे गैर आहे, असे मला वाटत नाही. तुमच्यावर आता ही जबाबदारी आहे. त्याचप्रमाणे स्त्रियांवर पण आहे. मी बोलतो ते केवळ पुरूषांकरिताच नव्हे. स्त्रियांनीसुद्धा याची जबाबदारी ओळखली पाहिजे. याचा तुम्ही विचार केला पाहिजे. तुम्ही नोकरीवर जाल, मला वाटते तुम्हापैकी बहुतेक कारकूनच होतील तर काही तरी ५०-६० रुपये पगार तुम्हास मिळेल आणि त्यात तुम्हाला चौदा पोरे झाली तर त्या पोरांचे काय होणार ? त्यांची जबाबदारी समाजावर टाकणार ? याचा तुम्ही चांगला विचार करा. तुम्ही संन्यास घ्यावयास तयार नसाल पण त्यातूनही तो कोणी घेतला तर फार चांगले ! (हंशा) हसू नका. ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. मला पाच मुले झाली. त्यापैकी चार मेली. याबद्दल आता मला वाईट वाटत नाही तर उलट आनंदच वाटतो. ही मुले जर जगली असती तर त्यांचे शिक्षण, खाणे, राहणे यांचा बोजा माझ्यावर पडला असता व ते मला फार त्रासाचे झाले असते. मला एकच मुलगा आहे. माझ्यावर त्याची फार जबाबदारी आहे. त्याच्या एकशतांश जरी जबाबदारी तुम्ही आपल्या मुलांबद्दल दाखविलीत तर फार उत्तम. ही समाजाच्या कल्याणाची गोष्ट आहे. तुम्हाला पाच सहा मुले झाली तर त्यांना शिक्षण कसे देणार, त्यांची इतर काळजी कशी घेणार ? मला वाटते ही चढती भाजणीच्या ऐवजी उतरती भाजणी आहे. तेव्हा स्त्री-पुरूषांचे पशुप्रमाणे जीवन घालविणे माणुसकीला सोडून आहे, या गोष्टीचा तुम्ही अवश्य विचार करा.

● ● ●

# १५०
# स्वातंत्र्य, माणुसकी, समान हक्क मिळतील तेच स्वराज्य

ता. ६ जानेवारी १९३९ रोजी महाड येथे सात हजार शेतकऱ्यांच्या पुढे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे निर्भिड व मननीय भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

प्रिय भगिनींनो व बंधुंनो,

मी नगर, खानदेश, निजामचे राज्य या बाजूला दौऱ्यावर गेलो होतो, नुकताच परत आलो. त्रास झाल्यामुळे चार दिवस विश्रांती घेण्याचा विचार केला होता. तरीसुद्धा माझ्यावर या सभेत बोलण्याची पाळी आलीच. मी काही फार वेळ बोलणार नाही, १०-१२ मिनिटे बोलेन. आज मी फक्त तीन मुद्यांवर बोलणार आहे. सात प्रांतात काँग्रेसचे राज्य आहे. बंगाल, पंजाब या प्रांतात इतर पक्षाला नेस्तनाबूद करून काँग्रेसचे राज्य स्थापण्याचा प्रयत्न चालू आहे. तीन-चतुर्थांश भागावर काँग्रेसचे राज्य आहे.

माझे एक मित्र थट्टेने म्हणाले, '' काँग्रेसने अधिकारसूत्रे घेऊन आज १८ महिने झाले. एखादी बाई १८ महिन्यात दोन वेळा बाळंत झाली असती. पण ही बाई अजून गरोदरही राहिली नाही '' हे अगदी बरोबर आहे. या काळातील जनतेच्या सुखासमाधानाच्या गोष्टींची कल्पना देणे गैर होणार नाही.

पहिला महत्त्वाचा प्रश्न हिंदू-मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न आहे. स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभेत हा प्रश्न निघत नाही. आपण फक्त पोटाचा प्रश्न विचारात घेतो. आधी पोटोबा मग विठोबा, असे आपण वागतो. परंतु इतर प्रश्नांचा उद्‌भव झाला की पोटाचा प्रश्नही बाजूला पडतो.

या देशात मुसलमान ८-९ कोटी आहेत. हे लोक मजुरी करणारे किंवा गुलाम नव्हेत. महाराष्ट्र सोडून हिंदुस्थानाच्या इतर भागावर औरंगजेब, अकबर वगैरे मुसलमान राजांची सत्ता होती. हिंदुस्थानच्या तीन-चतुर्थांश भागावर मुसलमानांची सत्ता होती. मुसलमानांची महत्त्वाकांक्षा राज्यसत्ता हस्तगत करण्याची आहे. हिंदुस्थानातील ९ कोटी मुसलमानांशीच आपला संबंध आहे, असे कोणी समजू नये. हिंदुस्थानाबाहेरील अफगाणिस्तान, इराक, पर्शिया,

---

जनता : २१ जानेवारी १९३९.

तुर्कस्तान, इजिप्त येथे मुसलमानी सत्ता असून वेळ प्रसंगी ती त्यांच्या पाठीशी उभी आहे. मुसलमान म्हणतात; ' पुन्हा एकदा पानिपत होऊ द्या ' तेव्हा हिंदू-मुसलमानात एकी होणे जरुर आहे. राजसत्ता ज्या काँग्रेसच्या हाती आहे तिच्यावर ही सारी जबाबदारी आहे, आमच्यावर नाही ! हिंदू-मुसलमान लढ्याबद्दल काँग्रेसने काय केले ? जाणूनबुजून काही केले नाही !

गेल्या पाच-सात दिवसात मुस्लिम लीगची सभा पाटणा येथे झाली. त्यातील भाषणांचा ध्वनी लक्षात घ्या. मुसलमान समाजाची घोषणा हिंदूंविरूद्ध सत्याग्रह करण्याची आहे ! पण हा मुसलमानांचा सत्याग्रह म्हणजे गांधींचा सत्याग्रह नव्हे ! ' हिंदुस्थान तोडून द्या ' हे मुसलमान बहुजन समाजाचे मागणे नाही. मुसलमानांचा दिवाण लीगचा असावा, असे त्यांचे म्हणणे आहे. काँग्रेसने काही प्रांतात मुसलमान दिवाण घेतले आहेत. मग मुंबईतच लीगचा मनुष्य का घेऊ नये ? नुरी ऐवजी देहलवीला का घेऊ नये ? आज ना. नुरी ५०० रुपये घेत आहेत ते सर देहलवी यांनी घेतले असते, यात काय बिघडले असते समजत नाही ! पुन्हा पानिपत करावयाचे आहे काय ?

दुसरा प्रश्न साम्राज्यशाहीस हाकून लावणे हा आहे. इंग्रजांचे साम्राज्य गेले तरी येथील गुजर, सावकार, खोत, गिरणीमालक जाणार नाहीत. ते तुमच्या रक्ताचे शोषण करणारच ! साम्राज्यशाही जावी अशी माझीही इच्छा आहे पण काँग्रेस काय करते ? मध्यवर्ती सरकार (फेडरेशन) अत्यंत किळसवाणे आहे. त्यात लुटारू, राजेरजवाड्यांच्या हातात आमची मानगूट देण्याचा ब्रिटीश सरकारचा प्रयत्न आहे. काँग्रेसच्या हाती सत्ता आहे. त्यामुळे हे नवे संकट टळू शकेल. पण काँग्रेस काय उपाययोजना करू इच्छिते ? इंग्रज सरकार हे फेडरेशन आमच्या माथी मारणार ! याला काँग्रेस पुढारी काय उपाय करणार ?

साम्राज्याचे कट्टे शत्रू काँग्रेसवाले फेडरेशनच्या विरूद्ध आहेत, अशी माझी मुळीच खात्री होत नाही ! एक मोठे काँग्रेस भक्त हवा खाण्याकरिता विलायतेस गेले होते. त्यांना कसला रोग झाला होता, मला माहित नाही ! या काँग्रेसच्या राजकारणातील बड्या झब्बूने इंग्रजाला आश्वासन दिले की, आम्ही फेडरेशनविरूद्ध कितीही ओरडलो, तरी ते आम्ही स्वीकारू. दे. भ. सुभाषबाबूंची फेडरेशनविरूद्ध घोषणा काँग्रेसपक्षाच्या मुखपत्रातून-गायमुखातून म्हणा वाटले तर– जाहीर झाली होती. दुसऱ्या बाजूला सत्यमूर्ति यांनी पत्रक जाहीर केले की, ' सुभाषबाबूंना

या विषयावर बोलण्याचा अधिकार नाही. सत्यमूर्तिंच्या या लिहिण्याचा काँग्रेस पुढाऱ्यांपैकी कोणी निषेध केला नाही ! यावरून कोठेतरी पाणी मुरते आहे, असे दिसते ! व्हाईसरॉयबरोबर एका गृहस्थाचा संवाद झाला तो असा :–

गृहस्थ : काँग्रेस फेडरेशन स्वीकारणार नाही.

व्हाईसरॉय : मग काय करणार ? तुम्ही कशावरून म्हणता ?

गृहस्थ : सुभाषबाबूंच्या धोरणावरून.

व्हाईसरॉय : सुभाषबाबूंची घोषणा आम्ही ऐकली आहे. पण तुमचा गांधी कुठे काय बोलतोय ? गांधींनी का मौन धरले आहे ?

महात्मा गांधींच्या या मुग्धतेत काहीतरी पाणी मुरत आहे. गांधी हिंदुस्थानला साम्राज्यशाहीचे गुलाम बनविणार आहे !

तिसरा प्रश्न आम्हाला स्वराज्य पाहिजे ते आमच्या स्वातंत्र्यासाठी पाहिजे ! सुखासाठी पाहिजे ! आम्हाला देशात पोटभर अन्न मिळत नाही, घर नाही, सुखसंपत्ती नाही ! ज्या राज्यात स्वातंत्र्य, माणुसकी वगैरे समान हक्क आम्हास मिळतील तेच स्वराज्य !

आमच्याकरिता काँग्रेसने काय केले ? निवडणुकीपूर्वी शिक्षण देऊ, शेतसारा कमी करू वगैरे आश्वासने दिली होती. पण त्याचे आता काय ? मुंबई इलाख्यात असेंब्लीत काँग्रेसचे बहुमत आहे. मग हाती सत्ता नाही, असे कसे म्हणता येईल ? पण काँग्रेसला तुमच्याकरिता काहीच करावयाचे नाही ! काँग्रेसचे स्वातंत्र्य कोठे आहे ? तुमच्या महाडात नुकतेच मुख्यप्रधान ना. बाळासाहेब खेर येऊन गेले. पण त्यांनी तुमच्याकरिता काही सांगितले का ? नाही ! कसे सांगणार ? त्यांना गांधींची आणि वल्लभभाईंची भीती वाटते. सध्या आपल्यावर गुजरात्यांचे राज्य आहे. वरिष्ठ सरकारकडून आलेल्या तीन कोटी जादा रकमेपैकी १ कोटी ९३ लक्ष म्हणजे जवळजवळ २ कोटी रुपये गुजरात प्रांतावर खर्ची पडले. मुंबई इलाख्याच्या तीन भागात महाराष्ट्र दरिद्री आहे. तेव्हा हे तीन कोटी रुपये गरीब महाराष्ट्राकरता खर्च व्हावयास पाहिजे होते. परंतु सर्वात श्रीमंत अशा गुजरात प्रांतावरच ते खर्च करण्यात आले ! रत्नागिरी, नगर वगैरे दुष्काळी जिल्ह्यांना त्याचा फार उपयोग झाला असता ! पण सध्या आपल्यावर गुजरात राज्य करीत आहे ! तीन गुजराती दिवाण दळतात आणि बाकीचे पीठ भरून भाकऱ्या भाजून गुजरातेत पाठवितात ! हे सारे दिवाण वल्लभभाईंच्या दारची कुत्री आहेत !

ना. खेरांना गुजरातेत एका समारंभाला बोलावून त्यांचा वल्लभभाईंनी भयंकर अपमान केला ! '' मुख्यप्रधान म्हणून आम्ही तुम्हाला बोलाविले नाही तर तुम्ही गांधींचे भक्त आहात म्हणून बोलाविले, नाही तर हाकलून लावले असते ! '' असे बोलून वल्लभभाईने एका महाराष्ट्रीयाचा भयंकर अपमान केला आहे ! आमच्या नामदार खेरांच्या या अपमानाचा सूड कोण घेणार ? त्याचा सूड मी घेईन. माझ्याविषयी असे उद्‌गार काढू दे की, त्या वल्लभभाईला मी जोड्यांनी मारीन ! त्यांच्या सभेत मी जातो. ताकत असेल तर त्यांनी माझ्या सभेत यावे.

एक-दोन महिन्यात खोती बील चर्चेला निघेल, पण ते बील पास होणार नाही. काँग्रेसचे राज्य उलथून पाडल्याशिवाय हे होणार नाही. स्वतंत्र मजूर पक्षाचे, शेतकरी कामकरी पक्षाचे राज्य झाल्याशिवाय हे होणार नाही. खोत बेकायदेशीरपणे कुळांना लुटतात, त्यांचा तुम्ही प्रतिकार केला पाहिजे. कबुलायतीचा फॉर्म स्वतंत्र मजूर पक्ष तयार करणार आहे, तो तयार झाल्यावर त्याप्रमाणे तुम्ही वागले पाहिजे, अन्यायाचा प्रतिकार केला पाहिजे. सर्व अधिकारीवर्ग खोतांच्या जातीचा आहे. त्यामुळे त्यांच्याकडून पक्षपात होत असता तुम्ही तुरुंगाची भीती बाळगू नका. तेथे घरच्यापेक्षा वाईट काहीच नाही. आम्ही तुमच्याबरोबर तुरुंगात येऊ पण तुमचा तुरुंगवास म्हणजे गांधींचा तुरुंगवास नव्हे. तो तुरुंगवास कसला ! तुरुंगात रोज त्यांना अत्यंत प्रिय असे शेळीचे दूध, फळे, अंजीर, मोसंबी वगैरेच्या करंड्याच्या करंड्या त्यांच्याकरिंता तयार असत ! तुमचा तुरुंगवास यापेक्षा निराळा आहे.

डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड निवडणुका लढवा व आपली माणसे निवडून आणा. सत्तेच्या सर्व जागा काबीज करा.



# १५१

# समता सैनिक दलाचा सैनिक निर्भय योद्धाच म्हटला पाहिजे

स्वतंत्र मजूर पक्षाच्या व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अस्पृश्यांच्या सर्वांगीण उन्नतीच्या कार्याला, ज्या सैनिकांनी आजन्म वाहून घेतले आहे, त्या मुंबईतील समता सैनिक दलाची वार्षिक परेड व पाहाणी डॉ. बाबासाहेब यांच्या नेतृत्वाखाली, गेल्या रविवारी दिनांक ८ जानेवारी १९३९ ला सकाळी परळ येथील कामगार मैदानावर झाली. मुंबईमधील निरनिराळया मोहल्ल्यातून, पहाड्यातून आणि वार्डातून समता सैनिक दलाची पथके आपल्या कॅप्टनसह सकाळी ६-३० वाजल्यापासून कामगार मैदानावर जमत होती. दलाचे कर्तृत्ववान जी. ओ. सी. श्री. रामजी धयाळकर यांनी सर्व दलांना शिस्तीने मैदानावर उभे करुन परेडची प्राथमिक तालीम घेतली. बँडच्या सुस्वर वाद्यात हा परेडचा कार्यक्रम उत्तम झाला.

बरोबर १० वाजता डॉ. आंबेडकर आपल्या सहकाऱ्यांसह मैदानावर येताच सैनिकांशिवाय इतर मंडळींनी त्यांचे टाळयांच्या गजरात जंगी स्वागत केले. समता सैनिकांनी मिलीटरी थाटात त्यांना सलामी दिली आणि नंतर बँडच्या मधूर वादनाने त्यांचे स्वागत करण्यात आले. हा प्राथमिक स्वागत समारंभ संपल्यावर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, स्वतंत्र मजूर पक्षाचे सेक्रेटरी डी. व्ही. प्रधान व दलाचे जी. ओ. सी. धयाळकर यांनी समता सैनिक दलाची पाहाणी केली. यावेळचा एकंदर देखावा लष्करी थाटाचा आणि अंगात एकप्रकारची वीरश्री उत्पन्न करणारा असा होता. प्रत्येक सैनिकाची टापटीप, नीटनेटके कपडे, शिस्त वगैरे वाखाणण्यासारखी होती.

दलाची पाहाणी झाल्यावर वीर फोटो आर्ट स्टुडिओच्याद्वारे दलाचे व डॉ. आंबेडकरांसह पुढारी मंडळीचे निरनिराळे फोटो घेण्यात आले. या जनरल परेडकरिता निदान २,५०० समता सैनिक व इतर जनता २०,००० पर्यंत जमली होती. हा सर्व कार्यक्रम आटोपल्यानंतर सर्व सैनिकांना उद्देशून डॉ. आंबेडकरांना भाषण करण्याची विनंती स्वतंत्र मजूर पक्षाचे सेक्रेटरी

---

जनता : १४ जानेवारी १९३९.

श्री. डी. व्ही. प्रधान यांनी करताना सांगितले की, " आज दलामध्ये युनिफार्म घातलेले फक्त २,५०० सैनिक आहेत. युनिफार्मशिवाय तितकेच इतर सैनिक आहेत. आजच्या परिस्थितीत पाच हजार समता सैनिक दलांची संख्या मुंबईत आहे. माझी खात्री आहे की, ही संख्या दुप्पटीने वाढून ती १०,००० पर्यंत पुढील वर्षी झालीच पाहिजे. तसेच समता सैनिक दलाच्या शाखा फक्त मुंबईतच नसून त्यांचा प्रसार सी. पी. मध्यप्रांतादी निरनिराळ्या प्रांतात सुरु आहे. लवकरच अखिल हिंदुस्थानामध्ये स्वतंत्र मजूर पक्षाच्या झेंड्याखाली ५०,००० सैनिक तयार झाल्याचे दृश्य दिसेल. प्रत्येक सैनिकानी स्वतंत्र मजूर पक्षाच्या कार्याकरिता यापुढे विशेष जातीने झटले पाहिजे." श्री. प्रधान यांच्या प्रास्ताविक भाषणानंतर डॉक्टरसाहेब भाषण करावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

समता सैनिक दलाच्या आजच्या वार्षिक जनरल परेडच्या निमित्ताने मुंबईतील सर्व सैनिक इतक्या जमावाने जमल्याबद्दल मला आनंद होत आहे. तसेच आज येथे त्यांनी एकत्र येऊन आपल्या संघटनेचे, शिस्तीचे व स्वार्थत्यागाचे दाखविलेले प्रदर्शन बहुजन समाजाला आदर्श म्हणून गणले जाईल. स्वतःच्या पैशाने प्रत्येकाने आपला युनिफॉर्म करून आपल्या पक्षाच्या कार्याविषयी दाखविलेली कळकळ खरोखरच अभिनंदनीय आहे. हे दल मी व माझ्या सहकारी मित्रमंडळींच्या बडेजावाकरिता आहे, असा काहींचा समज आहे, परंतु या दलाची ज्याला पूर्वपिठीका ठाऊक आहे त्याला या दलाची स्थापना करण्यात किती उदात्त आणि उज्ज्वल ध्येय पुढे ठेविलेले आहे, याची खात्रीने कल्पना येईल.

१९२६-२७ च्या सुमारास या दलाची स्थापना करण्याची मुहूर्तमेढ महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहाने करण्यात आली. त्यावेळी महाडच्या सत्याग्रहाचे कार्य निर्विघ्नपणे आणि यशस्वीरीतीने पार पाडण्यासाठी अशा संघटित दलाची फारच आवश्यकता होती. आम्ही स्थापन केलेल्या या समता सैनिक दलाची पूर्वपिठीका पाहता व एकंदर परिस्थितीचा विचार करता दलाची स्थापना मी माझ्या नावाकरिता, जयजयकाराकरिता किंवा बुवाबाजीच्या स्वरूपाच्या कार्याकरिता केलेली नाही. याला सरळ व रोखठोक उत्तर महाड तलावाच्या लढ्याने सहज मिळण्यासारखे आहे. हिंदुस्थानात जे अनेक धर्मीय समाज आहेत त्यात हिंदू समाजात अस्पृश्यांचा समावेश होत असल्यामुळे आणि या हिंदू समाजातील स्पृश्य बांधवांकडून अस्पृश्य मानलेल्या समाज बांधवांवर, होणाऱ्या अन्याय, जोर-जुलूम, विषमतेची शिकवण व वागणूक वगैरे अनिष्ट आणि

घातुक प्रकारांना आळा बसविण्याकरिता या दलाची प्रामुख्याने स्थापना करण्यात आली आहे. ज्या समाजात माणुसकीने जगता येत नाही, नैसर्गिक हक्कांचा जिथे समतेने उपभोग घेता येत नाही, ज्या धर्मावर विषमतेचा कीट चढला आहे तो धर्म झुगारून देऊन खरी माणुसकी जाणणारा धर्म निर्माण करण्याकरिता जे कार्य करावे लागत आहे, त्या पवित्र आणि उज्ज्वल कार्यासाठी या दलाची स्थापना झालेली आहे. या कार्याची मुहूर्तमेढ महाडच्या चवदार तळयाच्या सत्याग्रहाने करून हा सत्याग्रहाचा लढा विजयी केलेला आहे. अशाच तऱ्हेने ज्या ज्या ठिकाणी सार्वत्रिक विहिरी आहेत, तळी आहेत, नळ आहेत तेथे असेच समान हक्काचे लढे लढवून आपले कार्य करावयाचे आहे. महाड तळयाचा सत्याग्रह आपणास पिण्यास पाणी मुळीच मिळत नव्हते या भावनेने केला नव्हता. या तळयाच्या पाण्यावाचून आपले अडले नव्हते किंवा आपण तडफडून मरत नव्हतो. हा लढा पिण्याच्या पाण्यासाठी नव्हता; तर तेथील पाणी सर्व जातींच्या, धर्मांच्या आणि पंथांच्या लोकांना समानतेने पिण्यास मिळावे याच हक्कासाठी हा लढा लढविला गेला. तीच गोष्ट नाशिकच्या काळाराम मंदीर प्रवेशाच्या सत्याग्रहाची. केवळ देवाच्या दर्शनासाठी आम्ही भुकेलेले नव्हतो. गेल्या दोन हजार वर्षात हिंदूंच्या देवांचे अस्पृश्य बांधवांना दर्शन झाले नव्हते. म्हणून अस्पृश्य समाजाचे अडले नव्हते. नाशिकच्या मंदिर प्रवेशाचा लढा हा केवळ आपल्या हिंदू समाजातील समानतेच्या हक्कांचे संरक्षण करण्याकरिता होता. त्या सत्याग्रहाच्या लढ्यात लोकांना ज्या पीडा झाल्या होत्या, जे अनेक दुखःमय त्रास सोसावे लागले ते केवळ आपण माणसे आहोत आणि इतर माणसांप्रमाणे आपणालाही मंदिरात प्रवेश करण्याचा हक्क आहे हे प्रस्थापित करण्याकरताच सोसले होते. आपण माणसासारखी माणसे असून आमच्या या मंदिरातील प्रवेशामुळे ती हिंदू देवालये अपवित्र कशी होतात हेच कळत नाही आणि हा स्पृश्य हिंदुंनी आपणावर लादलेला शिवाशिवीचा घाणेरडा कलंक धुवून टाकण्याकरिता, आम्ही प्रत्यक्ष माणसे असून कोणत्याही दृष्टीने अपवित्र नाही हे दाखविण्याकरिताच हा काळाराम मंदीर प्रवेशाचा लढा लढविणे भाग पडले होते.

वरील प्रकारचे मोठे उज्ज्वल तत्त्वांचे लढे लढविण्याकरिताच आपल्या समता सैनिक दलाची स्थापना करण्यात आली आणि हीच खरी आपल्या दलाची पूर्वपिठीका आहे. यावरून दिसून येते की या दलाची उभारणी व्यक्तिवाचक नाही. या देशातील हिंदी समाजात खरी समता प्रस्थापित करण्याकरिताच हे समता सैनिक दल स्थापन झाले आहे.

समता सैनिक दलाचा सैनिक म्हणजे समाजसेवेसाठी तळहातावर शीर घेऊन लढण्यासाठी सज्ज झालेला निर्भय योद्धाच म्हटला पाहिजे. माणुसकीसाठी समतेचे उज्ज्वल तत्त्व अंतःकरणात तेवत ठेवून आपल्या कार्याची त्याने पूर्तता केली पाहिजे, यासाठी सर्वांनी शपथा घेऊन कोणत्याही प्रकारचा जातीभेद मानणार नाही, महार, मांग, भंगी वगैरे उच्चनीचतेचे भेद मानणार नाही, मी माणूस आहे, सर्वांना माणुसकीने वागवीन आणि विषमतेचे जहरी बीज समाजातून नाहीसे करीन वगैरे प्रकारचा बाणा शपथपूर्वक बाळगला पाहिजे. असा बाणा बाळगणारा हाच खरा समता सैनिक दलाचा सैनिक ठरला पाहिजे. या एकंदर परिस्थितीचा विचार करता आपले दल स्वातंत्र्याच्या युद्धात मागासलेल्या वर्गाच्या आघाडीची एक लढवय्यी तुकडी आहे, हे पूर्णपणे लक्षात ठेवा. तुम्ही आपल्या प्रत्येक कृतीने देशाचे आदर्श सैनिक बनले पाहिजे. तुमच्याकडे पाहताच सैनिक दलाचा एक उत्कृष्ट नमुना या दृष्टीने तुमची जगात कीर्ती गाजली पाहिजे. सद्‌गुण, शिस्त आणि संघटना यांच्यामुळे आपले दल पोलादी बनले पाहिजे. शुद्ध वर्तन आणि समतेचा भाव मनात धरल्यावर, आपल्यात जी एक म्हण आहे की ' तव्याचा जाय बुरसा मग तो दिसे आरसा ' तशी परिस्थिती उत्पन्न झाली पाहिजे. अनेक प्रकारच्या परिस्थितीमुळे तव्यातील बुरसा वाढला आहे. त्यामुळे तवा काळाकुट्ट आणि घाणेरडा दिसत आहे. परंतु तोच योग्य रीतीने मेहनत घेऊन साफसूफ केला, त्याच्यावरील सर्व घाण कायमची घालविण्याचा प्रयत्न केला तर खात्रीने त्यात यश मिळून तो शेवटी आरशासारखा स्वच्छ होतो. तसेच परिस्थितीने आपल्या समाजात काही अनिष्ट चालीरिती रुढ झाल्या असल्यास, दारूचे व्यसन लागले असल्यास, पान तंबाखू खाण्यावारी आपण वेळेचा, शरीराचा दुरुपयोग करीत असल्यास, आपण योग्य वेळी सावध होऊन निर्व्यसनी बनले पाहिजे. अशाप्रकारे सर्व प्रकारच्या अनिष्ट प्रसंगांवर, चालीरीतींवर नियंत्रण ठेवल्यास आपल्यावर कोणीही कसल्याही प्रकारचे आरोप करणार नाही. कोणत्याही प्रकारची पीडा देण्याचे धैर्य कुणी करणार नाही. अशा उज्ज्वल ध्येयाने आपण कार्य केल्यावर कुणी आपणावर निष्कारण टीका केली तर हाथी चलता है और कुत्ता भोंकता है याप्रमाणे ठरेल. प्रामाणिकपणे कार्य करीत राहिल्यावर जाणूनबुजून खोडसाळपणाने टीका करणारांची पर्वा बाळगण्यात मुळीच हशील नाही.

अशा रीतीने समता सैनिक दलाचे कार्य दिवसेंदिवस यशस्वी होत असलेले पाहून मला धन्यता वाटते. परंतु आपल्या दलाचे हे लोकोपयुक्त कार्य पाहून आपल्या विरोधकांना व टीकाकारांना पोटदुखी उत्पन्न झाली आहे. हल्ली मुंबई येथे कॉंग्रेस सरकारकडून ता. ७ नोव्हेंबर १९३८ रोजी झालेल्या एक दिवसाच्या सार्वत्रिक संपात पोलीसांकडून झालेल्या गोळीबारामुळे झालेल्या अत्याचारासंबंधी चौकशीचे काम सुरू आहे. ही चौकशी सुरू असता तिच्या कामकाजावर टीका

करण्याचा माझा मुळीच उद्देश नाही. परंतु ज्या सैनिकांनी आजपर्यंत समाजसेवेचे उज्ज्वल कार्य केले आहे त्याबद्दल प्रमुख पुढाऱ्यांपैकी मुंबईचे मुख्य प्रधान श्री. बाळासाहेब खेर व काँग्रेसचे एक बडे पुढारी श्री. वल्लभभाई पटेल यांनी प्रसंशोद्‌गार काढलेले आहेत.

मुंबई प्रधान मंडळाच्या पगारासंबंधी मी जे भाषण केले होते त्याला उत्तर देताना ना. खेर म्हणाले होते की, स्वतंत्र मजूर पक्षाच्या कार्याला मदत करणाऱ्या समता सैनिक दलाच्या स्वयंसेवकांनी स्वार्थत्यागाने, स्वाभिमानाने आणि शिस्तीच्या बळावर बिना मोबदला केलेले कार्य मला ठाऊक आहे आणि हे स्वयंसेवक इतक्या उज्ज्वल प्रकारचा स्वार्थत्याग जर करू शकतात तर आम्ही असेंब्लीच्या मंत्र्यांनी केवळ स्वार्थत्यागाने दरमहा ५०० रुपये पगार पत्करण्यास मुळीच हरकत नाही. तीच गोष्ट श्री. वल्लभभाई पटेल यांच्या उद्‌गारांवरून सिद्ध होईल.

गेल्या प्रांतिक असेंब्लीच्या निवडणुकी झाल्यावर पुण्यात शनिवार वाड्यासमोर स्वयंसेवकांच्या कार्यासंबंधी भाषण करताना श्री. वल्लभभाई म्हणाले की, '' संघटना, शिस्त, कार्याची कळकळ आणि ते यशस्वी करून दाखविण्याची धमक या दृष्टीने विचार करता स्वतंत्र मजूर पक्षाचेच स्वयंसेवक काँग्रेसच्या स्वयंसेवकांपेक्षा सरस ठरतील आणि हे त्यांच्या अंगी असलेले विशेष गुण इतर स्वयंसेवकांनी अवश्य आत्मसात करण्याचा प्रयत्न केला पाहिजे '' वगैरे. आपल्या समता सैनिक दलाच्या सैनिकात शेकडा ९० प्रमाणात महार तरुणांचा भरणा आहे. या देशात ब्रिटिश सरकारचा अंमल सुरू झाल्यापासूनचा इतिहास अवलोकन केल्यास रयतेचा पैसा तालुक्याच्या तिजोरीत नेऊन भरणारे महार लोक आहेत. गेल्या १५०–२०० वर्षात या बाबतीत एकाही महाराने अप्रामाणिकपणा दाखविल्याचा पुरावा नाही. हजारो रुपये रात्रीबेरात्री व उन्हातान्हातून प्रवास करून हा रयतेचा पैसा महारांनी सरकारी तिजोरीत भरून आपला प्रामाणिकपणा जगाच्या निदर्शनास आणला आहे. अशा एकंदर सर्व गोष्टींचा विचार केल्यावर मुंबई येथे कामगार संप गोळीबार चौकशी कमिटीपुढे महारांवर जे अप्रामाणिकपणाचे व गैरशिस्तीचे आरोप करण्यात येत आहेत ते कितपत खरे असतील याची शहानिशा करण्याची वेळ आल्याशिवाय राहाणार नाही. गरिबीने गांजलेल्या या समाजातील माणूस हाती हजारो रुपये असताना कोणत्याही प्रकारची अफरातफर करू शकत नाही, त्या या महार समाजाचे चारित्र्य किती उज्ज्वल असेल याची मीच स्तुती करायला पाहिजे असे नाही. जनता या सर्व गोष्टींचा विचार करण्यास समर्थ आहे. तशात समता सैनिक दलात काम करणारे काही स्वयंसेवक मिलीटरी खात्यात नोकरी केलेले आहेत. त्यांना कायदा, शिस्त चांगली कळते. अशावेळी दलाच्या स्वयंसेवकांवर आरोप करणे मोठ्या धाडसाचे किंवा खोडसाळपणाचे कृत्यच समजले पाहिजे.

शेवटी मला प्रत्येक सैनिकाला सांगायचे आहे की सैनिक हा शब्द मोठा महत्त्वाचा आहे. आपण खात्रीने बाजारबुणगे नाहीत, हे सिद्ध करणारा हा शब्द आहे. आपले कार्य करीत असताना तुम्ही सर्वजण प्रत्यक्ष फलटणीतच आहात, ही भावना मनात बाळगली पाहिजे. सभेच्यावेळी जो अफाट जनसमुदाय जमतो त्याचा योग्य बंदोबस्त ठेवताना आपण सैनिक आहोत ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. जनसमुदाय बाजारबुणग्याप्रमाणे वागेल, त्याच्या कृतीत आणि तुमच्या कार्यात जमीन अस्मानाचा फरक आहे. यासाठी सैनिक म्हटला म्हणजे तो शिस्तीचा शिलेदार. एखाद्या अधिकाऱ्याचा हुकूम चुकीचा वाटून त्याच्याविरुद्ध कुरकुर किंवा प्रतिकार करून चालणार नाही. केवळ शिस्तीकरता वेळ प्रसंगी सर्व प्रकारच्या प्रसंगांना धैर्याने तोंड देण्याचा आपला संकल्प यापुढेही उज्ज्वल समाजसेवेने पुरा करा, एवढेच तुम्हाला सांगावयाचे आहे.



# १५२

# संस्थानांची पुनर्घटना करून हिंदुस्थानला व्यापून टाकील असे नागरिकत्व निर्माण करणे गरजेचे

ता. ३० जानेवारी १९३९ रोजी पुणे येथे गोखले राजकारण-अर्थशास्त्र मंदिराचा संस्थापक दिन साजरा झाला. याप्रसंगी स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना खास आमंत्रण देऊन ' हिंदी फेडरेशन ' या विषयावर भाषण करण्याविषयी बोलाविले होते. या आमंत्रणानुसार त्यांनी पुणे येथील गोखले स्मारक मंदिरात भाषण केले. हे भाषण इंग्रजी मध्ये झाले. भाषण ऐकण्यासाठी पुणेकरांची अलोट गर्दी गोखले स्मारक मंदिराकडे लोटली होती. यावेळी श्री. नारायणराव म. जोशी, एम्. ए; एम्. एल्. ए. यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले होते.

आचार्य धनंजयराव गाडगीळ यांनी डॉ. आंबेडकरांना बोलावयास विनंती करताच टाळ्यांचा कडकडाट झाला. यावेळी लाऊडस्पीकरची योजना केल्यामुळे त्यांचे भाषण सर्वांना ऐकावयास मिळाले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपले भाषण लिहून आणले होते परंतु ते सर्वच वाचून दाखवणे अशक्य असल्यामुळे त्यातील मुख्य मुद्दे वाचून बाकीचे भाषण सारांश रुपाने निवेदन केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

सभ्य स्त्री-पुरुषहो,

आजपर्यंत विद्यार्थी वर्गाकडून मला आलेली व्याख्यानांची आमंत्रणे अनेकदा नाकारावी लागलेली आहेत. अशास्थितीत या संस्थेच्या निमंत्रणाचा स्वीकार मी केला, ही गोष्ट एकप्रकारच्या विषमतामूलक भेदाभेदांची निदर्शक आहे, असे वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुस्थिती तशी नाही. वकील आणि सार्वजनिक कार्यकर्ता या नात्याने मला माझी कामे सांभाळून अशा निमंत्रणांचा स्वीकार करणे कठीण जाते. मी राजकारणी आहे, नुसता अध्यापक नाही. अध्यापक हा एकप्रकारे विद्यार्थी असतो. राजकारणी लोक नुसते चळवळेच असतात.

जनता : ४ फेब्रुवारी १९३९.

मी चळवळयाही आहे आणि विद्यार्थीही आहे. शिक्षक हा वृत्तपत्रासारखा असतो आणि राजकीय पुढारी हा मतपत्रासारखा असतो. मला एकप्रकारच्या मतप्रचाराची ही संधी मिळाली आणि तीही मला आवडणाऱ्या विषयावर बोलण्याची संधी मिळाली म्हणून या विषयावर बोलण्याच्या निमंत्रणाचा स्वीकार मी आनंदाने केला.

१९३५ ची जी संयुक्त राज्यघटना हिंदुस्थानावर लादली जाणार आहे, तिचे स्वरुप फार विचित्र आहे. हे हिंदी फेडरेशन राक्षसी स्वरुपाचे होणार आहे. अमेरिकेतील संयुक्त संस्थाने किंवा जर्मनी अथवा स्वित्झर्लंड अगर कॅनडा किंवा ऑस्ट्रेलिया यापैकी कोणत्याही राष्ट्रातील फेडरेशनशी हिंदुस्थानच्या संयुक्त संघटनेची तुलना केली तर असे दिसून येईल की हिंदुस्थानातील ही घटना खरोखरच आसुरी स्वरुपाची आहे. कायदे मंडळाची घटना घ्या, मंत्रीमंडळाचे स्वरुप पाहा, अथवा वरिष्ठ न्यायासनाची अधिकार परीक्षा करा, काहीही पाहिले तरी हिंदुस्थानातील या संयुक्त संघटनेचे एकंदर स्वरुप विचित्र आणि अपूर्व असेच दिसेल. (१) संयुक्त संघटनेचे घटक, (२) घटकांचे मध्यवर्ती सरकारशी संबंध आणि (३) राष्ट्रातील बहुजन समाजाचा संयुक्त संघटनेतील नागरिकत्वाचा संबंध यापैकी कोणत्याही दृष्टीने या आगामी घटनेचे परीक्षण केले तर ती दोषपूर्ण आणि टाकाऊ आहे, असेच दिसून येईल. या संयुक्त संघटनेला संयुक्त संघटना किंवा फेडरेशन हे नाव देण्याच्या अगोदर विभक्त संस्थानांचा गट किंवा कॉन्फिडरेशन हे नाव दिले तर ते अधिक शोभेल. या संघटनेत संयुक्ततेपेक्षा विभक्ततेचेच गुण अधिक आहेत. सबंध राष्ट्रातील सर्व नागरिकांना सर्वसामान्य नागरिकत्वाचे हक्क या घटनेने दिलेले नाहीत. अशी ही मूलतःच सदोष असलेली घटना काही दुरुस्ती केल्यास स्वीकारार्ह होईल, असे म्हणणारा एक वर्ग आहे. त्या लोकांचे म्हणणे असे आहे की ही घटना स्वीकारल्यास हळूहळू (१) हिंदी संस्थानात लोकशाही राज्यपद्धती सुरू होईल, (२) हिंदुस्थानला जबाबदार राज्यपद्धतीचा लाभ होईल आणि (३) हिंदुस्थान देश एकछत्री होऊ शकेल, पण असे म्हणणाऱ्या लोकांनी १९३५ चा कायदाच नीट वाचलेला दिसत नाही. या कायद्याचे अगदी कलम ६ (१) हे वाचले आणि त्याच्या पहिल्या परिशिष्टावर नजर टाकली तर असे दिसून येते की या घटनेने सबंध हिंदुस्थान एकछत्री होऊ शकत नाही किंवा त्यात ऐक्यही निर्माण होऊ शकत नाही. हिंदुस्थानातील ६५० संस्थानांपैकी ४९८ संस्थानांना फेडरेशनमध्ये सामील होण्याची परवानगी देण्यात आलेली नाही.

या लहान संस्थानांना बाहेर वगळल्याने हिंदुस्थानचे ऐक्य घडून येते काय ? असा माझा प्रश्न आहे. या संस्थानांचे भवितव्य काय होणार, याचाही समाधानकारक खुलासा झाला पाहिजे. या नवीन घटनेने संस्थानातील एकतंत्री राज्यपद्धती नष्ट होईल, अशी अपेक्षा करणेही चुकीचे होईल. कारण या कायद्यानेच संस्थानिकांना असे स्पष्ट आश्वासन देण्यात आले आहे की त्यांच्या संस्थानातील अंतर्गत राज्यकारभारात कोणत्याही प्रकारची ढवळाढवळ करण्याचा अधिकार फेडरेशनला नाही. एवढ्यावरच न थांबता या घटनेने संस्थानातील एकतंत्री राज्यव्यवस्थेला खालसा मुलखातील लोकशाहीवर सासुरवास गाजविण्याची नवीनच सत्ता निर्माण करून दिलेली आहे. तसेच या घटनेने संपूर्ण जबाबदार राज्यपद्धतीचाही लाभ हिंदुस्थानास होणार नाही.

लष्करी संरक्षण आणि परराष्ट्र राजकारण ही खाती सरकारने आपल्याकडे राखून ठेविली आहेत. अर्थात मध्यवर्ती सरकारात द्विदल राज्यपद्धती सुरू करण्याची ही घटना आहे. पण द्विदल राज्यपद्धतीने जबाबदार राज्यपद्धतीची कशी गळचेपी केली जाते, याचा अनुभव आपणा हिंदी लोकास नुकताच आलेला असता मध्यवर्ती सरकारात तिला गोड फळे येतील, अशी अपेक्षा करणे हा शुद्ध वेडेपणाच नाही काय ? कोणत्याही दृष्टीने तुम्ही या घटनेची छाननी केलीत तरी तिच्यात खऱ्या लोकोत्तर दायित्वाचा पूर्ण अभाव असल्याचे तुम्हाला आढळून येईल. ही घटना काही दुरुस्त्या केल्यास स्वीकारावी, असे मि. सत्यमूर्ती म्हणतात. पण मी म्हणतो की श्री. सत्यमूर्तींनी सुचविलेल्या सर्व दुरुस्त्या त्या योजनेत घडून आल्या तरीही तिची त्याज्यता कमी होणार नाही. कारण या योजनेत मूलभूत दोष आहेत. या योजनेने हिंदुस्थानला स्वराज्याचे ध्येय गाठता येणार नाही.

हिंदुस्थानचे अंतिम राजकीय ध्येय कोणते ? कॉंग्रेस आता पूर्ण स्वातंत्र्यावरून डोमिनिअन स्टेट्सकडे पुच्छप्रगती करीत आहे. पण माझ्या मते या फेडरेशनच्या योजनेने डोमिनिअन स्टेट्सचा मार्गही बंद केला जाणार आहे आणि म्हणूनच या घटना कायद्यात डोमिनिअन स्टेट्स या शब्द योजनेवर पूर्ण बहिष्कार घालण्यात आल्याचे आपणास आढळून येईल. ही फेडरेशनची घटना अपरिवर्तनीय स्वरूपाची आहे. खुद्द ब्रिटिश पार्लमेंटला सुद्धा संस्थानिकांच्या संमतीविना ती बदलता येणार नाही किंवा ती बदलावयाची झाल्यास फेडरेशनच नष्ट करावे लागेल. जबाबदार राज्यपद्धती हा डोमिनिअन स्टेट्सच्या मार्गावरील पहिला टप्पा आहे पण या योजनेने राखीव खाती निर्माण करून हा रस्ता बंद केला आहे. यापुढेही लष्कर आणि परराष्ट्र राजकारण ही खाती सोपीव केली

जाणे शक्य दिसत नाही. संस्थानिक त्याला मान्यता देणार नाहीत. अशा स्थितीत हिंदी संस्थानांचे पुढे काय करावयाचे हाच मुख्य प्रश्न आहे. संस्थानांतील बेबंदशाहीचे एक कारण तेथील एकतंत्री राज्यकारभार हे तर आहेच पण पुष्कळ संस्थानांजवळ राज्यकारभार चालविण्यास आवश्यक असलेली साधनसामग्रीच उपलब्ध नाही. कोणतेही संस्थान सुव्यवस्थित चालावयाला त्याला विशिष्ट क्षेत्रफळ आणि काहीतरी किमान उत्पन्न आवश्यक असते. तसे ज्या संस्थानांच्या बाबतीत शक्य नसेल ती अजिबात रद्द करून त्यांची पुनर्रचना केली पाहिजे. राज्य कारभाराच्या दृष्टीनेच हे आवश्यक होणार आहे. ही संस्थाने एकदा फेडरेशनमध्ये समाविष्ट झाली आणि फेडरेशनची घटक बनली म्हणजे ती नष्ट करता येणार नाहीत किंवा त्यांची पुनर्घटना करणेही अशक्य होईल, कारण आतापर्यंत त्यांच्या सार्वभौमत्वाच्या रक्षणाची हमी घटनेतच दिलेली आहे.

यासाठी प्रथम संस्थानांची पुनर्घटना करून आणि सबंध हिंदुस्थानाला व्यापून टाकील असे नागरिकत्व निर्माण करून मग फेडरेशनचा विचार करावा, हे चांगले. संस्थाने बाजूला ठेवून ब्रिटिश प्रांताचे फेडरेशन करता येणे शक्य आहे. नुसत्या ब्रिटिश प्रांतांच्या संयुक्त संघटनेतही संपूर्ण जबाबदार राज्यपद्धती स्थापन करणे अशक्य नाही. १९३५ च्या कायद्याने दोन फेडरेशन्स निर्माण केलेली आहेत. एक ब्रिटिश प्रांतांचे आणि एक अखिल भारत वर्षाचे. यापैकी पहिल्याला मात्र जबाबदार राज्यपद्धतीची देणगी देण्यात आलेली नाही आणि दुसऱ्याला ती देण्यात येणार आहे. याचे खरे कारण हेच की ख़ालसा मुलखातील लोकशाहीच्या पायात शृंखला अडकविण्याला संस्थानिकांचा उपयोग व्हावा.

संस्थानिकांना फेडरेशन दोन कारणांकरिता पाहिजे आहे. त्यांना ब्रिटिशांचे सार्वभौमत्व नको आणि फेडरेशनचाही सासुरवास नको. मुसलमानांना असे वाटत आहे की हिंदुस्थानात मुसलमानांचे बहुसंख्य असलेले आणखी काही प्रांत निर्माण करावेत आणि हिंदूंना कमकुवत करावे. याउलट हिंदू महासभेची अशी विचारसरणी आहे की संस्थानिकांशी संगनमत करून संयुक्त संघटना स्थापन झाली की हिंदूंचे सामर्थ्य वाढेल आणि मुसलमानांवर नियंत्रण घालता येईल. याशिवाय व्यापारी वर्गाचाही एक दृष्टिकोन आहे. हा वर्ग काँग्रेसला पैसे चारीत असतो. त्यांना युरोपियनांविरुद्ध व्यापारी संरक्षण मिळाले म्हणजे झाले. हे सर्व वर्ग संयुक्त संघटनेचे आज ना उद्या स्वागत करतील. पण याशिवाय गरीब आणि स्वतंत्र लोकांचा एक मोठा वर्ग आहे त्यांची दखलगिरी या फेडरेशनने घेतलेली नाही. हे फेडरेशन स्थापन झाल्यास गरिबांच्या स्वातंत्र्याचा पूर्ण चुराडा होईल.

माझे भाषण फार लांबले, ते संपविण्यापूर्वी मला एका गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो: पूर्वी हिंदुस्थानच्या राजकारणातील नेतृत्व रानडे, टिळक, आगरकर, गोखले, दादाभाई, फिरोजशहा मेहता, सुरेन्द्रनाथ बॅनर्जी अशांसारख्या नामांकित लोकधुरीणांच्या हाती असून ते जुने पुढारी नीटनेटका पोषाख करीत आणि अभ्यास करुन बोलत. आज ती प्रथा बदलली आहे. आज अर्धनग्न राहाण्यात लोकधुरीणांना अभिमान वाटतो आणि राजकीय घटनांचा अभ्यास न करता त्यावर मते प्रदर्शित करण्यासही ते मागेपुढे पाहात नाहीत. कारण त्यांचा आधार ग्रंथापेक्षा आतल्या आवाजावर अधिक असतो. मला तशी प्रसाद-दीक्षा लाभलेली नाही. मला आतल्या आवाजाचा अनुभव नाही म्हणून मी रानडे, टिळक, गोखले यांच्या परंपरेला अनुसरून चालणाऱ्या रा. ब. काळे यांच्या स्मृतिदिनाच्या या सभेत आज हे आपले विचार या पद्धतीने आपणापुढे मांडले आहेत, त्यातील जो भाग ग्राह्य वाटेल तो आपण स्वीकारावा, अशी आपणास प्रार्थना करुन मी आपले भाषण संपवितो. (प्रचंड टाळया)

श्री. ना. म. जोशी, डॉ. आंबेडकर यांचे आभार मानताना म्हणाले की, '' डॉ. आंबेडकर हे माझे एलफिन्स्टन कॉलेजातील शिष्य होते, याबद्दल मला फार अभिमान वाटतो. स्वतंत्र बुद्धीने विचार करुन आपली मते धैर्यशालीपणाने पुढे मांडणारे त्यांच्यासारखे मार्गदर्शक तरुणपिढीला अवश्य मिळाले पाहिजेत. मुंबईहून येथे येण्याची त्यांनी तसदी घेतली याबद्दल संस्थेतर्फे मी त्यांचे मन:पूर्वक आभार मानतो.'' पुष्पहार समर्पण करण्यात आल्यावर सभेचे काम संपले.



## १५३

# दारूबंदीपेक्षा शिक्षणाचा प्रश्न अधिक महत्त्वाचा

मंगळवार ता. २१ फेब्रुवारी १९३९ रोजी मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या अंदाजपत्रकावर चर्चा करण्यासाठी, स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भाषण करणार असल्याचे कळताच, प्रेक्षक गॅलरीमध्ये बरीच गर्दी झाली होती. स्वतंत्र मजूर पक्षाचे प्रमुख कार्यकर्तेही हजर होते.

प्रश्नोत्तरे व नंतर आदले दिवसाचे श्री. बांद्रेकर याचे बजेटवरील शिल्लक राहिलेले भाषण संपल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उभे राहिले. त्यांनी आपल्या भाषणात प्रथमतः सांगितले की आजचे कॉंग्रेस सरकारचे अंदाजपत्रक जरी तिसरे असले तरी माझ्या मते ते पहिले आहे. कारण पहिली दोन्ही अंदाजपत्रके तयार करताना कॉंग्रेसला आपल्या परिस्थितीसंबंधी नक्की अंदाज करता येण्यासारखा नव्हता व त्यावेळी, परिस्थितीही निराळी होती. परंतु या वर्षाचे अंदाजपत्रक तयार करण्याच्या बाबतीत त्यांना मुबलक वेळ व त्याची उभारणी करण्यास सर्वतोपरी साधने आणि विचार करण्यास संधी मिळालेली होती. या सर्व गोष्टींचा विचार करता आजचे अंदाजपत्रकच पहिले असे समजतो. अशाप्रकारे अंदाजपत्रकासंबंधी प्रस्तावना केल्यानंतर, डॉक्टरसाहेब अंदाजपत्रकाकडे वळले. अगदी प्रथमतःच त्यांनी हे अंदाजपत्रक जमेच्या बाजूने '' बेजबाबदार आणि खर्चाच्या बाजूने नादानपणाचे आहे '' असे स्पष्टपणे सांगितले. त्यानंतर त्यांनी अंदाजपत्रकाची कलमवार चर्चा करण्यात सुरवात केली. त्यांनी प्रथमतः अंदाजपत्रकात ज्यांच्यावर कॉंग्रेस सरकारने कर बसविले आहेत त्यांची आपल्या भाषणात पुढीलप्रमाणे विभागणी केली:–

(१) कोर्ट फी व स्टॅम्प्स ड्यूटीवरील कर,

(२) विजेवरील कराची वाढ,

(३) शहरातील घरभाड्यावरील टॅक्स,

(४) मालमत्तेच्या लीजवरील टॅक्स,

(५) मुंबई व अहमदाबाद येथील वरील मालमत्तेच्या भाड्यावर शेकडा १० टक्के कर,

(६) विक्रीवरील टॅक्स.

---

जनता : २५ फेब्रुवारी १९३९.

यावरील मुद्यावर भाषण करताना ते म्हणाले की, सरकारने कोर्ट फी व स्टॅम्प ड्यूटी साठविण्यासाठी जी कराची उभारणी केली आहे ती पाहून मागील कायदेमंडळाचा इतिहास माझ्या दृष्टीसमोर उभा राहतो. त्यावेळी हेच कॉंग्रेसवाले या कराच्या विरूद्ध होते. त्यावेळचे त्यांचे धोरण पाहिल्यावर केवळ प्रतिपक्षावर हल्ला करण्यासाठीच त्यांनी आपल्या शक्तीचा उपयोग केला होता असे म्हटले तर ते अनाठायी होणार नाही आणि आता आपल्या हातात सत्ता येताच पूर्वी वाईट वाटणाऱ्या गोष्टी ह्या जनतेचे हित करण्यास सज्ज झालेल्या सरकारास चांगल्या वाटू लागल्या आहेत.

विजेवरील कर हा अनिष्ट आहे असे माझे प्रामाणिक मत आहे. या करामुळे जनतेचे आर्थिकदृष्ट्या नुकसान आहेच. त्याचबरोबर आरोग्यदृष्ट्या गोरगरिबांना हा कर घातक ठरणार आहे. खर्चाच्या भीतीने लोक घासलेट तेलाचे दिवे वापरू लागतील. घासलेट तेलाचे दिवे वापरल्याने मनुष्याच्या आरोग्यावर अनिष्ट परिणाम होतो ही गोष्ट कॉंग्रेस सरकारला माहीत नाही अशातली गोष्ट नव्हे. तत्त्वाच्या दृष्टीने विचार करता या सरकारने विजेवर कर न बसेल अशीच खबरदारी घ्यावयास पाहिजे. पूर्वी १२ युनिटच्या आत वीज वापरणारांना हा नवीन कर मात्र होता, पण आताच्या अंदाजपत्रकात त्याच्यावरही कर लादण्यात आला आहे. गोरगरीब व मध्यम वर्गावर या विजेच्या कराचा बोजा ठेविण्याऐवजी तो सिनेमा वा नाटकगृहावर ठेविलेला नाही. त्यांची या करवाढीच्या चक्रातून सहीसलामतरित्या सुटका केलेली आहे. सिनेमा व नाटकगृहावर हा कर वाढवला असता तर तो गरीब जनतेवर न बसता चैनीवरील साधनांवर तो कर बसला असता. याचा विचार केला म्हणजे हे सरकार गरीबांसाठी असेच डोईजड कर उभारण्यास कसे तयार असते हे दिसून येईल.

शहरातील स्थावर मालमत्तेवर कर बसविण्यात आला आहे. हा नवीन कर बसविण्याची कॉंग्रेस सरकारला का आवश्यकता भासावी ? मुंबई, मुंबई उपनगर व अहमदाबाद येथील मालमत्तेवरील कर, सर्व बाजूंनी विचार करता आक्षेपार्ह असाच आहे. या कराने सरकारने स्थानिक संस्थांची गळचेपी केली आहे. त्यांच्या उत्पन्नावर बेजबाबदारीने आक्रमण केलेले आहे. या बाबतीत सरकारने स्वीकारलेले धोरण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रगतीला आळा घालणारे असे आहे. मुंबईतील भाडेकरू आपले घरभाडे कमी व्हावे म्हणून कित्येक दिवस चळवळ करीत आहेत. अशा परिस्थितीत घर मालकांवरच हा नवीन जादा कर लादण्यात आल्यामुळे भाडेकरू निराश झाले आहेत. घरवाल्यांना

हल्ली साडे अठरा टक्के कर म्युनिसीपालिटीला द्यावा लागतो. जागा लीजवर घेतली असल्यास तिचे निराळे भाडे सरकारला द्यावे लागते. तसेच भाड्याच्या उत्पन्नातून हिंदुस्थान सरकारला ' इन्कम टॅक्स ' द्यावा लागतोच आणि या सर्व करांची सर्वसाधारणरित्या गोळा बेरीज शेकडा ५० टक्के पर्यंत जाते, अशां परिस्थितीत घरवाल्यावर आणखी १० टक्के अधिक वीज कर लादणे मूर्खपणाचे आहे. आपण म्युनिसीपालिटीला जो कर देतो त्याबद्दल म्युनिसीपालिटीकडून आपणास पाणी मिळेल, रस्ते दुरुस्ती होईल, दिवा बत्तीची सोय होईल पण सरकारच्या या नवीन कराने कसला फायदा मिळणार आहे ?

यानंतर डॉक्टरसाहेबांनी रेंट व टॅक्स यामधील भेदाचा अर्थ स्पष्ट करुन सांगितला व ते म्हणाले की, ' कर मालकांना द्यावा लागतो तो निर्जिव इमारतीपासून घेता येत नाही. त्यामुळे हा नवीन कर लोकांच्या मातीवरच बसणार आहे. या कराची उभारणी लहान-मोठ्या सरसकट सर्व घरमालकांकडून करण्यात येणार आहे. अशा वेळी लहान घरे बांधून आपली उपजीविका करणाऱ्या व मोठमोठ्या इमारती बांधून लाखो रुपये मिळविणाऱ्या मालकांवर कर लादणे इष्ट आहे का ? त्याचप्रमाणे मुंबईमधील ' स्पेशल सर्व्हिस लीग ऑफ इंडिया सोसायटी ' सारख्या सार्वजनिक व लोकोपयोगी संस्थांच्या इमारतीवरही या कराचे चक्र फिरविले आहे. आता पदार्थांच्या विक्रीवरील कराची आवश्यकता काँग्रेस सरकारला का वाटावी ? या करामुळे वस्तु विकत घेणाऱ्या लोकांवर परिणाम होईल आणि त्याचा त्यांच्या राहाणीच्या दर्जावर खात्रीने परिणाम होईल. या कराने सरकार कोणती गोष्ट साध्य करणार ? या कराचा विचार करताना मागील इतिहासाकडे पाहावे लागेल. सन १८००-१८९४ पर्यंत एक्साईज टॅक्स लादण्यात येत असे आणि आजच्या अंदाजपत्रकात त्याचेच रूपांतर काँग्रेस सरकारने केले आहे. या नवीन कराने मनुष्याच्या दर्जावर परिणाम होईलच, शिवाय हा कर प्रत्यक्ष कारखानदाराला व गिरणी मालकांना द्यावा लागल्यास देशातील उद्योगधंद्यांवर विपरित परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाही.

आवश्यक असा अधिक कर उभारण्याविषयी मी कधीच विरोध करणार नाही, पण एक विशिष्ट ध्येयाच्या सिद्धीसाठी काँग्रेस सरकारने हा १६९ लाखांचा नवीन कर उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे, तो जनतेला प्रत्यक्ष असा कोणता फायदा

करून देणार ? अंदाजपत्रकातील खर्चाच्या नवीन बाबी बघितल्या तर त्यात (१) शिक्षणासाठी दीड लाख रुपये, (२) सार्वजनिक आरोग्यासाठी पाणी पुरवठा वगैरे ५ लक्ष रुपये, (३) सहकारी चळवळीसाठी ७ लक्ष रुपये, (४) कर्जनिवारणासाठी २ लक्ष रुपये इतक्याच बाबी प्रमुख आहेत. या सर्व कार्यासाठी फक्त ४० लाख रुपये खर्च करून बाकीचे १२५ लाख दारूबंदीसाठी राखून ठेविले आहेत. परंतु वर निदर्शित केलेल्या लोककल्याणाच्या गोष्टीपेक्षा मद्यपान बंदीच्या धोरणासाठी खर्च करणे योग्य होईल काय ?

दारूबंदीसाठी सरकारने १२५ लाखांचा चुराडा करण्यासारखा हा तातडीचा प्रश्न आहे काय ? याचा आपण विचार केला तर सरकारचे हे धोरण निव्वळ अविचाराचे व आततार्इपणाचे दिसते.

मद्यपानबंदीच्या प्रश्नाचे महत्त्व आपल्या प्रांतात निष्कारण वाढविले आहे आणि हे धोरण किती हास्यास्पद आहे याची प्रत्यक्ष खात्री करुन देण्याकरिता डॉ. आबेडकरांनी ग्रेटब्रिटन, आयर्लंड, कॅनडा, नॉर्वे वगैरे देशातील लोकसंख्या व तेथील दारूच्या उत्पन्नाचे आकडे देऊन मुंबई इलाख्याचा दारूबंदीचा प्रश्न इतका तातडीचा नाही हे सिद्ध करून दाखविले. तसेच आपल्या प्रांतातील परदेशी दारूच्या खपाचे प्रमाण पाहिले तर दर माणसी तीन ड्राम पडेल आणि एकंदर इलाख्यात दारू पिणाऱ्यांचे प्रमाण पाहिले तर १० लक्ष लोक दारू पिणारे निघतील. आपल्या देशातील स्त्रिया दारू पित नाहीत. इतकेच काय पण अट्टल दारूडयाला आपल्या बायकोने दारू प्यालेली आवडणार नाही.

अमेरिकेमध्ये दारूबंदी केल्याचे उदाहरण आमच्या प्रांताचे सरकार दाखवून येथला प्रश्न सोडवू पहात आहे. परंतु तेथे दारूबंदी करण्याच्या पूर्वीची स्थिती आमच्या सरकारने अवलोकन केली आहे काय ? तेथे त्यावेळी दारूचा इतका खप वाढला होता की, दारू बेसुमार पिण्यामुळे कित्येक लोक मृत्युमुखी पडले होते. परंतु तशी भयानक परिस्थिती आपल्या प्रांतामध्ये दिसत आहे काय ? मग हा दारूबंदीचा प्रश्न सरकारला का महत्त्वाचा वाटावा ? या प्रश्नापेक्षा अधिक महत्त्वाचा असा शिक्षणाचा प्रश्न जरूरीचा आहे. या प्रश्नाकडे आज पहिल्याप्रथम लक्ष पुरविले पाहिजे. आपल्या इलाख्यातील साक्षरतेचे प्रमाण किती कमी प्रतीचे आहे हे पुढील आकड्यांवरून सहज कळून येईल. पुरुष शेकडा १४.३ व स्त्रिया फक्त २.४ टक्के साक्षर आहेत. सरळ बोलायचे म्हणजे शेकडा पुरुष ८६ व स्त्रिया ९८ असे निरक्षरतेचे प्रमाण बसते. कॉंग्रेस सरकारने प्रौढ स्त्री–पुरुष शिक्षणाचा विचार करण्यासाठी एक कमिटी नेमली होती. तिने याबाबतीत आपला रिपोर्टही सादर केला आहे. परंतु या अंदाजपत्रकात त्यासंबंधी काहीच तरतूद केलेली नाही. कॉंग्रेस सरकारने दारूबंदीसाठी १६९ लाखांची

उधळपट्टी करण्याऐवजी त्याचा शिक्षणाकडे प्रथम उपयोग केला तर कितीतरी मोठे लोकोपयोगी कार्य केले असे ठरेल. शिक्षणाचा प्रश्न कसा महत्त्वाचा व तातडीचा आहे हे डॉ. बाबासाहेबांनी प्राथमिक, मध्यम व कॉलेजात शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांची आकडेवारी देऊन सिद्ध केले. या प्रांतातील शहरात १८४ प्राथमिक शाळा व निरनिराळ्या खेडेगावात फक्त ८,५९९ शाळा आहेत आणि १२,८८५ खेडेगावात बिलकूल शाळा नाहीत. इलाख्यातील सर्व प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले तर, १ कोटी ३० लक्ष रुपये खर्च होईल. यासाठी दारूबंदीसाठी खर्च होणारी रक्कम या शिक्षणाच्या कार्याला भरपूर पुरणारी आहे. मग सरकार दारूबंदी ऐवजी या रकमेचा शिक्षणाकडे का उपयोग करीत नाही ? या सरकारला शिक्षण योजनेकडे पैसे खर्च करणे इष्ट वाटत नाही काय ? आणि मी येथे ना. फडणीसांना या बाबतीत सरळ सवाल करू इच्छितो. शिक्षणाच्या प्रश्नाप्रमाणेच सार्वजनिक आरोग्याचाही प्रश्न महत्त्वाचा आहे. हल्ली सार्वजनिक आरोग्य रक्षणाकरिता सरकार जी रक्कम खर्च करते ती इतकी अपुरी आहे की खेडोपाडी लोकांचे जीवन पिण्याच्या पाण्यावाचून कष्टमय व दुःखी झाले आहे. खेड्यापाड्यातील आपल्या गरीब बांधवांचे जीवन सुखी होण्यासाठी शहरातील लोकांवर कर बसवून त्याचा उपयोग दारूबंदी ऐवजी खेड्यातील लोकांच्या आरोग्य रक्षणाकडे का करण्यात येत नाही ?

या प्रांताचे जमीन महसुलाचे उत्पन्न ३ कोटी १८ लक्ष ६३ हजार रुपये आहे. गेल्या वर्षी कॉंग्रेस सरकारने १० लक्ष रुपयांची सूट दिली होती व जमीन महसुलात ४० लक्षांची सूट देण्याचा विचार आहे. इतर कर बसवून सरकार जर सर्व जमीन महसूल अजिबात माफ करीत असेल तर आपण अंदाजपत्रकावरील विरोध खुषीने परत घेतो. (हिअर-हिअर) या देशातील मद्रास, बिहार, ओरिसा वगैरे प्रांतांचे क्षेत्रफळ वगैरेची आकडेवारी पाहिली तर मुंबई प्रांत लहान ठरेल. आपल्या प्रांतातील जमीन सर्वत्र ठिकाणी लागवडीस लागलेली आहे. अशा परिस्थितीत शेतीपेक्षा उद्योगधंद्यांची वाढ झपाट्याने होणे अत्यावश्यक आहे.

चरख्यासारख्या प्रश्नाला महत्त्व देऊन, बाजारात चढाओढीत न टिकणारी खादी ग्रामोद्धाराचा प्रश्न सुलभतेने सोडवू शकत नाही. या सर्व गोष्टींचा बारकाईने विचार केल्यानंतर या देशातील औद्योगिकरणाला विरोध करणारा मनुष्य देशाचा वरून मित्र असला तरी खरा शत्रु आहे असेच म्हणेन, तसेच

सरकारचे हे अंदाजपत्रक तयार करणे म्हणजे मनात गणपतीची मूर्ती करणाऱ्या कुंभाराच्या हातून शेवटी माकडाची मूर्ती बनविली आहे असे दृष्य दृष्टोत्पत्तीस येते. (प्रचंड टाळया) डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जवळ जवळ सव्वा तास अस्खलित व परिणामकारक असे भाषण झाले.

● ● ●

# १५४

# जिल्हावारी चळवळींमुळे संघटनशक्ती कमकुवत बनेल

चेंबूर, मुंबई येथील अस्पृश्य समाज संघटन या संस्थेच्या विद्यमाने ता. २६ फेब्रुवारी १९३९ रोजी चेंबूर येथे सायं. स्वतंत्र मजूर पक्षाचे सेक्रेटरी भाई डी. व्ही. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरविण्यात आली होती. यावेळी स्वतंत्र मजूर पक्षाचे मुंबई प्रांतिक असेंब्लीचे आमदार, मुंबई म्युनिसीपालिटीमध्ये निवडून आलेले प्रतिनिधी याशिवाय विविध वृत्ताचे संपादक, रामभाऊ तटणीस हजर होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उठले.

प्रथम त्यांनी चेंबूर येथील कामगारांनी मोठ्या प्रेमाने, आस्थेने, इमारत फंडाकरिता पैसे जमविल्याबद्दल त्यांचे हार्दीक अभिनंदन केले. नंतर ते पुढे म्हणाले,

या इमारत फंडाचे महत्त्व किती आहे, हे माझ्या अगोदरच्या वक्त्यांनी सांगितलेले आहे. या फंडाकरिता निदान दोन लाखांचा तरी निधी जमविणे आवश्यक आहे. आतापर्यंत यासाठी जमा झालेली रक्कम पासंगालाही पुरणार नाही. या फंडाची मला कल्पना जेव्हा सुचली तेव्हा शेवटच्या बाजीरावाच्या दानशूरपणाची मला प्रथम आठवण झाली. त्याने एका भिक्षुकाला त्याचे समाधान होईपर्यंत त्याच्या डोक्यावर रुपये ओतून केलेल्या दानधर्माची गोष्ट वाचून मीही मला कुणी या फंडाकरिता असे दान द्यावयास तयार असल्यास तितके कष्ट सोसून माझ्या डोक्यावर रुपये ओतून घेत राहीन. भिक्षुकवृत्ती स्वीकारल्याशिवाय या इमारत फंडाची पूर्तता लवकर होणार नाही. नंतर त्यांनी चेंबूर येथील अस्पृश्य कामगारांच्या १९२६ ते १९३९ पर्यंतच्या काळातील जीवनाचे भयानक दृश्य निवेदन केले. पूर्वीची घाणेरडी वस्ती व त्यामध्ये माणसे व कचरा यांच्यामध्ये कधीच भेदभाव दिसत नव्हता. त्यामानाने आज दहा वर्षात बरेच समाधानकारक असे स्थित्यंतर घडून आलेले आहे. आज शिक्षण, सुधारणा वगैरे बाबींमुळे आपल्या समाजात झालेली सुधारणा अभिनंदनीय

---

ज़नता : ४ मार्च १९३९.

आहे. मुलांना आजच्यापेक्षा अधिक शिक्षण मिळवून देण्यासाठी झटणे आवश्यक आहे. १० वर्षांपूर्वी तुमची स्थिती सुधारण्यासाठी कामगारांचा संघ नव्हता. म्युनिसीपालिटीमध्ये आपले स्वतःचे प्रतिनिधी नव्हते. परंतु गेल्याच निवडणुकीत म्युनिसीपालिटीमध्ये आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे पाच सहा प्रतिनिधी निवडून आलेले आहेत. या निवडणुकीसाठी मी श्री. गणपतबुवा जाधव यांना उभे केले होते. दुर्दैवाने ते निवडून आले नाहीत. परंतु माझी खात्री आहे की त्यांनी आपल्या कामगार बांधवांसाठी अपूर्व अशी कामगिरी केली असती. केवळ आपल्याच काही मंडळीच्या विश्वासघाताने त्यांना अपयश आले आहे. ही गोष्टही मी कधीच विसरणार नाही. श्री. गणपतबुवा यांना गेल्या निवडणुकीत झालेल्या खर्चाबद्दल येथील कामगारांनी त्यांच्या आजपर्यंतच्या कामगिरीची जाणीव ओळखून त्यांना शंभर रुपये मदत म्हणून देण्याचे कबूल केले आहे. याबद्दल मी या सर्व मंडळींचे आभार मानतो.

आपली चळवळ संघटित करण्यासाठी जिल्हावार चळवळ सुरू आहे ती बंद केली पाहिजे. अशा जिल्हावार भावनेने कार्य केल्यामुळे संघटनशक्ती कमकुवत बनते. एकमेकांच्या चढाओढीच्या कार्यामुळे जिल्ह्याजिल्ह्यात हेवा, मत्सर वगैरे उत्पन्न होण्याची भिती अधिक असते. आपण सर्वांनी एक होवून आपला स्वतंत्र मजूर पक्षाचा लढा यशस्वी करा. जिल्ह्याजिल्ह्याच्या भावना सोडून द्या. हाच माझा तुम्हाला खरा संदेश आहे.

यानंतर श्री. डी. व्ही. प्रधान यांचे वेळेच्या अभावी थोडेसे भाषण झाल्यावर सर्व पाहुणे मंडळीना हारतुरे अर्पण करण्यात आले. या सभेची सर्व उत्तम व्यवस्था जी. ओ. सी. श्री. धयाळकर यांच्या नेतृत्त्वाखाली समता सैनिक दलाने ठेविली होती.



# १५५

# साम्राज्यशाही, भांडवलशाही, जमीनदारशाही आणि मध्यमवर्गीय हिंदी व्यापारी यांच्या दडपणातून राष्ट्राला मुक्त करणे हेच संपूर्ण स्वातंत्र्य

स्वतंत्र मजूर पक्षाच्या अखिल भारतीय कार्यकारी मंडळाची सभा ता. २१ मार्च १९३९ रोजी मुंबई येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. यावेळी पक्षाचे ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य असल्याचे जाहीर करण्यात आले. यावेळी भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आमचा पक्ष श्रमजिवी वर्गाचा आहे. परकीय साम्राज्यशाही, हिंदी भांडवलशाही व जमीनदारशाही आणि मध्यमवर्गीय हिंदी व्यापारी यांच्या दडपणाखाली श्रमजिवी वर्ग दबला आहे. त्याची या बिकट परिस्थितीतून मुक्तता करणे हिंदी राष्ट्राला संपूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय अशक्य आहे. संपूर्ण स्वातंत्र्याचे आमचे ध्येय शुद्ध स्वरूपाचे आहे. आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी सुरू झालेल्या कोणत्याही लढ्यात आपला पक्ष प्रामुख्याने भाग घेईल. तोपर्यंत गोरगरीब बहुजन समाजाची पिळवणूक करणाऱ्या आमच्याच देशबांधवांशी आम्ही आमचे निशाण उभारू.



---

जनता : ८ एप्रिल १९३९.

## १५६

# सर्व राजकीय पक्षांनी एक होऊन हिंदी राजकारणाची धुरा आपल्या हाती घ्यावी

रविवार दिनांक २ एप्रिल १९३९ रोजी विलेपार्ले, मुंबई येथील लोकशाही स्वराज्य पक्षातर्फे मुंबई म्युनिसीपल कार्पोरेशनमध्ये निवडून आलेल्या काही हिंदू कार्पोरेटरांचे जाहीर अभिनंदन करण्यात आले. यावेळी श्री. रामभाऊ तटणीस, ॲडव्होकेट तळपदे, प्रि. दोंदे, श्री. भगवंतराव परळकर व डी. व्ही. प्रधान वगैरे सभासद हजर होते. या समारंभाला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना खास आमंत्रण देऊन बोलावले होते. प्रथमतः सर्वांची अभिनंदनाला उत्तरे देणारी भाषणे झाल्यावर डॉ. आंबेडकरांना बोलण्याची विनंती करण्यात आली. त्यांनी आपल्या भाषणात प्रथमतः गांधीयुगापूर्वीच्या हिंदी राजकीय परिस्थितीचे विवेचन करताना सांगितले की,

गांधी युग सुरू होण्यापूर्वी नेमस्त व जहाल-अराजक असे दोनच पक्ष हिंदुस्थानात प्रमुख होते. नेमस्तपक्ष बुद्धी व अभ्यासू वृत्तीवर विशेष भर देत होता. तर अराजकांचा कल देशासाठी अलौकिक स्वार्थत्याग करण्याची पाळी येताच प्राणाची सुद्धा पर्वा बाळगायची नाही असा होता. परंतु गांधी युगाने सर्वच पारडे उलटे फिरले. ढोंगी लोकांचा राजकारणात शिरकाव झाला. दोन आण्याची गांधी टोपी डोक्यावर चढवून गांधींचा दास असल्याचे जाहीर केले की तो देशभक्त झालाच ! यामुळे हिंदी राजकारणात स्वार्थसाधूंचा सावळागोंधळ माजला. ज्या शुद्धीची आता गांधीजी टाहो फोडून आवश्यकता असल्याची ग्वाही गात आहेत त्याला तेच स्वतः जबाबदार आहेत. ज्या घाणीचा असा घाणेरड्या रीतीने उगम झाला त्याला घाणीने भरलेल्या गटारांचा प्रवाह येऊन मिळणारच !

काँग्रेसने असहकारितेची चळवळ केल्यामुळे हजारो लोक तुरुंगात गेले. त्या तुरुंगवासाचे हे लोक मोठ्या मुक्त कंठाने गोडवे गातात. पण या तुरुंगवासात स्त्री-भोगादी सुखे मिळाल्याची उदाहरणे दृष्टिसमोर असताना हे तुरुंगवास खडतर होते, असे कसे म्हणता येईल ? खरे क्लेश, खडतर दुःखे लो. टिळकांनी भोगली. त्यांच्या तुरुंगवासाची तुलना या काँग्रेस पुढाऱ्यांच्या

---

जनता : ८ एप्रिल १९३९.

तुरुंगवासाबरोबर करणे अशक्य आहे. त्यांच्या तुरुंगवासाच्या भयाण देखाव्याने डोळ्यातून अश्रू प्रवाहाऐवजी रक्ताचे थेंबसुद्धा गळू लागले असते. कॉंग्रेसची सत्ता म्हणजे एक झोटिंगशाहीचा कारभार आणि या कारभाराला खरे पाहिले असता मतदारसंघच कारणीभूत आहे. त्याने आता कॉंग्रेसच्या राजकीय खेळखंडोब्याला दूषणे देण्यात काय अर्थ आहे ? याला एकच उपाय आहे आणि तो म्हटला म्हणजे कॉंग्रेसची ही ढोंगी बुवाबाजी नाहिशी करण्यासाठी सर्व राजकीय पक्षांनी एक होऊन संघटना केली पाहिजे आणि कोणत्याही संकटांना न भिता हिंदी राजकारणाची धुरा आपल्या हाती घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपण आजच्या मुंबई असेंब्लीमधील कॉंग्रेस सभासदांकडे चिकित्सक दृष्टीने पाहा. ते असेंब्लीमधील दृश्य पाहिले की, हा किंग एडवर्ड हॉस्पिटलमधील लुळे पांगळे, आंधळे, म्हातारे वगैरे रोग्यांचा राखीव वार्ड आहे की काय असा भास होतो.



## १५७

# संस्थानात राहाणाऱ्या लोकांची स्थिती गोठ्यात कोंडलेल्या जनावरांपेक्षा वेगळी नाही

स्वतंत्र मजूर पक्षाचे जनक डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मेसर्स गडकरी, सावंत, देवरूखकर, गायकवाड, के. बी. जाधव, शामराव भोळे वगैरे मंडळीसह फलटणात जात असता वाटेत लोणंद येथे श्री. आबासाहेब खरात यांनी त्यांचे आदरपूर्वक स्वागत करून थाटानी पानसुपारी दिली. सदर प्रसंगी श्री. सावंत, भाऊराव गायकवाड यांची भाषणे झाली. त्यांनी आपल्या भाषणात स्वतंत्र मजूर पक्षाचे सर्वांनी का सभासद व्हावे याचे थोडक्यात विवरण करून सर्वांनी सभासद व्हावे म्हणून विनंती केली. नंतर श्री. आबासाहेब खरात यांनी डॉ. बाबासाहेब आपल्या विनंतीस मान देऊन मागच्या सर्व गोष्टी विसरून येथे आले त्याबद्दल समाधान व्यक्त करून डॉ. बाबासाहेबांबद्दल वसत असलेली भक्ती व्यक्त केली व त्यांना पुष्पहार अर्पण केला. तद्नंतर डॉ. बाबासाहेबांनी श्री. आबासाहेब खरात यांनी घडवून आणलेल्या या सभारंभाबद्दल आभार मानले. आभार मानताना त्यांनी सांगितले की, मागे असेंब्लीच्या निवडणुकीच्या वेळी सातारा जिल्ह्याचे स्वतंत्र मजूर पक्षाचे उमेदवार श्री. खंडेराव सावंत यांच्या मदतीसाठी मी दौरा काढला असता श्री. आबासाहेब खरातांचे वडील चिंरजीव श्री. सावंताविरुद्व होते. अशा प्रसंगी कर्तव्य म्हणून मला श्री. खराताबद्दल खरपूस टीका करावी लागली होती. असे असताही श्री. खरातांनी सार्वजनिक कार्यातील सख्ती जाणून ते सर्व विसरले आहेत ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. त्याचेच अनुकरण सर्व सार्वजनिक कार्यकर्त्यांनी गिरविण्यासारखे आहे. जमलेल्या मंडळींना हारतुरे व पानसुपारी झाल्यानंतर श्री. खरातांकडे जेवण करून डॉ. बाबासाहेब फलटणास दिनांक २३ एप्रिल १९३९ रोजी पोहचले.

फलटण संस्थानाधिपतीनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना आगाऊच पत्र पाठवून फराळाचे निमंत्रण दिले होते. त्याप्रमाणे सायंकाळी ४ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मेसर्स गडकरी, देवरूखकर, गायकवाड, रणपिसे, सावंत, के. बी. जाधव, शामराव भोळे वगैरे मंडळीसह बरोबर ४ वाजता फलटण संस्थानाधिपतीच्या खास मोटारने राजवाड्यात आले. तेथे राजेसाहेबांचे व त्यांचे सार्वजनिक कार्याबाबत थोडे बोलणे झाल्यानंतर थाटाची चहापार्टी झाली, चहापार्टीनंतर राजवाड्यात डॉ.बाबासाहेब समवेत राजेसाहेब व पाहुणे मंडळी यांचा फोटो

---

जनता : ६ मे १९३९.

झाला. नंतर सायंकाळी ५ वाजता राजवाड्यापासून जंगी मिरवणूक निघून ती सभेच्या मंडपापर्यंत आली. सभेसाठी भव्य मंडप व स्टेज तयार केला होता. संस्थानातील सर्व बडी बडी स्त्री-पुरुष मंडळी सभेत मुद्दाम आली होती. सुरूवातीस स्वागतपर पद्ये व पोवाडे झाल्यानंतर सभेचे स्वागताध्यक्ष श्री. गायकवाड यांनी डॉ. बाबासाहेबांचे व जमलेल्या मंडळींचे स्वागत करून आपल्या समाजाने संघटित राहणे किती हिताचे व महत्त्वाचे आहे याचे वर्णन केले. शेवटी डॉ. बाबासाहेबांनी परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी विनंती केली. प्रचंड टाळयांच्या कडकडाटात डॉ. बाबासाहेब स्थानापन्न झाले. सभेसाठी फलटण संस्थानातील व संस्थानाबाहेरील असा सुमारे दहाबारा हजार जमाव जमला होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या प्रचंड कडकडाटात बोलण्यास उठले. ते म्हणाले,

मी फलटण संस्थानातील अस्पृश्य मानलेल्या लोकांच्या परिषदेसाठी जरी येथे आलो असलो तरी सर्वसाधारण जनतेचे कर्तव्य काय, आज जगात काय चालले आहे इकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. सर्वसाधारण जनता ही सध्या लोकशाहीची भाषा बोलत असून संस्थानात व संस्थानाबाहेर लोकशाहीच्या तत्त्वावर सुधारणा मिळविण्याचे प्रयत्न करीत आहे. अशावेळी संस्थानिकांनीही आपला दृष्टिकोन बदलून प्रजेला जितके अधिक अधिकार देण्यासारखे असतील तेवढे दिले पाहिजेत.

आजची संस्थाने ही मागच्या राज्यांची अवशेष आहेत. पूर्वीच्या काळी राजांना जर कोणती शिकवणूक मिळत असेल तर ती म्हणजे गो-ब्राह्मण प्रतिपाल करणे एवढेच होय ! गो-ब्राह्मण प्रतिपाल हे त्यावेळच्या राजाचे मुख्य कर्तव्य समजले जात असे. गो-ब्राह्मण प्रतिपाल म्हणजे गाईंना चारा घालून ब्राह्मण जातीचे रक्षण केले म्हणजे राजाचे राजा म्हणून दुसरे कर्तव्यच शिल्लक राहिले नाही, असे समजण्यात येई. गो-ब्राह्मण प्रतिपालाखेरीज राजाने दुसरे काही न केले तरी चालत असे. आज सर्व संस्थानात राहाणाऱ्या लोकांच्या परिस्थितीकडे पाहिल्यास त्यांची स्थिती गोठ्यात कोंडलेल्या जनावरांपेक्षा मोठी चांगली नाही. याचा दोष जर कोणाकडे जाणार असलाच तर तो हिंदुधर्माच्या वरील शिकवणुकीकडेच जाईल. चाणक्यनिति, मनुस्मृती वगैरे ग्रंथांचे अवलोकन केले तर आपणास असे दिसून येईल की, त्यांनी राजाचे कर्तव्य म्हणजे खेड्यापाड्यातून शाळा काढून लोकांना सुविद्य करणे, अगर लोकहिताच्या गोष्टी करणे याचा कोठेच मागमूसही आढळणार नाही. या सर्व गोष्टी आपण इंग्रजांपासून शिकलो

आहोत ही कबुली देण्यास कोणास लाजण्याचे काहीच कारण नाही. प्राचीन काळचे रामकृष्णासारखे नावाजलेले चांगले चांगले नामांकित राजे घेतले तरी त्यांनी लोकात शिक्षणप्रसार व्हावा म्हणून काय स्कॉलरशिपा दिल्या होत्या ? या फलटण संस्थानातील आपली जनता ज्ञानहीन व अधिकारहीन अशी आहे. आपल्या लोकांच्या या स्थितीस जर कोणी जबाबदार असेल तर तो आपला धर्मच होय ! देशातील शेकडा ९० लोक आज अज्ञानात व गुलामीत दिवस कंठीत आहेत. याला जर कोणी कारण असेल तर तो हिंदू धर्मच होय. इतकेच काय पण हिंदुस्थानचे स्वातंत्र्य घालविण्यास व जो कोणी परकीय राजा इकडे येईल त्याला प्रथम आश्रय देऊन पुढे त्यासच शरण जाण्याला जर काही कारण झाले असेल तर आपला हिंदू धर्मच होय.

ही पद्धती नष्ट करण्याला आपण आज काय केले पाहिजे हा मुख्य प्रश्न आहे. याबाबत रामबाण उपाय अगर तोडगा म्हणून जर सुचवावयाचा असला तर तो म्हणजे राज्याची सत्ता काढून घेऊन ती प्रजेच्या ताब्यात देणे जरुर आहे. याबाबतचे माझे विचार आपणास जरा विचित्र वाटतील. परंतु मला ते लपवून ठेवावयाचे नाहीत. इंग्रज आमदानी इकडे सुरू होऊन बरेच दिवस झाल्यानंतर लोककल्याण करणे असल्यास राजकीय सत्ता प्रजेच्या प्रतिनिधींच्या हातात असणे योग्य असे वाटू लागले. त्याबाबत लोकांच्या आकांक्षा सारख्या वाढीस लागल्या. त्यांना अनुसरून ज्या काही सुधारणा अंमलात आल्या आहेत, त्या आपल्या या हिंदुस्थान देशात १९३७ च्या एप्रिल पासून सुरु झाल्या आहेत. परंतु मिळालेल्या या प्रजासत्ताक राज्यापासून या देशाचे काय हित झाले आहे ? खरे पाहाता आपल्या या देशात प्रजासत्ताक राज्यपद्धतीमुळे कवडीचासुद्धा फरक झाल्याचे दिसत नाही. परकीय इंग्रजांच्या आमदानीत जे त्यांनी केले नाही, ते हे लोक करताना दिसतात. ज्या गोष्टीबद्दल त्यांना लाज वाटत असे त्या गोष्टी आज लोकांच्या मतावर निवडल्या गेलेल्या लोकांनी केल्या आहेत. निःशस्त्र असलेल्या कामगारांवर गोळया झाडून त्यांचे जीव घेणे, पोटासाठी झगडत असता संप करणे हा गुन्हा आहे, असे कायदे जे मागचे सरकार करू शकले नाही ते ही कॉंग्रेसची सरकारे बिनदिक्कत करीत सुटले आहेत.

प्राचीनकाळची गो-ब्राह्मण प्रतिपाल करणे ही शिकवणूक आज तरी लोकांच्या व्यवहारातून सुटली आहे काय ? आज कॉंग्रेसची सात प्रांतात सरकारे आहेत. त्या सर्व प्रांतांचे मुख्य दिवाण ब्राह्मण आहेत. म्हणजेच त्या सर्व प्रांतांची सत्ता ब्राह्मणांच्या हातात आहे. असल्या या राज्यात सर्वांचे कल्याण होईल, असे म्हणणे ही बाजारगप्प आहे. त्यांच्या हातून सर्वांचे कल्याण होणे

अशक्य आहे. कारण जोपर्यंत या देशात गरीबांचे हितसंबंध हे श्रीमंत वर्गापासून भिन्न आहेत, एका वर्गाचे हितात दुसऱ्याचे अहित आहे व जेथे श्रीमंतांच्या कल्याणाची कदर करण्यास आजची काँग्रेस सरकारे तत्पर आहेत अशा ठिकाणी या असल्या काँग्रेस सरकारांकरवी आमचे कल्याण होईल, असा आत्मविश्वास शेतकरी व मजूर या वर्गांनी बाळगिणे म्हणजे या वर्गाची अधोगती होय. आज ज्याठिकाणी क्रय-विक्रय वस्तूसारखी आपल्या मतांची विक्री, मतदार, श्रीमंत अशा लोकांना पैशाच्या लोभाला बळी पडून विकतात व त्याचा खरेदीकर्ता जथे श्रीमंत मारवाडी व गुजर आहे, अशा लोकांच्या हातात सत्ता दिली असता आपले नुकसान करून गोरगरीब जनतेचे हा वर्ग कल्याण करील हे कधीच संभवनीय नाही. असल्या लोकशांहीपेक्षा अनियंत्रित सत्ता हातात असलेला राजा परवडेल, असे म्हणण्याची पाळी आता आली आहे. युरोपमध्ये ज्या प्रांतांची भरभराट चालली असे प्रांत म्हणजे जर्मनी, टर्की, इटली वगैरे होत. 'राजा कालस्य कारणम्,' या म्हणीप्रमाणे देशाच्या भरभराटीस व उन्नतीस राजाच कारण असतो. आज तरी जर्मनीचा हिटलर, टर्कीचा मुसोलिनी व इटलीचा केमालपाशा हे आपल्या देशाच्या प्रगतीला कारण आहेत. अशा राजांच्या हातात एकतंत्री सत्ता असता ते प्रजेचे जितके कल्याण करू शकतील तितके कल्याण मारवाडी अगर गुजर हे पैशाच्या जोरावर लोकांची मते विकत घेऊन लोकशाहीच्या नावाखाली करू शकणार नाहीत.

येथील राजे फार सूज्ञ आहेत. त्यांना पेन्शन देऊन संस्थान खालसा करण्यास ते हरकत घेतील, असे मला वाटत नाही. उलट माझी ही सूचना मान्य करण्यास त्यांना अडचण भासणार नाही. या संस्थानची लोकसंख्या ५८,००० असून वसूल मात्र अवघा साडेपाच लाख आहे. ज्या मुंबई प्रांताची लोकसंख्या दोन कोटी व उत्पन्न साडेबारा कोटी आहे अशा प्रांतातसुद्धा शेकडा ७५ गावांना अजून शाळा नाहीत. तेव्हा असल्या थोड्या उत्पन्नाच्या संस्थानाचा ताबा ठेऊन काय गळफास घ्यावयाचा आहे? या फलटण संस्थानात साडेपाच लाखाने काही भागणार नाही. त्यांनी हा प्रांत ब्रिटिश मुलखास जोडून घ्यावा.

या संस्थानातील अस्पृश्य मानलेल्या लोकांना आपली गाऱ्हाणी राजापुढे मांडण्यास मोकळीक असावी. प्रजेचे रक्षण करून त्यांच्या पोटापाण्याची सोय करावी. ज्या लोकांना आपल्या अस्पृश्यतेमुळे कोणताही धंदा-रोजगार करता येत नाही, ज्यांना स्पृश्य मानलेले लोक भांडी घासणे अगर

कपडे धुणे या कामासाठीसुद्धा जेथे ठेवित नाहीत असल्या प्रजेस आपल्या राज्यात असलेल्या पडित जमीनी सरकारने त्यांना वहिवाटीस द्याव्यात.

शिक्षणासारख्या आवश्यक कामी लागणारा पैसा खर्च करण्यास या वर्गाजवळ काही नसल्याने सरकारने या वर्गाच्या लोकांना पाटी, पुस्तके, स्कॉलरशिपा वगैरे देऊन हातभार लावावा.

या संस्थानात असलेल्या कायदे मंडळात १९ माणसे आहेत. त्यात आमचा प्रतिनिधी अवश्य घ्यावा. पूर्वी कै. आयवळे नावाचे गृहस्थ कायदे मंडळात १९३३ पर्यंत होते. त्यांच्या निधनानंतर दुसरा का निवडू नये, समजत नाही. एकदा मिळालेला हक्क परत घेतला असल्यास तो अवश्य परत मागावा. तसेच म्युनिसीपालिट्या, जिल्हा बोर्ड वगैरे ठिकाणी आमचे वर्गाचे प्रतिनिधी घेण्यात यावे.

शेवटी एक कटुसत्य तुम्हाला सांगितल्याशिवाय माझ्याच्याने राहवत नाही. आपल्या समाजात मृतमांसाहाराची अनिष्ट रूढी प्रचारात होती. ती रूढी आपल्या समाजाच्या अवनतीस कारण झाली आहे. ही अधम चाल आपण ताबडतोब बंद करावयास हवी आहे. ही घाण जोपर्यंत आपण काढून टाकीत नाही तोपर्यंत समतेचा झगडा झगडण्यास आपण अपात्र ठरू. तरी ही रूढी अविलंब बंद करावी.

शेवटी सर्वांनी जमून त्यांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतल्याबद्दल सर्वांचे आभार मानून टाळयांच्या प्रचंड कडकडाटात ते खाली बसले.

नंतर श्री. भाऊराव गायकवाड यांनी परिषदेपुढे मांडावयाचे एकंदर ५ ठराव एकत्र मांडून त्यास इतर दोघांनी अनुमोदन दिल्यानंतर एकमताने पास करण्यात आले.

• • •

# १५८

# इमारत फंडासाठी एक महिन्याचा पगार द्या !

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे आज्ञेवरून श्री. शां. अ. उपशाम, सेक्रेटरी, इमारत फंड मुंबई यांनी ता. १४ जून १९३९ रोजी मुंबईतील महार जातीतील प्रमुख गृहस्थांना उद्देशून एक निवेदन काढले होते. ते येणे प्रमाणे--

अनेक जोहार, वि. वि. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रस्थापित केलेल्या इमारत फंडाच्या कार्याला जोराची चालना देण्याच्या बाबतीत विचारविनिमय करण्यासाठी ता. १८ जून १९३९ रोजी सकाळी ९ वाजता ठिकाण आर. एम. भट हायस्कूल (मे. प्रि. दोंदे यांची शाळा) परळ, मुंबई येथे आपण आपल्या चाळीतील चार प्रमुख मंडळीसह येण्याची कृपा करावी, सदर प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे स्वतः हजर राहाणार आहेत.

याप्रमाणे ता. १८ जून १९३९ रोजी सकाळी १० वाजता परळ, मुंबई येथील आर. एम. भट हायस्कूल मधील हॉलमध्ये इमारत फंडाच्या सभेस सुरुवात झाली. मुंबई व मुंबई सबर्बन भागातील सर्व कार्यकर्त्यांनी सबंध हॉल चिक्कार भरला होता.

प्रथमतः इमारत फंडाचे सेक्रेटरी श्री. शांताराम अनाजी उपशाम यांनी इमारत फंडाच्या आतापर्यंत झालेल्या कार्याचा आढावा वाचून दाखविला. यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो व बंधूंनो,

अस्पृश्य समाजाकरिता सार्वजनिक कार्यासाठी मुंबईत एक प्रशस्त इमारत बांधणे जरूर आहे, असे मी वर्ष सव्वा वर्षापूर्वी तुम्हाला सांगितले होते व त्यासाठी महार जातीने विशेष पुढाकार घेऊन फंड जमा करावा असेही सांगितले होते. त्या माझ्या सांगण्याप्रमाणे काही ठिकाणच्या लोकांनी फंड जमा करून आतापर्यंत मजजवळ दोन अडीच हजार रुपये आणून दिले आहेत. मुंबई सारख्या ठिकाणी आपल्या सार्वजनिक कार्याला पुरेशी पडेल अशी इमारत बांधण्यास कमीत कमी एक लाख रुपये खर्च येणार आहे. एकंदर परिस्थितीचा विचार करता १-२ महिन्यातच या कार्याची मुहूर्तमेढ रोविली गेली पाहिजे. तेव्हा तुम्ही यापुढे स्वस्थ न बसता आजपासून या कार्याला सुरवात करा. दरेक चाळीतील माणसांनी आपल्यातील चार पाच किंवा चाळ मोठी असल्यास पाच

---

जनता : १७ आणि २४ जून १९३९.

दहा योग्य माणसांची कमिटी नेमा व त्यांच्या मार्फत आपापल्या चाळीतील माणसांची खानेसुमारी काढा. कमिटीतील सभासदांची नावे १-२ दिवसात कळवा. खानेसुमारी कशी काढावी याबद्दल तुम्हाला स्वतंत्र मजूर पक्षाच्या ऑफिसमध्ये माहिती मिळेल. ८-१५ दिवसात तुम्ही आपापल्या चाळीतील खानेसुमारी काढून स्वतंत्र मजूर पक्षाच्या ऑफिसमध्ये श्री. उपशाम मास्तर यांच्याकडे आणून द्या. सदर माहिती आणून दिल्यानंतर वर्गणीची रक्कम कशी जमा करावयाची याबद्दल तुम्हाला मागाहून माहिती देण्यात येईल.

या सत्कार्याला ज्यांचा पगार महिना ३० रु. पर्यंत आहे त्यांनी कमीत कमी २ रु. व ज्यांचा पगार ५० रु. पर्यंत आहे त्यांनी ५ रु. व ५० रु. पेक्षा जास्त पगार असणारांनी आपला एक महिन्याचा पगार द्यावा. तसेच शिक्षक, शिक्षकिणी व क्लार्कच्या नोकरीवर असणाऱ्या लोकांनी आपला एक महिन्याचा पगार द्यावयास पाहिजे.

● ● ●

# १५९

# अस्पृश्यांतील जातीभेद नष्ट व्हावेत हा धर्मांतराचा एक हेतू

रोहिदास शिक्षक प्रसारक समाजाचे विद्यमाने चांभार समाजाची शिक्षक परिषद रविवार २ जुलै १९३९ रोजी सायंकाळी आर. एम. भट हायस्कूलच्या हॉलमध्ये प्रि. दोंदे यांचे अध्यक्षतेखाली भरली होती. त्यावेळी निमंत्रित पाहुणे म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचारपरिप्लुप्त असे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आजची सभा रोहिदास समाजातील निरनिराळ्या परीक्षेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांस बक्षिसे वाटण्याकरिता भरणार आहे अशी माझी समजूत होती आणि म्हणूनच मी सभेस हजर राहिलो. पण या सभेत तशा प्रकारचा समारंभ आहे असे दिसत नाही. तथापि, मी येथे हजर आहे म्हणून दोन शब्द सांगावे असा आपला आग्रह आहे म्हणून मी आपल्यापुढे लहानसे भाषण करीत आहे.

प्रथमतः मला प्रामुख्याने सांगावयाचे म्हणजे मी कोणत्याच विशिष्ट जातीच्या चळवळीत भाग घेत नाही. मी सार्वजनिक कामाला आरंभ केल्यापासून जातीनिष्ठ मनोभूमिका कधीच ठेविली नाही. मी महार म्हणून जन्माला आलो असलो तरी महार जात टिकवावी म्हणून मी प्रयत्न करीत नाही. मी चालविलेल्या जनता पत्रात तशा प्रकारची मी कधीही शिकवण दिली नाही. मला महार म्हणून काय उज्ज्वल स्मृती कायम ठेवावयाची आहे ? महारांनी जातीबंधने तोडून टाकावी म्हणूनच मी सदोदित आटापिटा करीत असतो. मी आणि माझे अनुयायी मांग, भंगी, चांभार इत्यादी भिन्नजातींशी रोटी व्यवहार सर्रास करतो व जो जातीभेद मानील त्याचा तीव्र निषेध करतो व इतर जातींनीही तोच उपक्रम करावा म्हणून हमखास सांगत असतो. भिन्न जातीत विवाह व्हावे म्हणून आम्ही सतत प्रचार करीत असतो. पण विवाह ही काही जबरीने घडवून आणण्याची बाब नसल्यामुळे एखादी महाराची मुलगी व मांगाचा किंवा चांभाराचा अगर भंग्याचा मुलगा यांना झाडाशी बांधून व घागर घागर त्यांच्यावर पाणी ओतून काही त्यांचे लग्न लावावयाचे नाही. तथापि, जर भिन्न जातीतील वधुवरे स्वखुशीने विवाह लावीत असतील तर त्यास मी हरएक प्रकारे उत्तेजन देईन व त्यांच्यावर होणारा सामाजिक जुलूम कमी करण्याचा प्रयत्न करीन. हे झाले सामाजिक बाबीसंबंधी. राजकीय बाबतीत मी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली आहे. तो पक्ष सर्वांना मोकळा आहे. आता त्या पक्षात महारांचा भरणा

---

जनता : ८ जुलै १९३९.

अधिक आहे. पण त्याचा दोष माझेकडे नाही. महारांची लोकसंख्याच अधिक असल्यामुळे ते अधिक जमावाने त्यात सामील झाले आहेत. मी काही चांभारांना तुम्ही माझे पक्षात या असे सांगत नाही किंवा आग्रह करीत नाही. ज्याला पक्षाची तत्त्वे पसंत पडतील, ज्यांना त्याचा कार्यक्रम मान्य होईल ते आपोआप येतील अशी माझी खात्री आहे. चांभारांना जर असे वाटत असेल की आपण काँग्रेसमध्ये जावे तर त्यांनी खुशाल जावे. पण त्यांना एक गोष्ट मला सांगावीशी वाटते, ती ही की, त्यांना जी आज काँग्रेसमध्ये किंमत आहे ती जर आम्ही काँग्रेसमध्ये सामील झालो तर कायम राहिल का ? मी आज काँग्रेसच्या बाहेर आहे त्यामुळे त्यांना काँग्रेसवाले जवळ करीत आहेत. काँग्रेसवाले माझा द्वेष करतात म्हणून ते तुमच्यावर प्रेमाची साखर पेरतात. काँग्रेसमध्ये जाणे मला काही फार कठीण नाही. तसे जर मी केले तर आज जे तुम्ही सामील आहात त्यांची काय स्थिती होईल याचा त्यांनी विचार करावा. आमच्यापैकी एकाला दिवाणगिरी मिळाली असती. आज सोनगावकर किंवा तळकर काँग्रेसमध्ये सामील झाले असून देखील त्यांची काय स्थिती आहे ? हात वर करण्यापलिकडे त्यांना काय किंमत आहे ?

काही चांभार लोक माझेवर आरोप करतात की महारांना अधिक प्रमाणात मी मतदानाचा हक्क मिळवून दिला. कारण महार वतनदारांना मताचा अधिकार मिळाला. पण मी या गोष्टी केल्या हे म्हणणे साफ चुकीचे आहे. या गोष्टी प्रांतिक सरकारच्या मताप्रमाणे घडून आल्या आहेत. साधारण शेकडा किती टक्के लोकांना मतदानाचा हक्क द्यावयाचा हे सरकारने ठरविले व त्याप्रमाणे निरनिराळया प्रांतिक सरकारांनी निरनिराळया पद्धती सुचविल्या व त्या सरकारनी अंमलात आणल्या त्यात माझा दोष नाही. पण या बाबतीत मला एक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची आहे. मुंबई प्रांतात वरिष्ठ व कनिष्ठ अशी दोन कायदे मंडळे आहेत. वरिष्ठ कायदे मंडळाचे मुंबई शहरातील मतदार जवळ जवळ ३५० आहेत. त्यापैकी सुमारे ३०० मतदार चांभार आहेत आणि ५० महार आहेत. म्हणजे महारांच्या निदान ६ पट मतदार चांभार आहेत. महारांची लोकसंख्या चांभारांच्या कितीतरी पटीने अधिक आहे. पण हा जो महारांवर अन्याय झाला याची जाणीव माझेवर स्वार्थाचा आरोप करणाऱ्या चांभार पुढाऱ्यांना का झाली नाही ? आम्हाला चांभारांना अधिक मतदार मिळाले म्हणून खंती वाटत नाही. पण खेद वाटतो तो सर्व चांभार समाजाने मनात आणले असते तर केवळ आपल्या मतांच्या जोरावर ते आपला एक प्रतिनिधी वरिष्ठ कायदे मंडळात निवडू शकले असते. पण ही साधी गोष्ट देखील ते करू शकले नाहीत. इतकेच नव्हे तर एक चांभार उमेदवार उभा राहिला होता त्याला विरोध करून काही चांभार पुढाऱ्यांनी दुसऱ्या उमेदवाराला मते जमविण्याचा प्रयत्न केला. दुसरी गोष्ट

अस्पृश्यांच्या चळवळीत महार समाजाने प्रामुख्याने भाग घेतला व कष्ट सोसले ही गोष्ट निर्विवाद आहे. पण त्यामुळे त्यांनी सरकारी नोकऱ्या किंवा अधिकाराच्या जागा अधिक मिळविल्या असे काही झाले नाही. उलट चळवळे म्हणून सर्व जातीवर एक छाप बसला. मी पूर्वीच्या कायदे मंडळात असताना १९२७ सालापासून नाशिक येथील पोलीस ट्रेनिंग कॉलेजात अस्पृश्यांचा प्रवेश व्हावा म्हणून कसोटीचा प्रयत्न केला व त्यात थोडेबहुत यशही आले पण त्यात आतापर्यंत जे उमेदवार दाखल झाले त्यातून महार उमेदवारांना खड्यासारखे वगळण्यात आले. त्यांना अधिकाऱ्यांकडून प्रश्न विचारण्यात येतो की, तू किती विहिरी बाटविल्यास? तेव्हा चळवळीमुळे झाला असेल तर महारांचा तोटाच झाला आहे पण मला त्याबद्दल वाईट वाटत नाही. महार चळवळ करतात ती सर्व अस्पृश्य वर्गांच्या हिताकरता करतात. त्या चळवळीत त्यांचा तादृष्य असा फायदा झाला नाही तरी तो समाज जागृत झाल्याशिवाय राहणार नाही व पुढे गेल्याशिवाय राहाणार नाही. मागे राहातील ते चळवळ न करणारे लोक राहतील. मी चांभार किंवा मांग यांना तुम्ही माझे मागे या असे बिलकूल सांगत नाही. ज्यांना यायचे असेल त्यांनी यावे. कोणी माझे बरोबर राहिला किंवा कोणी मला सोडून गेला तरी त्याबद्दल मला आनंद किंवा रोष वाटत नाही. माझ्या तत्त्वावर, माझ्या कार्यक्रमावर माझा पूर्ण विश्वास आहे आणि माझी खात्री आहे की जे लोक मला सोडून गेले ते देखील माझ्या कार्यक्रमामागे येतील. शिवतरकर मास्तर देखील येतील! ते मला सोडून गेले म्हणून मला त्यांचेबद्दल रोष वाटत नाही किंवा त्यांचेबद्दल मी कोणाजवळ वाईट बोलत नाही. ते मला शिव्या देतात हे मला माहित आहे. पण मी असे म्हणतो की शिवतरकर मास्तर माझे बरोबर १२ वर्षे काम करीत होते. एवढ्या दीर्घावधीत माझ्यातील जे दोष त्यांना दिसले नाहीत ते १३ व्या वर्षीच कसे दिसले ? १२ वर्षे मानवलेले माझे दोष त्यांच्या मते दोष तरी नसले पाहिजेत किंवा असलेच तर ते क्षम्य असले पाहिजेत. तेव्हा माझा मार्ग सरळ आहे व सर्वांना खुला आहे. मी धर्मांतराचे मत पसंत केले. त्यात आपल्यातील महार, मांग, चांभार इत्यादी जातीभेद नष्ट व्हावेत हा एक हेतू आहे. आपण धर्म बदलला तर निदान महार, मांग, चांभार ही नावे तरी आपणास चिकटणार नाहीत. आपण सर्व एक होऊ व उन्नतीच्या मार्गाला लागू. शेवटी तुम्हास मला इषारा द्यावयाचा आहे आणि तेच माझे महत्त्वाचे कर्तव्य आहे असे मी समजतो. कांग्रेस ही हिंदू लोकांची आहे. तिचे अग्रणी गांधी हे तुम्हाला फसवीत आहेत. ' हरिजन सेवक संघ ' हा तुम्हाला गुलाम करण्याचा कावा आहे. त्यापासून तुम्ही सावध रहा व डोळे उघडून वागा. इतके बोलून मी आपली रजा घेतो.

● ● ●

## १६०

# करवाढीच्या तुटीवर हक्क कोणाचा ?

बुधवार ता. १२ जुलै १९३९ रोजी सायंकाळी मुंबईतील सर कावसजी हॉलमध्ये काँग्रेस सरकारच्या करवाढीच्या धोरणास विरोध करण्यासाठी भरलेल्या सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे मुद्देसूद भाषण झाले.

डॉक्टरसाहेब म्हणाले,

सरकारने बसविलेले नवे कर अभूतपूर्व आहेत. अण्णासाहेब लठ्ठे मुंबई सरकारचे मंत्री, यांनी दिलेल्या आकड्यांवरून हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतात करभाराचे प्रमाण काय आहे हे दिसून येते. बिहारमध्ये दर माणसी रु. १-४-०, बंगालमध्ये रु. १-१२-०, आसाममध्ये रु. २-४-०, मध्यप्रांत रु. २-१२-०, संयुक्तप्रांत रु. २-४-०, पंजाबमध्ये रु. ४-८-०, मद्रासमध्ये रु. ३-४-०, सिंधमध्ये रु. ४ व मुंबईमध्ये रु. ६ या प्रमाणात करभार द्यावा लागतो. वरील आकड्यांवरून मुंबई प्रांतात करभार कसा डोईजड आहे हे उघड दिसून येते.

ही झाली प्रांतवार रड. पण चालू करवाढ फक्त मुंबई शहर व उपनगर यावरच लादण्यात आली आहे. मुंबई शहरात आजवर कराचे ओझे दरमाणसी रु. २५ असे. नव्या कर लादणीने ते ओझे रु. ४५ पर्यंत वाढणार आहे. करवाढीच्या प्रयोगात ही गोष्ट अभूतपूर्व आहे. सन १९१९ पासून आजवर मुंबई प्रांतात शिक्षण मोफत व सक्तीचे करण्यासाठी चळवळ चालू आहे. या प्रांतात २४,७९,००० मुले शाळेत जाण्याच्या वयात आहेत. या मुलांच्या संख्येत ६ ते ११ वयाच्या मुलांचाच फक्त अंतर्भाव करण्यात आला आहे. या २४ लाखांवर मुलांपैकी फक्त साडेसात लाख मुलेच काय ती शाळेत दाखल झालेली आहेत. मुंबई प्रांतात २४००० वर खेडी असून त्यापैकी ८००० खेड्यातूनच शाळा अस्तित्वात आहेत. वरील आकड्यांवरुन मुंबई प्रांतात १७,००,००० मुलांचा अज्ञानात कोंडमारा होत असून १६००० खेडी अज्ञानांधकारातच गडप झालेली आहेत हे दिसून येईल. या १७,००,०००, मुलांचा कोंडमारा चालू ठेवावयाचा की काय असा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो. सरकारने या निरपराध मुलांचा विचार करावयास नको काय ?

---

जनता : १५ जुलै १९३९.

आता शेतकऱ्यांना भराव्या लागणाऱ्या शेतसाऱ्याचा आपण विचार करु. शेतसाऱ्यापासून सरकारला रु. ३,००,३८,००० चे उत्पन्न मिळते. हे सरकारसाऱ्याचे ओझे डोईजड आहे याबद्दल दुमत नाही. सारा भरल्यावर शेतकऱ्याला जगण्याचे साधन उरत नाही. या सरकारसाऱ्याच्या डोईजडपणाबद्दल काँग्रेसच आजवर ओरड करीत आली आहे. शेतकऱ्यांच्या या दुःस्थितीबद्दल काँग्रेस सरकारने विचार करावयास नको काय?

खेड्यातून लोकांना औषधपाणी तर मिळत नाहीच पण भरपूर पिण्याचे पाणीही मिळत नाही याचा सरकारने विचार अवश्य करावयास हवा.

मुंबई शहराकडे आपण वळू या. या शहरात १३,००,००० लोकसंख्या असून त्यामध्ये ६,००,००० कामगार लोक आहेत. या कामगार वर्गात बेकारी माजली आहे. रात्रंपाळया बंद होत असल्यामुळे या बेकारांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. अशा लोकांना एकतर काम देणे अगर त्यांना जीवन सामग्री पुरविणे हे सरकारचे आद्य कर्तव्य आहे, असे प्रत्येक सुधारलेल्या देशात मानण्यात येते. सरकारच्या मदतीवर या बेकार लोकांचा हक्कच आहे.

आपल्यापुढे असलेला प्रश्न अगदी सोपा आहे. तो प्रश्न असा–सरकार करवाढीच्या तुटीने जे रु. १,६९,००,००० जमा करणार आहे त्यावर कोणाचा हक्क आहे? आपल्या कमकुवत मनामुळे आत्मघात करणाऱ्या दारूबाजांचा त्यावर हक्क आहे, का अज्ञानात लोळणारी मुले, सरकारसाऱ्याने खचलेले शेतकरी, रोगाने मृत्यूमुखी पडणारे अज्ञानी लोक व सामाजिक अन्यायाने बेकार होऊन उपाशी मरणारे कामगार, यांचा त्यावर हक्क आहे ?

या प्रश्नाला माझे असे उत्तर आहे की, दारूबाज दुःख भोगतो ते आपल्या करणीने भोगतो. निरनिराळे हक्कदार पुढे आले की, त्यांच्या हक्काच्या खरेखोटेपणाचा निवाडा करावयाचा एकच मार्ग आहे, तो मार्ग म्हटला म्हणजे दुःखनिर्मितीला कारण काय हे पाहाणे हाच होय.

सामाजिक अन्यायाने दुःख निर्माण झाले आहे का ते स्वतःच्या दुर्वर्तनाने निर्माण झाले आहे हे निवाडा देताना अवश्य पाहिले पाहिजे.

म्हणून सामाजिक अन्यायाने दुःखी झालेल्या लोकांकडे कानाडोळा करून, स्वतःच्या पायांवर धोंडा मारून घेणारांच्या मदतीस धावणे ही सरकारची घोडचूक आहे असे मला वाटते.

आता दारूबंदीच्या कायद्याचा आपण विचार करू. दारूची आयात करणे, निर्गत करणे, ती इकडून तिकडे धाडणे, जवळ बाळगणे हा कायद्याने गुन्हा होतो.

पण दारू पिऊन बेहोष होणाराचे काय ? दारू पिणे हाच कायद्याने गुन्हा ठरवावयास हवे होते पण तसे करण्यात आले नाही. दारूबंदी यशस्वी होणार नाही असे मला वाटते व दारूबंदीसाठी दीड दोन कोटी रुपये फुकट जाणार आहेत. गांधीबुवांना दुखविण्याचे धैर्य नसलेले मंत्री मुंबईला लाभले हे मुंबईतील लोकांचे दुर्दैव होय. नाहीतर मुंबईच्या मंत्र्यांना मद्रासचे राजगोपाळचारी यांचा धडा घेऊन गांधीबुवांना धाब्यावर बसवता आले असते यात संशय नाही.



# १६१

# स्वातंत्र्याचा अर्थ उच्चवर्णीयांना स्वातंत्र्य व आमच्यावर अधिराज्य असा कधीच होऊ शकत नाही

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे महायुद्धाशी संबंधीत ठरावावरील चर्चेत सहभागी होताना ता. २६ ऑक्टोबर १९३९ रोजी विधीमंडळात भाषण झाले.

स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी डॉ. भीमराव आंबेडकर टाळयांच्या गजरात भाषण करावयाला उभे राहिले. प्रथम त्यांनी अध्यक्षांना जास्त वेळ देण्याची विनंती केली व ययातीला त्याचा मुलगा कुरुरव याने आपले आयुष्य दिले त्याप्रमाणे आपल्या पक्षातील सभासदांनी जास्त वेळ मिळावा म्हणून त्यांना एकट्याला भाषण क़रण्याची परवानगी दिल्याचे सांगितले. महाभारतातील दृष्टांताने डॉ. बाबासाहेब यांनी भाषणाला सुरुवात केली व सर्वांनी टाळयांच्या गजरात त्यांचे अभिनंदन केले.

ते म्हणाले,

हा ठराव अप्रस्तुत आहे असे मला वाटते. ज्या राष्ट्रीय मागण्यांचा या ठरावात उल्लेख केला आहे, त्या मागण्या या असेंब्लीत ना. मुख्य प्रधानांनी मांडल्या नव्हत्या. त्या मागण्या त्यांच्या हायकमांडने सादर केल्या. हायकमांडला कायद्यामध्ये अस्तिव नाही. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या बऱ्या वाईट कृत्यावर देखरेख ठेवणारी ती समिती (व्हिजिलन्स कमिटी) आहे. आता त्या मागण्या सरकारने नाकारल्या म्हणून ना. खेर, सर्व डाव फिसकटला, धावा हो धावा, आम्हाला मदत करा, अशा रीतीने हा ठराव मांडीत आहेत. हा या असेंब्लीचा मोठा अपमान आहे.

ना. व्हाईसरॉय यांचे पत्रक ता. १८ रोजी प्रसिद्ध झाले, त्याला आज ७ दिवस झाले. त्या पत्रकाविषयी मत व्यक्त करण्याकरिता हा ठराव नाही. तो क्षुल्लक व उथळ आहे. मला यावर बरेच बोलता येईल. प्रतिस्पर्ध्यावर टीका करण्याची प्रत्येकाला संधी मिळते. पण ना. खेर यांनी मतभेद विसरून जा अशी विनंती केली आहे. म्हणून या ठरावाशी कोणत्या बाबीपुरते माझे सहमत आहे ते मी प्रथमतः सांगतो. हिंदी लोकांच्या इच्छेविरुद्ध त्यांना या युद्धात पडावे लागले यात शंका नाही. आमचे परराष्ट्रीय धोरण ब्रिटिश साम्राज्याच्या गाड्याला जोडले आहे. वसाहती इतकाही आम्हाला दर्जा नाही.

---

जनता : २८ ऑक्टोबर १९३९.

संरक्षणाकरिता हिंदुस्थान समर्थ नाही. संरक्षण खातेही हिंदी कायदेमंडळाला जबाबदार करावे अशी गोलमेज परिषदेचेवेळी आम्ही मागणी केली होती. यादृष्टीने ब्रिटिश सरकारने काहीच केले नाही. इतक्यापुरते आमचे काँग्रेसशी एकमत आहे.

दक्षिण अमेरिकेतील राष्ट्रांना योग्य अशी घटना जेरेमी बेंथम याने तयार करून दिली पण ती अयशस्वी झाली. कपडा शरीराला उत्तम बसला पाहिजे, त्याप्रमाणे घटना योग्य असणे हे मुख्य तत्त्व आहे. गृहमंत्री ना. मुन्शी यांच्या किरकोळ शरीराकरिता तयार केलेले कपडे माझ्यासारख्या जाडजुड शरीराला उपयोगी नाहीत. (हंशा) वाकड्या पायाचा बूट सरळ पायाला बसणार नाही. या गोष्टी लक्षात घेऊन लोकशाहीचा विचार केला पाहिजे. लोकशाही म्हणजे बहुमताचे राज्य होय. आज मुसलमान, अस्पृश्य हे अल्पसंख्य आहेत व ते तसेच राहाणार. बहुसंख्य हिंदुंकडून सहनशीलता, समानता व बंधुत्वाची वागणूक मिळेल काय ?

ना. खेर यांनी होकारार्थी मान हालविली या गोष्टीचा उल्लेख करून डॉ. आंबेडकर यांनी अस्पृश्य समाजाचे कसे हाल होतात याची उदाहरणे दिली. १९२९ मध्ये अस्पृश्यांच्या परिस्थितीची चौकशी करण्याकरिता नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट १० वर्षापूर्वीची परिस्थिती कशी होती ते उत्तम प्रकारे दाखविते असे ते म्हणाले.

त्यांनी पुढे सांगितले की, या परिस्थितीत काही बदल झाला आहे काय ? कायदेभंगाच्या वेळी काँग्रेसने कौन्सिलवर बहिष्कार घातला. ' कौन्सिल में जाना हराम है ' हे त्यांचे त्यावेळी ब्रीदवाक्य होते. त्याचप्रमाणे ' कौन्सिल में कौन जायगा ? धेड जायगा, चमार जायगा ' असेही ते म्हणत असत. (यावेळी काँग्रेस पक्षीय सभासदांनी नाही, नाही अशी ओरड केली.) याबद्दल मी पुरावा देईन. त्यावेळी अखेर टाइम्सला अग्रलेख लिहावा लागला होता. जात विसरलो, धर्म विसरलो अशी फुशारकी मारणाऱ्या या काँग्रेसवाल्यांची ही मनोवृत्ती, मग मनाचा कायदा पूज्य मानणाऱ्या सनातनींचे मत काय असेल याची कल्पनाच केलेली बरी.

यानंतर डॉ. आंबेडकर यांनी अस्पृश्य वर्गावर होत असलेले अत्याचार, अन्याय, हाल व जुलूम यांची ५-६ उदाहरणे विस्ताराने निवेदन केली. प्रांतिक राज्यकारभारात बहुसंख्य हिंदुंचे कसे वर्चस्व आहे हे रेव्हेन्यूखात्यातील त्यांनी आकडेवार माहिती देऊन सांगितले.

ही सर्व उदाहरणे निवेदन केल्यावर ते पुढे म्हणाले, ना. मुन्शी यांच्या उपसूचनेत संरक्षणाचे तत्त्व मान्य करण्यात आले आहे. पण ते संरक्षण अस्पृश्यांच्या अधिकृत प्रतिनिधींना समाधानकारक असे पाहिजे. गृहमंत्री आपण अल्पसंख्यांकांचे ट्रस्टी आहोत असे समजतात. आमचे ट्रस्टी व संरक्षक दुसरे कोणी नाही. म्हणून त्यांची उपसूचना मला मान्य करता येत नाही. दुसऱ्या उपसूचनेत ना. मुन्शींनी आमचे अर्धे म्हणणे मान्य केले आहे. सध्याची राज्यव्यवस्था आर्यांच्या चातुर्वर्ण्यासारखी आहे. क्षत्रियांनी राज्य करावे, ब्राह्मणांनी ज्ञानदान करावे, वैश्यांनी व्यापार करावा व शुद्र आणि अतिशुद्रांनी सेवा करावी अशी ती तत्त्वे होती. वैश्यांनी आता राजकारणाचाही व्यापार सुरु केला आहे. (हंशा) पण शुद्रांच्या दर्जात फरक झालेला नाही. या अन्यायाविरुद्ध माझे रक्त उसळते. सामाजिक, आर्थिक व धार्मिक वर्चस्वाच्या जोडीला राजकीय वर्चस्व घालण्याला मी माझ्या रक्ताच्या शेवटच्या थेंबाने विरोध करीन. (टाळ्या) स्वातंत्र्याचा अर्थ उच्चवर्णीयांना स्वातंत्र्य व आमच्यावर अधिराज्य असा कधीच होऊ शकत नाही.

आयर्लंडमध्ये अल्स्टर प्रांतीय लोकांनी संरक्षण नको पण स्वातंत्र्य पाहिजे असा आग्रह धरल्याचा दाखला देऊन डॉ. आंबेडकर म्हणाले, मी ते मागत नाही. आम्हाला योग्य ती संरक्षणे द्या इतकीच आमची मागणी आहे. वैयक्तिक स्वार्थापेक्षा देश मोठा आहे. स्वार्थाची मी कास धरली असती तर निराळ्या ठिकाणी मी आज असतो. मला दोन गोष्टी पूज्य आहेत. एक देश व ज्या जातीत जन्मलो व वाढलो ती अस्पृश्य जात ह्या त्या होत. माझ्या जमातीकरिता मी इतर सर्वांचा त्याग करावयाला तयार आहे.

नंतर मुस्लिम लीग लोकशाहीच्या तत्त्वाविरूद्ध असली तरी स्वायत्ततेच्या विरूद्ध नाही असे त्यांनी स्पष्टीकरण केले. लोकशाही, राजसत्ता हे सर्व घटनेचे प्रकार आहेत, स्वायत्तता हे मुख्य तत्त्व आहे असे ते म्हणाले.

शेवटी त्यांनी सांगितले की, ना. मुख्य प्रधान उत्तम मुत्सद्दी आहेत. पण मंत्रिमंडळाने राजीनामा देण्याला ते कायदेमंडळाची संमती का मागतात तेच मला कळत नाही. तो त्यांच्या पक्षाचा प्रश्न आहे. राजीनामा देण्याला जर त्यांना माझी परवानगी पाहिजे, तर मी बोलाविल्याशिवाय यावयाचे नाही अशी अट ते कबूल करावयाला तयार आहेत काय ?

• • •

## १६२

# न्याय्य हक्काआड सरकार आले तर बंड करा पण अन्याय सहन करू नका

मुंबई इलाखा वतनदार महार, मांग, वेठिया परिषदेविषयी पत्रक काढण्यात आले. ते येणेप्रमाणे,—

" ता. १६ शनिवार व १७ रविवार, डिसेंबर १९३९ जागा–हरेगाव, शुगर फॅक्टरी, ता. कोपरगाव, जि. अहमदनगर, अध्यक्ष–डॉ. बाबासाहेब आंबेडकर.

सर्व वतनदार महार, मांग, वेठिया वगैरे बंधु-भगिनींना विनंतीपूर्वक कळविण्यात येते की, वतनाबद्दल आपणास वाटत असलेला अभिमान व लोभ विचारात घेऊन सरकार वतनदार महार, मांग, वेठिया वगैरे लोकांवर वेळोवेळी अन्यायी व जुलमी बंधने लादीत आहे. गावकामगार महार वगैरे लोक इमाने इतबारे सर्व सरकारी कामे करीत असूनही पाटील, तलाठी वगैरे लोकांच्या खोडसाळ रिपोर्टावरून शेकडो महारांना सरकारी कामे करीत नाहीत म्हणून दंड करण्यात येत आहे. तर गावकामगार महारांकडून पूर्वी जी सरकारी कामे करवून घेतली जात असत ती सर्व सरकारी कामे गावकामगार महार वगैरे लोकांकडून करवून घेऊन दारिद्र्याने गांजलेल्या व असलेली जुडीपट्टी मोठ्या कष्टाने भरणाऱ्या महार वगैरे लोकांच्या इनाम जमिनीवर हजारो रुपयांनी जादा जुडी वाढवून त्यांना अधिक कंगाल करण्यात येत आहे. तसेच त्यांनी सरकारी म्हणून करावयाच्या कामाचे भलतेच लटांबर त्यांच्यामागे लावून त्यांना जर्जर करून सोडले आहे.

या सर्व जुलूमांचा आपण वेळीच विचार करून आपले रास्त मागणे सामुदायिकरित्या मागावयास हवे आहे. आपल्या रास्त मागण्यांचा जर सरकारनी विचार केला नाही तर आपल्यावर होणाऱ्या या जुलूमांचा सनदशीर मार्गांनी प्रतिकार केला पाहिजे. या सर्व महत्त्वाच्या व आपल्या जिव्हाळ्याच्या बाबींचा विचार परिषदेत होणार असल्याने आपण सर्वांनी या प्रसंगी येण्याची कृपा करावी.

अनेक अडचणींमुळे परिषदेसाठी येणाऱ्या पाहुण्यांची जेवणाची व्यवस्था व्यवस्थापक मंडळास करता येणे शक्य नाही. हे कळविण्यास अत्यंत वाईट वाटते. यासाठी सर्वांनी आपापल्या पुरत्या भाकरी बरोबर आणाव्यात अशी नम्र विनंती आहे.

---

जनता : ९ डिसेंबर आणि २३ डिसेंबर १९३९.

या परिषदेबाबत कोणास काही पत्रव्यवहार करणे असल्यास तो त्यांनी श्री. भाऊराव कृष्णराव गायकवाड, एम. एल. ए., नाशिक, यांच्या पत्त्यावर करावा.''

याप्रमाणे आयोजित मुंबई इलाखा महार, मांग, वेठिया, वतनदार परिषदेत अध्यक्ष या नात्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अत्यंत उद्‌बोधक, तडफदार व कळकळीचे भाषण दिनांक १६ डिसेंबर १९३९ रोजी हरेगाव, येथे झाले.

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

आजची परिषद महार, मांग व वेठिया यांच्या वतनाचा विचार करण्यासाठी बोलावण्यात आली आहे. ही परिषद का बोलाविण्यात आली याचे सविस्तर विवेचन या परिषदेचे स्वागताध्यक्ष, माझे मित्र श्री. भाऊराव गायकवाड यांनी केलेले आहेच. तरी त्यांच्या भाषणास धरूनच माझे भाषण असल्यामुळे प्रथमतः श्री. भाऊरावांच्या भाषणातील मुख्य मुद्दे मी आपणास पुन्हा सांगत आहे. त्यांनी मुख्यतः महार, मांग, वेठिया वतनदारांची चार तऱ्हेची गाऱ्हाणी आपल्यापुढे मांडली आहेत. या वतनदारांचे पहिले गाऱ्हाणे म्हणजे सरकारने अन्यायाने सुरू केलेली 'जुडीवाढ' हे होय. त्यांना मोबदला न देता त्यांच्या जमिनीही जप्त करण्यात आल्या आहेत. जप्त केलेल्या जमिनींच्या किंमतीवरील व्याज त्यांना देणेही सरकारने आता बंद केले आहे.

या वतनदारीने त्यांच्यावर लादलेल्या कामाबद्दल मिळणारा मोबदला अपुरा असून त्यांना जी नगद रक्कम देण्यात येते ती सुद्धा अलीकडे बंद करून त्याजवर आणखी एक अन्यायाचे ओझे लादण्यात आले आहे. अशारीतीने या दारिद्र्यात खितपत पडलेल्या लोकांची चारही बाजूने पिळवणूक करण्यात येत असून त्यांच्या दारिद्र्यात भर टाकण्यात आली आहे.

काँग्रेस मंत्रिमंडळाने या वतनदारांनी करावयाची १९ कामे नमूद करणारा एक जाहीरनामा नुकताच प्रसिद्ध केला आहे. या जाहीरनाम्यात जी कामे नमूद केली आहेत त्यापैकी काही कामे जबरदस्त असून ती या गावकामगारास करणे अशक्य आहे.

ही झाली वतनदार कामगारांची रडकथा. याशिवाय खेडोपाडी असे अनेक गावकामगार आहेत की, त्यांना सरकारी कामे करावी लागतात. पण त्यांना जमीनी मात्र दिलेल्या नाहीत व सरकारी पगारही नाही. गावात भीक मागून त्यांना आपली गुजराण करावी लागते. मरमर मरेपर्यंत त्यांना सरकारी कामे करावी लागतात. या इमानदार नोकरास पगारपाण्याशिवाय तडफडत जीवन कंठणे सरकार भाग पाडीत आहे, हा केवढा अत्याचार ?

आता जुडीवाढीच्या वतनदारांच्या या पहिल्या गाऱ्हाण्याकडे आपण वळू या. या गाऱ्हाण्याचे स्वरूप कळण्यासाठी ' जुडी ' हे काय प्रकरण आहे ते आपण प्रथमतः पाहिले पाहिजे. सरकारी नोकरांना वतनी जमीनी देण्याची

पुरातन चाल असून ती पेशवाईत व मुसलमानी राज्यात जारी होती. त्या वेळची परिस्थिती आजच्याहून भिन्न होती. आज माणसाच्या लायकीप्रमाणे, त्याला नोकरी देण्याची साधारणतः वहिवाट आहे. पण जुन्या काळी नोकरी वतनदार पद्धतीने वंशपरंपरा चालत असे. पूर्वी नोकरीचा मोबदला इनाम जमिनीच्या रूपाने देण्यात येत असे. आज नोकरांना वेतन देण्यात येत असते. पूर्वी गावोगावी, कारूनारू व बारा बलुते असत. त्यातच महारांचा समावेश होत असे. या वतनदारांचा शेतसारा माफ असे. पेशवाईच्या शेवटी शेवटी, या लोकांकडून पैशाच्या टंचाईमुळे अल्प प्रमाणात घेण्यात येणाऱ्या साऱ्यालाच जुडी म्हणतात. ही जुडी रोखीने वसूल न करता धान्याच्या रूपाने घेण्यात येत असे. इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर पूर्वीच्या वतनांपैकी काही वतने नष्ट करण्यात आली व काही चालू ठेवण्यात आली. यावेळी मामुली जुडी न वाढविण्याचे आश्वासन देण्यात आले होते. सन १८२७ ते १८७५ पर्यंत जुडी न वाढवून वरील आश्वासन पाळण्यात आले. सन १८७५ मध्ये जुडी संबंधीच्या कायद्यात कामगार महारांचा पगार वाढविण्यासाठीच ती जुडी वाढविण्यात येईल, असे एक कलम आहे. असे कलम असताही आता जुडी का वाढविण्यात येत आहे ते कळत नाही. महारांचा पगार वाढविण्यासाठी ही जुडीची वाढ करण्यात येत नसल्याने ही वाढ सर्वतोपरी बेकायदेशीरच आहे. जुडीची वाढ करून सरकारच आज कायदेभंग करीत आहे, असे म्हणावयास हरकत नाही. रामोशांचा पगार वाढविण्यासाठी ही महारांची जुडी वाढविण्यात येत आहे, असे सरकारचे म्हणणे आहे. पण वतन ही चीज अशी चमत्कारिक आहे की ती एका घराण्यातून दुसऱ्या घराण्यात जाऊ शकत नाही. एका महाराचे वतन दुसऱ्या महार घराण्यातही जाणे शक्य नाही. असे असताही रामोशांसाठी महारांची जुडी सरकार वाढवीत आहे हा केवढा अन्याय ? महार गरीब आहेत, गरिबांचा वाली कोणी नाही, हीच गोष्ट सरकारने आपल्या वर्तनाने सिद्ध केली आहे. महार चळवळ करतात, ते माजले आहेत, असेच स्पृश्य हिन्दुप्रमाणे सरकारचे मत असले पाहिजे, नाही तर महाराला नागवून रामोशांची पगारवाढ करण्याचे प्रयोजन काय ? रामोशांना भरपूर पगार दिलेच पाहिजेत, असे माझेही मत आहे, पण महारांना नागवून ही पगारवाढ करणे अन्यायाचे आहे असे मला सांगावयाचे आहे.

सरकारचे कवडीइतकेही काम न करता वतने भोगणारे अनेक फुकटखाऊ वतनदार आज या हिन्दुस्थानात आहेत. त्यांच्या पैशातून रामोशांचा पगार वाढविण्यास काय हरकत आहे ते समजत नाही.

पेशवाईत देसाई, देशपांडे, देशमुख, कुळकर्णी, पोतदार, पाटील वगैरे अनेक वतनदार असत. वशिलेबाजीने त्यांची संख्या खूप माजली होती.

इंग्रजी राज्यात त्यांना आता कुठेही काम उरलेले नाही. त्यांच्या नोकऱ्या गेल्या तरी त्यांना नोकरीसाठी दिलेल्या जमीनी मात्र त्यांच्याकडेच कायम करण्यात आल्या आहेत. त्यांच्या उत्पन्नातून रुपयास पाच आणे कापून अकरा आणे त्यांना बहाल करण्यात आले. या व्यवहाराने या जुन्या काळाच्या नोकरांना वंशपरंपरा सरकारने रयतेच्या पैशातून पेन्शनच दिले असे म्हणण्यास हरकत नाही.

आता रामोशांना पगार द्यावयाचा तो महारांची जुडी वाढवून न देता, या ऐतखाऊ पेन्शनरांवर जुडी बसवून सरकारने दिला नाही, याचे कारण एकच आहे. हे कारण म्हणजे देवो दुर्बलघातकः हेच होय, यात शंका नाही. या वंशपरंपरा पेन्शन भोगणाऱ्या लोकांवर जुडी बसवून महार व रामोशी या दोन्ही दारिद्र्यात खितपत पडलेल्या लोकांना सरकारास सुखी करता आले असते, पण तसे करणे भांडवलशाही सरकारास कसे खपणार ?

पूर्वीच्या काळी सरंजामदारांचाच एक वर्ग होता. हे लोक आपल्या पदरी फौजफाटा ठेऊन वेळप्रसंगी सरकारास मदत करीत असत. त्यांनाही त्या काळच्या सरकारने जमीनी दिलेल्या आहेत. आज या वर्गावर फौजफाटा जवळ बाळगण्याची जबाबदारी नाही, तरीसुद्धा त्यांच्या जमीनी त्या वर्गाच्या ताब्यातच ठेवण्यात आल्या असून या जमीनीपासून त्यांना आज २,६७,५०१ रुपयांचे उत्पन्न मिळत असते. या रकमेतून रामोशांना सहज पगारवाढ देता आली असती. पण मग सरकारास बेशरमपणाने महारांचे हाल कसे करता आले असते ? वरील विवेचनावरून आपले माय बाप सरकार पूर्णपणे ' फुकटे धार्जिणे ' आहे ही गोष्ट उत्तम रीतीने सिद्ध होत नाही काय ?

आता गावकामगारांच्या मुशाहिऱ्याच्या प्रश्नाचा आपण विचार करू. खेडोपाडी पाटील, कुळकर्णी व महार हे सरकारी कामगार आहेत. त्यांच्याशी सरकारचे वागणे कसे पक्षपातीपणाचे आहे हे पुढील उदाहरणावरुन उघड होते.

गावोगावच्या पाटलांना सरकार पासोडी, जमीन, शेतसाऱ्याच्या प्रमाणात पेशगी व किरकोळ खर्चासाठी कागदबाद रक्कम देत असते. गावकामगार महारांना मात्र काही ठिकाणीच जमीनी देण्यात आल्या आहेत. कोकणातील महारांना जमीन नव्हती व देशावरही अनेक गावच्या महारांना जमीनी नाहीतच. जमीनीच्या अभावी या सरकारी नोकरांना सर्वस्वी बलुत्यावर

अवलंबून राहावे लागते, हे सांगणे नकोच. सरकारी कामाबद्दल गावकामगारांना पगार देण्याची जबाबदारी सरकारचीच नाही काय ? ही जबाबदारी फेटाळणारे सरकार अन्यायी आहे व अशा अन्यायी सरकारची सेवाचाकरी करणारे महार नादान आहेत, असे म्हणण्याशिवाय गत्यंतर नाही. सरकार हे काही महारांचे व्याही, जावई नाहीत, मग त्यांची सेवाचाकरी महारांनी विनावेतन का करावी ? धनी पगार देत नाही तर धन्यास ठोकर मारण्यास नोकरांनी शिकले पाहिजे. या परिषदेच्या द्वारा आपण आज सरकारास सहा महिन्यांची नोटीस देऊ. या मुदतीत सरकारने महार कामगारास योग्य पगार देण्याची व्यवस्था केली तर ठीक, नाही तर विनावेतन काम करणाऱ्या लोकांनी इलाखाभर संप पुकारावयास हवा, असे माझे सांगणे आहे.

' या गावकामगारांनी करावयाच्या १९ कामांची यादी सरकारने नुकतीच प्रसिद्ध केली आहे. ही यादी प्रसिद्ध झाल्यापासून स्वतंत्र मजूर पक्षाने ही कामे महारांवर लादली आहेत, असे श्री. रणखांबे प्रतिपादन करू लागले आहेत. स्वतंत्र मजूर पक्ष मूर्खपणा करीत आहे, तो पक्ष चुकत आहे, असे कोणी म्हणू लागला तर त्याबाबत वादविवाद करून स्वतंत्र मजूर पक्षाला आपले म्हणणे योग्य आहे, असे सिद्ध करण्याचा मार्ग खुला आहे. पण स्वतंत्र मजूर पक्ष हा अप्रामाणिक आहे, असे तुपाच्या लालचीने कोणी प्रतिपादन करू लागला तर तो गृहस्थ हरामखोर आहे, असे म्हटल्याशिवाय गत्यंतरच नाही.

स्वतंत्र मजूर पक्ष अप्रामाणिक असता तर राजकारणात बहुसंख्य असलेल्या काँग्रेस पक्षाशी त्याने उघडपणे, छातीठोक विरोध केला नसता. गांधी पक्षाला मिळणे, त्या पक्षाची खुशामत करणे याला काही विशेष प्रामाणिकपणा अंगी असावा लागतो असे नाही. त्या पक्षाला मिळणे, त्याच्याशी सहकार्य करणे ह्या गोष्टी सोप्या आहेत. दोन दिडक्यांची गांधी टोपी डोक्याला अडकवली की ज्या पक्षाच्या नालायक माणसास दिवाणपदही प्राप्त होते, त्या पक्षाला मिळणे, त्याचा उदो उदो करणे म्हणजे काही सुळावरची पोळी नाही, ही गोष्ट आमच्या टीकाकारांनी अवश्य लक्षात घ्यावयास हवी.

आता सरकारने जाहीर केलेल्या गावकामगारांच्या कामांचा विचार करू. या बाबतीत एक गोष्ट गावकामगारांनी लक्षात ठेवली पाहिजे, त्यांना वतन हवे असल्यास त्यांनी वतनासाठी काम पत्करलेच पाहिजे. वतन हवे पण काम नको असे म्हणून चालणार नाही, पण सरकारने प्रसिद्ध केलेल्या गावकामगारांच्या यादीत महारांवर लादलेली खालील कामे त्यांनी करावयाची तर त्यांना रोज मजूरी देणे अगत्याचे आहे. सरकारचा वसूल तिजोरीत भरणे, सरकारी दप्तर नेणे व आणणे, सरकारी टपाल नेणे, आणणे, कोंडवाड्यातील गुरे लिलावासाठी नेणे,

अधिकाऱ्यांसाठी तंबू , राहुट्या लावणे ही कामे रोजंदारी दिल्याशिवाय महारास करावयास लावणे हा निव्वळ वेठीचाच एक जुलूमी प्रकार आहे. गावातल्या गावात जी कामे करावयाची ती नेहमीप्रमाणे करावी पण बाहेरगावी जावून करावयाची कामे कोणीही रोजंदारीशिवाय करता कामा नये. अशा बाहेरगावच्या कामासाठी कामगारास रोजी आठ आणे तरी रोजंदारी मिळालीच पाहिजे.

काम नं. १५ बेपत्ता मयताची व्यवस्था लावणे हे आहे. हे काम करण्यास कोणीही स्वाभिमानी महार तयार होणार नाही.

काम नं. २ हे सरकारी माहिती देण्यासाठी गावकऱ्यांना बोलावणे हे होय. हे काम घरोघर बोलावणे न करता दवंडी पिटवून करून घेण्यात आले पाहिजे. जन्म-मृत्यूची नोंद करण्याचे काम महारावर लादणे अन्यायाचे आहे. ज्याच्या घरी जन्म अगर मृत्यू होईल त्याजवरच त्याची नोंद करण्याची जबाबदारी ठेवावयास हवी.

अशा रीतीची वतनदार महार, मांग व वेठी यांची बहुविध गाऱ्हाणी आहेत. ही दूर करून घेण्यासाठी आपण गव्हर्नर साहेबांकडे डेप्युटेशन नेऊन त्यांना ती समजावून दिली पाहिजेत. याबाबत एक सविस्तर अर्जही आपण सरकारकडे धाडला पाहिजे. इतक्याने काम भागून आपली गाऱ्हाणी दूर झाली तर ठीकच, पण आपला जय झाला नाही तर आपण सत्याग्रह पुकारू. या अन्यायाचा प्रतिकार करावयास हवा.

आपली स्थिती आज जुन्या कपड्यासारखी झाली आहे. ठिगळे लावून ही परिस्थिती सुधारणार नाही. आकाशाला कोण कशी ठिगळे लावणार ? आपण वतने सोडण्याशिवाय आपला तरणोपाय नाही.

सन १९२६ पासून मी ही गोष्ट सांगत आहे. त्यावेळी वतने, महारकी, डल्ल्या, सागुती यांचा मोह आपणास सुटत नव्हता. आज आपला दृष्टीपालट झालेला पाहून मला कृतार्थ वाटत आहे.

वतने सोडा पण हातच्या जमिनी मात्र गमावू नका. शेतसारा भरा व वतनाच्या गुलामगिरीतून मुक्त होऊन स्वाभिमानी शेतकरी बना. काम न करता इतरांना दिलेली वतने कायम ठेवण्यात आलेली आहेत. कुलकर्ण्यांची आज चंगळ आहे. त्यांना सरकारने पेन्शनरच बनवले आहे. अशा स्थितीत तुमच्या न्याय्य हक्काआड सरकार आले तर खुशाल बंड करा पण अन्याय कदापि सहन करू नका.

या अन्यायाची दाद लाऊन घेण्यासाठी आपण एक कमिटी नेमून कामास आरंभ करु या. आपण सरकारकडे अर्ज करू, डेप्युटेशन नेवू. सर्व काही कायदेशीर रीतीने करू. एवढ्यावरच काम भागेल अशी मला आशा आहे. काम नच झाले तर काय करायचे हेही आपण ठरवू. शेवटी माझ्या वतन बिलाचे काय झाले ते सांगून मी आपले भाषण संपविणार आहे.

काँग्रेस सरकार सुरू होण्यापूर्वी जे तात्पुरते कूपर मंत्रीमंडळ अस्तित्त्वात आले होते त्यावेळी दिवाण पद स्वीकारण्याचे मी नाकारल्यामुळे थोड्या काळपर्यंत काँग्रेस सभांमध्ये माझा भाव थोडासा वधारला होता.*

काँग्रेस राज्य सुरू झाल्यावर माझ्या वतन बिलास त्यांनी पुष्टी देण्याचे आश्वासन दिले होते. पण कालांतराने काँग्रेसचे पारडे फिरले. हे पारडे फिरले तरी मला त्याची पर्वा नाही. माझ्या हातात अजून काही बाण शिल्लक आहेतच. पुणे करारापूर्वी गांधींनी उपवास केला. त्यानंतर त्यांचा व काँग्रेसचा हृदयपालट होईल, अशी मला आशा होती. आम्ही एकमेकांचे सहकारी होऊन कार्य करू अशी मला उमेद होती. पण शेवटी चोरांशी सहकार्य अशक्य असाच अनुभव आला. काँग्रेसला आज पूर्ण स्वातंत्र्य हवे आहे. हे स्वातंत्र्य देण्यापूर्वी आमच्याही काही अटी पूर्ण झाल्या पाहिजेत. दुसऱ्यास एक भाकर देण्यापूर्वी आम्हास चतकोर तरी मिळालीच पाहिजे. आम्हास उपाशी ठेवून कोणी मेजवान्या झोडू लागल्यास त्यांच्या अन्नात माती कालविल्याविना आम्ही राहणार नाही. या आणीबाणीच्या प्रसंगी तुम्ही सर्वांनी एकजुटीने व निकराने वागले पाहिजे हे मात्र विसरू नका.



---

* ''स्वतंत्र मजूर पक्ष अशा मताचा होता की, भारताचे नवे संविधान, ते म्हणजे, भारत शासन अधिनियम, हे दोषपूर्ण होते आणि पूर्ण जबाबदार शासनासाठी ते तोकडे पडत होते. काँग्रेस पक्षाचेसुद्धा या संविधानाने समाधान झाले नव्हते आणि ते मोडून टाकण्याचा त्यांचा निर्धार होता. पहिल्यांदा त्यांनी कार्यालय स्वीकारले नाही, परंतु मागाहून जुलै, १९३७ मध्ये त्यांनी शासन बनविले तेव्हा सर धनजी शहा कूपर इतर मंत्र्यांसह मुख्यमंत्री झाले आणि ते लोक काही काळ शासन चालवित होते. सर धनजी शहांनी डॉ. आंबेडकर यांना आमंत्रण दिले होते, पण ते त्यांनी नाकारले, कारण ते अशा मताचे होते की सर धनजी शहाच्या शासनाला बहुसंख्यांकांचा पाठिंबा नव्हता आणि म्हणून ते विधिग्राह्य शासन नव्हते. आमच्या पक्षाने म्हणून शासनामध्ये प्रवेश केला नाही.''—न्या. आर. आर. भोळे यांचा ''स्वतंत्र मजूर पक्ष आणि मुंबई विधानसभा'' या शिर्षकाखालील लेख–डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरवग्रंथ-महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,मुंबई. पृष्ठ १३६-३७.

# १६३

# तरुणांनो, निर्भय व्हा : स्वाभिमान जपा

ता. २४ डिसेंबर १९३९ रोजी दुपारी सातारा जिल्हा अस्पृश्य युवक परिषद अंकलखोप येथे भरली होती. परिषदेचे अध्यक्षस्थान डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुशोभित करण्याचे कबूल केले होते. सभेस अलोट जनसमुदाय हजर होता. अंकलखोप येथे जात असता वाटेत भिलवडी गावी डॉक्टरसाहेबास स्थानिक स्त्रियांनी ओवाळून त्यांच्याबद्दल आपल्या ठायी वसत असलेली अलोट भक्ती व्यक्त केली. स्वागत मंडळाचे अध्यक्ष मि. पी. टी. मधाळे व इतर सभासद यांनी टोलेजंग मिरवणूक काढून डॉ.साहेबांसह परिषदेच्या मंडपात प्रवेश केला. डॉक्टरसाहेबांचे प्रचंड टाळयांच्या गजरात, सभाजनांनी स्वागत केले.

परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. मधाळे यांनी स्वागतपर भाषण केले, त्यात ते म्हणाले, आपणा अस्पृश्यांवर डॉ. बाबासाहेबांचे परमेश्वरापेक्षाही जास्त उपकार झालेले आहेत. सज्जनांचे संरक्षण करून दुर्जनांचे संहारण करण्यासाठी परमेश्वराने दहा अवतार घेतल्याची दंतकथा हिंदू धर्मात आहे. पण या दहा अवतारातील एका अवताराලाही आपणा अस्पृश्यांची व त्यांच्यावरील जुलूमांची आठवण झाली नाही. आजकाल आपणास हरिजन म्हणून गोंजारणाऱ्या महात्म्यांनीही आपल्या स्वाभिमानास पोषक असे कार्य मुळीच केलेले नाही.

स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षीय भाषण झाले, ते आपल्या भाषणात म्हणाले,

'भगिनींनो, तरूण मित्र व बंधुजनहो,

आजची सभा प्रामुख्येकरून तरुणांची आहे. माझे मित्र श्री. मधाळे, आजच्या सभेचे स्वागताध्यक्ष हे तरुणच आहेत. या सभेत तरुणांपुरतेच भाषण होईल अशी आपली अपेक्षा असणार. पण सभेस तरुणांप्रमाणेच तरुणात न मोडणारे इतर लोकही हजर असल्याने त्यांना आपल्या समाजाच्या जिव्हाळयाच्या निरनिराळया प्रश्नांसंबंधी मी बोलावे असे वाटत असणारच. म्हणून प्रथमतः या

---

जनता : ६ जानेवारी १९४०.

लोकांना दोन शब्द सांगून नंतर मी तरुणांच्या प्रश्नांकडे वळतो' (येथे डॉ. साहेबांनी हरेगावच्या महार वतनदार कामगारांच्या सभेत मांडिलेल्या प्रश्नांची चर्चा करून ते प्रश्न सभाजनास समजावून दिले.)

नंतर तरुणांस उद्देशून ते म्हणाले, 'जनता' पत्रातून माझे विचार दर आठवड्यास प्रसिद्ध होत असतात. ते पत्र वाचल्याने आपणास आपल्या जिव्हाळयाच्या प्रश्नांची माहिती होत जाईल.

आपणास स्वाभिमानाची अत्यंत जरूरी आहे. स्वाभिमान सोडून साधलेली उन्नती ही कुचकामाची आहे. इतरांप्रमाणेच आपणही माणसेच आहोत ही गोष्ट प्रत्येक तरुणाने आपल्या मनात वागविली पाहिजे.

महारांनी महारवाड्यातच राहिले पाहिजे हे परमेश्वरास कधीही मान्य होणार नाही. हजारो वर्षे चालू असलेल्या जुलूम जबरदस्तीने आपल्या समाजाच्या भावना मारल्या गेल्या आहेत. ब्राह्मणी राज्यात आपण स्वाभिमानाने वागतो तर ' पाह्यरी सोडल्याचा ' आरोप ठेवून आपणास हत्तीच्या पायीही देण्यात आले असते.

आपण उन्नतीचा मार्ग आखला पाहिजे. अशिव व अमंगल अशा आपणातील चाली आपण सोडून दिल्या पाहिजेत. ' पडे खावयाचे व तुकडे मोडावयाचे ' दिवस आता उरले नाहीत. आपल्या लोकांना इतर लोकांप्रमाणेच समाजातील अधिकाराच्या जागा मिळाल्या पाहिजेत. पोलिसात आपल्या लोकांची आता कोठे थोडी थोडी भरती होऊ लागली आहे. अजून पोलीस खात्यात अधिकाराच्या जागा आपल्या सुशिक्षित तरुणांसही मिळत नाहीत ही शोचनीय गोष्ट आहे. अस्पृश्य अधिकारी नेमला तर त्याच्या हाताखालील स्पृश्य नाराज होणार ही भीती सरकारची अजून सुटत नाही, हे देशाचे दुर्दैव नाही काय ?

आपण लोकांनी आपल्या अंगी निर्भयता बाणविली पाहिजे. आपल्या समाजास मानसन्मानाने जगात राहावयाचे असल्यास आपण सदैव मरावयास तयार असले पाहिजे. अशी आपली वृत्ती झाली की आपला अपमान करण्यास कोणीही धजणार नाही ' निर्भय व्हा व जगाचे राज्य मिळवा ' हेच माझे तुम्हा तरुणास सांगणे आहे.

आता आपल्या राजकारणाबाबत मी आपणास दोन शब्द सांगतो. आपणात झालेल्या जागृतीबद्दल मी आपले अभिनंदन करतो. हिंदुस्थानात आपल्या राजकारणाचा मामला पुन्हा सुरू होणार असा रंग दिसू लागला आहे. काँग्रेस पक्ष व अस्पृश्य यामधील मतभेदांची सामदामाने तडजोड होईल असे वाटत नाही.

आपणास मिळालेले राजकीय हक्क पुरेसे नाहीत. काँग्रेस राजवटीतही आपल्या हक्कांचे संरक्षण होत नाही. काँग्रेसला अधिकार अधिक मिळाले की, आपल्यावरील जुलूमाचेही प्रमाण अधिक होते.

आपआपल्या पुरतेच पाहात राहणे हा अल्पसंख्यांकांचा दोष आहे. आपण ब्राह्मणेतर पक्षाचे उदाहरण घेऊ या. जे ब्राह्मणेतर काँग्रेसमध्ये सामील झाले त्यांनी काय मिळविले असा माझा प्रश्न आहे. पुढील आकड्यांवरून ब्राह्मणेतरांनी काँग्रेसच्या कच्छपी लागणे ही भुरळ आहे, हे आपल्या निदर्शनास येईल. ब्राह्मणेतर पक्षाची लोकसंख्या ७५ टक्के असून इतर सर्व पक्षांची लोकसंख्या फारतर २५ टक्के भरेल.

मुंबईच्या कायदेमंडळात २७ ब्राह्मण सभासद आहेत, मंत्रीमंडळात तीन ब्राह्मण मंत्री आहेत. प्रांतातील ७५ टक्के ब्राह्मणेतरांचा या मंत्रीमंडळात एकच दृष्टमणि आहे. यावरून काँग्रेसला मिळालेल्या ब्राह्मणेतरांना काय लाभले हे स्पष्ट होते.

रेव्हेन्यू खात्यातही हीच रड आहे. इलाख्याच्या उत्तर भागात चोवीस मामलतदारांपैकी दहा मामलतदार ब्राह्मण आहेत व इतरही भागातून अशीच विषमता नांदत आहे. यावरून हिन्दी राज्य कारभाराला, मग तो इंग्रज चालवीत असो की, काँग्रेस चालवीत असो, ब्राह्मणबाधा झालेली आहे, हे उघड होते. ब्राह्मण्य हे महाभयंकर विष आहे. ते हलाहलापेक्षाही भयंकर असल्याने शंकरास देखील पचविता येणार नाही. या विषाला उतारा देण्यासाठी भगवान बुद्धाने अवतार घेतला व ब्राह्मण्यावर हल्ला केला. आजचे काँग्रेसवाले ब्राह्मणेतरास चकविण्यासाठी 'रे मार्केटाचे' ' फुले मार्केट ' बनवितात. तद्वतच, बुद्धकालीन ब्राह्मणांनी इंद्र, अग्नी, वरूण ' वगैरे आपल्या वैदिक देवता झुगारुन त्यांच्या जागी ' राम, कृष्णादी ' क्षत्रिय देवांची स्थापना केली व आपल्या काळाच्या ब्राह्मण्य विरोधकास चकवून आपले आसन स्थिर केले. असो, पुढील निवडणुकीत या भागातून आपला एक प्रतिनिधी निवडून द्या व राजकीय सत्ता हस्तगत करण्याच्या मार्गास लागा. दारिद्र्यामुळे आपल्या विद्यार्थ्यांना अनेक अडचणीस तोंड द्यावे लागत असते. या अडचणीत सापडलेल्या विद्यार्थ्यांना

भुलवून स्वाभिमानशून्य बनविण्यासाठी श्री. भाऊराव पाटील व हरिजन सेवासंघ यांनी ठिकठिकाणी सापळे निर्माण केले आहेत. भीष्माचार्यासारख्या वीराला कौरवांचे अन्न खाल्ल्याने पांडवांची न्याय्य बाजू घेता आली नाही, ही गोष्ट ध्यानात धरा व ' अर्थस्य पुरुषोदासः ' अशी आपली स्थिती करून घेऊ नका. आपल्या लोकांनी चालविलेल्या बोर्डिंगासच मदत करून त्याचा फायदा घ्या. सातारा जिल्ह्यात माझे मित्र रा. सावंत यांनी एक बोर्डिंग उघडलेले आहे. या संस्थेस आपल्या लोकांनी भरपूर मदत करावी व तिचा फायदा गरीब विद्यार्थ्यांस करून द्यावा अशी माझी आपणास आग्रहाची विनंती आहे.

●●●

१६४

# सर्व मागासवर्गीयांनी एकजुटीने वागावे

ता. २५ डिसेंबर १९३९ रोजी बेळगाव येथे मुस्लिम लीग तर्फे बॅ. जीना यांची जयंती साजरी करण्यात आली. सदर प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनाही आमंत्रित करण्यात आले होते. जयंतीनिमित्त झालेल्या सभेचे अध्यक्षस्थान बेळगाव येथील मौलाना कुतुबुद्दीन अहेमद यांनी मंडित केले होते. सभेस तीन हजारावर लोक समुदाय जमलेला होता.

अध्यक्षांनी डॉ. बाबासाहेब यांना भाषण करण्यास विनंती केल्यावरून बाबासाहेब टाळ्यांच्या गजरात भाषण करण्यास उभे राहिले. ते म्हणाले,

अध्यक्ष महाराज व मुसलमान बंधुंनो,

या ठिकाणी भाषण करावे लागणार नाही असे मला वाटत होते. परंतु सभाध्यक्षांनी मला बोलण्याची विनंती केली आहे तिचा अव्हेर करून त्यांची निराशा करणे मला योग्य वाटत नाही.

आज आपण आपले पुढारी जिनासाहेब यांचा जन्मदिन साजरा करण्यास जमलो आहो. त्यांचा व माझा व्यवसाय एकच आहे. आम्ही दोघेहीपण बॅरिस्टरच आहोत. राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये आम्ही दोघांनी बरोबरीनेच कार्य केले आहे. काँग्रेसचा त्याजवर राग आहे त्यापेक्षाही जास्त मजवर राग आहे.

बॅ. जीना यांचा मला जो अनुभव आहे त्यावरून मला असे वाटते की, दुसऱ्याच्या आहारी न जाणारे असे मुसलमान पुढारी आहेत त्यात जीनासाहेब हे अग्रगण्य आहेत. ते कोणाच्या पैशाला कधीही भाळणार नाहीत. त्यांना विकत घेणे शक्य नाही. त्यांच्या या निर्लोभीपणामुळेच मला त्याजबद्दल अत्यंत आदर आहे.

आता याप्रसंगी आपणास मुसलमान राजकारणासंबंधी दोन गोष्टी सांगणे अस्थानी होणार नाही असे मला वाटते. मुसलमानांनी, आपण सर्वजण हिंदी आहोत ही गोष्ट विसरता कामा नये. या देशातच आपला जन्म झाला असून आपण येथेच मरणार आहोत हे निश्चित. आपला देश स्वतंत्र राहिला तरच आपण स्वतंत्र राहाणार हेही खरेच आहे. म्हणून देशाच्या स्वातंत्र्याआड येणार नाही असेच धोरण आपण नेहमी ठेवले पाहिजे हे उघड आहे.

---

जनता : ३० डिसेंबर १९३९.

काही मुसलमान असे मानतात की, हिंदुस्तान हा आपला देश नसून अफगाणिस्थान, अरबस्थान, टर्की वगैरे देश हे आपले देश आहेत. परंतु मी आपणास असे विचारतो की, हिंदुस्थान आणि अफगाणिस्तान अगर अरेबिया अथवा टर्की याजमध्ये लढा उत्पन्न झाला तर हिंदी मुसलमान कोणाची बाजू घेणार? हिंदुस्थानची की परकीयांची? हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची जबाबदारी आपणा सर्वांवर आहे ही गोष्ट आपण विसरता कामा नये. ही जबाबदारी हिंदी मुसलमान टाळू पहातील तर हिंदी जनतेचा त्यावर विश्वास राहणार नाही, हे सांगावयास नको.

दुसरी गोष्ट अशी की, मुसलमानांनी सर्व हिंदुंविरुद्ध ओरड करण्यात अर्थ नाही. मुसलमानांनी असे करणे सर्वस्वी चुकीचे आहे. येथे आल्यावर मला असे सांगण्यात आले की लिंगायत व मराठा लोक ब्राह्मणांविरुद्ध आहेत. या विरुद्ध असणाऱ्या लोकात बोलाचालीही होत नाही. लिंगायत, मुसलमान, मराठे व अस्पृश्य हे सर्वच मागासलेले आहेत. या समदुःखी माणसांनी सहकार्य करून एकजुटीने वागण्यास काय हरकत आहे?

खरे पाहू गेले तर असे केले तरच त्यांना आपले हित करून घेता येईल असे मानल्याशिवाय गत्यंतरच नाही. सन १९३७ सालापूर्वी मुंबई सरकारचे दिवाण लिंगायत, मराठा व मुसलमान याच जातीचे नव्हते का ? ते आपसात भांडत नसत, सलोख्याने काम करीत. मग तुम्ही सर्वांनी आता सलोखा करून सहकार्याने का वागू नये हे मला समजत नाही. प्रत्येक जातीने आपल्या जातीच्या हितार्थ निरनिराळया संस्था काढल्या तरी त्या सर्वांनी राजकीय क्षेत्रात एकजुटीने कार्य केल्याशिवाय त्यांचे कल्याण होणार नाही हे निश्चित आहे. बेडकी कितीही फुगली तरी तिला बैला एवढे होता येत नाही. ही गोष्ट जातीय संस्थांच्या बाबतीतही खरीच आहे. मुसलमानांचे प्रांतिक असेंब्लीत तीस प्रतिनिधी आहेत. मुसलमान समाजाने इतर समाजाशी फटकून वागण्याचे ठरविले तर त्यांच्या ३० प्रतिनिधींची संख्या त्यांना एकतीस देखील करता येणार नाही. या तीस मुसलमान प्रतिनिधींनी मुसलमान म्हणून कितीही ओरड केली तरी इतर मागासलेल्या समाजाशी फटकून वागल्याने त्यांचे काहीही बिघडणार नाही. म्हणून मुसलमान समाजाने इतर लहान गटांबरोबर सहकार्य केलेच पाहिजे असे माझे आग्रहाचे सांगणे आहे. असे करण्यात त्यांचे हित आहे.

● ● ●

## १६५

# अन्याय करणाऱ्यांना स्वराज्य मागण्याचा काय हक्क ?

ता. २६ डिसेंबर १९३९ रोजी सकाळी १० वाजता बेळगाव म्युनिसीपालिटीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मानपत्र दिले. त्या मानपत्रास डॉ. बाबासाहेब उत्तर देताना म्हणाले,

येथे होणाऱ्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या परिषदेचा अध्यक्ष म्हणून मला आज संध्याकाळी भाषण करावेच लागणार आहे. आपणापैकी ज्या कोणास माझी राजकीय भूमिका समजून घ्यावयाची जिज्ञासा असेल ते सर्व लोक त्या परिषदेस हजर राहातील असे मला वाटते. अशा परिस्थितीत मी येथे सविस्तर भाषण करण्याची आवश्यकता नाही. आपण मला जे आज मानपत्र दिले आहे त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आजपर्यंत राजकीय कार्यकर्त्यांना जी मानपत्रे आपण दिलीत ती सर्वानुमते देण्यात आली नाहीत असे समजते. पण मला देण्यात आलेले मानपत्र मात्र सर्वानुमते देण्यात येत आहे असे समजते. या प्रकरणावरून बेळगाव म्युनिसीपालिटीच्या सर्व पक्षांच्या सभासदांचे मजवर निर्व्याज्य प्रेम आहे, असे मानण्याचे कारण नाही. माझ्या जोतिबाला तेल लावण्यात तुमच्या खंडोबाला आमच्या लोकांनी भंडारा लावावा असा हेतु असावा, असा माझा तर्क वाहतो. मी जे कार्य करीत आहे ते खरे म्हटले तर तुमचे कार्य आहे. तुम्ही पिढ्यानपिढ्या करून ठेवलेले पाप मला निस्तरावे लागत आहे. या पापाची जबाबदारी माझ्यावर नाही, अस्पृश्यांवरही ती नाही. ती सर्वस्वी आपणा स्पृश्यांवरच आहे. ही गोष्ट आपण विसरता कामा नये.

हे पाप कायम ठेवून तुम्ही जी स्वराज्याची चळवळ करीत आहा व तुम्ही पूर्ण स्वराज्याची जी मागणी करीत आहा ती संशयास्पद वाटते, हे मी तुम्हास स्पष्ट सांगत आहे. अस्पृश्यांना पिण्यास पाणी मिळत नाही, त्यांना लोकसंख्येच्या मानाने नोकऱ्या मिळत नाहीत वगैरे अन्यायाची सर्व जबाबदारी तुम्हावरच आहे. दुसऱ्यास नाडणाऱ्या तुम्हास स्वराज्य मागण्याचा काय हक्क आहे, हे मला समजत नाही.

---

जनता : ३० डिसेंबर १९३९.

आपले राजकीय कार्य तात्पुरते थांबवून तुम्ही अस्पृश्यता नष्ट केली तर तुम्ही प्रामाणिक आहा, असे सिद्ध होईल.

मी आपले विचार आपणापुढे निर्भीडपणे मांडले आहेत. मी मोठा देशद्रोही आहे, मी इंग्रजांचा बगलबच्चा आहे, मी स्वराज्याच्या मार्गातील धोंड आहे, मी असुर आहे असा डांगोरा सत्य व अहिंसाभक्त काँग्रेस पक्ष पिटीत असता, मला मानपत्र देऊन आपण आपल्या भाईबंदांना निरुत्तर केले आहे म्हणून आपणास धन्यवाद देऊन मी आपले भाषण संपवितो.



## १६६

# तुमचे स्वराज्य आणि आमच्यावर राज्य !

बेळगाव जिल्हा स्वतंत्र मजूर पक्षाच्या परिषदेला बेळगाव येथे दि. २६ डिसेंबर १९३९ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी संबोधित केले.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

येथे मी पहिल्यांदाच येत आहे. नवीन स्वराज्य स्थापन झाल्यापासून गेले २७ महिने काँग्रेसचे राज्य होते. ते आता गेले आहे आणि अल्पसंख्यांकांनी काँग्रेसचे राज्य गेल्याबद्दल देवाची प्रार्थना केली. परंतु कित्येक जण असा बकवा करीत आहेत की, ता. २२ चा प्रकार हा देशद्रोही आहे. हा कार्यक्रम म्हणजे स्वराज्य मार्गात एक धोंड होय म्हणतात. पण मुसलमान, अस्पृश्य, पारशी वगैरेनी संघटित होऊन राज्यकारभाराविरुद्ध तक्रार केली व न्याय मागितला, गाऱ्हाण्यांची चौकशी करा एवढेच आमचे म्हणणे असता आम्ही देशद्रोही ठरलो आहो.

व्यापक दृष्टीने राजकारणाचा विचार केला असताना त्यात तीन महत्त्वाचे प्रश्न आहेत. एक, हिंदू-मुसलमानात एकी झाल्याशिवाय प्रगती होणे शक्य नाही. दोन, नुसता हिंदू घेतला तरी त्यातील ब्राह्मण-ब्राह्मणेतर भेद व तीन, हिंदू-अस्पृश्य लढा. हे प्रश्न मतलबाचे आहेत, असे काही लोक म्हणतात. पण याला मूळ आहे. राष्ट्राची सत्ता आपल्या हाती असावी, असे काँग्रेस म्हणते. मग तुम्ही मुसलमानांबद्दल काय केले ? हिंदू-मुसलमानात बरीच दुष्मनी आहे व ती आतापूर्वी कधीच नव्हती, इतकी विकोपास गेली आहे. हिंदुंच्या राज्यात राहावयाचे नाही, अशी मुसलमानांची भावना आहे. हिन्दुस्थानचे दोन तुकडे झाले पाहिजेत असे त्यांना वाटते. याला कारणीभूत कोण तर काँग्रेसच. कै. टिळकांचे मुसलमानांवर प्रेम नव्हते. परंतु मॉन्टेग्युसाहेब हिंदुस्थानात येतात, असे कळताच तुम्हाला जे पाहिजे ते आम्ही देतो, असे त्यांनी मुसलमानांना सांगितले व त्यांनी लखनौचा पॅक्ट घडवून आणला. पण आज काँग्रेसचे लोक काय करीत आहेत ? देण्याघेण्याची तर यांची भाषा नाहीच.

---

जनता : ६ जानेवारी १९४०.

आता ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद. हा तरी मिटला का ? सर्वांना मानाच्या, सन्मानाच्या जागा मिळत आहेत, याची ग्वाही काँग्रेसमध्ये घुसलेले आमचे मित्र रा. ब. आंगडी देतील का ? ते आज येथे हजर आहेत. त्यांना पाहिजे तर विचारा. काँग्रेसच्या सातही प्रांतात मुख्य प्रधान बामणच ! आणि आमच्या इलाख्यात ७ मंत्र्यात ३ बामण, १ मराठा पोर, १ पारशी, १ मुसलमान व १ जैन. आता आपण नोकऱ्यांकडे वळू. मुंबई इलाख्यातील रेव्हेन्यू खात्याचे उदाहरण घ्या. त्यात ब्राह्मणांचेच भरताड. मामलेदारांचाच दाखला घ्या. इलाख्यात एकूण मामलेदार १८८ आहेत, पण जातवारी अशी आहे की बामण ८३, बनिये ११, मुसलमान २३, मराठे १८, लिंगायत १०, ढोर १ आणि इतर जातीचे ४३. महालकरी ३५ आहेत. त्यापैकी बामण २०, बनिये २, मुसलमान ५, मराठा ३, आणि इतर ५. हेडक्लार्क २१७. बामण १११, बनीये १२, प्रभु १०, मुसलमान १४, मराठा १४, लिंगायत ७ आणि इतर ४९. महालकरी व हेडक्लार्क यात अस्पृश्यांपैकी एकही नाही. सर्व कॅबिनेट ब्राह्मणांच्याच हातात आहे. असेंब्लीच्या १७५ सभासदात ५२ ब्राह्मण आहेत ! पूर्वी किती ब्राह्मण होते ? काँग्रेसने ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा वाद मिटविला काय ?

अस्पृश्यांच्या बाबतीत तर विचारावयासच नको. नुसती ठकबाजी चालली आहे. गांधींनी प्राणांतिक उपोषण केले. महात्मा गेला असता तर दुनिया ओस पडली नसती. तडजोड करण्याबद्दल भीड घालण्यात आली व मी तडजोड केली आणि संयुक्त मतदार संघात सामील झालो. परंतु तडजोडीत यांनी १५ च्या १६ जागा केल्या नाहीत. उलट निवडणुकीच्या वेळी माझ्या व्यवस्थेतील जागा कमी केल्या. परंतु स्पृश्यांसाठी असलेल्या जागेसाठी अस्पृश्याला निवडून आणले नाही आणि यासाठीच मुसलमानांना काँग्रेसचा विश्वास वाटत नाही.

हे काँग्रेसचेच पाप आहे. मंत्रीमंडळात त्यांनी अल्पसंख्यांकांना घेतलेले नाही. त्यांनी आमच्याविरुद्ध उमेदवार उभे करून चौघांना निवडून आणले. पण त्यातील एकाही अस्पृश्याला मंत्रीमंडळात घेतले नाही. का तर म्हणे ते नालायक आहेत. मग तुम्ही नालायकांना का निवडून आणले ? मला काही मंत्री व्हावयाचे नाही व मला त्याचा लोभही नाही. मला माझ्या समाजासाठी मरावयाचे आहे. अल्पसंख्यांकांना मंत्रीमंडळात घ्यावे म्हणून मीच गव्हर्नरकडे सूचना केली. कारण ज्याच्या हातात अधिकार असतो तोच सत्ताधीश. कलेक्टर-मामलेदार वगैरे मंत्रीमंडळाच्या कागदी चिठोऱ्यांना कोठे विचारतात ? म्हणून आमचे भांडण अधिकाराकरिता आहे. मुसलमानांची

मंत्रीमंडळे असलेल्या प्रांतातून मात्र मुसलमान सभासद बहुसंख्य असतानाही त्यांनी मिश्र मंत्रीमंडळे बनविली आणि हे समाधानाचे होय. बंगालच्या मंत्रीमंडळात २ अस्पृश्य दिवाण असून आसामात १ अस्पृश्य दिवाण आहे आणि पंजाबात २ पार्लमेंटरी सेक्रेटरी आहेत कारण दिवाणपदाची जबाबदारी घेण्यास कोणीही तयार नसल्याने त्यांनी २ पार्लमेंटरी सेक्रेटरीज नेमले. सिंधबद्दल विचारावयास नको. कारण तेथे अस्पृश्यांची संख्या नाही. याची या काँग्रेसवाल्यांना लाज वाटावयास पाहिजे होती ! नालायकाला राजीनामा मागून तुम्ही लायक इसमाला निवडून का आणले नाही ? आम्ही काही त्यांला अडथळा केला नसता. काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर सही केल्याशिवाय कोणासही मंत्रीमंडळात घेऊ नये, असा नियम आहे तर मग आसाममध्ये प्रतिज्ञेशिवाय मंत्री का घेण्यात आले ? ही लुच्चेगिरी नव्हे काय ? अधिकारावर आमचा इसम असावा म्हणून माझे भांडण. तुमचे स्वराज्य आणि माझेवर राज्य ! हे मला नको आहे.

अस्पृश्यांच्या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्यासाठी एक कमेटी नेमण्यात आली व तिने पोलीस खात्यात अस्पृश्यांची भरती व्हावी, आर्थिक जीवितासाठी या समाजाची स्वतंत्र योजना करावी व फॉरेस्टमधील पडित जमिनी त्यांना द्याव्यात, अशा सूचना केल्या. पण आमच्या मुरारजी देसायांनी ' जात-पात न पाहता साऱ्याच्या २० पट किंमत देणाऱ्याला अशा फॉरेस्ट जमीनी द्याव्यात म्हणून सरक्युलर काढले. ज्याला खावयाला अन्न नाही, ज्याला राहायला झोपडीही नाही त्याने इतके पैसे आणावे कुठून ?

वतनाच्या बाबतीत तर कहर झालेला आहे. महारकीवर जादा जुडी बसविण्यात आली असून नाशिक जिल्ह्यातील एका गावात तर अडीच हजार रुपये वसूल करण्यात येत आहे. महारकीबद्दल आमच्याकडून फार कामे करून घेण्यात येतात म्हणून आम्ही तक्रार केली तर ' पढने गये नमाज और मशीद आयी गलेमे ' या म्हणीप्रमाणे आमच्यावरील १९ कामांची नोंद झाली ! म्हणून हरेगाव (अहमदनगर) येथे झालेल्या वतनदार महार परिषदेत गाऱ्हाणी दूर करण्याबद्दल ६ महिन्यांची नोटीस देण्याचा ठराव करण्यात आला आहे व त्या मुदतीत जर ती दूर झाली नाहीत तर सर्वत्र आम्ही संप पुकारणार आहो.

मजुरांचाच प्रश्न घ्या. पूर्वी मजुराला नोटीस न देता संप करता येत असे, पण याच काँग्रेसने संप करावयाचा असेल तर आधी नोटीस दिली पाहिजे म्हणून कायदा केला. जगात असा कोठेही कायदा नाही आणि या काळ्या

कायद्याच्या निषेधार्थ ता. ७ नोव्हेंबर १९३५ रोजी संप पुकारला असता याच काँग्रेसने त्यांच्यावर गोळीबार केला व दोन जिवांचा बळी घेतला. मजुरांवर कायद्याने लादलेली ही गुलामगिरी होय.

शेकडा ५० टक्के शेतसारा कमी करू असे यांनी अभिवचन दिले. पण याबद्दल काय केले ? दारूबंदी करू म्हणून यांनी मुंबई येथील लोकांवर दीड कोटी रुपये कर बसविला. माझा दारूबंदीला जो विरोध आहे तो एवढ्यासाठीच की श्रीमंतांवर बसविलेला कर गरिबांच्या कल्याणासाठी खर्च केला पाहिजे. मुंबईतील लोकांची यांना दारू पितात म्हणून दया येते. पण आज मुंबई इलाख्यातील १४,००० गावात शाळा नाहीत ! समजा एखादी बाई नागडी आढळली आणि आपणाजवळ २ रु. असले तर त्यातून चोळी घ्यावी की लुगडे ? अंग कशाने झाकेल हे आधी पाहिले पाहिजे. यांना मुंबईच्या लोकांची काळजी, पण लाखो कुळंब्यांची वाट काय ? म्हणून यांचे राजकारण कोणालाही फायद्याचे होणार नाही. आमचा स्वतंत्र मजूर पक्ष न्यायाचा व सत्याचा आहे. मला माझ्या समाजासाठी मरावयाचे आहे.

मांजर आणि उंदीर एकत्र राहू शकत नाही. एकाच टोपलीखाली मांजर व उंदीर झाकून ठेवले तर सकाळीं आपणास काय दिसेल ? गांधी आणि कंपनीचे दिवाळे आता निघणार आहे. त्यांच्याजवळ पुष्कळसा पैसा असल्याने वरचेवर ते शेवगावला* जातात. एखादा ठराव करावयाचा व तो टाइम्स ऑफ इंडियामध्ये प्रसिद्ध केला की झाले. आम्हाला मात्र पैसा नसल्यामुळे झोन तिकीटाशिवाय कोठेही जाता येत नाही. तरसाचा हल्ला चुकविण्यासाठी मेंढ्या जर लांडग्याच्या गोटात जाऊन बसू लागल्या तर ते हिताचे होईल काय ? तुम्ही इंग्रजांशी खरेपणाने लढत असाल तर कौरव-पांडवाप्रमाणे १०५ होऊन लढा. आम्ही खांद्याला खांदा लावून लढू. परंतु गांधी हा इंग्रजाला कोणीतरी सी. आय. डी. पोलीस मिळाला आहे, असे मला वाटते.

पांढरी टोपी पाहिली की धडकी भरते, परंतु सूर्य उगवला की तो मावळतोच. यासाठी संघटन करा.

● ● ●

---

*प्रस्तुत उल्लेख सेवाग्रामला उद्देशून असावा असे वाटते–संपादक.

## १६७

# लोकसत्ताक राज्य पद्धतीचे हिंदू समाजास वावडे का ?

बॅ. जीना यांनी मुक्तता दिन पाळण्याचे ठरविल्यानंतर त्यांनी इतर अल्पसंख्यांकांना देखील त्या दिवसाच्या कार्यक्रमात भाग घेण्याची विनंती केली व जीनांच्या विनंतीस मान देऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मुक्तता दिनानिमित्त मुंबई येथे महमदअली रोडवर जी प्रचंड सभा* भरली होती त्या सभेत भाषण केले. ही सभा हिंदुस्थानच्या इतिहासात अजरामर झाल्याशिवाय राहाणार नाही. अशा ऐतिहासिक प्रसंगी डॉक्टरसाहेबांचे भाषण झाले ते तितकेच महत्त्वाचे व चिरस्मरणीय असेच होते. मूळ भाषण इंग्रजीत झाले. त्या भाषणाचे आमूलाग्र भाषांतर या ठिकाणी देणे जरी शक्य नसले तरी त्याचा गोषवारा आम्ही खाली देत आहोत.

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

आजचा प्रसंग घडवून आणल्याबद्दल मी मिस्टर जीना यांचे अभिनंदन करतो व या प्रसंगाबद्दल मी आपला आनंद व्यक्त करतो. तथापि, एका गोष्टीबद्दल मला खेद वाटतो, तो हा की, या ठरावात जे एकाच अल्पसंख्यांक समाजास प्राधान्य देण्यात आले आहे तसे न होता इतर अल्पसंख्यांकांचाही जर त्यात विचार झाला असता तर अधिक बरे झाले असते. सर्वांनी मिळून ठराव तयार केला पाहिजे होता. तशी गोष्ट घडत नाही, ही खेदाची बाब होय. तरी पण सर करीमभाय इब्राहिम यांनी काँग्रेसच्या अन्याय्य वर्तनासंबंधी ठराव मांडून रॉयल कमिशनची जी मागणी केली आहे तीस मी पूर्णपणे पाठिंबा देतो कारण ठरावात नमूद केलेल्या गोष्टी सत्य आहेत व मागणी न्याय्य व सरळ आहे.

आपल्याला माहीत आहे की मुसलमानांवर काँग्रेसने केलेल्या अत्याचाराची चौकशी करण्याकरिता मि. जीना यांनी रॉयल कमिशनची मागणी केल्यापासून काँग्रेसच्या हस्तकांनी व पुढाऱ्यांनी एक अजब युक्तिवाद पुढे आणला आहे. त्यांनी दिसण्यात अगदी सोपे व सरळ पण खरोखर कपटनीतीने

---

जनता : ३० डिसेंबर १९३९.

*सभेची तारीख दर्शविलेली नाही—संपादक.

पुण्ययुक्त असे एक प्रमेय मांडले आहे. ज्याअर्थी गुन्ह्याची चौकशी झाली नाही त्याअर्थी गुन्हाच घडला नाही किंवा खुनाची चौकशी झाली नाही म्हणून मुळात खूनच झाला नाही, असे त्यांचे म्हणणे. १९३५ च्या सुधारणा कायद्यात कोणत्याही प्रांतात अल्पसंख्यांकांवर अन्याय झाल्यास त्यांचे निवारण करण्याकरिता प्रांतीय गव्हर्नरास अधिकार देण्यात आले आहेत. त्या खास अधिकारांचा कॉंग्रेस सरकारच्या आमदानीत गव्हर्नरांना एकदा देखील अवलंब करावा लागला नाही. '' मुसलमानांवर जर कॉंग्रेस सरकारकडून जुलूम झाला असता तर गव्हर्नर्सनी आपल्या खास अधिकाराचा उपयोग केला असता. तसा खास अधिकारांचा अवलंब ज्याअर्थी गव्हर्नर्सना करावा लागला नाही किंवा तसा प्रसंगच उद्‌भवला नाही त्याअर्थी कॉंग्रेस सरकारच्या हातून मुसलमानांवर जुलूम झालाच नाही '' हा त्यांचा गोड सिद्धान्त ! त्याचे गोडवे फक्त कॉंग्रेसचेच पुढारी गाते तर एक वेळ क्षम्य होते. पण नुकतेच हिंदुस्थानात ज्यांचे आगमन होऊन सध्या कॉंग्रेसच्या पाहुणचारात जे एक बडे इंग्लिश गृहस्थ हिंदुस्थानभर संचार करीत आहेत ते सर स्ट्रॅफर्ड क्रिप्स यांनी हे प्रमेय उचलून धरले आहे आणि म्हणूनच या घातुक युक्तिवादाचे खंडण करणे अत्यंत आवश्यक आहे.

तुमच्या सर्वांच्या स्मरणातील गोष्ट आहे की कॉंग्रेसने अधिकारग्रहण करण्यापूर्वी ब्रिटिश सरकारशी जो वितंडवाद माजविला होता तो आपल्या आठवणीत आहे. नेमक्या याच प्रश्नावर म्हणजे गव्हर्नर्सच्या खास अधिकारांबाबतच कॉंग्रेसने हाय मोकलली होती. अधिकारग्रहण करण्यापूर्वी प्रांतीय गव्हर्नर्स आपल्या अधिकारांचा आश्रय घेणार नाहीत, असे आम्हाला आश्वासन मिळाल्याशिवाय आम्ही रिकबीत पाय टाकणार नाही, असा कॉंग्रेसने हट्ट धरला होता, हे कोणीही विसरले नाही आणि आश्चर्य हे की अशा प्रकारचे आश्वासन मिळाले म्हणूनच आम्ही अधिकार ग्रहण केले, अशी निरंतर ग्वाही देणारी कॉंग्रेस आज उच्च स्वराने सांगत आहे की गव्हर्नर्सनी खास अधिकारांचा अवलंब केला नाही हाच आमच्या न्याय्य वर्तनाचा दाखला, हाच आमच्या निरपराधित्वाचा पुरावा ! हा कोणत्या नीतीतील युक्तीवाद ?

ज्या प्रांतात कॉंग्रेसचा अधिकार चालू झाला होता त्या प्रांतात कॉंग्रेस पक्षाचे इतके मताधिक्य होते की कॉंग्रेसेतर पक्षांना त्या प्रांतात आपले सरकार स्थापणे ही अशक्य गोष्ट होती. आपल्या मुंबई प्रांतात कॉंग्रेसच्या हातात जरी इतके बहुमत नव्हते तरी कॉंग्रेसेतर पक्ष इतके परस्परभिन्न होते की त्यांचे संयुक्त

सरकार बनणे शक्य नव्हते. अशा रीतीने बदली सरकार बनण्याची शक्यता नसता कोणताही गव्हर्नर लोकसत्तात्मक राज्यपद्धतीत बहुसंख्य पक्षास कोणत्याही रीतीने दुखवील हे संभवनीय नाही. बहुसंख्यांकांच्या ओंजळीने पाणी प्याल्याशिवाय गव्हर्नरला गत्यंतर नाही. अशा परिस्थितीत गव्हर्नर हा बहुसंख्यांकांच्या हातातील एक बाहुले बनतो. म्हणूनच कॉंग्रेस प्रांतातील गव्हर्नर्स हे कॉंग्रेसचे रबर स्टॅंप होते, असे म्हणण्यास हरकत नाही आणि अनुभवही तसाच आला.

बार्डोली तालुक्यातील जप्त जमिनी सरकारी खर्चाने पूर्वीच्या मालकास परत करण्याचे बिल कॉंग्रेस सरकारने कायदे मंडळात पास करून घेतले. जप्त जमिनी खासगी मालमत्ता होती. त्या परत करण्यात काही विवक्षित व्यक्तींचा फायदा होता. त्या विवक्षित व्यक्ती एका विवक्षित पक्षाच्या होत्या. त्या परत करण्यात सार्वजनिक हिताची अशी कोणतीच गोष्ट नव्हती. असे होते तरी गव्हर्नरने त्या बिलास मान्यता देऊन ते बिल कायद्याच्या स्वरूपात आणले व कॉंग्रेस पक्षीयांच्या तुंबड्या भरल्या. लोकसत्ता प्रसृत असलेल्या इतर कोणत्याही देशात अशा रीतीचा कायदा होणे शक्य नाही. तिथे अशा रीतीचा प्रयत्न हाणून पाडण्यात आला असता. त्याला गव्हर्नरने कधीच मान्यता दिली नसती. पण कॉंग्रेस प्रांतात ते घडू शकले. याला कारण गव्हर्नरची केविलवाणी स्थिती. म्हणूनच जो गव्हर्नर या विपरित परिस्थितीत कायद्यात तरतूद असूनही स्वतःचे संरक्षण करू शकला नाही तो अल्पसंख्यांकांचे संरक्षण करू शकला असता, अशी अपेक्षा करणे मूर्खपणाचे होय.

मुसलमानांच्या गाऱ्हाण्यांबाबत मला असे वाटते की आज या ठिकाणी मी त्याबद्दल विवरण करण्याची जरूरी नाही. माझ्या अगोदरच्या वक्त्यांनी त्याचे चांगलेच स्पष्टीकरण केले आहे. तेव्हा मी ज्या अल्पसंख्यांक समाजात जन्मलो आहे त्या अस्पृश्य समाजाच्या गाऱ्हाण्यांबाबत मी बोललो म्हणजे झाले. त्यातही अस्पृश्यांवर होणाऱ्या अन्यायाचा पाल्हाळीक पाढाही मी वाचणार नाही. तसे मला करावयाचे असल्यास तुम्हाला आजची रात्रच नव्हे तर आणखी किती तरी दिवस इथेच डांबून बसावे लागेल. याकरता मी काही थोड्या बाबींचाच उल्लेख करणार आहे. सर्व अल्पसंख्यांक एकाच बोटीतून प्रवास करीत असले तरी त्यातील काही उतारू पहिल्या वर्गाचे, काही दुसऱ्या वर्गाचे व काही तिसऱ्या वर्गाचे आहेत. आम्ही अस्पृश्य मात्र बोटीच्या सामान ठेवण्याच्या तळमजल्यातूनच

प्रवास करणारे उतारू आहोत, यात संशय नाही. या प्रवासात आमचे हाल होत आहेत.

राऊंड टेबल कॉन्फरन्सनंतर ब्रिटिश सरकारने अस्पृश्य समाजास आपल्या जातीय निवाड्याद्वारे एक बहुमोल अशी देणगी दिली होती, ती ही की प्रत्येक प्रांतात त्यांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यात येऊन त्यांच्या वाट्याकरिता काही ठराविक जागा नियमित केल्या होत्या. शिवाय त्यांना इतर सर्वसाधारण मतदारांबरोबर मतदान करण्याचा अधिकार देण्यात आला होता. या योजनेने अस्पृश्य समाजास आपल्या खऱ्या विश्वासाचे खास प्रतिनिधी निवडता येऊन इतर आपुलकीच्या भावनेने काम करणाऱ्या उमेदवारास निवडून देण्याचा त्यास अधिकार देण्यात आला होता. या योजनेने अस्पृश्यांचे समाधान झाले होते. पण गांधींचे समाधान झाले नाही ! त्यांना अस्पृश्यांवर उपकार करण्याची उकळी फुटली आणि ही योजना बदलली नाही तर प्राणार्पण करण्याचे त्यांनी ठरविले. अस्पृश्यांच्या हितापेक्षा कोणाचेही प्राण अधिक मौल्यवान आहेत, असे मी समजत नाही. पण आमच्यात असे काही लोक होते की त्यांनी गांधीविना या जगात जगणे व्यर्थ आहे, असा हट्ट धरला व मला 'पुणे करार' ला मान्यता द्यावी लागली.

त्यावेळी माझी अशी समजूत झाली की, 'पुणे करार' हा जंटलमन्स् ॲग्रीमेंट आहे व काँग्रेस वगैरे सर्व हिंदू लोक स्पृश्यास्पृश्य वाद मिटला आहे, असे समजून त्या कराराप्रमाणे वागतील व आगामी स्वराज्य हे आपले राज्य आहे, असे अस्पृश्यांना वाटण्यासारखी परिस्थिती उत्पन्न होईल. पण व्यर्थ ! निवडणुकीची वेळ आली तेव्हा काँग्रेस आपले खरे स्वरूप प्रकट करू लागली. पुणे कराराने आम्हास मिळालेल्या १५ जागात लोभाखातर एखाद्या जागेची भर टाकणे दूरच राहो तर या १५ जागा निष्प्रभ कशा करता येतील हे पाहाण्याचा त्यांनी प्रयत्न चालविला. या सर्व जागांकरिता अशिक्षित व स्वार्थसाधू असे भाडोत्री गुलाम त्यांनी उभे केले. अशा हेतूने की ते निवडून आल्यावर आपल्या ताटाखालची मांजरे बनावीत. कुठे आपल्या आश्रमातील झाडूवाला तर कुठे कुण्या काँग्रेस पुढाऱ्यांचा बुटलेर, तर कुठे आपला शिपायी अशी आपली प्यादी उभी करून स्वतंत्रपणे उभे राहिलेल्या स्वाभिमानी व सुशिक्षित उमेदवारांचा पाडाव करण्याचा त्यांनी चंग बांधला व आपल्या पैशाच्या जोरावर आपला हेतू तडीस नेला. मिस्टर जिना हे स्वतंत्र मतदार संघास इतके का कवटाळून बसले आहेत हे यावरून चांगलेच सिद्ध होते. मला विरोधी उमेदवार उभे केल्याचा विषाद

वाटला नसता. पण नालायक माणसांना हाती धरून त्यांना आमच्या डोक्यावर नाचवायला हे धजवतात म्हणून उद्वेग येतो.

निवडणुकीनंतर ज्यावेळेस सरकार बनविण्याची संधी प्राप्त झाली त्यावेळेस तरी या महाभागांनी हिंदुस्थानाला मिळालेले स्वराज्य आमचे आहे, अशी आमची भावना होईल, असे काही केले का ?

१५ जागांपैकी ११ जागा आम्ही मिळविल्या होत्या. म्हणजे अल्पसंख्यांक अस्पृश्य समाजातील बहुसंख्य समाज आमचे बाजूला होता. काँग्रेसने मंत्रीमंडळे बनविली त्यावेळेस एक महत्त्वाचे अल्पसंख्यांक म्हणून आमच्या पक्षाला त्यांनी विचारावयाचे होते. कूपर मंत्रीमंडळाचे प्रधानपद स्वीकारून मी विटाळलेला नव्हतो. मी पूर्ण निष्ठावंत राहिलो होतो. पण नाही.

त्यावेळेस काँग्रेसने प्रतिज्ञापत्राचे बुजगावणे उभे केले. प्रतिज्ञापत्रावर सही केल्याशिवाय कोणालाही मंत्रीमंडळात न घेण्याचे कारण असे सांगण्यात आले की मंत्रीमंडळ एकजीवी, एकध्येयवादी असल्याविना राज्यकारभार हाकता येणार नाही. तत्त्व म्हणून मी ही गोष्ट मान्य करतो. पण हे तत्त्व तरी काँग्रेसने पाळले का ? आसाम प्रांतात काँग्रेसचे बहुमत नव्हते. त्याठिकाणी अधिकाराची लालसा उत्पन्न झाल्यामुळे काँग्रेसने हे तत्त्व झुगारून दिले व प्रतिज्ञेची अट काढून टाकून त्यांनी संयुक्त मंत्रीमंडळ बनविले. याचा अर्थ असा की एकजीवी मंत्रीमंडळे असावीत हे काँग्रेसचे अबाधित तत्त्व नसून सोयीचे तत्त्व आहे. तसेच प्रतिज्ञापत्रावर सही करणाऱ्यांची काँग्रेसनिष्ठा ही कसोटी होती, असे म्हणावे तर काही लोक एका रात्रीत कागदावर सही करून काँग्रेसमन बनत होते व कार्यभाग साधत होते. ही काँग्रेसनिष्ठा की ढोंगीपणा ? कोणीही प्रामाणिक मनुष्य असा थिल्लरपणा करणार नाही व आजच्या अस्पृश्यांनी तो पंथ स्वीकारला नाही, यात नवल नाही.

अधिकार स्वीकारल्यानंतरची काँग्रेसची कामगिरीही भूषणावह आहे, असे मला वाटत नाही. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे हातात कलिंगड मिळाले असता माकड चेष्टा करते त्यापेक्षा त्यांनी काही अधिक केले आहे, असे मानण्याचे कारण नाही. त्यांचा राज्यकारभार म्हणजे Monkey and Melon च्या चेष्टा

होत्या. कायदा एक, जाहीरनामा दुसरा व हुकूम तिसरा असा लोकल बोर्डाच्या निवडणुकीच्या बाबतीत त्यांनी तमाशा चालविला होता. त्यात उद्देश एकच की, आमचे उमेदवार नामशेष करावयाचे.

दलितांची अवहेलना, दलितांची दु:खे, त्यांचे हातून दूर होत नाहीत. मी जुनी उदाहरणे देत नाही. काँग्रेसच्याच एका वर्तमानपत्रात, नवाकाळात, गेल्या मे महिन्यात प्रसिद्ध झालेली गोष्ट. कल्याणजवळील टिटवाला गावात २ विहीरी आहेत. त्यातील एका विहीरीचे पाणी भरण्यास अस्पृश्यांनी सुरवात केली. अशारीतीने अस्पृश्यांना स्वतंत्ररीतीने पाणी मिळावे ही गोष्ट गावातील हिंदुंना सहन झाली नाही. त्यांनी अस्पृश्यांना पाणी न मिळण्याची एक युक्ती काढली. त्यांनी दुसऱ्या गावाहून एक भंगी आणविला व त्याच्याकडून २ टोपल्या मैला त्या विहीरीत टाकविला. काय ही अमानुष वृत्ती ! आणि दिवसाढवळ्या हा अन्याय काँग्रेस राज्यात चालू. काँग्रेस सरकार त्यास आळा घालीत नाही. दुसरी गुजरातेतील गोष्ट. एका गावात अस्पृश्यांनी दिपावली उत्सव साजरा केला म्हणून गावातील स्पृश्य हिंदुंनी त्यांना मरेपर्यंत मारले. असे अनेक दाखले मला दाखविता येतील. त्याचा पाढा मी आज वाचीत नाही. असो.

काँग्रेस हिंदुस्थानला स्वराज्य मागत आहे आणि ते लोकसत्तात्मक पद्धतीचे असावे, अशी तिची मागणी आहे. या पद्धतीत केव्हाही बहुसंख्यांकांचाच अंमल चालणार हे निर्विवाद आहे. हिंदुस्थानात हिंदू बहुसंख्यांक आहेत. तेव्हा, लोकसत्तात्मक राज्यात हिंदूच अल्पसंख्यांकांवर राज्य करणार, ही गोष्ट मान्य करणे प्राप्त आहे. या हिंदुंच्या लोकसत्तेच्या मागणीबद्दल मात्र एक प्रश्न विचारायचा आहे. तो असा की, हिंदू लोकसत्ता शासन पद्धतीस लायक आहेत का ? चातुर्वर्ण्यपद्धतीमुळे मूलत:च जो समाज इतका विभागला गेला आहे की एका विभागातील जनतेचा दुसऱ्या विभागातील व्यक्तीवर मुळीच विश्वास नाही. एकास दुसऱ्याचा अंमल सहन होत नाही. अशा सामाजिक घटनेत अल्पसंख्यांकांना स्वत:च्या संरक्षणाकरिता राज्यघटनेत काही योजना करण्याची मागणी केल्याशिवाय गत्यंतर नाही आणि अल्पसंख्यांक आज तीच मागणी पुढे मांडीत आहेत. अद्याप अल्पसंख्यांकांनी आयर्लंडच्या इतिहासाची हिंदुस्थानात पुनरावृत्ती केली नाही. अल्स्टरचे पुढारी सर एडवर्ड कार्सन यांना दक्षिण आयर्लंडचा पुढारी रेडमंड वाटेल ती संरक्षणे देण्यास तयार होता. पण कार्सनने चोख उत्तर दिले की 'तुमच्या संरक्षणाला लावा आग ! आम्हाला तुमचा अंमल नको !' अल्पसंख्यांकांनी ती वृत्ती अद्याप धारण केली नाही हे हिंदुस्थानचे नशीब.

माझी खात्री आहे की, काँग्रेस खरोखरच सदिच्छेने प्रेरित झाली असेल तर अल्पसंख्यांकांचा तंटा ४८ तासात मिटविता येईल. पण सध्या काँग्रेसची सूत्रे ज्याचे हाती आहेत ते प्रश्न सरळरीतीने सोडवतील अशी मला आशा वाटत नाही. त्यांनी वारंवार हा प्रश्न चिघळविला आहे. मला यावेळी लो. टिळकांची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. तुम्हाला माहीत आहे की, मुसलमानांचे व टिळकांचे विशेष सख्य नव्हते. किंबहुना हिंदू-मुसलमानांची तेढ वाढविली असाही आरोप त्यांचेवर केला जात असे. पण ज्यावेळेस मॉंट्येग्यू हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेची चर्चा करण्याकरिता हिंदुस्थानात यावयास निघाले त्यावेळेस हिंदु-मुसलमानांची एकमुखी मागणी मॉंट्येग्यूसमोर मांडण्यात यावी म्हणून टिळकांनी मनातील वैरभाव बाजूस ठेवून लखनौ पॅक्ट घडवून आणला.

हल्ली त्याच्या उलट परिस्थिती आहे. अल्पसंख्यांकांचा प्रश्न समेटाने हातावेगळा करण्यास गांधींचा लय लागत नाही. ब्रिटिश सरकारने आपली मागणी मान्य केली नाही तर आपण सत्याग्रह सुरू करू, अशी भाषा ते बोलू लागले आहेत. पण मी वेळीच त्यांना इशारा देत आहे. मिळकतीच्या बाबतीत तंटा चालू असता इस्टेटीची व्यवस्था नीट ठेवण्याकरिता कोर्ट रिसीव्हरची नेमणूक करते. हिंदुस्थानच्या स्वराज्याबाबत ब्रिटिश सरकार हे अशा रिसीव्हरच्या जागी अधिष्ठित आहे. या रिसीव्हरच्या हातून सर्व संयुक्त मिळकत आपल्या वाट्यास यावी म्हणून रिसीव्हरला सतावण्याची कोणतीही ' कृती ' अल्पसंख्यांकांच्या वाजवी हक्कांविरूद्ध उठाव म्हणूनच गणली जाईल आणि त्याचे पर्यवसान असे होईल की आपणाला योग्य न्याय मिळावा म्हणून रिसीव्हरच्या पारड्यात अल्पसंख्यांकांना आपले बळ घालावे लागेल आणि त्या घटनेला ज़बाबदार काँग्रेसच राहील.

अशा रीतीने मुद्देसूद व सद्यःस्थितीचे योग्य आकलन करून देणारे भाषण ५०-६० हजारांचा लोकसमुदाय शांत वृत्तीने श्रवण करीत होता व भाषण संपताच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला व डॉक्टरसाहेब व्यासपीठावरून खाली उतरले.



# १६८

# शाहू छत्रपतींनी ब्राह्मण्याचा किल्ला ढासळून टाकला

कोल्हापूर संस्थान दलित प्रजा परिषदेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे ३० डिसेंबर १९३९ रोजी भाषण झाले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

स्वागताध्यक्ष, भगिनी, बंधुजन व निमंत्रित पाहुणे जनहो.

आपण माझी अध्यक्षस्थानी नेमणूक केलीत त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. आजची परिषद ही इतर परिषदांपेक्षा निराळ्या परिस्थितीत भरत आहे. या परिषदेत होणारी भाषणे जबाबदारी ओळखूनच करावयास हवीत. आपली आजची परिस्थिती फार नाजूक आहे, ही गोष्ट विसरता कामा नये. आम्ही बाहेरून आलेले इंग्रजी राज्यातील प्रजाजन व स्थानिक कोल्हापूर संस्थानचे प्रजाजन यांच्या परिस्थितीत महदंतर आहे हे विसरून चालणार नाही. या परिषदेत भाग घेणारांनी आपली भाषणे आपल्यावरील जबाबदारी ओळखूनच केली पाहिजेत, असा मी आपणास आगाऊ इशारा देत आहे. आता लवकरच १९३९ हे साल संपून नवे वर्ष सुरू होणार आहे. कोल्हापूरच्या इतिहासात चालू साल फारच गुंतागुंतीचे झालेले आहे. चालू सालात ह्या संस्थानात रोज परिषदा झाल्या असून ही तिसरी प्रसिद्ध परिषद आहे. पहिली काँग्रेस प्रजा परिषद आहे तिचे अध्यक्षस्थान डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांनी मंडित केले होते. दुसरी परिषद रयत सभेने भरविली होती. या परिषदेचे अध्यक्षस्थान रा. मोरे यांनी स्वीकारले होते. आपण त्या परिषदेस हजर असालच, असे मला वाटते. आजची आपली परिषद ही दलित प्रजा परिषद होय. आता ही परिषद निराळी का भरविण्यात येत आहे, असा प्रश्न उपस्थित होणारच. प्रजा परिषद व रयत सभा यांना न मिळता हा सवतासुभा का करण्यात आला, अशी शंका येणे साहजिकच आहे. ही तिसरी परिषद व त्याचा अध्यक्ष मी असल्यामुळे तर टीकाकारांच्या टीकेला जास्तच जोर चढणार. गेल्या मे महिन्यात पन्हाळ्यास असता रयत सभेचे चालक मला त्यांच्या परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याबाबत आग्रह करीत होते. मी त्याजकडून विचार करण्यासाठी दोन तासांचा अवधी मागून घेतला. त्या दोन

---

जनता : १३ जानेवारी १९४०.

तासात मी कोल्हापुरी राजकारणाची पूसतपास केली. विचाराअंती रयत सभेचे अध्यक्षस्थान न स्वीकारणेच बरे, असे मी ठरविले. आजची परिषद भरवून सवतासुभा का करता, असे विचारण्याचा हक्क निदान रयत सभावाल्यांना तरी खास नाहीच. त्यांनीही प्रजा परिषदेनंतरच आपली परिषद भरविली होती. मग आम्हाला निराळी परिषद हवीशी वाटली तर त्यात गैर ते काय ?

प्रजा परिषदेच्या चालकांनाही माझी सहानुभूती हवी होती. माझ्या मते प्रजा परिषदेचा हेतू प्रजेचे कल्याण करणे हा नसून कोल्हापूरकरांचा द्वेष करणे हा होता. अर्थात मला त्यांच्या चळवळीबद्दल सहानुभूती वाटणे शक्य नव्हते. कोल्हापूर संस्थान हे काही नंदनवन नव्हे, ही गोष्ट मलाही मान्य आहे. पण कोल्हापूरच्या आसपास अनेक लहान लहान संस्थाने असून त्यातील प्रजेचीही गळचेपी चालू असता कोल्हापूरातच चळवळ करणाऱ्यांचे हेतू अशुद्ध असावे असा संशय येणे स्वाभाविकच नाही का ?

कोल्हापूरसंबंधी एक गोष्ट अगदी निश्चित आहे व या गोष्टीबद्दल अस्पृश्यांना व मला कोल्हापूरचा अभिमान वाटतो. कै. शाहू महाराजांनी कोल्हापुरातच खरी लोकशाहीची मुहूर्तमेढ रोवली ही ती गोष्ट होय. आपण गोब्राह्मण प्रतिपालक छत्रपती शिवाजी महाराजांची जयंती साजरी करीत असतो. शिव छत्रपतीला ब्राह्मण्य नष्ट करता आले नाही. आपल्या राज्याभिषेकासाठी सोने देऊन काशीहून गागाभट्टाला त्यांना आणावे लागले. ब्राह्मण्याची नांगी तोडण्याबाबतीत कै. शाहू छत्रपती हे शिवरायापेक्षाही श्रेष्ठ होत, असे म्हटल्याशिवाय गत्यंतर नाही. शाहू राजांना वेदोक्त अधिकार नाही असे सांगणाऱ्या ब्राह्मणांना पुण्याच्या लोकमान्य टिळकांचा व तेथील भटशाहीचा आधार असतानाही त्यांना शाहू छत्रपतींनी ठोकरीने उडविले, ही गोष्ट विसरता येण्याजोगी खास नाही. कै. शाहू छत्रपती महाराजांच्या अंगी दोष असतील. पण मी असे विचारतो की कोणता राजा निर्दोष आहे ? निव्वळ दोषांकडे पाहण्यात अर्थ नाही. ब्राह्मण्य नष्ट झाल्याशिवाय समाजाची उन्नती होणे नाही. त्यांनी ब्राह्मण्य नष्ट करण्याचा धडाडीने प्रयत्न केला यातच त्यांची थोरवी आहे. कै. शाहू छत्रपतींनी समाजातील विषमता नष्ट करण्याचा आटोकाट प्रयत्न केला व ब्राह्मण्याचा बालेकिल्ला ढासळून टाकला ही काही लहान कामगिरी नाही. माझ्या सार्वजनिक आयुष्याचा श्रीगणेशा कै. छत्रपती शाहू महाराजांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या माणगावच्या परिषदेतच मी गिरविला होता, ही गोष्ट येथे नमूद करणे आवश्यक आहे. त्यांना व मला प्रिय असलेल्या समतेच्या प्रचारासाठी रु. २,५०० देऊन त्यांनी मला सदैव ऋणी केले. असे असल्यामुळे मी प्रजा परिषदेशी संबंध ठेवला नाही, हे उघड आहे रयत सभेचाही पाया शुद्ध नाही,

अशी विचाराअंती खात्री झाल्याने मी त्या सभेने भरविलेल्या परिषदेचे अध्यक्ष स्थान नाकारिले, हे सांगणे नकोच. रयत सभेचा हेतू प्रजेचे कल्याण हा नसून, महाराजांची हाजी हाजी करून अधिकाऱ्यांचे आपसातील लढे लढविणे व स्वार्थ साधणे हा आहे. संस्थानातील सर्वच लोक महाराजांचे प्रजाजन आहेत. ही सर्व प्रजा काही समदु:खी नाही. प्रजेतील काही लोक सुखी तर काही दु:खी आहेत. या सुखी व दु:खी लोकांची एक मोट बांधण्यात काय अर्थ आहे ? अशी मोट बांधल्याने एकमुखी मागणी कशी करता येणार ? भगिनी व बंधुजनहो, दु:खीजनांना एकमुखी मागणी करता यावी म्हणून आज आपण ही दलित प्रजा परिषद भरविली आहे. आपण सर्व राजनिष्ठ प्रजाजन एकत्रित झालो आहोत. प्रजा परिषदेत मराठ्यांचाच विशेष भरणा होता. त्या परिषदेत अस्पृश्य एकही नव्हता. राजनिष्ठेमुळे अस्पृश्यांचा प्रजा परिषदेस विरोध होता, हे सांगणे नकोच.

आता आपण या संस्थानातील प्रजा कशी वाटली गेली आहे हे पाहू. या संस्थानातील एकंदर प्रजा ९,९७,००० असून त्यात ८,६६,००० हिन्दू आहेत व १,१०,००० अस्पृश्य असून मुसलमानांची संख्या ४१,८६६ आहे. ठोकळ मानाने पाहता एकंदर लोकसंख्येत ११% अस्पृश्य ५% मुसलमान आहेत, असे म्हणण्यास हरकत नाही. या अकरा टक्के अस्पृश्यांपैकी फक्त ४८१ अस्पृश्य सरकारी नोकरीत आहेत व त्यापैकी बहुतेक झाडूवाले, घोडेवाले, नालबंद वगैरे हीन तऱ्हेच्या नोकऱ्यावरच आहेत, हे सांगणे नकोच.

आता संस्थानातील शिक्षण संस्थांचा आपण विचार करू. संस्थानाने प्रसिद्ध केलेल्या आकड्यांवरून कोणकोणत्या विद्यार्थी वसतिगृहास सरकारी मदत काय मिळते हे पुढील आकड्यांवरून कळून येईलच.

| | रूपये |
|---|---|
| (१) आर्य समाज वसतिगृह | ५,०१२ |
| (२) कर्नल बोर्ड हाऊस | ३,६०० |
| (३) वैदिक वसतिगृह | ३,६०० |
| (४) मराठा वसतिगृह | ११,३१४ |
| (५) मुसलमान वसतिगृह | ९,४६० |
| (६) इतर वसतिगृह | ५,०१० |
| (७) मिस क्लार्क वसतिगृह | ६२५ |
| (८) इन्दुमती वसतिगृह | ७०० |
| | ३९,३२१ |

विद्यार्थी वसतिगृहासाठी कोल्हापूर संस्थानात रू. ३९,३२१ खर्च होत असतात, ही गोष्ट वरील आकड्यांवरून सिद्ध होते. पण या रकमेतील अवघे रू. १,३२५ च फक्त अस्पृश्यांच्या नं. ७ व ८ या वसतिगृहांच्या वाट्याला येतात ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

याशिवाय या संस्थानात २० अस्पृश्य विद्यार्थ्यांनाच काय ती अर्धी फी माफ करण्यात येत असते. वरील विवेचनावरून अस्पृश्यांच्या शिक्षणाची हेळसांडच या संस्थानात होत आहे हे उघड आहे.

आता आपण शेतीच्या प्रश्नाकडे वळू. या संस्थानात एकंदर शेतीजमीन बावीस लाख एकर असून त्यापैकी वहिवाटली जाणारी जमीन तेरा लाख, तेरा हजार एकर आहे. पड जमीन ३,७१,४२३ एकर असून महाराजांची खाजगी शेरी जमीन ४६,३५९ एकर आहे. ही पड व शेरी जमीन अस्पृश्यांना देऊन त्यांची स्थिती सुधारणे शक्य नाही काय ? देवस्थान व धर्मदाय खातीही संस्थानाचा बराच पैसा निरर्थक खर्चत असतो, हे सांगणे नकोच.

कोल्हापूर येथील इलाखा पंचायत व म्युनिसीपालिटी या संस्थात अस्पृश्यांचे प्रतिनिधी नाहीतच, असे म्हणावयास हरकत नाही. या नवयुगात एक गोष्ट सर्वमान्य झालेली आहे. प्रातिनिधीक संस्थांतून भिन्न लोकांचे लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी घेणे ही ती गोष्ट होय. आता येथील परिस्थिती काय आहे ती पहा. इलाखा पंचायतीत २८ सभासद असून त्यात एकही अस्पृश्य नाही. म्युनिसीपालिटीत अस्पृश्यांचे फक्त दोनच प्रतिनिधी घेण्यात आलेले आहेत. आता नवे कायदेमंडळ अस्तित्वात येणार आहे. त्यात तरी आमच्या हक्कांची आजवर झाली तशी पायमल्ली होणार नाही, अशी आपण आशा करू या. कोल्हापूर संस्थानाबद्दल मला भारी आशा होती. पण या संस्थानानेही माझी सर्वस्वी निराशाच केली आहे. छत्रपतींच्या राज्यात आम्हा अस्पृश्यांच्या हिताची अव्याहत वाढ होत जाणार, अशी मला फार आशा होती. पण ती झाली नाही, ही फार खेदाची गोष्ट होय.

शेवटी मला महाराजांना दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत. एकतर त्यांनी स्वतःच्या हातात राज्यसूत्रे घेऊन कारभार पाहावा नाहीतर प्रजेला अधिकार देऊन लोकशाही तरी स्थापन करावी. प्रजेला नोकरशाहीच्या ताब्यात मात्र मुळीच ठेवू नये. लोकशाही हमेशा कल्याणप्रद होतेच असे नाही. ही गोष्ट तुर्कस्तान, इटली व जर्मनीच्या चालू इतिहासातील एकसूत्री राज्यपद्धतीने सिद्ध केली आहे.

कोल्हापूरचे राज्य मराठ्यांचे असूनही आजच्या परिषदेवर अधिकाऱ्यांची अवकृपा झालेली आहे. मी रयत सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारावे म्हणून ' मुडदा जागवतात ' त्याप्रमाणे माझ्या आसपास असणाऱ्या अधिकाऱ्यांना आज माझा विसर पडला आहे. यावरून काय समजावयाचे ते समजा. आजच्या सभेला म्युनिसीपालिटीने १०० व दरबारने १०० रु. दिले. याव्यतिरिक्त मदत परिषदेस मिळालेली नाही. या सभेस स्वयंस्फूर्तिने लोक जमा झालेले आहेत. जुलूम जबरदस्तीने गावपाटलाकडून मारुन मुटकून आणलेले लोक या परिषदेत नाहीत. या सभेसाठी हजारो रुपयांचा चुराडा झाला नाही हे या सभेचे वैगुण्य. मग ती अधिकाऱ्यांना कशी आवडणार ?

कोल्हापुरात मला एक विशेष गोष्ट आढळून आली आहे. अनुयायांपेक्षा पुढाऱ्यांची संख्याच येथे फार माजली आहे. या राज्याची पद्धत अशी आहे की येथील कोणत्याही फाटक्या तुटक्या माणसास अधिकाऱ्यांच्या कानाशी लागता येते. मी आजच्या सभेला अध्यक्ष नको, असा अर्जही दिवाणाकडे गेल्याचे माझ्या कानी आले आहे. अशा परिस्थितीत दलित प्रजामंडळ चिरकाळ टिकेल अशी व्यवस्था करण्याचे काम तुमचे आहे. एक ना धड भाराभर चिंध्या असा प्रकार इतःपर तुम्ही करू नका. आजच्या परिषदेस महाराजांना मानपत्र देण्याचा आपला मानस होता. ती गोष्ट शक्य झाली नाही म्हणून आपण दिलगीर आहोत. महाराजांनी आजच्या परिषदेचा मेळा पाहिला एवढ्यानेच आपण कृतार्थ झालो आहोत. आपण महाराजांशी राजनिष्ठ राहावे. महाराजांनीही पड जमिनी, देवस्थानाच्या जमिनी व शेरी जमीनी अस्पृश्यांना कसण्यास देऊन त्यांना उद्योगधंद्यास लावावे, असे मला वाटते. अस्पृश्यांच्या शिक्षणाप्रित्यर्थ जादा पैसा पुरविणे हे संस्थानाचे कर्तव्य आहे. अस्पृश्य मुलींच्या वसतिगृहासाठीही सढळ हाताने पैसा खर्च केल्यास त्याने अस्पृश्य समाजाचे कल्याण झाल्याशिवाय राहणार नाही. शेवटी दलित प्रजामंडळाची संघटना मजबूत करा, असे माझे तुम्हाला आग्रहाचे सांगणे आहे.

● ● ●

## १६९

# माझ्यामागे तुमचे ऐक्य अभेद्य ठेवा

ता. ३१ डिसेंबर १९३९ रोजी कोल्हापूरहून सातारा येथे जात असता वाटेत नेरे मुक्कामी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे स्वागत करण्यात आले. गावातील सर्व स्त्री-पुरुष समुदाय स्वागतासाठी गावच्या शाळेच्या इमारतीत जमा झाला होता. स्थानिक पुढाऱ्यांनी डॉ. बाबासाहेबांचे स्वागत केले. रा. बी. टी. कांबळे या तरुण व उत्साही समाजकर्त्याचे स्वागतपर भाषण झाल्यावर डॉ. बाबासाहेबांनी जमलेल्या स्त्री-पुरुष मंडळीस दोन शब्द सांगितले, ते म्हणाले,

मी स्वागत मानपत्र वगैरे प्रकारांचा भुकेला नाही. मला कोणी शिव्याशाप दिले तरी त्याची मला भीती वाटत नाही. सार्वजनिक कामास पैशाचे पाठबळ अवश्य लागते, हे आपणास ठाऊकच आहे. गांधीजींनी एक कोटी रुपयाचा फंड जमविला व त्याचा फन्ना झाला, हे आपण ऐकले असेलच. जनाब जिनांनाही सार्वजनिक कार्याप्रित्यर्थ पैशाचा पाठिंबा मिळत असलाच पाहिजे. माझ्या समाजाकडून आजवर माझ्या कार्याला रु. ५,००० पेक्षा जास्त मदत झालेली नाही, ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. आपल्या गरिबीमुळे आपणास सांपत्तिक अडचणीतूनच कार्य करीत राहावे लागणार, हे उघड आहे. आपण आपसात एकी राखली पाहिजे. बेकी माजू देता उपयोगाचे नाही. गांधी, जिना व अस्पृश्यांच्यावतीने मी, यांना विचारल्याशिवाय हिन्दुस्थानचा राजकीय प्रश्न सुटणार नाही, अशी परिस्थिती आज निर्माण झाली आहे. ही गोष्ट डॉ. थॉमसन् या इंग्रज गृहस्थाने गांधीजींना व मलाही सुनविली आहे. कॉंग्रेसने काही केले व काही म्हटले, मला राक्षस, राष्ट्रद्रोही, अस्तनीतील निखारा वगैरे शिव्याशाप दिले तरीही त्यांना मला पुसून टाकता येणार नाही, हे खास ! असे म्हणण्याचे कारण काय ? मी काही गांधीजीप्रमाणे महात्मा नाही. माझ्यामागे तुम्हा लोकांच्या अभेद्य ऐक्याचे कवच आहे. त्यानेच मला बळकटी आली आहे. म्हणून तुम्ही आपआपसात भांडू नका. मानापानासाठी चढाओढ करून एकमेकात बेकी करू नका. जगात फुकट्याला काही मानसन्मान मिळत नाही, ही गोष्टही विसरू नका. समाजकार्यासाठी पैसे जमवतात व ते क्वचितप्रसंगी

---

जनता : २० जानेवारी १९४०.

खाण्यातही येतात, ही गोष्ट मला माहीत आहे. तरी एवढ्यासाठी समाजकार्य थांबविता येणार नाही. तळे राखणारा पाणी चाखतो, त्याचा आपण बंदोबस्त केला पाहिजे. पण आपण याबाबतीत व्यावहारिक दृष्टी ठेवली पाहिजे. काँग्रेसच्या एक कोटी फंडाची काय अवस्था झाली, हे जगजाहीर असून काँग्रेसचे कार्य चालूच आहे. आपसातील बारीकसारीक गोष्टींना महत्त्व देऊन यापुढे समाजात भेद करू नका, असेच माझे तुम्हास शेवटी सांगणे आहे.



## १७०

# युद्धोत्तर हिंदुस्थानपुढे मोठमोठे प्रश्न उपस्थित होणार आहेत

ता. २ जानेवारी १९४० रोजी संध्याकाळी ४ वाजता कऱ्हाड म्युनिसीपालिटीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मानपत्र देण्याचे ठरविले होते. या समारंभासाठी डॉ. बाबासाहेब सातारहून सुमारे ३ वाजता जाण्यास निघाले. सातारहून १३ मैलांच्या अंतरावर गाडी नादुरुस्त होऊन पुढे जाणे अशक्य झाले. थोड्यावेळात मुंबई येथील परळ भागातील तंबाखूचे प्रसिद्ध व्यापारी रा. लक्ष्मणराव शेटे हे आपल्या खाजगी मोटारीतून जात असता त्या ठिकाणी येऊन पोहोचले. त्यांनी डॉ. आंबेडकर यांना कऱ्हाडपर्यंत नेण्याचे मोठ्या आनंदाने कबूल केले. याच गाडीस कऱ्हाडजवळ एक भयंकर अपघात झाला. सुदैवाने गाडीतील उतारु मरणाच्या दारातून वाचले. कोणासही गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या नाहीत. डॉ. आंबेडकरांच्या डोक्यास, पायास व हातास मार बसला होता. गाडीतील मार लागलेल्या सर्व जणास सातारचे बॅरिस्टर करंदीकर यांनी सरकारी दवाखान्यात नेले व त्यांना पट्ट्या बांधण्यात आल्या. दवाखान्यात थोडी विश्रांती घेतल्यानंतर डॉ. आंबेडकर सुमारे ६ च्या सुमारास म्युनिसीपालिटीतील मानपत्र समारंभास जाण्यास निघाले. म्युनिसीपालिटीचा हॉल आतून व बाहेरून सभासदांनी व इतर नागरिकांनी फुलून गेला होता. प्रथमतः स्थानिक स्पृश्य विद्यार्थिनींनी स्वागतपर पद्ये म्हटली व समारंभास सुरुवात करण्यात आली. पद्ये म्हणून झाल्यावर रा. बहुलेकर वकील यांनी म्युनिसीपालिटीचे मानपत्र वाचून दाखविले. म्युनिसीपालिटीचे अध्यक्ष रा. कदम यांनी हे मानपत्र डॉ. बाबासाहेबांस अर्पण केले. मानपत्र अर्पण झाल्यावर डॉक्टरसाहेब उत्तर देण्यासाठी उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, सभासद, भगिनी व बंधुजनहो,

आपण मला जे मानपत्र दिले आहे त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. स्थानिक प्रश्नाबाबत मी काही कामगिरी केलेली नाही. मी कऱ्हाडचा रहिवाशीही नाही. माझी कामगिरी राजकीय स्वरूपाची आहे. अशा परिस्थितीत आपण मला मानपत्र अर्पण करून माझा जो गौरव केला आहे त्यावरून आपला उदारपणा मात्र व्यक्त होतो. आज या समारंभास मला हजर राहता आले ही इष्टापत्तीच होय.

---

जनता : २० जानेवारी १९४०.

हिन्दुस्थानच्या आजच्या परिस्थितीत जागृती व जबाबदारीची फार आवश्यकता आहे. युद्धोत्तर हिंदुस्थानापुढे मोठमोठे प्रश्न उपस्थित होणार आहेत. स्वराज्य सर्वांसच हवे, यात शंका नाही. पण एकाचे स्वराज्य दुसऱ्यास गुलामगिरीत डांबण्यास कारणीभूत होणार नाही, अशी आपण सर्वांनी दक्षता बाळगली पाहिजे. अल्पसंख्यांकांच्या मागण्या या वरील भीतीच्या निदर्शकच आहेत. ही भीती नाहिशी करण्यासाठी व आपणापुढील प्रश्न सोडविण्यासाठी अल्पसंख्य व बहुसंख्य या दोन्ही लोकात आपण जागृती व जबाबदारीची जाणीव उत्पन्न केली पाहिजे, असे माझे सांगणे आहे.

आज हिन्दी राजकारणात मोठी विचित्र परिस्थिती निर्माण झाली आहे. हा विचित्रपणा लक्षात येण्यासाठी आपण गेल्या पिढीचे राजकारण व या पिढीतील राजकारण यांची तुलना करू.

गेल्या पिढीतील गोखले, टिळकांचे राजकारण व आजचे गांधी राजकारण यामध्ये एक मोठा फरक आहे. गेल्या पिढीतील राजकारणास विद्वत्तेची जरूरी भासत असे. आजच्या राजकारणात बोटवाती, काडवाती करणारांची जरूरी भासत आहे. विद्वानांची त्यातून खड्यासारखी उचलबांगडी करण्यात येत आहे. आजचे राजकारण हे आंधळयाच्या माळेच्या हाती गेले आहे. ही अत्यंत अनिष्ट गोष्ट झालेली आहे. देशाची प्रगती होत राहण्यास विविध विचार व वादविवादाचे निरनिराळे प्रवाह आवश्यक आहेत. अशा भिन्न विचारांच्या प्रवाहातूनच हमेशा प्रगती होत असते. आंधळयाच्या माळेमागून एकाच मार्गाने देश जात राहिला तर तो खळग्यात पडल्याशिवाय रहाणार नाही, हे खास. राजकारणात एकच पंथ निर्माण करणे हा चालू राजकारणातील हेतू आहे. जागृती, नानातऱ्हेचे विचार व साधक बाधक प्रमाणे यांचे या राजकीय पंथास वावडे आहे. त्याच त्या गोष्टीची री ओढीत राहण्यात फायदा काहीच नाही. आज लोक गांधीवेडे झाले आहेत. गांधीवाक्य हे ब्रह्मवाक्य होऊ पाहत आहे. या गांधी वेडाबरोबरच ढोंगबाजीही खूप वाढू लागली आहे. केवळ स्वार्थासाठी काँग्रेसला चार आणे देऊन व्यभिचार करणारे अनेक हरीचे लाल आज पैदा होत आहेत. जागृती व जबाबदारी नाही तेथे तशी बिकट स्थिती होणारच. आपल्या कऱ्हाड म्युनिसीपालिटीत भिन्न मताचे व भिन्न पक्षाचे सभासद आहेत. यावरून स्थानिक मतदार विचारी असावेत, असे मला वाटते. आपल्यात विचार जागृत आहेत म्हणून मी आपले अभिनंदन करतो. आपण दिलेल्या मानपत्राबद्दल पुनः एकदा आपले आभार मानून मी आपले भाषण पुरे करतो.

त्यानंतर स्थानिक महारवाड्यातील समारंभास डॉक्टरसाहेब हजर राहिले. तेथे अलोट जनसमुदाय दुपारी चार वाजेपासून डॉक्टरसाहेबांच्या भेटीसाठी तिष्ठत राहिला होता. जमलेल्या मंडळीस आपसात एकोपा राखण्यास व पुढील निवडणुकीत स्वतंत्र मजूर पक्षाचा एक प्रतिनिधी निवडून आणण्यास सांगून डॉक्टरसाहेब आपल्या बरोबरील मंडळीसह साताऱ्यास आपल्या निवासस्थानी गेले.



## १७१

# महार वतन आणि महारवाडा ह्या गुलामगिरीच्याच द्योतक

ता. ३ जानेवारी १९४० रोजी दुपारी सातारा जिल्ह्यातील मेढे या गावी स्वतंत्र मजूर पक्षाची दुसरी परिषद भरली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना या सभेचे अध्यक्षस्थान देण्याचे ठरले होते.

सभेपूर्वी मोठ्या थाटाने मिरवणूक काढून अध्यक्षांना सभास्थानी आणण्यात आले. इशस्तवन व स्वागतपर पद्ये झाल्यावर सभेच्या कामास सुरवात झाली. स्वागताध्यक्ष रा. सावंत यांच्या भाषणानंतर श्री. जावळे यांनी डॉ. बाबासाहेबांनी अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी सूचना केली व सुचनेस रा. उबाळे व रा. रोकडे यांनी पाठिंबा दिल्यावर डॉ. आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले. अध्यक्षांची प्रकृती नादुरुस्त असल्याने त्यांनी नाशिकचे स्वतंत्र मजूर पक्षाचे रा. भाऊराव गायकवाड यांना प्रथम भाषण करावयास सांगितले. ते म्हणाले,

कालच्या अपघातात आपले परमपूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब यांना मुका मार फार आहे. अशा स्थितीत त्यांना इतर पुढाऱ्यांप्रमाणे अपरिहार्य कारणे सांगून परिषदेस हजर राहणे टाळता आले असते. पण आपणा सर्वांची निराशा होऊ नये म्हणून इष्ट मित्रांचे न ऐकता ते आज परिषदेस हजर आहेत. आपणासारख्या गरिबांचे पुढारीपण सुखाचे खास नाही. आपल्या पुढाऱ्याला तळहातावर शीर घेऊन लढावे लागते याची जाणीव आपणास आहेच. गेल्या आठवड्यात एकामागून एक, दोन अपघात झाले असूनही बाबासाहेबांनी आपल्या कार्यक्रमात खंड पडू दिला नाही. आपल्या मार्गात कितीही संकटे आली तरी आपण पुढे जाण्याचे सोडून माघार घेता कामा नये असा धडा बाबासाहेबांच्या वर्तनावरून आपण घ्यावयास नको काय?

यानंतर स्वतंत्र मजूर पक्षाचे श्री. अनंतराव चित्रे यांना भाषण करावयास सांगितले. रा. चित्रे यांच्या भाषणानंतर डॉ. आंबेडकर यांनी भाषण केले, ते म्हणाले,

भगिनी, पाहूणे मंडळी, बंधुजनहो,

आजच्या परिस्थितीत मनाजोगे भाषण करणे मला शक्य नाही. आजच्या सभेचा बेरंग होण्याचा समय आला होता पण देवाच्या दयेने तो टळला आहे.

---

जनता : २० जानेवारी १९४०.

हा प्रसंग टळला असला तरी मला फार वेळ बोलता येणार नाही. अशा प्रसंगी रा. भाऊराव गायकवाड व श्री. चित्रे हे दोन देवदूतच मला भेटले. त्यांनी आयत्या वेळी धावत येऊन भाषण करण्याची माझी जबाबदारी हलकी केली. या कामगिरीबद्दल मी या देवदूतांचा आभारी आहे. मी आता महार वतन व सातारा येथील अस्पृश्य विद्यार्थ्यांचे वसतिगृह याबाबत दोन शब्द सांगणार आहे. असे करण्यापूर्वी रा. उबाळे यांनी या परिषदेत केलेल्या भाषणाचा मी प्रथमतः विचार करणार आहे. रा. उबाळे यांनी रा. सावंत आजच्या परिषदेचे स्वागताध्यक्ष याजवर थोडीशी आडून टीका केली आहे. श्री. सावंत यांची कामगिरी मला माहीत आहे व ती बहुमोलाची आहे, असे माझे मत आहे. वर्तमानपत्रातून रा. सावंतांचे नाव झळकत नाही म्हणून त्यांची कामगिरी कमी प्रतीची ठरते, असे भर सभेत सांगण्यात आले. या बाबतीत माझे स्वतःचेच उदाहरण मी आपणास देणार आहे. मी गेल्या सव्वादोन वर्षात विधिमंडळात फक्त चारच भाषणे केली आहेत. मी प्रश्नही कधी विचारलेले नाहीत. गैरहजर असणाऱ्या सभासदातही माझा नंबर वर लागणारच. मग उबाळ्यांच्या दृष्टीने रा. सावंतांपेक्षाही मी जास्तच नालायक ठरणार नाही का ?

कायदे मंडळात १७५ सभासद आहेत. ते निरनिराळ्या पक्षांचे आहेत. सर्व पक्षांचे सर्व सभासद काही तेथे भाषणे करीत नाहीत. तेथे मोजके लोक मोजकी भाषणे करीत असतात. विधिमंडळात काँग्रेसचे ९२ सभासद आहेत. त्यापैकी किती भाषणे करतात याची रा. उबाळयांना माहिती असती तर त्यांनी रा. सावंतांवर टीका केली नसती. श्री. सावंत यांनी गेल्या दोन सव्वा दोन वर्षात, एक कारकून, सहा तलाठी, अकरा पट्टेवाले, एकवीस शाळा मास्तर, सदुसष्ट पोलीस, सहा शिक्षकिणी व एकोणवीस पोस्टमन यांना नोकऱ्या मिळवून दिल्या. ही काय कमी महत्त्वाची कामगिरी आहे. महारांवर स्पृश्यांचा दात आहे. महार तक्रारखोर आहेत असे सांगण्यात येते. अशा स्थितीत १३१ महारास चाकऱ्या लावून देणे ही काही सोपी गोष्ट नाही, तरी अशी रा. उबाळे तक्रार करतात. पण त्यांनी सातारा येथील अस्पृश्य वसतिगृहास मदत करण्याचे जे वचन दिले होते ते पाळले काय असा माझा त्यांना सवाल आहे. मंदिराला कळस चढविण्याची इच्छा असणाऱ्यांनी तरी त्याचा पाया उखडून टाकता कामा नये. विघातक टीका करून निव्वळ उणेपणा काढण्यात काय हशील ?

आता महार वतनाच्या प्रश्नाकडे आपण वळू या. आपल्या पायातील वतनाची बेडी तोडून टाकल्याशिवाय आपला तरणोपाय नाही. वतन आहे तोपर्यंत आपण गुलामच राहणार. वतन नाहीसे करून आपण स्वातंत्र्य मिळविलेच पाहिजे. गावोगावचे महारवाडे आपण नष्ट करून टाकले पाहिजेत.

प्रत्येक महारवाडा हा माणसांचा कोंडवाडा व गुलामवाडाच होय. महार वतन व महारवाडा या दोन गोष्टी सनातन गुलामगिरीच्या द्योतक आहेत. त्या नष्ट झाल्याच पाहिजेत. स्पृश्यांनी या गोष्टी नष्ट करण्यास कितीही आडकाठी केली तरी त्या गोष्टी नवीन स्वराज्यात मी नष्ट केल्याशिवाय राहाणार नाही, हे खास. पण वतन नष्ट होईपर्यंत वतनाची बेडी ढिली करण्याचे प्रयत्न आपण केले पाहिजेत, हे विसरू नका. चळवळ करून जुडीवाढ आपण बंद पाडली पाहिजे. गावकामगारास पगारी नोकऱ्या दिल्या पाहिजेत. गावाबाहेरच्या कामासाठी त्यांना आठ आणे रोज मिळाला पाहिजे. गावकामगारांची ही गाऱ्हाणी सहा महिन्यात नष्ट करण्यात आली नाहीत तर गावकामगारांनी इलाखाभर संप पुकारला पाहिजे. काही झाले तरी तुम्ही मात्र आपल्या जमीनी सोडू नका.

आता रा. सावंत यांनी सातारा येथे चालविलेल्या अस्पृश्य विद्यार्थी वसतिगृहाकडे आपण वळू या. चळवळ करताना आम्हा अस्पृश्य पुढाऱ्यांची मोठी केविलवाणी स्थिती होत असते. इतर वर्गाच्या राजकीय पुढाऱ्यांची अशी दैना कधीच होत नाही. मि. जिना वसतिगृहे चालविण्याच्या फंदात कधीही पडणार नाहीत. आम्हां अस्पृश्यांना चळवळ करताना बहुरूपी बनावे लागते. आम्हाला वसतिगृहे काढावी लागतात, पत्रे चालवावी लागतात, गावोगाव वणवण भटकावे लागते. थोटा नवरा केला की त्याच्या पत्नीस त्याला आंघोळ घालावी लागते तशीच आमची गत आहे. याबाबतीत आपल्यातील शिक्षक वर्गावर माझा फार कटाक्ष आहे. ते सुशिक्षित असतात. आमच्या चळवळीमुळे त्यांना चाकऱ्या मिळतात, तरी ते बेफिकिर राहतात, असा त्यांवर माझा आरोप आहे.

साताऱ्यास रा. भाऊराव पाटलांचे एक वसतिगृह असता सावंतांचे वसतिगृह कशाला ? अशी शंका कोणास येईल. पण त्याचे उत्तर फार सोपे आहे. रा. पाटलांच्या वसतिगृहातून बाहेर पडणारे अस्पृश्य विद्यार्थी एकतर भीष्म-द्रोणाप्रमाणे ' अर्थस्य पुरुषोदासः ' या न्यायाने गुलामीवृत्तीचे निपजणार नाही तर ते कचाप्रमाणे तरी होणार, हे उघड आहे. आपल्या विद्यार्थ्यांना संपत्तीचे गुलाम होणे भाग पडू नये म्हणून रा. सावंत यांच्या वसतिगृहासारख्या संस्थांची अत्यंत जरूरी आहे हे सांगणे नकोच.

● ● ●

## १७२

# सैन्यात भरती होऊन मानसन्मानाच्या जागा काबीज करा

तारीख २८ जानेवारी १९४० रोजी रत्नागिरी येथे नुकत्याच लष्करात नावे नोंदविलेल्या महार बांधवांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे लष्करी थाटात स्वागत केले.

त्याप्रसंगी डॉ. साहेबांनी आपल्या छोट्या भाषणात सर्व मराठा स्पृश्य व अस्पृश्य बांधवांना धडाडीने सैन्यात शिरकाव करून घेण्याचा उपदेश केला. ते आपल्या भाषणात म्हणाले,

हा सैनिकाचा व्यवसाय, आपल्यातील जाती वैमनस्यामुळे बंद पडला होता. एकेकाळी मुंबईतील सैन्यात तीन चतुर्थांश महार निवडले जात असत व त्यावेळी आपल्या पूर्वजांनी ब्रिटिश सरकारच्या बाजूने पुष्कळ लढायाही मारल्या होत्या. ज्या ठिकाणी पेशवे नामोहरम होऊन इंग्रजांनी आपली सत्ता स्थापिली तो इतिहासप्रसिद्ध कोरेगावचा रणसंग्राम आम्हीच लढविला होता.

सन १८५७ सालच्या बंडानंतर इतर जातीही सैन्यात शिरल्या, त्यांच्या जातीय भावना दुखावू नयेत म्हणून इंग्रज सरकारने महारांची सैन्य भरती थांबविली व त्यांच्या इमानीपणाचे बक्षिस त्यांना दिले. पुन्हा आता आपल्यास सुवर्णसंधी आली असून तिचा लाभ घेऊन आपण वेळीच आपली पूर्वीची मानसन्मानाची जागा काबीज कराल अशी मला आशा आहे. अशी संधी वारंवार येत नसते. ही गोष्ट ध्यानात घेऊनच आपण आपले कर्तव्य बजाविले पाहिजे, असे माझे तुम्हास सांगणे आहे.



---

जनता : १० फेब्रुवारी १९४०.

## १७३
# देशाच्या हितासाठी मी आपले वैयक्तिक हित सोडून देण्यास तयार आहे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर अपघातातून वाचल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यासाठी माझगाव, मुंबई येथे रविवार दिनांक ४ फेब्रुवारी १९४० रोजी सभेचे आयोजन करण्यात आले. या सभेत डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, भगिनी व बंधुजनहो,

अपघातातून वाचल्याबद्दल आपण माझे अभिनंदन केले याबद्दल मी आपला ऋणी आहे. माणसांनी फार जगावे अशा मताचा मी नाही. मनुष्य म्हातारा झाला, दांत पडले, हात पाय कापू लागले, म्हातारचळ लागला अशा स्थितीत जगण्यात काय अर्थ आहे ? जगण्यात हशील आहे तोवर जगावे असे कै. गडकरी सांगतात ते खोटे नाही. पण एक गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली आहे. माझे कार्य अर्धवट राहिले आहे. त्या कामाचा पाया शुद्ध आहे, त्यात प्रामाणिकपणाही भरपूर आहे, मला चांगले सहकारी लाभले आहेत. हे कार्य अर्धवट स्थितीत आहे तोवर काही दिवस जगणे मला आवश्यक वाटते, मी वाचलो याचे खरे समाधान, तुम्हालाही त्यात समाधान वाटते यातच आहे. मी मुंबईत आल्यावर मला भेटावयास येणारे असंख्य लोक ढळढळा रडून माझ्यावर येऊन गेलेल्या संकटाबद्दल दुःख व्यक्त करताना पाहून मी वाचलो ते बरे झाले असे वाटते. आजच्या अभिनंदनाच्या सभेत खरे पाहू गेले तर जास्त काही बोलण्याची जरूर नाही. पण येथे जमलेल्या अफाट जनसमुदायास चालू परिस्थितीसंबंधी मी काही सांगितले नाही तर त्यांची निराशा होणारच. म्हणून आपल्या जिव्हाळ्याच्या प्रश्नाबद्दल बोलणे मला प्राप्तच आहे.

गेल्या काही महिन्यांपासून कॉंग्रेसने नवी दोन पत्रे ' पूर्णिमा ' व ' नवयुग ' ही ्वास माझ्यासाठी काढून माझा बहुमान केलेला आहे. त्यातील लेख वाचून,

---

ानता : १० फेब्रुवारी १९४०.

दिवसभर काम करून दमल्या भागल्यावर माझी फार करमणूक होत असते. आपल्याबद्दल लोक सारखे लिहित राहतात. आपण नसतो तर त्यांचे जीवन अळणी झाले असते असे पाहून काँग्रेसला माझी मिठाइतकीच आवश्यकता आहे, याची मला जाणीव होते व मला स्वाभिमान वाटू लागतो. मी नसलो तर ही पत्रे कशी खपणार. माझी काळजी वाटून मला चिरंजीव होण्याचाही मोह होऊ लागला आहे. गावमामाने माझा फोटो छापला त्यावरून काय सिद्ध होते ? मी यापुढे संन्यास घेईल देखील, नाही कोणी म्हणावे ? एका पत्राने मी बैठकीस एक शेर भजी खातो असे लिहिले आहे. या नवयुगात भजी खाणे पाप झाले म्हणावयाचे. भजी खाण्याने कोणाच्याही शीलाला व इज्जतीला धोका नाही असा माझा समज आहे. अशा टीका वाचून मी हसतो. माझ्या बंधुंनीही हसावयास शिकावे असे माझे सांगणे आहे. टीका केली तरी वैमनस्य करू नये. मी टीका वाचून कसा हसतो, मलाही पण खमंग प्रतिटीका करता येण्याजोगी आहे याची साक्ष येथे हजर असलेले माझे मित्र नागरिक संपादक रा. तटणीस देतीलच. दुसरेही काही माझे टीकाकार आहेतच. देशाच्या हितासाठी मी आपले वैयक्तिक हित सोडून देण्यास तयार आहे. पण अस्पृश्य समाजाचे हित सोडण्यास मात्र तयार नाही. कोणाला जात्यंधता वाटली तर खुशाल वाटो.* त्यांच्या हिताला मात्र मी कधीही विसरणार नाही. अस्पृश्यांचा प्रश्न हा निव्वळ मजुरांचा किंवा शेतकऱ्यांचा प्रश्न नाही. गिरण्यातील कापड खात्यात अस्पृश्याने काम करण्याआड मजूरच येत असतात. काँग्रेसच्या कुळकायद्यानेही अस्पृश्य शेतकऱ्यांचा फायदा होणे शक्य नाही. कारण त्यांच्याजवळ जमीनीच नाहीत. मग बिन जमिनीच्या अस्पृश्य शेतकऱ्यांचे हित कुळकायदा कसे साधणार ? अस्पृश्य हा शेतकरी व मजूर आहे. पण प्रत्येक शेतकरी व मजूर हा काही अस्पृश्य नाही, ही गोष्ट उघड आहे.

अस्पृश्य मजूर डांगे, निमकरांच्या झेंड्याखाली का एकत्र होत नाहीत ? आपल्या निराळ्या युनियन्स का काढतात याचे खरे कारण म्हणजे सगळे मजूर सारखे नाहीत हेच होय. मजूर व शेतकरी हेही जातीभेदाने पछाडले असून त्यातील स्पृश्य मजूर व शेतकरी यांना अस्पृश्य मजूर व शेतकरी यांची हेटाळणी करण्यास दिक्कत वाटत नाही. स्वतंत्र मजूर पक्ष हा अस्पृश्यांचा प्रश्न कधीही सोडणार नाही. मी महार आहे, अस्पृश्य

---

*उपलब्ध अंकातील पुढील बारा ओळी अस्पष्ट आहेत.

आहे. स्पृश्य लोक दगडा-धोंड्यांना, झाडा-झुडपांना, पशु-पक्षांना व साप-विंचवांनाही देव मानतील पण त्यांना अस्पृश्य पुढारी कसा मानवणार ? बहुसंख्य मजूर व शेतकरी हे स्पृश्यच आहेत ही गोष्ट चालू परिस्थितीत विसरुन भागणार नाही.

आमच्या पक्षाचे काय संघ नाहीत ? का रा. प्रधान व रा. मडकेबुवा यांजसारखे कामगार पुढारी आमच्याजवळ नाहीत ? आमच्या पक्षात काय कमी आहे ? पण आम्ही सनातनी नाही. आमचा पक्ष अस्पृश्यांचा पक्ष. मग स्पृश्यांना त्याचा विटाळ कसा होणार नाही !

आमचे मडकेबुवा हे महार पडले. भाई, संघ, लढाऊ धोरण इतक्यापुरतीच त्यांना माहिती असणार. त्यांना बुरइवा, प्रॉलिटॅरिएट, टेम्पो वगैरे जडजंबाळ शब्द कसे पेलणार ? हे शब्द नाहीत तर मडकेबुवा कामगार पुढारी कसे होणार ? पण ते खरे पुढारी आहेत. म्युनिसीपालिटीतील कामगारांना विचारा, रेल्वेच्या पोर्टरांना विचारा. ते सर्व मडकेबुवा हेच आमचे खरे कामगार पुढारी आहेत असे एक आवाजाने सांगतील. चेंबूर येथील कचरापट्टीत काम करणाऱ्या मजुरांचा व इतर म्यु. कामगारांचा त्यांनी एका फटक्यासरशी लाखो रुपयांनी पगार वाढवून दिला. असे हे पुढारी आमच्या पक्षात आहेत. पण नावडतीचे मीठ अळणीच. त्याला कोण काय करणार ?

काही लोक मला मानतात तेवढ्यातच मी संतुष्ट आहे. तत्त्व सोडून मला काँग्रेसचे पुढारी, मजुरांचे पुढारी, शेतकऱ्यांचे पुढारी होण्याचा काहीच हव्यास नाही.*

काँग्रेसने आपल्यातून फोडलेले रा. ब. राजा, रा. देवरुखकर व राजभोज हे आपणात परत आले आहेत. ही आनंदाची गोष्ट होय. इतर चुकलेली वासरेही परत येणारच अशी माझी खात्री आहे. आपल्यातील मधाच्या लालचीने बारगळलेल्या तरुणांना, मी असे विचारतो की, कोणाच्या चळवळीने तुम्हास चाकऱ्या मिळतात याचा विचार करा व आपला मूर्खपणा सोडून द्या. सेक्रेटरिएट मध्ये शिपाई ठेवण्याबद्दल माझे गव्हर्नरशी सन १९२६ साली पहिले भांडण झाले. त्याची मला चांगलीच आठवण आहे. आज

---

*उपलब्ध अंकातील पुढील बावीस ओळी अस्पष्ट आहेत.

स्वतंत्र मजूर पक्षाने आपल्या समाजास सावलीची जागा निर्माण करून दिली आहे. आपली संघटना करून व सतत चळवळ चालू ठेवून या सावलीचा विस्तार करावयास विसरू नका, एवढेच शेवटी माझे तुम्हाला सांगणे आहे. सावली देणाऱ्या झाडावर कुऱ्हाड चालविणे हे आत्मघातकीपणाचेच होणार नाही काय ?



१७४

# नुसत्या राजकीय स्वातंत्र्याने जनतेचे कल्याण होईल, हा भ्रम

स्वतंत्र मजूर पक्षातर्फे महाड येथे १९ मार्च १९४० रोजी 'अस्पृश्य स्वातंत्र्य-दिन' समारंभ आयोजित करण्याविषयक पत्रक काढण्यात आले होते. ते खालीलप्रमाणे–

"ता. १९ मार्च १९२७ रोजी महाड येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली अस्पृश्य समाजाची विराट सभा झाली. त्या सभेत डॉ. आंबेडकरांनी अखिल भारतीय अस्पृश्य समाजाच्या वतीने स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या लोकशाहीप्रणित तत्त्वत्रयीची जाहीर घोषणा केली. सभेनंतर हजारो अस्पृश्यांनी मिरवणुकीने चवदार तळयावर जाऊन सार्वजनिक पाणवठ्यावर पाणी भरण्याचा आपला नागरिक स्वातंत्र्याचा आणि समानतेचा हक्क प्रस्थापित केला. त्या प्रसंगाचे ऐतिहासिक महत्त्व लक्षात घेऊन यापुढे १९ मार्च हा दिवस अस्पृश्य जनतेने स्वातंत्र्य दिन म्हणून साजरा करण्याचा प्रघात सुरू करणे अवश्य आहे.

महाड येथे १९ मार्च १९४० मंगळवार रोजी, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य वर्गाची प्रचंड जाहीर सभा, मिरवणूक, झेंडा वंदन, स्वातंत्र्याची प्रतिज्ञा वगैरे कार्यक्रम होणार आहे.

ज्या ज्या अस्पृश्य बंधुभगिनींना शक्य असेल त्यांनी महाडच्या ता. १९ मार्चच्या समारंभात अवश्य भाग घ्यावा. ज्यांना महाडास येता येत नसेल त्यांनी त्या दिवशी आपापल्या गावी स्वातंत्र्योत्सव करावा. उत्सवाचा कार्यक्रम सर्व-साधारणपणे खालीलप्रमाणे असावा––

१. सकाळी घरोघरी स्वतंत्र मजूर पक्षाचा झेंडा उभारावा.

२. डॉ. बाबासाहेबांच्या फोटोसह झेंड्याची सार्वजनिक मिरवणूक वाजत गाजत दांडपट्टा वगैरेसह काढावी व महारवाड्यात मंडप श्रृंगारून झेंडावंदन करावे.

३. झेंडावंदनानंतर सर्व स्त्री पुरुषांनी व मुलाबाळांनी स्वातंत्र्य प्रतिज्ञा करावी.

४. सभा, भाषणे वगैरे कार्यक्रम करावा.

विशेष सूचना :–स्वतंत्र मजूर पक्षाचे निशाण––

हा झेंडा लाल रंगाचा असून त्यावर मधोमध ' स्वतंत्र मजूर पक्ष ' असे लिहिले आहे. झेंड्याच्या डाव्या बाजूस वरच्या कोपऱ्यात ११ तारे दाखविलेले आहेत. हे ११ तारे हिन्दुस्थानातील ११ प्रांतांचे द्योतक होत. वरील सर्व प्रांतात स्वतंत्र मजूर पक्षाचा असा हा झेंडा सदैव फडकत राहिला पाहिजे. झेंड्याचा आकार सोयीप्रमाणे लहान मोठा करण्यास हरकत नाही.

'स्वातंत्र्य दिनाची प्रतिज्ञा'

" आम्ही माणुसकीचे हक्क मिळविणार अशी आमची प्रतिज्ञा आहे. स्पृश्य समाजाने आम्हास बहिष्कृत करून वाळीत टाकले असून तो समाज आम्हास अन्नपाणी व जीवनास इतर आवश्यक असणारी सुख साधनेही मिळवू देत नाही. त्याने आम्हास महारवाड्यात डांबून टाकिले आहे. आम्हास उद्योगधंदा करणे व आमच्या लायकीप्रमाणे चाकरी मिळणे या गोष्टींही स्पृश्यांनी दुरापास्त केल्या आहेत. आमच्या या दुःस्थितीची सर्व जबाबदारी स्पृश्य वर्गावरच आहे. आमचे मानवी हक्क हिरावून घेणाऱ्या या लोकांच्या हाती सर्व राजसत्ता देणे म्हणजे माकडाचे हातात कोलित दिल्याप्रमाणेच होणार आहे.

काँग्रेस सरकारने महार वतनदार कामगारांना विनावेतन राबवून पन्नास हजार अस्पृश्य कामगारांवर लादण्यात आलेली सनातनी बिगारी नाहीशी करण्यासाठी काहीही केलेले नाही. यावरून काँग्रेस सरकारचे 'हरिजन प्रेम' उत्तम व्यक्त होत नाही काय? आपल्या समाजाची, काँग्रेस सरकारच्या राज्यात देखील पूर्वापार पद्धतीप्रमाणे शारिरीक, आर्थिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक व आध्यात्मिक पिळवणूक चालू होतीच. म्हणून आमचे असे ठाम मत झाले आहे की, आमच्या शत्रूच्या हाती राज्यसत्ता सर्वस्वी देणे हे आमच्या दृष्टीने अत्यंत धोक्याचे आहे.

आपणास माणुसकीचे अधिकार मिळविण्याचा मार्ग म्हटला म्हणजे देशाच्या राज्यकारभारात आपला वाटा मिळविणे हाच होय. म्हणून अस्पृश्यांना राजकीय सत्तेचा वाटा मिळवून देऊन मानवी हक्क मिळवून देण्याची पुनरपी आम्ही प्रतिज्ञा करीत आहो.

जातीभेद मोडून जाती, धर्म व वर्ण हे ऐहिक व्यवहाराच्या आड येणार नाहीत अशी घटना करणे हे आमचे ध्येय आहे, असे आम्ही समजतो.

डॉ. आंबेडकरांनी आपल्या समाजास राजकीय सत्ता मिळवून देण्यासाठी जो लढा चालू केला आहे तो आम्हास पूर्णपणे मान्य असून डॉ. बाबासाहेबांच्या आज्ञेनुसार आम्ही त्या लढ्यात भाग घेण्यास सदैव सज्ज राहू अशी आमची प्रतिज्ञा आहे."[१]

[१] जनता : १६ मार्च १९४०.

चवदार तळ्याच्या लढ्याच्या संदर्भात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना हायकोर्टापर्यंत न्याय मिळविण्यासाठी जावे लागले. त्यात अस्पृश्य समाजाचा विजय झाला. त्यासंबंधी संपूर्ण वृत्तांत दि. २७ मार्च १९३७ च्या ' जनतेत ' प्रकाशित झाला. तो येणेप्रमाणे--

## '' चवदार तळ्याच्या लढ्यात मिळालेला विजय

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपली स्वाभिमानाची आणि माणुसकीच्या हक्काची चळवळ १९२७ साली मार्च महिन्याच्या १९ व्या तारखेला सुरू केली आणि अस्पृश्य समाजाच्या सर्वांगीण उन्नतीची मुहूर्तमेढ रोविली होती. महाड येथील चवदार तळ्यावर पाणी पिण्याचा आपला समान हक्क आहे अशी अस्पृश्य बांधवांनी मागणी करून त्याप्रमाणे चळवळ सुरू करताच तेथील सनातनी व काही विघ्नसंतोषी स्पृश्यांनी या समान हक्काच्या लढ्यास विरोध केला आणि अस्पृश्यांविरुद्ध मनाई मिळवून कायदेशीररितीने या चळवळीला प्रतिबंध केला होता. परंतु हा दावा महाडच्या सब-जज्जानी काढून टाकल्यावर याच सनातनी मंडळीनी त्यांच्याविरूद्ध ठाणे कोर्टात अपिल केले. तेथे बरेच दिवस या खटल्याबाबत काम होऊन शेवटी याही कोर्टाने खालच्या कोर्टाच्या हुकूमाबर निकाल देताच महाडच्या स्पृश्य मंडळींनी पुन्हा एकदा प्रयत्न करून, अस्पृश्य समाजाच्या या समान हक्काच्या लढ्याचा नायनाट करण्याचा प्रयत्न करण्यासाठी मुंबई हायकोर्टाकडे धाव घेतली. येथे हे अपिल बरेच दिवस लांबणीवर पडले. परंतु शेवटी गेल्या महिन्यात सुनावणीस निघाले. या खटल्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर व इतर चौघे अस्पृश्य प्रतिनिधी यांना प्रतिवादी केले होते. कोर्टाने या खटल्याची सर्व प्रकारची हकिगत तेथील परिस्थिती, या तळ्याचे ऐतिहासिक महत्त्व आणि जुना रीतिरिवाज याविषयी माहिती करून घेतली आणि काही दिवस निकाल देण्याचे तहकूब करून शेवटी ता. १७-३-३७ रोजी न्या. ब्रमफील्ड यांनी या खटल्याचा निकाल जाहीर केला. त्यांनी निकालात स्पष्टपणे सांगितले की, चवदार तळ्याच्या मालकीबद्दल आता वादीचे काही म्हणणे उरलेले नाही परंतु लॅन्ड रेव्हेन्यू कोडप्रमाणे महाडचे चवदार तळे हे सरकारच्या मालकीचे होते आणि डि. म्यु. ॲक्टप्रमाणे सध्या या तळ्याची मालकी महाड म्युनिसीपालिटीकडे आहे. असे प्रतिवादीने प्रतिपादन केले आहे. या तळ्याचा मुसलमानासारख्या अहिंदू समाजाकडूनही उपयोग केला जातो. यावरून फक्त स्पृश्य लोकांनाच या तळ्याचा उपयोग करण्याचा हक्क पोचत नाही. तथापि प्राचीनकाळी या तळ्यावर अस्पृश्य लोकांना पाणी

भरण्याची व पिण्याची मनाई होती असे वादीचे म्हणणे आहे. परंतु या प्राचीन रूढीने वादीला कायदेशीर हक्क पोचत नाही. तशात ही प्राचीन रुढी आहे असेही वादीना समाधानकारकरित्या पुराव्याने सिद्ध करता आले नाही. अशा-रीतीने या खटल्यात शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर विजयी झाले आणि महाडचे चवदार तळयात यापुढे अस्पृश्यांना कायदेशीररितीने पाणी पिण्यास व वापरण्यास हक्क प्राप्त झाला आहे. डॉ. बाबासाहेबांनी अस्पृश्य समाजाच्या सर्वांगीण चळवळीची जी दहा वर्षांपूर्वी मुहूर्तमेढ केली होती त्यात आज अपूर्व असे यश मिळाले आहे. यावरून संघटना आणि शिस्त या चळवळीने आपणाला कोणतेही अवघड कार्य कसे यशस्वी करता येते याचे अवलोकन करणे अवघड नाही. या खटल्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादि प्रतिवादीतर्फे मि. गुप्ते व मि. मोडक वकील यांनी कायद्याच्या दृष्टीने केलेल्या कामगिरीस ते अभिनंदनास प्राप्त आहेत ''.

## '' डॉ. आंबेडकर यांचे महाडास प्रयाण

ता. १९ मार्च १९४० रोजी महाड, कुलाबा जिल्हा येथे अस्पृश्यांचा १४ वा स्वातंत्र्यदिन साजरा करण्यासाठी डॉ. बाबासाहेब हे ता. १८ रोजी धरमतर मार्गाने महाडास जाण्यासाठी मुंबईहून निघाले. त्यांजबरोबर स्वतंत्र मजूर पक्षातील त्यांचे सहकारी श्री. दौलतराव जाधव, श्री. मडकेबुवा, श्री. भातनकर, श्री. पाटणे, श्री. सवादकर व श्री. सहस्त्रबुद्धे वगैरे मंडळीही होती.

महाड येथे जाताना रेवस बंदरावर रा. नारायणराव थळे व रा. कुंडलीक कमळ पाटील या चरी शेतकरी संघ व अलीबाग येथील स्वतंत्र मजूर पक्षाच्या आग्री पुढाऱ्यांनी त्यांना पुष्पहार अर्पण केले.

यानंतर धरमतर येथे बंडू पांडुरंग पाटील (आग्री) व गोपाळ चांगू जाधव (अस्पृश्य) यांनी त्यांचे स्वागत करून त्यांना पुष्पहार अर्पण केले. बंदरावर डॉ. आंबेडकरांच्या स्वागतासाठी नारायण नागोजी पाटील, सौ. पाटील, अनंतराव चित्रे, श्री. कोवळे व श्री. सुरबा टिपणीस वगैरे कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यातील शेतकरी पुढारी उपस्थित होते.

यानंतर महाडास जाता गडप गावच्या शेतकऱ्यांतर्फे श्री. दामोधर खंडू पाटील या आग्री पुढाऱ्याने त्यांचे स्वागत करून त्यास पुष्पहार अर्पण केला.

कोलाड येथे रावसाहेब बारटक्के,श्री. किंजळे, पुना म्युनिसीपालिटीचे माजी नगराध्यक्ष, श्री. शेखा खोत व श्री. जोसेफ खोत यांनी त्यांचे स्वागत केले.

यानंतर इन्दापूर येथे श्री. बापूसाहेब देशमुख यांनी डॉ. साहेब व इतर पाहुणे मंडळी यांचे टोलेजंग स्वागत करून त्यांना अल्पोपहार दिला. या स्वागत समारंभात कु. भागीबाई तुकाराम गायकवाड या अस्पृश्य तरुणीने उत्साहाने भाग घेतला होता. नंतर नाणगाव येथे श्री. अनंत गंगाराम खुळे व श्री. शंकरराव खुळे या बंधूद्वयांनी डॉ. बाबासाहेब यांचे स्वागत करून त्यांना पुष्पहार अर्पण केला.

येथून पाहुणे मंडळी लोणेरे या गावी पोहोचताच तेथे श्री. पांडूरंग बुवा चोरवे (कुणबी) या शेतकरी पुढाऱ्याने डॉ. साहेबांचे स्वागत करून त्यांना पुष्पहार अर्पण केला.''[१]

## '' महाड अस्पृश्य स्वातंत्र्य दिन--झेंडावंदन

सोमवार, ता. १९ मार्च १९४० रोजी कुलाबा जिल्ह्यातील महाडगावी १४ वा अस्पृश्य स्वातंत्र्य दिन साजरा करण्यात आला. या स्वातंत्र्यदिनी सकाळी महाड येथील सुप्रसिद्ध चवदार तळयावर 'झेंडावंदन' समारंभ साजरा करण्यात आला.

या समारंभासाठी स्वतंत्र मजूर पक्षाचे सुमारे २०० स्वंयसेवक डॉ. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली इतर बाहेरगावाहून परिषदेसाठी आलेल्या मंडळीसह मिरवणुकीने सकाळी ११ वाजता चवदार तळयावर उपस्थित झाले. समारंभाच्या आरंभी श्री. मचंडे यांनी बिगूल वाजवून समारंभाच्या सुरवातीचा इशारा जमलेल्या मंडळीना दिला. यानंतर स्वतंत्र मजूर पक्षाचे कुलाबा जिल्ह्यातील सुप्रसिद्ध पुढारी श्री. सुरबा टिपणीस यांनी सभाजनास शांतता राखून समारंभ पार पाडण्याची विनंती केली.

नंतर खानदेशातील स्वतंत्र मजूर पक्षाचे पुढारी रा. दौलतराव जाधव यांनी १९२७ साली चवदार तळयाबाबत झालेल्या लढ्याची माहिती सांगून स्वतंत्र मजूर पक्षाचा झेंडा कसा विजयी झालेला आहे याचे थोडक्यात विवेचन केले.

यानंतर थोडावेळ बिगूल वादन होऊन झेंडावंदनाकरिता केलेले पदरा चंद्रकांत केशव यांनी तडफदाररीतीने झटकले व स्वतंत्र मजूर पक्षाचा झेंडा डॉ. बाबासाहेबांच्या हस्ते उभारण्यात येऊन त्याला सामुदायिकरित्या वंदन करण्यात आले.

झेंडावंदनानंतर आमदार जाधव यांनी झेंड्याला साक्षी ठेवून अस्पृश्यांनी घ्यावयाची प्रतिज्ञा जमलेल्या मंडळीस वाचून दाखविली.

---

[१] जनता : २३ मार्च १९४०.

## आपली चळवळ अव्याहतपणे फोफावत आहे

हा प्रतिज्ञाविधी संपल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे टाळ्यांच्या गजरात भाषण करावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनी आणि बंधुजनहो,

आता आपण स्वातंत्र्य दिनानिमित्त होणाऱ्या कार्यक्रमातील पहिला कार्यक्रम पार पाडीत आहो. दुपारी मिरवणुकीचा दुसरा कार्यक्रम पार पाडून आपली सभा सायंकाळी होणार आहे. मिरवणुकीत व सभेत आपण शिस्त व शांतता राखली पाहिजे. गेल्या पंधरा वर्षांच्या अवधीत आपणास कुलाबा जिल्ह्यात, विषेशतः महाडास स्पृश्यांपैकी अनेक सहकारी लाभून आपली चळवळ अव्याहतपणे फोफावत आहे. तरी पण आपल्या समारंभात कोणीही काहीच उपद्व्याप करणार नाही अशी खात्री देता येत नाही. जुन्याकाळची आपली आठवण अद्याप ताजी आहे. म्हणून आपण मिरवणुकीत व समारंभात शिस्त व शांतता राखण्याची शिकस्त केली पाहिजे. समारंभाचा खेळ खंडोबा करण्यास एखाद दुसराही माणूस पुरेसा होत असतो. एखादा अपशब्द वापरण्यात आला, एखादा दगड फेकण्यात आला तरीही शांतताभंग होण्याचा संभव असतो. असे काही झाले तरी आपण शांतता राखावी असा मी आपणास इशारा देत आहे. समारंभाचा बेरंग करण्याचा कोणी प्रयत्न केला तरी त्याकडे दुर्लक्ष करा व समारंभ यशस्वी करा असे माझे आपणास सांगणे आहे. माझे स्वातंत्र्य दिनाबाबतचे भाषण संध्याकाळच्या सभेत होणार असल्यामुळे आता जास्त काही बोलण्याची जरूरी नाही.

डॉ. बाबासाहेबांच्या भाषणानंतर स्वयंसेवक मंडळी चवदार तळयाला फेरी घालून घरी गेली. झेंडावंदन समारंभाप्रसंगी लाऊड स्पीकर लावल्यामुळे झेंडावंदनाचा कार्यक्रम चवदार तळयापासून एक मैलपर्यंत स्पष्टपणे ऐकू येत होता.'' [१]

## '' अस्पृश्य स्वातंत्र्यदिनाची विराट सभा

दुपारी सुमारे तीन वाजता सभाध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची एक जंगी मिरवणूक काढून त्यांना सभास्थानी आणण्यात आले. महाडच्या इतिहासात ही मिरवणूक व सभाही अद्वितीयच होती. या सभेस पुण्याचे श्री. गोपीनाथराव पोतनीस यांजबरोबर सुमारे १,००० मावळे मुद्दाम येथे आले होते.

मिरवणुकीस सुरवात वीरेश्वर रोडवरून होऊन ती पोष्ट ऑफिस, उभा प्रांतिक रस्ता, साळवाडा अलावा, सरेकर आळी, चवदार तळयाची दक्षिण बाळी, डोंगरे पूल, पेठ व सुकाळी गल्ली या मार्गाने सभास्थानी नेण्यात आली. मिरवणुकीची लांबी सुमारे मैल ते दीड मैल होती.

---

[१] जनता : २३ मार्च १९४०.

मिरवणुकीच्यावेळी 'स्वतंत्र मजूर पक्षाचा विजय असो.' 'आंबेडकर झिंदाबाद,' 'महात्मा फुले की जय,' 'महात्मा आगरकर की जय,' 'शेतकऱ्यांचा विजय असो,' 'कामकऱ्यांचा विजय असो,' 'खोतशाही नष्ट करा,' 'सावकारशाही नष्ट करा,' 'भांडवलशाही नष्ट करा,' 'साम्राज्यशाही नष्ट करा,' 'भिक्षुकशाही नष्ट करा,' 'जातीभेदांना मूठमाती द्या,' 'अस्पृश्यता नष्ट करा,' 'समतेचा विजय असो,' 'मालकशाही नष्ट होवो,' 'अस्पृश्य स्वातंत्र्याचा विजय असो,' वगैरे विधिनिषेधात्मक गर्जनांनी महाडचे वातावरण दुमदुमून गेले होते.

मिरवणूक चालू असता श्री. भानुदास कांबळे व श्री. भाई शेठ वडंके या दोघांनी जुन्या पेठेत डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण केले. साळवाड्यात साळी मास्तर यांनी त्यांना पुष्पहार अर्पण केला. सरेकर आळीत श्री. भिकोबा मालुसरे व श्री. यशवंतराव टिपणीस यांनी त्यांचा सत्कार केला. चवदार तळयाच्या नजीक श्री. दगडोबा साळुंके. श्री. दत्तोबा देशपांडे व श्री. चिंतोबा देशपांडे यांनी त्यांचा सन्मान केला. नव्या पेठेतील महाड मुंबई मोटार युनियनतर्फे साळी मास्तर यांनी डॉ. बाबासाहेबांना पुष्पहारांनी मंडीत केले.

अशा थाटाने ही टोलेजंग मिरवणूक सुमारे पाच वाजता सभास्थानी येवून दाखल झाली व सभेच्या कार्यास सुरवात करण्यात आली.

या सभेस महाड शहराबाहेरील श्री. गोपीनाथराव पोतनीस, राजारामभाऊ भोळे, भाऊसाहेब गडकरी, आमदार सावंत, श्री. अधिकारी वकील, आमदार घाडगे व शंकरराव खुळे ही मंडळी उपस्थित होती.

स्थानिक मंडळीपैकी रा. ब. कर्णिक, श्री. अण्णासाहेब भिलारे, यशवंतराव वीरकर, कॅप्टन जगताप, पी. बी. गांधी, हिरालाल शेठ मारवाडी, विष्णुपंत चांदे, डॉ. चितळे, डॉ. खेडकर, बुटाला वकील, शंकरशेट डोळस, महादेवशेठ बनारसे, दत्तोपंत देशपांडे, हरिभाऊ बनारसे, भानुदास कांबळे, नारायणराव मांगडे व सावंत वकील वगैरे मंडळी सभास्थानी उपस्थित होती.

सभेच्या आरंभी कु. इन्दु गुप्ते व कु. विमल गुप्ते या भगिनींनी स्वागतपर पद्य व कु. वृंदा चित्रे यांनी आभार प्रदर्शक पद्य म्हटल्यावर सभेचे स्वागताध्यक्ष श्री. सुरबा टिपणीस यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात नियोजित अध्यक्षांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली.

श्री. सुरबाच्या भाषणानंतर श्री. नारायणराव पाटील यांनी अध्यक्षांच्या निवडणुकीच्या सुचनेस पाठिंबा दिला.

पनवेलचे आमदार भातणकर यांनी पाटलांच्या भाषणास पाठिंबा दिल्यावर टाळ्यांच्या प्रचंड गजरात व आंबेडकर झिंदाबाद या गर्जनात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले.

यानंतर अध्यक्षांच्या आदेशानुसार श्री. चिंतामणराव देशपांडे यांनी सभेस आलेले ना. भास्करराव जाधव, श्री. केशवराव ठाकरे, दामुअण्णा पोतनीस, गोविंदराव वरघरकर, देवराव नाईक, कारखानीस, श्री. राजभोज, काकासाहेब लिमये वगैरे स्पृश्यास्पृश्य पुढाऱ्यांचे संदेश वाचून दाखविले''. [१]

''सुरवातीच्या हॅंडबिलप्रमाणे १९ मार्च १९४० रोजी अस्पृश्यांच्या जीवनात क्रांतिकारक बदल घडवून आणणारा महाड क्रांतीदिन, स्वातंत्र्यदिन म्हणून पाळण्याचा निर्णय घेऊन त्या दिवशी महाड येथे स्पृश्य, अस्पृश्य, मुसलमान समाजातील पंधरा ते वीस हजार लोक एकत्रित झाले होते. या जनसमुदायाला बाबासाहेब आंबेडकरांनी मार्गदर्शन केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

' सभेचा हेतू हॅंडबिलावर आपणास कळून चुकलाच आहे. महाडमध्ये आज सुखाचे, शांततेचे व ऐक्याचे वातावरण नांदत आहे. पण चौदा वर्षांपूर्वी, याचवेळी, याच महाडात कोण दुर्धर प्रसंग ओढवला होता त्याची आपणापैकी पुष्कळ जणांना आठवण असणारच. सन १९२७ च्या सभेस हजर असणारे सभाजन आजच्या सभेस हयात असून गैरहजर आहेत, असे सहसा होणार नाही.

ती चौदा वर्षांपूर्वीची एक मामुली सभा याच थियेटरात भरली होती. अस्पृश्यांना सार्वजनिक तळी खुली करावी असा एक ठराव त्या सभेत पास करण्यात आला. या ठरावास सर्व पक्षांच्या लोकांचा पाठिंबा मिळाला होता. या पाठिंब्याने उतावळा नवरा गुडघ्याला बाशिंग अशी आमच्या अनंतराव चित्र्यांची स्थिती झाली. आम्ही सर्व सभाजन हुरळल्या मेंढीप्रमाणे चवदार तळ्यावर सामुदायिकरित्या पाणी पिण्यास गेलो. आमच्या मंडळींनी तेथे येथेच्छ जलपान केल्यावर आम्ही कृतार्थ होऊन परत आपआपल्या ठिकाणी गेलो. माझी राहाण्याची व्यवस्था त्यावेळी ' ट्रॅव्हलर्स बंगलो ' मध्ये करण्यात आली होती. मी व माझे सहकारी बंगल्यावर गेलो. आमची जेवणाची काही सोय त्या दिवशी करता येणे शक्य झाले नाही. दुपारच्या वेळी आम्हास रक्तबंबाळ झालेल्या अस्पृश्यांचे दर्शन मात्र घडून आले. महाडातील स्पृश्यांनी अस्पृश्यांना एकटे दुकटे गाठून पिटून काढले होते. स्पृश्य मारेकऱ्यांचा मोर्चा आम्हाकडे बंगल्यावर दुपारी चारच्या सुमारास आला होता. या मोर्चात सुमारे दोन हजार

---

[१] जनता : ३० मार्च १९४०.

माणसांचा जमाव होता. विरेश्वराच्या देवळात डॉ. आंबेडकर जाणार अशी कंडी उठवून त्यांना चेतविण्यात आले होते. पण त्या जमावाबरोबर पोलीस अधिकारी असल्याने त्या दिवशी आमचे मरण टळले. पोलीस अधिकारीही त्यावेळी घाबरले होते. 'मुंबईला जा नाहीतर पोलीस खात्यात राहा ' असे त्यांनी मला स्पष्ट सांगितले. जखमी लोकांना टाकून मुंबईला जाणे मला शक्य नव्हते. म्हणून मी पोलीस खात्यात राहू लागलो. श्री. सुरबा टिपणीस यांनाही लोकांची भीती होतीच. तरी देखील ते मला थोडे फार चोरून मारून अन्न पुरवीत असत. वीर गावचा म्हातारा वीरकर मात्र नित्य नेमाने मला जेवण आणीत असे.

सन १९२७ साली डिसेंबर महिन्यात आम्ही सत्याग्रहासाठी पुन्हा सभा भरविण्याचे ठरविले. आम्हावर मनाई हुकूम बजावण्यात आला. लोक मनाई हुकूम तोडण्यास एका पायावर तयार होते. पण आमच्या सभेत सनदशीर मार्गाने जाण्याचे धोरण ठरविण्यात आले. पुष्कळ मित्र नाराज झाले. शत्रु आम्ही तुरुंगाला भितो असे म्हणू लागले. पण आमचे धोरणच रास्त होते, असे इतिहासाने सिद्ध केले आहे.

आजच्या सभेत स्पृश्य, अस्पृश्य, हिंदू, मुसलमान खांद्याला खांदा लावून बसले आहेत. त्यावरून आमचेच धोरण बरोबर होते, हेच सिद्ध होत नाही काय ?

आज आपण अस्पृश्यांचा स्वातंत्र्यदिन साजरा करण्यासाठी जमलो आहोत. अस्पृश्यांचे स्वातंत्र्य हा बहुतांशी सामाजिकच प्रश्न आहे. या प्रश्नाचे मी आज सिंहावलोकन करणार आहे. सामाजिक स्थित्यंतराचा मी आज विचार करणार आहे. राजकीय चळवळीविषयी या सभेत मी फारसे लक्ष देणार नाही.

नुसत्या राजकीय स्वातंत्र्याने जनतेचे कल्याण होईल, हा भ्रम आहे. इंग्रज गेला की आपण सुखी होऊ, अशी खात्री कोणासही देता येणार नाही. जगातील अनेक स्वतंत्र देशातील जनता आजही दुःखी कष्टी आहे, असे अनुभवाने दिसून येते. रुमानिया, अल्बेनिया, सर्व्हिया व युगोस्लोव्हाकिया हे देश स्वतंत्र आहेत. पण ते सुखी आहेत काय ? फिनलँड व रशिया यांची स्थिती आपल्या डोळ्यांपुढे आहेच. ज्या राष्ट्रात समाजस्थिती सुव्यवस्थित तेच राष्ट्र स्वातंत्र्य मिळवून टिकवू शकते. कै. सर. टी. माधवराव या हिंदी पुढाऱ्याने एका ठिकाणी असे म्हटले आहे की ' जनतेच्या दुःखाला सामाजिक दुःस्थितीच कारणीभूत होत असते ' आपली सामाजिक चौकट आर्य संस्कृतीने हाडकासारखी कठीण करून सोडली आहे. तिच्यामध्ये लवचिकपणा मुळीच उरला नाही. परिस्थितीनुरूप तिच्यात फेरफार करणे सुकर होत नाही. आर्य संस्कृती श्रेष्ठ मानून तिला उराशी कवटाळण्यात अर्थ नाही. या संस्कृतीचा मानीव श्रेष्ठपणा हा निव्वळ

भ्रम आहे. आर्यांची अमानुष हिंसावृत्ती त्यांच्या यज्ञसंस्थेने चांगलीच प्रतीत होते. यज्ञात अगणित पशुंचे हनन आर्य लोक बेदरकारपणे करीत असत. एका एका यज्ञात पाच सातशे पशू धर्माच्या नावाखाली मारले जात. आर्य लोक हे पट्टीचे सोमपान करणारे असत. त्यांच्याइतके दारूबाज क्वचितच पाहावयास मिळतील. ते शूद्रांना तुच्छ मानीत व स्त्रियांना शूद्रा-पेक्षाही हीन मानीत. आपल्या माय बहिणीच्या स्त्री-जातीला हीन मानणाऱ्या या आर्यांची संस्कृती काय दर्जाची होती, हे सांगणे नकोच. याच आर्यांनी चार वर्ण करून समाजाचे तुकडे पाडले व शूद्रांना हीन स्थितीत नेऊन लोटले. ही आर्य संस्कृतीच आजच्या आपल्या हीन स्थितीस कारणीभूत झाली आहे.

भगवान बुद्धाने ही दु:स्थिती सुधारण्याचा प्रयत्न केला. त्याने यज्ञसंस्थेला विरोध केला. स्त्रिया, शूद्रांची स्थिती सुधारण्याचे प्रयत्न केले व मद्यपानासही बंदी केली.

पण ब्राह्मणी धर्माला हा बुद्ध धर्म मानवला नाही. त्या धर्माच्या विरोधापुढे बुद्ध धर्म तगला नाही.

बुद्धानंतरही अनेकांनी समाज सुधारण्याचे प्रयत्न केले. पण ते सफल झाले नाहीत.

अगदी अलीकडच्या काळातही कै. आगरकर व महात्मा जोतिबा फुले यांनी समाज सुधारण्याचे भगीरथ प्रयत्न केले. हे सर्व अतिरथी-महारथी थकले, पण आपल्या गेल्या पंधरा वर्षांच्या चळवळीस मात्र थोडेफार यश मिळाले आहे, ही आनंदाची गोष्ट होय.

चवदार तळयाचा लढा हा समाजसमतेचा लढा होता. या लढ्याचे परिणाम दूरवर पोहचले आहेत. ते अवलोकन केल्यानेच या लढ्याचे व्यापक स्वरूप ध्यानात येते. हा लढा सुरू झाल्यापासूनच आपण मृतमांस भक्षणाची व गावात तुकडे मागून पोट भरण्याची दुष्ट चाल सोडून दिली आहे. आपल्या या चळवळीच्या सुरवातीस आपणातील रूढ चाली पाळणारे 'आपले पूर्वज मूर्ख होते काय ? ' असा प्रश्न आम्हास विचारीत असत. यावरून त्यावेळेच्या जनमनाची वृत्ती कळून येते. आज ही वृत्ती पालटली आहे. हा पालट चवदार तळयाच्या लढ्यातूनच उत्पन्न झाला आहे. आपल्या लोकात नानातऱ्हेच्या देवदेवतांचा बुजबुजाट होता. आपणात खंडोबा व मुरळयांचे प्रस्थ फार माजले होते. आता आपणातून पूर्वीच्या भूताखेतांची व देवदेवतांची हकालपट्टी झालेली आहे. आज महार समाजाची कायिक, मानसिक व आत्मिक अशी त्रिशुद्धी झालेली आहे. आपण आजचा हा स्वातंत्र्य दिन पाळण्यास सर्वतोपरी लायक झालेलो

आहो. 'मन स्वतंत्र तर मनुष्य स्वतंत्र' ही गोष्ट ध्यानात धरा. चवदार तळयाच्या लढ्यातून स्वतंत्र मजूर पक्षाचा उगम झाला आहे. हा पक्ष या लढ्याची राजकीय फलश्रुतीच होय. चवदार तळयाच्या लढ्यानेच आपल्या वर्गात राजकीय, सामाजिक, आर्थिक जागृती झाली आहे, ही गोष्ट कोणीही विसरता कामा नये.

या लढ्याचा स्पृश्य वर्गावरही परिणाम झालाच आहे. महाराष्ट्रात महाडकरांचा पहिला नंबर लागतो, तो या लढ्यामुळेच. ही जागृती व ही प्रगती संग्रामजन्यही होत. चौदा वर्षापूर्वी फुटलेल्या डोक्यांनी ही जागृती व ही प्रगती घडवून आणलेली आहे. येथे जमलेल्या कुणबी व मराठा बांधवांना मी आता दोन शब्द सांगणार आहे, ते त्यांनी लक्ष देऊन ऐकावे.

महार समाजात सध्या स्पृहणीय जागृती झाली आहे. महाराष्ट्रापुरतेच बोलावयाचे तर महार व ब्राह्मण यांनाच राजकारण कळते, असे म्हणण्याची पाळी आली आहे. कुणबी-मराठ्यांमध्ये जागृती नाही.

अशी परिस्थिती का असावी याचा तुम्ही विचार करावयास हवा. तुम्हामध्ये आपण महारांपेक्षा श्रेष्ठ, असा अभिमान भरपूर आहे. पण महारापेक्षा मोठे होण्यात काय भूषण आहे, ते मला समजत नाही. समाजाच्या तळाच्या लोकांशी ताठ्याने वागण्यात पुरुषार्थ कोणता ?

कुलाबा जिल्ह्यात सात मामलतदार आहेत, त्यातले कुणबी-मराठ्यांचे किती आहेत, याचा तुम्ही विचार करावयास हवा. अधिकारी वर्गात तुमचे लोक किती आहेत ? प्रांताधिकारी तुमच्यापैकी आहेत काय ? कलेक्टर तुमच्यापैकी आहेत काय ? या महत्त्वाच्या गोष्टींचा तुम्ही विचार करावयास हवा. तुम्ही ७० टक्के, ८० टक्के लोक आहात. निव्वळ झाडूवाले व पट्टेवाले याजकडे पाहूनच का तुम्ही अभिमान बाळगणार ?

महार समाज खंबीर बनला आहे. आता तो बुडणार नाही व तुमच्या पायाखालीही राहणार नाही, ही गोष्ट ध्यानात बाळगा. यापुढे तुम्हीतरी जागे व्हा. तुम्ही ७०-८० टक्के लोक असता तुम्हाला निव्वळ हमाली करण्यात आयुष्य कंठावे लागावे, कोण ही तुमची दैना ?

तुम्ही काँग्रेसला मिळालात तरी काँग्रेस तुम्हाला स्वतंत्रपणे वावरू देणार नाही. तुम्हाला काँग्रेसचे गुलाम म्हणूनच राबावे लागेल, हे लक्षात ठेवा. आमच्या स्वतंत्र मजूर पक्षाचा पाया महारच होत. धार्मिक, सामाजिक,

राजकीय व आर्थिकदृष्ट्या पिळल्या जाणाऱ्या आपल्या समाजाच्या तळाच्या वर्गजागृतिवरच स्वतंत्र मजूर पक्षाचा पाया रचला असल्यामुळे तो पक्ष अभेद्य असाच राहणार आहे, हे निश्चित समजा.

आमची शिडी घेऊन तुम्ही कामास लागा. पण आपण आपली स्वतःची शिडी तयार करण्यास मात्र विसरू नका. आमच्या अस्पृश्यांनी विटाळलेल्या पक्षास, नको असेल तर तुम्ही मिळू नका. पण आम्ही जी कासवाची पाठ तयार केली आहे तिचा अवलंब करून आपल्या दुःखसागरातून तरून जाण्यास मात्र अनमान करू नका, हेच माझे तुम्हास सांगणे आहे.'' [१]

'' अध्यक्षीय भाषणानंतर महाड तालुका, माणगाव व मुंबईतील फोर्ट भागात राहणारे कुलाबा रहिवासी यांनी डॉ. साहेबांस रु. ३१८, रु. २१० व रु. ३१ च्या थैल्या अर्पण केल्या.

डॉ. बाबासाहेबांनी यापैकी अर्धी रक्कम महाड येथील सुभेदार सवादकर बोर्डिंग या संस्थेस व राहिलेली रक्कम स्थानिक कार्यास देण्यात येईल असे जाहीर केले.

रा. जाधवांच्या भाषणानंतर मडकेबुवा जाधव यांनी स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभासदांची संख्या वाढविण्यासाठी प्रयत्न करणे जरूर आहे असे सांगितले. सभेच्या शेवटी दोन अस्पृश्य मुलांनी अस्पृश्य चळवळीस पोषक अशी पद्ये गाऊन दाखविली व रा. पोतनीस यांनी सर्वांचे आभार मानण्याचा ठराव मांडला.

आभारदर्शक ठरावानंतर, स्वतंत्र मजूर पक्ष कुलाबा जिल्हा, सुभेदार सवादकर बोर्डिंग, महाड, स्वतंत्र मजूर पक्ष, माणगाव तालुका, श्री. सुरबा टिपणीस, महाड, श्री. ओहोळ मास्तर, श्री. शंकरशेठ खुळे व श्री. भास्करशेठ खुळे यांच्यातर्फे बाबासाहेबास पुष्पहार अर्पण करण्यात आल्यावर सभा समाप्त झाली.

हा स्वातंत्र्य दिन पार पाडण्याचा श्री. राधो दगडू ओहोळ, विठोबा गणपत वरघरकर, देऊ रामा जोजी, यशवंत भिकाजी साळवे, लक्ष्मण विरकर, भिकू राया महाडकर व गुणाजी देवजी कोलकर यांनी अत्यंत परिश्रम केले म्हणून त्यांचे मानावे तितके आभार थोडेच होत.'' [२]



---

[१] जनता : ३० मार्च १९४०.

[२] तत्रैव.

## १७५

# व्यवहारज्ञान व शील हे महाराष्ट्रीयांचे दोन गुण होत असे माझे मत आहे

ता. १९ मार्च १९४० रोजी महाड येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर अस्पृश्य स्वातंत्र्य दिनानिमित्त आले असताना त्यांना महाड म्युनिसीपालिटीने मानपत्र अर्पण केले. त्या प्रसंगी महाड म्युनिसीपालिटीचे सभासद व महाडातील प्रमुख नागरिक हजर होते. रा. खोडके यांनी मानपत्र वाचले. मानपत्र येणे प्रमाणे—

डॉ. भीमराव रामजी आंबेडकर,

एम. ए., पीएच. डी., (कोलंबिया), डी. एससी., (लंडन), बार ॲट लॉ.,

एम. एल. ए., जे. पी., मुंबई, यांचे सेवेशी,

विद्वत्मान्य भारतभूषण डॉक्टरसाहेब,

बरोबर तेरा वर्षांपूर्वी ता. १९ मार्च १९२७ रोजी आमच्या या महाड शहरात आपल्या नेतृत्वाखाली अस्पृश्य जनतेने चवदार तळ्यात पाणी भरून आपला नागरिक समानतेचा जन्मसिद्ध हक्क प्रस्थापित केला. त्या ऐतिहासिक प्रसंगाची स्मृती जागृत ठेवण्याच्या हेतूने ता. १९ मार्चचा आजचा दिवस 'अस्पृश्य-स्वातंत्र्य दिन' म्हणून साजरा करण्याच्या निमित्ताने आपण येथे आला आहात. अशा या ऐतिहासिक महत्त्वाच्या प्रसंगी महाड शहरातील नागरिकांतर्फे आम्ही महाड म्युनिसीपालिटीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सर्व सभासद आपले हार्दिक स्वागत करतो.

विद्यार्थीदशेत आपण नाना प्रकारचे कष्ट सोसून ज्ञानार्जन केलेत. आपली असामान्य बुद्धिमत्ता व ज्ञानलालसा पाहून कै. श्रीमंत सर सयाजीराव महाराज गायकवाड यांनी आपल्याला परदेशी जाऊन ज्ञान संपादन करण्याची संधी आणि साधन प्राप्त करून दिले. तत्त्वज्ञान, राजकारण, शास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, कायदा वगैरे गहन विषयात आपण स्वदेशी व परदेशी विश्वविद्यालयात पारंगतता प्राप्त करून घेतली आहे. केवळ स्वार्थबुद्धीने आपण मोठ्या अधिकाराच्या सरकारी नोकरीचा हेतू धरला असता तर आपल्या थोर विद्वत्तेच्या बळावर आपल्याला सहज साध्य करून घेता आला असता, परंतु आपण सरकारी नोकरीच्या मोहपाशात न सापडता आपल्या स्वतंत्र वृत्तीला साजेसा बॅरिस्टरचा पेशा पत्करला व उत्तम कीर्ती संपादन केली.

---

जनता : २३ मार्च आणि ३० मार्च १९४०.

आपण आपल्या प्रभावशाली नेतृत्वाने ह्या देशातील सात कोटी अस्पृश्य जनतेचा स्वाभिमान जागृत केलात, तिच्यात नवचैतन्य आणि स्फूर्ती निर्माण करून तिला आपल्या माणुसकीच्या जन्मसिद्ध हक्कांची जाणीव करुन दिलीत. आपण आपल्या असामान्य कर्तृत्वाने अस्पृश्य जनतेच्या आचार विचारात अभूतपूर्व क्रांती घडवून आणलीत, इतकेच नव्हे तर स्पृश्य हिंदू समाजालाही अंतर्मुख करून विचारप्रवण बनविलेत. ते आपण केवळ दोन दशकांच्या अल्पावधीत घडवून आणलेत ही गोष्ट जितकी आश्चर्यकारक तितकीच आनंदप्रद आणि आशादायक आहे. अतिदलित व अस्पृश्य समाजात आपल्यासारखा अद्वितीय नेता निर्माण झाला आहे, हे अस्पृश्य जनतेचे नव्हे तर अखिल हिंदी जनतेचे परमभाग्य होय.

तेरा वर्षांपूर्वी आपल्या नेतृत्वाखाली या शहरातील चवदार तळ्यावर पाणी भरून हजारो अस्पृश्य बंधुंनी आपला नागरिक समानतेचा हक्क बजावला. त्यानंतरच्या काळात येथील लोकमतात स्पृहणीय क्रांती झाली असून तिचे श्रेय मुख्यतः आपल्यालाच दिले पाहिजे. आपल्या अस्पृश्योन्नतीच्या महत्कार्याला येथील स्थानिक लोकांचा पाठिंबा आहे, असे आम्ही आपल्या महाडच्या नागरिकांच्या वतीने आश्वासन देऊ इच्छितो.

ज्यांच्यामध्ये आपण जन्म घेतलात त्या अस्पृश्य समजाच्या उन्नतीसाठी आपल्या अंतःकरणाला लागलेली तळमळ गेल्या वीस वर्षांत अनेक लहानमोठ्या प्रसंगी जनतेच्या निदर्शनास आली आहे. ज्या विशिष्ट सामाजिक परिस्थितीत आपल्याला अस्पृश्य जनतेची राजकीय व सामाजिक प्रगती करावयाची आहे तिचा विचार करता आपल्या चळवळीचे स्वरूप बाह्यतः जरी जातीय दिसत असले तरी अंतरंगी ती पूर्णपणे राष्ट्रीय आहे, ही गोष्ट विचारवंतांना कबूल करावीच लागेल. गोलमेज परिषदांच्या व पुणे कराराच्या प्रसंगी परिस्थितीनुरूप स्वजनहित आणि राष्ट्रहित यांचा योग्य समन्वय करण्याचा आपण आटोकाट प्रयत्न केलात. राजकीय क्षेत्रात आपण केलेल्या कामगिरीची ज्यांना यथातथ्य जाणीव आहे अशा हिंदी नागरिकांच्या अंतःकरणात आपल्याविषयी पूर्ण आदर वसत आहे.

गेल्या तीन वर्षात स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना करून आपण आपल्या राजकीय कार्यक्षेत्राची व्याप्ती वाढविली आहे. केवळ अस्पृश्य नव्हे तर देशातील श्रमजिवी, दलित, शेतकरी, कामकरी वर्गांच्या उन्नतीकरणासाठी आपण जे अविश्रांत श्रम करीत आहात ते खरोखर अभिनंदनीय आहेत.

ह्या देशातील दलित आणि श्रमजिवी वर्ग आपल्याकडे मोठ्या आशेने पाहात आहे. त्यांच्या आशा आपल्या हातून सफल होवोत व त्यासाठी आपल्याला दीर्घायुरारोग्य प्राप्त होवो अशी जगन्नियंत्या प्रभुच्या चरणी प्रार्थना करून आम्ही हे मानपत्र आदराने आणि आपुलकीच्या भावनेने आपल्याला अर्पण करीत आहोत. त्याचा स्वीकार व्हावा अशी आमची विनंती आहे.

आपले नम्र सेवक,
विष्णु नरहरी खोडके,
प्रेसिडेंट,
महाड म्युनिसीपालिटी.

मानपत्र वाचून दाखविल्यावर डॉ. आंबेडकरांनी उत्तरादाखल छोटेसे भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, सभासद व नागरिक जनहो,

आपण मला दिलेल्या मानपत्राबद्दल मी आपला फार आभारी आहे. मला आपण मानपत्र दिले नसते तरी मी आपला ऋणी राहिलो असतोच. माझ्या सार्वजनिक कार्याचा उगम महाडात झाला. त्या कार्यास लागणाऱ्या स्फूर्तीचा पुरवठाही मला येथूनच मिळाला आहे व याच शहरातून मला सहकाऱ्यांचा लाभही झाला आहे.

चौदा वर्षांपूर्वी आमच्या चळवळीने महाडात जो दंगा झाला त्यामुळे काही स्थानिक लोकांचा आम्हास विरोध होणे हे स्वाभाविकच आहे. आज आपण उदारपणे या तंट्यास कारणीभूत होणाऱ्या आम्हास सन्मानाने वागवीत आहा हे पाहून मला आनंद होत आहे. महाडच्या सहकाऱ्यांची माझ्या कार्यास बहुमोल मदत होत असते, यामुळेही मला महाडकरांबद्दल अभिमान वाटत असतो. वरून जातिवाचक भासणारे माझे कार्य अंतर्यामी खरे राष्ट्रीय स्वरुपाचे आहे हे आपण ओळखले आहे. यावरून आपला चाणाक्षपणा चांगला व्यक्त होत आहे.

माझा नेहमीचा रवंथ करण्याचा विषय राजकारण हाच होय हे आपणास माहीत असणारच. राजकारणासंबंधी बोललो नाही की मला चुकल्या चुकल्यासारखे वाटू लागते. मी आपल्या आयुष्याच्या पूर्व वयात सात आठ वर्षे विलायतेत काढली आहेत. विलायतेतच हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतातील लोक एकत्र पाहावयास मिळतात व त्यांच्याशी मैत्रीही करता येते. मला विलायतेत असतानाच महाराष्ट्रीय व इतर प्रांतातील लोक त्यांच्या स्वभावात काय गुण दोष आहेत ते ताडून पाहावयास मिळाले. बंगाल व मद्रास प्रांतातील लोकांपेक्षा महाराष्ट्रीय बुद्धीने थोडे फार कमी असतील कदाचित पण महाराष्ट्रीयात जे व्यवहारज्ञान (Common sense) ओतप्रोत भरलेले आढळून येते तसे इतर समाजात येत नाही.

मी विलायतेत असताना आम्ही हिंदी विद्यार्थी दर रविवारी एका होस्टेलमध्ये व्याख्यान ऐकण्यास जमत असू. तेथे मला एक विचित्र गोष्ट दिसून आली. आमची महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांची संख्या कमी होती. आम्ही सात, आठ विद्यार्थीच होतो व आम्ही एका बाजूला बसून व्याख्यान ऐकत असू. व्याख्यानानंतर, व्याख्यात्यास प्रश्न विचारण्यात येत असत व व्याख्यात्याच्या उत्तराने प्रश्न विचारणारांची चांगलीच शोभा होत असे. चार पाच वर्षांच्या अवधीत एकाही महाराष्ट्रीय विद्यार्थ्याने एखादा प्रश्न विचारुन आपली शोभा करून घेतल्याचे मला स्मरत नाही.

या महाराष्ट्रीयांच्या धोरणावरूनच त्यांचे व्यवहार ज्ञान उत्तम रीतीने व्यक्त होत नाही काय?

दुसरी एक गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. हिंदी चळवळींविरुद्ध विलायतेत पाळत ठेवण्यासाठी हिंदी सी.आय.डी. नेमण्यात येत असत. इतर प्रांतातील विद्यार्थी हे काम करताना आढळून येत. पण मला सांगावयास अभिमान वाटतो की, त्यामध्ये एकही महाराष्ट्रीय कधी आढळून आला नाही.

म्हणून व्यवहारज्ञान व शील हे महाराष्ट्रीयांचे दोन गुण होत असे माझे मत आहे. या गुणांमुळेच महाराष्ट्राला हिंदुस्थानात महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे.

सध्या हिंदुस्थानात काल्पनिक (Imaginary) राजकारण धुमाकूळ घालीत आहे. अशा परिस्थितीत व्यवहार व शील यांची सांगड घालून महाराष्ट्राने आपले कर्तव्य बजावले पाहिजे. आजचे राजकारण अगदीच उडाणटप्पू व अल्लडटप्पू बनले आहे. या दुर्धर प्रसंगातून हिंदुस्थानची सोडवणूक करावयास हवी आहे. हल्लीची परिस्थिती अत्यंत धोक्याची झाली आहे. आपण जागरुकता राखली तरच तरणोपाय आहे. आपण महाराष्ट्रीयांनी तरी अंधश्रद्धा ठेवून कोणाच्या तरी मागे जाणे हे आपल्या शीलास, व्यवहारास व ज्ञानास शोभण्यासारखे खास नाही.

मानपत्राबद्दल पुनः आपले आभार मानून मी आपले भाषण संपवितो.



## १७६

# स्वतंत्र मजूर पक्षाच्या आश्रयाने चालणाऱ्या वृक्षाचे छापखाना व 'जनता' पत्र हे मूळ आहे

*शनिवार ता. १४ जुलै १९४० रोजी रात्रौ ९ वाजता परळ येथे आर. एम. भट हायस्कूलच्या हॉलमध्ये स्वतंत्र मजूर पक्षाच्या मुंबई शाखेच्या कार्यकारी मंडळाची बैठक भरली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले होते. ही बैठक ठाणे बोर्डिंग, 'जनता' पत्र व भारत भूषण छापखाना या तीन संस्थांना सध्या प्राप्त झालेल्या बिकट स्थितीचा विचार करून तिच्यातून मार्ग काढण्याच्या हेतूने, मुद्दाम भरविण्यात आली होती. श्री. बाबूराव भातणकर, एम. एल. ए. यांनी सभासदांना ठाणे बोर्डिंगच्या परिस्थितीसंबंधी माहिती सांगून बोर्डिंगला मदत करण्याची विनंती केली. श्री. अनंतराव चित्रे यांनी 'जनता' व भारत भूषण छापखाना याचेसंबंधी माहिती दिली. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी लहानसे भाषण केले. ते म्हणाले,

श्री. बाबुराव भातणकर हे स्वत: जर ठाणे बोर्डिंगची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्याला तयार असतील तर माझी हरकत नाही. त्याचप्रमाणे श्री. अनंतराव चित्रे यांना छापखाना नुकसान न येता चालू शकेल, असे वाटत असेल तर आणखी काही दिवस अनुभव घेण्याला माझी तयारी आहे. मात्र बोर्डिंग आणि छापखाना याची जबाबदारी व्यक्तिश: मी माझेवर घेण्याला तयार नाही. मला शक्य होते तोवर ती जबाबदारी सांभाळली. पंचवीस हजार रुपये किंमतीचा छापखाना मी तुम्हाला काढून दिला आहे. कायदेमंडळे, म्युनिसीपालिट्या, लोकल बोर्ड वगैरेच्या निवडणुका, मुंबई म्युनिसीपल कामगार संघ वगैरे संस्था ज्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या आश्रयाने चालतात त्या वृक्षाचे छापखाना व जनता पत्र हे मूळ आहे, हे अजून आपल्यातल्या कित्येक लोकांना समजत नाही. छापखान्याचा ट्रस्ट करण्याची माझी तयारी आहे. पण आता नवीन कार्यकर्ते पुढे आले पाहिजेत. आतापर्यंतच्या कार्यकर्त्यांनी बिनामोबदला तुमचे कार्य केलेले आहे. आम्ही आता म्हातारे झालो आहोत. माझी पन्नाशी जवळ आली आहे. यापुढे तुमच्यापैकी नवीन उत्साही लोकांनी काम करण्याला पुढे सरसावले पाहिजे. माझ्याकडून शक्य ती सर्व मदत तुम्हाला देण्याला मी केव्हाही तयार आहे.



---

जनता : २० जुलै १९४०.

* भाषणाची तारीख १३ जुलै १९४० असावी-संपादक.

१७७

# निश्चयाने, निष्ठेने आणि निमूटपणे कार्य करणारे कार्यकर्ते हवेत

रविवार ता. २८ जुलै १९४० रोजी सकाळी १० वाजता दामोदर ठाकरसी हॉल, परळ, मुंबई येथे ठाणे अस्पृश्य विद्यार्थी वसतिगृह सहाय्यक मंडळाच्या विद्यमाने अस्पृश्य समाजाची जंगी जाहीर सभा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आली होती.

प्रथम श्री. पी. एल. लोखंडे यांनी प्रि. एम. व्ही. दोंदे, बी. ए. आणि श्री. एस. जी. केनी, जे.पी. यांच्या अभिनंदनाचा ठराव मांडला. त्यानंतर श्री. लोखंडे, श्री. ए. बी. केनी, श्री. सी. एन. मोहिते आणि वि. का. उपशाम यांची भाषणे झाली. यानंतर डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

आजच्या प्रसंगी विशेष भाषण करण्याची जरुरी नाही. ठाणे बोर्डिंग १९२६ साली काढण्यात आले. आज १४-१५ वर्षे समाजावर कोणत्याही प्रकारचा भार न टाकता ते चालविले. ह्या बोर्डिंगच्या बाबत मुंबई सरकारशी मी काही अटी ठरविल्या होत्या. त्यामध्ये प्रत्येक मुलामागे दरमहा १० रुपये देण्याचे ठरले होते. पण काँग्रेस सरकार अस्तित्वात आल्यावर त्यांनी माझ्याशी वाटाघाटी न करता मुलामागे १० रुपयांऐवजी ४ रुपयेच मंजूर केले. प्रत्येक मुलाचा खर्च ४ रुपयात भागवून बोर्डिंग चालविणे अतिशय कठिण काम आहे.

आता ठाणे बोर्डिंगची सारी जबाबदारी तुमच्यावर आहे. हिंदुंच्या दारी जाणे स्वाभिमानाच्या विरुद्ध आहे. आपण स्वतःच्या शिरावर जबाबदारी घेऊन बोर्डिंग अव्याहत चालविले पाहिजे. बोर्डिंग सतत चालविण्याच्या दृष्टीने आज मिळालेली मदत अपुरी आहे. कार्यकर्त्यांना काम करण्यास उत्साह येईल, अशी मदत करा. ती मदत कशी करावयाची ते तुम्ही ठरवा. पण मला वाटते आपल्यात सुशिक्षित शिक्षक, कारकून इत्यादी मंडळी प्रामुख्याने दिसत आहे. त्यांना दरमहा बोर्डिंगला मदत करणे शक्य आहे. म्युनिसीपल युनियनच्या कार्यकर्त्यांनी युनियनच्या सभासदांकडून वर्षाच्या काठी काही मदत मिळवून द्यावी. लग्नादी विधी होतात त्यावेळी बोर्डिंगला मदत करावी.

---

जनता : ३ ऑगस्ट १९४०.

समाजात १०० च्या वर संस्था आहेत. त्यांनी वर्षअखेर २०-२५ रु. दिल्यास काही वावगे होणार नाही. पण मला वाटते पैशाच्या अभावी बोर्डिंग बंद पडणार नाही. आपल्या समाजात एकाग्र चित्ताने काम करणारा एकही मुनष्य आज वीस वर्षात मला दिसला नाही. कौन्सिलच्या किंवा म्युनिसीपालिटीच्या एका जागेकरिता १०० अर्ज तयार असतात. पण एकच काम एका मार्गाने, एकाच ध्येयाने करणारा एकही मनुष्य अजून माझ्यापुढे आलेला नाही. शिक्षण, सामाजिक आणि आर्थिक अडचणी हे प्रश्न महत्त्वाचे आहेत. ही कामे करण्यास प्रसिद्धीची अपेक्षा न करता काम करणारी माणसे पाहिजेत. जो तो प्रसिद्धीच्या मागे आहे. त्यामुळे पाहिजे तसे काम होत नाही. तात्पुरत्या कामाने महत्त्वाचे प्रश्न सुटत नाहीत. त्याकरिता अहोरात्र झटले पाहिजे. ब्राह्मण समाजाने आपल्या समाजावर अन्याय केला आहे. त्यांनी आपल्याला छळले आहे, हे सत्य आहे. पण त्यांची कामाची पद्धत इतकी चांगली आहे की, त्यांनी मिळविलेली सत्ता ते कायम टिकवून धरू शकतात. कोणत्याही प्रकारचा गाजावाजा न करता मूळ पायाला किवा धोरणाला घट्ट चिकटून काम करीत राहणारे ध्येयवादी कार्यकर्ते त्यांच्यात निपजतात. आपल्या कार्यकर्त्या मंडळींनी अजून निश्चयाने, निष्ठेने आणि निमूटपणे कार्य करावयास सुरवात केल्यास आपली चळवळ पसरल्याशिवाय राहाणार नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या भाषणाच्या वेळी देणग्यांचा वर्षाव सारखा सुरू होता. सभेत एकूण रुपये १८२ जमले. श्री. जी. एम. जाधव यांनी एका वर्षात ७०० पायली तांदूळ ' म्युनिसीपल कामगार संघाच्या ' सभासदांकडून मिळवून देण्याचे अभिवचन दिले.

श्री. के. व्ही. सवादकर मॅनेजर ' जनता ' यांनी जनता पत्र व भारतभूषण छापखाना या संस्थेस मदत करणाऱ्या सद्‌गृहस्थांचे अंतःकरणपूर्वक आभार मानीले. श्री. रामकृष्ण गंगाराम उर्फ बाबूराव भातणकर, एम. एल. ए., चेअरमन ' ठाणे वसतिगृह सहाय्यक मंडळ ' यांनी ठाणे बोर्डिंगला मदत करणाऱ्यांचे मनःपूर्वक आभार मानीले आणि बाबासाहेबांच्या भाषणाचा विचार करून प्रत्येकाने त्यांच्या आज्ञेनुसार वागण्याचा निश्चय करावा अशी जनसमुहास विनंती केली आणि सर्वांचे आभार मानल्यावर सभा बरखास्त झाली.

●●●

## १७८

# वृत्तपत्र हे चळवळीचे प्रभावी साधन

सोमवार, ऑगस्ट २६, १९४० रोजी रात्रौ पोयबावडी, परळ, मुंबई येथील समाज सेवा संघाच्या दामोधर हॉलमध्ये मुंबई म्युनिसीपालिटीत काम करणारे अस्पृश्य कामगार जमले होते. हॉल चिक्कार भरून गेला होता. ९ वाजता अस्पृश्यांचे कर्णधार डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभास्थानी हजर झाले व श्रोतृवृंदानी टाळ्यांच्या कडकडाटात त्यांचे प्रेमाने स्वागत केले.

सभेच्या आरंभी म्युनिसीपल कामगार संघाचे चिटणीस भाई प्रधान यांचे भाषण झाले. नंतर डॉ. बाबासाहेब यांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले, भगिनींनो आणि बंधुनो,

संघाच्या विद्यमाने जरी तुम्ही येथे जमला असलात तरी त्या संघासंबंधी आज मी तुम्हास काही सांगणार नाही. मी आज तुम्हाला अत्यंत महत्त्वाची अशी गोष्ट सांगणार आहे. ती ऐकून घेण्याकरता व यशस्वीपणे पार पाडण्याकरता मी तुम्हाला आज येथे बोलाविले आहे. आपल्या सर्व चळवळीचे सार आपल्या वर्तमानपत्रात आहे आणि ते वर्तमानपत्र गेली २०-२२ वर्षे कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात तुमच्यासमोर आहे. प्रथम मूकनायक, नंतर बहिष्कृत भारत व आजनी जनता ही त्यांची निरनिराळी स्वरूपे आहेत. जनतेस जन्म देणारा भारत भूषण छापखाना आहे. ह्या दोन्ही संस्था मांजरीच्या पिल्लांप्रमाणे मी सांभाळल्या आहेत. एका जागेवरून दुसऱ्या जागेवर पिल्लांचे संरक्षण करण्याकरिता मांजरीला नाचावे लागते. त्याचप्रमाणे जनता व छापखाना यांना मला अनेक संकटातून वाचवावे लागले आहे. पण अशी स्थिती नित्याची होऊन भागणार नाही.

जनता व छापखाना याजवर परत आज संकट ओढवले आहे. ती ज्या जागेत आहेत ती जागा सोडून जाण्याबद्दल मला नोटीस लागली आहे. म्हणून जनता व प्रेस ह्यांना आता दुसरीकडे निवाऱ्याच्या जागेवर नेणे प्राप्त आहे. ही निवाऱ्याची जागा यापुढे तरी तात्पुरत्या स्वरूपाची असता कामा नये. म्हणून आपली स्वतःची इमारत बांधणे हा अगदी तातडीचा प्रश्न झाला आहे. हा प्रश्न

---

जनता : ३१ ऑगस्ट १९४०.

तुम्ही एकट्याने सोडवावयाचा नाही, हे खरे. तुमच्याप्रमाणे इतरांवरही हा बोजा पडणार आहे आणि इतरांना या कार्यातील आपला योग्य हिस्सा उचलण्याची विनंती करण्यात येईलच. पण तुम्हाला प्रथम बोलाविण्याचे कारण तुम्ही इतर लोकांपेक्षा अधिक संघटित आहात. म्हणूनच तुम्हाला संदेश देणे अधिक सुलभ आहे. तुमच्या संघाचे पाच हजार सभासद आहेत. या सर्व सभासदांकडून प्रत्येकी दोन रुपयेप्रमाणे एकंदर दहा हजार रुपये तुम्ही जमविले पाहिजेत. पहिल्या महिन्यात प्रत्येकाने एक रुपया द्यावा व नंतर एक महिना सोडून दुसऱ्या महिन्यात प्रत्येकाने आपल्या हिश्श्याचा दुसरा रुपया द्यावा.

या कामाकरता एक कमिटी नेमण्यात येईल. त्या कमिटीच्या चिटणीसाचे काम श्री. शांताराम अनाजी उपशाम हे करतील. माझ्या सहीची पावतीपुस्तके काढण्यात येतील व त्यातील पावत्या घेऊन ज्याने त्याने आपला हिस्सा पुरा करावा. मला येथे एक स्पष्ट खुलासा केला पाहिजे, तो असा, तुम्ही हा जो पैसा देणार तो युनियनचे सभासद म्हणून नव्हे, तर तुम्ही एक अस्पृश्य जातीचे घटक म्हणून तो पैसा देणार आहात. हा पैसा मडकेबुवांच्या मार्फत वसूल केला जाईल, युनियनच्या मार्फत नव्हे. या फंडावर तुमच्या युनियनचा कोणत्याही प्रकारे अधिकार नाही. तेव्हा हे काम जातीचे आहे, असे जाणून तुम्ही या कार्यास ताबडतोब सुरवात करा, असे तुम्हाला माझे आग्रहाचे सांगणे आहे. आज मला अधिक काही बोलावयाचे नाही.



# १७९

# दूरदृष्टी आणि काटकसर हे वैभव भावी पिढीने टिकविले पाहिजे

कोकणस्थ महार को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी, खार, मुंबई तर्फे श्री. चांगदेव नारायण मोहिते, श्री. गणपत विठ्ठल कासारे आणि श्रीमती मुक्ताबाई दगडू सातम्बेकर या तिघांनी खार येथे नवीन टुमदार घरे बांधिली. त्याच आनंदोत्सवाप्रित्यर्थ त्यांनी रविवार ता. २२ सप्टेंबर १९४० रोजी ४ वाजता आपल्या घरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना थाटाची टी पार्टी दिली. प्रथम मोहिते मास्तर यांनी स्वगृही त्यांना पुष्पहार अर्पण केला. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे समवेत सर्व पाहुणे मंडळीचा ग्रुप फोटो घेण्यात आला. फोटोनंतर सर्वांना थाटाची गार्डनपार्टी देण्यात आली. नवीन तीन घरे व कॉलनीतर्फे डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार अर्पण करण्यात आल्यानंतर मोहिते मास्तर यांनी बाबासाहेबांचे आणि आलेल्या पाहुणे मंडळीचे समयोचित शब्दात आभार मानले. पाहुणे मंडळीतर्फे सुरबा टिपणीस यांनी यजमानाचे आभार मानिले. शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले, ते म्हणाले,

मला तुमची घरे पाहून फार आनंद होत आहे. तुम्ही हे धाडस केल्याबद्दल मला अभिमान वाटतो. त्याबद्दल मी तुमचे अभिनंदन करितो. हे तुमचे सुख पुत्रपौत्रापर्यंत कायम टिकेल असा प्रयत्न झाला पाहिजे. घराचे हप्ते व्यवस्थित देऊन संसार सुखाचा करा. तद्नंतर त्यांनी दापोली कँप येथील सेवानिवृत्त सुभेदारांचे वैभव आणि जीवनक्रम सांगितला. त्याचनंतर त्यांच्या मुलांबाळांची झालेली दुर्दशा वर्णन केली. बाप सुभेदार व मुलगा झाडुवाला हे अत्यंत मोठे दुर्दैव होय. तेव्हा तुम्ही सर्वांनी दूरदृष्टीने आणि काटकसरीने वागून तुमचे हे वैभव भावी पिढीने टिकविले पाहिजे. ज्यांना शक्य असेल त्यांनी अशा तऱ्हेची घरे जरूर बांधावी आणि आपला संसार सुखाचा करावा, तुमच्या शेजारी झोपड्यात जीवन कंठणाऱ्या आपल्या गरीब भाऊबंदांशी गुण्यागोविंदाने वागा. त्यांच्यासाठी चांगली घरे बांधून देण्याविषयी मी सरकार व बांद्रा म्युनिसीपालिटीकडे प्रयत्न चालविला आहे.

शेवटी यजमानांचे कार्याबद्दल समाधान व्यक्त करून त्यांनी आपले भाषण संपविले. सदरहू प्रसंगी प्रो. व्ही. जी. राव, बॅ. एस. एन. माने, मेसर्स कमलाकांत चित्रे, भाई चित्रे, सुरेन्द्रनाथ टिपणीस, इझिकेल, आर. जी. भातणकर, के. व्ही. सवादकर, टी. टी. शिर्के, एन. बी. आसगोलकर, एस. एल. वडवलकर, संभाजी गायकवाड, बी. बी. उनबरकर वगैरे प्रमुख मंडळी हजर होती.

● ● ●

---

जनता : २८ सप्टेंबर १९४०.

## १८०

# अस्पृश्यांच्याच पैशावर चळवळीसाठी भव्य इमारत उभारा

गुरुवार ता. १० ऑक्टोबर १९४० रोजी महाड तालुका महार हितसंरक्षक संघातील मंडळीकडून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना चहा पार्टी देण्याचा कार्यक्रम परळ येथील आर. एम. भट हायस्कूलमध्ये आनंदाने पार पडला.

प्रथम संघाच्या सभासद व कार्यकारी मंडळीसह आमदार भाई चित्रे, श्री. कमलाकांत चित्रे, दादासाहेब संभाजी गायकवाड, लोखंडे, सवादकर, इत्यादी कार्यकर्त्यांसमवेत डॉ. बाबासाहेबांबरोबर ग्रुप फोटो काढण्यात आला. नंतर चहा पार्टीचा कार्यक्रम उरकण्यात आला. संघाचे अध्यक्ष श्री. आर. व्ही. मोरे यांनी कबूल केल्याप्रमाणे 'जनते' ला ४० रुपये रोख दिले व १० रुपये मागाहून देण्याचे जाहीर अभिवचन दिले. डॉ. बाबासाहेबांनी काही बोलावे अशी सर्व जनसमूहामार्फत आग्रहाची विनंती करण्यात आली.

डॉ. बाबासाहेब टाळ्यांच्या गजरात बोलावयास उठले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

ज्या महाड तालुक्याने अस्पृश्यांच्या चळवळीची मुहूर्तमेढ रोवण्याबाबत पुढाकार घेतला त्याच तालुक्यातील मंडळींनी मला ५० रुपये देऊन सभेला बोलविण्याची प्रथा अस्पृश्य समाजात घालून दिली याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. मुंबई येथे अस्पृश्य समाजासाठी एक भव्य इमारत बांधली जाणार आहे आणि ती निव्वळ अस्पृश्यांच्याच पैशावर बांधली जाणार आहे. त्या इमारतीकरिता द्रव्याची आत्यंतिक आवश्यकता आहे. ही मोठी जबाबदारी पार पाडण्याकरिता आपण आपल्या पूर्वीच्या कर्तबगारीला शोभेल अशा रीतीने याही बाबतीत पुढाकार घ्याल अशी मला खात्री वाटते. मला महाड तालुक्यातील मंडळीबद्दल अभिमान वाटतो. अशा प्रकारचे अमोल उद्‌गार काढून झालेल्या कार्याबद्दल समाधान व्यक्त करुन त्यांनी आपले भाषण संपविले.

नंतर संघाचे उपाध्यक्ष श्री. विठ्ठल साळवे यांनी प्रमुख मंडळीस हार घातले. शेवटी एस. एस. निकम यांनी सर्वांचे आभार मानले व सभा बरखास्त झाली.



---

जनता : २६ ऑक्टोबर १९४०.

## १८१

# .... तर खेड्यापाड्यातील अन्यायग्रस्त लोकांना मदत करता येईल

दिनांक १ नोव्हेंबर १९४० रोजी इमारत व तिच्याकरिता जमवावयाचा फंड या विषयीची योजना यासंबंधी जंगी सभा चित्रा सिनेमाच्या पाठीमागे घेतलेल्या जागेवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आली होती. सभेत श्री. डी. व्ही. प्रधान, भा. र. कद्रेकर, के. व्ही. चित्रे वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. डॉ. साहेबांचे स्वागत जमलेल्या समुदायाने टाळयांच्या कडकडाटात केले.

सभेस सुरवात श्री. बी. एस. गायकवाड यांनी केली. त्यांनी अध्यक्षांची सूचना आणताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या ज्येष्ठ भावजई श्रीमती लक्ष्मीबाई ह्या बुधवार, तारीख २३-१०-४० रोजी पहाटे २-३० वाजता स्वर्गवासी झाल्याचे वर्तमान उपस्थित असलेल्या लोकांना सांगितले आणि अशा तऱ्हेचे वैयक्तिक संकट आले असताही डॉ. बाबासाहेबांनी स्वतःचे व आपले दुःख बाजूला ठेवून सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याचे कबूल केल्याबद्दल त्यांचे आभार मानिले. तसेच चिटणीस इमारत फंड यांच्या विनंतीस मान देऊन मोठ्या जमावाने उपस्थित झाल्याबद्दल चिटणीसाचे वतीने जनतेचेही आभार मानले. नंतर डॉ. बाबासाहेबांना अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. श्री. एस. एल. वडवलकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रचंड टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उभे राहिले, ते म्हणाले,

आजची सभा घेण्याची वास्तविक जरूरी नव्हती. कारण इमारत व तिच्यासाठी फंड उभा करणे या विषयीची घोषणा मी दोन वर्षांपूर्वी केलेली होती. तेव्हापासून एखादी सोईची जागा आम्ही मिळविण्याच्या प्रयत्नात होतो. मुंबई शहरात बहुधा दोन प्रकारच्या जागा आहेत. एक मुंबई म्युनिसीपालिटीच्या जागा व दोन इम्प्रुव्हमेंट ट्रस्टच्या जागा. इम्प्रुव्हमेंट ट्रस्टची जागा विकत घेणाराने त्या जागेच्या फक्त एक तृतीयांश जागेवर इमारत बांधावयाची व बाकीची दोन तृतीयांश जागा तिच्या भोवती रिकामी सोडावयाची, असा नियम आहे. तसेच म्युनिसीपालिटीची जागा विकत घेणारास १० फूट जागा चोहोकडे मोकळी सोडावी लागते. या जबरदस्त अटी आम्हास मान्य

---

जनता : १६ नोव्हेंबर १९४०.

होण्यासारख्या नव्हत्या. म्हणून आम्ही दुसरी एखादी सोईची जागा शोधू लागलो. शेवटी ज्या जागेवर आपण आता बसला आहात ती जागा आम्ही पसंत केली. ही विस्तीर्ण जागा तोडून द्यावयास जागेचा मालक तयार नव्हता. पण काही मित्रांच्या मदतीने ही जागा आम्ही तोडून घेतली.

२० वर्षेपर्यंत आपला सामाजिक कारभार चालला असताना सभा, समारंभ वगैरे निरनिराळया कार्यांकरिता जागेसाठी आपणास इतरांकडे जाणे भाग होते. ही उणीव या जागेवरील इमारतीने खास भरून निघेल. ही जागा आपणा सर्वास फारच सोईची आहे. ह्या जागेचे क्षेत्रफळ १,१०० चौरस वार आहे. बाजूला ट्रॅम आहे. जी. आय. पी; बी. बी. अँन्ड सी. आय. ची स्टेशने जवळ आहेत. किंमतीच्या दृष्टीने पाहता ही जागा आपणास सवलतीने मिळाली, असे म्हणावयास काहीच हरकत नाही. काही ठिकाणी जागेची किंमत २२ रुपये वार तर दुसरीकडे तिची किंमत २५, २७, ३० रुपये वार अशी आहे. ही जागा आपणास १५ रुपये वार पडली आहे. (टाळया).

आनंदाची गोष्ट ही की जागेच्या मालकाची आजच्या आज जागेची सर्व रक्कम द्या व मग तिचा ताबा घ्या, अशी अट नाही. तसे झाले असते तर इतकी मोठी १५-१६ हजार रुपयांची रक्कम देणे आपणास कठीण झाले असते. आपणास बारा वर्षात ही रक्कम हप्त्याहप्त्याने द्यावयाची आहे.

ही जागा आम्ही ९९९ वर्षांच्या कराराने घेतली आहे. व्यावहारिक दृष्टीने हा करार म्हणजे यावच्चंद्रदिवाकरौ मालकी असावयाचा करार आहे, असे म्हणण्यास हरकत नाही.

या जागेवर तीन मजली इमारत बांधण्याचा आमचा इरादा आहे. पहिल्या मजल्यावर अर्ध्या भागात ' भारत भूषण छापखाना ' व अर्ध्या भागात म्युनिसीपल युनियनची व इतर ऑफिसे व काही राहण्याच्या खोल्या ठेवण्याची व्यवस्था करावयाची आहे. दुसरा मजला भाडोत्री लोकांकरिता तयार करावयाचा आहे. त्यात सुमारे सोळा खोल्या तयार होतील, असा अंदाज आहे व त्याचे जवळ जवळ वर्षाचे ३,५०० रुपये भाडे येण्याचा संभव आहे.

तिसऱ्या मजल्यावर ५० फूट रुंद व १०० फूट लांब असा हॉल बांधावयाचा आहे.

हॉलचे भाडे नियमित यायचे नाही. तरीपण वर्षाचे ४००-५०० रुपये भाडे येईल, असा अंदाज आहे.

या प्रमाणे वार्षिक ४,००० रुपये उत्पन्न होईल, असे वाटते. त्यातून म्युनिसीपल पट्टी, व्याज वगैरे वजा जाता २,५०० रुपये शिल्लक राहातील, असा अंदाज आहे. यावरून या जागेवर इमला उठविला तर आपले नुकसान न होता फायदा आहे, असे दिसून येईल.

प्रिय बंधूंनो, अशा तऱ्हेने दरसाल २,५०० रुपये पुंजी झाली तर खेड्यापाड्यातील लोकांवर इतर स्पृश्य लोकांकडून जो अन्याय करण्यात येतो, त्यास मदत करता येईल. अशा रीतीने खेड्यापाड्यातील लोकांचे संरक्षण होऊन प्रसंग आला असता इकडे तिकडे झोळी पसरण्याचा प्रसंग टळेल.

हे तीन मजले बांधावयाचे झाले तर जागेची किंमत व इमारतीचा खर्च याकरिता एक लक्ष रुपये लागतील. लढाईमुळे सीमेन्ट, लोखंडी वस्तू महाग झाल्या आहेत. दुसरी गोष्ट या फंडाकरिता इतर जातीतून मदत मिळणे कठीण आहे. धार्मिक लोक आपआपल्या जातीलाच दानधर्म करतात. आपल्या लोकात श्रीमंत लोक नाहीत, आपण काँग्रेसमध्ये नाही.

हा फंड आपल्या लोकांमधूनच आपण उत्पन्न केला पाहिजे. धनिकांप्रमाणे आपल्या लोकांकडून एकदम २००, ५०० किंवा १,००० रुपये देणगी मिळणे कठीण आहे. आपल्यातील प्रत्येक माणसाने दोन दोन रुपये देणगी देऊनच ही रक्कम जमली पाहिजे. ठिकठिकाणी इमारत फंड कमिट्या तयार करा आणि आपले काम करा. पैसे घेण्यासाठी मीच आपणाकडे यावे, अशी आपली इच्छा असेल तर मी येईन पण तुम्हास माहीत आहे की आपल्या समाजाची जबाबदारी सर्वपरीने माझ्या शिरावर आहे. तेव्हा प्रत्येक ठिकाणी मला बोलविण्याचा हट्ट धरू नका. असे असूनही आपले प्रेम खरोखरच इतके वेडे असेल तर मी येईन सुद्धा. पण इमारत फंडाच्या कामाच्या बाबतीत कोणीही कुचराई करता कामा नये, इतके बोलून मी माझे भाषण संपवितो.



# १८२

# सार्वजनिक कार्यासाठी एकजूट हवी

बी. डी. डी. चाळ नं ९६, वरळी, मुंबई येथील श्री. शंकर नाथा खैरमोडे यांच्या नवीन व्यायाम शाळेचा व डॉ. आंबेडकर स्पोर्टिंग क्लब यांचा सार्वजनिक उत्सव शनिवार ता. २३ नोव्हेंबर १९४० रोजी रात्रौ ९ वाजता मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला. उत्सवाचे अध्यक्षस्थान डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्वीकारावयाचे कबूल केले होते. सभास्थानी डॉ. बाबासाहेब आंबेडकर येताच ' आंबेडकर झिंदाबाद, ' ' आंबेडकरांचा जयजयकार, ' ' थोडे दिनमे भीमराज ' अशा गर्जनांनी वातावरण दुमदुमून गेले होते. बाबासाहेब मंडपात येताच टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटाने त्यांचे स्वागत करण्यात आले. बाबासाहेबांच्या बरोबर श्री. डी. व्ही. प्रधान, श्री. एम. ए. उपशाम, श्री. पी. एल. लोखंडे, श्री. व्ही. एल. केळशीकर, श्री. बी. एस. गायकवाड ही कार्यकर्ती मंडळी हजर होती.

सभामंडप उत्तमप्रकारे सजविण्यात आला होता. सभेस दहा हजार लोकसमुदाय होता. अध्यक्षाची सूचना श्री. झाल्टे यांनी मांडली. सूचनेस श्री. आर. बी. पगारे यांनी अनुमोदन दिल्यावर श्री. आर. एस. भालेराव यांचे भाषण झाले. नंतर डॉ. बाबासाहेब यांचे भाषण झाले. ते म्हणाले,

प्रिय भगिनींनो व बंधुंनो,

आज सभेचा वेळ निश्चित कोणता हे पुष्कळ लोकांना ठाऊक नसल्यामुळे त्यांना भुके ठेवून लांबलचक भाषण करण्याचा माझा इरादा नाही. ज्या कारणासाठी मी आलो आहे त्याबद्दल थोडक्यात माहिती सांगणार आहे.

मी इमारत फंडाचा प्रश्न हाती घेण्याला कोणते कारण घडून आले असेल तर, आपल्या समाजाच्या भविष्यकाळाचे दृश्य डोळयांसमोर उभे राहाणे हेच होय. माझ्या आयुष्यात जेवढे करणे शक्य होते, तेवढे मी केले आहे. १९१९ साली सार्वजनिक चळवळ सुरू झाली तेव्हा अस्पृश्य समाजात मुळीच जागृती नव्हती. आपण माणसे आहोत याची जाणीवही नव्हती. ब्राह्मण, मराठे, पाटील वगैरे स्पृश्य लोक जोड्यांप्रमाणे आपणास वागवीत होते. सर्प म्हटला की सर्व लोक भितात त्याप्रमाणे पाटील, तलाठी, कुलकर्णी यांना अस्पृश्य समाज

---

जनता : ३० नोव्हेंबर १९४०.

घाबरत होता. सुरवातीच्या काळात आपल्या लोकांना म्युनिसीपालिटी, लोकल बोर्ड, कौन्सिल यामध्ये प्रवेश मिळणे कठीण होते. त्याचठिकाणी आपले लोक स्वाभिमानाने मांडीला मांडी लावून आपल्या हिताकरिता आज झगडत आहेत. (टाळ्या) आपल्यापैकी गृहमंत्री किंवा शिक्षणमंत्री झाला असता पण तसा योग आला नाही. जेथे पट्टेवाल्याची जागा देखील मिळणे महाग होती तेथे आपल्यापैकी डेप्युटी कलेक्टर होत आहेत. ज्याने शून्य पाहिले त्यानेच जर शंभर पाहिले, त्याला अभिमान व आनंद वाटणे स्वाभाविक आहे.

आपण आपल्या चळवळीचा पल्ला बराच गाठला आहे, तरीपण आपणास बरेच कार्य अजूनही करावयाचे आहे. ह्या कार्याच्या मार्गात गांधी व काँग्रेस हे दोन अस्पृश्यांना मोठे शत्रू आहेत. नुकत्याच झालेल्या मुलाखतीच्या वेळी व्हाईसरायने गांधींना विचारले ‘ तुम्हाला स्वराज्य पाहिजे पण तुम्ही राजेरजवाडे, मुसलमान व अस्पृश्य यांची विल्हेवाट काय लावणार ’ ? पण गांधी आपल्या पत्रकात म्हणतात ‘ राजेरजवाडे व मुसलमान यांच्याशी आम्ही तडजोड करू पण अस्पृश्यांबद्दल विचारणारे तुम्ही कोण ? अस्पृश्यांचे आम्ही वाटेल ते करू. ’ राजेरजवाडे व मुसलमान यांच्याशी गांधी तडजोड करण्यास तयार असतात, पण अस्पृश्य समाजाचा प्रश्न सरकारने विचारल्याबरोबर गांधींच्या अंगाचा तिळपापड होतो. अस्पृश्य समाजाच्या प्रगतीच्या मार्गात हा एक खडक आहे. हा खडक माझ्या हयातीत नाहीसा करता आला, तर तुमचे भावी आयुष्य सुखकर झाल्याविना राहणार नाही. (प्रचंड टाळ्यांचा कडकडाट)

मला एक मोठी चिंता वाटत असते ती ही की, आजपर्यंत आपण केलेली एकजूट व प्रगती तुम्ही पुढे कशी टिकवाल ? एक खांबी तंबूत आज तुम्ही सुखासमाधानाने बसता. पण त्या तंबूचा खांब कोसळला तर मग तुमची काय स्थिती होईल ? याकरिता त्या तंबूला आजूबाजूला खांब व दोर बांधून मजबूत करण्याचा मी विचार केला आहे, म्हणूनच इमारत फंड उभारला आहे. हेतू हा की, माझ्या पश्चात तुमचा कोणीही पराभव करू नये. त्याचप्रमाणे तुम्हास सार्वजनिक कार्य चांगल्या रीतीने करता यावे. आज देखील आपणापुढे हजारो अडचणी आहेत पण त्या पैशाच्या अभावी तशाच राहून गेल्या आहेत. इमारत फंडाच्या उत्पन्नातून जो निधी जमेल तो आपली गाऱ्हाणी दूर करण्याच्या उपयोगी पडेल.

मी आपल्या समाजात जास्त शिकलेला आहे, म्हणून सरकारजवळ अधिकाऱ्याची जागा मला मागता आली असती. मी अधिकारीही झालो असतो. पण मग माझ्या अज्ञ बांधवांचे काय झाले असते ? मी अस्पृश्य समाजाकरिता माझ्या

स्वार्थाकडे व संसाराकडे नजर न ठेवता हे कार्य करीत आहे. ज्याला जितके कार्य करता येईल तितके त्याने करावे. तसेच इमारत फंडास जितकी मदत करता येईल, तितकी आपण अवश्य द्यावी. मनुष्यमात्राला तीन ऋणे असतात. एक आईबापाचे, दोन कुलदेवतेचे व तीन समाजाचे. ज्या समाजात आपला जन्म झाला आहे, त्या समाजाचे उपकार आपण न विसरता फेडले पाहिजेत. उपकार फेडण्याची संधी तुम्हाजवळ चालून आली आहे. तिचा फायदा जरूर घ्या व इमारत फंडाला प्रत्येक स्त्री-पुरुषानी, १८ वर्षावरील बेकार असला तरी, दोन दोन रुपये द्या.

तुम्ही जिल्हावार, तालुकावार व देशवार संघ स्थापन करून काम करीत असता, हे मला मुळीच आवडत नाही. मी कोणताही भेदाभेद मानीत नाही. आपल्यात भेदाभेद उत्पन्न झाल्यास हिंदू समाज त्याचा फायदा घेऊन आपल्या चळवळीचा नाश करील. मला पुढारीपणाची मुळीच हाव नाही. पण आपणाला पुढारी कशाला पाहिजे ? याचा आपण विचार करा. आपणाला पुढारी पाहिजे असेल, तर तो शत्रुस तोंड देण्याकरिता आपल्या कल्याणाकरिता झटणारा, आपल्या हिताच्या आड येणाऱ्या गांधी, नेहरू, वल्लभभाई पटेल यांच्याशी दोन हात खेळणारा, असाच पुढारी आपणास हवा. तर मीही अशा माणसास पुढारी म्हणावयास तयार आहे. (टाळ्या) वाटेल त्या दगडाला शेंदूर फासून मारुती होता येत नाही. (हंशा) चाळीच्या पटांगणात तलवारीचे हात करणारा पण रणांगणात गुलूगुलू करून पळत सुटणारा योद्धा काय कामाचा ?

पांडवांनी जन्मभर श्रीकृष्णाची सेवा केली. शेवटी स्वर्गाला नेण्याविषयी श्रीकृष्णाला विनवू लागले. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला ' मीच ओढ्या जगन्नाथला वाहात चाललो आहे .' अशाच प्रकारची स्थिती आपल्या चळवळीतून बाहेर आहेत त्यांची झाली नाही म्हणजे त्यांनी पुष्कळ मिळविले. आपल्या कार्यात कार्यकर्त्या मंडळीची उणीव आहे. ही उणीव शिक्षक वर्गाने भरून काढावी. इमारतीकरिता घेतलेली जागा अपुरी आहे असे आपले लोक म्हणत आहेत. अधिक जागा घ्या, आम्ही पैसे मिळवून देतो असे त्यांचे म्हणणे आहे. जास्त जागा घेण्याचा माझा विचार आहे, अर्थात आपल्याला ह्या कार्याकरिता एकंदर दोन-अडीच लाख रुपये खर्च येईल. त्याकरिता मी काही योजना तयार केल्या आहेत. ज्यांचा मासिक पगार ३० रु. किंवा अधिक असेल त्यांनी आपला एक महिन्याचा पगार दिल्यास त्यांचे नाव इमारतीत बोर्डावर लिहिण्यात येईल.

मी खेडोपाडीही मागणी करणार आहे. पण खेडेगावात प्रत्येक माणसावर मागणी न करता, गावाची वर्गणी म्हणून त्या गावाचे नाव लिहिण्यात येईल. तेव्हा मित्रहो, आपला भावी काळ उज्ज्वल ठेवावयाचा असेल, तुमच्या समाजाचे कल्याण करावयाचे असेल, तर तुम्ही आपले कर्तव्य म्हणून हे कार्य पार पाडा. डॉक्टर बाबासाहेबांचे भाषण संपल्यावर डॉक्टर आंबेडकरांच्या जयजयकाराने वातावरण परत दुमदुमून गेले.

शेवटी बाबासाहेबांना पुष्पहार घालण्यात आला व सर्वांचे आभार मानल्यावर सभेचे काम संपविण्यात आले. तेथील व्यायाम शाळेला बाबासाहेबांनी भेट दिली. सभेची व्यवस्था आनंदा लालू मायणीकर. शं. ना. खैरमोडे, ठोकळे मास्तर, माने मास्तर, कांबळे वगैरे मंडळींनी फारच चांगली ठेविली होती. याच सभेत परगावचे श्री. सुकड्या सखाराम जाधव यांनी बाबासाहेबांचे दर्शन घेऊन एक रुपया इमारत फंडास दिला.



१८३

# आता पालवी फुटली आहे उद्या फळे येण्याचा रंग दिसत आहे

श्री. सोमवंशीय समस्त मंडळ, चिंखलपाडा, फोरास रोड, मुंबई यांचेतर्फे इमारत फंडास निधी अर्पण समारंभ रविवार ता २४ नोव्हेंबर १९४० रोजी सायंकाळी ६ वाजता दलितांचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला. सदर प्रसंगी बॅरिस्टर माने, मोहिते मास्तर, श्री. मडकेबुवा, उपशाम मास्तर सेक्रेटरी, इमारत फंड, श्री. धयाळकर जी. ओ. सी. समता सैनिक दल, मुंबई श्री. मिंढे पाटील वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. लोकसमुदाय ४-५ हजारावर होता. डॉ. बाबासाहेबांचे स्वागत जमलेल्या लोकांनी टाळयांच्या कडकडाटात आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय, आंबेडकर कौन है, दलितोंका राजा है ' वगैरे सुभाषितांनी केले.

सभेस श्री. एन. एम. साळवे यांनी सुरुवात केली. त्यांनी डॉ. बाबासाहेब आमच्या आमंत्रणास मान देऊन आपला बहुमोल वेळ खर्च करून या ठिकाणी आले याबद्दल त्यांचे आभार मानिले. तसेच ते सभेचे नियोजित अध्यक्ष असल्यामुळे त्यांना अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. श्री. बी. एस. गायकवाड यांनी अनुमोदन दिल्यानंतर डॉ. बाबासाहेब अध्यक्षस्थानी विराजमान झाले.

इमारत फंडाचे सेक्रेटरी श्री. एस. ए. उपशाम मास्तर यांनी अत्यंत उद्‌बोधक असे भाषण केले.

तद्‌नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळयांच्या प्रचंड कडकडाटात बोलावयास उभे राहिले, ते म्हणाले,

प्रिय भगिनींनो आणि बंधुजनहो,

आजच्या सभेत इमारत फंडाकरिता जमा केलेली रक्कम स्वीकारून येथील मंडळींना आशीर्वाद देणे या पलीकडे काही बोलावे असे मला वाटत नाही. मला जे काही बोलावयाचे होते ते मी कालच वरळीच्या सभेत सांगून टाकले आहे. शिवाय माझ्या अगोदरच्या वक्त्यांनी जे काही बोलावयाचे होते ते सांगितले आहे. तेव्हा माझ्यापासून लांबलचक भाषणाची आपण अपेक्षा करू नये. या कार्यास नुकतीच सुरवात झालेली आहे व त्याचा ठसा जितका चांगला उमटवता येईल तितका उमटवणे प्राप्त आहे. अर्थात रात्रीच्या भाषणाचा गोषवारा मी

जनता : ३० नोव्हेंबर १९४०.

सांगणार आहे. तसेच ज्यांना इमारत फंडाची कल्पना झालेली नसेल त्यांना ती करून देणे आवश्यक आहे. येथे जमलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषाने विचार करावा की गेल्या वीस वर्षात आपली बरीच प्रगती झालेली आहे. तसेच ही प्रगती कायम कशी राहील याचाही विचार करावा. गेल्या वीस वर्षात समाजाच्या प्रगतीची जबाबदारी माझ्या शिरावर होती, मी ती माझे कर्तव्य म्हणून समजतो. पुष्कळ लोकांना माझे कार्य नापसंत वाटत असेल आणि म्हणून ते माझ्यावर टीकाही करतात. सामाजिक, राजकीय कार्यकर्त्यावर टीका ही व्हावयाचीच. मी देखील दर आठवड्यास जनतेतून गांधींवर टीका करतो. अर्थात माझ्यावर काही माणसांना टीका करण्याचा अधिकार आहेच. मात्र टीका करताना स्वतःचे मन शुद्ध असावे, त्यात कसल्याही तऱ्हेचा कल्प अगर अढी ठेवून टीका करू नये. मला सार्वजनिक कार्यात उपलब्ध असलेल्या साधनांचा आणि गांधींना उपलब्ध असलेल्या साधनांचा तारतम्य दृष्टीने विचार करावा. आपली सर्वांची वीस वर्षापूर्वीची स्थिती काय होती ? आता कशी आहे ? या सर्वांचा विचार केला तर माझ्या नावावर केव्हाही शून्य पडणार नाही.

माझ्याबरोबरीने कार्य करीत असलेले इतर पक्ष देखील हिंदुस्थानात आहेत. ब्राह्मणेतर पक्ष सन १८५० पासून कार्य करीत आहे. मराठ्यांचे राजे देखील दोन दोन पैशानी त्यांना मदत करीत आहेत. त्यांच्या ' विजय मराठा ' या वर्तमानपत्रास त्यांनी तीस हजारावर मदत केलेली आहे. तर मला अवघे अडीच हजार रुपये मदत केलेली आहे. यातच वीस वर्षेपर्यंत हा कारभार मी चालविला आहे. पण ब्राह्मणेतर पक्षाचे काय झाले ? आज व्हाइसरॉय मुंबईस आले तर शेकडो लोकांच्या भेटी घेतात. पण आमच्या भास्करराव जाधवांचा मागमूसही नाही, असो.

वीस वर्षापूर्वी मी हे सार्वजनिक कार्याचे झाड लावले आहे. त्याला आता पालवी फुटली आहे. उद्या फळे येण्याचा रंग दिसत आहे. झाली ही प्रगती अखंड कशी राहील याची व्यवस्था करणे प्राप्त आहे. आतापर्यंतचे कार्य झाले ते शुष्क, निर्फळ झाले असे कोणीही म्हणणार नाही आणि जो म्हणेल तो माझा शत्रु असला पाहिजे. मी म्हणतो ते सत्य आहे. हे कार्य पायाशुद्ध आहे. कोणापुढेही दात विचकण्याचा प्रसंग न येईल अशी व्यवस्था करणे आवश्यक आहे.

पुष्कळ लोक कॉंग्रेसमध्ये जातात. कॉंग्रेसचे लोक त्यांच्या हातावर पावली ठेवतील तर माझ्या हातावर बंदा रुपया ठेवतील अशी माझी खात्री आहे. (टाळ्या)

मुंबईतील कॉंग्रेसचे एक मोठे पुढारी श्रीयुत भुलाभाई देसाई मला म्हणतात, 'तुम्ही सेवाग्रामला चला व गांधींशी बोला !' पण माझ्याच्याने हे शक्य होणार नाही.

मी लहानपणी पुराण वाचले आहे. त्यात दुसऱ्याचे अन्न खाणारा कधीही स्वतंत्र असू शकत नाही. भीष्म, द्रोण वगैरे लोकांना कौरवांची बाजू खोटी आहे हे माहीत होते. गादीवर पांडवांचाच हक्क होता. लढाईत पांडवांनाच विजय मिळणार हेही त्यांना माहीत होते, तरी देखील ते कौरवांच्या बाजूने लढले. एकाने विचारले हे तुम्ही असे का केले ? भीष्माने सांगितले ' आम्ही त्यांचे अन्न (भात) खातो म्हणून.'

आमचे स्वातंत्र्य हिंदू लोकांची पायपिटी करून मिळणार नाही. त्यांच्याशी लांगूलचालन करून भागणार नाही. आमच्या वाडवडिलांनी ते सर्व काही करून पाहिले, त्यांनी त्यांच्यासमोर, हिंदूंसमोर, छत्री घेतली नाही, पायात जोडे घातले नाहीत वगैरे अनेक गोष्टी करून पाहिल्या, पण काय उपयोग झाला ? त्यांच्याशी सग्रामात दोन हात करून झगडाच करावयास पाहिजे, त्याशिवाय दुसरा मार्ग नाही. (टाळया)

मला त्यांचा भात (अन्न) खायचा नाही. मला स्वतःला समाजाचा उद्धार करावयाचा आहे. एखादा गरीब मनुष्य आपल्या गोधडीस ठिगळ वगैरे लावून शरीर कसेतरी झाकतो. त्याप्रमाणे मी आजपावेतो सामाजिक कार्य चालविले आहे. भिक्षा मागून स्वातंत्र्य मिळणार नाही, हे सांगितलेलेच ठीक या वीस वर्षात माझ्या हातून एकही चूक झाली नाही अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. कोणाही माणसाने माझ्याकडून अमुक एक चूक झाल्याने सामाजिक नुकसान झाले आहे असे सिद्ध करून द्यावे. आतापर्यंतचे कार्य निराशजनक नाही. जे करावयाचे आहे ते आत्मबलानेच करावयाचे आहे. आपल्याला पैशाची आवश्यकता आहे. राजकारण पैशावाचून चालणार नाही. माणसाच्या संसारास पैशाची जरूरी असते. त्याचप्रमाणे सामाजिक संसारात पैशाची त्याहीपेक्षा अधिक जरूरी असते. आपल्याजवळ पैसा नाही. कॉंग्रेसमागे पैशाच्या थैल्या आहेत. त्यांना या कार्यास एक रुपया खर्च झाला तर आपणास निदान पावली तरी खर्च लागणारच. महाड आणि नाशिकचे सत्याग्रह आम्ही भिक्षा मागूनच पार पाडले आहेत, पण हे कोठवर चालणार ? घागरीस छिद्र असल्याने तीतून पाणी गळून जाणार हे खास. तेव्हा काही तरी कायमची व्यवस्था असावी, असे माझे मत आहे. इमारतीसाठी अंदाजे दोन अडीच लाख रुपये खर्च येईल. त्याच इमारतीपासून दरवर्षाला पाच हजार रुपये भाडे मिळाले तर आपली स्थिती सुधारेल. आपण सर्व लोक तन-मन-धनाने या कार्यासाठी झटले पाहिजे. कोणी म्हणतील डॉ. साहेब बेकारांपासूनही पैसे मागतात, पण मला असे विचारावेसे वाटते की, मनुष्य आयुष्यभर बेकार असू

शकतो काय ? महिना दोन महिने बेकार असू शकेल, पण जन्मभर बेकार असू शकणार नाही. बेकार असताना जीवनास अवश्य असणाऱ्या गोष्टी त्याला मिळतात. इतकेच नव्हे तर तो आपली तल्लफ देखील भागवितो. कोणाही माणसास आपली दोन रुपये वर्गणी भरण्यास काहीहीं हरकत नाही.

दुसरे असे की, आपल्यात श्रीमंत लोक नाहीत. ज्यांना पन्नास रुपये पगार मिळतो अशांना श्रीमंत म्हणता येईल. दोन चार आणे मजुरी मिळणाऱ्या मजुरापेक्षा त्यांची स्थिती काहीशी बरी असे म्हणता येईल. तेव्हा अशा लोकांनी शिंगे मोडून वासरात शिरू नये. ज्याची जशी इभ्रत असते तितकीच त्याची जबाबदारी असते. माझ्यावर लोक टीका करतात. कारण मला विद्या आहे व सामाजिक कार्याची सर्व जबाबदारी माझ्या शिरावर आहे. दोन रुपये देऊन स्वतःची किंमत करून घेऊ नये.

तिसरे असे की, ज्यांचा पगार तीस रुपये किंवा त्याहून जास्त आहे, अशांनी स्वतःचा पगार द्यावा, बहुतेक लोक आपले नाव इमारतीवर यावे अशी अपेक्षा करितात. आपले नाव इमारतीवर यावे अशी इच्छा असेल, तर एक महिन्याचा पगार देणगी दाखल देणे प्राप्त आहे. यापेक्षा जास्त सवलत ती कोणती पाहिजे ?

एखाद्या माणसास अंगात हुशारी असल्यामुळे काम मिळू शकते, पण बहुतेक शिक्षक, शिक्षकिणी व कारकून वगैरे लोक समाजाच्या दुर्दैवाचा फायदा घेतात. अशा लोकांनीच समाजाचा फायदा करण्यास पुढे आले पाहीजे. सर्वांनी आपल्या वाट्याची वर्गणी भरली पाहिजे. मला त्याचे काय ? माझे नाव हिंदुस्थानच्या त्रिकोणात आहे. मी आज आहे उद्या नाही. माझ्या कार्याचा इतिहास जर कोणी लिहिला तर तो बराच मोठा होईल असे मला वाटते. पण माझ्या पश्चात तुमचे काय ? मी आहे तो पुष्कळसे होईल. आज पावेतो पुष्कळ मजल मारली आहे. अजून दिल्ली बहोत दूर—' अजून पुष्कळ मजल मारावयाची आहे. हा एक खांबी तंबू मी उभारला आहे. त्यास चोहोकडून खुंट्या मारून मजबूत करणे आवश्यक आहे. तसे न केले तर उंचावर गेलेला पतंग कनी कापल्यानंतर जसा खाली येतो तशी तुमची स्थिती होता कामा नये. माझ्यानंतरही तुमचा मार्ग फार दूर आहे. तो सुखकर व्हावा म्हणून मी हे कार्य करीत आहे, तरी बंधु-भगिनींनो या कार्यास नेटाने सुरवात करा, अशी सूचना करून मी माझे भाषण संपवितो.

शेवटी श्री. मडकेबुवा यांनी डॉ. बाबासाहेबांना हार अर्पण केल्यानंतर श्री. साळवे मास्तर यांनी सर्वांचे आभार मानून फुलहार दिले. सभा बाबासाहेबांच्या जयघोषात बरखास्त झाली.

● ● ●

१८४

# . . . . असा भेदभाव कराल तर अधोगतीला जाल

इमारत फंडाची जंगी जाहीर सभा चंदनवाडी, मुंबई येथे अस्पृश्यांचे कैवारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली शनिवार, तारीख ७ डिसेंबर १९४० रोजी रात्रौ साडे आठ वाजता भरली होती. सभास्थानी तीन-चार हजारांवर जनसमुदाय जमला होता. या उपस्थित झालेल्या जनसमुहाने डॉ. बाबासाहेबांचे स्वागत टाळयांच्या प्रचंड कडकडाटात आणि ' आंबेडकर कौन है दलितोंका राजा है, 'आंबेडकर, झिंदाबाद, थोडे दिनमें भीमराज,' वगैरे सुभाषितांनी केले. सदर प्रसंगी श्री. मोहिते मास्तर, वि. का. उपशाम मास्तर, वडवलकर, मिंढे पाटील, लोखंडे, गायकवाड, आमदार भाई चित्रे आणि वराळेसाहेब वगैरे मंडळी हजर होती. सभेची व्यवस्था उत्तमप्रकारे ठेवलेली होती.

सभेस सुरवात श्री. उ. तु. जाधव मास्तर यांनी केली, त्यांनी सभेचे नियोजित अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. नंतर श्री. खैरे यांनी अनुमोदन दिल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले.

प्रथमतः श्री. सी. एन. मोहिते मास्तर यांनी डॉ. बाबासाहेबांनी प्रस्थापित केलेल्या इमारत फंडाविषयी आणि वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुषाने इमारत फंडास द्यावयाच्या देणगी विषयी खुलासेवार भाषण केले. श्री. वडवलकर आणि उपशाम मास्तर यांनीही समयोचित भाषणे केली.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बोलावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

आज आपण याठिकाणी सभा करून मला निमंत्रण दिले, याबद्दल मी आपले आभार मानतो. वास्तविक मी कोणाचेही आभार मानिले नाही. तुमचेच आभार का मानतो ? कारण तुम्ही आज दहा-बारा वर्षेपावेतो सार्वजनिक कार्यात भाग घेतला नाही व मला शंका होती की, येथील लोक झोपी गेले की काय ? किंवा ते करतात तरी काय ? वगैरे गोष्टींचा थांगपत्ताही नव्हता. आता आपण ही सभा घेऊन समाजकार्याविषयी आपली जिज्ञासा दाखवित आहात आणि म्हणून मी आपले आभार मानणे योग्य आहे. महाडच्या सत्याग्रहापासून काही मंडळीनी कोकणी लोकांचा बूट काढला. ज्या लोकांनी तो काढला त्यांची नावे येथे सांगण्याची जरुरी नाही. माझ्याप्रमाणे तुम्हालाही त्यांची नावे

---

जनता : १४ डिसेंबर, १९४०.

माहीत असतील. अशा लोकांपैकी एखाद्या माणसाने सार्वजनिक चळवळीत भाग घेतला आहे, अशी माझी मनोदेवता मला साक्ष देत नाही. अशा लोकांपैकी काही मंडळींनी उघडपणे कोकणस्थ व देशस्थ भेद माजविला आहे. या भेदभावाने समाजाचे कल्याण होणे तर दूरच राहिले पण नुकसान मात्र ताबडतोड झाल्याशिवाय राहणार नाही. हा भेदभाव उत्पन्न करणाऱ्या लोकांनी या दहा-बारा वर्षात काही समाजहिताची कार्ये केली असती तर मला आनंद झाला असता. त्यांनी काही बोर्डिंगे काढली असती, कांही गरीब मुलांना स्कॉलरशिपा देवविल्या असत्या तरीही मला आनंद झाला असता. पण तसे काही एक नसून उलट समाजात भेदनीती निर्माण करण्यात येत आहे. कटू शब्द सांगणे मला प्राप्त होत आहे. येथे जमलेल्या मंडळींना मला एक शुभसंदेश सांगावासा वाटतो आणि तो हा की, तुम्ही देशस्थ, कोकणस्थ, कर्नाटकी वा वायदेशी असा भेदभाव कराल तर तुम्ही अधोगतीला गेल्यावाचून राहणार नाही. इतके दिवस आपली अधोगती झाली, ती आता होऊ देता कामा नये. समाजात भेदभाव करणाऱ्यांना आपण बिलकूल थारा देऊ नका. त्यांच्याकरता मला कडक उपाय योजावे लागतील. तुम्ही हे ओळखूनच की काय, आपसातील भेदभाव विसरून ही अपूर्व सभा घडवून आणली म्हणून मी आपले आभार मानणे योग्य आहे. बरे असो.

बंधुजनहो ! इमारतीच्या बाबतीत माझ्या अगोदरच्या दोन वक्त्यांनी आपणास सांगितले आहे. यापूर्वीही मी इमारतीच्या बाबतीत दोन तीन ठिकाणी भाषणे केली आहेत. आपण ' जनता ' वाचत असाल तर आपणालाही ते समजले असेल. माझ्या अगोदरच्या वक्त्यांनी जे सांगितले त्यावरून त्यांना माझे मनोगत समजले नाही, असे वाटते.

इमारतीची कल्पना येणे आवश्यक आहे. ही इमारत देशावर जशी चावडी असते तशी करावयाची नाही. देशावरच्या चावडीत कामधंदा न करणारे रिकामटेकडे महार लोक लोळत असतात. अशा प्रकारची इमारत करण्याचा माझा इरादा नाही. मुंबईत दगडचाळीमध्ये एक शंकराचे देऊळ होते. तेथे बरेचसे साधुलोक गांजा, चरस वगैरे ओढून मठात गप्पागोष्टी सांगत बसत. याठिकाणी हिंदू-मुसलमान राहात असत. ते एकमेकांच्या विश्वासातले होते. एकेदिवशी देवळातील शंकराची पिंडी कोणीतरी फोडली. तेव्हा ही शंकराची पिंडी मुसलमानांनी फोडली असावी असे वाटणे साहाजिकच होते. पण चौकशीअंती असे समजले की, ती देवळातील साधुंनी फोडली. मुसलमानांनी फोडली नाही. बंधुंनो ! मला जी इमारत करावयाची आहे ती बेकार महारांना दिवसारात्री झोपण्यासाठी नव्हे, इमारती विषयीचा हेतू निराळा आहे.

तो जाणणे म्हणजे दुसऱ्या एका विषयाकडे वळण घेणे भाग आहे. आपण अस्पृश्य दारिद्र्याच्या गर्तेत सापडलो आहोत. आपल्याजवळ पैसा नाही. कोपर मोडल्याखेरीज भाकर मिळत नाही पण आपणाजवळ संघटनेचे सामर्थ्य फार दांडगे आहे. त्याच्यावरच आपल्याला प्रतिपक्षाशी दोन हात खेळावे लागणार आहेत.

आपल्याला जे काही राजकीय हक्क मिळालेले आहेत ते आपल्यापासून हिरावून घेण्यासाठी काँग्रेसही तयार आहे. काँग्रेसने मोठमोठ्या लोकांना हतबल करून टाकलेले आहे. एकेकाळी ब्राह्मणेतर पक्ष अगदी बलाढ्य असा होता. त्याचा सत्यशोधक समाज मोठ्या जोराने काम करीत होता. गणपतीच्या उत्सवाचे वेळेस ब्राह्मणाचा गणपती निराळा तर मराठ्यांचा गणपती निराळा. त्यावेळेस ह्या मराठे लोकांनी ब्राह्मणांना चिडवण्यासाठी एक पालुपद तयार केले होते. ते ब्राह्मणांना ' हर्रर्र बॅ ' असे म्हणत असत. परंतु जे ब्राह्मणेतर ब्राह्मणांना शिव्या देत असत त्यांची काय धडगत आहे ? रा. ब. बोले यांनी आपले आयुष्य ब्राह्मणांना शिव्या देण्यात घालविले. परंतु तेच बोले आता बॅ. सावरकरांच्या ताटाखालचे मांजर झाले आहे. तीच गोष्ट पुण्याच्या जेधेची. ते आता पुण्यातील एका ब्राह्मणाच्या हातातील बाहुले झालेले आहेत.

हा ब्राह्मणेतर पक्ष एवढा बलाढ्य होता पण तोच काँग्रेसपुढे लोटांगण घालीत का गेला ? त्याचे कारण एकच आणि ते म्हणजे हे की त्यांच्यामध्ये विस्कळीतपणा आहे. आमची गत तशी नाही. आम्हाला जे काही मिळालेले आहे त्याचा फायदा आम्ही आमच्या जातीकरिता करीत आहोत आणि तेही कोणाचे गुलाम न होता.

हल्लीचे राजकारण फुकटचे नसते. गांधींनी काँग्रेसचे राजकारण लढविण्यास एक कोटी रुपये खर्च केले आहेत. मागच्या इलेक्शनमध्ये मला हाणून पाडण्यासाठी काँग्रेसने अगदी पराकाष्ठा केली. इतर लोक जरी निवडून आले तरी ते काँग्रेसला चालले असते पण मला निवडून येऊ द्यावयाचे नाही, अशी काँग्रेसची महत्त्वाकांक्षा होती आणि म्हणून वल्लभभाई पटेल यांनी त्याकरिता ३५,००० रुपये खर्च केले. परंतु आपल्या समाजाच्या एकीमुळे मी दुसऱ्या नंबराने निवडून आलो. पारशांच्या बायांनी डॉ. गिल्डर यांनाच सॉलीड मते दिली नसती तर मी पहिल्या नंबराने पण निवडून आलो

असतो. म्हणून वेळोवेळी होणाऱ्या निवडणुकी लढविण्यासाठी पैसा नसल्यामुळे आपली कुचंबणा होण्याचा संभव आहे. तसे होऊ नये म्हणून या इमारतीपासून आपल्याला प्रत्येक वर्षाला ५-६ हजार रुपये भाडे येऊ शकेल. त्यामुळे आपण आपल्या निवडणुकी स्वतंत्रपणे लढवू शकू. त्याचप्रमाणे आपल्याला समाजातील लोकांना स्पृश्य लोकांपासून गावोगावी त्रास होत असतो. मला अशा गोष्टी बऱ्याच सांगण्यात येत असतात. परंतु मी काय करणार ? त्याच्याकरिता पैशाची आवश्यकता असते. वकील लोक पैशाशिवाय कसे काम करू शकतील ? म्हणून मला लोकांना मोठ्या पराकाष्ठेने सांगावे लागते की, बाबांनो, तुमच्यासाठी मी जास्त काही करू शकत नाही. ही गोष्ट खरोखरच नामुष्कीची आहे. म्हणून या इमारतीच्या उत्पन्नातून आपल्याला आपल्या लोकांची थोडीफार तरी दुःखे निवारण करता येतील.

या इमारत फंडाला पैसा देण्यासाठी आपणाजवळ श्रीमंत माणसे नाहीत. म्हणून थेंब थेंब रांजणामध्ये टाकीत राहिल्याने ज्याप्रमाणे रांजण भरतो त्याचप्रमाणे आपण सर्वांनी थोडे थोडे पैसे देऊन हा इमारत फंड पुरा केला पाहिजे.

हा प्रश्न माझ्या अगर दुसऱ्या कोणाच्याही स्वार्थाचा नाही. ही इमारत म्हणजे सर्व लोकांची पुंजी आहे, अशी आस्था मनात बाळगून आपण सर्वांनी मदत केली पाहिजे. ज्या लोकांना २५ रुपयांपर्यंत पगार आहे त्यांच्यासाठी मी दोन रुपये वर्गणी ठेवलेली आहे. परंतु ज्या लोकांना जास्त पगार आहे त्यांनी मात्र शिंगे मोडून वासरात शिरण्याचा प्रयत्न करू नये. त्या सर्वांनी एक महिन्याचा पगार या कार्यासाठी हप्त्या हप्त्याने दिला पाहिजे. तुम्ही जन्मभर पैसे कमवून आपल्या नातलगांना पोसाल, सावकारांचे पैसे भराल, दागिनेही कराल तरीपण हे सामाजिक ऋण आपण द्यावयास पाहिजे. या कामामध्ये तुम्ही हलगर्जी करता कामा नये. मी आपणास सरळपणे विनंती करतो. तिचा जर काही उपयोग झाला नाही तर कडक उपायांचा देखील उपयोग करण्यास मी मागे पुढे पाहाणार नाही. तो उपाय कोणता तर जाती बहिष्कार. वाईट काम करणाऱ्या माणसास ज्याप्रमाणे आपण वाळीत टाकतो त्याप्रमाणे या कार्याला मदत न करणाऱ्यास वाळीत टाकले तर वावगे होईल, असे मला वाटत नाही. इतके सांगून आपण या कार्यास मदत करा, असे परत एकदा सांगून माझे भाषण संपवितो.



## १८५

# मुलांना शिक्षण देण्यात कसूर करू नका

शनिवार, तारीख १५ फेब्रुवारी १९४१ रोजी रात्रौ १० वाजता फलटणरोड, मुंबई येथील म्युनिसीपल चाळीमध्ये प्रि. दोंदेसाहेब यांच्या अध्यक्षतेखाली जंगी जाहीर सभा झाली. सभेत अलोट जनसमूह हजर होता. अस्पृश्यांचे एकमेव नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभेस हजर राहणार म्हणून फोर्ट भागात व इतर ठिकाणी राहाणाऱ्या लोकांचे थवेच्याथवे ८ वाजल्यापासून सभेच्या ठिकाणी येत होते. डॉ. बाबासाहेब इतर कार्यकर्त्यांसह सुमारे १० वाजता सभास्थानी येते झाले. त्यावेळी जयघोषाच्या निनादानी सर्व वातावरण दुमदुमून गेले होते.

नंतर थोड्या वेळाने सभेस सुरवात झाली. सभेचे नियोजित अध्यक्ष प्रि. दोंदे यांनी अध्यक्षस्थान स्विकारल्यानंतर भाषण केले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना २३० रुपयांची थैली अर्पण केली. नंतर डॉ. बाबासाहेब भाषण करावयास उभे राहिले, ते आपल्या भाषणात म्हणाले,

सभाधिपती, भगिनींनो व बंधुंनो,

बऱ्याच वर्षानंतर आज मी याठिकाणी आलेलो आहे. लहानपणी मी ज्यावेळेस एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये जात होतो त्यावेळेस याचठिकाणी माझे काही नातलग राहत होते. त्यांचे मला जेवण्याचे आमंत्रण होते म्हणून मी आलो होतो. त्या दिवसापासून नाही. तो फक्त आजच मी येथे येत आहे.

एकंदरीत आजपर्यंत जे समाजकार्य होत आले आहे त्याचा वारा येथपर्यंत वाहात आला असेल असे मला वाटत नव्हते. त्याचे कारण असे की याठिकाणी अजून कसलीही चांगली सभा झालेली आहे, असे माझ्या ऐकिवात नव्हते. तथापि, आज येथील लोकांनी ही सभा घडवून आणली त्याबद्दल मला समाधान वाटत आहे.

मी दुसरी सगळी कामे बाजूला ठेवून हे इमारतीचे काम हाती घेतले आहे. या इमारतीची आपल्याला किती जरूरी आहे, याची तुम्हाला चांगली कल्पना असेल, असे मला वाटत नाही. तुम्हापैकी प्रत्येकाला माहीत असेल की आपल्या समाजाची कारकीर्द महाड सत्याग्रहापासून सुरू झाली. तुम्ही कुलाबा आणि

जनता : २२ फेब्रुवारी १९४१.

रत्नागिरी जिल्ह्यातील राहणारे असल्यामुळे तुम्हाला महाडाविषयी माहिती असणे शक्य आहे. या महाडच्या सत्याग्रहाचा माझ्या मनावर फार मोठा परिणाम झालेला आहे. त्या सत्याग्रहापासून मी जर काय शिकलो असेल तर ते हे की, आपण आपल्या उन्नतीचे काम करावयास लागलो तर स्पृश्य लोक आपल्याला भयंकर त्रास देतात. महाडच्या ठिकाणी आपले लोक जेवावयास बसले असताना स्पृश्य लोकांनी त्यांना मारिले. मी त्यावेळेस डाक बंगल्याकडे असताना मला या स्पृश्य लोकांनी गराडा घातला. परंतु तेथे पोलीस असल्यामुळे त्यांना मला काही करता आले नाही.

ज्यावेळेस सत्याग्रहास आलेले लोक आपआपल्या गावी परत गेले त्यावेळेस बऱ्याच खेड्यातून स्पृश्य लोकांनी आपल्या पुरुषांना तर मारलेच पण आपल्या स्त्रियांनादेखील भाल्याने मारहाण करण्यास मागेपुढे पाहिले नाही. इतकेच नसून बऱ्याच स्पृश्य लोकांनी आपल्या लोकांनी लाविलेल्या जमिनीदेखील काढून घेतल्या आणि बराच जाच केला. हा जाच कुलाबा जिल्ह्यातील आपल्या लोकांनी १-२ वर्षे काढला. परंतु खेदाची गोष्ट अशी की आम्ही मुंबईत राहणारे लोक त्यांच्याकरिता काहीही करू शकलो नाही. ह्याचे कारण काय ? त्याचे कारण दुसरे तिसरे काही नसून त्या लोकांची दुःखे निवारण करण्यासाठी आपल्याजवळ पैसा नव्हता आणि याच कारणामुळे माझ्या मनावर असा परिणाम झालेला आहे की आपल्याला आपला सामाजिक लढा लढविण्यासाठी आपणाजवळ पैसा असणे अत्यावश्यक आहे. तो पैसा आपणाला या इमारतीपासून मिळेल, असे वाटते.

आतापर्यंत आपले बरेचशे सामाजिक काम झालेले आहे आणि होत आहे. परंतु जोपर्यंत मी हयात आहे तोपर्यंत हे ठीक आहे. परंतु माझ्यानंतर काय ? आपल्यामध्ये अजूनपर्यंत व्हावी तितकी सुधारणा झालेली नाही. आपल्याला पुढे आपला लढा लढविणे क्रमप्राप्त आहे. त्याकरिता ही इमारत झाल्यावर माझ्यानंतरच्या लोकांना सोयीस्कर होईल यात संशय नाही. त्यांच्याकरिता मी जर एखादी योजना करून ठेवली नाही तर ते मला दोष दिल्याशिवाय राहणार नाहीत.

ही इमारत झाल्यावर तिच्यापासून सालीना पाच-सहा हजार रुपये उत्पन्न येईल, असा माझा अंदाज आहे. या उत्पन्नाचा विनियोग आपल्या लोकांना स्पृश्य लोकांकडून होणाऱ्या त्रासाचे हरण करण्यासाठी करण्यात येईल.

ज्याप्रमाणे एखादा शेठ आपल्या मुलाच्यासाठी इमारत किंवा एखादी चाळ बांधून ठेवतो त्याचप्रमाणे ही इमारत बांधण्यात माझा हेतू आहे. माझ्यानंतर ह्या इमारतीपासून तुम्हाला फारच मदत होईल. परंतु तुम्ही सर्वांनी एकोप्याने राहिले पाहिजे. म्हणून सर्वांनी या कामाकरिता मदत करणे अत्यावश्यक आहे.

याप्रसंगी मला आपणास तीन गोष्टी सांगाव्याश्या वाटतात. त्यातली पहिली गोष्ट म्हणजे ही की तुम्ही जो हा कचरापट्टीचा धंदा करिता तो काही इतका मानाचा नाही. तो अत्यंत गलिच्छ असा आहे. आपले लोक पूर्वी पलटणीत होते, हल्ली नाहीत. त्याचे कारण काय ? त्याचे कारण आपले लोक हा धंदा करतात हेच आहे. हल्ली ब्रिटिश सरकारला माणसांची फार जरुरी असताना देखील आपल्याला पलटणीमध्ये घेत नाहीत. पलटणीमध्ये स्पृश्य लोकांचा जास्त भरणा असल्यामुळे ब्रिटिश सरकार आपल्यापेक्षा याबाबतीत त्यांची जास्त पर्वा करीत आहे. म्हणून तुमच्या मुलांना तुमच्यानंतर तुमच्यासारखाच धंदा करण्याची पाळी येऊ नये, म्हणून तुम्ही सर्वांनी काळजी घ्यावयास पाहिजे. मुलांना शिक्षण दिले पाहिजे, तुमची मुले क्लर्क, शिक्षक वगैरे झाले पाहिजेत अशी तुम्ही इच्छा धरली पाहिजे. इतर जिल्ह्याचे मानाने जर पाहिले तर कुलाबा, रत्नागिरी या जिल्ह्यात आपले लोक शिक्षणाच्या बाबतीत फार मागासले आहेत. तुमच्यात फार थोडे मॅट्रिक झालेले आहेत. याकरिता तुम्ही तुमच्या मुलांना शिक्षण देण्यास कसूर करता कामा नये.

दुसरी गोष्ट अशी की तुम्हाला कपडे वापरण्याच्या बाबतीत फार वाईट सवय लागलेली आहे. तुम्ही कामावर जाताना, फिरावयास जाताना किंवा लग्नाला जाताना एकच कपडा घालीत असता. हे फार वाईट आहे. कामावर जाण्याकरिता वेगळे व फिरावयास जाण्याकरिता किंवा लग्नकार्यात जाण्याकरिता चांगले कपडे करा. दोन वेळचे खावयास नसले तरी चालेल परंतु चांगले कपडे करा. कारण कपड्यापासून आज जगात मान आहे.

तिसरी गोष्ट अशी की मुंबईत म्युनिसीपल कामगार युनियन फार जोरात आहे. मागे एकदा मडकेबुवांनी ही युनियन काढण्याचा घाट घातलेला होता. त्यावेळेस त्यांना यश आले नव्हते. परंतु आता त्यांच्या प्रयत्नाला यश आलेले आहे. म्हणूनच मी तुमचे व मडकेबुवांचे अभिनंदन करतो. संघटनेचे किती महत्त्व आहे, याचे तुम्हास एक ताजे उदाहरण देतो. म्युनिसीपालिटी कामगार युनियनतर्फे ड्रेनेज डिपार्टमेंटमध्ये काम करणाऱ्या लोकांना त्यांना कामाच्या मानाने फार थोडा पगार मिळत असे. त्यांना जास्त पगार मिळावा

म्हणून म्युनिसीपल कमिशनरला कळविले आणि संपाची नोटीस दिली. आमचा संप फोडण्याचा फार प्रयत्न करण्यात आला. परंतु त्यांना यश आले नाही. शेवटी मागण्या म्युनिसीपल कमिशनरने मान्य केल्या व ड्रेनेज डिपार्टमेंटमधील लोकांचा पगार वाढविण्यात आला. या मुंबईमध्ये इतर लोकांनी जे संप केले त्यात त्यांना यश आले नाही. मग हाच संप कसा यशस्वी झाला ? त्याचे कारण दुसरे तिसरे नसून संघटना हेच होते.

तुम्ही जो हा धंदा करता तो करण्याकरिता स्पृश्य लोकांना दरमहा १०० रुपये दिले तरी कोणीही तो करणार नाही. तुम्ही जर संप केला तर मुंबईत राहाणाऱ्या लोकांना तडफडून मरून जावे लागेल. म्हणून तुम्ही एकी ठेवल्यावर या मुंबईमध्ये राहाणाऱ्या लोकांची नांगी तुमच्या हातात राहील.

हल्ली तुम्हाला महागाई भत्ता मिळावा म्हणून म्युनिसीपालिटीमध्ये ठराव आणिलेला आहे. म्हणून तुम्ही म्युनिसीपल कामगार युनियनचे सभासद होऊन युनियनच्या लढ्याला साहाय्य करा, इतके सांगून मी माझी जागा घेतो.



# १८६

# मी म्हणतो अस्पृश्य गव्हर्नर का नसावा ?

तारीख २३ फेब्रुवारी १९४१ रोजी तडवळे (ढोकी) येथे आयोजित सोलापूर जिल्हा व मोगलाई मराठवाडा भागातील महार-मांग वतनदार परिषदेच्या कामासाठी अखिल भारतीय अस्पृश्यांचे वंदनीय पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे तारीख २२ फेब्रुवारी १९४१ रोजी सकाळी १० वाजता तडवळे स्टेशनवर उतरले. बार्शीपासून पुढील प्रत्येक स्टेशनवर त्यांचा अस्पृश्य समाजाकडून सत्कार झाल्यामुळे गाडी आज अर्धा तास तडवळयाला उशीरा आली. तेथून लतापल्लवांनी शृंगारलेल्या पन्नास बैलांच्या गाडीतून लतापल्लवांनी शृंगारलेल्या रस्त्यावरून त्यांची मिरवणूक निघाली ! शिंगे, हालग्या, नगारे, तुतारे, सनया, ब्यांड वाजंत्री, तडवळे, येडशी, उस्मानाबाद वगैरे ठिकाणच्या आत्मयज्ञ दलाचे शेकडो सैनिक आणि हजारो अस्पृश्यांच्या मुखातून निघणाऱ्या ' आंबेडकर कौन है, दलितोंका राजा है ' वगैरे जयजयकाराने तडवळयाचे वातावरण दणाणून गेले. अशा आनंदाने मिरवणूक परिषदेच्या मंडपात येताच शेकडो स्त्रियांनी बाबासाहेबांच्यापुढे पाण्याच्या घागरी ओतून त्यांच्यावरून नारळ ओवाळून टाकून, ' इडापिडा टळो बाबासाहेब सुखी राहोत,' म्हणून पंचारतीने ओवाळले. कित्येक बायांनी ' आमची ही अल्पशी देणगी इमारत फंडाला घ्या ' म्हणून काही पैसेही दिले ! शेकडो हार बाबासाहेबांना अर्पण झाल्यानंतर ते विश्रांतीसाठी निवासस्थानी गेले व सायंकाळी विषयनियामक कमेटी आणि इतर चर्चा झाली.

दुसऱ्या दिवशी तारीख २३ फेब्रुवारी १९४१ रोजी सकाळी ९.४५ वाजता दहा हजार श्रोतृसमुदायाने भरलेल्या मंडपात ईशस्तवनाने परिषदेच्या कार्याला सुरूवात झाली. नंतर ए. एच. भालेराव यांनी अध्यक्षांची सूचना मांडली. तिला हरिभाऊ तोरणे यांनी अनुमोदन दिले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारल्यानंतर परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. देवीचंद मारूती कदम यांचे भाषण झाले. यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले.

---

जनता : १ मार्च आणि ८ मार्च १९४१.

ते आपल्या भाषणात म्हणाले,

बंधु, भगिनींनो,

आपणापैकी कोणी निजामाच्या संस्थानातून आला आहात तर कोणी खालसा भागातून आला आहात. म्हणून मला आज माझ्या भाषणाचे दोन भाग करावे लागतील. एक खालसातील बांधवांसाठी व दुसरा निजाम प्रांतीय बांधवांसाठी. सोलापूर जिल्ह्यातील बांधवांना आमदार ऐदाळे यांनी बरीच सरकारी पडित जमीन मिळवून दिली आहे. त्यांची दैन्यावस्था शक्य तितकी कमी करण्यासाठी आणि काही गावच्या अस्पृश्यांवर झालेले अन्याय निवारण्यासाठी त्यांनी बरेच प्रयत्न केलेले आहेत व त्यात त्यांना यशही आलेले आहे. पुढेही काही सुधारणा होणार तोच राज्यकारभाराचा गाडा मधेच रस्त्यावर टाकून काँग्रेसचे बुजके बैल रानोरान पळाले ! हे बैल गांधींना बुजतात ! गांधींनी कसलीतरी हूल उठवावी आणि त्यांच्या भाटांनी डोळे झाकून टिमकी वाजवावी, अशी आज काँग्रेसची स्थिती आहे. हिंदी लोकांचा कैवार घेऊन त्यांच्या हिताचे रक्षण करण्यासाठी काँग्रेस १८८५ साली जन्माला आली. सुरवातीच्या पाच पंचवीस वर्षात ती कोणाच्या फारशी ओळखीची नव्हती. मुंबई-पुण्याच्या कोणीतरी पुढाऱ्यांनी, व्यापाऱ्यांनी उठावे, कुठेतरी जमावे आणि काही ठराव करावे, अशी तिची कामगिरी होती ! पण गेल्या वीस वर्षापासून तिच्या नावाचा डांगोरा जोराने पिटण्यात येऊ लागला आहे. जरी इंग्रज लोक मि. चेंबरलेन यांना प्रधानपद देतात, साम्राज्याची सर्व सूत्रे त्यांच्या हाती देतात पण त्यांच्या सार्वजनिक वागणुकीमुळे आपणाला गुलामगिरीच्या खोड्यात पडावे लागेल अशी शंका येताच त्यांना प्रधान पदावरून खाली ओढतात ! अशी स्थिती काँग्रेसची नाही. तिला व्यवहार ज्ञान नाही. १९४० साल म्हणजे १९११ साल, असा तिला भ्रम झाला आहे. पण तिच्यात आता दम राहिला नाही. काँग्रेसच्या गंगेतून फुटून हिंदूसभेची यमुना निराळया प्रवाहाने वाहू लागली आहे. मुसलमान मुस्लिम लीगचे झेंड्याखाली आहेत. मुस्लिम लीगचा प्रवाह निराळ्याच मार्गाने वाहात आहे. मुसलमानांचा दरारा वाढला आहे. इंग्रज सरकारला शरण आणण्याची ताकद काँग्रेसमध्ये किंवा हिंदू सभेमध्ये नाही. ती फक्त एकट्या मुस्लिम लीगमध्येच आहे. हिंदुस्थानचे व्हाईसरॉय लॉर्ड लीनलिथगो यांनी कायदे कौन्सिलाच्या पुनर्घटनेची योजना पुढे मांडली. तेथे दुराग्रहाने सगळी सत्ता काँग्रेसच्या हाती द्या आणि मग मुस्लिम लीगच्या लोकांना किंवा अस्पृश्यांना अथवा अल्पसंख्यांकांना त्यात घ्यावयाचे किंवा नाही व घेतले तर किती प्रमाणात आणि कोणत्या व्यक्तिला घ्यावयाचे ते काँग्रेस ठरवील अशी अहंकाराची आणि उद्दामपणाची भूमिका काँग्रेसने घेतली. व्यक्तिमात्राने अहंकार केला तर त्याची

चिंता करण्याचे काहीच कारण नाही. त्यांचे कर्म तो भोगील. पण जेव्हा व्यक्तिचा अहंकार त्या व्यक्तिला प्राप्त झालेल्या स्थानामुळे बाधक होतो तेव्हा सर्वांनीच त्याचा विचार करावयास पाहिजे व राष्ट्राच्या हितासाठी खोट्या, दांभिक व अहंकारी वृत्तीला आळा घातला पाहिजे आणि राष्ट्रकार्याचा गाडा योग्य त्या मार्गाने नेला पाहिजे. पण गांधींच्या बुजर बैलांनी तो रस्त्यावरच टाकून हिंदी राजकारणाचा विचका केला आहे. गांधींच्या तंत्राने चाललेल्या हरिजन सेवक संघाचीही तीच रडकथा ! ते अस्पृश्यांना साक्षर करण्यासाठी कुठे एखादी रोडकी शाळा काढतील आणि वापरण्यासाठी वेगळी विहीर बांधतील, पण ती जबाबदारी सरकार यथाशक्ती पार पाडीतच आहे. हरिजन सेवक संघवाल्यांना मी सूचना करतो की, बाबांनो, अस्पृश्यांना पाणी पाजावयाचे असेल तर समतेने पाजा. आम्हाला विषमता नष्ट करावयाची आहे. अशा थातुर मातुर उपायांनी ती नष्ट होणार नाही. शरीराच्या नाजूक भागावर उठलेला ढळढळीत फोड नाहीसा करण्यासाठी तेल पाणी लावून नवारीचा हात फिरविल्याने काम भागेल का ? हरिजन सेवक संघ, काँग्रेस आणि गांधी हे मुसलमानांची मनधरणी करतील, राजेरजवाड्यांची मनधरणी करतील पण अस्पृश्यांच्या बाबतीत ? अंहं ! गांधींना हिंदू गव्हर्नर पाहिजे, हिंदू कलेक्टर पाहिजे. मी म्हणतो अस्पृश्य गव्हर्नर का नसावा ? अस्पृश्य कलेक्टर का नसावा ? पण गांधींना नेमके तेच नको ! मध्यप्रांतात डॉ. खऱ्यांनी एका अस्पृश्याला दिवाणाची जागा देताच गांधींचे पित्त भडकले ! ते डॉ. खऱ्यांवर चवताळले. योग्यवेळी तो पत्र-व्यवहार मी उघडकीस आणणार आहे ! थोडक्यात सांगावयाचे म्हणजे गांधींची चळवळ, त्यांचा सार्वजनिक संसार अस्पृश्यांच्या बाबतीत असा हा पक्षपातीपणाचा आहे. संसाराला मीठ, मिरची, लाकूडसुद्धा लागते. गांधींच्या या संसाराला शेठ सावकारांकडून चंदी मिळते. काँग्रेसचा आज जो बोलबाला ऐकू येतो त्यात गांधींची कर्तबगारी नाही ! ती एक कोटी रुपयांच्या फंडाची करामत आहे. बंधुंनो, आपला संसार आपणच केला पाहिजे. पण त्याला सामग्री नाही, फंड नाही, पैसा नाही. म्हणून हताश होऊन बसल्याने सध्याच्या धकाधकीच्या मामल्यात आपला निभाव लागणार नाही. आपल्याला तर मानाने जगावयाचे आहे. तसे जगण्यासाठी राजकीय हक्काची सत्ता आपल्या हाती पाहिजे. महारकीचा लोभ आणखी किती दिवस कवटाळून धरावयाचा ? मीही आठ आण्याचा वतनदार आहे. वतनदारीचा लोभ मी सोडला. अजूनही माझ्या घराच्या आढ्याला बांधलेले देव स्पृश्य गावकरी लग्नकार्याच्या वेळी मोठ्या मिरवणुकीने नेतात. एकदा त्या गोष्टीला खंड पडला आणि गावात वाखा झाला. आपल्या सार्वजनिक कार्याचा तसा वाखा होऊ देऊ नका. आपल्या

चळवळीचे कार्य अखंड चालावे म्हणून मुंबईत मी अडीच लाखाची इमारत बांधण्याचे ठरविले. तिच्या काही भागात ' जनता ' पत्राचे ऑफिस, प्रेस वगैरे ठेवून बाकीच्या भागातून भाडे घेता येईल. वर्षाकाठी आठ नऊ हजाराचे उत्पन्न येईल व त्यातून आपला खर्च भागेल. त्यासाठी देशावरच्या अस्पृश्य लोकांकडून, प्रत्येक घराकडून एक रुपया तरी मिळवा. हे पैसे घेण्यासाठी या जिल्ह्यात मी दोनच माणसे निवडली आहेत. एक आमदार ऐदाळे व दुसरे हरिभाऊ तोरणे. याजकडे पैसे द्यावेत. हा पैसा आपला आपणच जमविला पाहिजे. दुसऱ्याकडून पैसा घेतला तर आपण त्यांचे होऊ. महाभारतातील कौरव पांडवांची कथा तुम्हाला माहीत असेलच. पांडवांच्या बाजूला न्याय आहे, त्यांच्याच बाजूला सत्य आहे याची पूर्ण खात्री असून भीष्म, द्रोणासारखे योद्धे कौरवांच्या बाजूला राहिले कारण, त्यांनी कौरवांचे अन्न खाल्ले होते. आपण आपल्या शक्तीनुसार मदत करा. मी इमारत बांधून काढीन असा मला आत्मविश्वास आहे.

आज निजाम सरकारच्या राज्यातील बांधवांसंबंधाने बोलावयाचे. खरे पाहिले तर खालसा मुलुखात काय आणि निजाम हद्दीत काय, महारांची स्थिती जवळ जवळ सारखीच. हिंदुस्थानात जी पाच सहाशे संस्थाने आहेत त्यात निजामचे राज्य पहिल्या दर्जाचे आहे. त्यामानाने बडोदा स्टेट किती लहान ? पण त्या संस्थानाने अस्पृश्यांच्या शिक्षणाची सोय केली आहे. म्हैसूर संस्थानामध्ये तसेच तिकडे अस्पृश्यांना जमीनी मिळाल्या. सुरतीच्या साऱ्याची सूटही मिळाली. त्या संस्थानातून अस्पृश्यांच्या हितसंबंधांकडे सरकारने लक्ष दिल्याचे दिसून येते. तसे हैद्राबाद संस्थानात काय आहे ? वतनदार महारांच्या पोटापाण्याचा प्रश्न समाधानकारकपणे अजून सुटलेला नाही. अस्पृश्यांच्या प्राथमिक शिक्षणाची सोय नाही. लाखो एकर सरकारी जमीन पडली असून अस्पृश्य लोक उपास काढीत आहेत. संस्थानाची आर्थिक स्थिती चांगली असताना असे का व्हावे ? मला समजत नाही. आपली दु:खे सरकारच्या नजरेस आणण्यासाठी अस्पृश्यांनी संघटना करावी. हैद्राबादच्या नवीन होणाऱ्या राज्यघटनेत अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात योग्य ते प्रतिनिधित्व मिळवण्याचा प्रयत्न करावा. आज जे काही पैसे निजाम प्रांतीय अस्पृश्यांनी मला देण्यासाठी आणले होते ते त्यांना त्यांच्या कार्याला पाहिजे असतील तर घेऊन जावेत. आपली गाऱ्हाणी योग्य त्या सनदशीर मार्गाने सरकारच्या नजरेस आणण्याचा प्रयत्न करावा. त्यात जरुर त्या प्रसंगी मी साह्य करू शकेन.

डॉ. आंबेडकर यांचे भाषण झाल्यावर पुढील तीन ठराव पास झाले.

**ठराव १ ला.**—— निजाम सरकारच्या हद्दीतील वतनदार महार, मांग लोकांना करावी लागणारी कामे लक्षात घेता त्यांना सरकारकडून योग्य तो मोबदला मिळत नाही. तरी सरकारी फॉरेस्ट जमीनी देवून वतनदार महार, मांग लोकांच्या पोटाचा प्रश्न मिटवावा अशी ही सभा निजाम सरकारास विनंती करते.

**ठराव २ रा.**—— निजाम हद्दीत राहणाऱ्या अस्पृश्य लोकांची अत्यंत हेळसांड होत आहे. तरी सरकारतर्फे त्यांच्या प्राथमिक शिक्षणाची सोय त्वरित करण्यात यावी अशी या सभेची विनंती आहे.

**ठराव ३ रा.**—— नवीन होणाऱ्या राज्यघटनेत निजाम हद्दीतील अस्पृश्य जनतेला त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी मिळावे अशी या सभेची निजाम सरकारास विनंती आहे.

बार्शी म्युनिसीपालिटीचे प्रेसिडेंट व ब्राह्मणेतरांचे पुढारी श्री. भातनकर यांनी आज सकाळीच बाबासाहेबांना भेटून बार्शी म्युनिसीपालिटीचा कार्यक्रम मुक्रर केल्यामुळे दुपारी तीन वाजता ते बार्शीकडे मोटारने गेले. तेथे म्युनिसीपालिटीच्या बागेत बाबासाहेबांना ' ॲटहोम ' पार्टी झाली. तेव्हा श्री. भातनकर यांनी बार्शी म्युनिसीपालिटीने अस्पृश्य नोकरांना, अस्पृश्य विद्यार्थ्यांना व त्यांच्या बोर्डिंगाला मदत केली व पुढे करणार आहे असे सांगितले. उत्तरादाखल बोलताना बाबासाहेबांनी म्युनिसीपालिटीचे आभार मानले आणि आपल्या गंगाजळीचा अदमास पाहून म्युनिसीपालिटी असेच धोरण ठेविल अशी आशा व्यक्त केली. तसेच जरूरीच्या कामाच्या गर्दीमुळे आपणाला मानपत्र स्वीकारता आले नसले तरी ॲटहोम पार्टीला हजर झालो आहे असे सांगून श्री. भातनकर आणि त्यांचे सहकारी यांचे आभार मानले.

यानंतर वतनदार महारवाड्यात श्री. सखाराम बोकेफोडे, राजाराम बोकेफोडे वगैरे मंडळींनी महारवाड्यात मंडपात स्त्रियांची ओवाळणी आणि इमारत फंडाला देगणी देण्याचा कार्यक्रम झाल्यावर बाबासाहेबांनी तेथील अस्पृश्य वस्तीला भेट दिली. तेथून ते कुर्डूवाडीला निघाले. तिथे किसन सोनवणे वगैरे बी. एल. रेल्वेस्टाफच्या मंडळींनी हारतुरे व चहापार्टी करून इमारत फंडाला १०१ रुपये देणगी दिली. त्याशिवाय कित्येक अस्पृश्य भगिनींनी स्टेशनामध्ये येऊन बाबासाहेबांना पंचारतीने ओवाळून इमारत फंडाला देगणी दिली.

कुर्डूवाडीच्या कार्यक्रमानंतर अत्यंत जरूरीच्या कामासाठी बाबासाहेबांना मुंबईस जाणे भाग पडल्यामुळे पंढरपूर, अकलूज, नातेपुते, माळसिरस येथील कार्यक्रम नाइलाजाने रहित झाले.

• • •

१८७

# श्वानवृत्ती सोडून मनुष्यत्वाची धारण करा

रविवार तारीख ११ मे १९४१ रोजी मुंबई अस्पृश्य विद्यार्थी संमेलन ३ रे, यातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रस्थापित केलेल्या इमारत फंडास ' पर्स ' अर्पण करण्याकरिता, प्रिं. दोंदेसाहेब, बी.ए. म्युनिसीपल कार्पोरेटर, यांच्या अध्यक्षतेखाली जंगी जाहीर सभा आर. एम. भट हायस्कूल, परळ, मुंबई येथे भरविण्यात आली होती. सभास्थानी अस्पृश्यांचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर येताच त्यांचे जमलेल्या जनसमूहाने टाळयांच्या प्रचंड कडकडाटात स्वागत केले.

श्री. व्ही. एस. पगारे यांनी प्रिं. दोंदेसाहेब यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली आणि श्री. साळवे यांनी अनुमोदन दिल्यावर अध्यक्षांनी आभार प्रदर्शनार्थ प्रास्ताविक भाषण केले.

श्री. एस. डी. गायकवाड (इंटर आर्टस्) यांनी एकंदरीत विद्यार्थी समूहाने इमारत फंडास कशा तऱ्हेने निधी जमा करण्यात आला त्याचा सविस्तर अहवाल वाचून दाखविला. सदर निधी अस्पृश्य विद्यार्थी संमेलन ३ रे यातर्फे जमा करण्यात आला. संमेलनप्रसंगी काटकसर करून इमारत फंडास थोडी फार मदत करावी, असा विद्यार्थ्यांचा मानस होता. परंतु संमेलनास जमलेला निधी अपुरा होऊन त्यांना (विद्यार्थ्यांना) इमारत फंडास मदत करणे अशक्य झाले. ही महत्त्वाकांक्षा पूर्ण व्हावी म्हणून विद्यार्थ्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या ४९ व्या वाढदिवसानिमित्त लहान बॅजेस तयार करून ती विकून त्यांनी एकूण रु. ८६-०-६ रक्कम जमा केली. त्यापैकी रु. ३४-१५-३ खर्च वजा जाता शिल्लक ५१-१-३ ची रक्कम येथे डॉक्टर बाबासाहेबांस इमारत फंडाकरिता अर्पण करण्यात येणार आहे. सदर रकमेपैकी निम्मे अधिक रक्कम कुमारी कमल मुरवाडकर हिने जमा केली आहे.

सदर प्रसंगी वि. भंडारे व एस. जे. जाधव यांनी इमारत फंडाविषयी परिणामकारक भाषणे केली.

नंतर कुमारी कमल मुरवाडकर हिने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या गुणवर्णनपर छोटेसे भाषण करून त्यांना विद्यार्थी समितीतर्फे ५१ रु. १ आ. ३ पै. ची पर्स अर्पण केली. (टाळ्या).

---

जनता : १७ मे, १९४१.

नंतर सुप्रसिद्ध जलसाकार श्री. भीमराव धोंडिबा कर्डक यांनी नाशिक जिल्ह्यातर्फे जनता पत्रास एकूण ११३ रु. ची थैली अर्पण केली आणि भाषण केले.

तद्नंतर श्री. दगडूजी जाधव यांनी परेल गव्हर्नमेंट गेट, लाल चाळीतर्फे ८० रु.चा पहिला हप्ता म्हणून डॉ. बाबासाहेबांना इमारत फंडाकरिता दिला. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे प्रचंड टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

' विद्यार्थी आणि बंधुभगिनींनो,

आज या ठिकाणी येताना काही महत्त्वाच्या मुद्यांवर बोलण्याचा माझा हेतू होता. परंतु याठिकाणी जमलेला जनसमुदाय अतिशय अल्प असल्यामुळे तो हेतू मी आज येथे तुम्हास सांगू शकत नाही. आज तीन वस्तीतून याठिकाणी समाजकार्याकरिता पैसे देण्यात आले आहेत. त्याबद्दल तेथील मंडळींचा मी आभारी आहे.

आपणास पैशाची अत्यंत जरूरी आहे. इमारत फंडाशिवाय इतरही काही प्रसंग आपल्यावर येत आहेत. पैशाची आपत्ती सारखी वाढत आहे. इमारतीस सुरवातीला दोन-अडीच लाख रुपये लागतील असा माझ्या इंजिनियरने अंदाज केला होता. आता सिमेंट, लोखंड वगैरे सामान महाग झाल्यामुळे दोन-अडीच लाख रुपयांऐवजी ४ लाख रुपये खर्च येण्याचा संभव दिसत आहे.

चार लाख रुपयांची जबाबदारी कुठे आणि या सभेत मिळालेल्या अल्प निधीची जबाबदारी कुठे ? ही जबाबदारी लोकांना पार पाडणे शक्य नाही, त्यांच्यासाठी मला दुसरा उपाय योजावा लागेल. परंतु एका गोष्टीचा मला मोठा आनंद वाटतो. हल्लीच्या तुम्हा लोकात समाजकार्याविषयी उत्कट भावना निर्माण झाली आहे. काम करण्याचा तुमचा हा उत्साह पाहून मला अत्यंत समाधान वाटते, म्हणून येथील लोकांचा मी फार ऋणी आहे.

माझ्या स्वतःच्या मनात असे वाटते की, वरच्या वर्गाच्या संस्था ज्या उपायांनी कार्य करतात ते उपाय अंमलात आणावे हे चांगले. पुण्यातील ब्राह्मणांची सेवासदन सारखी संस्था घ्या. या संस्थेत मुलींना शिक्षणाचा लाभ मिळतो, त्या मुली काहीतरी काम करतात. उत्सव, सण वगैरे प्रसंगी त्या तिकिटे विकून पुष्कळ पैसा जमवितात. पूर्वी माझ्याकडेही असे लोक येत असत पण आता मात्र ते येत नाहीत. याचे कारण माझी हल्लीची भूमिकाही असू शकेल.

आपले लोक सण वगैरे पाळीत नाहीत असे एका विद्यार्थ्याने सांगितले. लोक होळी पेटवीत नसतील, गणपती आणीत नसतील, पाडव्याच्या दिवशी तोरणे लावत नसतील परंतु सणाचा कारभार ते व्यवस्थित पार पाडीत असतील असे मला वाटते, अशा प्रसंगाला जे लोक समाजाच्या कार्याप्रित्यर्थ तिकिटे घेऊन घरोघर फिरतील

तर बरे होईल. ही गोष्ट महत्त्वाची आहे. शिक्षण घेणे हे जरूर आहे. तुमची सर्वांची अशी भावना झाली आहे की, महार म्हणजे सरकारचा भिकारी. भाकरी मागणे हा आपला हक्क आहे असे आपण समजता पण तो खोटा आहे. भाकरी मागणे हे कुत्र्याचे जीवन आहे. भीक मागण्याची वृत्ती लोकांनी सोडून दिली पाहिजे. काँग्रेसने सत्त्याग्रहाची चळवळ केवळ आपले हक्क मिळविण्यासाठी सुरू केली आहे. मी जर काँग्रेसमध्ये गेलो तर ४ लाख रुपयांऐवजी १० लाख रुपये इमारतीसाठी जमा करीन. पण ही श्वानवृत्ती आहे. माणसाची नाही. ही वृत्ती आपण सोडली पाहिजे. माणसाची वृत्ती धारण केली पाहिजे. आपण आपली जबाबदारी ओळखली आहे याबद्दल मला समाधान वाटते.

दुसरी गोष्ट अशी की, वर्ष दोन वर्षापासून ' जनता ' पत्रावर अनेक आपत्ती आलेल्या आहेत. ' जनता ' पत्राच्या जबाबदारीचे मूळ अत्यंत महत्त्वाचे असे आहे. तुम्ही ' जनता ' घेता. या अंकातील अग्रलेख काल रात्री ११ वाजता मी लिहून दिला व सकाळी ' जनता ' तयार झाली. जनतेस लागणारा कागद साडे नऊ वरून साडे दहा रुपयापर्यंत गेला आहे. इतका प्रसंग पत्रावर आला असताना पत्र बंद करावे असे वाटू लागते. परंतु पत्र हा चळवळीचा आत्मा आहे. कोणत्या ठिकाणी कोणती विशेष गोष्ट घडली, हे पत्राद्वारे आपणास समजते. म्हणून सांगतो की, ज्या दिवशी जनता पत्र बंद पडेल, त्याच दिवशी तुमची चळवळ मातीत जाईल. गेल्या शनिवारी आमची सभा झाली. पत्र बंद करावे की काय ? आठवड्याचे पत्र काढल्यास एक पान ठेवावे की काय ? पाक्षिक काढावे की काय ? युद्धामुळे ' जनतेस ' दरमहा ४०० रु. ची तूट येते. ती भरून कशी काढावी ? शेवटी प्रेसमधील काही माणसे कमी करून १५० रु. ची बचत कशी तरी करता येईल असे ठरले. वेळ कठीण आहे. लढाईमुळे कागद महाग झाला आहे. कदाचित तो पुढे मिळणार नाही. सध्या जनता पत्र चालविण्याचे आम्ही ठरविले आहे. तथापि, पत्राची जबाबदारी तुम्ही घेणे महत्त्वाचे आहे. येथेच विराम करून सर्वांचे आभार मानतो.

आता जास्त न बोलता तुमची जबाबदारी काय आहे याचा विचार करा असे सांगून शेवटी आभार प्रदर्शनार्थ श्री. एस. व्ही गायकवाड, बी. ए. यांनी भाषण केले.



## १८८

# आपला स्वार्थत्याग व धडाडी अपूर्व आहे

परळ, मुंबई, ता. १७ मे १९४१ रोजी सायंकाळी ५-४५ वाजता परळ, लाल चाळ पंचातर्फे इमारत फंडास थैली अर्पण समारंभ डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली करण्यात आला. प्रथम पंचाचे स्वागताध्यक्ष श्री. गणपत तुळशीराम सावळेकर आणि श्री. पी. एल. लोखंडे यांची भाषणे झाली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बोलावयास उठले त्यावेळी प्रचंड टाळ्यांनी त्यांचे स्वागत करण्यात आले. ते म्हणाले,

पोलीस कमिश्नरच्या हुकूमामुळे सभा होत नाही. पण मी, आपले आभार मानण्यासाठी आलो आहे. आपल्या लोकांच्या ह्या ठिकाणी १८ खोल्या आहेत. आपली जरी येथे थोडीशी वसती आहे तरी आपण इमारत फंडास मदत करून दाखविलेला स्वार्थत्याग व धडाडी अपूर्व आहे. त्याबद्दल मी आपले अभिनंदन करीत आहे. ह्या मंडळींनी आपल्या समाजाला धडा घालून देण्यासारखे कृत्य केले आहे. सदर वेळी काही मंडळीकडून इमारत फंडासाठी आश्वासने सुद्धा मिळाली आहेत.

शेवटी चहापान झाले व फोटो काढण्यात आल्यावर डॉ. बाबासाहेबांच्या जयजयकारात समारंभ संपविण्यात आला.



---

जनता : ३१ मे १९४१.

# १८९

# मुला-मुलींना शिक्षण द्या : परंपरागत कामात गुंतवू नका

रविवार तारीख १३ जुलै १९४१ रोजी तीन वाजता मुंबई येथील कावसजी जहांगीर हॉलमध्ये म्युनिसीपल कामगार संघाची वार्षिक सर्वसाधारण सभा झाली. सभेचे अध्यक्षस्थान संघाचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मंडित केले होते. सभेस जवळजवळ दोन अडीच हजार म्युनिसीपल कामगार हजर होते.

प्रथम संघाचे सेक्रेटरी श्री. डी. व्ही. प्रधान यांनी गेल्या वार्षिक सभेचा अहवाल वाचून दाखविला. तो मंजूर केल्यानंतर संघाचा वार्षिक छापलेला अहवाल वाचण्यात आला. त्याला संघाचे उपाध्यक्ष श्री. इझीकेल यांनी अनुमोदन दिल्यानंतर अहवाल सर्वानुमते मंजूर करण्यात आला.

नंतर म्युनिसीपल कामगारांची राहाण्याची सोय उत्तम व्हावी म्हणून म्युनिसीपालिटीने जास्त चाळी बांधाव्या या आशयाचा ठराव प्रिं. एम. व्ही. दोंदे यांनी मांडला. त्याला श्री. मडकेबुवा यांनी अनुमोदन दिल्यावर ठराव सर्वानुमते पास करण्यात आला.

सध्याच्या महागाईच्या काळात म्युनिसीपल कामगारांना महागाई भत्ता देण्यात यावा या आशयाचा दुसरा ठराव श्री. टी. एस. तासकर यांनी मांडला. त्याला श्री. वाडेकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर तो पास करण्यात आला.

आणखी दोन ठराव पास करण्यात आले.

तद्नंतर पुढील वर्षाकरिता कार्यकारी मंडळ निवडण्यात आले. शेवटी डॉ. बाबासाहेब टाळयांच्या कडकडाटात भाषण करण्यास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

म्युनिसीपल कामगार संघाच्या अहवालाचे वाचन झाल्यानंतर तुम्हाला काही सांगावे अशी माझी इच्छाच नव्हती. संघाच्या छापलेल्या अहवालावरून, संघ उत्तमप्रकारे चालला आहे, अशी कोणाचीही खात्री झाल्याशिवाय राहणार नाही. १९३८ आणि १९४० सालच्या संघाच्या सभासदांच्या संख्येकडे जर पाहिले तर १९३८ साली सभासदांची संख्या २ हजारांच्या घरात होती पण तीच संख्या १९४० साली पाच हजारांच्या घरात गेलेली आहे.

---

जनता : १९ जुलै, १९४१.

म्युनिसीपल कामगार संघासारखे संघ, मुंबईमध्ये कमी आहेत असे नाही. श्री. निमकरांचा संघ, टेक्स्टाईल युनियन वगैरे वगैरे. त्या संघाची आणि आपल्या संघाची तुलना जर केली, तर ते संघ आपल्या या म्युनिसीपल संघाच्या पासंगालाही पुरणार नाहीत. त्या संघाच्या पुढाऱ्यांचे कार्य, मी १९१९ पासून ते १९४१ पर्यंत पहात आलेलो आहे. त्यांनी कामगार लोकांचा थोडा देखील फायदा केलेला नाहीच, उलट नाश मात्र केलेला आहे. या लोकांनी एकंदर ३०-४० संप केले असतील, परंतु त्यातला एकही संप यशस्वी झालेला नाही. नुकत्याच गेल्या वर्षी गिरणी कामगारांचा संप त्या लोकांनी घडवून आणिला. तो कसा तरी ३-४ आठवडे चालविला, शेवटी कामगारांच्या पदरात एक पै देखील न पडता संपाचे तीन-तेरा वाजले. ही गोष्ट आपणापैकी बऱ्याच जणास माहित असेल.

त्याउलट आम्ही २ वर्षापूर्वी फक्त एकच संप तुम्हास करावयास लावला आणि त्याला इतक्या थोड्या अवधीत यश आले की, मुंबई म्युनिसीपालिटी अपल्याला शरण आली आणि आपल्या कामगारांच्या सर्व अटी वगैरे मान्य करून त्यांना पगारही वाढविले.

यावरून म्युनिसीपल कामगार संघाला कोणीही नावे ठेवणार नाही. या माझ्या म्हणण्याबद्दल कोणाला संशय असेल तर त्यांनी मुंबई सरकारचे लेबर गॅझेट पहावे. सरकार प्रत्येक संघाची व युनियनची मधून मधून तपासणी करीत असते व नंतर लेबर गॅझेटमध्ये नमूद करीत असते. म्युनिसीपल कामगार संघाबद्दल ' म्युनिसिपल कामगार संघासारखा व्यवस्थित असा कोणताही संघ अथवा युनियन चालत नाही. ' असा शेरा सरकारने दिलेला आहे.

या संघाकडून जी कामे होण्याची राहिलेली आहेत त्याबद्दल संघात काम करणाऱ्या मंडळींना कोणताही दोष देता येणार नाही. संघाचे काम करणारी माणसे अगदी कर्तबगार आहेत याबद्दल मला शंका नाही. त्याबद्दल मला जर कोणाला दोष द्यावासा वाटत असेल तर तो संघाच्या सभासदांना. संघात काम करणारी माणसे त्यांच्या स्वतःच्या जोरावर काहीही करू शकणार नाहीत. त्यांना तुम्हा सर्वांची मदत पाहिजे आहे आणि असे झाले तरच संघाला यश येईल. संघात काम करावयास तुम्हाला चांगली माणसे लाभलेली आहेत आणि तुम्ही जर एकीने राहाणार नाही तर मोठे दुर्दैव असेच मला म्हणावे लागेल.

मी या सभेत तुम्हाला उपदेश करतो याचा अर्थ असा नाही की, तुम्ही आणि तुमच्या मुलांनी व मुलींनी तुम्ही जे काम करीत आहात तेच काम सतत करावे. तुम्ही जे काम करता ते फार घाण आहे परंतु सध्याच्या वाईट परिस्थितीत चोऱ्या, दरोडे इत्यादि गोष्टी करण्यापेक्षा हे काम बरे असे मला

वाटते. परंतु तुम्ही तुमच्या मुलांना व मुलींना शिक्षण देऊन तुम्ही जे काम करता त्या कामात त्यांना पडू न देण्याची खबरदारी घ्या. तुम्ही हे इतके घाणीचे काम करता तेच काम दुसऱ्या जातीच्या लोकांना कितीही पैसा दिला तरी ते काम करणार नाहीत. असे असताना या घाणेरड्या कामाचा मोबदला तुम्हाला चांगला तरी मिळतो का ? तुम्ही जर हे काम करण्याचे नाकारले तर मुंबईत राहाणारे लोक कॉलराने व इतर रोगांनी पटापट मेल्याशिवाय राहाणार नाहीत. मुंबईची किल्ली तुमच्या हातात आहे. तुमच्याकरिता दुसऱ्याने काहीही करण्याची जरुरी नाही. तुम्ही तुमचे भले करू शकाल एवढे सामर्थ्य तुमच्यात आहे. या गोष्टीची तुम्हाला जाणीव झाली तर सगळ्या गोष्टी सुरळीतपणे चालतील. त्याकरिता तुम्ही तुमच्यात एकी ठेवली पाहिजे. चेंबूर कचरापट्टी येथे काही भानगड झालेली आहे असे मी ऐकतो. तेथे इतर लोक तुमच्यात बेकी करण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या त्या कपटनितींना भुलाल तर भुलून गेलेले लोक फसल्याशिवाय राहाणार नाहीत. एकीच्या बळावर तुम्हाला वाटेल ते करता येईल. मुंबईतील ड्रेनेज खात्यातील लोकांनी जर संप केला आणि चेंबूरच्या लोकांनी त्यांना सहाय्य केले तर म्युनिसीपल कमिशनर तुमच्यापुढे धावत आल्याशिवाय राहाणार नाही. तुमच्या ह्या सामर्थ्याच्या जोरावर हिंदू-मुसलमानांच्या तीन महिन्यांच्या दंग्यात जितका हाःहाःकार झाला त्याच्यापेक्षा जास्त हाःहाःकार तुम्ही एक आठवड्याच्या संपाने करू शकाल. परंतु त्याकरिता तुमच्यात एकी असणे अत्यंत जरुरीचे आहे.

म्युनिसीपल संघाच्या चार आणे वर्गणीसाठी काही लोकांकडे १० वेळा जावे लागते ही नामुष्कीची गोष्ट आहे. पगाराच्या दिवशी पान, बिडी, सिनेमा वगैरे चैनीसाठी तुम्हाला पैसे मिळतात आणि संघाच्या वर्गणीसाठी ४ आणे मिळू नये ? परंतु तुम्हाला मी निक्षून सांगतो की, जो कोणी दुसऱ्यांना जाऊन मिळेल आणि तुमच्यात फाटाफूट करील त्याला पूर्वी ज्याप्रमाणे एखाद्या माणसाने जातीचा गुन्हा केला असताना त्याला वाळीत टाकण्यात येत होते त्याचप्रमाणे या बाबतीतही करावे असे सांगण्यास मी मागेपुढे पहाणार नाही. हे तुम्ही पक्के लक्षात ठेवा. तुमच्यात एकी असल्यावर तुमच्या गैरसोयी दूर करण्यासाठी तुम्हास दुसऱ्याजवळ याचना करण्याची जरुरी नाही. चेंबूर कचरापट्टी येथे आतापर्यंत चांगले काम चालले होते. तेथील लोकांची एकी वाखाणण्याजोगी होती. परंतु तेथील अधिकारी लोकांनी काही लोकांना आमिष दाखवून तेथील लोकात फाटाफूट करण्याचा प्रयत्न चालविला आहे. त्याचा बंदोबस्त आम्ही करणार आहोतच. परंतु तुमच्यात जिल्ह्या-जिल्ह्याचे जे भेद काही लोक पाडण्याचा प्रयत्न करीत आहेत त्याबद्दल मला तुम्हाला सांगावेसे वाटते. हे म्युनिसीपल कामगारांकरताच आहे असे नसून ते सर्वसाधारण अस्पृश्य मानलेल्या लोकांकरता आहे.

काही वर्षापूर्वी आपल्या समाजाला राजकारणात काहीही स्थान नव्हते, परंतु आता आपला पक्ष कॉंग्रेस व मुस्लिम लीग या राजकीय पक्षाबरोबरचा झालेला आहे. त्यांना जे महत्त्व ते आपल्या पक्षाला आहे. हा कशाचा परिणाम ? आमच्यातील एकजुटीचा. त्याचप्रमाणे या म्युनिसीपल संघात हे असले भेद असता कामा नयेत. म्युनिसीपल अधिकाऱ्यांना म्युनिसीपल कामगार संघाचे फार वावडे होऊन बसले आहे. त्यांना हा संघ नको आहे. या संघामुळे त्यांना पैसे, लाचलुचपत खाता येत नाही म्हणून हे अधिकारी फोडा आणि झोडा या भेदनितीचा अवलंब करीत आहेत. म्हणून वेळीच सावध होऊन तुम्ही जर या जिल्ह्यांचा भेद नाहीसा कराल तरच तुमचा फायदा होईल.

महार जात येथून तेथून सारखी आहे. कुठलाही महार कुठल्याही महाराच्या पंक्तीला जेवतो. त्याला कोणत्याही प्रकारे वाईट वाटत नसते. ज्याप्रमाणे कोणत्याही प्रांताचा मुसलमान बिसमिल्ला म्हणाला की, कुठल्याही दुसऱ्या प्रांताच्या मुसलमानाबरोबर जेवतो त्याचप्रमाणे महार जातीचे आहे. म्हणून जे लोक हा नाशिकचा, हा सातारचा, हा नगरचा असा भेद करून आपल्यातील एकी फोडण्याचा प्रयत्न करतील तर सर्वांचे नुकसान झाल्याशिवाय राहाणार नाही.

युरोप देशाकडे पहा. युरोपातील राष्ट्रे स्वतंत्रपणे पृथक पृथकपणे असल्यामुळे त्यांना हिटलरने पादाक्रांत केले. परंतु या सर्व राष्ट्रांनी एकी केली असती तर त्यांनी जर्मनीचा कधीच नाश करून टाकला असता. तुम्ही तुमच्यात एकी ठेवली तरच आम्हाला तुमच्याकरिता भांडता येईल, नाही तर आमच्या हातून काहीही होणार नाही. आमच्या पायाखालील मातीच जर ढासळली तर काय करणार ! म्हणून तुम्ही सर्वांनी एकोप्याने राहून म्युनिसीपल संघाचे बळ वाढवा एवढी मी तुम्हास विनंती करतो.

नंतर डॉ. बाबासाहेबांनी जमलेल्या लोकास, मुंबई विधिमंडळाच्या यादीत आपापली नावे नोंदविण्यविषयी सूचना दिली व आपले भाषण संपविले.



# इंग्रज सरकारने आमच्यासाठी काय केले ?

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली, गेल्या वर्षी डिसेंबरमध्ये हरेगाव मुक्कामी भरलेल्या मुंबई इलाखा वतनदार महार, मांग, वेठिया परिषदेच्या ठरावानुसार डॉ. साहेबांनी मुंबईचे गव्हर्नर यांच्याकडे एक विस्तृत आणि विद्वत्ताप्रचुर खलिता पाठवून, सरकारने बेकायदेशीररीत्या अस्पृश्य वर्गावर लादलेल्या जादा जुडीच्या बाबतचे आपले धोरण बदलावे अशी विनंती केली होती. परंतु सरकारने आपले धोरण अद्याप बदलले तर नाहीच, पण सिन्नर तालुक्यामध्ये काही वतनदारांवर खटले भरण्यापर्यंत सरकारी धोरणाची मर्यादा गेली आहे. अस्पृश्य समाजात तीव्र असंतोष पसरून, हरेगाव परिषदेच्या धोरणानुसारच सरकारच्या या अन्यायी धोरणाचा प्रतिकार करण्याबाबत निर्वाणीचा विचारविनिमय करण्यासाठी मु. सिन्नर, जिल्हा नाशिक, येथे ता. १६ ऑगस्ट १९४१ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली वतनदार महार, मांग, वेठिया यांची प्रचंड सभा भरली होती.

सभेतील लोकसमुदाय सुमारे पंधरा हजारापर्यंत होता. नाशिक जिल्ह्यातील त्याचप्रमाणे नगर जिल्ह्याच्या पश्चिम भागातील सर्व वतनदार प्रचंड संख्येने हजर राहिले होते. अनेक कार्यकर्ते हजर होते, त्याचप्रमाणे आ. दादासाहेब उर्फ भाऊराव गायकवाड, नाशिक, आ. भोळे, पुणे, आ. डी. जी. जाधव, जळगाव, आ. पी. जे. रोहम, अहमदनगर, आ. बी. एच. वराळे, बेळगाव, आ. जे. एस. ऐदाळे, सोलापूर, आ. भाई चित्रे, रत्नागिरी, बाम्बे सेन्टीनलचे उपसंपादक मि. इझिकेल, श्री. वि. ना. बर्वे इत्यादी प्रमुख मंडळी उपस्थित होती. लोकसमुदाय अफाट होता म्हणून लाऊडस्पिकर्सची खास व्यवस्था करण्यात आली होती. मिरवणुकीनंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभामंडपामध्ये अध्यक्षस्थानी विराजमान झाले. सभेच्या कामास संध्याकाळी ५-३० वाजता सुरवात झाली. सुरवातीला शाहीररत्न रा. घेगडे यांचे पोवाडे व गायन झाले. नंतर सातारचे आमदार के. एस. सावंत आणि विजापूरचे आमदार आर. एस. काळे, यांनी सभेमध्ये होणाऱ्या निर्णयाला पाठिंबा देणाऱ्या तारा पाठविल्या होत्या त्या वाचून दाखविण्यात आल्या, त्याचप्रमाणे वडाळा (मुंबई) येथील नाशिक जिल्ह्यातील मंडळीनी सिन्नर सभेच्या निर्णयाला सर्वतोपरी पाठिंबा देण्याचा निश्चय केला आहे, हे शाहीररत्न के. अ. घेगडे यांनी जाहीर केले. नंतर डॉ. बाबासाहेब टाळयांच्या प्रचंड कडकडाटामध्ये आणि

---

जनता : २३ ऑगस्ट १९४१.

जयघोषामध्ये बोलावयास उभे राहिले. बाबासाहेब म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुंनो !

आजची ही सभा का भरविण्यात आली, हे आपणा सर्वास माहीत आहे. गेल्या वर्ष दीड वर्षापासून सरकारने आपल्या वतनासंबंधाने अन्यायाचे धोरण अंगिकारले आहे. महार, मांग, वेठिया या वतनदारांच्या ज्या जमिनी वंशपरंपरा त्यांच्या ताब्यात आहेत त्या जमिनीवर त्यांची सर्व उपजीविका अवलंबून आहे. त्या वतनी जमिनीवर सरकार जादा जुडी लादीत आहे. नाशिक जिल्ह्यामध्ये सरकार ही नवीन लादलेली जुडी वसूल करीत आहे. माझ्या माहितीवरून, १९३९ साली सरकारला या नवीन धोरणामुळे १,५०० किंवा २,००० रुपये अधिक मिळाले. सन १९४० साली ही वाढ ५,००० रुपये झाली आहे. या सरकारी अन्यायी धोरणाविरूद्ध लोकमत जागृत करून गेल्या साली हरेगाव मुक्कामी मुंबई इलाखा महार, मांग, वेठिया वगैरे अस्पृश्य वतनदारांची परिषद माझ्या अध्यक्षतेखाली भरली होती. त्या परिषदेने असा ठराव पास केला होता की जादा जुडीच्या अन्यायी धोरणाबाबत सरकारकडे खलिता सादर करण्यात यावा. तो खलिता मान्य न झाला तर सरकारी कामावर बहिष्कार घालावा किंवा इतर कोणता तरी प्रतिकारात्मक मार्ग स्वीकारावा. परिषदेचा अध्यक्ष या नात्याने मी त्या ठरावाचा खलिता ना. गव्हर्नरांकडे पाठविला. त्याच्यावर विचार चालू आहे, असे मला सरकारकडून उत्तर आले. परंतु इतका अवधी लोटला तरी अद्याप सरकारी धोरणात बदल झालेला नाही. उलट मी तर असे ऐकतो की या जिल्ह्याप्रमाणे सिन्नर तालुक्यात काही ठिकाणी सरकारने महार वतनदारांवर दिवाणी दावे केले आहेत. जादा जुडीच्या वसुलीसाठी पोलिसांनी मालमत्ता जप्त करण्याचा प्रयत्न केला. पुरेशा मालमत्तेच्या अभावी जनावरे जप्त करण्याचा व त्याही अभावी घरे जप्त करण्याचा प्रयत्न केला. सरकारच्या या धोरणाबाबत लोकांमध्ये असंतोष उत्पन्न करणारावरही कायदेशीर इलाज योजण्याचा सरकारचा विचार आहे.

सरकारचे हे धोरण अत्यंत अन्यायी असे आहे. त्यास न्यायाचा किंवा नितीचा मुळीच आधार नाही. या अन्यायी धोरणाच्या प्रतिकारासाठी आपण आता सिद्ध झाले पाहिजे.

वतन पद्धत ही नवीन नसून ती फार जुनी आहे. ही पद्धत हिंदुंच्या राज्यापासून सुरू आहे. इंग्रजांची सत्ता येथे प्रस्थापित झाल्यावर त्यांनी आपल्या सोयीनुसार या वतन हक्कांमध्ये फेरफार केले. महार, मांग, वेठिया वगैरे लोकांप्रमाणेच येथे इतर वतनदार आहेत. परंतु इतरांच्या बाबतीत सरकारने जी न्याय्यबुद्धी दाखविली ती आपल्या बाबतीत दाखविली नाही. या अन्यायाची आपणास कल्पना यावी म्हणून मी आपणास दोन चार उदाहरणे सांगतो.

पेशवाईत इनामदारांचा एक वर्ग होता. या वर्गाला सरकारमधून वर्षासन मिळत असे. त्यांना उद्योगधंदा काही नसे. त्याचप्रमाणे देवस्थानातील पुजाऱ्यांनाही वतने होती. पेशवाई जाऊन इंग्रजी सत्ता येथे आल्यावर सरकारने या वतनाबाबत काय केले ? ज्यांना पेशवाईत इनाम मिळत होते त्यांच्या वतनाला सरकारने मुळीसुद्धा धक्का लावला नाही. या लोकांचा सरकारला काडीचाही उपयोग नसताना सरकारने ६,१५,६४९ रुपये इतक्या साऱ्याच्या जमीनी या इनामदार वर्गाकडे ठेविल्या आहेत.

दुसरा वतनदार वर्ग म्हणजे सरंजाम लोकांचा होय. या लोकांना पेशव्यांनी उत्पन्न दिलेले असे. हे लोक त्या पैशावर आपल्या पदरी सैन्य बाळगीत आणि पेशव्यावर काही प्रसंग गुदरला म्हणजे किंवा लढाईमध्ये हे सैन्य पेशव्याच्या मदतीला देत असत. परंतु इंग्रजांचे लष्करी धोरण अगदीच वेगळे आहे. सैन्याच्या बाबतीत त्यांचे परावलंबी धोरण नव्हते. हे सरकार स्वखर्चाने सैन्य बाळगते. अर्थातच पेशवेकाळचे सरंजामी लोक कुचकामी ठरले, सरकारला त्याचा काही एक उपयोग उरला नाही. तथापि, सरकारने त्यांच्या वतनाला हात लावला नाही. या सरंजामी लोकांना घर बसल्या सरकारी तिजोरीतून २,६७,५०० रुपये इतके पेन्शन दिले जाते.

सरंजामदार, पुजारी यांच्याप्रमाणेच पेशवाईमध्ये देशमुख, देशपांडे हे नोकरीला असत. परंतु ही वतने वारसाहक्काने चालत असल्याकारणाने सरकारला नको होती. मामलेदाराची जागा त्याच्या मुलाला लायकी नसताना दिली तर राज्यकारभारामध्ये घोटाळा उत्पन्न होईल म्हणून पगारी मामलेदार नेमण्यात आले. पूर्वीच्या देशमुख-देशपांड्यांचा सरकारला काही उपयोग नाही. परंतु आश्चर्याची गोष्ट ही की त्यांच्याकडे असलेल्या जमीनी काढून घेण्यात आल्या नाहीत. त्या त्यांच्याकडेच ठेवल्या. इतकेच काय पण सरकार त्यांच्याकडून ८,१४,५४५ रुपये इतक्या साऱ्याऐवजी फक्त २ लाख रुपये सारा घेते.

तुमच्याप्रमाणेच पूर्वीच्याकाळी लोहार, सुतार, परीट, न्हावी इत्यादी बारा बलुतेदार काम करीत असत. परंतु १८६३ साली सरकारने या लोकांना नोकरीतून मुक्त केले. त्यांची वतने सरकारने त्यांना बहाल केली. त्यांच्या जमिनी त्यांना बहाल केल्या. हल्ली असलेल्या तलाठ्यांच्या ऐवजी पूर्वी वतनदार कुळकर्णी होते. सरकारने कुळकर्ण्यांचे वतन खालसा करून पगारी तलाठी नेमले. कुळकर्ण्यांचे वतन खालसा केले तरी त्यांच्याकडे असलेल्या जमीनी पूर्वीच्या अल्प जुडीइतक्या साऱ्यावर त्यांना बहाल केल्या. इतकेच नव्हे तर काही एक सरकारी काम न करता त्यांना पूर्वीप्रमाणे

पोटगीही मिळते ! आमच्याप्रमाणे इतर जे वतनदार होते त्यांना सरकारने असे न्याय्य आणि उदारबुद्धीने वागविले. मग आम्हालाच असे का वागविले ? सरकार २,००,००० रुपये या घरबशा लोकांना फुकट देते आणि जे बिचारे महार, मांग आणि वेठिया उन्हातान्हाची पर्वा न करता दिवसाचे चोवीसही तास सरकारी कामासाठी राबतात त्यांच्यावरच इतका अन्याय आणि जुलूम का, असा माझा सरकारला आव्हानपूर्वक सवाल आहे.

गेल्या दहा-पंधरा वर्षापासून तो आतापर्यंत माझा कटाक्ष स्पृश्य हिंदू आणि काँग्रेस इत्यादी या देशातील लोकांविरुद्ध होता. आजपर्यंत हिंदू धर्म आणि हिंदू समाज यांच्यावर मी हल्ले चढवीत होतो. परंतु सरकारला मी खात्रीपूर्वक सांगू इच्छितो की जितक्या निकराने मी हिन्दू समाजावर हल्ले चढविले त्याच्या शतपटीने तीव्र हल्ले सरकारविरुद्ध चढवीन. मी केव्हाही सरकारविरूद्ध बोलत नसे म्हणून माझ्यावर अनेक जण सरकारनिष्ठ, देशद्रोही, जातीनिष्ठ असे आरोप करीत असतात. परंतु आपणा सर्वांना ही गोष्ट कबूल करावी लागेल की कोणी कितीही प्रबळ असला तरी चोहोबाजूस शत्रूवर हल्ला करू शकणार नाही. केव्हाही मी एकेका शत्रूवर हल्ला चढवून त्यांना आटोक्यात आणण्याचा प्रयत्न करीत होतो. याच धोरणाने मी आजपर्यंतचा लढा लढवीत आलो आहे. परंतु ज्या सरकारशी आम्ही पूर्ण इमानाने वागलो ते सरकारच आता आमच्यावर उलटले आहे ! वास्तविक, या देशामध्ये इंग्रजांचे राज्य आम्ही आणले, हे ऐतिहासिक सत्य आहे. इंग्रजांच्या बाजूने रक्त सांडून पेशवाईचा अंत आम्ही केला. १८१८ साली पेशवाईचा संपूर्ण अंत झाला. यासाली खर्ड्याच्या निर्णयात्मक लढाईमध्ये इंग्रजांना विजय मिळाला तो केवळ महार वीरांच्या सहाय्यामुळेच होय. याची साक्ष कोरेगाव येथे उभारलेला विजयस्तंभ देऊ शकेल. त्या विजय स्तंभावर दोन नावे इंग्रजांची, चार पुरभय्याची आणि बाकीची सर्व नावे महार वीरांचीच आहेत !

ज्यांना आम्ही राज्य मिळवून दिले तेच आता आम्हावर लाथा झाडण्यास सिद्ध झाले आहेत. आम्ही मिळवून दिलेल्या इंग्रजी राज्यात आमचा काही फायदा होण्याऐवजी उच्च वर्णीयांचाच फायदा झाला आहे. तुम्ही वाटेल त्या सरकारी ऑफिसमध्ये जाऊन पाहा. तुम्हाला हाच अनुभव येईल. सरकारने स्पृश्य हिंदुंकडे लक्ष दिले, मुसलमानांच्या वाटेल त्या मागण्यास मान्यता देऊन त्यांना हिंदूंच्या इतके राजकीय महत्त्व दिले पण आपणाकरता काय केले ? गेल्या दीडशे वर्षाच्या आमदानीत ब्रिटिश सरकारने अस्पृश्य समाजासाठी काय केले, याचे उत्तर सरकारने दिले पाहिजे.

आज आपणासमोर किती बिकट परिस्थिती उभी राहिली आहे ? पूर्वी गावात किंवा खळयावर पोटापाण्यासाठी थोडेतरी मिळत असे, पण आपण उभारलेल्या चळवळीमुळे ते आता सारे बंद झाले आहे. सरकार अंमलदारासाठी आपली तिजोरी उघडी करू शकते पण आपणाला मात्र एक रुपयासुद्धा द्यावयास तयार नाही. इतकेच नाही तर आमच्या तोंडात असलेला घास काढू पाहात आहे, परंतु सरकारचे वाटेल ते आव्हान स्वीकारण्यास मी तयार आहे. मी सरकारला आव्हानपूर्वक बजावतो की तुम्ही वाटेल तो उपाय योजिला तरी जादाजुडीविषयी अंमलात आलेल्या धोरणाचा मी तितक्याच निकराने प्रतिकार केल्याखेरीज राहाणार नाही.

मी आजपर्यंत सरकारविरुद्ध वागलो नाही. मी कॉंग्रेसला मिळून त्यांच्या लढ्यात सामील झालो नाही किंवा कोणत्याही दंग्यात भाग घेतला नाही. या देशामध्ये शांतता राखण्याचा माझ्याइतका प्रयत्न कोणीही केला नसेल. परंतु सरकारला त्याची जाणीव राहिली नाही. आज सरकारला आपण नको आहोत, हिंदुंना नको आहोत, मुसलमान डोक्यावर बसले तरी चालतात. इंग्रजांना जो नेहमी सतावीत राहील त्याला मात्र सरकार नमते. आपण इतके दिवस जो खोटा विश्वास इंग्रज सरकारबद्दल धरला होता त्यावर आज तिलांजली दिली पाहिजे. हा एक लढा, संग्राम आहे. मी पाठविलेल्या खलित्याचे उत्तर सरकार देऊ शकणार नाही. कारण मी मांडलेली बाजू न्याय्य आणि सत्य आहे. मला सरकारला असे सांगावयाचे आहे की आमचे मागणे अमान्य करावयाचे असेल तर त्याचा परिणाम फार विघातक होणार आहे. आमची मागणी अगदी साधी आहे आणि तीही पोटाच्या प्रश्नाची आहे. आमची मागणी ही आहे की ज्याप्रमाणे इतर वतनदारांना जमिनी देऊन त्यांना वतनदारीतून मुक्त केले त्याचप्रमाणे आम्हालाही आमच्या जमिनी देऊन वतनदारीतून मुक्त करा. इतर वतनदार काही एक कामे न करता आयते खातात त्याचप्रमाणे आम्ही मागत नाही. हे जर सरकारला मान्य नसेल तर कायदे कौन्सिल भरल्यावर स्पृश्य हिंदुंचे प्रतिनिधी आणि आमचे प्रतिनिधी यांच्यावतीने आम्ही हा प्रश्न आपसात सोडवू. परंतु तिकडेही सरकारने लुडबूड करण्याचा जर प्रयत्न केला तर त्याचा प्रतिकार केल्याखेरीज आम्ही राहाणार नाही.

आपला प्रतिकार कसा असेल हे आजच काही सांगता येणे शक्य नाही. कारण ते सर्वस्वी सरकारवर अवलंबून आहे. सरकार जे धोरण स्वीकारील त्या दिशेने आपणाला प्रतिकाराचे स्वरूप ठरवावे लागेल. ते काहीही झाले, तुमच्या प्राणावर बेतले तरी तुम्ही आपल्या जमीनी सोडू नका. भाऊराव गायकवाडांना कधी अटक होईल ते सांगता येत नाही. त्यांना आता अटक झाली तरी ती आनंदाची गोष्ट आहे. त्यांची जागा भरून काढण्यास अनेक लोक सिद्ध

आहेत. या पुढारी लोकांच्या अटकेनंतर सरकार तुमच्यावर फिर्याद करील. पोलीस आणील, तथापि, कोणीही डगमगता कामा नये. घरावर जप्ती आली तर प्रतिकार करा. सामान नेऊ देऊ नका. जमीनी खालसा केल्या तर कुटुंबासहित शेतावर झोपड्या बांधून राहा. पोलिसांनी गोळीबार केला तरी शेतातून हटू नका. एखादे कुटुंब तुरुंगात गेले तर त्याच्या इतर नातलगांनी ती जागा भरून काढून सरकारचा प्रतिकार केला पाहिजे.

या लढ्यामध्ये आपणास कोणी साहाय्य करणार नाही. तो आपण स्वसामर्थ्यावर लढवावयाचा आहे. इतरांचे साहाय्य नसेल तरी ही गोष्ट आपण पणास लावलीच पाहिजे. मी वापरलेल्या भाषेवरून माझ्या मनामध्ये सरकारविरूद्ध किती असंतोष उत्पन्न झाला आहे याची आपणास कल्पना येईल. सरकारच्या या अन्यायी धोरणाला इतरत्र तोड नाही. बार्डोलीला काँग्रेसने सरकारी शेतसारा देण्याचे साफ नाकारले. त्यावेळी सरकार काँग्रेसला सरळ शरण गेले आणि काँग्रेसच्या कमिशनने ठरविलेला सारा मान्य केला. काँग्रेसला पैसा-बळ आणि माणूस-बळ यांची काही उणीव नव्हती. आपली त्या दोन्ही दृष्टीने बाजू कमी आहे. तथापि, न्याय आणि नीती आपल्या बाजूला आहे, हे लक्षात असू द्या. शेवटी आपल्या न्याय्य बाजूचाच विजय झाल्याशिवाय राहणार नाही.

● ● ●

## १९१

# इंग्रजांना वाचविण्यात यावे म्हणून नाही तर आपल्या घराची राख रांगोळी होऊ नये म्हणून . . .

गेले महायुद्ध बंद झाल्यापासून महार लोकांना पलटणीमध्ये घेण्यात येत नव्हते. परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रदीर्घ प्रयत्नामुळे येत्या ऑक्टोबर महिन्यापासून महार लोकांच्या दोन पलटणी उभारण्याचे हिंदुस्थान सरकारने ठरविले आहे. त्यानुसार महार तरुणांनी या संधीचा फायदा घ्यावा आणि पलटणीमध्ये भरती व्हावे म्हणून बुधवार, तारीख २४ सप्टेंबर १९४१ रोजी रात्रौ ९ वाजता आर. एम. भट हायस्कूल परेल येथे जाहीर सभा घेण्यात आली होती. सभेत इतका जनसमुदाय लोटला होता की, हॉल व गच्ची भरून बाहेर देखील लोकांना ताटकळत उभे राहावे लागले.

बरोबर सव्वा नऊच्या सुमारास डॉ. बाबासाहेब आंबेडकर सभास्थानी आले. त्यावेळी बाबासाहेबांच्या जयघोषात व टाळयांच्या कडकडाटात वातावरण दुमदुमून गेले. नंतर ' जनता ' पत्राचे मॅनेजर श्री. के. व्ही. सवादकर यांनी सभेचे प्रयोजन काय वगैरे जनसमुदायास सांगून बाबासाहेबांना बोलण्यास विनंती केली.

बाबासाहेब टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उठले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

सद्‌गृहस्थहो !

आजच्या या तातडीने बोलाविलेल्या सभेचा मुख्य हेतू हिंदुस्थान सरकारने आपल्या समाजाकरिता ज्या दोन बटालियन्स उभारलेल्या आहेत त्याबद्दल मी आपणास माहिती सांगावी असाच आहे. १९३२ साली १११ वी महार पलटण उभारण्यात आली होती. त्या पलटणीतील शिपायांनी गेल्या महायुद्धात महार समाजाचे क्षात्रतेज लोकास दाखवून दिले होते. परंतु महायुद्ध संपल्यानंतर सरकारने ही पलटण कमी केली. त्यानंतर पलटणीमध्ये भरती व्हावे म्हणून बऱ्याच महार तरुणांनी अर्ज केलेले होते. परंतु त्यांना पलटणीत घेण्यात येत नव्हते. चालू असलेले हे युध्द झाल्यानंतर सरकारने अस्पृश्य लोकांचे कामगार पथक (Labour Corps) उभारण्याची योजना पुढे आणली. याबाबतीत ज्यावेळेस मला विचारणा करण्यात आली त्यावेळेस मी सरकारला सांगितले की, तुम्ही ज्याअर्थी अस्पृश्यांना पलटणीत घेत नाही, त्याअर्थी आमचे लोक तुमच्या या कामगार पथकामध्ये भाग घेणार नाहीत. तुम्हाला कामगार पथकात आमची

---

जनता : २७ सप्टेंबर, १९४१.

माणसे पाहिजे असतील तर अगोदर आमच्या माणसांना पलटणीत सामील करून घ्या. माझ्या सांगण्याचा सरकारच्या मनावर परिणाम झाला व आपली एक पलटण उभारण्याचे सरकारने निश्चित केले. आणखी दुसरीही एक पलटण उभारण्याचे आश्वासन मला देण्यात आले आहे. त्याचप्रमाणे मी त्यांना असेही सांगितले होते की, पलटणीतील महारलोक शिपाई व त्यांच्यावरचे अधिकारी इतर वरच्या जातीचे असता कामा नये. तर अधिकारी देखील महारांचेच पाहिजेत. याही माझ्या म्हणण्याला सरकारने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार आपले लोक जमेदार, सुभेदार याच हुद्यावर घेतले जातील असे नसून लेफ्टनंट सारख्या हुद्यावर देखील घेतले जातील, येथपर्यंत ही गोष्ट येऊन ठेपलेली आहे. गेल्या शनिवारी माझी व ना. गव्हर्नरांची मुलाखत झाली. तेथे मला सांगण्यात आले की आतापर्यंत ६००-७०० अस्पृश्यांनी या नव्या पलटणीमध्ये नावे दिलेली आहेत. परंतु त्यांना वाणवा जर कशाची असेल तर अधिकाऱ्यांच्या जागा भरण्याकरिता आपल्यातील लायक उमेदवारांची. मला असेही सांगण्यात आले की, ज्याप्रमाणे आम्ही तुमच्या अटी मान्य केल्या, त्याचप्रमाणे अंमलदारांच्या जागा भरण्यासाठी तुमच्यातील लायक माणसे पुरविण्याचे कर्तव्य तुमचे आहे. म्हणून आपण अंमलदारांच्या जागेकरिता, दोन्हीही पलटणीकरिता लायक उमेदवार पाठविणे जरूरीचे आहे.

काही लोकांच्या मनात या पलटणी बाबत शंका उत्पन्न झाल्या आणि त्यांनी मला विचारले की, ' सरकारने व्हाइसरॉयच्या विस्तृत केलेल्या कार्यकारी मंडळात अस्पृश्यांचा एकही प्रतिनिधी घेतला नाही व त्याचप्रमाणे सरकारने महार वतनावर जुडी लादल्यामुळे हल्ली आपण या अन्यायाविरूद्ध चळवळ करीत आहोत मग त्याच सरकारला आपण लष्करात भरती होऊन मदत कशी करावयाची ? याच प्रश्नांची उत्तरे देण्याकरिता आजच्या सभेचा मुख्य हेतू आहे.

हल्ली हिंदुस्थानातील इतर समाजांची विचारसरणी कशी आहे ती मी तुम्हास सांगतो काँग्रेस म्हणते की, ज्याअर्थी इंग्रज लोक आपल्याला स्वराज्य देत नाहीत त्याअर्थी आपणही त्यांना मदत करू नये. याबाबत मी आपणास दोन गोष्टी सांगतो. त्यातली पहिली अशी की, समजा एका मनुष्याच्या मालकीचे घर आहे. त्यात मालकाला जबरदस्तीने बाहेर काढून एक माणूस शिरलेला आहे. दुसरा एक माणूस येऊन घरात गेलेल्या पहिल्या माणसाला बाहेर निघण्यास सांगत आहे व तो बाहेर निघत नाही असे पाहून त्या घराला आग लावील म्हणून धमकी देत आहे. तीच गोष्ट हल्ली झालेली आहे. आपण या देशाचे मालक आहोत व आपल्या देशात इंग्रज हे घुसलेले आहेत. ते येथून जावेत अशीच इतरांप्रमाणे आपली इच्छा आहे. जर हिटलर आला आणि इंग्रजांना म्हणू लागला की, तुम्ही या देशातून जा, नाहीतर या देशाची मी राख-रांगोळी करील. सांगा, तसे त्याने केले तर कोणाचे नुकसान होईल ? हे नुकसान इंग्रजांचे होणार नाही. तर या देशातील लोकांचे होणार आहे, हे तुम्ही पक्के लक्षात ठेवावयास पाहिजे.

या युद्धात इंग्रजांना मदत करा, असे जे मी सांगतो ते काय इंग्रजांना वाचविण्यात यावे म्हणून नाही तर आपल्या घराची राख रांगोळी होऊ नये म्हणून हे सांगतो.

दुसरी गोष्ट अशी की, लोक म्हणतात की, व्हाइसरॉयने डॉ. आंबेडकरांना आपल्या कार्यकारी मंडळात घेतले नाही, मग आपण पलटणीत कशाला भरती व्हायचे ? या बाबत मला असे सांगावयाचे आहे की, निकराचा लढा व रूसवा यात पुष्कळ अंतर आहे. होय ना ? आपला प्रतिनिधी कार्यकारी मंडळात घेतला नाही हा आपल्यावर अन्याय झालेला आहे हे मला कबूल आहे. त्याचप्रमाणे सरकारला देखील कबूल आहे. खुद्द ना. व्हाइसरॉयने माझ्या देखत हा अन्याय कबूल केलेला आहे. परंतु जर सरकार हमकरे सो कायदा या नीतिमत्तेचा अवलंब करू लागले व गर्वाने फुगून जाऊन आपल्याला म्हणू लागले की, जा वाटेल तशी चळवळ करा, आम्ही तुमच्याकरिता काहीही करणार नाही. तर आपण सरकारचे काय करू शकणार आहोत. आपल्याजवळ साधने देखील उपलब्ध नाहीत. अशा वेळी आपल्याला सरकारवर रूसून बसण्यापलिकडे काय साधन आहे ? मला माझ्या लहानपणाच्या एका प्रसंगाची आठवण झाली. आम्ही ३-४ भावंडे आमच्या आत्याकडे राहात असू. जेवणाच्या वेळेस याला जास्त, त्याला कमी यावरून आम्हा भावंडांच्या नेहमी तक्रारी होत असत. या असल्या भांडणात माझा पहिला नंबर असे. एकदा आमच्या आत्याने वांग्याचे कालवण केलेले होते. जेवणाच्या वेळी मला इतरांपेक्षा कमी वांग्याच्या फोडी मिळाल्या म्हणून मी तक्रार उपस्थित केली. त्या दिवशी मला काहीच मिळू द्यावयाचे नाही म्हणून माझ्या भावंडांनी चंग बांधला असल्यामुळे माझ्या तक्रारीचा काहीच फायदा झाला नाही. मला मात्र फार राग आला व मी जेवणावरून उठून रूसून बाहेर गेलो. माझ्या मागे मला ज्या वांग्याच्या फोडी मिळाल्या होत्या त्या देखील माझ्या भावंडांनी खाऊन टाकल्या. त्या दिवशी मला सबंध दिवस काहीच खावयास न मिळता उपाशी रहावे लागले. सांगावयाचा मतलब एवढाच की, दोन पक्ष जर शक्तितुल्य असले तरच भांडण योग्य होय. नाहीतर रूसून बसण्यात काही शहाणपणा आहे असे मला वाटत नाही. आपल्या जवळ काही अधिकार नाहीत. बोलण्यात आणि लढण्यात फार अंतर आहे. व्हाईसरॉयने अन्याय केलेला आहे यात जरी शंका नसली तरी रूसून एखाद्या झोपडीत बसून राहाण्यात काही फायदा नाही.

मुस्लिम लीग ही मुसलमानांची अगदी बलाढ्य अशी संस्था आहे. सर्प व मुंगूस यांचे जसे एकमेकात वैर असते त्याचप्रमाणे इंग्रजांचे व या संस्थेचे वैर आहे. असे जरी असले तरी मुसलमान लोक जे साधवून घेता येण्यासारखे आहे

ते साधवून घेत आहेत. लष्करात शेकडा ८० लोक मुसलमान आहेत, शेकडा ५० अंमलदार आहेत व शेकडा ८० ते ९० मिलिटरी कॉंट्रॅक्टर्स मुसलमान आहेत. अशी खरी वस्तुस्थिती आहे. मुसलमान लोक दांडगाई पेक्षा व्यवहाराकडे पहात असून ते वाहत्या नदीत हात धुवून घेत आहेत. मुसलमान लोकांनी जर ब्रिटिशांना नाही म्हटले तर ब्रिटिशांना त्यांची मनधरणी करावी लागेल. कारण मुसलमानांच्या हातात शक्ती आहे. तशी परिस्थिती आपली नाही. आपण सर्व दृष्टीने नाडलेलो आहोत. असे असताना देखील त्यांनी आपल्या अटी कशा मान्य केल्या याचेच मला आश्चर्य वाटते.

म्हणून कॉलेजामध्ये शिक्षण घेणारे व त्याचप्रमाणे इतर सुशिक्षित तरूणांनी उभारण्यात आलेल्या या दोन पलटणी मधील अंमलदारांच्या जागा पटकाविण्याकरिता पुढे झाले पाहिजे. सरकारने मला असेही आश्वासन दिलेले आहे की, जर यदाकदाचित युद्धानंतर या पलटणी मोडल्या तर पलटणीतील लोकांना सिव्हीलमध्ये चांगल्या नोकऱ्या देण्यात याव्यात याबद्दल तजवीज करण्यात येईल. तेव्हा तुम्हास सांगावयाचे की, एवढ्या सवलती आपल्याला प्राप्त झालेल्या आहेत. त्यांचा फायदा करून घेणे आपणावर अवलंबून आहे. जी शिकलेली माणसे आहेत त्यांच्यावर ही जबाबदारी आहे, हे विसरता कामा नये.

आपल्या तरूणांनी सावलीत बसण्याची प्रवृत्ती सोडून दिली पाहिजे. माझी देखील अशीच इच्छा होती की, सावलीत काम मिळावे. हल्ली सर्व लोक महाराविरूद्ध आहेत. इतर जातींच्या मनात मांगाविषयी, चांभाराविषयी, भंग्याविषयीं प्रेम आहे, परंतु महाराविषयी मात्र नाही. त्याचे कारण दुसरे तिसरे नसून मी आहे. इतर लोक मला पिशाच्च म्हणून समजतात आणि माझ्या भोवताली असलेल्या महारांना भुतावळ म्हणून मानतात. १९२६ पासून अस्पृश्यांच्या न्याय्य हक्काकरिता मी भांडत आहे. अस्पृश्यांना पोलिसमध्ये घ्यावे म्हणून मी सरकार जवळ भांडलो आणि त्याचा फायदा म्हणजे हल्ली २ चांभार व १ मांग सब-इन्स्पेक्टर्स आहेत. महार एकही नाही ! याचे कारण काय ? ज्या महार उमेदवारांना मुलाखतीस बोलविण्यात आले होते त्यांना तुम्ही डॉ. आंबेडकरांचे अनुयायी आहात का असे प्रश्न विचारण्यात आले. त्यांनी होय म्हटले, त्यांची निवड करण्यात आली नाही. आता पोलीस सब-इन्स्पेक्टरच्या जागेशी माझ्या अनुयायित्वाचा काय संबंध आहे ? त्याचप्रमाणे गेल्या महिन्यात आपल्या काही पदवीधरांना मामलेदारांच्या जागेकरिता मुलाखतीकरिता मध्य भागातील रेव्हेन्यू कमिश्नरने बोलाविले होते, त्यांना तेथे जुडीविषयी प्रश्न विचारण्यात आले. गेलेले तिघेही उमेदवार महारच असल्यामुळे एकाचीही निवड झाली नाही. पण मला या अधिकाऱ्यांना असे विचारावयाचे आहे की, जादा जुडीचा व उमेदवारांच्या मुलाखतीचा काय संबंध आहे ? आणि त्या जुडीबाबत योग्य उत्तरे मिळाली असताना देखील एकही महार उमेदवारला का

निवडू नये ? सारांश, महार जातीवर सर्वांचा फार कटाक्ष आहे. आपल्या समाजातील तरूणांना मामलेदार, सब-जज, डेप्युटी कलेक्टर होणे कठीण जाईल. परंतु २ वर्षे मिलीटरीत नोकरी केल्याने तुम्हाला मोठा अधिकारी होणे फारच सोपे जाईल यात मुळीच संशय नाही. म्हणून आपल्याला पुढे जर फायदा करून घ्यावयाचा असेल तर प्रथम काही दिवस त्रास सहन करणे जरूर आहे. टाकीचे घाव सहन केल्याशिवाय देवपण येत नसते हे लक्षात ठेवावे. म्हणून जे मॅट्रीकपर्यंत शिकलेले असतील, जे बी. ए. झालेले असतील त्यांनी या संधीचा फायदा घेणे अवश्य आहे.

या अंमलदारांच्या जागेकरिता आपण जर आपली माणसे पाठविली नाहीत तर त्या जागेवर इतर जातीचे अधिकारी नेमण्यात येतील. वरच्या जातीच्या लोकांच्या मनात आपल्याविषयी प्रेमभाव नाही हे मी आपणास सांगावयास पाहिजे अशातले नाही. आपल्याला ते माहीत आहेच. ते जर अधिकारी झाले तर आपल्या शिपायांच्या विरूद्ध वाटेल तसे खोटेनाटे रिपोर्ट करून, महार लोक लष्करामध्ये काम करण्यास नालायक आहेत असे सरकारच्या नजरेस आणून दिल्याशिवाय कधीही राहाणार नाहीत.

म्हणून आपल्यातील शिकलेल्या तरुणांना ही चांगली संधी आलेली आहे. कॉलेजचे शिक्षण संपल्यावर आपल्या तरुणांना ऑफिसामध्ये कारकुनाच्या नोकऱ्या कराव्या लागतात. त्यात त्यांना जास्त बढती मिळत नाही. मामलेदारांच्या जागेकरिता खेटा घालण्यापेक्षा २ वर्षे मिलीटरीमध्ये नोकरी केली तर त्या माणसाला भरपूर पगार मिळतो. युद्ध संपल्यानंतर सिव्हीलमध्ये ज्या काही वरीष्ठ नोकऱ्यांच्या जागेवर नेमणूका करतेवेळेस लढाईत नोकरी केलेल्या माणसास सवलती देण्यात येणार आहेत. आपल्या पलटणी मोडल्या तर हा प्रश्न उपस्थित होईल परंतु आपल्या या पलटणी युद्धानंतर देखील कायम राहातील असे आश्वासन मला सरकारकडून देण्यात आलेले आहे.

लढाईत नावे देण्यास लोक घाबरतात. परंतु सध्याच्या युद्धाच्या परिस्थितीकडे पाहिले तर युद्ध लवकरच संपेल असे अनुमान काढण्यात येत आहे. म्हणून ' करंड्यात असलेले कुंकू लेईल ती सौभाग्यवती व जी न लेईल ती रांडाव ' या म्हणीप्रमाणे आपल्या तरुणांनी या संधीचा फायदा अवश्य घ्यावा, एवढे सांगून मी माझे भाषण संपवितो.

तद्नंतर पुण्याचे श्री. पां. ना. राजभोज यांनी भाषण केले. त्यांनी आपल्या भाषणात सांगितले की, बाबासाहेबांच्या कर्तृत्वामुळे आपल्याला ही संधी मिळालेली आहे तरी सर्वांनी तिचा फायदा करून घेणे जरूर आहे, वगैरे.

नंतर डॉ. बाबासाहेबांच्या जयजयकारात सभा बरखास्त झाली.



## १९२

# आपल्या संरक्षणासाठी संरक्षक दले उभारा

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रस्थापित केलेल्या इमारत फंडास आर. आय. एन्. डॉकयार्ड फॅक्टरीतील मिल राईट शॉप मधील अस्पृश्य कामगारांतर्फे रविवार ता. ११ जानेवारी १९४२ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना १०१ रुपयांची थैली अर्पण करण्यात आली. सभेचे नियोजित अध्यक्ष-महाशय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आगमनाप्रसंगी सभास्थानी जमलेल्या प्रचंड जनसमूहाने टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात व त्यांच्या जयघोषात त्यांचे अपूर्व स्वागत केले. सभेस सुरवात श्री. बी. एस. गायकवाड यांनी केली. ते म्हणाले, या सभेचा विशेष असा की, माझे मित्र एल. एस. रोकडे, यांनी मिल राईट शॉप मधील आपल्या २०-२५ कामगार बंधुंच्या साह्याने ही अल्पशी थैली डॉ. बाबासाहेबांच्या इमारत फंडास अर्पण करण्याचा घाट घडवून आणला याबद्दल ते व त्यांचे अस्पृश्य कामगार बंधू अभिनंदनास पात्र आहेत. नंतर इमारत फंडाचे जनरल सेक्रेटरी श्रीयुत उपशाम मास्तर यांचे भाषण झाले.

डॉ. बाबासाहेबांच्या भाषणापूर्वी श्री. एल. एस. रोकडे यांनी बाबासाहेबांच्या इमारत फंडास १०१ रु. ची थैली अर्पण केली.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले,

बंधुंनो व भगिनींनो,

आज या ठिकाणी इमारत फंडाची सभा आहे म्हणून मी हजर राहिलो आहे. वास्तविक १०० रु. च्या थैलीकरिता प्रत्येक ठिकाणी हजर राहाण्याचे मी ठरविले तर मला माझे आयुष्यही पुरणार नाही. परंतु हे १०० रु. फक्त मिल राईट शॉपमधील अवघ्या २२ मुलांनीच जमा केले आहेत ही गोष्ट आनंदाची आहे. दुसरे कारण असे की डॉकयार्डमध्ये वाडिया खात्यात आपले ४० व इतर १०० कामगार आहेत. त्यांनी त्या कामास अद्याप हातभार लावलेला नाही. कदाचित मी सांगितले असता ही मंडळी इमारत फंडास मदत करतील असे मला सांगण्यात आल्यावरून मी या ठिकाणी हजर राहिलो आहे. या ठिकाणी ती माणसे हजर आहेत की नाही, हे मला माहीत नाही, परंतु जे

---

जनता : १७ जानेवारी १९४२.

हजर असतील त्या माणसांनी आपल्या इतर कामगारांना सांगून या मुलांनी घालून दिलेल्या उदाहरणाप्रमाणे इमारत फंडास मदत करावी, अशी मी त्यांना विनंती करतो.

इमारतीकरिता मी सांगितल्याप्रमाणे लाख सव्वालाख माणसानी दोन रुपये प्रमाणे देणगी दिली असती तर आता ती इमारत कदाचित् आपण प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलीही असती. इमारत फंड जमा होण्यास इतका अवधी लागावा यात काहीतरी संकेत असावा आणि मजजवळही इतके पैसे जमा झाले असते, तरी कदाचित् मी ही इमारत बांधली नसती. कारण हल्लीची युद्धजन्य परिस्थिती होय. लढाई युरोपच्या पश्चिमेच्या एका कोपऱ्यात सुरू झाली. ती आता पूर्वेस आपल्या दाराजवळ आली आहे. बॉंबच्या माऱ्याने इमारती, शहरे बेचिराख होत आहेत. अशावेळी आपली इमारत जर बॉंब हल्ल्यास बळी पडली तर असमर्थ अस्पृश्य समाजाला परत ती उभी करणे मुष्कील झाले असते. तथापि, रा. उपशाम मास्तर यांनी सांगितल्याप्रमाणे जागा तरी आपल्या मालकीची करून घेणे जरूर आहे.

लढाईमुळे माणसे विवंचनेत आहेत. अशी जरी परिस्थिती असली तरी आपण सर्व लोक लढाईत मरणार नाहीत, हे खास. काही मरतील तर काही जगतील. तेव्हा मेलेल्यांनी जगणाऱ्यांसाठी काहीतरी विचार करणे अगत्याचे आहे. लढाईत काय होईल ? असा अदूरदर्शीपणा करणे योग्य नाही.

दुसरी महत्त्वाची गोष्ट मला तुम्हाला सांगावयाची आहे. या सभेने मला ती सांगण्याची संधी दिली आहे. दुसरीकडे अशी संधी मला मिळाल्यास मी ती गोष्ट जरूर सांगेन. हल्ली चोहोकडे ' ब्लॅक आऊट ' आहे. जपानी विमाने घिरट्या घालीत आहेत. लढाई दाराजवळ आली आहे. अशा वेळी आपली बायकामुले तसेच निरूपयोगी माणसे आपापल्या गावी पाठवावे, हे बरे. सरकारी हुकूम मिळेपर्यंत थांबणे धोक्याचे आहे. पेट्रोल नियंत्रणामुळे तुम्हाला मोटार मिळणार नाही. ट्रेन्स (आगगाड्या) अशा किती उपयोगात आणता येतील याचा विचार करा. दुसरे असे की या शहरात पुष्कळ गुंड व बदमाश लोक दबा धरून आहेत. त्यांच्यापासून संरक्षण करण्याकरिता तुम्ही चाळीचाळीतून, प्रत्येक मोहोल्ल्यातून संरक्षक दले तयार करा आणि संघटनेने रहा.

शेवटी, या ठिकाणी आलेले मि. एफ. डब्ल्यू. शॉर्टलंड या साहेबांचे सभेच्यातर्फे अभिनंदन करावयाचे आहे. या साहेबांनी आपल्या २०-२२ माणसांना कामावर लावलेले आहे, असे मी ऐकतो. वास्तविक २८-२२ माणसांना कामाला लावणे म्हणजे मोठीच बाब आहे असे नाही. पण आपणाला नोकरीच्या बाबतीत

अतिशय वाईट अनुभव येतो. येथेच धोबीतलाव जवळ सैन्यात भरती करण्याचे रिक्रुटिंग ऑफिसरचे ऑफिस आहे. आपली दररोज काहीतरी दहापंधरा मुले भरतीसाठी जात असतात. तेव्हा कोणाची छाती कमी, कोणाचे वजनच कमी, कोणाचे काहीना काही तरी कमी असे सांगून त्यांना परत पाठवतात. उलट स्पृश्य तरूण कसाही असला तरी तो भरती झाल्यावाचून रहात नाही, असे दररोज मला सांगण्यात येते. कारण हे की, भरती करणारे ऑफिसर स्पृश्य आहेत. या दृष्टीने पाहिले असता या साहेबांनी या कामावर लाविलेल्या माणसांवर उपकार केले हे उघड आहे. याबद्दल मी मि. शार्टलंड साहेबांचे अभिनंदन करतो.

सदर प्रसंगी रॉयल इंडियन नेव्ही येथील राईट खात्यातील फोरमन मि. शॉर्टलंड साहेब यांनी हिंदीत छोटेसे भाषण केले.

सदर सभेच्या शेवटी इमारत फंडाचे जनरल सेक्रेटरी श्री. शा. अ. उपशाम यांनी जाहीर केले की, सदर सभेत इमारत फंडास मिळालेल्या सर्व रकमा जमेस धरून आज इमारत फंड १०,१२९ रु. ७ आ. ३ पै. इतका जमा झाला आहे.

नंतर इमारत फंडाचे असि. सेक्रेटरी श्री. बी. एस. गायकवाड यांनी बाबासाहेबांचे व इतर मंडळींचे समयोचित भाषणात आभार मानले व अध्यक्षांच्या परवानगीने सभा बरखास्त झाल्याचे जाहीर केले.



# १९३

# आपला उद्धार इतर करणार नाहीत त्यासाठी आपणच कंबर कसली पाहिजे

( मुंबई, दिनांक २६ एप्रिल १९४२)

मी सार्वजनिक कार्यामध्ये पदार्पण करून आज तेवीस वर्षे झाली आहेत. १९२० साली कोल्हापूर संस्थानात माणगाव मुक्कामी मी जाहीर सभेचा अध्यक्ष या नात्याने प्रथम भाषण केले. तेव्हापासून तो आतापर्यंत मी सार्वजनिक कार्य करीत आहे. या तेवीस वर्षातील सार्वजनिक कार्याचा आढावा काढला तर त्या कार्याचे तीन भाग पडतील. सामाजिक, धार्मिक आणि राजकीय हे ते भाग होत.

१९२० सालापूर्वीची सामाजिक स्थिती आणि आजची आपली सामाजिक स्थिती यांचा विचार केल्यास आपण मोठी सामाजिक क्रांती घडवून आणली आहे, असे म्हणावयास कोणतीच हरकत नाही. पूर्वी सर्वजण मृतमांस खात होते. त्यात त्यांना काहीच कमीपणा वाटत नव्हता किंवा लाजही वाटत नव्हती. परंतु आज ? आपल्यातील सुशिक्षित असो किंवा अशिक्षित असो, पुरुष असो किंवा स्त्री असो, प्रत्येकाच्या मनावर आपण पूर्वी करीत होतो त्या गोष्टी निंद्य आहेत, असा ठसा बसला आहे. आपले खास हक्क वतन म्हणून आपण त्यापूर्वी जतन करीत होतो. परंतु त्या गोष्टी आता आपण वर्ज्य केल्या आहेत. जनावरे ओढण्याची पाळी आता ब्राह्मण, मराठ्यावर आली आहे. हे मी काल्पनिक सांगत नसून सत्य ते सांगत आहे. रत्नागिरी जिल्ह्यात महाड मुक्कामी कृष्णा नावाचा एक महार होता. तो तेथील कार्यकर्ता होता. महाडच्या चवदार तळयाच्या सत्याग्रह चळवळीनंतर तेथील एका ब्राह्मणाची म्हैस मेली. ब्राह्मणाने कृष्णाला एकांतात नेऊन म्हैस ओढून नेण्याबद्दल विनविले. परंतु कृष्णा म्हणाला, ' तात्या हे कसे होईल ? ' तेव्हा निरूपायाने त्या ब्राह्मणानेच आपल्या मुलास मदतीस घेऊन ती म्हैस जवळच गावाबाहेर ओढून टाकली ! पण ती म्हैस कुजून, दुर्गंधी सुटली. ब्राह्मणाने पुनः कृष्णाची विनवणी करून अठरा रुपये देण्याचे आमिष दाखविले. परंतु कृष्णाने त्याला

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक मा. फ. गांजरे, खंड-२, पुनर्मुद्रण १०-४-१९८६, पृ. १५३-५६.

स्पष्ट नकार दिला. अर्थातच त्या ब्राह्मणाला स्वतःच ती म्हैस तशा स्थितीत ओढून गावापासून दूर तीन मैल अंतरावर नेऊन टाकावी लागली. या उदाहरणावरून, मी माणूस आहे, माझ्यात पुरुषार्थ आहे, ही जाणीव आपल्यातील प्रत्येकास झाली आहे. तेव्हा, ही एक सामाजिक क्रांती नव्हे काय ?

धार्मिकदृष्ट्या आपण जेवढी क्रान्ती केली आहे तेवढी क्रान्ती कोणत्याही अन्य समाजाने केलेली नाही, हे कोणालाही नाकारता येणार नाही. न्याय, नीती, समता, बंधुत्व यावर या हिंदू धर्मामध्ये भर नाही. मनुष्याला जाळणाऱ्या उपाधी मात्र भरपूर आहेत. धर्माच्या नावाखाली आपणाला जे विघातक ते आपण सर्व करीत होतो. परंतु आज धार्मिकदृष्ट्या आपण जितके उज्ज्वल दिसतो तितका दुसरा कोणताच हिंदू समाज दिसत नाही. मराठा, भंडारी या जातींमध्ये शिमग्यातील सोंगे ढोंगे अद्याप सर्रास चालू आहेत. त्यात त्यांना आनंद आणि अभिमान वाटतो. पण आपण हे सर्व सोडून दिले आहे. आपण आता पूर्वीप्रमाणे भक्तिभावाने पोथ्या पुराणे वाचीत नाही. आपल्यातील मंत्रतंत्र, साधुसंत सर्व नामशेष झाले आहेत आणि त्यामुळे आपला समाज अगदी धुतल्या तांदळाप्रमाणे स्वच्छ दिसू लागला आहे.

राजकीय प्रगतीबद्दलही तोच प्रकार आहे. अत्यंत अल्प अशा काळामध्ये आपण राजकीय उन्नती करून घेतली आहे, तेवढी इतर कोणत्याही समाजाची झालेली नाही, हे प्रत्येकास मान्य करावे लागेल. सरकारी नोकऱ्या आणि म्युनिसीपालिट्या, डिस्ट्रिक्ट बोर्डस् इत्यादि स्थानिक स्वराज्य संस्था ही स्पृशांची कायमची खोती बनून गेली होती. आपण फक्त त्यांची गलिच्छ कामे करण्यासाठी होतो. आपला एकही अधिकारी नव्हता. पण आज अशी एकही स्थानिक स्वराज्य संस्था नाही की जीमध्ये आपले लोक नाहीत. ज्यांची सावली घेण्यात येत नव्हती, जे राजकारणात अनाधिकारी ठरले होते ते अस्पृश्य लोक ब्राह्मणांच्या मांडीला मांडी लावून आज देशाच्या कारभारात लक्ष पुरवीत आहेत.

हा सर्वसाधारण असा त्रोटक आढावा आहे. कित्येक लोक म्हणतात की डॉ. आंबेडकरांनी काही केलेले नाही ! आजच्याच एका साप्ताहिक वृत्तपत्रात माझ्यावर टीका आली आहे. मी, हिटलर आणि कर्वे असे आम्ही तिघेजण एकाच आठवड्यात जन्मलो. या आधारावरून सदर पत्रकाराने असा निष्कर्ष काढला आहे की हिटलरने कार्य केले, कर्व्यांनी कार्य केले, पण डॉ. आंबेडकरांनी मात्र काहीच केले नाही ! मी काही केले किंवा नाही, हे

सांगण्याची मला जरुरी नाही. मला माझे पुढारीपण कोणापुढे मिरवावयाचे नाही. परंतु याबाबतीत एक गोष्ट स्पष्ट करणे जरूर आहे. माझ्याविषयी कोणी काहीही म्हणोत मला त्याची पर्वा नाही. परंतु आपण जी क्रांती केली आहे ती एक मोठी क्रांती आहे, हे आपण विसरता कामा नये.

ही पूर्वपीठिका मी आजच्या प्रसंगी का निवेदन केली ? मला तुम्हाला आज आपल्या समाजाच्या भवितव्याविषयी ज़े निवेदन करावयाचे आहे आणि ज्या निवेदनासाठी मी आजच्या प्रसंगी मुद्दाम हजर राहिलो आहे, ते सांगण्यापूर्वी आपल्या चळवळीचे आतापर्यंतचे स्वरूप नीट ध्यानात यावे म्हणून ही पूर्वपीठिका निवेदन केली. आपण आपल्या मुक्कामाच्या-ध्येयाच्या जवळ आलो आहोत, असे मला वाटत होते. एकेकाळी मला वाटत होते की, कालांतराने आपण स्पृश्य समाजात समरस होऊ. कालांतराने अशी स्थिती येईल की स्पृश्यास्पृशातील भेदभाव नष्ट होईल. नाशिक, महाड येथे जी चळवळ केली तिचा हाच मुख्य हेतू होता. सार्वजनिक स्थळांचा आणि पाणवठ्यांचा उपभोग आम्हाला पाहिजे या भावनेने उद्दीप्त होऊन आपण सत्याग्रह केले. पण हिंदू लोक आपणास समानतेने सामील करून घेण्यास सिद्ध होत नाहीत.

हे आम्हास स्वानुभवाने दिसून आले. म्हणून आम्ही आपली कार्याची दिशा बदललेली आहे, ही गोष्ट आपण आणि स्पृश्य हिंदुंनीही पूर्ण लक्षात ठेवावी, असे माझे सांगणे आहे.

जर हिंदू समाजात आम्हास समतेचे आणि ममतेचे स्थान नाही, तर आमचे राजकारण आम्ही आमच्याच हाती घेतले पाहिजे. दोन भावांचे भांडण झाले तर त्याचे विभक्तिकरण होते. तसे स्पृश्य हिंदुंचे आणि आमचे हक्कांबाबत विभक्तिकरण झाले पाहिजे. स्पृश्य आणि आपण यांच्यामध्ये कोणत्याही प्रकारची ऐक्यभावना उरलेली नाही. आपले उभयतांचे अशा प्रकारचे हक्कांबाबत विभक्तिकरण झाल्याखेरीज हे भांडण कदापि मिटणे शक्य नाही, हे सर्वांनी लक्षात ठेवावे. यात माझे कोणाशी वैयक्तिक वैर नाही. हे भांडण, एक भाऊ दुसऱ्या भावाच्या जुलूमाला कंटाळून विभक्त होऊ इच्छित असताना दुसरा भाऊ ते मान्य करीत नाही, अशा स्वरूपाचे आहे. परंतु याप्रसंगी मला स्पृश्य हिंदुंना जाहीरपणे असे निक्षून सांगावयाचे आहे की आधी आमचा वाटा द्या. आमचा वाटा आम्हाला मिळाल्यास तुमचे स्वातंत्र्य मिळविण्याचे भांडण लढण्याची जबाबदारी मी घेतो. स्पृश्य हिंदुंप्रमाणेच हा देश त्वरित स्वतंत्र व्हावा, असे

आमचे मत आहे. इतकेच नव्हे तर, इंग्रजांचे राज्य या देशात एक दिवसही राहू नये, या मताचा मी आहे. परंतु ज्या राज्यसत्तेवर आपल्या अखिल समाजाचे भवितव्य अवलंबून आहे त्या राज्यसत्तेचा हिस्सा देण्याचे हिंदुंनी नाकारले तर तो साध्य करण्यासाठी मी समर्थ आहे.

यापुढे आपल्या समाजाने अत्यंत सावध राहिले पाहिजे. क्रिप्सच्या वाटाघाटी अयशस्वी होऊन ते परत गेले. क्रिप्सची योजना फेटाळली गेली ही आपल्यावर अत्यंत मोठी कृपा झाली आहे. ही योजना पाहून इंग्रजांच्या प्रामाणिकपणाबद्दल मला अत्यंत आश्चर्य वाटले. घटना समितीची मागणी काँग्रेसने केली होती. तिला सर्व अल्पसंख्यांकांनी विरोध केला होता. त्याप्रमाणे सरकारनेही घटना समितीची काँग्रेसची मागणी अमान्य केली होती.

स्वयंनिर्णायक घटना समितीची योजना मान्य केली तर आपले हक्क ठरविण्याचा अधिकार सर्वस्वी स्पृश्यांच्या हाती जाईल. याप्रमाणे या घटना समितीच्या योजनेने आपल्या समाजाच्या भवितव्यावर मोठा घाला आला होता.

सरकारला वाटते की अस्पृश्य लोक गरीब, अल्पसंख्यांक, दरिद्री आहेत. म्हणून आपले हक्क देण्याची त्यांना बुद्धी नाही. तेव्हा याउपर आपण योग्य तो धडा घेतला पाहिजे. आपले न्याय्य हक्क संपादन करण्याकरिता लढण्यास सिद्ध झाले पाहिजे. चारी दरवाजे बंद करून आपला कोंडमारा करण्याचा कोणी प्रयत्न केला तर कायदेशीर आणि बेकायदेशीर अशा दोन्ही मार्गांचा अवलंब करून आपण आपले अस्तित्व झगडून टिकविले पाहिजे. आपला उद्धार इतर करणार नाहीत त्यासाठी आपणच कंबर कसली पाहिजे. तरच काही तरी तरणोपाय आहे.



# १९४

# लोकशाही जिवंत राहिली तर तिची फळे नक्कीच लाभतील, पण लोकशाही मेली तर विनाश अटळ

नागपूर येथे दिनांक १८ व १९ जुलै १९४२ ला अखिल भारतीय दलित वर्ग परिषद घेण्याचे ठरविण्यात आले. या परिषदेमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी चालविलेल्या चळवळीवर विचारविनिमय होऊन चळवळीची पुढील दिशा ठरविण्यात येणार असल्यामुळे या परिषदेस असाधारण ऐतिहासिक महत्त्व होते. प्रथमतः या परिषदेची पार्श्वभूमी आणि कार्यवाही याबाबत माहिती देऊन त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिलेले ऐतिहासिक भाषण आणि त्यानंतर दिलेले परिषदेच्या समारोपाचे भाषण दिले आहे. या परिषदेसोबतच ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस वुईमेन्स कॉन्फरन्स् आणि समता सैनिक दल कॉन्फरन्स् घेण्यात आल्या. त्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिलेली भाषणे क्रमशः दिली आहेत– संपादक

'' डॉ. आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली १९४२ मध्ये अखिल भारतीय दलित परिषद भरविण्याचे ठरले. त्यावेळी नागपूरातील सर्व वर्तमानपत्रकारांची एक सभा हितवाद प्रेसच्या गोखले हॉलमध्ये घेण्यात आली होती. या सभेचे अध्यक्ष काँग्रेस पक्षाचे एक ब्राह्मण पुढारी होते. ही वर्तमानपत्रकारांची सभा विशिष्ट हेतूकरिता बोलावण्यात आली होती. तो हेतू असा की डॉ. आंबेडकरांच्या अध्यक्ष तेखाली होणार असलेल्या परिषदेच्या वृत्तावर नागपूरातील सर्व वर्तमानपत्रांनी बहिष्कार घालावा. अशा प्रकारचा एक प्रस्ताव तयार करून त्यावर उपस्थित पत्रकारांच्या सह्या घेण्याचे कार्य सुरू असतानाच त्या बैठकीला उपस्थित असलेले ' श्यामसुंदर ' चे संपादक राजहंस रामचंद्र पाटील यांनी त्यासंबंधी विचारणा केली. त्यावेळी त्यांना ह्या प्रस्तावासंबंधी माहिती मिळाली. राजहंस पाटील यांनी अशा प्रकारच्या प्रस्तावास आपला जोरदार विरोध दर्शविला. ते म्हणाले, '' व्हाइसरॉयच्या मंत्रीमंडळात असणारे श्री. बापूजी अणे, डॉ. खरे हे तुमच्या दृष्टीने देशभक्त होऊ शकतात आणि डॉ. आंबेडकर हे देशद्रोही काय? खऱ्या अर्थाने डॉ. आंबेडकर हे खरे देशभक्त आहेत कारण शेकडो वर्षे गुलामगिरीत पिचत पडलेल्या दलित समाजाच्या स्वातंत्र्याकरिता ते लढत आहेत. तुमचे हे कृत्य नादानपणाचे आहे. मला ते मुळीच मान्य नाही.

मी माझ्या 'श्यामसुंदर' मधून दलित परिषदेचा सर्व वृत्तांत प्रसिद्ध करणार आहे.'' अशा प्रकारे राजहंस पाटील यांनी निर्भिड व सडेतोडपणे आपले मत मांडून बहिष्काराच्या प्रस्तावाला ठोस विरोध केला आणि त्या वर्तमानपत्रकारांच्या सभेतून बहिर्गमन केले. या विरोधामुळे त्यांचा नियोजित डाव उधळला गेला. (श्री. राजहंस पाटील संपादक, श्यामसुंदर यांनी दिलेली माहिती.)''[१]

'' दिनांक १८ जुलै १९४२ चा दिवस, वेळ सकाळी नऊची. ठिकाण नागपूर रेल्वे स्टेशन. हजारोंच्या संख्येने स्त्री-पुरूषांनी रेल्वे स्टेशनचे सर्व प्लॅटफार्मस् तुडुंब भरून टाकले होते. 'बाबासाहेब आंबेडकर झिंदाबाद' च्या घोषणा चालू होत्या. समता सैनिक दलाचे सुमारे पाच हजार सैनिक गणवेषामध्ये मोठ्या शिस्तीने उभे राहिले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर येत असलेल्या आगगाडीची वेळ झाली होती. त्यांची गाडी नागपूर रेल्वे स्टेशनात आल्याबरोबर बँड व घोषणांचा एकच जल्लोष सुरू झाला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर रेल्वेच्या डब्यातून खाली उतरले. त्यांच्या समवेत मद्रासचे एन. शिवराजही होते. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची स्थापना करण्यासाठी जी खास परिषद नागपूरला घेण्यात आली होती त्या परिषदेसाठी रेल्वेने येत असलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे व एन. शिवराज यांचे उत्स्फूर्त स्वागत करण्यासाठी तो अलोट जनसमुदाय नागपूर रेल्वे स्टेशनवर जमला होता. भारतातील सर्व प्रांतातील अस्पृश्य समाजाचे प्रतिनिधी एकजिवाने, मोठ्या उत्साहाने हजर झाले होते. एखाद्या अति प्रचंड लोह चुंबकाकडे लोहाचा कण आणि कण जसा ओढला जातो त्याप्रमाणे बाबासाहेब आंबेडकरांच्या निष्ठेने तमाम अस्पृश्य जनता नागपूर मुक्कामी जमली होती. एवढी विराट जनता, केवळ अस्पृश्य समाजातीलच नव्हे, तर कोणत्याही समाजातील व कोणत्याही पुढाऱ्यासाठी त्यापूर्वी नागपूरला कधी काळी जमली नसेल, असे ते अभूतपूर्व दृश्य होते.''[२]

'' ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या अगोदर स्वतंत्र मजूर पक्ष अस्तित्त्वात होता. त्या पक्षातर्फे क्रिप्स मिशनपुढे अस्पृश्यांची राजकीय कैफियत बाबासाहेबांनी मांडली. तेव्हा क्रिप्ससाहेबांनी असे उद्गार काढले की, मजूर पक्ष काही जातीय राजकारणाचा पाठपुरावा करू शकत नाही. मग ती कैफियत अस्पृश्य वर्गातर्फे तुम्ही स्वतः मांडणे तुम्हाला तर्कनिष्ठ दिसते काय ? तुम्ही दुसऱ्या जातीय संस्थेतर्फे कैफियत मांडा. ही दिल्लीत घटना घडली तेव्हा बाबासाहेबांनी सर्व पुढाऱ्यांना तारा पाठवून बोलावून घेतले आणि सर्व परिस्थिती त्यांच्यापुढे ठेवून नवी संस्था काढण्याचा आपला मनोदय प्रकट केला. बाबासाहेबांनी

---

[१] विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : एच. एल. कोसारे, पृ. ५२९.

[२] समग्र आंबेडकर चरित्र- बी. सी. कांबळे : खंड १६ वा. पृ. ४७-४८.

संस्थेचे नाव व घटना अगोदरच तयार करून ठेवली होती. नागपूरला अस्पृश्यांतर्फे जंगी परिषदा भरविण्याचे आणि फेडरेशनची स्थापना व घटना तयार करण्याचे ठरविण्यात आले. हे सर्व सोपस्कार बाबासाहेबांनी अगोदरच दिल्लीत केलेले होते. फक्त त्याला कायदेशीर स्वरुप या वेळी मिळाले. या तीन परिषदांची नावे अशी :

(१) ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस कॉन्फरन्स्, थर्ड सेशन, १८ व १९ जुलै १९४२.

(२) ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस वुईमेन्स कॉन्फरन्स्, २० जुलै १९४२.

(३) समता सैनिक दल कॉन्फरन्स्, २० जुलै १९४२.

या तिन्ही परिषदेस सुमारे पाऊण लाख लोक उपस्थित होते. त्यात सुमारे २० हजार स्त्रिया होत्या. नागपूर येथील मोहन पार्क येथे नागपूरकरांनी परिषदासाठी प्रचंड मंडप उभारला होता. त्याला आंबेडकर, हरदास, काळू आहेरे व रमाबाई यांच्या नावाचे चार बाजूंनी चार दरवाजे होते. १८ व १९ जुलै १९४२ च्या! तिसऱ्या अधिवेशनासाठी अध्यक्ष म्हणून बाबासाहेबांची अगोदर निवड करण्यात आली होती. परंतु त्यांना ९ जुलैच्या हुकुमान्वये व्हाईसरॉयच्या मंत्रिमंडळात घेतल्यामुळे, त्यांना अध्यक्षपद भूषविता आले नाही. ते पद मद्रासचे रावबहादूर एन. शिवराज, एम. एल. ए. (सेंट्रल), मद्रास लॉ कॉलेजचे प्रोफेसर आणि किंग्ज-कमिशन कमिटीचे सभासद यांना देण्यात आले. बाबासाहेब आणि शिवराज आणि त्यांचे सहकारी नागपूरला १८ जुलैला सकाळी ९ वाजता आगगाडीने येऊन पोहोचले, तेव्हा प्रचंड मिरवणूक स्टेशनपासून मोहन पार्क हॉटेलपर्यंत काढण्यात आली. समता सैनिक दल व त्यांचा बँड अग्रभागी होते. सन्माननीय मंडळी हॉटेलमध्ये चार दिवस राहिली.

दी ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस कॉन्फरन्स्चे अध्यक्ष रावबहादूर एन. शिवराज, बी. ए. बी.एल., एम. एल. ए. (सेंट्रल) हे होते. दी ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस वुईमेन्स अधिवेशनाच्या अध्यक्षा सौ. डोंगरे (अमरावती) या होत्या. दी समता सैनिक दल कॉन्फरन्स्चे अध्यक्ष-गोपाळसिंह, एच. बी. ई., एम.एल. ए. (पंजाब) हे होते. या तीन परिषदांचा इंग्रजी अहवाल (पाने १२१), श्री. जी. टी. मेश्राम, तिसऱ्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष यांनी ७-९-१९४२ ला ' मंगलधाम ' इंदोरा येथे प्रसिद्ध केला.

राजकीय स्वरुपाचे जे पाच ठराव झाले त्यात (१) क्रिप्स योजना अस्पृश्यांना नापसंत आहे, (२) घटना परिषद लवकर भरविण्यात यावी याबद्दल मागणी, (३) अस्पृश्यांच्या संरक्षणाची तरतूद घटनेत करण्याबद्दल मागणी. अस्पृश्यांच्या हिताची कामे करण्याबद्दल एक मोठी रक्कम प्रत्येक वर्षी अंदाजपत्रकात मंजूर

करणे, पब्लिक सर्व्हिस कमिशन, मोठ्या अधिकाराच्या जागा, कायदेमंडळे व स्थानिक स्वराज्य संस्था यात भरपूर प्रमाणात अस्पृश्यांना असाव्यात अशा मागण्या केल्या, (४) अस्पृश्यांच्या निराळ्या वसाहती असाव्यात, त्यासाठी सेटलमेंट कमिशनर असावा, अस्पृश्यांना सरकारी जमीनी द्याव्यात वगैरे, (५) ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची स्थापना एक प्रमुख मध्यवर्ती राजकीय पक्ष म्हणून करणे. सदर मूळ ठराव खालीलप्रमाणे :–

RESOLUTION No. I

CRIPPS' PROPOSALS UNACCEPTABLE

This conference declares that the proposals of His Majesty's Government relating to constitutional changes sent out with Sir Stafford Cripps are utterly unacceptable to the Scheduled Castes. In the opinion of this conference these proposals were nothing but a betrayal of the interests of the Scheduled Castes and a breach of the assurance given by His Excellency the Viceroy in his declaration of 8th August 1940 on behalf of His Majesty's Government that the constitution which had not the consent of the Scheduled Castes, would not be imposed upon them.

PROTEST AGAINST CRIPPS PROPOSALS

This conference places on record its emphatic protest against His Majesty's Government agreeing to the demand made by the Congress that the new constitution be framed by the Constituent Assembly and also against the proposal of safeguarding the interests of the Scheduled Castes by a treaty between the New Indian National Government and the Government of His Majesty's in Great Britain.

RESOLUTION No. II

CONSENT TO CONSTITUTION NECESSARY

This conference declares that no constitution will be acceptable to the Scheduled Castes unless, (i) it has the consent of the Scheduled Castes, (ii) it recognises the fact that the Scheduled Castes are distinct and separate from the Hindus and constitute an important element in the national life of India, (iii) it contains within itself provisions, which will give to the Scheduled Castes a real sense of security under the new constitution and which are set out in the following resolutions.

## RESOLUTION No. III

## ESSENTIAL PROVISIONS IN NEW CONSTITUTION

For creating this sense of security among the Scheduled Castes, this conference demands that the following provisions shall be made in the new constitution :

Provisions in provisional Budgets for Scheduled Castes advance :—

(1) That in the budget of every Provincial Government an annual sum, as may be determined upon by agreement, be set apart for promoting the primary education among the children of the Scheduled Castes and another annual sum for promoting advanced education among them and such sums shall be declared to be the first charge on the revenues of the province.

(2) That provision shall be made by law of securing representation to the Scheduled Castes in all Executive Governments, Central and Provincial, the proportion of which shall be determined in accordance with their number, their needs and their importance.

(3) Representation in Public Services : That provisions shall be made by Law for securing representation to the Scheduled Castes in the Public Services, the proportion of which shall be fixed in accordance with their members, their needs and their importance. This conference insists that in case of essential services, such as Judiciary, Police and Revenue, provision shall be made that the proposition fixed for Scheduled Castes shall, subject to the rule of minimum qualification, be realised within a period of ten years.

(4) Representation by Statute in all Legislatures and Local Bodies:—

That provision shall be made by law for guaranteeing to the Scheduled Castes representation in all Legislatures and Local Bodies in accordance with their number, needs and importance.

(5) Separate Electorate : That provision shall be made by law whereby the representation of the Scheduled Castes in all Legislatures and Local Bodies will be by the method of Separate Electorates.

(6) Representation on Public Service Commissions : That provision shall be made by law for the representation of the Scheduled Castes on the Public Service Commissions, Central and Provincial.

## RESOLUTION No. IV

## CHANGE IN VILLAGE SYSTEM

That so long as the Scheduled Castes continue to live on the outskirts of the village, with no source of livelihood and in small numbers as compared to the Hindus they will continue to remain untouchables and subject to the tyranny and opposition of the Hindu and will not be able to enjoy free and full life. For the protection of the Scheduled Castes from the tyranny and opposition of the caste Hindus to enable them to develop to their fullest manhood, to give them economic and social security and also to pave the way for the removal of untouchability this conference has after long and mature deliberation come to conclusion that a radical change must be made in the village system, now prevalent in India and which is the parent of all the ills from which the Scheduled Castes are suffering for so many centuries at the hands of Hindus. Realising the necessity of these changes this Conference holds that along with the constitutional changes in the system of Government there must be a change in the village system now prevalent made along the following lines :—

(1) SEPARATE VILLAGES : The constitution should provide for the transfer of the Scheduled Castes from their present habitation and constitute separate Scheduled Castes villages away from and independent of Hindu villages.

(2) SETTLEMENT COMMISSION : For the settlement of the Scheduled Castes in new villages a provision shall be made by the constitution for establishment of a Settlement Commission.

(3) LAND FOR SCHEDULED CASTES : All Government land which is cultivable and which is not occupied shall be handed over to the Commission to be held in trust for the purpose of making new settlement of the Scheduled Castes.

(4) ACQUISITION OF NEW LAND : The Commission shall be empowered to purchase new land under the Land Acquisition Act from the private owners to complete the scheme of settlement of the Scheduled Castes.

(5) CENTRAL GOVERNMENT TO PROVIDE MINIMUM OF FIVE CRORES PER ANNUM : The constitution shall provided that the Central Government shall grant to the Settlement Commission minimum sum of Rs. Five crores per annum to enable the Commission to carry out their duty in this behalf.

## RESOLUTION No. V

## ESTABLISHMENT OF ALL INDIA SCHEDULED CASTES FEDERATION

This Conference is of the opinion that the time has arrived for the establishment of a Central Political Organization for carrying on the political movement of the Scheduled Castes.

This Conference, therefore, resolves to establish the All India Scheduled Castes Federation as the Central Political Organization of the Scheduled Castes of India and appeals to all political organisations of the Scheduled Castes to merge into this Central Organization and work through it. For execution of this purpose this conference authorises Dr. B. R. Ambedkar to form a Committee with himself as a Chairman to frame a constitution for All India Scheduled Castes Federation. The Committee will submit the report to a provisional council consisting of the following on whose approval the constitution shall become operative.

*Bengal :* M/s. R. L. Biswas, A. D. Rcy, R. S. Dhurija, B. C. Mandal.

*Bombay :* M/s. D. G. Jadhav, P. N. Rajbhoj, B. K. Gaikwad.

*Punjab :* M/s. Gopal Singh, Seth Krisandas.

*C. P. and Berar :* M/s. R. V. Kavade, R. H. Shendre, H. L. Kosare.

*U.P. :* Rai Saheb Shamlal, Rai Saheb Ramsahai, Dr. Dandalal Jaiswal, Shri Badriprasad Balmiki, Shri Babu Tilak Chand.

वरील ठरावांवर खालील वक्त्यांनी भाषणे केली. बी. के. गायकवाड, एम.एल.ए. (नाशिक), रायसाहेब शामलाल (अलाहाबाद), गोपालसिंह, एम.एल.ए. (पंजाब), एन. एम. दास, बी.ए., बी.एल. (कलकत्ता), आर. आर. भोळे, बी.एससी., एल.एल.बी. (पुणे), ए. डी. रॉय, बी.ए., एम.एल.सी. (जेस्सोर), पी. एम. पट्टणी, (अहमदाबाद), मंगीलाल, (राजपुताना), बी. एच. वराळे, एम.एल.ए. (कर्नाटक), डी. जी. जाधव, बी.ए., एल.एल.बी. (जळगाव), राईसाहेब, एन. सी. धुरीया (बंगाल), पी. एन. राजभोज (पुणे), बी. सी. मंडल, बी.ए. (कलकत्ता), बद्रीप्रसाद वाल्मीकी, (अलाहाबाद), पी. एल. के. तलिब, एम.ए., एल.एल.बी., पीएच.डी. (लखनौ), पी. जे. रोहम, एम.एल.ए. (अहमदनगर).

महिला परिषदेत जे ठराव झाले त्यात घटस्फोट घेणे व देणे, स्थावर जंगम इस्टेटीत महिलांना वाटा मिळणे वगैरे प्रमुख ठराव होते. या ठरावावर खालील महिलांची भाषणे झाली.

सौ. राधाबाई कांबळे, जाईबाई चौधरी, कु. मंजुळा कानफाडे, कु. लतिका गजभिये, कु. सुलोचना नाईक, कु. वीरेंद्रबाई तीर्थंकर, कु. चंद्रभागा पाटील, कु. कौसल्या नंदेश्वर आणि इंदिराबाई पाटील.

रावबहादूर शिवराज यांनी आपल्या भाषणात अस्पृश्यांच्या राजकीय हक्कासंबंधी केलेल्या चळवळीचा संक्षिप्त इतिहास सांगितला आणि काँग्रेस, हिंदू लोक आणि सरकार यांनी वेळोवेळी स्वीकारलेल्या विरुद्ध भूमिकेबद्दल त्यांना दोष दिला. डॉ. आंबेडकरांनी क्रिप्सबरोबर जी वाटाघाट केली तीत क्रिप्ससाहेबांनी जे विरोधी धोरण स्वीकारले त्याचा संक्षिप्त इतिहास सांगून शिवराज यांनी क्रिप्ससाहेबावर खूप टीका केली. पुणे करारामुळे काँग्रेसला अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांवर हव्या त्या मार्गानी आक्रमण करण्यास वाव मिळाला, या मुद्यावर त्यांनी सोदाहरण भाषण केले व पुणे करारात योग्य तो फेरफार करा, अगर तो करार रद्द करा, अशी मागणी केली.

बाबासाहेबांना अस्पृश्यांतर्फे मंडपात मानपत्र देण्यात आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मानपत्राला उत्तर देताना जे भाषण केले त्यात कराराने काँग्रेसच्या हाती, अस्पृश्यांना प्राणघातक अशी गोष्ट मिळाली आहे, याचे विवेचन केले आणि सदर करारच रद्द केला पाहिजे अशी मागणी केली.

फर्स्ट अँड सेकंड महार बटालियन्स यांचा तळ कामठी येथे होता. बाबासाहेबांना भेटण्यासाठी यांचे ऑफीसर आले आणि त्यांनी बाबासाहेबांना चहा पार्टीचे आमंत्रण दिले. बाबासाहेब कामठीला गेले व चहापार्टीनंतर त्यांनी सैनिकांसमोर, त्यांना उद्देशून भाषण केले की, महार आणि महाराष्ट्र यांची शूरत्वाची उज्ज्वल परंपरा तुम्ही सतत डोळ्यापुढे ठेवा आणि मर्दुमकी करून नावलौकीक आणि अधिकार मिळवा. दोन्ही बटालियन्स, त्यांचे कमांडिंग ऑफिसर्स आणि बाबासाहेब यांचा फोटो घेण्यात आला.

फेडरेशनच्या घटनेचा मराठी अनुवाद श्री. सखाराम मेश्राम, वकील, नवी वस्ती, नागपूर यांनी केला आणि तो हरिदास आवळे, कार्यवाह मध्यप्रांत-वऱ्हाड शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन, नागपूर, यांनी ३१-१२-१९४२ ला पुस्तकरुपाने प्रसिद्ध केला. किंमत ४ आणे ( पाने १५ ).

'' हिंदुस्थानच्या राजकीय जीवनात दलितांना स्वतंत्र व स्वयंपूर्ण दर्जा प्राप्त करून देऊन त्यांची संख्या, त्यांच्या गरजा व त्यांचे महत्त्व या सर्व बाबीमुळे जे त्यांना हक्क मिळणे अपरिहार्य आहे, ते त्यांचे राजकीय, सामाजिक व आर्थिक हक्क मिळवून देणे, हे अखिल भारतीय दलित फेडरेशनचे उद्देश आहेत '' असे भाग (१) यात ध्येय व्यक्त केलेले आहे. घटना २३ भागात लिहिलेली होती.

नागपूर परिषदेत मंजूर झालेल्या ठरावाच्या प्रती प्रांतिक गव्हर्नर आणि व्हाईसरॉय यांच्याकडे पाठविण्यात आल्या.

नागपूरची परिषद संपल्यानंतर बाबासाहेब मुंबईत आले. दुसऱ्या दिवशी त्यांनी यशवंतराव, मुकुंदराव, द्रौपदी व शंकरमामा यांना आपल्या अभ्यासिकेत बोलावून घेतले. मी दिल्लीला जाणार आहे, तुम्ही सर्वजण नीट रहा आणि माझी लायब्ररी व्यवस्थितपणे संभाळा असा उपदेश त्यांनी सर्वांना केला. या सर्वांसाठी त्यांनी कपडे आणले होते ते त्यांना दिले आणि मग रमाबाईंची आठवण काढून ते म्हणाले 'ती आता असती तर तिला फार आनंद झाला असता ! तिने माझ्यासाठी खूप त्रास काढला.' त्यांचा कंठ सद्गदीत झाला. डोळ्यात अश्रू जमा झाले. त्यांचे अश्रू पाहून सर्वजण रडू लागले.'' [१]

## ''अखिल भारतीय दलित वर्ग परिषदेतील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण

अध्यक्ष महाराज, बंधु आणि भगिनींनो,

या परिषदेत बोलताना प्रथमच जाणवणारी मूलभूत अडचण म्हणजे भाषेचा प्रश्न. या विस्तृत अशा गर्दीत मराठी विभागातून आलेल्या लोकांची संख्या फार मोठी आहे. म्हणून या परिषदेचा अहवाल त्यांना समजावा, अशी इच्छा बाळगणाऱ्या माणसाने मराठीतच बोलले पाहिजे. या मराठी भाषी श्रोत्यांशिवाय अ-मराठी प्रदेशातूनही अनुसूचित जातीचे प्रतिनिधी उपस्थित आहेत. यातील काही बंगाल, बिहार, मद्रास, आन्ध्र, पंजाब आणि इतर अनेक प्रांतातून आलेले दिसतात. त्यांनाही या परिषदेचे कामकाज समजण्यासाठी मी इंग्रजीत बोलले पाहिजे, हे उघडच आहे. ही अडचण टाळण्यासाठी एकदा इंग्रजीत आणि नंतर मराठीत बोलण्याचे मी ठरविले आहे. म्हणजे मला जे काय सांगावयाचे आहे ते दोन्ही विभागांना समजेल. आज इंग्रजीत बोलण्याचा माझा मानस आहे. उद्या मी मराठीत बोलेन.

---

[१] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ९ वा, पृ. १२० ते १२७.

ही परिषद भरविण्यासंबंधीची कल्पना कशी सुचली याविषयी दोन शब्द बोलणे उचित होईल असे मला वाटते. तुम्हास आठवत असेल की मागच्या एप्रिलमध्ये सर स्ट्राफर्ड क्रिप्स यांना भेटण्यासाठी दिल्लीस उपस्थित राहावे, असे मला बोलावणे आले होते. भारतीय राज्यघटनेत काही बदल सुचविण्यासाठी इंग्रज सरकारचे प्रतिनिधी म्हणून ते आले होते आणि या सूचना भारतातील वेगवेगळया राजकीय पक्षांनी स्वीकाराव्या म्हणून त्यांच्याशी वाटाघाटी करण्याची जबाबदारी त्यांच्यावर सोपविण्यात आली होती. दिल्लीला जाण्यापूर्वी भारतातील विविध प्रांतांच्या अनुसूचित जातींच्या प्रतिनिधींना विचारविनिमय करण्यासाठी मी दिल्लीला बोलाविले होते. सर स्ट्राफर्ड क्रिप्सबरोबर झालेल्या वाटाघाटींचा निर्णय जेव्हा मी त्यांना निवेदन केला तेव्हा आम्हा सर्वांना कळून चुकले की सर स्ट्राफर्ड क्रिप्स यांनी ज्या योजना आणल्या होत्या त्या अनुसूचित जातींच्या कल्याणावर एक भयानक प्राणघातक हल्लाच होता. क्रिप्सच्या योजनांवरील माझा दृष्टीकोन एका लेखाद्वारे वर्तमान पत्रातून मी मांडला होता. मला वाटते तुम्ही तो वाचला असावा. परंतु असे वाटू लागले की अखिल भारतीय अनुसूचित जातीतर्फे सर्वसामान्य व सुसंघटित अशी चळवळ करणे फार आवश्यक आहे आणि केवळ ही सार्वत्रिक चळवळच येऊ घातलेल्या राजकीय विनाशापासून आम्हाला वाचवू शकेल. अखिल भारतातील सर्व अनुसूचित जातींनी आपल्या प्रतिनिधिद्वारे दिल्लीला जी इच्छा व्यक्त केली तिचा परिणाम म्हणजेच ही परिषद होय. म्हणूनच या परिषदेच्या पाठीशी अखिल ' अस्पृश्य भारत ' एकसंघपणे उभा आहे. याचकरिता अखिल भारतातून अनुसूचित जातींचे प्रतिनिधी आज आपणामध्ये उपस्थित झालेले आहेत. ही परिषद कोठे घ्यावी याबद्दल विविध प्रांतात बरीच स्पर्धा लागली होती, बंगाल, पंजाब, उत्तरप्रदेश, मध्यप्रदेश आणि मुंबई यापैकी प्रत्येकाला ही परिषद भरविण्याचे श्रेय आपणास मिळावे असे वाटत होते. शेवटी ही परिषद भरविण्याचे श्रेय मध्यप्रदेशाला द्यावे याबद्दल सर्व सहमत झाले. तथापि, एका अटीसाठी मात्र सर्वांनी आग्रह धरला. ती अट म्हणजे परिषद कोठेही भरली तरी त्या परिषदेचे अध्यक्षस्थान मी स्वीकारावे. ह्या सर्वांशी माझा मतभेद असूनही अखेर अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मी संमती दिली होती. तेव्हा राजकारणी माणसाच्या वाट्याला येणारे स्वातंत्र्य मी उपभोगत होतो. या परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारून तेव्हा हवे ते विचार बोलून दाखविणे मला शक्य झाले असते. जबाबदारीच्या अधिकारावर असताना निर्माण होणारी बंधने त्यावेळी मुळीच नव्हती. परंतु परिषद घडून येण्याच्या आधीच व्हाईसरॉयच्या

एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचा सभासद म्हणून माझी नेमणूक झाल्याचे जाहीर करण्यात आले. या बरोबरच जबाबदारीची बंधने आली. म्हणून मी विचार केला की अनुसूचित जातींच्या वतीने अधिकारवाणीने व स्वतंत्रवृत्तीने बोलू शकेल असा दुसरा कोणी माणूस जर निवडला तर अधिक चांगले होईल. रावबहादूर एन. शिवराज स्वतंत्रवृत्तीने आणि अधिकारवाणीने ते बोलू शकतात याबद्दलसुद्धा मला मुळीच संदेह नाही. आपल्या लोकांच्या कल्याणासाठी बऱ्याच दिवसांपासून ते परिश्रम घेत आहेत. केन्द्रीय विधिमंडळात आपले प्रतिनिधीत्व ते करीतच आहेत. त्यांच्या शैक्षणिक पात्रतेसंबंधी सांगायचे म्हणजे आपणापैकी त्यांच्या इतके शिकलेले फारच थोडे असतील. मद्रास विश्वविद्यालयाचे ते बी. ए., एल. एल. बी. आहेत. ते वकिलीचा व्यवसाय करीत असून मद्रास येथे दहा वर्षापासून कायद्याचे प्राध्यापक आहेत. खरेच ! या परिषदेचा अध्यक्ष म्हणून त्यांच्यापेक्षा अधिक योग्य व्यक्ती शोधूनही सापडली नसती. म्हणूनच माझ्या जागी त्यांची निवड झाल्यामुळे मला अतिशय आनंद होत आहे.

जोपर्यंत मी भारतीय सरकारचा सभासद आहे तोपर्यंत आपली चळवळ सांभाळण्याची जबाबदारी तुम्ही स्वीकारली पाहिजे. आपणा सर्वांचे ध्येय हस्तगत होईपर्यंत ही चळवळ सतत कार्यप्रवण ठेवण्याची जबाबदारीही तुमच्यावर आहे. मी तुम्हाला मदत करीन, सल्लाही देईन, परंतु प्रत्यक्ष चळवळीत भाग घेणे मला शक्य होणार नाही. ही प्रत्यक्ष वस्तुस्थिती आहे. ती तुम्ही मनात नीट बाळगली पाहिजे. म्हणूनच माझ्याशी मागच्या वीस वर्षापासून संबंधित असलेल्या आणि आश्रयाखाली नसली तरी माझ्या नेतृत्वाखाली प्रगतीकडे वाटचाल करणाऱ्या अस्पृश्यांच्या चळवळीची जबाबदारी दुसऱ्याच्या हाती सोपविताना माझ्या मुखत्यारीचा अहवाल तुमच्यासमोर मांडणे अत्यंत आवश्यक होऊन बसले आहे. अनुसूचित जाती, भारतातील इतर जातींच्या तुलनेने कोठे उभ्या आहेत हे ज्यांच्यावर जबाबदारी सोपविल्या जात आहेत त्यांना नीट आकलन व्हावे म्हणून समजावून सांगणे अत्यावश्यक आहे. त्यांच्या मुक्तीसाठी काय काय केले आहे आणि काय करावयाचे राहिले, हे सांगणे फार जरूरीचे आहे.

अस्पृश्यांनी सर्व दिशांनी वाटचाल करण्यासाठी जलद पावले उचलली आहेत ही अतिशय समाधानाची गोष्ट आहे. विशेष अशा तिनच गोष्टीचा मी उल्लेख करतो. भारतातील फारच थोड्या जातींमध्ये दिसून येणारी राजकीय दक्षता त्यांनी बऱ्याच प्रमाणात मिळविलेली आहे. दुसरे, त्यांनी शिक्षणात लक्षणीय प्रगती केलेली आहे व तिसरे म्हणजे निरनिराळया संस्थांमध्ये आणि देशाच्या नोकऱ्यांमध्ये निदान पाय ठेवायला त्यांनी आधार मिळविलेला आहे.

अस्पृश्यांनी केलेल्या प्रगतीचा विस्तार लक्षात घेण्याजोग्या स्थितीत सध्याची अस्पृश्य पिढी नाही. या एवढ्याशा कारणासाठी वीस वर्षांपूर्वी ही चळवळ सुरू झाली तेव्हा त्यांची काय परिस्थिती होती याची त्यांना जाणीव नाही. इंग्लंडवरून बॅरिस्टर होऊन मी जेव्हा परत आलो तेव्हाच्या मुंबईच्या परिषदेची मला चांगली आठवण आहे. परिषदेच्या संयोजकाशिवाय एकही वेगळा श्रोता तेथे उपस्थित नव्हता. काही जण घराच्या दरवाज्याच्या पायऱ्यावर बिड्या फुंकीत बसले होते. तर काही लोक कोपऱ्या कोपऱ्यातून आपसात गप्पा छाटत होते. हे चित्र पाहा आणि ते चित्र पाहा. येथे तुमच्यासमोर पंच्याहत्तर हजारावर श्रोतृसमुदाय उपस्थित आहे. वीस वर्षापूर्वीच्या परिस्थितीशी तुलना केली तर आपली शैक्षणिक प्रगती फार चांगल्या तऱ्हेने होत आहे, असेच म्हणावे लागेल. एकट्या पुण्यामध्येच पन्नास विद्यार्थी कॉलेजात शिकत आहेत. निरनिराळया विश्वविद्यालयातून ग्रॅज्यूएट झालेल्यांची एकंदर संख्या पाचशेच्या जवळपास भरेल. काही डॉक्टर आहेत. काही बॅरिस्टरही झालेले आहेत. आपल्या बांधवांपैकी बरेच जण नगरपालिकांचे व जिल्हा आणि स्थानिक नगरपरिषदांचे सभासदही आहेत. काही वर्षापूर्वी आपल्या मुलांना शिक्षण घेण्याची मनाई होती. काही वर्षापूर्वी बाटण्याच्या भितीमुळे अस्पृश्यांना स्थानिक संस्थांचा आणि नगरपालिकांचा सभासद होण्याची परवानगी नसे. हे सर्व आता बदललेले आहे. सरकारी नोकऱ्यांमध्ये मात्र आपल्या अपेक्षेप्रमाणे आपली प्रगती जलद गतीने झालेली दिसत नाही. तथापि, काही प्रमाणात का होईना तेथेही आपला प्रवेश झालेला आहे. या बाबतीत पोलीस व सैन्याचा उल्लेख केला पाहिजे. पोलिस खाते अस्पृश्यांसाठी बंद होते. केवळ साध्या पोलीस शिपायाची जागासुद्धा अस्पृश्यांसाठी मोकळी नव्हती. निदान काही प्रांतात तरी ही परिस्थिती आता बदललेली आहे. आता आपल्याही लोकांची पोलिस दलात भरती करण्यात येते. सैन्याचाही मला उल्लेख केलाच पाहिजे. १८९२ पर्यंत सगळीकडे महार होते, इतकेच नव्हे तर महार सैनिकांची स्वतंत्र पथके होती. १८९२ च्या पुढे महारांचा सैन्यामधील प्रवेश बंद करण्यात आला. १९१४ चे महायुद्ध चालू असताना महारांची सैन्यात भरती करणे पुन्हा सुरू करण्यात आले व महार सैनिकांचे एक पथक उभारण्यात आले. युद्ध संपल्यानंतर ते पथक पुन्हा रद्द करण्यात आले. तथापि, आता आपली सैनिक पथके पुन्हा तयार करण्यात आली आहेत. आपल्या तरुणांना ऑफिसरच्या जागा देण्यात येत आहेत आणि आपल्या पाच-सहा तरुणांना राजपत्रित अधिकाऱ्याच्या जागा सैन्यामध्ये देण्यात आल्या असून तेथे त्यांना सन्मानाचे पद प्राप्त झालेले आहे. आपण केलेली सर्वात मोठी प्रगती आपल्या

स्त्रियांमध्ये आढळून येते. या परिषदेला वीस-पंचेवीस हजार स्त्रिया उपस्थित आहेत हे तुम्ही पाहातच आहात. या अस्पृश्य स्त्रिया आहेत असे कोणी तरी म्हणू शकेल काय ? आपल्या स्त्री वर्गाने केलेली प्रगती फारच आश्चर्यकारक व आपल्या चळवळीचे स्फूर्तिदायक असे स्वरुप आहे. अर्थात हे स्वरुप अत्यंत समाधानकारक असेच आहे. जिच्याबद्दल आपण सर्वांनी अत्यंत अभिमान बाळगावा अशी ही आपल्या प्रगतीची नोंद आहे. या प्रगतीबद्दल दुसऱ्या कोणाचेही आभार मानण्याचे मुळीच प्रयोजन नाही, अशी ही प्रगती आहे. हिंदू लोकांच्या दयेचा काही हा परिणाम नव्हे. पूर्णतः आपल्या श्रमांना आलेली ही फळे आहेत. ही प्रगती आता पुढेही कशी चालू ठेवावी हा प्रश्न आहे. हा असा प्रश्न आहे की, तो नेहमी स्वतःला विचारण्याचा आपणाला कधी विसर पडू नये. वेगवेगळया जातींच्या स्पर्धेमध्ये एखाद्या जातीची प्रगती झालेली दिसून येत असेल तर ती त्या जातीजवळ असणाऱ्या एखाद्या शक्तीचा केवळ परिणाम मात्र होय. ही शक्ती आर्थिक असेल, सामाजिक असेल किंवा राजकीय असेल. आपली प्रगती तशीच पुढे चालू ठेवण्यासाठी आपल्याजवळ शक्ती आहे काय ? आपल्याजवळ आर्थिक शक्ती आहे काय ? मला खात्री आहे की, आपल्याजवळ मुळीच नाही. आपण केवळ गुलामाची जात आहोत. आपणाजवळ सामाजिक शक्ती आहे काय ? मला खात्री आहे की, हीही आपल्याजवळ शून्यच आहे. मानव जातीचा अवमानित असा आपण एक भाग आहोत. म्हणूनच आपल्या सतत प्रगतीसाठी जिच्यावर आपण अवलंबून राहू शकू अशी एकच गोष्ट आहे व ती म्हणजे राजकीय शक्ती हस्तगत करणे. या शक्तीशिवाय आमचा सर्वनाश होईल. आमच्या मुक्तीचा तो एकच मार्ग आहे, याबद्दल मला तर मुळीच संदेह नाही. म्हणूनच या प्रश्नावर आपण सर्वांनी आपले लक्ष केन्द्रित केलेच पाहिजे. हा आपल्या जीवन मरणाचा प्रश्न आहे. राजकीय शक्ती हस्तगत करण्याच्या दृष्टीने आपले भवितव्य काय आहे ? आपणाला सहाय्यभूत असणाऱ्या व आपल्या विरोधी काम करणाऱ्या शक्तींचा थोडक्यात आढावा घेणे उत्तम होईल. अशा शक्तींची जाणीव झाल्यानंतर तुमचे पुढील धोरण आखणे तुम्हाला सोईचे होईल व एखाद्या गोष्टीला तुम्ही तावून सुलाखून मंजुरी द्याल.

माझ्या राजकारणाची गुरुकिल्ली कोणती हे सांगण्यापासून मी सुरूवात करतो. कदाचित ती तुमच्या परिचयाचीही असेल. तरीसुद्धा ती पुन्हा सांगणे उचितच आहे. अस्पृश्य लोक हिंदुंचा एक विभाग अथवा उप-विभाग नसून भारताच्या राष्ट्रीय जीवनातील तो एक स्वतंत्र आणि ठळक असा घटक आहे, हा सिद्धांत माझ्या राजकारणाचा पांया आहे. मुसलमान हिंदू समाजापासून जितके

स्पष्टपणे वेगळे आहेत, तितकेच अस्पृश्यही वेगळे आहेत आणि मुसलमानांप्रमाणेच हिंदुंपासून वेगळे असे राजकीय हक्क मिळण्याचा त्यांचा अधिकार आहे, ही माझ्या राजकारणाची गुरुकिल्ली आहे. हे जर नीट लक्षात ठेवले तर माझ्यासंबंधी किंवा माझ्या राजकारणासंबंधी कोणाचाही गैरसमज होणार नाही. माझ्या राजकारणाचा मुख्य पाया सांगितल्यानंतर आपल्या विभक्त राजकीय हक्कांना पूरक असणाऱ्या व मारक असणाऱ्या गोष्टींचा मी थोडक्यात आढावा घेतो. गोलमेज परिषदेपासून सुरवात करावयाची म्हटले तर ती एक फार भयंकर भानगड आहे व तेथे काय काय घडले हे तपशीलासह सांगून तुम्हाला मी त्रास देऊ इच्छित नाही. अस्पृश्यांसंबंधी तेथे काय घडले या पुरतीच मर्यादा मी घालून घेतो. तेथे म. गांधी आणि माझ्यात बराच गरमागरम वाद झाला. अस्पृश्य लोक हिंदूंचाच एक उप-विभाग आहेत असा गांधींनी तेथे जोराचा वाद घातला व परिणामतः ब्रिटिश सरकार जे काही राजकीय अधिकार भारतीय लोकांना देणार असेल ते सर्व अविभक्तपणे हिंदुंच्या हाती सोपविल्या जावेत, असे मत त्यांनी मांडले. कारण त्यांच्या मताप्रमाणे अस्पृश्यांच्या कल्याणाची जबाबदारी केवळ हिंदूच स्वीकारू शकतात. मी स्वीकारलेली विचारसरणी पूर्णतः भिन्न होती. राष्ट्रीय जीवनात अस्पृश्यांचा ठळकपणे स्वतंत्र असा घटक आहे असे मी प्रतिकारात्मक मत मांडले. स्पृश्य हिंदू अस्पृश्यांचे जन्मजात शत्रु असल्यामुळे ते अस्पृश्यांचे विश्वस्त होऊच शकत नाहीत. अस्पृश्यांची उन्नती करण्यासाठी राजसत्तेचा उपयोग करण्याऐवजी ते गुलामगिरी सतत कशी टिकून राहील यासाठीच तिचा उपयोग करतील आणि म्हणूनच अस्पृश्य आणि हिंदू यांचेकडे राजकीय हक्कांची विभागणी करणे अत्यंत आवश्यक आहे, अशातऱ्हेने अस्पृश्यांच्या हातात राजसत्ता येईल व स्वतःच्या कल्याणासाठी किंवा हिंदूंच्या जुलूमापासून व पिळवणुकीपासून आमचा बचाव करण्यासाठी तिचा उपयोग करता येईल. महात्मा आणि इतर हिंदुंनी आमच्या हक्कांचा पाडाव करण्यासाठी कोणकोणत्या हिकमती केल्या हे विस्ताराने सांगावे असे मला वाटत नाही. गोलमेज परिषदेत अस्पृश्यांचा विजय झाला व महात्म्याचा पराजय झाला इतके सांगितले म्हणजे पुरे. या चढाओढीचे फळ जातीय निवाड्याच्या रूपाने प्राप्त झाले. त्याचा सर्वात मोठा लाभ म्हणजे भारताच्या राष्ट्रीय जीवनात अस्पृश्यांचे पृथक अस्तित्व मान्य करण्यात आले व विभक्तपणे राजकीय हक्क मिळण्याचा त्यांचा अधिकार कबूल करण्यात आला. हे जातीय निवाड्याचे मुख्य महत्त्व होय.

प्रथम या जातीय निवाड्याला मि. गांधींनी मान्यता दिली नाही. इंग्रज सरकारने दिलेला आपला निर्णय बदलावा म्हणून त्यांनी आमरण उपोषण सुरू केले. परंतु अस्पृश्य लोक हिंदूंपासून स्वतंत्र घटक नाहीत व त्यांना स्वतंत्रपणे राजकीय अधिकार नाहीत हे सिद्ध करण्याची त्यांची धडपड गोलमेज परिषदेप्रमाणेच या उपवासातही अयशस्वी ठरली. गोलमेज परिषदेत मांडलेले माझे मुख्य तत्त्व त्यांना त्यांच्याच उपवासामुळे घडून आलेल्या पुणे करारामध्ये मान्य करावेच लागले.

पहिल्या फेरीत अस्पृश्यांनाच जय मिळाला. महायुद्ध सुरू झाल्यानंतर आणि भारतीय राजकारणात काँग्रेसला महत्त्वपूर्ण स्थिती प्राप्त झाल्यानंतरसुद्धा आमची स्थिती शाबूत होती. खरेच, अजूनही आमच्या हक्कांबद्दल शाश्वतीच होती व ८ ऑगस्ट १९४० रोजीच्या व्हाइसरॉयच्या निवेदनामुळे ती टिकून राहिली होती. अस्पृश्य आणि मुसलमान हे भारतीय राष्ट्रजीवनातील ठळक व स्वतंत्र घटक असल्यामुळे, ज्या राज्यघटनेला मुसलमान आणि दलितवर्गाचा पाठिंबा राहाणार नाही ती राज्यघटना ब्रिटिश सरकार लागू करणार नाही, असे त्या निवेदनात स्पष्ट करण्यात आले होते.

आपली स्थिती कितपत मजबूत आहे याविषयी मी आतापर्यंत बोललो. आपली ही स्थिती कमजोर करण्याकडे कोणकोणत्या शक्तींचा कल आहे हेही आता मी सांगितले पाहिजे. आपली स्थिती कमजोर करणाऱ्या गोष्टीपैकी एक अत्यंत घातक गोष्ट म्हणजे गांधी आणि गांधीवाद. पुणे करारावर सही करून मी श्री. गांधींचा जीव वाचविला आहे. परंतु आपल्या वचनाला जागण्याच्या हेतूने सभ्य माणसाप्रमाणे श्री. गांधींनी सही करून त्याचा स्वीकार केलेला नाही, तर एका कावेबाज माणसाने केवळ एका कठीण परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी केलेला तो एक करार आहे. कारण मी तुम्हाला आठवण करून देऊ इच्छितो की पुणे कराराने श्री. गांधींना जीवनदान दिले असताही त्यात असलेल्या तत्त्वांना त्यांनी कधीच प्रामाणिकपणे व खराखुरा रुकार दिलेला नाही. विभक्तपणे अस्पृश्यांना राजकीय अधिकार मिळू न देण्याचा त्यांचा दृढनिश्चय कायम टिकून आहे आणि आमच्या अधिकारांच्या विरोधी व आमची स्थिती कमजोर करण्यासाठी जे जे करणे शक्य असेल ते ते करण्याची त्यांची नेहमीच तयारी असते. श्री. गांधी हे आपले सर्वात मोठे प्रतिपक्षी आहेत हे तुम्ही नीट मनात बाळगावे, असे मला वाटते. शत्रु हा शब्द वापरण्यास पुरेसे समर्थन करता येण्यासारखे असले तरीही मला ते आवडत नसल्यामुळे ' शत्रु ' हा शब्द मी वापरला नाही. त्यांच्या कृत्रिम वाक्‌चातुर्याला आपणापैकी बरेच जण

फसतात. परंतु मी तुम्हाला बजावून सांगतो की तुमची बाजू कमजोर करणाऱ्या ज्या ज्या विरोधी बाजू आहेत व राजकीय स्वातंत्र्य मिळविण्यासाठी ज्या ज्या गोष्टींविरुद्ध तुमचे सैन्यबल तुम्हाला केन्द्रित करावयाचे आहे, त्यांच्यापैकी सर्वात प्राणघातक अशी जर कोणती शक्ती असेल तर ती श्री. गांधी होय. हे लक्षात घेण्यास तुम्ही विसरलात तर तुम्ही भयंकर चूक केली असे होईल. तुमची स्थिती कमजोर करणाऱ्या गोष्टीत दुसरा क्रमांक ब्रिटिश सरकारच्या झालेल्या वृत्तीबदलाला दिला पाहिजे. ८ ऑगस्ट १९४० च्या जाहीर निवेदनापर्यंत ब्रिटिश सरकारचा दृष्टिकोन अस्पृश्यवर्ग हा स्वतंत्र व ठळक घटक आहे व तो इतका ठळक व महत्त्वाचा घटक आहे की घटनेमधील कोणताही बदल ह्यांच्या संमतीशिवाय होऊ शकत नाही, असा होता. परंतु सर स्ट्राफर्ड क्रिप्स यांच्याबरोबर ज्या योजना त्यांनी पाठविल्या त्या पाहिल्या असता ब्रिटिश सरकारने पूर्णतः पाठ फिरविली असे दिसते, कारण सर स्ट्राफर्ड क्रिप्स यानी काहीही भीड-मुर्वत न ठेवता जाहीर करून टाकले की क्रिप्स योजनेत अंतर्भूत असलेला कोणताही घटनाविषयक बदल घडवून आणण्यास केवळ मुसलमान आणि हिंदुंची संमती पुरेशी आहे, अस्पृश्यांच्या संमतीची आवश्यकता नाही. स्पष्ट शब्दात सांगायचे म्हणजे भारताच्या राष्ट्रजीवनात अस्पृश्यांना स्वतंत्र महत्त्वाचा घटक म्हणून देण्यात आलेली मान्यता आता काढून टाकलेली आहे. सहा ते सात कोटी अस्पृश्यांचे केवळ काही महिन्यांच्या अवधीतच राष्ट्राचे मुख्य घटकत्व नाहीसे कसे होते ही गोष्ट कोणाच्याही आकलनाच्या पलिकडे आहे. ब्रिटिश सरकारने मारलेली ही कोलांटउडी आहे, अस्पृश्यांचा भयानक विश्वासघात आहे. या विश्वासघाताची कारणे कोणतीही असोत व ब्रिटिश सरकारच्या या अन्यायाबद्दल तुमच्या मनात कितीही तीव्र भावना निर्माण झालेल्या असोत, परंतु आपल्या पक्षाला पडलेला हा मोठा तडा आहे, ही गोष्ट ओळखली पाहिजे. विरोधी प्रकारची आणखी तिसरीही एक परिस्थिती आहे, की तिच्याकडेही आपले लक्ष वेधून घेण्यास मी विसरू नये. एक अशी वेळ होती की भारतातील विविध अल्पसंख्यांक जातींमध्ये जातीकल्याणावर आधारित एकात्मतेची भावना होती व त्यांच्यापैकी मुसलमान हा प्रमुख वर्ग होता. ही एकात्मता आता निघून गेलेली आहे. मुस्लिम लीगने मुसलमान लोकांच्या दृष्टिकोनात घडवून आणलेल्या बदलामुळे मुख्यतः हे घडून आलेले आहे. १९३७ च्या निवडणुकीनंतर जीनाद्वारे सजीव झालेल्या मुस्लिम लीगने मुसलमान वर्ग हा एक अल्पसंख्यांक वर्ग आहे, हे तत्त्व डोळयासमोर ठेवून कार्यवाहीला सुरुवात केली व अल्पसंख्यांक असल्यामुळे इतर अल्पसंख्यांकांची मदत घेऊन आपले अस्तित्व टिकवून ठेवण्याचा प्रयत्न केला. परस्परांनी केलेल्या सहकार्यातून निर्माण होणाऱ्या

शक्तीवर मुस्लिम लीगचा इतका दृढ विश्वास होता की, इतर अल्पसंख्यांकांच्या हिताचे कार्यही मुस्लिम लीगने स्वीकारले व त्यांच्या मागण्यांना पाठिंबा दर्शविणारे ठराव केले. अशातऱ्हेने केवळ मुसलमानांचीच ती बाजू येत नव्हती तर भारतातील सर्व अल्पसंख्यांकांची रक्षणकर्ती म्हणून मुस्लिम लीगने कार्य केले. लीगची ही वृत्ती निस्संदेहपणे अस्पृश्यांना फार उपकारक होती. अस्पृश्यांचीही वृत्ती अर्थात तशीच होती. परंतु लीगच्या वृत्तीमध्ये आता पूर्णतः बदल झालेला आहे. जेव्हापासून मुस्लिम लीगने पाकिस्तान संबंधीचा निर्णय जाहीर केला तेव्हापासून आता मुसलमान वर्ग हा भारतीय राष्ट्राचा एक घटक आहे असे लीग मानत नाही. ते एक स्वतंत्र राष्ट्र आहे, असे त्यांचे प्रतिपादन आहे. येथेच सर्व काही संपले असे नव्हे तर मुस्लिम लीग यापुढे जाऊन असे समजते की, भारतातील इतर जातींशी त्यांना काही एक कर्तव्य नाही. हिंदुंशीही काही कर्तव्य नाही व इतर अल्पसंख्यांक जातींशीसुद्धा काही संबंध नाही. मुस्लिम लीगच्या एकीचा अर्थ साधा आहे. ही एकी कोणत्याही तऱ्हेचा भेदभाव किंवा विचार न करता सर्व अ-मुसलमान लोकांविरूद्ध केलेली एकी आहे. मुस्लिम लीगच्या वृत्तीमध्ये झालेल्या या बदलाचा अस्पृश्यांच्या राजकारणावर गंभीर परिणाम झाल्याशिवाय राहू शकत नाही. याचा अर्थ असा की, अस्पृश्यांनी आपला एक सहकारी गमावलेला आहे. मुसलमान विरूद्ध अ-मुसलमान अशा तऱ्हेची नवीन विचारसरणीच केवळ मुस्लिम लीगने तयार केली असे नव्हे, तिने एक नवीन समीकरण निर्माण केले आहे, ते एक साधे समीकरण आहे. मुसलमानांची संख्या कितीही असो. ती अ-मुसलमानांच्या बरोबरीची आहे व म्हणून कोणत्याही राजकीय तडजोडीमध्ये मुसलमानांना अर्धा वाटा मिळालाच पाहिजे. या समीकरणाला कोणीही संमती देऊ शकत नाही. हे केवळ गणितविरोधीच नव्हे तर अस्पृश्यांसहित सर्व अ-मुसलमानांच्या कल्याणाच्या हे विरोधी आहे. मुस्लिम लीगच्या राजकीय धोरणात झालेला हा बदल लक्षात घेतला तर अस्पृश्यांनी आपला केवळ एक सहकारी गमावला एवढेच नाही तर त्यांचा एक मित्र नाहिसा झाला आहे. कारण ज्याअर्थी लीग प्रत्येक क्षेत्रात पन्नास प्रतिशत प्रतिनिधीत्व मागत आहे त्याअर्थी अस्पृश्य आणि मुसलमान यांच्यात विरोध निर्माण होईल, यात मुळीच संदेह नाही. भारतीय राजकारणात आपली स्थिती काय आहे, याबद्दल मी आपणाला कल्पना दिलेली आहे. त्याचप्रमाणे या स्थितीला सुरूंग लावण्यासाठी कोणकोणत्या शक्ती कार्य करीत आहेत याचीही आपणास कल्पना दिली. आता माझ्या मताप्रमाणे तुम्ही कोणत्या राजकीय मागण्या

मागाव्या या संबंधी कल्पना देऊ इच्छितो. या मागण्या तुम्ही अत्यंत स्वच्छ शब्दात तयार करणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे तुमची स्थिती स्पष्ट होईल. आपला कोणकोणत्या गोष्टींना पाठिंबा आहे, हे आपल्या लोकांना कळेल. आपल्या विरोधकांनाही आपल्या मागण्यासंबंधीची नोटीस मिळेल.

सर्वप्रथम, भारतीय राष्ट्रजीवनात स्वतंत्र व विभक्त घटक म्हणून आपणास ओळखण्यात यावे, असा आग्रह तुम्ही धरला पाहिजे. अस्पृश्य हे हिंदुंचा केवळ एक उप-विभाग आहेत, या विचारसरणीला तुम्ही नखशिखांत विरोध केला पाहिजे. हिंदुंपासून स्वतंत्र घटक म्हणून अस्पृश्यांना मान्यता मिळविण्यात जर अपयश आले तर ते हिंदुतच राहतील व त्यामुळे त्यांच्यावर गुलामगिरी लादल्या जाईल व हळूहळू त्यांची अधोगती होईल. पुढची गोष्ट म्हणजे अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी आपापल्या वार्षिक बजेटमधून राज्य सरकारांनी व मध्यवर्ती सरकारने एक रक्कम बाजूला काढून ठेवावी अशी घटनेमध्येच तरतूद करण्याची तुम्ही मागणी केली पाहिजे. अशातऱ्हेची मागणी तुम्ही फक्त प्राथमिक शिक्षणाकरताच नव्हे तर उच्च शिक्षणाकरिताही केली पाहिजे. नेतृत्वाच्या दृष्टिकोनातून आणि वरच्या दर्जाच्या सरकारी नोकरीच्या जागा भरण्याच्या दृष्टीने अस्पृश्यांना उच्च शिक्षणाची अतिशय आवश्यकता आहे. तिसरे म्हणजे सरकारी नोकऱ्यांमध्ये अस्पृश्यांसाठी काही ठराविक जागा राखून ठेवण्यात याव्यात व या जागा आवश्यक त्या कमीतकमी पात्रतेच्या नियमाप्रमाणे भराव्या हे अत्यावश्यक आहे. कारण आम्ही, वाईट कायदे असल्यामुळे, यातना भोगतो आहोत असे नव्हे तर वाईट शासनामुळे आम्हाला यातना भोगाव्या लागत आहेत. हे शासन केवळ हिंदू जातींच्या हाती असल्यामुळे वाईट झाले आहे. हे हिंदू सामाजिक पूर्वग्रह शासनातही घेऊन जातात व तत्त्वतः अस्पृश्यांना मिळावयास हवा असणारा लाभ कोणते तरी कारण दाखवून ते त्यांना सतत मिळू देत नाहीत. जेथपर्यंत तुमचे शासन चांगले नाही तेथपर्यंत चांगले कायदे तुमचे काहीच कल्याण करू शकत नाही आणि अस्पृश्यांपैकी काही लोक सरकारी नोकऱ्यांच्या पदावर जेव्हा जातील तेव्हाच तुम्हाला चांगले शासन मिळेल. कारण हे लोक, हिंदू अधिकारी अस्पृश्यांशी कशा तऱ्हेचे आचरण करीत आहेत यावर नजर ठेवून त्याला आळा घालतील व काही टवाळकी करण्यापासून त्यांना रोखतील. तथापि, केवळ राखीव जागांसाठी मागणी करणे पुरेसे नाही तर ह्या राखीव जागा ठराविक काळाच्या आत भरल्या जाव्या असा आग्रह धरणेही अत्यंत आवश्यक आहे. केवळ राखीव जागांपेक्षा याचे महत्त्व अतिशय आहे. कारण तुम्ही काळ निश्चित केल्याशिवाय राखीव जागा अस्तित्वात येणारच नाहीत. काही तरी कारणे दाखवून टाळाटाळ केल्या जाईल व अर्थातच

नेहमीच्याच पण अतर्क्य कारणामुळे आपल्यामध्ये कोणी लायक उमेदवारच सापडणार नाही ! आपणा सर्वांना माहीतच आहे की, नेमणूक करणारा अधिकारी जर एखादा हिंदू असेल तर अस्पृश्यांमध्ये कोणीही योग्य उमेदवार नसतोच ! चवथी गोष्ट म्हणजे, केंद्रीय आणि प्रांतिक शासनामध्ये अस्पृश्यांना प्रतिनिधित्व मिळण्यासाठी तुम्ही आग्रह धरला पाहिजे. हे मूलभूत उपाय आहेत. ज्या लोकांच्या हाती ही मूलभूत शक्ती आहे, ते परिस्थितीला हवी तशी वाकवू शकतात. अत्यंत भयावह अशा सामाजिक चेष्टांनाही ते आळा घालू शकतात व केवळ तेच सामाजिक, राजकीय व आर्थिक बाबतीत हितकर असे बदल घडवून आणू शकतात. या गुरुकिल्लीच्या जागी आपले प्रतिनिधी ठेवण्यात आलेच पाहिजेत असा अस्पृश्यांनी आग्रह धरावा. यावेळी ही गोष्ट आश्वासनांवर किंवा रूढीवर मुळीच सोपविल्या जाऊ नये. परिस्थितीनुरूप हिंदुंनी दिलेल्या वचनावर मुळीच विश्वास ठेवू नये. या संबंधी घटनेमध्ये तरतूद केली जावी, यावर दक्षतेने तुम्ही लक्ष दिले पाहिजे.

अस्पृश्यांनी जिच्यासाठी आग्रह धरावा अशी एक शेवटची मागणी आहे. ती शेवटची असली तरी कोणत्याही दृष्टीने तिचे महत्त्व कमी नाही. खरेच, माझी तर अशी खात्री आहे की, ती अत्यंत महत्त्वाची मागणी आहे. इतकेच नव्हे तर इतर सर्वांपेक्षाही ती अधिक महत्त्वाची आहे. हिंदुंच्या खेड्यांव्यतिरिक्त अस्पृश्यांच्या स्वतंत्र व विभक्त अशा नवीन वसाहती स्थापन करण्याच्या योजनेसंबंधी मी बोलत आहे. इतक्या हजारो वर्षांपासून अस्पृश्य लोक हिंदुचे दास व गुलाम होऊन का राहिलेले आहेत ? माझ्या मते या प्रश्नाचे उत्तर हिंदू खेड्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेमध्ये आहे. सर्व भारतात जवळ जवळ सात लक्ष खेडी पसरली आहेत. हिंदुंच्या या प्रत्येक खेड्याला अस्पृश्यांची एकेक लहानशी वसाहत जोडलेली आहे. त्या खेड्यातील हिंदुंच्या लोकसंख्येच्या मानाने अस्पृश्यांची संख्या फारच लहान आहे. दुसरी गोष्ट म्हणजे या अस्पृश्यांच्या वसाहतीजवळ आर्थिक साधने नाहीत आणि प्रगतीची त्यांना संधीही नाही. ही कायमची भूमिहीन लोकांची वसाहत असते. अस्पृश्य असल्यामुळे ते कोणतीही वस्तू विकू शकत नाहीत. कारण अस्पृश्यांपासून कोणीही काहीही विकत घेत नाही. ही वसाहत पूर्णतः कंगालांची, पोटासाठी हिंदू लोकांवर अवलंबून असलेली वसाहत असते. ती भिक्षेवर किंवा क्षुल्लक मजुरीवर काम करून कसाबसा उदरनिर्वाह करीत असते. अशा परिस्थितीत अस्पृश्य शेकडो वर्षे केवळ अवमानित अवस्थेत का राहिले असतील याची कल्पना सहज करता येण्यासारखी आहे. कारण हिंदुंच्या विरोधी काही प्रतिकार करणे अस्पृश्यांना

अशक्य झाले. संख्येने ते लहान असतात व आर्थिकदृष्टीनेही गरीब असतात. जेथपर्यंत सध्याच्या रूपात ही खेडेपद्धती अस्तित्वात आहे तेथपर्यंत अस्पृश्यांना स्वातंत्र्य प्राप्त होणार नाही. मग ते सामाजिक असो कि आर्थिक असो व सामाजिक आणि आर्थिक पारतंत्र्यामुळे त्यांच्यात निर्माण झालेला हीनगंड कधीही नाहीसा होणार नाही. म्हणूनच ही खेडेपद्धती मोडून टाकली पाहिजे. या खेडे पद्धतीमुळे हिंदुंनी अस्पृश्यांवर गुलामगिरीची जी मगरमिठी बसवली आहे तीतून अस्पृश्यांची मुक्त होण्याची खरी इच्छा असेल तर त्यांना हा एकच मार्ग मोकळा आहे. केन्द्रीय सरकारच्या खर्चाने केवळ अस्पृश्यांना नवीन स्वतंत्र वसाहती स्थापन करण्याची तरतूद घटनेतच करावयास पाहिजे, याबद्दल तुम्ही आग्रह धरावा, अशी माझी सूचना आहे. सरकारच्या मालकीची शेती करण्याजोगी बरीचशी जमीन आहे व ती अजून कोणाच्याही ताब्यात नाही. अस्पृश्यांची नवीन खेडी निर्माण करण्याच्या योजनेला प्रत्यक्षात उतरविण्यासाठी ही जमीन राखून ठेवल्या जाऊ शकते. लोकांकडे पडित असलेली खाजगी मालकीची जमीनही सरकार विकत घेऊ शकते व तिचा उपयोग या उद्देश्यपूर्तीसाठी करू शकते. सध्याच्या राहाण्याच्या ठिकाणासून या नव्या गावी जाण्यासाठी व स्वतंत्र शेतकरी म्हणून स्थायिक होण्यासाठी अस्पृश्यांचे मन वळवणे कठीण नाही. याला काही वेळ लागेल पण त्यामुळे काही बिघडत नाही. हे इतके महत्त्वाचे आहे की, खुद्द घटनेनेच केंद्रीय सरकारवर ही योजना अंमलात आणण्याची जबाबदारी टाकली पाहिजे.

ज्याच्यासंबंधी चार शब्द सांगितलेच पाहिजेत असा आणखी एक मुद्दा आहे. भारतातील सर्व अस्पृश्यांची मुख्य संघटना म्हणून काम करणारी अखिल भारतीय स्वरूपाची केंद्रीय राजकीय संस्था स्थापन करणे, हाच तो मुद्दा होय. आपण आपल्या प्रांतिक संस्थांच्याद्वारे आपल्या राजकीय चळवळी करीत आलो आहोत. मला तर असेही आढळून आले की, प्रांतामध्येसुद्धा अनेक राजकीय संस्था आहेत. एखाद्या महत्त्वाकांक्षी माणसाची अध्यक्ष किंवा सेक्रेटरी होण्याची इच्छा असली म्हणजे तो संस्था स्थापन करतो व तिचा अध्यक्ष किंवा सेक्रेटरी बनतो. त्या संस्थेचे नाव त्याचे अध्यक्ष किंवा सेक्रेटरी म्हणून नाव कागदावर छापून आणण्याच्या पलिकडे काही करण्याची त्याला आवश्यकताच भासत नाही. हा अनागोंदी कारभार आहे. याला तुम्ही एकदम आळा घातला पाहिजे. हे केवळ एका उपायाने होऊ शकते व तो म्हणजे प्रांतिक शाखासहित अखिल भारतीय स्वरूपाची ही एक संस्था आपण उभारली पाहिजे व सध्या

अस्तित्वात असलेल्या सर्व संस्था रद्द केल्या पाहिजेत. तुम्हाला आवश्यक असलेली शक्ती यामुळे तुम्हास मिळेल व एकत्रित आघाडी उभारण्यासाठी मदत होईल. अशारितीने कार्य करण्यास तुम्ही समर्थ व्हाल. योग्य त्या कळकळीने हा प्रश्न तुम्ही हाताळाल अशी मला आशा आहे.

अस्पृश्यांच्या समस्येसंबंधी माझे विचार व भावना मी तुम्हाला सांगितलेल्या आहेत. मला आशा आहे की, तुम्ही यावर नीट विचार कराल.

भाषण संपविताना युद्धासंबंधी आपली वृत्ती कोणती यावर बोलणे बरे होईल. सुरुवातीपासून सरकारच्या युद्धप्रयत्नांना आपला पाठिंबा आहे. मला खात्री आहे की, आपला पुढेही त्याला पाठिंबाच राहील. आमच्या काही राजकीय मागण्या आहेत. त्याच्यासंबंधी आम्ही आग्रह धरतो. त्या पूर्णही होतीलच. परंतु आमच्या मागण्या पूर्ण झाल्या पाहिजेत अशातऱ्हेची कोणतीही अट न घालता आम्ही सरकारच्या युद्ध प्रयत्नांना पाठिंबा दिलेला आहे. पण याचा अर्थ युद्धाच्या यशस्वी अंतापेक्षा आम्ही आमच्या मागण्यांना कमी महत्त्व देतो असा नव्हे. आम्ही युद्धाला पाठिंबा देताना कोणत्याही प्रकारची अट घातली नाही याचे कारण त्या युद्धाचा शेवट अयशस्वी झाल्यास जी परिस्थिती निर्माण होईल तिच्यापेक्षा युद्धाचा शेवट यशस्वी झाल्यानंतर निर्माण होणारी परिस्थिती आमचे राजकीय प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने उपकारक होईल असे आम्हाला वाटते. हे लोकशाही आणि हुकूमशाही यामधील युद्ध आहे. ती सुद्धा उदारमतवादी कल्याणकारक हुकूमशाही नव्हे तर ती अत्यंत रानटी स्वरुपाची हुकूमशाही होय. तिचा पाया नीती नसून वांशिक उद्धटपणा आहे. पूर्णतः नायनाट करून टाकण्याजोगी जर कोणती हुकूमशाही असेल तर ती हीच नीच नाझी हुकूमशाही होय. नाझीझमचा विजय झाल्याने जी भयंकर विपत्ती ओढवणार आहे तेवढी भयंकर गोष्ट अजून घडली नाही व भविष्यातही कदाचित दुसरी घडणार नाही, हे आपण विसरून जाण्याची शक्यता आहे. तिचा वंशावर आधारलेला पाया हा भारतीय लोकांना अधिक धोकादायक ठरणार आहे ही फार महत्त्वाची बाब आहे. परिस्थिती संबंधीचे हे विचार जर बरोबर असतील तर या जगाच्या पाठीवरून माणसामाणसातील संबंधाचे योग्य पालन करविणारे लोकशाहीचे तत्त्व लुप्त होऊ नये म्हणून लक्ष देणे आपले जबरदस्त कर्तव्य ठरते असे मला वाटते. आपला जर त्यावर विश्वास असेल तर आपण त्याशी एकनिष्ठेने व सत्याने वागले पाहिजे. आपला लोकशाहीवर खंबीर विश्वास असूनच भागणार नाही, तर समता, स्वातंत्र्य आणि बंधुभाव या तत्त्वांचा मुळासह नाश करणाऱ्या लोकशाहीच्या शत्रुला कोणत्याही कृत्याने आपण मदत करणार नाही, असा

आपण दृढनिश्चय केला पाहिजे, या प्रश्नावर सर्वांचे एकमत आहे अशी मी आशा करतो व जर तुमचे माझ्याशी सहमत असेल तर हे ओघानेच येते की, लोकशाही संस्कृतीच्या पायाचे रक्षण करण्यासाठी इतर लोकशाही देशासोबत आपण जोराचा प्रयत्न केला पाहिजे. जर लोकशाही जिवंत राहिली तर तिची फळे नक्कीच आपणास लाभतील. जर लोकशाही मेली तर तो आपला विनाश आहे, यासंबंधी शंकाच नको.

या प्रसंगी अधिक सांगावे असे काही नाही. तुम्हामध्ये मिसळल्यामुळे मी आनंदी झालो आहे. भूतकाळाप्रमाणेच भविष्यातही तुमची सेवा करण्याने आनंदच प्राप्त होईल. आपण सर्वांनी एकत्रितपणे कष्ट केले व जोरदार प्रयत्न केला तर आपणाला अपयश येणार नाही, कारण आपले कार्य न्यायाचे व मानवी हिताचे आहे.'' [१]



[१] डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक– मा. फ. गांजरे खंड-१, पुनर्मुद्रण १९८६ पृ. ८०-९२.

# १९५

# शिक्षित व्हा, चळवळ करा, संघटित व्हा, आत्मविश्वास बाळगा, कधीही धीर सोडू नका ही आमच्या जीवनाची पंचसूत्री

नागपूर येथील १९४२ च्या अ. भा. दलित वर्ग परिषदेच्या अधिवेशन प्रसंगी दिनांक २० जुलै रोजी परिषदेच्या स्वागत मंडळाच्या वतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना भावपूर्वक मानपत्र अर्पण करण्यात आले होते. प्रस्तुत मानपत्रात दलित वर्गाच्या उत्थान व उद्धाराकरिता संघर्षमय लढा उभारून त्यांच्या राजकीय, सामाजिक हक्कांच्या मागणीकरिता डॉ. आंबेडकरांनी सतत वीस वर्षे जी स्वाभिमानी चळवळ चालविली आणि अखिल दलित वर्गाची एका संघटनेखाली सर्व शक्ती एकसंघ केली याबद्दल त्यांचा गौरव करण्यात आला होता, तसेच व्हाइसरॉयच्या कौंसिलचे सभासद म्हणून नवीन जबाबदारीच्या पदावर त्यांची नुकतीच नेमणूक झाल्याबद्दल त्यांचे गौरवपूर्वक अभिनंदन करण्यात आले होते. ते पुढे दिले आहे–

ADDRESS
PRESENTED
To

THE HON'BLE DR. B. R. AMBEDKAR
M. A., Ph.D., D. Sc., J.P., Barrister-at-law,
Member of The Executive Council, of H. E. the Viceroy.
OUR MOST BELOVED BABASAHEB.

We, the Chairman and Members of the Reception Committee of the third All India Depressed Classes Conference held at Nagpur, beg respectfully to present you this address on the occasion of your having completed the 50 th year of your age, in token of our grateful appreciation of your long sustained and untiring zeal and work in the cause of the downtrodden dumb millions of India.

This year is, by coincidence, a most important one in the history of the Depressed Classes of India, inasmuch as you have completed the 50 th year of your age and you have now changed your sphere of work from active politics to the executive. If your life history is anything, it is nothing but the history of the progress of the oppressed millions and sacrifice of one individual. You are not only an individual to us but an institution. You are our sole guide, friend and philosopher; nay, you are the only prop of the Depressed Classes. Your continuous and sustained efforts in the just and righteous cause for the uplift of our classes

---

विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास : एच. एल. कोसारे, पृ. ४१६, १७.

are really the means of such benefits as we have so far achieved.

A budding lawyer as you were, with a vast future, you risked your all by throwing yourself whole-heartedly in the struggle for relieving the distressed from the oppressed. In doing so, you did not halt to realise that you were antagonising your future clients, viz. the touchable Classes, for a fight in the interests of the Depressed Classes, is a fight against the so called caste Hindus. Little did any one then realise that your efforts, in a short space of two decades, would result in the recognition of the rights of the Depressed Classes as a living entity necessitating a seat on the highest Executive of the country.

The procession from the Railway Station Nagpur to the Conference Pandal and the grand attendance at the Conference Session are testimony of the extent to which you are held in esteem by the people of our Communities. This spontaneous expression is but a little expression of the devotion of our classes to you for what you have done. You are more than a creator to us. We were thrown by the creator in a bottom-less abyss, but unlike him you have done everything to lift us up out of it.

We can find in history no equal to you in respect of your head and heart, who for no other reason than service to our classes, has been as liberal as you, in keeping open the purse freely and devoting all life and energy for our cause. Words fail us to open our hearts and give expression to our feelings. Suffice it to say that if there be any living God on earth, he is personified in you.

We again offer you our sincere and heartfelt gratitude and wish you a long life so that your mission on this earth may be fulfilled.

WE BEG TO REMAIN,
Our Most beloved BABA SAHEB,
Your most grateful and devoted followers,
CHAIRMAN and MEMBERS
of the Reception Committee of the
All India Depressed Classes Conference.

NAGPUR.
The 20th July, 1942.

सदरहू मानपत्राला उत्तर देताना डॉ. आंबेडकर म्हणाले,

ह्या प्रकारचे मानपत्र मला देण्याची काही आवश्यकता आहे याचे मला नवल वाटते. शुभचिंतन (Toasts) व मानपत्र (Address) यांच्या पाठीमागे एक विशेष इतिहास आहे, विशेषतः शुभचिंतन–आरोग्यचिंतन याच्या पाठीमागे तर आहेच. इंग्लिश समाजामध्ये राजाच्या आयुरारोग्य शुभचिंतनाचा रिवाज असल्याचे आपणास दिसून येते. ही प्रथा गृहयुद्धानंतर व पुन्हा प्रस्थापित झालेल्या काळात सुरू झाली. मुळात ही प्रथा दबावाखाली सुरू झाली आणि राजाविरूद्ध बंडाळी करणाऱ्या इंग्रज सैनिकांवर ती बळजबरीने लादण्यात

आली. नवीन राजावर आपली राजनिष्ठा व्यक्त करण्याकरिता त्यांना राजाला आयुरारोग्य चिंतन करावे लागत असे. राजाला आयुरारोग्य चिंतिणे ही आता सर्वसामान्य बाब झाली आहे व त्या प्रथेचे मूळ काय हे शोधण्याची कोणाला गरजही वाटत नाही. मी सांगितल्याप्रमाणे, या प्रथेचे मूळ, ज्यांची निष्ठा शंकास्पद वाटते त्यांनी स्पष्टपणे ती राजनिष्ठा जाहीररीत्या व्यक्त करावी, या हेतूत आहे. तुमची निष्ठा संशयातीत आहे याची जाण मला असल्यामुळे ती पुन्हा अशा मानपत्राद्वारे तुम्ही व्यक्त करण्याची काहीच आवश्यकता नव्हती. आता हे मानपत्र स्वीकारावे असा तुम्ही मला आग्रह धरला आहे. माझ्या विषयी तुमच्या मनात वसत असलेल्या प्रेम व आदर या सद्भावनांचे प्रतीक म्हणून या मानपत्राचा मी स्वीकार करतो. दलित वर्गाकरिता मी जे काही केले आहे ते तुम्हाला मान्य झाले असल्याचेच हे प्रतीक मी समजतो. भारतातील अस्पृश्य वर्गाच्या वतीने भारतीय राजकारणात मी त्यांची बाजू उचलून धरताना जे धोरण स्वीकारले आहे त्याला तुमचा पाठिंबा आहे असे या मानपत्रावरून प्रमाणित होते. या देशाचे शासन चालविण्यात हिंदू व मुसलमान यांच्या बरोबरीचे सन्माननीय भागीदार-सन्माननीय व समान स्तरावरील भागीदार– म्हणून अस्पृश्य वर्गाला मान्यता मिळावी हे आपले ध्येय आहे. आपण जे ध्येय ठरविलेले आहे ते मिळविण्यासाठी मी निर्धाराने झटेल असे मी आपणास आश्वासन देतो.

ध्येयसिद्धीकरिता मी झटेल अशा प्रकारच्या माझ्या आश्वासनाची तुम्हाला कमीच गरज आहे. वस्तुतः तुमच्याच आश्वासनाची मला अतिशय गरज आहे. तुम्ही माझ्याबद्दल प्रेम व आदर व्यक्त केला आहे, त्याची काहीच आवश्यकता नव्हती. मला तुमच्याकडून दुसऱ्याच प्रकारचे आश्वासन पाहिजे आहे. ते आश्वासन म्हणजे शक्ती, ऐक्य व आपल्या हक्कांच्या बाजूने उभे राहण्याचा, आपल्या हक्कांकरिता लढण्याचा आणि आपले हक्क मिळवून विजयी होईपर्यंत कधीही माघार न घेण्याचा तुमचा निर्धार ! ही तुमची जबाबदारी पार पाडण्याकरिता तुम्ही वचनबद्ध झाले पाहिजे. मी आपल्या कर्तव्याकरिता वचनबद्ध आहे. न्याय आपल्या बाजूने असल्यावर आपण हा लढा हारण्याचे काहीच कारण मला दिसत नाही. संग्राम माझ्या जीवनातील विशेष आनंददायी पर्व आहे. हा संग्राम पूर्णार्थाने आध्यात्मिक आहे. यात भौतिक अथवा नीच असे काहीही नाही. कारण आपला हा संग्राम म्हणजे संपत्तिकरिता किंवा सत्तेकरिता संग्राम नव्हे. स्वातंत्र्याकरिता हा संग्राम आहे. मानवी व्यक्तित्वाच्या विकासाकरिता हा संग्राम आहे. जे मानवी व्यक्तित्व हिंदू समाजव्यवस्थेमुळे चिरडून व छिन्नभिन्न करण्यात आले आणि या राजकीय लढ्यात हिंदू जिंकले

व आपण हारलो तर आपण कायमचे चिरडले जाऊ व त्यांचे दमन सतत चालू राहील. माझा तुम्हाला शेवटी हाच हितोपदेश आहे ; शिक्षित व्हा, चळवळ करा (लढा उभारा), संघटित व्हा, आत्मविश्वास बाळगा आणि कधीही धीर सोडू नका ! तुम्ही माझ्या बरोबर राहाणार आहात याची मला जशी जाणीव आहे तसेच मी सुद्धा तुमच्याबरोबर सदैव राहाणार आहे.



## १९६

# ब्राह्मणशाहीला प्राणघातक ठोसा

दिनांक १८ आणि १९ जुलै १९४२ रोजी नागपूर येथे आयोजित अखिल भारतीय दलित वर्ग परिषदेत समारोपाचे भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

मित्रांनो,

मागच्या दहा वर्षात राजकीय चळवळींना मोठी गती आलेली आहे. तथापि, अस्पृश्यांचा जेथपर्यंत संबंध आहे तेथपर्यंत पाहाता तुम्ही आज जे ठराव पास केलेले आहेत त्यांनी अस्पृश्यांच्या नव्या युगाला सुरुवात झाली आहे, अशी मला खात्री आहे. तुम्हाला माहितच आहे की, उद्यापासून मी माझ्या नव्या ऑफिसची जबाबदारी स्वीकारणार आहे. म्हणून माझ्या मागील वीस वर्षाच्या मुखत्यारपदाचा हिशेब तुम्हास सादर केला.

मुसलमान आणि अस्पृश्य हे अल्पसंख्यांक समजल्या जात असले तरी त्यांच्या परिस्थितीत भक्कम असे अंतर आहे हे स्पष्ट केलेच पाहिजे. आपल्या जातीच्या मानाने मुसलमान जात अत्यंत श्रीमंत आहे. ब्रिटिश येईपर्यंत ते या देशाचे राज्यकर्ते होते. अशा तऱ्हेने त्यांच्यामागे उच्च असा दर्जा आहे व आपल्यापेक्षा त्यांची प्रगती कितीतरी अधिक झालेली आहे. शेकडो वर्षापासून आपली पिळवणूक झालेली आहे. आत्यंतिक दारिद्र्य ही आपली आर्थिक स्थिती आहे. केवळ एकट्या लोकसंख्येवरून आपली तुलना आपण मुसलमानांशी करू शकत नाही. पुर्णतः आपल्याच प्रयत्नांवर सुरुवातीपासून अवलंबून राहून आपणाला कार्य केले पाहिजे. आपणाला आपल्या जातीचा उद्धार करावयाचा आहे. माझ्या या नवीन नेमणुकीमुळे ही माझी जबाबदारी मला दुसऱ्याच्या खांद्यावर सोपवावी लागत आहे. अधिकारासंबंधी (office) मला मुळीच आवड नाही. मी चांगला सुरळीत होतो. साध्या 'डॉ. आंबेडकर' मध्ये आणि 'नामदार डॉ. आंबेडकर' मध्ये काही फरक आहे असे मला वाटत नाही. माझ्या नेमणुकीसंबंधी अधिक महत्त्वाचे मला वाटते ते हे की गव्हर्नर जनरलच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलवर दलित वर्गाच्या प्रतिनिधीसाठी एक जागा ठेवलीच पाहिजे अशी आता रूढी स्थिर झालेली आहे. ब्राह्मणशाहीला हा प्राणघातक ठोसा आहे. माझ्या नेमणुकीचे महत्त्व येथे आहे. अशा तऱ्हेचा प्रघात पडणे ब्राह्मणशाहीला मुळीच पथ्यकारक नाही. मला वाटते अस्पृश्यांचा हा फार मोठा विजय आहे.

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक–मा. फ. गांजरे, खंड एक, पुनर्मुद्रण १९८६, पृष्ठ ९२-९४.

माझ्यासंबंधी ज्यांची मते चांगली नाहीत असे बरेचसे लोक आहेत. वाचनात वेळ घालवून एकाकी जीवन जगणे हा माझा स्वभाव आहे. अशा माझ्या स्वभावाबद्दल पुष्कळांना असे वाटते की, मी लोकांशी नीट न वागता त्यांना टाळतो याचा हा पुरावाच आहे. मी तुम्हाला खात्रीपूर्वक सांगू इच्छितो की कोणाचाही कसलाही अपमान करावा अशी माझी मुळीच इच्छा नसते. माझे आयुष्य फार मर्यादित आहे. मला पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत व मदतनीस तर नाही.

पुष्कळ हिंदू माझ्याकडे शत्रुत्वाच्या नजरेतून पाहतात. मी त्यांच्या भावना दुखविण्याइतके कठोर बोलतो अशी त्यांची तक्रार आहे. परंतु माझे हृदय अत्यंत कोमल आहे हे मला माहीत आहे. ब्राह्मणांमधून सुद्धा मला पुष्कळ मित्र आहेत. तथापि, कोमल हृदयाच्या माणसाने सुद्धा सत्य बोलून दाखविलेच पाहिजे. आपल्या अत्यंत प्रिय अशा आप्तेष्टांना कुत्र्यापेक्षाही वाईट वागविल्या जात असताना आणि त्यांची पुढील प्रगतीची द्वारे सर्व तऱ्हेने बंद झालेली आहेत हे दिसत असताना मी हिंदुंशी दयाळूपणाने वागावे अशी ते अपेक्षा तरी कशी करू शकतात ? सध्याच्या हिंदू पिढीने यासंबंधी काही केलेले नाही हे मला कळते. म्हणूनच माझ्या भावना आवरून माझ्या विरोधकांशीही सन्मानपूर्वक वागण्याचा मी प्रयत्न करतो. माझ्या विरोधकांशी माझी वागणूक दुष्टपणाची कधीच नसते. परंतु त्यांचे अपराधी मन खात असते.

या देशात राजकीय हक्क हिंदू, मुसलमान व दलित वर्ग यांच्यामध्ये विभागल्या जावेत असे माझे निश्चित मत आहे. हिंदू आणि मुसलमानासमवेत दलित वर्गालाही शासनामध्ये योग्य तो वाटा कायद्याने मिळाला पाहिजे. या तीन खांबाचा आधार असला तरच भविष्यकालीन घटना योग्यपणे कार्य करू शकेल. हे प्राप्त करून घेण्यासाठी तुम्ही सर्वांनी एका निशाणाखाली संघटित झाले पाहिजे व केवळ एकच संघटना केली पाहिजे. आतापर्यंत आपल्या वाट्याला येणारे अधिकार घटनेमध्ये आपणाला प्राप्त झाले नाहीत, यास एकमेव कारण म्हणजे आपण अजून संघटित झालेलो नाही हेच होय. तुम्ही सर्व संघटित झालात व एका संस्थेखाली कार्य करू लागलात तर तुमच्या अधिकारपात्र अशा स्थितीला तुम्ही पोहचाल, याबद्दल मला मुळीच संदेह नाही.

कॉंग्रेस ही एक फार मोठी संघटना आहे. तिचा प्रभाव फार दूरवर पसरला आहे. कोणीही सहजच विचारतो की आपल्या संघटनेचा प्रचार असा दूरवर का पसरला नाही. कॉंग्रेसच्या हाताशी दोन गोष्टींची सुविधा आहे. कॉंग्रेसच्या पाठीशी भारतातील सर्व छापखाने उभे आहेत. त्यामुळे तिला पूर्णतः प्रसिद्धी मिळते. आपणाला तथाकथित राष्ट्रीय हिंदू वर्तमानपत्रातून प्रसिद्धी मिळत नाही. दुसरी गोष्ट कॉंग्रेसच्या हाताशी पैसा आहे. तुम्हाला आठवत असेल

की कॉंग्रेसने एक कोटी रुपयांचा फंड जमविला आहे. तिच्या यशाचे रहस्य या अवाढव्य फंडात आहे. परंतु आपल्या जातीच्या कार्यासाठी मी कधीच फंड मागितलेला नाही. जी काही संघटना व प्रगती आपण केली आहे ती कोणत्याही फंडाच्या मदतीशिवाय केलेली आहे. परंतु आपले संघटन करण्याच्या दृष्टीने फंड गोळा करणे अत्यंत आवश्यक आहे हे मी तुम्हास सांगितलेच पाहिजे. फंडाशिवाय आपला समाज पुढे वाटचाल करण्यास असमर्थ ठरेल व आधीच सुसंघटित झालेल्या जातीच्या बरोबरीने चालणे आपणास कठीण जाईल.

सार्वजनिक जीवनात चुका घडतातच पण त्यामुळे आपली हिम्मत खचू देऊ नये. चुकांच्या द्वारेच आपणास आपले दोष दिसून येतात व मगच आपण ते घालवू शकतो.

अखिल भारतासाठी एक संघटना असावी असा जो ठराव तुम्ही पास केला आहे तो पाहून मला अत्यंत आनंद झाला आहे. प्रत्येक प्रांतात तिच्या शाखा आता तुम्ही स्थापन कराव्या. सध्या अस्तित्वात असलेल्या सर्व संघटना या अखिल भारतीय संस्थेमध्ये विलीन होतील इकडे तुम्ही लक्ष दिले पाहिजे.

कार्यालय व चळवळीचे केन्द्र म्हणून प्रत्येक प्रांतातच नव्हे तर प्रत्येक शहरी आपल्या संघटनेच्या इमारती असाव्यात अशी माझी मोठी अपेक्षा आहे. काल रात्री वेळयाच्या दशरथ पाटलांशी मी बोलत होतो. नागपूरमध्ये एखादा जमीनीचा तुकडा विकत घेऊन आपल्या संस्थांसाठी एक इमारत बांधण्यास मी त्यांना सांगितले. वीस ते पंचवीस हजाराच्या रकमेत तुम्ही हे करू शकाल. अशा तऱ्हेची इमारत तुम्ही नागपूरला बांधण्याची सिद्धता करू शकलात व इमारतीची कोनशिला बसविण्यासाठी मला निमंत्रण दिलेत तर हे निमंत्रण स्वीकारण्यात मला फार मोठा संतोष वाटेल.



## १९७

# स्त्रियांच्या प्रगतीवरच समाजाची प्रगती अवलंबून

दिनांक २० जुलै १९४२ रोजी नागपूर येथे आयोजित ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस वुईमेन्स कॉन्फरन्स मध्ये महिलांना उद्देशून डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

या प्रसंगी तुमच्या परिषदेत बोलताना मला आनंद होत आहे. दलित वर्गाच्या प्रगतीची व कल्याणाची इच्छा बाळगणाऱ्या माणसाला हा स्त्रियांचा समुदाय पाहून जेवढा आनंद होईल त्यापेक्षा अधिक आनंद दुसऱ्या कोणत्याही प्रसंगी होणार नाही. तुम्ही इतक्या २० ते २५ हजारांच्या संख्येने येथे उपस्थित राहाल ही गोष्ट दहा वर्षापूर्वी कल्पना सुद्धा करण्यासारखी नव्हती. स्त्रियांच्या संघटनेवर फार मोठा विश्वास ठेवणारा मी माणूस आहे. त्यांना जर विश्वासात घेतले तर समाजाची सुधारणा करण्यासाठी त्या काय करू शकतात हे मी जाणतो. सामाजिक दोष नाहिसे करण्याची त्यांनी फार मोठी सेवा केलेली आहे. माझ्या स्वतःच्या अनुभवावरूनही हे मी सिद्ध करून देईन. दलित वर्गामध्ये काम करण्यास जेव्हापासून मी सुरुवात केली तेव्हापासून पुरुषांबरोबर स्त्रियाही सहभागी झालेल्या आहेत. म्हणूनच आपल्या परिषदा मिश्र परिषदा आहेत, असे तुम्हास दिसून येईल. स्त्रियांची प्रगती ज्या प्रमाणात झाली असेल त्यावरून एखाद्या समाजाची प्रगती मी मोजित असतो. म्हणूनच हा समुदाय पाहिल्यावर मला खात्री वाटते व आनंद होतो की आम्ही प्रगती केलेली आहे. तुम्ही मनात नीट जपून ठेवाव्या अशा काही थोड्याशा गोष्टी तुम्हास सांगतो.

स्वच्छ राहण्यास शिका व सर्व दुर्गुणांपासून मुक्त राहा. तुमच्या मुलांना शिक्षण द्या. हळू हळू त्यांच्या मनात महत्त्वाकांक्षा जागृत करा. ते थोर पुरुष होणार आहेत असे त्यांच्या मनावर बिंबवा. त्यांच्यातील हीनगंड नाहिसा करा. लग्न करण्याची घाई करू नका. लग्न म्हणजे जबाबदारी. लग्नामुळे निर्माण होणारी आर्थिक जबाबदारी पार पाडण्याइतपत आर्थिकदृष्ट्या समर्थ झाल्याशिवाय त्यांच्यावर लग्न लादू नका. जे लग्न करतील त्यांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की अती जास्त मुले होणे हे दुष्ट कृत्य आहे. आपल्या लहाणपणी

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक–मा. फ. गांजरे, खंड एक, पुनर्मुद्रण १९८६, पृष्ठ-९४-९५.

आपणाला मिळू शकली त्यापेक्षा अधिक चांगली परिस्थिती आपल्या प्रत्येक मुलाला देणे हे आईवडिलांचे कर्तव्य आहे. सर्वात अधिक महत्त्वाचे म्हणजे लग्न झालेल्या प्रत्येक मुलीने पतीची मैत्रीण म्हणून त्याच्या प्रत्येक कार्यात सहकार्य द्यावे. मात्र गुलामासारखे वागण्यास खंबीरपणे तिने नकार द्यावा व समतेसाठी आग्रह धरावा. या उपदेशाचे तुम्ही पालन केले तर तुम्हा सर्वांना मानसन्मान व कीर्ती प्राप्त होईल एवढेच नव्हे तर दलित वर्गालाही सन्मान व कीर्ती मिळेल अशी खात्री आहे.



## १९८

# राजकीय समतेसाठी स्वतंत्र राजकीय हक्कांची आवश्यकता

नागपूर येथे समता सैनिक दलाला उद्देशून दिनांक २० जुलै १९४२ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

मध्यप्रदेशात उभारण्यात आलेले हे स्वंयसेवकांचे विस्तृत दल पाहून मला फार आनंद होत आहे. प्रथमतः हे स्वयंसेवकांचे विस्तृत दल १९२६ साली मुंबईत सुरू करण्यात आले होते. आपल्या सर्वसामान्य चळवळीचा ' समता सैनिक दल ' हा एकसंघ असा विभाग आहे. खरेच, आपल्या चळवळीचे ते एक अत्यंत भक्कम असे साधन आहे. आता आपल्या चळवळीच्या ध्येय धोरणामध्ये पूर्णतः व मूलभूत असा बदल घडून आलेला आहे. अशी एक वेळ होती की हिंदू समाजाला जोडलेला एक घटक म्हणून हिंदू समाजात आम्हाला समतेचे स्थान प्राप्त करून घेणे आपले उद्दिष्ट होते. आज भारताच्या राष्ट्रीय जीवनात आम्ही वेगळा व स्वतंत्र घटक असून हिंदुंच्या बरोबरीचे आहोत अशी आपली विचारसरणी आहे. आपल्या चळवळीच्या ध्येय धोरणाबरोबर समता सैनिक दलाच्या ध्येय धोरणातही बदल झालेला आहे. या स्वंयसेवक संघटनेच्या उभारणीला मूलतः कोणते कारण असेल तर हिंदू समाजात समता मिळविण्यासाठी दलित वर्गाच्या मागण्यांना प्रोत्साहन देणे हेच होय. तिच्या नावातच सूचित असल्याप्रमाणे ही संघटना हिंदू समाजामध्ये दलित वर्गाला समतेचे स्थान प्राप्त करून देण्याच्या उद्देशाने स्थापन करण्यात आली होती. आज हिंदूंपासून पूर्णतः विभक्त होऊन हिंदुंच्या बरोबर सामाजिक सत्ता हस्तगत करणे तिचे ध्येय आहे. हे धर्मांतराद्वारे घडवून आणण्याची आपणास आशा आहे. आपणाला पायरी पायरीने पुढे गेले पाहिजे. स्वतंत्र राजकीय हक्क मागून प्रथम आपण राजकीय समतेची मागणी करावी व अशा तऱ्हेने आपले प्रयत्न सुरू केले पाहिजे. हे अत्यंत कठीण कर्म झाले होते, कारण आपल्या राजकीय मागण्यांना व्यक्त करण्यासाठी सुरक्षित असे सभास्थान दलित वर्गाला लाभू शकत नव्हते. एक काळ असा होता की हे पूर्णतः अशक्य होते. काँग्रेसची संघटना इतकी चढेल झाली होती की ती मुंबईमध्ये इतर कोणत्याही राजकीय पक्षाला सभा घेऊ देत नसे. सभा घेण्याचे कोणी धाडसच करीत नसे. काँग्रेसचे स्वयंसेवक येऊन अशा सभा उधळून लावीत असत. या दहशतीशी सामना देण्यासाठी आमच्या स्वयंसेवकांच्या मूळ कर्तव्यामध्ये आम्ही आणखी नवीन भर घातली. ती म्हणजे राजकारणात भाग घेऊन काँग्रेस स्वयंसेवकांच्या या जुलमी व अत्याचारी कृत्यापासून आपल्या

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे : संपादक–मा. फ. गांजरे, खंड एक, पुनर्मुद्रण १९८६. पृष्ठ–९५-९८.

सभांचे रक्षण करणे हे होय. काँग्रेस स्वयंसेवकांच्या धमकीला तोंड देण्याची ही पद्धत अत्यंत कार्यक्षम ठरली. मी गोलमेज परिषदेला जाण्याच्या तयारीत होतो तेव्हाचा प्रसंग अजून मला आठवतो. माझ्या गोलमेज परिषदेला जाण्यासंबंधी निंदा करण्यासाठी, मी राहत होतो त्याच्याजवळ दलित वर्गाच्या नावावर काँग्रेसने मुंबईमध्ये एक सार्वजनिक सभा घेतली होती. या सभेत दलित वर्गाचा मी खरा प्रतिनिधी नाही असे ते जाहीर करणार होते. त्या सभेच्या संघटकांना मी असे सांगितले की जर ही खरीखुरी दलित वर्गाचीच सभा होणार असेल तर त्यांनी कोणताही ठराव घेतला तरी मला मुळीच वाईट वाटणार नाही. परंतु ही तुमची सभा दलित वर्गाची नाही. परंतु आधीच योजून ठेवलेली कृत्ये बंद करण्यास त्यांनी नकार दिला. संध्याकाळी ही सभा भरविण्यात आली. परंतु ऐनवेळी आपल्या स्वयंसेवकांची एक तुकडी आली आणि काँग्रेसच्या स्वयंसेवकांची पूर्णतः दाणादाण करून त्यांनी सभा हस्तगत केली. खुर्ची, टेबल व कालबेल सोडून काँग्रेसच्या लोकांना जीव घेऊन पळावे लागले. ही खुर्ची, टेबल व बेल विजयाचे मानचिन्ह म्हणून आमचे स्वयंसेवक अखेर घेऊन आले. आमचा स्वयंसेवक संघ मुंबईत सर्वात बलवान आहे. आमच्या स्वयंसेवकांना आव्हान देण्याचे धाडस अजूनपावेतो कोणीही केले नाही.

आपल्या राजकीय चळवळी विनाछळणुकीशिवाय चालत आहेत याला जर काही कारण असेल तर ते म्हणजे आपल्या स्वयंसेवक संघाची शक्ती हेच होय. आपल्यावर त्यांचे कृतज्ञतेचे फार मोठे ऋण आहे.

तुम्ही ही कल्पना मुंबईपासून उसनी घेतली पण संघाच्या विस्तारामध्ये मुंबईला कितीतरी मागे टाकलेले आहे, हे प्रत्यक्ष दिसत आहे. याबाबतीत तुमचे कौतुक करावेसे वाटते. तुमच्या पातळीवर येण्यासाठी मुंबईला स्वतःस खडखडीत जागे करून जोराचा प्रयत्न करावा लागणार आहे. स्वयंसेवकांच्या संघटनेच्या आवश्यकतेवर माझा पूर्णतः विश्वास आहे. ही संघटना चालू ठेवावी एवढेच नव्हे तर प्रत्येक प्रांतात तिच्या शाखा उघडाव्या व दलित वर्गातील प्रत्येक तरुण तिचा सभासद होईपर्यंत तिचा विस्तार करण्यात आला पाहिजे.

अशा स्वयंसेवकांच्या संघटनेला विरोध करणारे काही लोक आहेत. ते अहिंसेवर विश्वास ठेवणारे म्हणवितात आणि या संघटनांना व शक्तीच्या प्रदर्शनाला विरोध करतात. मी सुद्धा स्वतः अहिंसा तत्त्वाला शिरोधार्य मानणारा माणूस आहे. परंतु अहिंसा आणि लीनता यामध्ये मी फरक करतो. लीनता म्हणजे दुर्बलता आणि स्वतःच स्वतःवर दूर्बलता लादून घेणे हा काही सद्‌गुण नव्हे. एका उपनिषदामध्ये एका कोकराची एक गोष्ट आहे. ते देवाजवळ गेले व त्याने तक्रार केली की, ''देवा, तू सर्व प्राणीमात्रांचा बाप असल्यामुळे सर्व प्राणी भाऊ-भाऊ आहेत परंतु असे असले तरी प्रत्येक प्राणी हे सर्व बंधूप्रेम विसरून जाऊन मला खाऊ की गिळू असे करीत आहेत. हे असे काय म्हणून ?'' कोकराने देवाला विचारले. देवाच्या तोंडी घातलेले उत्तर मोठे

विचार करण्यासारखे आहे. देव म्हणाला, '' तू इतका लीन व लुसलुशीत दिसतोस की तुला खाऊन टाकावे असा मलासुद्धा मोह होत आहे. '' या गोष्टीतील कोकराप्रमाणेच आपली बरीचशी स्थिती आजपर्यंत होती आणि म्हणूनच प्रत्येकजण आपणाला खाऊ की गिळू असा धाक घालीत होता. स्वतःच स्वतःवर लादलेल्या दुर्बलतेच्या रूपातील लीनता हा काही सद्‌गुण नव्हे, याबद्दल माझी पक्की खात्री आहे. मी अहिंसेवर श्रद्धा ठेवणारा आहेच पण--

' दया तिचे नाव भूतांचे पाळण ।
आणिक निर्दाळण कंटकांचे ।।'

या तुकाराम महाराजांच्या अहिंसेच्या व्याख्येतील अर्थाने. तुकारामाने अत्यंत समर्पकपणे दोन गोष्टींमध्ये अहिंसा असल्याचे सांगितले आहे. एक सर्व प्राणीमात्रासंबंधी प्रेम व दया आणि दोन दुष्ट लोकांचा नाश. अहिंसेच्या व्याख्येतील या दुसऱ्या भागाकडे बहुधा दुर्लक्ष होते व या नजरचुकीमुळेच अहिंसेचे तत्त्व हास्यास्पद होते. दुष्टांचा विनाश करणे हा अहिंसा तत्त्वातील महत्त्वाचा घटक आहे. त्याच्याशिवाय अहिंसा म्हणजे केवळ टरफल, फक्त कल्पनारम्य सुख. व्यवहारात वापरण्याजोगे तत्त्व म्हणून ते उरतच नाही. जोपर्यंत दुसऱ्याला दुःख देण्याची दुष्ट इच्छा आपण बाळगीत नाही आणि जोपर्यंत केवळ सर्व दुष्टांचा नाश करण्याच्या सीमेपर्यंतच आपण मर्यादा घालून घेऊ तोपर्यंत शक्तीची उपासना करण्याविरुद्ध व शक्ती संघटनेविरूद्ध कोणीही कोल्हेकुई करू शकत नाही. शीलाने नियंत्रित केलेली शक्ती आमचा आदर्श आहे. कसल्याही टीकेला भीक घालण्याची तुम्हाला मुळीच गरज नाही. अविचाराने कोणालाही दुःख देण्याचे टाळा. ज्याला ज्याला तुमच्या मदतीची आवश्यकता असेल त्याला त्याला सर्व प्रकारची मदत करा. म्हणजे तुम्ही आमच्या लोकांची फार मोठी सेवा केली असे होईल. आजपर्यंत तुमचे कार्य मुख्यतः आपल्या राजकीय जीवनाला आधार देण्याशीच संबंधित होते. याशिवाय तुमच्या कार्यक्रमाच्या विस्तारासाठी आणखीही अनेक क्षेत्रे आहेत. कोणीतरी बदमाशाने स्त्रीला पळवून नेल्याचे नेहमी शहरात ऐकिवात येते. हिंदू जातीकडून खेड्यात आपल्या लोकांवर अत्याचार झाल्याचे नेहमी ऐकिवात येते. तुम्ही तुमची शक्ती वापरावी अशी ही प्रकरणे आहेत. केवळ तुमच्या संघटनेसारख्या संघटनाच काही सहाय्य करू शकतील असे हे प्रसंग होत.

अखिल भारतीय दलित वर्ग स्वयंसेवक दलाचे अधिवेशन भरविण्याचा तुम्ही निर्णय पास केल्यामुळे मला आनंद झाला. ही फारच आनंदाची कल्पना आहे. ती जर सफल झाली तर परिणामी ती अत्यंत हितावह ठरणार आहे. मी सर्वप्रकारे सुयश चिंतितो.

मला येथे चार शब्द बोलण्याची तुम्ही संधी दिली याबद्दल तुमचे व तुमच्या अध्यक्षांचे आभार मानतो.

● ● ●

# १९९

# मी तीन गोष्टी होऊ देणार नाही

डॉ. बी. आर. आंबेडकर हे व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावर * काल अधिकारारूढ झाले व त्यानंतर आज दिनांक २१ जुलै १९४२ रोजी नॅशनल सीमेन्स युनियन मुंबई तर्फे ताजमहाल हॉटेलमध्ये झालेल्या सत्कार समारंभाच्या वेळी मजूर खात्याचे मंत्री या नात्याने मुंबईतील पहिले जाहीर भाषण त्यांनी केले.

आपण स्वतः मजूर वर्गातले असून मजुरांच्या भावना आणि आकांक्षा याच आपल्या आकांक्षा आणि भावना आहेत असे त्यांनी सांगितले. पुढे ते म्हणाले,

आपली ज्या कार्यकारी मंडळावर नेमणूक झाली आहे, ते कार्यकारी मंडळ मुख्यतः युद्धप्रयत्नासाठी आहे आणि लोकमतानुवर्ती पक्षांचे नसून संमिश्र स्वरूपाचे असल्यामुळे तेथील बहुमतावर बऱ्याच गोष्टी अवलंबून राहातील.

तथापि, काही झाले तरी मी तीन गोष्टी निश्चितपणे होऊ देणार नाही. कामगारांचे रहाणीचे प्रमाण आहे त्यापेक्षा कमी होऊ देणार नाही आणि व्यवस्थित व सुसंस्कृतरितीने पहाता येईल इतके ते प्रमाण वाढविण्याचा प्रयत्न करीन. दुसरी गोष्ट म्हणजे राष्ट्रीय युद्ध प्रयत्नात इतरांच्या प्रमाणापेक्षा अधिक स्वार्थत्यागाचा बोजा मी कामगारांवर पडू देणार नाही. तिसरी गोष्ट अशी की, संकटाच्या परिस्थितीच्या नावाखाली तात्पुरती काही नियंत्रणे कामगारांना सहन करावी लागली तरी कामगारांच्या स्वातंत्र्याला बाध आणणाऱ्या अशा नियंत्रणाला मी कायद्याच्या बुकात समावेश होऊ देणार नाही. त्यांनी पुढे मालक व मजूर यांच्या झगड्यात आपली सहानुभूती नेहमी मजूरांकडेच राहील असेही आश्वासन दिले.

---

दैनिक नवाकाळ, मुंबई : २३ जुलै १९४२.

* दि. २० जुलै १९४२ ला व्हाइसरॉयचा दूत निरोप घेऊन बाबासाहेब आंबेडकर यांना भेटावयास नागपूरला आला आणि त्याच दिवशी त्यांनी श्रम मंत्रालयाचा कार्यभार स्वीकारल्याचे तारेद्वारे कळविले–संदर्भ–डॉ. आंबेडकर लाईफ अँड मिशन, लेखक धनंजय कीर, आवृत्ती ३री, पृ. ३५३.

नॅशनल सीमेन्स युनियनतर्फे डॉ. आंबेडकर यांचा सन्मान करताना मि. मिर्झा अखार हुसेन व खा. ब. महंमद इ. साईत यांनी हिंदी खलाशांच्या अडचणी आणि तक्रारी त्यांच्या पुढे मांडल्या होत्या. त्यांना उत्तर देताना डॉ. आंबेडकर यांनी या तक्रारी अधिकृत रीतीने आपल्याकडे पाठवून देण्याची सूचना केली. ते म्हणाले की, हिदुस्थानचा किनारा शत्रुंच्या हल्ल्याला केव्हाही उघडा असा असल्यामुळे संरक्षणाच्या दृष्टीने या देशातील खलाशी व नावाडी यांना सैनिकापेक्षा अधिक महत्त्व आहे.

सन्मान समारंभाला बरेच प्रतिष्ठित, निमंत्रित व स्थानिक अधिकारी हजर होते.





आमच्या अंतःकरणातील आकांक्षा फारच मोठ्या आहेत. शासनकर्ती जमात बनणे हीच
ती आकांक्षा होय.

-- डॉ. बाबासाहेब आंबेडकर

## २००

# नुसते स्वराज्य मिळून फायदा नाही, ते कोणाच्या हातात राहाणार हा प्रश्न महत्त्वाचा

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे इंडियन फेडरेशन ऑफ लेबरपुढे भाषण झाले. आपल्या भाषणात ते म्हणाले,

हिंदी मजूर चळवळ ही आमूलाग्र पोकळ आहे. ही चळवळ नुसती वरकरणी चाललेली आहे. म्हणून मजूर पुढाऱ्यांनी आत्मनिरीक्षण करून ह्या चळवळीच्या संघटनेचे दोष काढून टाकावेत. या देशात ' मजूर सरकार ' स्थापन करणे हा मजूर चळवळीचा खरा हेतू आहे. भांडवलवाल्या मालकशाहीकडे विनंत्या अर्ज करण्याची संघटना म्हणजे मजूर चळवळ नव्हे. त्यामुळे मजुरांपेक्षा भांडवलशहांची संघटना जास्त होण्याचे भय आहे. मजूर सरकार स्थापन करण्याची घोषणा आजपर्यंत एकाही मजूर पुढाऱ्याने केल्याचे ऐकिवात नाही. इतर राजकीय संघटनेपासून मजूर चळवळीने फारकत करून घ्यावी आणि विचारात व कृतीत स्वतःचे संघटित स्वातंत्र्य प्रस्थापित करावे. मजूर चळवळीने आपल्या आकांक्षा स्पष्टपणे व्यक्त कराव्यात. केवळ मजुरांच्या हितासाठी म्हणून देशाचा कारभार आपल्या हाती घेण्याचा मजूर पुढाऱ्यांनी चंग बांधावा. नुसते ' स्वराज्य ' मिळून फायदा नाही. हे ' स्वराज्य ' कोणाच्या हातात राहाणार आहे हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे.



---

नवयुग : १६ मे १९४३.
अंकात सभेची तारीख आणि स्थळ दर्शविलेले नाही—संपादक.

# २०१

# . . . तर व्यक्तिचा सुसंस्कृत व सुखी जीवन प्राप्त होण्याचा मूलभूत हक्क प्रस्थापित होईल

महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्समध्ये भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

जगात चिरकाल शांतता नांदण्याचे वाटेत साम्राज्यलोभ, वर्णद्वेष आणि दारिद्र्य हे तीन प्रचंड अडथळे आहेत. राष्ट्राचे सामर्थ्य वाढवणे हा पहिल्या दोन अडचणीवरील तोडगा आहे. दुबळ्या राष्ट्राला नेहमी गुलामगिरीतच राहावे लागते. म्हणून दुबळे देश सामर्थ्यवान झाले पाहिजेत. वर्णवर्चस्व हे पाश्चात्य राष्ट्रांच्या आर्थिक वर्चस्वातून निर्माण झालेले आहे. हिंदुस्थानाच्या सुप्त औद्योगिक आणि आर्थिक सामर्थ्याचा संपूर्ण विकास केला म्हणजे वर्णद्वेषाचा प्रश्न दूर होईल. युद्धोत्तर जगात दारिद्र्याचा प्रश्न शिल्लक राहाणे शक्य नाही. औद्योगिक क्षेत्रात आमूलाग्र क्रांती घडून येईल आणि त्यामुळे धनसंचय करण्याच्या हक्कापेक्षाही व्यक्तीचा सुसंस्कृत व सुखी जीवन मिळण्याचा मूलभूत हक्क आधी प्रस्थापित होईल.



---

नवयुग : १६ मे १९४३.

अंकात सभेची तारीख दर्शविलेली नाही—संपादक.

## २०२

# शासनयंत्रणेचा ताबा घेणे कामगारांचे ध्येय असावे

'द इंडियन फेडरेशन ऑफ लेबर' या संस्थेच्या विद्यमाने दिल्ली येथे दिनांक ८ ते १७ सप्टेंबर १९४३ पर्यंत आयोजित 'द ऑल इंडिया ट्रेड युनियन वर्कस् स्टडी कॅम्प'च्या समारोपीय सत्राच्या वेळी दिनांक १७ सप्टेंबर १९४३ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

मी आपल्याला दोन शब्द सांगावे असे आपल्या चिटणीसांनी मला सुचविल्याबद्दल मला फार आनंद होत आहे. हे आमंत्रण स्वीकारावे किंवा नाही याचा मला दोन कारणांमुळे प्रश्नच पडला होता. आपण असे बघा की, सरकारला बंधनकारक होईल असे फारसे मी बोलू शकणार नाही. दुसरे असे की, तुम्हाला जिव्हाळयाचा वाटणारा जो कामगारांच्या आर्थिक मागण्यांचा प्रश्न, त्याविषयी मी फारच थोडे सांगू शकेन. खरे पाहिले असता, मी हो म्हटल्याशिवाय तुमचे चिटणीस मुळी हलायलाच तयार नव्हते म्हणून मी रुकार दिला. अर्थात मला असे वाटल्यावाचून राहिले नाही, की एकंदर कामगार चळवळीविषयी माझ्या मनात जे विचार सारखे घोळत असतात ते बोलून दाखवायला ही संधी चांगली आहे आणि केवळ कामगारांच्या आर्थिक चळवळीविषयीच ज्यांना आस्था वाटते त्यांना देखील माझ्या मतांपैकी थोडा तरी भाग पटल्याशिवाय राहाणार नाही.

पण त्या प्रश्नाचे आजचे स्वरूप समजायला आपल्याला थोडे मागे जावे लागेल. मानवी समाजाच्या शासनपद्धतीत महत्त्वाचे असे पुष्कळ फरक घडून आले आहेत. असा एक काळ होता, की ज्यावेळी जुलमी राजांची अनियंत्रित सत्ता हेच एक शासनसंस्थेचे स्वरूप होते. कित्येक वर्षांच्या रक्तरंजित लढ्यानंतर ती परिस्थिती बदलून संसदीय लोकशाही आली. शासन संस्थात हीच सर्वोत्कृष्ट अशी समजूत त्यावेळी सर्वत्र होती. प्रत्येक मानवी व्यक्तीला स्वातंत्र्य, संपत्ती व सुख प्राप्त करण्याचा अधिकार असेल असे सहस्त्रक निर्माण करण्यात येईल असा विश्वास होता. अशी आशा वाटायला खरोखरच तशी

---

श्री. रमेश शिंदे यांच्या सौजन्याने प्राप्त एक छापील पुस्तिका. प्रकाशक मणिबेनकारा, स्वागताध्यक्ष, वार्षिक परिषद हिंदी कामगार फेडरेशन, रतिलाल मॅन्शन, परिख स्ट्रीट, गिरगाव, मुंबई-४.

कारणे होती. जनतेच्या अव्यक्त इच्छांना मूर्त स्वरूप देणारे कायदेमंडळ या पद्धतीत आहे. त्याला जबाबदार असणारे कार्यकारी मंडळ आहे व त्याही पलीकडे या दोघांवर लक्ष ठेऊन त्यांना कह्यात ठेवणारे न्यायमंडळही आहे. कायदेमंडळ आणि कार्यकारी मंडळ या दोन्हीवर नियंत्रण तसेच अधिकार क्षेत्रात ठेवण्यासाठी न्यायपालिकेची व्यवस्था आहे. लोकांचे, लोकांनी, लोकांसाठी चालविलेले सरकार ही लोकप्रिय सरकारची सर्व वैशिष्टये संसदीय लोकशाहीत आहेत. जनतेच्या खऱ्याखुऱ्या राज्याला आवश्यक असणारे सर्व गुण या पद्धतीत आढळतात आणि म्हणूनच ही पद्धती सार्वत्रिकरीत्या सुरू होऊन एक शतकही पुरे उलटले नाही, तोच तिच्याविरूद्ध सर्वत्र गहजब झालेला पाहून आश्चर्य वाटणे साहजिक आहे. इटली घ्या, स्पेन घ्या, जर्मनी घ्या किंवा रशिया घ्या तेथे या पद्धतीविरूद्ध जोराचे बंड पुकारले गेले आहे. तसे पाहिले, तर असे देश फारच थोडे आहेत, की ज्यात या पद्धतीविरूद्ध ओरड नाही. हे असे का व्हावे हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. दुसऱ्या कोणत्याही देशात या प्रश्नाची चर्चा करण्याची जेवढी निकड आहे त्यापेक्षा अधिक ती भारतात करण्याची आहे. भारतात संसदीय लोकशाही असावी अशी चर्चा सुरू आहे. पण यावेळी एखाद्या निर्भिड व्यक्तीने बेडरपणे पुढे येऊन असे सांगायला हवे, की '' या मार्गाने जाण्यात धोका आहे, प्रथमदर्शनी वाटते त्याप्रमाणे काही ही पद्धत समाजधारणेचा सर्वोत्तम मार्ग नव्हे. ''

पण पार्लमेंटरी स्वरूपाची लोकशाही अयशस्वी झाली तरी का ? हुकूमशहांच्या राष्ट्रात ती अयशस्वी ठरली, कारण तिला तडकाफडकी काम करण्याची सवय नाही. दिरंगाई हे तर तिचे ब्रीद आहे. जे कायदे मंजूर होणे कायदेमंडळाला आवश्यक वाटते ते कायदे मंजूर करण्यासाठी कायदेमंडळ नकार देऊ शकते. कायदे मंडळानी जर ते स्थगित ठेवले नाही तर न्यायपालिका त्यांना बेकायदेशीर ठरवून स्थगित ठेवू शकेल. संसदीय लोकशाहीत हुकूमशाहीला काही वाव नाही. हुकूमशाही राजवट असलेल्या इटली, स्पेन व जर्मनीसारख्या देशात संसदीय लोकशाही अविश्वसनीय संस्था गणल्या जाते. पण केवळ हुकूमशहाच या पद्धतीला नावे ठेवीत असते तर हरकत नव्हती. हुकूमशहांनी लोकशाहीला केलेला विरोध खऱ्या अर्थाने विरोध ठरू शकत नाही. संसदीय लोकशाहीचे स्वागत केल्या जाईल कारण ती हुकूमशाहीवर प्रभावी नियंत्रण ठेवू शकेल. दुर्दैवाने ज्या देशातील लोक हुकूमशाहीला विरोध करतात तिथेसुद्धा संसदीय लोकशाहीबद्दल असमाधान आहे. संसदीय लोकशाहीसाठी ती

शोचनीय स्थिती आहे. ती अधिक शोचनीय यासाठी आहे कारण संसदीय लोकशाही थांबलेली नाही. तीन दिशेनी तिचा विकास झाला आहे. व्यक्तिमात्रास समान राजकीय हक्क असावे या तत्त्वाची सारखी वाढ झाली आहे. ती इतकी की आज ही पद्धत अवलंबिणारे असे एकही राष्ट्र नाही, की जिथे सार्वत्रिक मतदानाचा हक्क नाही. दुसरे असे की, यात आर्थिक व सामाजिक समतेचे तत्त्व मान्य झाले आहे. तिसरी बाब म्हणजे समाजविरोधी असलेल्या संघटित संस्था स्वतःच्या उद्देशाकरिता राज्याची कोंडी करणार नाही हे मान्य झाले आहे.

संसदीय लोकशाहीने आर्थिक विषमतेची दखल घेतली नाही, तसेच कराराच्या स्वातंत्र्याचा संबंधित पक्षांवर काय परिणाम होईल, ते अन्यायकारक ठरतील काय याचाही विचार केला नाही. करार करण्याच्या स्वातंत्र्यामुळे दुर्बलांना त्यांच्या हक्कापासून वंचित ठेवण्याची संधी सशक्तांना प्राप्त झाली आहे याचाही विचार करण्यात आला नाही. इतके असूनही लोकशाहीची शपथ घेतलेल्या राष्ट्रात या पद्धतीविरूद्ध कितीतरी असंतोष आहे. अर्थातच हा विरोध हुकूमशहांच्या विरोधापेक्षा अगदीच वेगळा आहे हे उघड आहे. विशेष खोलात न जाता आपल्याला असे थोडक्यात म्हणता येईल, की सर्वसाधारण जनतेला सुख, संपत्ती व स्वातंत्र्य या त्रयीचा लाभ अजूनही या पद्धतीत पूर्णपणे होत नाही, ही जाणीवच या असंतोषाच्या मुळाशी आहे. हे जर खरे असेल, तर पार्लमेंटरी लोकशाहीच्या अपयशाची कारणे आपण समजून घेतली पाहिजेत. माझ्या मते या अपयशाची कारणे चुकीची विचारसरणी व संघटना दोष ही होत.

चुकीच्या विचारसरणीची मी आपल्याला दोन उदाहरणे देतो. करार स्वातंत्र्याला या पद्धतीत भलतेच महत्त्व दिले गेले आहे. त्यामुळे तिला अपयश आले. स्वातंत्र्याच्या नावाखाली याचा उदोउदो केला गेला. त्यावेळी सामाजिक विषमता व तिचा होणारा परिणाम विचारात घेतला गेला नाही. विषम पक्षात होणारे करार कसे अन्याय्य होतात हे दृष्टिआड झाले. दुर्बलांना नाडण्याची संधी यामुळे सबलांना मिळते याची पर्वाच नव्हती. परिणाम असा झाला, की स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या या संसदीय लोकशाहीने गरिबांच्या दुःखात आणखी भर घातली.

विचारसरणीतली दुसरी उणीव ही की, सामाजिक व आर्थिक समता नसल्यास नुसत्या राजकीय समतेचा उपयोग नाही, याची उमज पडली नाही. हे कदाचित काहींना पटणार नाही, पण त्यांना मी असे विचारतो, की इंग्लंड व

अमेरिका या देशात संसदीय लोकशाही अयशस्वी ठरली नाही पण इटली, जर्मनी, रशियामध्ये ठरली, हे का ? याचे कारण हेच, की त्या ठिकाणी आर्थिक व सामाजिक लोकशाही जास्त होती. खरे पाहिले असता लोकशाही म्हणजे समता. संसदीय लोकशाहीने स्वातंत्र्याचा घोष केला, पण खऱ्या समतेची तोंडओळख सुद्धा करून घेतली नाही ! समतेचे महत्त्व न कळल्यामुळे स्वातंत्र्य व समता यांचा तिला मेळ घालता आला नाही. परिणामी स्वातंत्र्यापुढे समता नामशेष झाली व विषमता वाढली.

पण विचारसरणीतील दोषांपेक्षा संघटनेतील दोष हे अपयशाला जास्त कारणीभूत झाले आहेत. सर्व राजकीय समाजाचे राज्यकर्ते व सामान्य जनता असे वर्ग पडतात हे दुर्दैव आहे. एवढ्यावरच हे थांबते तर हरकत नव्हती, पण त्याच्यावर ताण म्हणजे हे दोन तट इतके कायम राहातात, की समाजाच्या एका विशिष्ट घटकातूनच राज्यकर्ते निवडले जातात, सर्वसाधारण जनता तशीच राहते. जनता स्वतः राज्य करीत नाही, ती फक्त शासनसंस्था स्थापन करते आणि त्यापुढे त्यापासून अलिप्त राहाते आणि ते राज्य आपले राज्य आहे हे विसरते. असे झाल्यामुळे पार्लमेंटरी लोकशाही जनतेचे राज्य कधीच स्थापू शकली नाही. थोडक्यात म्हणजे जनतेच्या राज्याचे बाह्य अवडंबर असूनही वस्तुतः ते एका वर्गाचे दुसऱ्या वर्गावर परंपरागत चालणारे राज्य झाले आहे. या दोषांमुळेच पार्लमेंटरी लोकशाही अयशस्वी ठरली आणि जनतेची सौख्याची आशा पूर्ण करू शकली नाही.

मग प्रश्न असा उभा राहातो, की याला जबाबदार कोण ? गरीबगुरीब, कामगार व इतर दलित जनता यांचे पार्लमेंटरी लोकशाहीने हित केले नाही हे खरे. पण त्याला तेच मुख्यतः जबाबदार आहेत. आपण असे बघा, की मानवी जीवनाचा पाया आर्थिक आहे हे तेच विसरले नाहीत का ? मी नुकतेच ' आर्थिक मानवाचा मृत्यू ' या नावाचे पुस्तक बघितले. पण आर्थिक मानवाचा अजून जन्मच झाला नाही, तर त्याच्या मृत्यूचा प्रश्नच येत नाही. नुसत्या अन्नावरच मनुष्य जगत नसतो हा मार्क्सच्या टीकाकारांनी त्याला दिलेला टोमणा दुर्दैवाने खरा आहे. या मानवाने नुसते डुकरासारखे लठ्ठ होणे हे संस्कृतीचे ध्येय नाही हे कार्लाइलचे म्हणणे मला पटते. पण कामगार लठ्ठ होण्याचे तर दूरच राहो, त्यांना पोटभर देखील अन्न मिळत नाही. मी तर असे म्हणेन, की सर्व सोडून अन्नाचाच विचार कामगारांनी प्रथम केला पाहिजे.

मानवी जीवनाचा पाया आर्थिक आहे आणि म्हणून आर्थिक परिस्थितीप्रमाणे इतिहास घडत असतो ही विचारसरणी मार्क्सने जगाच्या पुढे ठेवल्यापासून त्यावर वाद झाले आहेत. पण माझ्या मते त्याने हे तत्त्व म्हणून ही विचारसरणी मांडली

नसून त्यायोगे कामगारांना शिकवणूक दिली, की ज्याप्रमाणे वरिष्ठ वर्ग आर्थिक बाबींना महत्त्व देतात त्याचप्रमाणे कामगारांनी दिल्यास इतिहास म्हणजे आर्थिक जीवनाचे प्रतिबिंब होईल. मार्क्सचे तत्त्व खरे असलेले आपल्याला वाटत नाही याचे कारणच मुळी हे, की आर्थिक परिस्थितीचा समाजरचनेवर जो परिणाम होतो त्याचे महत्त्व कामगारांनी लक्षात घेतले नाही. शासन पद्धतीविषयीचे वाङ्मय त्यांनी वाचले नाही. रूसोचे 'सामाजिक करार', मार्क्सचा 'कम्युनिस्ट जाहीरनामा', पोप १३ वा लिओचे 'कामगाराची स्थिती' आणि जॉन स्टुअर्ट मिलचे 'स्वातंत्र्य' ही समाज रचनेविषयीची चार मूलभूत पुस्तके कामगारांनी वाचलीच पाहिजेत. पण मला नक्की ठाऊक आहे की कामगार त्यांना महत्त्व देणार नाहीत. त्यांनी राजाराणीच्या गोष्टी वाचण्याचा नाद आधीपासून लावून घेतला आहे.

खरे पाहिले असता त्यांचा अपराध यापेक्षाही घोर आहे. राज्ययंत्र काबीज करण्याची कल्पनाही त्यांना अजून शिवली नाही, इतकेच नव्हे तर स्वतःचे हित साधण्याकरता राज्ययंत्रावर ताबा ठेवण्याची जरूर आहे हेही त्यांना पटत नाही. ते त्याचा विचारच करीत नाहीत. आजपर्यंतच्या अत्यंत दुर्दैवी घटनांपैकी ही एक आहे. त्यांचे सर्व संघटनाचातुर्य ट्रेड युनियनसारख्या केवळ आर्थिक मागण्यापुरत्या मर्यादित स्वरूपाच्या संस्थांमध्ये खर्च होत आहे. मी स्वतः ट्रेड युनियन्सविरुद्ध नाही. त्यांचा उपयोग आहे हे मला नाकबूल नाही. पण हेही तितकेच खरे, की तो मर्यादित आहे. कामगारांचे सर्व प्रश्न त्या सोडवू शकत नाहीत. कितीही संघटित व बलवान झाल्या तरी भांडवलशाही व्यवस्था जास्त चांगल्या तऱ्हेने चालवायला त्या भांडवलदारांना भाग पाडू शकत नाहीत. त्यांच्या पाठीशी मजूर सरकार असते तर गोष्ट वेगळी होती. म्हणून सत्ता संपादन हेच एकमेव ध्येय कामगारांनी ठेवले पाहिजे. नाहीतर कार्यकर्त्यांची भांडणे मिटविण्यातच ट्रेड युनियन्सची शक्ती खर्च होईल व कामगारांचे हित बाजूला राहील.

राष्ट्रवादाच्या नावाखाली त्यांना लोक भलत्या मार्गावर नेऊ शकतात हा कामगारांचा तिसरा मोठा दोष आहे. आधीच गरीब असताही राष्ट्रवादाच्या नावाखाली त्यांना सर्वस्वाचा त्याग करावा लागतो.

पण त्यांच्या स्वार्थत्यागामुळे राष्ट्रवादाचा जय झाल्यावरही त्यांना आर्थिक व सामाजिक समतेचा लाभ होईल काय, याचा कामगारांनी कधी विचारच केला नाही. त्यांच्या त्यागावर जो राष्ट्रवाद जोपासला जातो तोच त्यांचा मुख्य शत्रु बनतो, त्यांची सर्वात जास्त पिळवणूक यातच होते.

म्हणून पार्लमेंटरी लोकशाही खालीच जर कामगारांना नांदावयाचे असेल, तर तिचा उपयोग त्यांनी स्वतःकरताच केला पाहिजे. याकरिता हिंदुस्थानात दोन गोष्टींची जरूर आहे. केवळ आर्थिक मागण्याकरता ट्रेड युनियन्स स्थापणे एवढेच कोते ध्येय हिंदी कामगारांनी न ठेवता शासनयंत्रणेचा ताबा घेणे हे ध्येय पुढे ठेवले पाहिजे. म्हणून कामगारांनी आपला स्वतःचा राजकीय पक्ष स्थापला पाहिजे. अर्थातच ट्रेड युनियन बळकट करणे हे या पक्षाचे एक काम राहील. अशा पक्षाने कामगारांचे प्रतिनिधी म्हणून मिरविणाऱ्या कार्यकर्त्यांची मक्तेदारी फेटाळली पाहिजे व फक्त थोड्याश्या तात्पुरत्या फायद्याकरता अंतिम ध्येयाला बाध आणण्याची प्रवृती सोडून दिली पाहिजे. त्याचप्रमाणे हिंदु महासभा किंवा काँग्रेस यासारख्या जातीय व भांडवलदारी राजकीय पक्षांपासून त्याने अलिप्त राहिले पाहिजे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरता आम्ही लढतो, असा आव जरी हे पक्ष आणीत असले तरी त्याला न भुलता त्यांच्यापासून वेगळे राहिले पाहिजे. काँग्रेस व हिंदू महासभा यांच्या तावडीतून सुटल्यामुळे कामगारांना हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यात जास्त हिरिरीने भाग घेता येईल आणि राष्ट्रवादाच्या नावाखाली चाललेली फसवणूकही थांबवता येईल. पण याला मार्ग एकच. स्वतःचा राजकीय पक्ष स्थापणे. सर्वात महत्त्वाची गोष्ट ही, की हिंदी राजकारणातील बुद्धिवादाचा अभाव त्यामुळे कमी होईल, आपले राजकारण क्रांतिवादी आहे असा काँग्रेस टेंभा मिरविते म्हणून काही लोक तिच्या मागे जातात हे खरे, पण तिच्या पदरी अपयशाशिवाय काहीच पडत नाही हेही तितकेच खरे. त्याचे कारण काँग्रेसला प्रतिस्पर्धी नसल्यामुळे तिच्यात बुद्धिवाद कधी आलाच नाही. गेल्या वीस वर्षातील ही उणीव कामगारांच्या पक्षामुळे भरून निघेल.

हिंदी कामगारांनी दुसरीही एक गोष्ट शिकायला हवी. ती म्हणजे ही, की ज्ञानावाचून सामर्थ्य नाही. आपला प्रश्न घेऊन कामगार जेव्हा लोकांपुढे उभे राहातील तेव्हा हा प्रश्न नक्की विचारला जाईल की, ' राज्य करण्याची त्यांची

लायकी आहे का ?' राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय राजकारणात आम्ही इतरांइतक्याच फार तर चुका करू असे उत्तर त्यावेळी देऊन चालणार नाही. त्यांना याहीपलिकडे जाऊन असे सिद्ध करावे लागेल, की वरिष्ठ वर्गापेक्षाही ते जास्त राज्यकुशल आहेत. कामगारांच्या शासन पद्धतीचे स्वरूप इतर वर्गाच्या पद्धतीपेक्षा कठीणच राहाणार. कारण त्यांचे सरकार आर्थिक नियोजनाच्या पद्धतीवर उभारलेले असणार. इतर पद्धतीपेक्षा या पद्धतीत ज्ञानाची जास्त आवश्यकता आहे. दुर्दैवाने हिंदी कामगार वर्गाला अभ्यासाची अजून जरूर वाटली नाही. कारखानदारांना शिव्या देण्यापलीकडे कामगार कार्यकर्ते काही शिकले नाहीत !

ही उणीव भरून काढण्यासाठी अभ्यास मंडळे स्थापन करण्याचा हा उपक्रम इंडियन फेडरेशन ऑफ लेबरने केला आहे, त्याबद्दल मला अत्यंत समाधान वाटत आहे. त्यामुळेच राज्य करण्याची पात्रता कामगारात येईल. कामगारांचा स्वतंत्र पक्ष स्थापन करण्याचीही जरूरी इंडियन फेडरेशन ऑफ लेबरला पटेल अशी मी आशा करतो. कामगार वर्गाला शासक वर्गाची लायकी आणून दिल्याबद्दल ते फेडरेशनचे आभारच मानतील.



# समता सैनिक दलाच्या शाखा सर्वत्र स्थापून आपली शक्ती वाढवा

अखिल भारतीय समता सैनिक दलाचे दुसरे अधिवेशन रविवार, ता. ३० जानेवारी १९४४ रोजी सकाळी कानपूर येथे झाले. अध्यक्षस्थानी श्री. बी. के. गायकवाड हे होते. परिषदेस मुंबई, महाराष्ट्र, मध्यप्रांत, गुजरात, पंजाब, बंगाल, मद्रास, संयुक्तप्रांत, तसेच हैद्राबाद, ग्वाल्हेर, कोल्हापूर, इंदूर, उज्जैन वगैरे संस्थानांतून शेकडो प्रतिनिधी आले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, श्री. शिवराज, जनरल सेक्रेटरी श्री.पी.एन. राजभोज, प्यारेलाल कुरील तलीब इत्यादी पुढाऱ्यांची भाषणे झाली.

प्रथम श्री. आर. आर. पाटील (नागपूर) यांनी मुंबई व नागपूर येथील समता सैनिक दलांनी गेल्या वर्षात केलेल्या कामगिरीचा अहवाल वाचून दाखविला. नंतर परिषदेचे अध्यक्ष, श्री. भाऊराव गायकवाड यांचे भाषण झाले. त्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

माझ्या समता सैनिक दलाच्या शूर सैनिकांनो,

आज या संयुक्त प्रांतात दलाचे दुसरे अधिवेशन भरले आहे. गेल्या १७ वर्षापासून या दलाचे कार्य मुंबई व मध्यप्रांत येथे मोठ्या जोराने चालले आहे. या दोन्ही प्रांतात दहा हजारांवर समता सैनिक दलाचे श्रेष्ठ सैनिक उभे आहेत. माझ्या मुंबई प्रांतात काही वर्षापूर्वी आपल्या किंवा इतर पक्षांची जाहीर सभा काँग्रेसचे गुंड उधळून लावीत असत. १९२७ साली या दलाची स्थापना माझे हस्ते करण्यात आली. त्या दिवसापासून आमच्या सभेत काँग्रेसचा गुंड अथवा एखादा मवाली शिरण्याची ताकद नाही. एकदा माझ्या ऑफिससमोर विरोधी पक्षाची मोठी जाहीर सभा भरली होती. त्या सभेत आपले सैनिक गेले आणि त्यांनी ती सभा व सभेतील दिवाबत्ती, टेबल, खूर्ची वगैरे काबीज करून माझ्या ऑफिसमध्ये आणून टाकली. ते सामान अद्याप माझ्याकडे तसेच आहे. या वस्तू म्हणजे आपल्या या सैनिकांच्या कार्याचे द्योतक आहे.

---

जनता : ६ जानेवारी १९४५.

सांगण्याचा उद्देश एवढाच की आपले सैनिक इतके तडफदार आहेत. ते मनात आणतील तर त्यांच्यावर सोपविलेले कार्य चुटकीसरशी करून दाखवितील इतका मला त्यांच्याविषयी विश्वास वाटत आहे. म्हणून या ध्येयवादी दलाच्या शाखा प्रांतोप्रांती, शहरोशहरी, खेडोपाडी स्थापून शक्ती वाढविली पाहिजे.

यानंतर श्री. प्यारेलाल कुरील तलीब, एम्. एल्. ए. (सेंट्रल असेंब्ली), यांचे भाषण झाले. ते म्हणाले, ''आताच डॉ. बाबासाहेब, यांनी जे भाषण केले त्यांच्या ह्या कामगिरीबद्दल मी त्यांना धन्यवाद देतो व मी माझ्या संयुक्त प्रांतात येत्या अधिवेशनापूर्वी दहा हजारावर सैनिक तयार करून ठेवितो.'' श्री. पी. एन्. राजभोज व इतर वक्त्यांच्या भाषणानंतर या परिषदेत पुढील ठराव पास करण्यात आले.

**ठराव नं. १.**––देशाच्या निरनिराळया भागात अस्तित्त्वात असलेल्या अस्पृश्य वर्गाच्या सर्व स्वयंसेवक संघांना एकजूट करण्याबद्दल व समता सैनिक दल या अखिल भारतीय सैनिक दलात सामील होण्याबद्दल या परिषदेची विनंती आहे.

**ठराव नं. २.**––अखिल भारतीय दलित वर्ग फेडरेशनच्या निरनिराळया घटकांनी आपापल्या हद्दीत समता सैनिक दलाचे सामर्थ्य वाढविण्यासाठी स्वयंसेवक पथके स्थापन करून त्यांची संघटना करावी, असे आपले पूर्ण विचारांती निश्चित मत झाले आहे, असे ही परिषद जाहीर करते.

**ठराव नं. ३.**––अखिल भारतीय दलित फेडरेशनच्या सर्व घटकांनी आपापल्या स्वयंसेवकांना जरूर ते शिक्षण देण्यासाठी शैक्षणिक केंद्रे व छावण्या उघडाव्या अशी या परिषदेची विनंती आहे.

**ठराव नं. ४.––**भारत संरक्षण कायद्यान्वये स्वयंसेवक संस्थांवर लादण्यात आलेले निर्बंध अनिष्ट व असमर्थनीय आहेत, असे या परिषदेचे निश्चित मत आहे. 'समता सैनिक दल' या सारख्या फॅसिस्ट विरोधी स्वयंसेवक संस्थेच्या वाढीला या निर्बंधामुळे निष्कारण व्यत्यय येतो. म्हणून हे निर्बंध ताबडतोब रद्द करण्यात यावेत, अशी या परिषदेची मागणी आहे.

**ठराव नं. ५.**––अखिल भारतीय दलित फेडरेशनने नुकत्याच भरलेल्या अधिवेशनात जे ठराव संमत केले त्या सर्व ठरावांना या परिषदेची मान्यता आहे.

**ठराव नं. ६**.––(अ) दलाची घटना तयार करण्यासाठी ही परिषद पुढील गृहस्थांची एक समिती नेमीत आहे. (१) श्री. बी. के. गायकवाड (अध्यक्ष), सभासद, (२) श्री. एम. एम. ससाळेकर, (३) श्री. एस. बी. जाधव, (४) श्री. आर. आर. पाटील, (५) श्री. के. एन. वाल्मिकी, (६) श्री. ए. एल. कोसारे, (७) श्री. पी. एल. लळिंगकर.

(ब) येत्या वर्षाकरता (१९४४-४५) पुढील गृहस्थांची वर्किंग कमिटी ही परिषद नेमीत आहे. (१) श्री. बी. के गायकवाड (अध्यक्ष, महाराष्ट्र), (२) श्री. एम. एम. ससाळेकर (जनरल सेक्रेटरी, मुंबई), (३) श्री. आर. आर. पाटील (असिस्टंट सेक्रेटरी, मध्यप्रांत). सभासदः–(४) श्री. के. एम. वाल्मिकी (संयुक्त प्रांत), (५) श्री. ए. एल. कोसारे (मध्यप्रांत), (६) श्री. पी. परमार (गुजरात), (७) श्री. एस. बी. जाधव (मुंबई). ज्या प्रांतांना प्रतिनिधित्व मिळाले नसेल, त्यांना प्रतिनिधित्व देण्यासाठी जरूर ते सभासद नेमण्याचा अधिकार ही परिषद वर्किंग कमिटीला देत आहे. वरील ठरावावर वेगवेगळया प्रांतातील प्रतिनिधींची भाषणे झाल्यावर दुपारी दोन वाजता परिषदेचे अधिवेशन समाप्त झाल्याचे अध्यक्षांनी जाहीर केले.



## २०४

# राज्यसत्तेची विभागणी सारखी झाल्याशिवाय स्वराज्याला काय अर्थ ?

अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे दुसरे अधिवेशन कानपूर येथे तारीख ३० जानेवारी १९४४ रोजी रा. ब. एन. शिवराज यांच्या अध्यक्षतेखाली झाले. त्या प्रसंगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

' भगिनींनो व बंधुंनो,

आजची ही आपली परिषद प्रातिनिधीक स्वरूपाची आहे. हिंदुस्थानातील बहुतेक प्रांतातून प्रतिनिधी आलेले आहेत. बंगाल व आसामचे प्रतिनिधी जपानबरोबर चाललेल्या युद्धात आणीबाणीचे व महत्त्वाचे कार्य करीत असल्यामुळे परिषदेस येऊ शकले नाहीत. परिषदेस एवढा मोठा जनसमुदाय पाहून मला फार समाधान वाटते. पण ह्या समुदायामध्ये स्त्रिया कमी आहेत. आमच्या महाराष्ट्रात व सी. पी. मध्ये कोणत्याही सभेला हजारांनी स्त्रिया हजर राहातात. आमच्याकडे स्त्रिया गोषा किंवा पडदा ठेवीत नाहीत. पती व पत्नी दोघेही सारख्याच प्रमाणात सामाजिक कार्यात भाग घेतात. त्याप्रमाणे तुम्हीसुद्धा भाग घेतला पाहिजे. त्याशिवाय आपल्या समाजाचा उद्धार होणार नाही.

आज जी आपण चळवळ सुरू केलेली आहे ती मोठ्या प्रमाणात झाली पाहिजे, परंतु त्याचबरोबर आपल्या चळवळीचे मूलतत्त्व काय आहे, हे आपण समजावून घेतले पाहिजे. अस्पृश्यांची स्थिती आपण सगळे जाणता. २,००० वर्षापासून आपली विच्छिन्न परिस्थिती होण्याचे कारण काय ? आपली अवनती केव्हापासून आहे व ती कधी मिटेल ? आपल्या हलाखीच्या स्थितीचे मोठे कारण हिंदू धर्म आहे. हिंदू धर्मात शिवाशिवीला धर्म मानतात व त्यालाच हिंदू धर्माचा मूळपाया समजला जातो. हिंदू धर्मात अस्पृश्यांना शिक्षणाची मनाई आहे. शिक्षण घेणे मोठे मुश्कीलीचे आहे. प्रत्येकाला या देशाचा शिपाई बनले पाहिजे. स्वच्छ कपडे अंगावर घालता आले पाहिजे व सर्व धार्मिक विषमता नष्ट झाली पाहिजे.

---

जनता : ३० डिसेंबर १९४४.

तशी स्थिती अस्पृश्यांची झालेली नाही. अस्पृश्यांनी स्वच्छ कपडे वापरणे हिंदू धर्मात वाईट मानले जाते. पायात चप्पल घालून अस्पृश्यांना गावातून जाता येत नाही. गेल्यास अस्पृश्यांवर जुलूम केल्याची अनेक उदाहरणे माझ्याजवळ आहेत. शिवाशिव हे आपल्या अवनतीचे कारण आहे. ज्या धर्मात अवनती आहे त्या धर्माला फक्त मूर्ख लोक मानतात. अस्पृश्यांनी कानांनी वेद ऐकले तर त्यांच्या कानात लोखंडाचा रस ओतावा व वाचेने उच्चार केला तर त्यांची जीभ कापावी, असे हिंदू धर्म-ग्रंथात लिहिले आहे. शम्बूक अस्पृश्य होता. म्हणून रामाने त्याला ठार मारले. त्याच रामाला हिंदू धर्म देव मानतो ! आणि आश्चर्य हे की ज्या धर्माने आपली एवढी अवहेलना केली, ज्या धर्माने आपल्याला माणुसकीपासून कायमचे उठवले त्याच धर्माला आमच्यातील काही लोक चिकटून आहेत. आपण घरादाराला पारखे होऊन गंगा-स्नान करीत बसलो आहोत. आपली दुर्दशा जर नष्ट करावयाची असेल तर आपण हिंदू धर्माचा त्याग केला पाहिजे. हिंदू धर्म सोडल्याशिवाय आपले दुःख कधीही नष्ट होणार नाही.

या व्यावहारिक आयुष्यात आपल्याला कसे जीवन जगता येईल, याचा आपण विचार केला पाहिजे. भावी स्वराज्यात शासनकर्ती जमात बनणे हे आमचे ध्येय आहे, की जे स्वराज्य सर्वांचे व आमचेही होईल. सर्वांना शिक्षण व नोकऱ्या मिळतील. आज कामगाराला सुख नाही, अंगावर कपडे नाहीत, अर्धपोटी जगावे लागते व राहावयास चांगली घरे नाहीत. ही आजच्या कामगारांची परिस्थिती नष्ट झाली पाहिजे. राजकीय सत्ता आमच्या हातात आली तर प्रत्येक कामगाराला आम्ही कमीतकमी ३० रुपये पगार करू. आपल्या राज्यात चांगली घरे मिळतील व कामगाराला पेन्शन मिळेल. आमच्या राज्यात आजारीपणाचा भत्ता मिळेल व कोणी बेकार राहणार नाही. पण ब्राह्मण लोक आपल्या हातात सत्ता येऊ देत नाहीत. मुसलमानी राज्य असताना ब्राह्मण लोकांनी ' अल्ला हो अकबर ' म्हणून दिवस काढले. आज ते इंग्रजांची सेवा करीत आहेत. इंग्रजांचा उदोउदो करून सर्व महत्त्वाच्या नोकऱ्या ब्राह्मणांनी पटकावल्या आहेत. ही परिस्थिती आपण नष्ट करून राजसत्ता आपल्या हातात घेतली पाहिजे. त्याकरिता आपण आपले सामर्थ्य उभे केले पाहिजे. कॉंग्रेस-लीगसारखी धनदौलत आपल्या पक्षाजवळ नाही. स्वराज्यात दुसऱ्याचे राज्य आपल्यावर होईल. त्याकरिता आपण सर्व मनुष्यबल एकत्रित करून सामर्थ्य वाढविले पाहिजे. हिंदू लोकांचा एक वेगळा गट आहे, मुसलमानांचा एक वेगळा गट आहे व आपला एक गट वेगळा आहे. असे या देशात प्रमुख तीन वेगवेगळे गट आहेत. या देशाची राजसत्ता या तिन्ही गटातून सारखी वाटली गेली पाहिजे. राजसत्तेची विभागणी सारखी झाल्याशिवाय

या देशाला स्वराज्य मिळणार नाही. इंग्रज मुसलमानांना मोठे मानतात व सवलतीही त्यांना सरकारकडून मिळतात. आज मुसलमानांची पाकिस्तान किंवा ५० टक्के ही मागणी आहे. कॉंग्रेसचे लोक बाहेर येतील आणि ५० टक्के मुसलमानांना देतील. पण आपल्या मागण्या आपल्या सामर्थ्याशिवाय मिळणार नाहीत. कॉंग्रेस व मुसलमानांना अस्पृश्यांच्या मागण्या मिळाव्यात असे वाटत नाही म्हणून मी अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची स्थापना केली आहे. आता हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्य लोकांनी एकत्रित येऊन संग्रामास तयार झाले पाहिजे.

आपल्या मानाकरिता व पुढारी होण्याकरिता फार हपापलेले लोक आहेत. फाईलीत किंवा कागदात पुढारीपण नसते. वर्तमानपत्रात नाव आल्याने माणूस पुढारी होत नसतो. सी. आय. डी. ऑफिस फार मोठे आहे. त्यात प्रत्येक पुढाऱ्याच्या कार्याची डायरी ठेवली जाते. तुमची तशी डायरी तयार झाली पाहिजे. खरे काम करा. आपल्या हक्कांकरिता बलिदान करा. गव्हर्नरला पुढाऱ्याची भीती वाटली पाहिजे. पुढाऱ्याचे ऐकले नाही तर ज्या समाजाचा तो पुढारी आहे तो समाज आपल्या डोक्यावर जोडे मारील ही धास्ती गव्हर्नरला वाटली पाहिजे. याला म्हणतात सच्चा पुढारी.

अस्पृश्य समाजामध्ये संघटन नाही. अस्पृश्य लोक अद्याप आपल्यामध्ये शिवाशिवी मानतात. ब्राह्मणापेक्षाही मोठा प्लेग आपल्यात आहे. जातीधर्म आपल्यामधून नष्ट झाला पाहिजे. मी जातपात मानीत नाही. जात मानणारा पुढारी होऊ शकत नाही, हा माझा २५ वर्षाचा अनुभव आहे.

समता सैनिक दल हे आपल्या राजकीय पार्टीचे सामर्थ्य आहे. लढणाऱ्या सैनिकांशिवाय कोणतीही पार्टी सामर्थ्यवान होणार नाही. आपल्याला तर मोठमोठ्या संस्थांशी टक्कर द्यावयाची आहे. म्हणून आपण समता सैनिक दल वाढविले पाहिजे. समता सैनिक दल वाढविणे हे प्रत्येक पुढाऱ्याचे कर्तव्य आहे. कानपुरात आणि इतर सर्व ठिकाणी दलाची स्थापना करा. दर महिन्याला दलाच्या सभासदाकडून एक आणा वर्गणी घ्या. आमच्या मुंबईत समता सैनिक दलाचे कार्य जोरात चालू आहे. परिषदेनंतर आपले कार्य थंड पडत असते. ते पडू देऊ नका. आपले कार्य अव्याहतपणे चालू असले पाहिजे. लोकांना जागृत करा. तरूणांना संघटित करा.

मला जी अनेक संस्थांकडून मानपत्रे देण्यात आली आहेत, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पण मला ते नकोत. मला फक्त काम करावयाचे आहे. मी जर मानाकरिता काम करीत असतो, तर मी कॉंग्रेसचा अध्यक्ष झालो असतो. मला तुम्हाला सांगावेसे वाटते ते हे की, काम करा, म्हणजे मान तुमच्या पाठीमागे धावत येईल.

मी अस्पृश्य समाजाला राजकीय अधिकार मिळवून देण्याचे कार्य करीत आहे. मला पुष्कळ लोक विचारतात की मी सगळ्या देशाच्या स्वातंत्र्याचे कार्य का करीत नाही ? पंडित जवाहरलाल नेहरूला देशाकरिता हजारो कॉलेज विद्यार्थी मिळू शकतात. पण अस्पृश्यांच्या कार्याकरता पंडित नेहरूंचे कोणताही कॉलेज विद्यार्थी ऐकणार नाही. मग हे कार्य कोण करणार ? हे काम आपले आहे. ते आपणच केले पाहिजे, देशाकरिता पुष्कळ लोक आहेत. अस्पृश्यांकरिता आमच्याशिवाय कोणी नाही. मी तर हेच काम करीत राहीन. ज्या कार्यात आठ कोटी पददलित, पिळल्या गेलेल्या लोकांचा उद्धार आहे, ते खरेखुरे स्वराज्य मिळविण्याचे कार्य आहे.

विद्यार्थ्यांनी जे मला मानपत्र दिले, त्याबद्दल मी त्यांचे आभार मानतो. मला अस्पृश्य विद्यार्थ्यांना एक प्रश्न विचारावासा वाटतो. तुम्ही डिग्री घेऊन नोकरी पत्करल्यावर आपल्या समाजाकरिता काय कराल ? तुम्ही आपल्या संसारातच गुरफटून न जाता ज्या समाजातून आपण आलो त्या समाजाची परिस्थिती काय आहे, याकडे लक्ष दिले पाहिजे. त्या समाजाकरिता आपल्या नोकरीतला शक्य तेवढा पैसा दिला पाहिजे. मी हिंदुस्थान सरकारकडून दरवर्षी आपल्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाकरिता तीन लाख रुपये मंजूर करविले आहे. त्याचा भरपूर उपयोग करा आणि माऱ्याच्या जागा पटकवा. याचा उपयोग तुम्ही केला नाही आणि माऱ्याच्या जागा जर पटकावल्या नाही तर शेवटी तुम्हाला पश्चाताप होईल. दुसरी एक गोष्ट, शिकलेल्या अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठी मला जी दिसते ती ही की, ते आपल्यातील मुलींबरोबर लग्न करीत नाहीत. मग दुसरे कोण करणार ? याचा आपण विचार केला पाहिजे.

आता मला आपणा सर्वांना सांगावेसे वाटते की आपण जो लढा सुरू केलेला आहे तो फार मोठा आहे, पवित्र आहे. आपल्या समाजाच्या उन्नतीशिवाय तो आपण सोडता कामा नये.



# २०५
# इतर कुठल्याही जमातीपेक्षा अस्पृश्यांना स्वातंत्र्याविषयी अधिक आस्था आहे

'' निझामच्या हैद्राबाद संस्थानला बाबासाहेबांनी पहिली भेट दिनांक २० सप्टेंबर १९४४ ला दिली ती अविस्मरणीयच म्हटली पाहिजे. ते दक्षिण भारताच्या दौऱ्यावर निघाले होते. मुंबईतील कार्यक्रम आटोपून हैद्राबादला गेले. त्यावेळी त्यांचे दोन ठिकाणी अपूर्व स्वागत झाले. त्यापैकी एक ठिकाण म्हणजे नामपल्ली आणि दुसरे ठिकाण म्हणजे सिकंदराबाद ते हैद्राबाद. बेगमपेट रेल्वे स्टेशनवर बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वागतासाठी हैद्राबाद संस्थानच्या फेडरेशनचे अध्यक्ष श्री. जे. सुबय्या, सौ. सुबय्या, श्रीमती राजमणी देवी, श्री. माद्रे इत्यादिं हजारो कार्यकर्ते उपस्थित होते.

नामपल्लीच्या अपूर्व स्वागतात, पुरुषांपेक्षा स्त्रियांनी केलेले स्वागत उस्फूर्त होते. हैद्राबाद शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या पुरुष स्वयंसेवकांनी एकाच नमुन्याच्या बुश शर्टचे युनिफॉर्म चढविले होते. तर फेडरेशनच्या महिला स्वयंसेवकांनी विविधरंगी पोशाखाने सर्व नामपल्ली मढवून टाकली होती. त्यातून महिला स्वयंसेवकांनी स्वतःच जो शिस्तबद्ध बंदोबस्त ठेवला होता त्यामुळे एकूण कार्यक्रम दृष्ट लागण्यासारखा बनला होता. परंतु यावरही कळस महिला स्वयंसेवकांनी केला होता. या स्वयंसेविकांच्या वतीनेच बाबासाहेबांना देण्यात आलेला गार्ड ऑफ ऑनर, व्हॉईसरॉयला मिळणाऱ्या गार्ड ऑफ ऑनरला मागे टाकणारा असा विलोभनीय दिसत होता. ' आंबेडकर झिंदाबाद ' च्या घोषणांनी नामपल्ली परिसर नुसता दुमदुमून गेला होता.

बाबासाहेबांचे रेल्वेचे खास सलून जेव्हा सिकंदराबादेत आले, तेव्हा त्यांच्या भेटीस अनेक थोरा मोठ्यांची रीघ लागलेली होती. त्यामध्ये प्रामुख्याने, नबाब मैना, नबाब जंग बहाद्दूर, हैद्राबाद संस्थानचे पोलिटिकल एजंट व माहिती खात्याचे ऑफिसर, कॅप्टन डब्ल्यू. एफ. क्रॅशन्शन, रेसिडेंटचे ऑनररी अंडर सेक्रेटरी, छतारीच्या नबाबाचे ए. डी. सी. हेही भेटी देणाऱ्या अनेक मान्यवरांमध्ये होते. सिकंदराबाद रेल्वे स्टेशनपासून तर हजारो स्त्री पुरुषांची विराट मिरवणूक निघाली होती. सदर मिरवणूक, रस्ता काटीत काटीत, मार्केट स्ट्रीट वरुन, के. ई. एम्. रोड वरून किंग्जवेकडे आगेकूच करीत निघाली.

पुढे धनमंडीला मिरवणूक पोहोचल्यावर तर एकच तोबा गर्दी उसळली. अशी अपूर्व मिरवणूक. त्यात बँडच्या संगिताचे झंकारच झंकार, एकामागून एक अशा उठविल्या जाणाऱ्या ' आंबेडकर झिंदाबाद 'च्या घोषणांचे असंख्य ध्वनी-प्रतिध्वनी आणि सर्व रस्त्यावर फडकत राहिलेल्या रंगी-बेरंगी पताका, या सर्वांची एकमेकात जणू प्रचंड स्पर्धाच चालली होती. याशिवाय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे असंख्य ध्वज जिकडे तिकडे डौलाने फडकत होते.

बाबासाहेबांना अशा मिरवणुकीतून नेण्यात येत होते. सर्व सिकंदराबाद व हैद्राबाद ही दोन्ही जुळी शहरे जणू एकत्र लोटली होती. प्रथमतः बाबासाहेबांना ' पाच-बंधु-सेवा-हाल ' मध्ये नेण्यात आले. हे जनतेची सेवा करणारे केंद्र होते. कोणत्याही गोरगरीब मनुष्याचे काही गाऱ्हाणे असल्यास त्यास मोफत सहाय्य करण्यासाठी सदर केंद्र उभारण्यात आल्याचे बाबासाहेबांना सांगण्यात आले. या केंद्रानंतर मिरवणूक विस्तीर्ण अशा जीरा मैदानाकडे वळली. तेथे भला मोठा मंडप उभारण्यात आला होता. सर्व मैदान तुडूंब भरून गेले होते. महिलांच्यासाठी खास व्यवस्था करण्यात आली होती. या प्रसंगी स्वागत समितीचे प्रमुख प्रेमकुमार यांनी बाबासाहेबांचे स्वागत केले तर शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वतीने जे. एच. सुबय्या यांनी बाबासाहेबांना मानपत्र सादर केले.

बाबासाहेब आंबेडकर भाषण करावयास उठले तेव्हा त्या जनसागराने टाळयांची प्रचंड साथ दिली. बाबासाहेब सुमारे ४५ मिनिटे बोलले. हिंदुस्तानी भाषेतून. परंतु त्यांनी सर्व श्रोतृवर्गाला आपल्या भाषणाने मुग्ध करून टाकले होते. बाबासाहेबांचे प्रभावी भाषण, हृदयास भिडणारी भाषा, गोरगरिबांशी एकरूप होणारी त्यांची प्रवृत्ती, शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या ध्येयाचा न्यायीपणा व त्यांची विद्वत्ता यामुळे, शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या झेंड्याखाली सर्वांना एकजुटीने अस्पृश्यांचे हक्क मिळविण्यासाठी कसे लढावे याचे त्यांचे विवेचन प्रत्येकाच्या हृदयास जाऊन भिडले.''[१]

'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज व बंधु, भगिनींनो,

आज तुम्ही जे माझे प्रचंड प्रमाणात स्वागत केलेत त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. मी आपल्याकडे पहिल्यांदाच आल्यामुळे आजच्या स्वागताची अपेक्षा करीत नव्हतो. परंतु माझे आयुष्य व जीवनाकडे पाहिले म्हणजे ह्याप्रकारचे मला आश्चर्य वाटत नाही.

---

[१] समग्र आंबेडकर चरित्र : बी. सी. कांबळे, खंड १७ वा. पृ. ६६, ६७

आजच्या स्वागतात, सभेत व मिरवणुकीत तरुणांनी जो उत्साह दाखविला त्याबद्दल मला फार समाधान वाटते. आपल्या समाजाची मदार आजच्या तरुण पिढीवर अवलंबून आहे. तरुण पिढीने आपल्या समाजाकरिता स्वार्थत्याग केल्याशिवाय आपले उद्दिष्ट लवकर हस्तगत करता येणार नाही. येथे चळवळ करण्याच्या सवलती असत्या तर तुमची फार प्रगती झाली असती, असे मला वाटते.

आजच्या समारंभात स्त्रियांचा उत्साह पाहून तर मला विशेष वाटते. इथल्या स्त्रिया चांगली भाषणे करू शकतात, असे माझ्या निदर्शनास आले आहे. इथल्या स्त्रिया स्वच्छ राहावयास शिकल्या आहेत. समता सैनिक दलाची शाखा इथे स्थापन करून स्त्रियांनीसुद्धा त्यामध्ये मोठ्या प्रमाणात भाग घेतला आहे, त्याबद्दल फार समाधान वाटते. आजच्या प्रसंगी मला स्त्रियांना जो संदेश द्यावासा वाटतो तो हा की, त्यांनी पुरुषांबरोबर सार्वजनिक आयुष्यात उतरले पाहिजे. पुरुषवर्ग पुढे जाऊन जर स्त्रिया पाठीमागे राहिल्या तर कुठल्याही समाजाची प्रगती होणार नाही. गाडीचे एक चाक जर लुळे असेल तर गाडी चालू शकत नाही. म्हणून स्त्रियांनी आता पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून लढले पाहिजे, म्हणजे आपले स्वातंत्र्य आपणाला लवकर मिळेल.

आपल्या चळवळीचा अखेर कोठे आहे ? आपल्या समाजाला व देशाला स्वातंत्र्य मिळाले पाहिजे, हे आपले ध्येय आहे. पण या देशात अनेक पंथ आहेत. (१) हिंदू, (२) मुस्लीम, (३) इसाई व (४) अस्पृश्य. अस्पृश्य कोण आहेत ? अस्पृश्य जात ही हिंदुंपासून वेगळी आहे. हिंदू समाजाने आपणाला हजारो वर्षांपासून सामाजिक, आर्थिक, राजकीय बाबतीत गुलाम करून टाकले आहे. गुलामगिरीचे बंधन आम्ही आता तोडू इच्छितो. असे टाहो फोडून सांगण्यात येते की या देशाला प्रजासत्ताक राज्य पाहिजे. परंतु अस्पृश्य वर्गाला वगळून प्रजासत्ताक राज्य होऊ शकते काय, हा माझा हिंदू समाजाला प्रश्न आहे. प्रजासत्ताक राज्यात मुसलमानांना हक्क मिळतील, इसाई लोकांनासुद्धा हक्क मिळतील पण आम्हाला हक्क मिळणार नाहीत, अशी हिंदुंची कारवाई चालू आहे. परंतु आम्ही त्यांचे भाऊबंद नाही. आम्ही त्यांचे सगे नाही. हिंदू समाजावर विसंबून, ते आम्हाला हक्क देतील यावर आमचा विश्वास बसूच शकत नाही. मि. जिना यांनी पूर्वी सर्व अल्पसंख्यांकांची बाजू धरली होती. पण त्यांनी आता मुस्लिम लीगच्या वतीने पाकिस्तानची मागणी केली व इतर अल्पसंख्यांक जमातीच्या हिताचा लढा सोडून दिला आहे. ते फक्त आता

मुसलमानांचेच हित साधू पाहतात. एवढेच नव्हे तर उलट जास्तीतजास्त, प्रसंग विशेषी, इतर अल्पसंख्यांकांचे हक्क हिरावून आपण अधिक सत्ता हस्तगत करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. म्हणून आम्ही म्हणतो की हिंदूच काय पण मुसलमानसुद्धा आमच्या विरुद्ध आहेत.

काँग्रेसने व गांधीने आपणाला कसल्याही प्रकारचे हक्क मिळू नयेत, आपणाला स्वतंत्र अस्तित्त्व असू नये, आपण या देशात मानाने व सन्मानाने राहू नये व आपणाला राजकीय क्षेत्रातून कायमचे नष्ट करून आपल्या पायात हजारो वर्षांपासून चालत आलेल्या श्रृंखला अधिक घट्ट करण्याचा त्यांनी चंग बांधला आहे. आपण डोके वर काढू नये व सदैव त्यांचे गुलाम म्हणून राहावे, अशी त्यांची इच्छा आहे.

ब्रिटिश सरकार, हिंदू-मुसलमान यांना आम्ही सांगतो की देशाच्या सत्तेमध्ये आमचा वारसा पाहिजे. त्याकरिता आम्ही लढू, मरू. आमचा अत्याचारावर विश्वास नाही व अत्याचाराची आम्ही पर्वा करीत नाही. ब्रिटिश सरकार, हिंदू, मुसलमान व इतर जमातींना आता कळले पाहिजे की ज्यात हिंदू, मुसलमान व अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधी असतील तेच खरे राष्ट्रीय सरकार म्हणता येईल. अस्पृश्य हे हिंदू समाजाचे एक घटक नाहीत, ते एक निराळे राष्ट्रच आहेत. स्वतःचे उद्दिष्ट गाठण्यासाठी, चळवळ करण्यास व लढण्यास अस्पृश्य वर्ग तयार आहे.

आपली मागणी फार मोठी आहे. आपल्या मार्गात अनेक संकटे आहेत. आपणाला शत्रु फार आहेत. त्याकरिता आपण आपली संघटना उभारली पाहिजे. आपण संघटन केले तर गांधी, जिना, सावरकर आपले हक्क नाकारू शकणार नाहीत. सरकारकडे जाणे हे आपल्याला कमीपणाचे आहे. आपण आपले संघटन वाढवून आपल्या मागण्या मान्य करण्यास लावणे हे आपले आजचे कार्य आहे. आपली शक्ती वाढल्याशिवाय आपणास काही मिळणार नाही.

'' हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबद्दल अस्पृश्यांना फारशी आस्था नाही, अशाप्रकारचा खोडसाळ, निंद्य व दुष्ट प्रचार काँग्रेस व राष्ट्रीय वर्तमानपत्रांकडून केला जातो. आपण राष्ट्रविरोधी, देशबुडवे आहोत अशाही प्रकारचे हल्ले आपणावर करण्यात येतात. अस्पृश्यांना माणुसकी पाहिजे, समता पाहिजे,

त्यांना इतरांबरोबर राजकीय दर्जा पाहिजे. ती या देशात शासनकर्ती जमात बनली पाहिजे, याकरिता आपली चाललेली चळवळ जर देशबुडवी आहे असे त्यांना म्हणावयाचे असेल तर त्यांच्या या करणीबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. अस्पृश्यांना इतर कुठल्याही जमातीपेक्षा स्वातंत्र्याविषयी कमी आस्था नाही, उलट ती अधिक आहे. परंतु देशाच्या स्वातंत्र्याबरोबर स्वतःच्या समाजाचेही स्वातंत्र्य आम्हाला हवे आहे. ''[१]



[१] जनता : २ डिसेंबर १९४४.

## २०६

# मालकांच्या नफ्याची कमाल मर्यादा ठरविण्याचे मध्यवर्ती सरकारचे धोरण असावे

कुमारराज सर मुथिमा चेट्टिमार यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना २२ सप्टेंबर १९४४ रोजी सायंकाळी अड्यार (मद्रास) येथील आपल्या ' चेट्टिमाड हाऊस, ' या राजवाड्याच्या विस्तीर्ण मैदानात चहापार्टी दिली. मद्रास सरकारचे बडे अधिकारी, जज्ज व प्रमुख नागरिक असे २५० निमंत्रित पाहुणे होते. बाबासाहेबांनी यजमान व पाहुणे यांच्याशी मनमुराद गप्पा मारल्या व समारंभ संपला. त्यानंतर अर्ध्या तासाने बाबासाहेबांचा, सदर्न इंडिया चेम्बर ऑफ कॉमर्स या संस्थेच्या इमारतीत सत्कार झाला. त्यात संस्थेच्या प्रवक्त्यांनी मजूर चळवळीला सरकारने आळा घातला नाही, तर औद्योगिक व व्यापारविषयक प्रगती देशात होणार नाही, अशा आशयाचे भाषण केले.

त्याला उद्देशून बाबासाहेबांनी उत्तर दिले. ते म्हणाले,

कामगारविषयक कायदे करण्याचे सर्व अधिकार प्रांतिक सरकारांना दिलेले आहेत. मध्यवर्ती सरकार फक्त या विषयाची देखरेख करीत राहील. हे कायदे करताना प्रांतिक सरकारने मजूर व मालक यांच्या हितांना परिपोषक असेच कायदे करावेत. पुढे राष्ट्रीय सरकार येईल तेव्हा या बाबतीत योग्य ते धोरण स्वीकारले जाईल पण माझे मत असे आहे की, मजूरांचे किमान वेतन ठरविण्याचे धोरण या सरकारने स्वीकारु नये. मालकांच्या नफ्याची कमाल मर्यादा काय असावी, हे ठरविण्याचे धोरण स्वीकारावे. कामगारांना आजारपणात योग्य ती मदत करणे याबद्दलच्या योजना प्रांतीय सरकारने हाती घ्याव्यात, असा केंद्र मजूर खात्याने त्यांना सल्ला दिलेला आहे. कामगार आणि मालक यांच्यात होत असलेले तंटे सामोपचाराने मिटवावेत व उभयपक्षी आपलेपणा राहावा, यासाठी सरकार लौकरच तीन बडे अधिकारी (कमिशनर्स ऑफ कन्सीलिएशन) सर्व ब्रिटिश हद्दीत तीन भागात नेमणार आहे. सरकारने आतापर्यन्त ६८,००० लोकांना तांत्रिक शिक्षण देऊन पोटापाण्यास लावलेले आहे. तांत्रिक शिक्षणाचा विस्तार सर्वत्र व्हावा, अशी सरकार तरतूद करणार आहे. लढाई संपल्यानंतर जे औद्योगिक आंदोलन सुरू होईल त्यात अशा शिक्षित तंत्रज्ञांचा भरपूर उपयोग करता येईल.



---

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३३६.

## २०७

# . . . तर त्या स्वातंत्र्यासाठी मी केव्हाही लढावयास तयार आहे

शुक्रवार, दिनांक २२ सप्टेंबर १९४४ ला सायंकाळी मद्रास म्युनिसीपल कार्पोरेशन तर्फे चांदीच्या करंड्यातून मेयर डॉ. सय्यद नियामथुल्ला यांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना मानपत्र अर्पण करण्याचा जंगी समारंभ रिपन बिल्डिंग मध्ये झाला. या समारंभात अनेक प्रतिष्ठित नागरिक, सरकारी अधिकारी आणि कार्पोरेटर्स उपस्थित होते. काँग्रेसपक्षीय कार्पोरेटर्सनी मानपत्राला विरोध केलेला होता व म्हणून ते समारंभाला उपस्थित राहिले नव्हते.

मानपत्रास उत्तर देताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आपल्या शहरातर्फे आपण माझे स्वागत करीत आहात, हा आपला मोठेपणा आहे. मी मद्रास शहराचा रहिवासी नाही आणि नागरिक जीवनातही मी काही विशेष कधी केले नाही. म्हणून आपल्या पाहुणचारावर माझा तसा काहीच हक्क नाही. असे असूनही आपण माझे स्वागत करीत आहात त्याबद्दल मी आपला आभारी आहे. कोणावरही टीका करण्याच्या किंवा कुरापत काढण्याच्या उद्देशाने मी ही पुढील गोष्ट काढीत नाही. तर एक घडलेली सत्य गोष्ट म्हणून उल्लेख करतो. मी वर्तमानपत्रात वाचले की मला मानपत्र देण्याचा ठराव सर्वानुमते पास झाला नाही. त्यास काही लोकांनी विरोधही केला (हंशा). याचा उल्लेख करण्याचे कारण एवढेच की सर्वानुमते संमत होऊन मानपत्र मिळण्यापेक्षा ते अशा रितीने मिळालेलेच मला पत्करते. सर्वानुमते होणाऱ्या बऱ्याच गोष्टी आपण केवळ औपचारिक म्हणून करतो व आधुनिक समाजातील काही परंपरागत खोट्या रूढी ह्यापलीकडे त्याचा काही अर्थ नसतो (टाळ्या). झाली ही गोष्ट एवढे तरी नक्की दाखविते की कार्पोरेशनच्या एका तरी भागाने मला मानपत्र देण्यात प्रामाणिकपणा व आग्रह दाखविला.

माझ्या युनिव्हर्सिटीतील आयुष्याचा आणि शिक्षक, वकील व मुंबईच्या वरिष्ठ कायदेमंडळाचा सभासद या नात्याने माझ्या कार्याचा आपण चांगल्या पण अंमळ अतिशयोक्तीपूर्ण शब्दात उल्लेख केला आहे. आपण माझ्याविषयी जे म्हटलेले आहे ते सर्व खरे समजण्याइतका गर्व मला चढलेला नाही. ज्या उद्दिष्टासाठी मी एवढेदिवस खपत आहे त्याच्या सहानुभूतीमुळेच आपण माझा गौरव केला आहे.

---

जनता : २५ नोव्हेंबर १९४४.

तो माझ्या वैयक्तिक गौरवापेक्षा या उद्दिष्टाला पाठिंबा देण्याच्या उद्दिष्टानेच आपण केला आहे, असे मी धरून चालतो.

गरीब वस्तीची सुधारणा करण्यात व कामगारांच्या मुलांना अन्न पुरविण्यात मद्रास कार्पोरेशनने केलेल्या कामगिरीचा आपण उल्लेख केला आहे. ह्या बाबतीत हिंदी सरकारने काय केले आहे हे या ठिकाणी सांगणे अप्रस्तुत होईल, परंतु हिंदी सरकार हे एक अत्यंत मंद गतीने चालणारे यंत्र आहे, अशी जी टीका त्यावर नेहमी होते तिला मला या ठिकाणी उत्तर दिले पाहिजे. प्रत्येक सरकारने हाती घेतल्याच पाहिजेत अशा सुधारणा देखील टाळून स्वस्थ बसणारी निरुपयोगी संस्था, असे वर्णन मध्यवर्ती सरकारचे करता येणार नाही.

गेल्या काही वर्षात कामगारांसाठी सरकारने केलेल्या कार्याकडे पाहा. धंदेवाईक शिक्षण देण्याच्या योजनेकडे प्रथम मी आपले लक्ष वेधू इच्छितो. जवळ जवळ ६८,००० लोकांनी त्याचा फायदा घेतला. असे शिक्षण देणारी ३००-४०० केंद्रे हिंदुस्थानात आहेत. ज्यांची युनिव्हर्सिटीत शिक्षण घेण्याची ऐपत नाही अशा कामगारांच्या मुलांना आपले कामातले कसब वाढवून थोडा जास्त पैसा मिळविता येईल, असे हे शिक्षण युद्धानंतर बंद करण्यात येणार नाही तर उलट ते देशातील शिक्षण पद्धतीचे एक महत्त्वाचे अंग होऊन बसेल, अशी आम्हाला आशा आहे.

शिवाय कामाकरता सरकारने केलेले इतर काही कायदे आहेत. उदाहरणार्थ उद्योगधंद्यातील तंट्यामध्ये सक्तीने लवाद नेमण्याचा कायदा. अजूनपर्यंत कामगारांच्या नोकरीविषयी काही अटी अगर शर्ती घालण्याचा मध्यवर्ती सरकारला काहीच अधिकार नव्हता. नोकरीच्या अटी व वेतन ठरविणे हा केवळ कामगार आणि मालक ह्यांचा खाजगी सवाल होता. आज कायदा असा आहे की त्या अटी समाधानकारक नाहीत, असे जर सरकारला वाटले तर त्याबद्दल योग्य त्या अटी घालण्याचा सरकारला अधिकार आहे. हा कायदा युद्धजन्य परिस्थितीमुळे करण्यात आला असला तरी युद्धाबरोबर त्याचा अंत होणार नाही व आमच्या कायमच्या कायद्यात त्याचा अंतर्भाव करण्यात येईल, अशी मला आशा आहे. आम्ही जे केले आहे ते अत्यल्प आहे, ह्याची मला जाणीव आहे. परंतु लोकांनी हे ध्यानात घ्यावे की हे कायदे घडविण्याच्या बाबतीत मध्यवर्ती सरकारची स्थिती फारशी समाधानकारक नाही. मूलतः कामगारांच्या बाबतीत कायदे करण्याचा अधिकार बहुतांशी प्रांतिक सरकारकडे आहे. अर्थात प्रांतिक सरकारांसमवेत हा अधिकार मध्यवर्ती सरकारकडे देण्यात आला आहे, परंतु १९३५ सालच्या घटना कायद्यात अशी तरतूद करण्यात आली आहे की, कायदा कुणीही करो त्याची अंमलबजावणी व कारभार प्रांतिक सरकारकडेच सोपविलेला आहे. म्हणून काही कायदा करावा असे मध्यवर्ती सरकारास वाटले तरी प्रथम

प्रांतिक सरकारला विचारूनच कायदे करावे लागतात व शेवटी सारा कार्यभार प्रांतिक सरकारकडेच असतो आणि कारभार करणारे लोकच ज्या कायद्यांकडे ढुंकून पाहायला तयार नाहीत ते कायदे अर्थात मध्यवर्ती सरकारने करण्यात काही हशील नाही. ह्या आमच्या अडचणी आहेत. सर्वांना हवी तेवढी आमची गती नसली तरी सरकारचे अंतःकरण काही अगदी दगडाचे नाही. कामगार संबंधीच्या कायद्यांना निराळेच वळण देण्याचा विचार चालू आहे.

पुष्कळ लोक मध्यवर्ती सरकारवर टीका करतात. पण तसे करण्यात काही अर्थ आहे काय ? मध्यवर्ती सरकारने फारसे काही केले नसेल. त्याचे माझ्या मते एवढेसे महत्त्व नाही. शेवटी आजचे मध्यवर्ती सरकार काय करणार आणि काय करणार नाही हा खरा खरा प्रश्न आहे. हा प्रश्न असा आहे की, ज्याला आपण सर्व राष्ट्रीय सरकार म्हणतो ते त्याहून काही जास्त करणार आहे का ? माझे नम्र मत आहे की आज वाटतो त्याहून हा फार महत्त्वाचा प्रश्न आहे. वादादाखल मी हे गृहीत धरण्यास तयार आहे की, आजचे मध्यवर्ती सरकार हे केवळ तात्पुरते सरकार आहे. आपण सर्व राष्ट्रीय सरकारची अपेक्षा करीत आहोत आणि सर्वात मला जास्त काळजी वाटत असेल ती याची की, हे राष्ट्रीय ,सरकार आजच्या सरकारपेक्षा काही जास्त करणार आहे काय ? याबद्दल मला थोडीशी शंका वाटते. आपण सर्व म्हणत आहोत की, एकदा आमच्या हातात सत्ता आली, वयात आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांना मतदानाचा अधिकार मिळाला की, सगळ्या दुःखाचा अंत होईल आणि सर्व काही व्यवस्थित होऊन प्रत्येक व्यक्ती माणूस म्हणून छाती पुढे काढून हमरस्त्यावरून फिरू लागेल ! मला त्याबद्दल मोठी शंका वाटते. मी युरोपियन शासन पद्धतीचा व पार्लमेंटरी राज्यव्यवस्थेचा पुरेसा अभ्यास केला आहे आणि सार्वत्रिक मतदान अंमलात येऊन पार्लमेंटरी पद्धतीचे सरकार स्थापन होताच सर्व मानवी दुःखाचा अंत होईल; असे जे जे कधी कधी म्हणण्यात येते, त्यावर माझा काडीइतकाही विश्वास नाही. अशा समजूतीला इतिहासाचा काहीच आधार नाही. खरी गोष्ट अशी आहे की, सार्वजनिक मतदान असो की नसो, लोकमतानुवर्ती सरकार असो की दुसरे कसलेही सरकार असो, प्रत्येक देशात, प्रत्येक समाजात दोन वर्ग असतात, शासनकर्ता वर्ग आणि बहुजन समाज. हे भेद स्पष्ट असोत की अस्पष्ट असोत त्याला काही महत्त्व नाही. तुम्ही सार्वजनिक मतदान अंमलात आणा, शेवटी शासनकर्ता वर्ग अधिकारपदावर निवडून येणार ! बहुजन समाजाला मात्र निवडून येण्याची कधीच आशा नाही. हे विधान मी बेजबाबदारपणे ठोकून देत नाही. त्याला इतिहाससिद्ध आधार आहेत.

१९३७ सालच्या निवडणुकांचा परिणाम काय झाला, पाहा. मतदानाचा अधिकार अगदी व्यापक होता. निवडणुका अगदी जोरात लढविण्यात आल्या आणि मतेही अनिर्बंध देण्यात आली. शेवटी झाले काय ? आता त्याविषयी मला काही म्हणावयाचे नाही, पण काँग्रेसच्या ७ प्रांतात मी म्हटले तेच खरे ठरले. ते हे की, या देशात तुम्ही काहीही केले तरी शासनकर्ती जमात ही ब्राह्मण जातच ठरणार ! सात प्रांतात मुख्य प्रधान ब्राह्मण होते. मंत्रीमंडळात अर्धे लोक ब्राह्मणच होते. मी हे टीका म्हणून सांगत नाही. या प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी आहेत. निवडणुकीवरून जर काही निश्चित झाले असेल तर ते हेच की, ह्या देशात शासनकर्ती जमात एकच आहे व तीच वर आली. प्रत्येक देशात स्वराज्य असावे का, हा प्रश्नच चुकीचा आहे. खरा प्रश्न हा की त्या देशातल्या शासनकर्त्या जमातीला राज्याधिकार देण्याइतका समंजसपणा त्या शासक जमातीत आहे काय ? या प्रश्नाच्या उत्तरावरच स्वराज्याचा हक्क अवलंबून आहे, हे आपण विसरत आहोत. एखाद्या शासनकर्त्या जमातीच्या हातात सत्ता द्यायची झालीच तर प्रश्न हा उपस्थित होतो की, त्या जमातीचा दृष्टिकोन काय आहे, तिला वाटते तरी काय ? जर तुमच्या शासनकर्त्या जमातीला असे वाटत असेल की, ठराविक विषमता असलीच पाहिजे, समतेवर तिचा विश्वास नसेल, तिला काही माणसांना माणसेही म्हणावे वाटत नसेल, त्यांना शिवू नये, शिक्षणाचा व मालमत्तेचा हक्क फक्त एकाच विशिष्ट वर्गाला आहे, दुसऱ्यांना नाही, दुसरे गुलामच बनावे व गुलामीतच त्यांनी मरावे, असे त्या जमातीला वाटत असेल तर, मी विचारतो की राष्ट्रीय सरकार त्या जमातीच्या हातात आले तर ते राष्ट्रीय सरकार आजच्या मध्यवर्ती सरकारपेक्षा जास्त चांगले काम करणार आहे काय ?

मी राष्ट्रीय सरकारचा शत्रू नाही. माझा स्वराज्याला विरोध नाही अगर स्वातंत्र्याच्याही मी विरूद्ध नाही. देशाला ज्याचे आश्वासन देण्यात येत आहे ते स्वातंत्र्य, शिक्षण आणि सुबत्ता माझ्याही वाट्याला येणार, अशी माझी खात्री पटली तर त्या स्वातंत्र्यासाठी, त्या राष्ट्रीय वृत्तीसाठी मी केव्हाही लढावयाला तयार आहे. पण जर ह्या सगळ्या लंब्याचवड्या तत्त्वज्ञानाचा परिणाम हाच होणार असेल की त्याचा व्याप फक्त एका शासनकर्त्या जमातीपुरताच राहाणार व हा राज्याधिकार त्या जमातीचा जोर वाढवून इतरांचे हक्क हिरावून घेण्यासाठीच होणार असेल तर आजच्या मध्यवर्ती सरकारवर जशी टीका होत आहे तशी टीका करण्यात काहीच अर्थ नाही. (टाळ्या).

● ● ●

२०८

# भारताच्या भावी राज्यघटनेत कामगारांच्या राजकीय हक्कांना प्राधान्य दिले पाहिजे

एम्. अँड एस्. एम्. रेल्वे एम्प्लाईज युनियनने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पेरांबुर येथील आपल्या कचेरीत शनिवार दिनांक २३ सप्टेंबर १९४४ ला संध्याकाळी मानपत्र दिले. अध्यक्ष श्री. सी. कृष्णमूर्ती होते. श्री. शिवसुब्रह्मनियम यांनी मानपत्र वाचले. या युनियनमध्ये जे अस्पृश्य कामगार होते त्यांच्यातर्फे दुसरे मानपत्र देण्यात आले, ते अध्यक्षांनी वाचले.

दोन्ही मानपत्रांना उत्तर देताना बाबासाहेब म्हणाले,

मद्रास प्रांत हा खुळ्या धार्मिक समजूतीचा बालेकिल्ला आहे. पण आज येथे ज्या कामगार लोकांतर्फे ही सभा भरविलेली आहे त्यात ख्रिस्ती युरोपियन, अँग्लोइंडियन, हिंदू, मुसलमान, अस्पृश्य, ख्रिस्ती वगैरे मजूर व अधिकारी आहेत. यावरून हेच सिद्ध होते की, दारिद्र्य ही या सर्वांना एकत्र बांधणारी दोरी आहे. तुम्ही सर्व कामगार एकजुटीने राहिला तर तुम्हाला आपले सध्याचे दारिद्र्याचे जिणे नष्ट करण्याचे मार्ग चोखाळता येतील. महायुद्ध संपल्यानंतर भारताला ज्यादा राजकीय हक्क मिळणार आहेत, याबद्दल वाद नाही. पण ते हक्क सर्वस्वी दुसऱ्यांच्या हातात न जाता त्यात मजूरांचाही मोठा हिस्सा असला पाहिजे. कारण हातात राजकीय सत्ता असली की, कोणत्याही वर्गाला आपली सर्वांगीण प्रगती घडवून आणण्यास मदत होते. म्हणून कामगार वर्गाने ट्रेड युनियनच्या चळवळीला सांभाळता सांभाळता भारताला जे राजकीय हक्क मिळणार आहेत ते वसाहतीच्या स्वराज्याचे असावेत, अशी चळवळ केली पाहिजे. भारताच्या घटनेत कामगारांचे जे खास हक्क नमूद केले जातील त्यात राजकीय हक्कांना प्राध्यान्य दिले पाहिजे. मध्यवर्ती कायदे मंडळात ५० टक्के आणि प्रांतिक कायदेमंडळात ३० टक्के जागा कामगारांसाठी राखून ठेवल्या पाहिजेत. यासाठी तुम्ही चळवळ करा. मजूर खाते माझ्याकडे आहे. ते मला सुव्यवस्थित करावयाचे आहे. मजूरांचे जास्तीत जास्त कल्याण करणे, हेच माझे ध्येय आहे.

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३५५-५६.

अस्पृश्य मजूरांना उद्देशून बाबासाहेब म्हणाले, रेल्वे, पोस्ट आणि तारयंत्र खात्यात १३ टक्के जागा राखण्याचे मध्यवर्ती सरकारने ठरविलेले आहे. पण अस्पृश्य वर्गाच्या शिक्षणाची प्रगती पाहाता आठ पूर्णांक एक तृतियांश टक्के जागा अस्पृश्य वर्गाच्या वाट्याला येतात. तरी अस्पृश्य वर्गात शिक्षणाची प्रगती झपाट्याने व्हावी आणि या १३ टक्केवारीचा भरपूर फायदा समाजाला मिळावा.

• • •

# २०९

# आपल्या धार्मिक, सामाजिक व राजकीय आयुष्याचा पाया बुद्धिवाद हाच असला पाहिजे

तारीख २४ सप्टेंबर १९४४ रोजी सकाळी १० वाजता मद्रास येथे प्रभात टॉकीजमध्ये रॅशनल सोसायटीच्या विद्यमाने, श्री. एस. रामनाथ यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज, बंधु आणि भगिनींनो,

मी नुसता राजकारणी असल्यामुळे वाङ्मय, इतिहास व तत्त्वज्ञान यावर अधिकाराने बोलू शकत नाही. पण मी वाङ्मय, इतिहास व तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून जे मत बनविले, ते आज तुम्हाला सांगणार आहे.

हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधी पुष्कळ गैरसमज रुढ आहेत. पुष्कळ विद्वान इतिहासकारांनी म्हटले आहे की, हिंदुस्थानात राजकारणाचा काही गंधच नव्हता. प्राचीन भारतीयांनी केवळ तत्त्वज्ञान, धर्म व अध्यात्म याविषयी लिहिण्याकडेच लक्ष दिले होते व ते इतिहासापासून, राजकारणापासून साफ अलिप्त होते. असेही म्हणतात की हिंदी जीवन व समाज एका ठराविक पोलादी चौकटीमध्येच फिरत आहेत व त्या चौकटीचे वर्णन केले की इतिहासकाराचे काम संपले ! हिंदुस्थानचा प्राचीन काळचा इतिहास अभ्यासल्यानंतर माझे मत मात्र ह्या विद्वानांहून अगदी निराळे बनले आहे. ह्या अभ्यासात मला आढळून आले आहे की, जगात कुठल्याही देशात हिंदुस्थानसारखे प्रचंड गतिमान राजकारण नव्हते आणि हिंदुस्थान हा बहुधा एकच देश असा आहे की जेथे जगात दुसरीकडे, कोठेही दिसली नाही अशी क्रांती घडून आली होती.

हिंदी इतिहासाच्या विद्यार्थ्यांनी एक मूलभूत गोष्ट-ज्याचा इतिहासकारांना साफ विसर पडलेला दिसतो-नेहमी ध्यानात घेतली पाहिजे, ती म्हणजे प्राचीन हिंदुस्थानात घडलेला बौद्ध व ब्राह्मण यामधील लढा. याचा इतिहास काही प्रोफेसरांनी म्हटल्याप्रमाणे हा केवळ एखादा पंथामधला मामुली लढा नव्हता. सत्य म्हणजे काय यासाठी तो लढा होता.

---

जनता : ९ डिसेंबर १९४४.

बुद्धाने सत्याची व्याख्या अगदी सोप्या शब्दात सांगितली होती. इंद्रियांना कळू शकेल तेच सत्य होय. दुसऱ्या भाषेत सांगावयाचे म्हणजे कुणी अधिकारी व्यक्तीने सांगितलेली वस्तूच सत्य, असे नाही. उलट ब्राह्मणांचे म्हणणे असे की, जे वेदाप्रमाणे तेच सत्य (हास्य). बौद्ध क्रांतिकारक होते आणि ब्राह्मण प्रतिगामी. सध्या आपण प्रतिगामी लोकांच्या वर्चस्वाखाली आहोत. वेद वाचल्यानंतर मला मोठे आश्चर्यच वाटले, त्यात विदूषकी बडबडीखेरीज दुसरे काही नाही. (प्रचंड हास्य व टाळ्या) अशा ह्या पुस्तकांनाच प्रमाणग्रंथ मानण्याचा आग्रह ब्राह्मणांसारखे हुशार लोक का धरतात ? अथर्ववेदात तर निव्वळ 'जादुई मंत्र' आहेत ! (हास्य व टाळ्या).

जर इस्लाम धर्माने ह्या देशात पाऊल टाकले नसते तर आणखी फार काळ हा ब्राह्मण-बौद्धातला लढा चालला असता. जगाच्या इतिहासात स्वातंत्र्य, समता व बंधुत्वाचा आदेश देणारा बुद्ध हाच पहिला मनुष्य निघेल. तो आदेश नष्ट झाला आहे. त्याचीच आज हिंदू समाजाला सर्वात जास्त जरूरी आहे. तो आदेश नष्ट झाला कारण क्रांतीविरूद्ध प्रतिक्रांतीने विजय मिळविला.

पुष्कळ लोकांना भगवद्‌गीता हा फार मोठा धार्मिक ग्रंथ वाटतो. मोठ्या खेदाने मला म्हणावे लागते की तसे वाटण्यासारखे मला तरी त्या पुस्तकात काही आढळले नाही. याउलट त्या ग्रंथाने बराच अनर्थ केला आहे. ज्या बुद्धीच्या कसोटीला उतरू शकणार नाहीत, अशा गोष्टींना तात्त्विक आधार देण्याचा प्रयत्न त्यात केला आहे.

शेवटी राजकारण, समाज, राज्य शासन, धर्म व बुद्धिवादात ज्या क्रांतीची बुद्धाने मुहूर्तमेढ रोवली ती पुढे निष्फळ ठरली. धर्म व राजकारण यांना एकत्र जुंपून, चातुर्वर्ण्य ही केवळ सामाजिक प्रथा नाही, ते एक राजकीय तत्त्वज्ञान आहे, असे सिद्ध करण्यासाठी मनुस्मृती लिहिण्यात आली.

आपल्या सामाजिक व राजकीय आयुष्याचा पाया बुद्धिवाद हाच असला पाहिजे. प्रत्येक देशात राजकीय पुढाऱ्याची कसोटी पाहिली जाते. पण गांधींकडे पाहा. त्यांना तशी कसोटीच कुणी लावत नाही. ते म्हणतील ते खरे. दोन वर्षापूर्वी गांधी म्हणाले पाकिस्तान हे पाप आहे. सर्व कॉंग्रेसवाल्यांनी त्यांची री ओढली. आज गांधी म्हणतात, पाकिस्तान पाप नाही, मुसलमान मागतील

तर ते दिले पाहिजे आणि काँग्रेसवाले आता त्याचीही री ओढतात. आपल्या सामाजिक, राजकीय व बौद्धिक जीवनात बुद्धिवादाला कसा फाटा देण्यात येतो याचे हे एक उदाहरण आहे. ह्या परिस्थितीचा जर अंत झाला नाही तर देशावर मोठे गंडांतर आल्याशिवाय राहाणार नाही.



# २१०

# सत्तेवर असूनही ब्राह्मणेतर पक्षाला ब्राह्मण्य नष्ट करता आले नाही

दक्षिण भारतात १९२०-३६ या काळात ब्राह्मणेतरांचा पक्ष, जस्टिस पार्टी, फार प्रबळ होता. तो १९३७ च्या नंतर डबघाईस आला. त्याचे पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न जून १९४४ पासून सुरू झाले. यासाठी मद्रास प्रांतात बऱ्याच सभा झाल्या. अशा तऱ्हेची एक मोठी सभा २४-२५ सप्टेंबर १९४४ ला सालेम या शहरात भरविण्याचे जाहीर झाले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना या चळवळीची माहिती मिळाली तेव्हा त्यांना ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या बरोबर चर्चा करून या विषयाची संपूर्ण माहिती मिळविण्याची इच्छा झाली. त्यांनी सदर चळवळीचे प्रमुख श्री. ई. व्ही. रामस्वामी नायकर यांना भेटण्यास या म्हणून आमंत्रण पाठविले, तेव्हा श्री. नायकर बाबासाहेबांना भेटण्यासाठी मद्रासला शनिवार, दिनांक २३ सप्टेंबर १९४४ ला आले. चेट्टीनाड हाऊस, अड्यार येथे दोघांनी दोन तास चर्चा केली. ब्राह्मणेतर पक्षाच्या सामाजिक व धार्मिक कार्यक्रमाला आपला पाठिंबा आहे व पुढेही राहील, असे बाबासाहेबांनी श्री. नायकर यांना आश्वासन दिले. 'करूर' येथे भरणाऱ्या ब्राह्मणेतर परिषदेला उपस्थित राहाण्यासाठी श्री. नायकर, मद्रास येथून दिनांक २३ सप्टेंबरच्या रात्री रेल्वेने गेले.

रविवार, दिनांक २४ सप्टेंबरला दुपारी दोन वाजता मद्रास शहरातील अस्पृश्य महिलांतर्फे बाबासाहेबांना रायपेट्टा येथील 'वुडलँडस' या भव्य इमारतीत चहापार्टी देण्यात आली. स्त्रियांनी चळवळीत भाग घ्यावा व आपल्या समाजाच्या उन्नतीच्या कार्याला हातभार लावावा, अशा अर्थाचे भाषण त्यांनी तेथे केले. आपल्या समाजातील शिकलेल्या लोकांना आपल्या जातीचा नामनिर्देश करण्याची भीती वाटते ही नामुष्कीची गोष्ट आहे, असेही ते म्हणाले.

'दी संडे ऑब्झर्व्हर', मद्रास या पत्राचे संपादक, श्री. पी. सुब्रह्मनियम मुदलियार, यांनी बाबासाहेबांना कोन्नेमर हॉटेलमध्ये दुपारचे जेवण दिले. जेवणानंतर हॉटेलच्या ग्रीन रुममध्ये आमंत्रित पाहुणे (सरकारी अधिकारी व इतर) गप्पा मारण्यास बसले, त्यावेळी यजमानाने बाबासाहेबांना ब्राह्मणेतर चळवळीसंबंधी मार्गदर्शक विचार प्रदर्शित करण्याची विनंती केली. तेव्हा बाबासाहेबांनी आपले विचार प्रदर्शित केले. ते म्हणाले,

---

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ ३८१-३८३.

बंधु भगिनींनो,

ब्राह्मणेतर पक्षाचे सुशिक्षित तरुण येथे आलेले असते व त्यांच्यापुढे आपणास एखाद्या तत्त्वज्ञान्याप्रमाणे विद्वत्ताप्रचूर भाषण करावे लागले असते तर तसे करण्यात मला उत्साहही वाटला असता पण येथे नवविचारांच्या तरुणांपेक्षा जुने पुढारी व कार्यकर्ते जास्त संख्येने असलेले पाहून माझ्या उत्साहावर पाणी पडले आहे. तरी पण मी माझे विचार तुमच्यापुढे मांडतो.

मद्रास ब्राह्मणेतर पक्ष, जस्टीस पार्टी, १९१७ ते १९३७ पर्यंत या इलाख्यात वीस वर्षे अधिकारावर होता. असे असताही तो पक्ष १९३७ च्या निवडणुकीत का पडला ? हा प्रश्न विचारण्यासारखा आहे. ब्राह्मणेतर पक्ष निर्माण झाला, ही एक लोकशाहीच्या दृष्टीने मोठी महत्त्वाची ऐतिहासिक घटना होय. ती फार महत्त्वाची आहे. ब्राह्मणेतर या शब्दाने त्याला जातीयवादी स्वरूप प्राप्त झाले. हा पक्ष लोकशाहीच्या दृष्टीने महत्त्वाचा होता. हिंदू समाजात ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन वर्ग हजारो वर्षे अस्तित्त्वात आहेत. ब्राह्मणवर्ग विषमता मानतो. त्याच्या हातात धार्मिक व राजकीय सत्ता हजारो वर्षे अनियंत्रितपणे चालू आहे. ब्राह्मणेतर वर्ग समतेचा पुरस्कर्ता आहे. त्याने हुकूमशहा ब्राह्मणवर्गावर आतापर्यंत हजारो वेळा निकराचे हल्ले केले, ते समाजात समता निर्माण करण्यासाठी. पण हुकूमशहा ब्राह्मणवर्ग धार्मिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रातील मोक्याच्या सर्व जागा बळकावून बसलेला असल्यामुळे ब्राह्मणेतर पक्षाचे सर्व हल्ले त्याने नेस्तनाबूद केले. त्यामुळे ब्राह्मणवर्ग हा ब्राह्मणेतर वर्गाचा अनियंत्रित राज्यकर्ता म्हणून अद्याप तसाच राहिलेला आहे. ब्राह्मणेतर वर्ग समतेचा पुरस्कर्ता आहे पण त्याला विषमतेच्या पुरस्कर्त्या ब्राह्मणवर्गाला नेस्तनाबूद करून समाजात समता आणि देशात लोकशाही स्थापन करता आली नाही.

ब्राह्मणेतर पक्ष या इलाख्यात वीस वर्षे सत्तारूढ होता तरी त्याला ब्राह्मणवर्गाला नेस्तनाबूद करता आले नाही, याची अनेक कारणे आहेत. त्यापैकी प्रमुख कारण म्हणजे या पक्षातील लोकांचा स्वार्थांधपणा, गतानुगतिकत्वाची ओढ, सुशिक्षित ब्राह्मणेतरांची समाजापासून अलिप्त राहण्याची प्रवृत्ती, पक्षातील ध्येय धोरणांचा संकुचितपणा आणि संघटनेतील शिथिलता ही होत. हा पक्ष १९१७ ते १९३७ या वीस वर्षात सत्तारूढ झाला. पण त्याला जनतेच्या हिताचे कार्य करण्यापेक्षा ब्राह्मणवर्गाला शिव्याशाप देणे हेच जास्त महत्त्वाचे वाटले. त्यातच त्या पक्षाची सारी शक्ती खर्च झाली. खेडेगावातील जनता दारिद्र्याने पीडलेली आहे, ती सावकारांच्या पाशात अडकलेली आहे. तिच्या हितासाठी उद्योगधंदे काढणे, सावकारांच्या तावडीतून तिला सोडविणे वगैरे कार्य करण्याचे भान या पक्षाला राहिले नाही. आपल्या नातलगांना नोकऱ्या देणे, हेच मुख्य कार्य या पक्षाने केले. नोकऱ्यावर लावलेले तरूण ब्राह्मणेतर समाजापासून अलिप्त राहून

चैनीत दिवस काढू लागले. ब्राह्मणांना शिव्याशाप देणारे ब्राह्मणेतर ब्राह्मणांप्रमाणे गंध लावणे, पूजा करणे, पोशाख करणे वगैरे ब्राह्मणी आचार विचारांचा अवलंब करून राहू लागले. यामुळे ब्राह्मण्य नष्ट करण्याचे जे ब्राह्मणेतर पक्षाचे धोरण होते ते सांदीकोपऱ्यात पडून राहिले आणि ब्राह्मण्य तसेच जिवंत राहिले. ब्राह्मणेतर पक्षाला ब्राह्मणांपासून आपण अगदी निराळे आहोत, त्यांचे व आपले तत्त्वज्ञान यात जमीन अस्मानाचे अंतर आहे, याची पूर्ण कल्पना आली नाही व त्याप्रमाणे वर्तन करण्याचे ध्येय त्यांना साध्य करता आले नाही. ब्राह्मण हे पहिल्या दर्जाचे ब्राह्मण होत व आपण दुसऱ्या दर्जाचे ब्राह्मण आहोत हीच कल्पना ब्राह्मणेतरांच्या वागणुकीवरून सिद्ध झालेली आहे. ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी हेही विद्वान व तर्कशुद्ध विचार करणारे उच्च दर्जाचे नव्हते. त्यांच्यात पक्षाचे धोरण व्यापक करून पक्षाला लोकशाही स्थापन करण्यासाठी राबविता आले नाही. पुढारी कसे असावेत ? स्पष्ट धोरण आखणारे व त्या धोरणाचे उद्दिष्ट गाठण्यासाठी जीवाचे रान करणारे. गांधी अगर जिनांसारखे पुढारी नसावेत. गांधी आज एक मत देतील तर उद्या त्याच्या उलट देतील. अशी उदाहरणे अनेक देता येतील. पाकिस्तानाबद्दल त्यांनी आतापर्यंत अनेक परस्पर विरोधी मते प्रकट केली आहेत. जिना तर हुकूमशहा आहेत. ते लीगमधील कार्यकारी मंडळ स्वतः तयार करतात. लोकांनी निवडलेल्या प्रतिनिधींना ते मान्यता देत नाहीत. गांधी व जिना यांना त्यांचे अनुयायी पुढारीपणापासून च्यूत का करीत नाहीत ? कारण तसे झाले तर काँग्रेस व लीग या पक्षात बजबजपुरी माजेल, हे ते ओळखतात. कारण या दोन पुढाऱ्यांमुळेच त्यांच्या पक्षात संघटना टिकून राहिलेली आहे. ब्राह्मणेतर पक्षांच्या पुढाऱ्यांनाही दूर केले तर त्या पक्षाची संघटना होणार नाही. कारण ही संघटना मुळी विस्कळीत आहे. ती सिमेंटप्रमाणे घट्ट नाही. म्हणूनच १९३७ च्या निवडणुकीत त्या पक्षाला ब्राह्मणेतर मतदार बहुसंख्य असताही हार खावी लागली.



२११

# शासनकर्ती जमात बनणे हेच आमचे उद्दिष्ट आणि आकांक्षा

"मद्रास इलाखा शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या विद्यमाने मद्रास येथील मेमोरियल हॉल, पार्क टाऊन येथे रविवार, दि. २४ सप्टेंबर १९४४ रोजी संध्याकाळी ६ वाजता अस्पृश्यांची प्रचंड जाहीर सभा झाली. अध्यक्षस्थानी रावबहादूर एन. शिवराज होते. यासभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर आले तेव्हा लोकांनी उठून त्यांचे प्रचंड टाळ्यांनी व जयघोषांनी स्वागत केले. अध्यक्षांनी बाबासाहेबांचे स्वागत करणारे भाषण केले. त्यांना या सभेत (१) मद्रास आणि द्रविड वर्कर्स असोसिएशन, (२) साऊथ इंडियन बुद्धिस्ट असोसिएशन, (३) शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ऑफ दी सिव्हील अँड मिलीटरी स्टेशन, बंगलोर, (४) मद्रास शेड्यूल्ड कास्ट्स् स्टुडंट्स् असोसिएशन, (५) आंध्र प्रॉव्हिन्शियल शेड्यूल्ड कास्ट्स् वेलफेअर असोसिएशन आणि इतर संस्थांतर्फे मानपत्रे देण्याचा समारंभ झाला. एका तरुणाने बाबासाहेबांना भगवान बुद्धाचे सुंदर रंगीत चित्र अर्पण केले. मानपत्राबद्दल आभार मानून बाबासाहेबांनी या सभेत भाषण केले. त्यात त्यांनी प्रतिपक्षांना प्रक्षोभक वाटणारी पूर्वीची काही माहिती सांगितली." [1]

*डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

अध्यक्ष महाराज व बंधु भगिनींनो,

या मद्रास शहरात आपण जो माझा मोठ्या प्रमाणावर सन्मान केलात त्याबद्दल मी तुमचे प्रथमतःच आभार मानतो.

ह्याच मद्रास शहरात एका फार मोठ्या गृहस्थाने हल्लीच दोन वेळा आपल्या भाषणात माझ्याविषयी फार वाईट उद्गार काढले आहेत. हे गृहस्थ म्हणजे नेक नामदार श्रीनिवास शास्त्री हे होत. सुरवातीसच मला त्यांचा परामर्श घेतला पाहिजे. काही दिवसांपूर्वी जेव्हा पाकिस्तानच्या प्रश्नाने नामदार शास्त्रींच्या मनात गोंधळ उडवून दिला नव्हता व कोठल्याही आंतरराष्ट्रीय परिषदेत हिंदुस्थानचे एकमेव प्रतिनिधी व भारतवर्षाचा आत्मा या नात्याने महात्मा गांधीच

[1] डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३५६-५७.

* भाषण उपलब्ध जनतेच्या अंकात पृष्ठ ४ ते ६ वर प्रकाशित परंतु त्या पृष्ठांवर अंकाची तारीख नाही व पहिले पृष्ठही नाही.––संपादक.

बसू शकतील, असे त्यांना वाटत होते, त्यावेळी ते एकदा म्हणाले की काही झाले तरी डॉ. आंबेडकरांना कोठल्याही आंतरराष्ट्रीय परिषदेत भाग घ्यावयाला मिळणार नाही, अशी काळजी हिंदी जनतेने घेतली पाहिजे. त्यांच्यासारख्या वयोवृद्ध व पूज्य माणसाच्या तोंडी ही भाषा ऐकून मला अंमळ आश्चर्य वाटले. माझे सार्वजनिक आयुष्य नामदार शास्त्रींच्या तुलनेने लहानच आहे आणि तेवढ्यात त्यांच्या इतकी कीर्तीही मी संपादन केली नसेल. परंतु या लहानशा सार्वजनिक आयुष्यातही मी असे कोणते दुष्कृत्य केले की ज्यामुळे मला एखाद्या आंतरराष्ट्रीय परिषदेत बसलेला बघून हिंदी जनतेला शरमेने मान खाली घालण्याची पाळी यावी ? .याबद्दल मी बरेच आत्मसंशोधन करून पाहिले. मी काही येथे शिव्या देण्यासाठी उभा नाही. नाहीतर मी नामदार शास्त्रींना ब्रिटिश सरकारच्या मांडीवरचे कुत्रे सहज म्हणू शकलो असतो. सबंध आयुष्य त्यांनी ब्रिटिश सरकारच्या मांडीवर बसून घालविले आहे आणि देशात किंवा देशाबाहेर जर त्यांनी काही कुप्रसिद्धी आणि मोठेपणा मिळविला असेल तर केवळ ब्रिटिश सरकारने त्यांना शोभेसाठी पुढे करण्याची कृपादृष्टी ठेवली म्हणूनच होय. शास्त्रींची वटवट म्हणजे कुजलेल्या मढ्यावर चालविलेली एका म्हाताऱ्या कावळ्याची कावकाव आहे असे मी म्हणू इच्छित नाही.

बहुतेक कॉँग्रेसवाले म्हणत तरी काय असतात ? हेच की अस्पृश्य वर्ग देशहिताच्या आड येतो ! श्री. गांधी, नामदार शास्त्री, सर तेजबहादूर सप्रू व हिंदी राजकारणात प्रथम पंक्तीचा मान असलेल्या अनेक पुढाऱ्यांच्या बरोबर मी बसलो आहे. राष्ट्रवाद्यांकडून ज्याची आपण अपेक्षा करू नये अशा गोष्टी करताना त्यांना मी पाहिलेले आहे आणि माझी खात्री आहे, नुसतीच खात्री नाही, तर या गोष्टीचा मला अभिमान वाटतो, की ज्या ज्या वेळी एखादा सार्वजनिक प्रश्न गोलमेज परिषदेत चर्चेस आला त्या त्या वेळी त्या देशभक्त म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांपेक्षा माझे वर्तन कितीतरी पटीने चांगले व राष्ट्रीय बाण्याचे होते. (टाळया)

येथे जमलेल्या बहुतेक लोकांना गांधींनी गोलमेज परिषदेत काय केले ते माहीत नसेल. आम्ही सर्वांनी तेथे श्रेष्ठ कामगिरी बजावली, अशीच तुमची समजूत असेल. हे खरे आहे का ? श्री. गांधींनी काय केले ? १९३१ साली जेव्हा गांधी गोलमेज परिषदेत गेले त्यावेळी कॉँग्रेसची त्यांना आज्ञा होती की संपूर्ण स्वातंत्र्याचीच त्यांनी मागणी करावी, काहीही कमी स्वीकारू नये. हिंदुस्थानातले

दुसरे मोठे राजकारणी धुरंधरदेखील त्या मागणीच्या जवळ आले नव्हते. पण गांधींनी काय केले ते सांगण्यास मला दुःखच वाटते. परंतु ज्याअर्थी मी गोलमेज परिषदेत ' संघ फोडण्याचे ' काम केले असा माझ्यावर नेहमी आरोप करण्यात येतो त्याअर्थी मला काही गोष्टी सांगितल्याच पाहिजेत.

अर्थात गांधींनी स्वातंत्र्याच्या मागणीचे गाठोडे बरोबर आणल्यामुळे ते आमच्या मागणीच्या पुष्कळच पुढे जातील, अशी सर्वांची अपेक्षा होती. परंतु आश्चर्य हे की हिंदुस्थानच्या दुर्दैवाने या म्हाताऱ्याला असे काही खेळविण्यात आले की त्याने सायमन कमिशनच्या शिफारशीवरच संतुष्ट होण्याची तयारी दर्शविली. अर्थात, त्यामुळे त्यावेळचे भारतमंत्री सर सॅम्युअल होअर व अधिकारारूढ असलेली कॉन्झर्व्हेटिव्ह पार्टी यांना परिषद संपविण्याची घाई झाली. पार्लमेन्टमधील कॉन्झर्व्हेटिव्ह, लेबर व लिबरल् या तीन पक्षांचे एक कमिशन त्यावेळी आम्ही नेमले होते. पार्लमेन्टने सायमन कमिशनच्या शिफारशी मान्य कराव्यात, त्यापलिकडे जाऊ नये, याकडे आपल्या मानाचा प्रश्न म्हणून सर सॅम्युअल होअर पाहात होते. त्यांना गांधींचे हे धोरण म्हणजे ईश्वरी प्रसादच वाटला. त्यांनी लगेच बोलावयास सुरवात केली की गांधींहून मोठा माणूस हिंदुस्थानात आहे तरी कोण ? सप्रू कोण आहेत ? आंबेडकर कोणत्या झाडाचा पाला ? आणि जिना तरी कोठले आले ? गांधींचे जर प्रांतिक स्वायत्ततेने समाधान होते तर परिषदा बंद कराव्यात व लगेच पार्लमेन्टने सायमन कमिशनच्या सांगण्याप्रमाणे कायदा करावा. त्या विरूद्ध आवाज आम्हीच उठविला. आम्ही स्पष्ट सांगितले की, आम्हाला हे मुळीच मान्य नाही व असल्या गोष्टीत आम्ही कधीही साथीदार होऊ शकत नाही. आम्ही एवढी ओरड केली की शेवटी ब्रिटिश मंत्रिमंडळाला परिषदेतील प्रतिनिधींची मते अजमावण्यासाठी एक छोटीशी कॅबिनेट कमेटी नेमणे भाग पडले. या कमिटीपुढे साक्ष देणाऱ्यांपैकी मी एक होतो. कमिटीचे अध्यक्ष लॉर्ड चँसेलर व सभासद, मुख्य प्रधान व भारत मंत्री हे होते. मला सांगण्यास मोठा अभिमान वाटतो की अस्पृश्य वर्गालादेखील पार्लमेन्टने मागे पाऊल टाकलेले सहन होणार नाही हेच मी सांगितले. माझे हे कृत्य निंद्य होते असे कोणी म्हणू शकेल ? मध्यवर्ती सरकार लोकमतानुवर्ती करण्यात अस्पृश्यवर्ग विरूद्ध आला असे कोणीतरी म्हणेल काय ?

त्यावेळी गांधींनी संस्थानिकांपुढे लोटांगण घातले. सरळ सांगितले की, संस्थानिकांनी प्रतिनिधींची पसंती करण्यात त्यांची काहीच हरकत नाही. सबंध गोलमेज परिषदेत या प्रश्नावर झगडणारा मी एकटाच प्रतिनिधी होतो. (टाळ्या) नामदार शास्त्री त्यावेळी कोठे दडले होते ? त्यांच्याविषयी काही गमतीच्या

गोष्टी मी तुम्हाला सांगू शकेन. आम्ही सर्व फेडरेशनच्या अगदी विरुद्ध होतो. मी सुरुवातीपासून लढविलेला एक महत्त्वाचा मुद्दा हा होता की ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानातील राजकारणाची संस्थानातील राजकारणाशी भेसळ करू नये. या दोघांना निरनिराळे होऊन आता जवळ जवळ १५० वर्षे झाली. अर्थात आम्ही एकच लोक आहोत. आमचे भवितव्यही एक असणार यात शंका नाही, तरी शेवटी ही गोष्ट राहतेच की १५० वर्षे आम्ही वेगवेगळ्या मार्गांनी चाललो आहोत. आम्हाला मिळालेले राजकीय शिक्षण वेगवेगळे आहे.

माझे आग्रहाचे सांगणे होते की ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानला राष्ट्रस्वातंत्र्याकडे स्वतःच्याच विशिष्ट मार्गाने जाऊ द्यावे. त्यांच्या पासंडीला हिंदी संस्थानिकांना जोडून त्यांचे भवितव्य गुंतागुंतीचे करू नये. नामदार शास्त्री त्याच मताचे होते किंवा या ' कटात ' माझ्या बरोबर सामील होते म्हणा ! आम्ही तिघेजणच ह्याप्रमाणे ब्रिटिश हिंदुस्थानला ' हृदयाशी ' बाळगून होतो. ना. शास्त्री, सर चिंतामणी व मी.. माझ्यासारख्या ' पोरापेक्षा ' नामदार शास्त्रीसारख्या कीर्तीमान मनुष्याकडे लोक जास्त आदराने बघतील म्हणून आम्ही त्यांना आमच्या वतीने बोलण्यास उभे केले. परिषदेपुढे ते बोलले. त्याच्या आदल्या दिवशी मी व चिंतामणी त्यांच्याकडे गेलो होतो. त्यांचे मत त्या वेळीही तसेच निश्चित असल्याचे आम्हास आढळले. तीन वाजता किंग जेम्स पॅलेसमध्ये नामदारसाहेब बोलणार होते तेथे आम्ही गेलो, ते काय बोलले असतील असे तुम्हाला वाटते ? माझे व सर चिंतामणींचे हृदय चांगले मजबूत होते म्हणून ब्रे, नाहीतर त्याचवेळी त्या धक्क्याने आम्ही ठार झालो असतो. श्री. शास्त्री यांनी सांगितले की ते फेडरेशनच्या बाजूने होते ! आणि त्यांचे मला सांगणे होते की, मी दुराग्रह करून सर्व योजनेचा विचकाच करीत आहे म्हणून मी गप्प बसावे. जर गांधी प्रामाणिक असते आणि हिंदी संस्थानातील जनतेबद्दल त्यांना खरी कळकळ असती तर संस्थानिकांच्या जुलूमापासून त्यांची सुटका व्हावी ह्या तत्त्वानुसार ते वागले असते. संस्थांनी प्रजेचे प्रतिनिधी जनतेने निवडले पाहिजे असा त्यांनी सर्वांच्या आधी आग्रह धरला असता. उलट गांधींनी सांगितले की, संस्थानिकांनी प्रतिनिधींची पसंती करण्यास त्यांची मान्यता आहे ! एक गोष्ट मी तुम्हाला सांगितलीच पाहिजे ती ही की गांधींना राजकारण फार थोडे कळते. हे काही मी त्यांची निंदा करण्याच्या दृष्टीने म्हणत नाही किंवा टाळ्या मिळविण्याच्या हेतूनेही म्हणत नाही. परंतु ही सत्य गोष्ट आहे. मी पहिल्या गोलमेज परिषदेला हजर होतो, गांधी नव्हते. मला त्यातील पुष्कळ खाचखळगे माहीत होते आणि गांधींनी बोलण्यापूर्वी त्या सर्व बऱ्यावाईट, खोट्या नाट्या गोष्टी त्यांना कळाव्यात म्हणजे त्यांनी काय बोलावे काय नाही ते कळेल, अशी मला कळकळ वाटत होती. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळी गांधी असताना फेडरल

स्ट्रक्चर कमिटीवर मी होतो. अर्थात अस्पृश्यांचा प्रतिनिधी असल्यामुळे मला अध्यक्षस्थानी असलेल्या लॉर्ड चँसेलर शेजारी जागा मिळण्याची आशा नव्हती. मला शेवटी कोठेतरी बसविण्यात आले होते. पहिल्या दिवशी गांधी आले तेव्हाच सभेचा विषय चर्चेला निघाला होता. आधीच गांधींना राजकीय ज्ञान कमी व त्यातच ते पहिल्या परिषदेला हजर नव्हते या दोन गोष्टींमुळे मला बरीच काळजी वाटत होती. सर्वांआधीच बोलण्याची संधी मिळाली तर सर्व परिस्थिती मी उघडकीस आणीन आणि गांधींना त्याची चांगली जाणीव करून देईन, अशी मला उत्कंठा होती.

तेव्हा, थोडा ताप आल्याचे निमित्त करून मी लॉर्ड चँसेलर साहेबांकडून प्रथम बोलण्याची परवानगी मागितली. त्यांनी गांधींना काही विरोध असल्याचे विचारले. गांधींनीही उदारपणा दाखवून नाही म्हटले. जवळ जवळ दीड तास मी बोललो. विलायतेत याहून अधिक मी कधीच बोललो नसेन. भाषण झाल्यानंतर आधी ताप आल्याची जी सबब सांगितली होती ती खरी भासविण्यासाठी मला निघून जाणे भाग होते. गांधी नंतर काय बोलले, हे कळून येण्यासाठी सबंध रात्र आतुरतेने वाट पाहणारा सबंध लंडनमध्ये मीच एकटा त्यावेळी असेन. बरोबर मध्यरात्रीला परिषदेचा रिपोर्ट माझ्या हाती पडला. घाई घाईने मी ते पाकीट फोडले आणि गांधींचे पहिलेच वाक्य माझ्या नजरेस पडले ' माझ्या मनाला डॉ. आंबेडकरांचे म्हणणे पटते पण बुद्धीला पटत नाही!' माझ्या भाषणात मी जे काही सुचविले होते त्याच्या अगदी उलट ते बोलले होते. मला अतिशय संताप आला आणि सकाळी जरी नव्हता तरी मात्र मला रात्री थोडा ताप आला. दुसऱ्या दिवशी सकाळी मी परिषदेस गेलो. गांधी व इतर सर्व तेथे होतेच. सभा सुरु होताच मी लॉर्ड चँसेलरकडे गांधींना काही प्रश्न विचारण्याची परवानगी मागितली, माझे व गांधींचे भांडण असण्याचे मूळ कारण हेच होय.

मी गांधींना तीन प्रश्न विचारले. माझा पहिला प्रश्न हा होता की संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी संस्थानिकांनीच पसंत करावे, असे म्हणण्यात काँग्रेसने त्यांना काही आज्ञा केली होती काय ? काँग्रेसने कधी यावर चर्चा केली होती काय ? काँग्रेसने त्यांना त्या बाबतीत बोलण्यास काही अधिकार दिला होता काय ? दुसरा प्रश्न निवडणुकीविषयी होता. कॉन्झर्व्हेटिव्ह पार्टीला निवडणुका अप्रत्यक्ष व्हाव्या अशी इच्छा होती. आमचा सर्वांचा त्याला विरोध होता. परंतु गांधींनी ते मान्य केले. मी गांधींना प्रश्न केला की याच तत्त्वाचा पुरस्कार केल्याबद्दल काँग्रेसने मिसेस ॲनी बेझंटचे होमरूल बिल फेटाळले होते, ही

गोष्ट खरी आहे की नाही ? तिसरा प्रश्न आता काही माझ्या ध्यानात नाही. अध्यक्षानी गांधींना काही उत्तर द्यावयाचे आहे का म्हणून विचारले. गांधींनी उत्तर देण्यास नकार दिला. जर हिंदुस्थानला बुडविण्याचे पाप कोणाच्या हातून घडत असेल तर ते माझ्या हातून नाही, अस्पृश्यवर्गाच्याही हातून नाही, ते पाप गांधी, शास्त्री व अशाच दुसऱ्या लोकांच्या हातून घडलेले आहे.

आयर्लंडची परिस्थिती हिंदुंनी आठवावी. १९१६ साली त्या देशाची एकजूट करण्याचे शेवटचे प्रयत्न झाले. दक्षिण आयर्लंडमधील कॅथालिकांतर्फे रेडमंड व आयर्लंडतर्फे सर एडवर्ड कार्सन यांची बोलणी चालली होती. ज्यावेळी रेडमंडने उत्तर आयर्लंडमधील प्रॉटेस्टन्ट पंथाच्या लोकांसाठी खास हक्क देऊ केले, तेव्हा कार्सनने उत्तर दिले, 'जळोत ते तुमचे खास हक्क. आम्हाला तुमच्या हुकमतीखाली मुळी कसेही राहावयाचे नाही !' आम्ही असे कधी म्हटले आहे काय ? आम्हाला तसे म्हणायला सबळ कारणे आणि हक्क असूनही आम्ही तसे म्हटलेले नाही. त्याहून कितीतरी नम्रतेने आम्ही बोलत आहोत. हिंदू महासभेच्या अध्यक्षाप्रमाणे आम्ही अजून म्हटलेंले नाही की तुमची लोकशाहीची बोलणी म्हणजे स्वतःची सुलतानशाही झाकण्यासाठी दिलेल्या थापा आहेत. आम्ही म्हटले तुम्हाला स्वराज्य पाहिजे, घ्या, आम्ही तुम्हाला पाठिंबा देऊ. फक्त एक लहानशी न्याय्य अट आहे. आम्हाला आमच्या हितसंबंधाचे रक्षण करण्यासाठी खास हक्क द्या. कार्सनच्या भूमिकेपेक्षा आमची भूमिका कितीतरी उच्च पातळीवर आहे.

आमची ही भूमिका देशप्रेमाची नाही, उदात्त नाही, उदार अंतःकरणाची नाही असे शास्त्री किंवा गांधी किंवा कोणीही काँग्रेस पुढारी म्हणू शकेल काय ? दोन हजार वर्षांचा ब्राह्मणांचा केवढा भयंकर जुलूम आम्ही विसरावयास तयार आहोत ! व ते एका आशेवर की आम्हाला हे खास हक्क मिळाले तर देशातील इतर विशाल अंतःकरणाच्या माणसांच्या मदतीने आम्ही आमच्या समाजाला व राष्ट्राला खऱ्या माणुसकीचे व राष्ट्रत्त्वाचे हक्क प्राप्त करून देऊ. सर्व राजकारणात ह्याहून अधिक उदार, अधिक उदात्त आणि थोर भावना कोणी दाखवू शकेल काय ? म्हणून मी माझ्या हिंदू बांधवांना सांगतो की आतातरी तुमची मनोवृत्ती बदलून टाका आणि आम्ही जो स्वार्थत्याग करीत आहोत, भविष्यकाळाच्या आश्वासनावर विसंबून आम्ही आज जो धोका पत्करण्यास तयार होत आहोत त्याचा नीट विचार करा. आपण सामोपचाराने हा प्रश्न सोडवू. एकी करण्याची माझी इच्छा आहे. त्यासाठी मी तयार आहे. परंतु दुर्दैवाने अजून मला ह्या बाबतीत हिंदू समाजाचा अनुभव बरा नाही.

जेव्हा जेव्हा आम्ही आमचे डोके वर केले तेव्हा तेव्हा त्यांनी हशावरी गोष्ट घालविली. १९३२ साली प्रथम अस्पृश्यांचा प्रश्न वर आला आणि मुसलमानांच्या जोडीचे स्थान त्यांना मिळाले. तेव्हा मतदान कमिटीने सबंध देशात फिरून प्रत्येक प्रांतातील अस्पृश्यांची संख्या शोधून काढण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी मला सर्वत्र हाच अनुभव आला की सगळे हिंदू, मग ते जुने सनातनी असोत की स्वतःला व्यापक दृष्टीचे म्हणविणारे असोत, सर्व एकां सुरात सांगावयाचे की अस्पृश्य नावाची काही चिजच नाही. संयुक्तप्रांत, बिहार, पंजाब सगळीकडे हीच स्थिती. असे का ? कारण अगदी उघड आहे. आमच्या हिंदू बांधवांना कळले होते की, सरकार अस्पृश्यांचे वेगळे प्रतिनिधी कायदे मंडळात घेणार आहे आणि त्या प्रतिनिधींची संख्या अस्पृश्यांच्या एकंदर संख्येवर अवलंबून राहाणार आहे. सरकारचा निर्णय बदलणे त्यांना शक्य नव्हते. म्हणून अस्पृश्य नावाचा समाजच अस्तित्त्वात नाही, असा धादांत खोटा कांगावा त्यांनी सुरू केला होता. असा नीच डाव १९३२ साली हिंदू खेळत होते. आज ते निराळाच डाव खेळत आहेत.

गांधी व व्हाईसरॉय यांचा पत्रव्यवहार प्रसिद्ध झालेला तुम्हास माहीतच आहे. त्यामध्ये १५ जुलै १९४४ चे पत्र फार महत्त्वाचे आहे. त्यात व्हाईसरॉयांनी म्हटले आहे की, युद्धाअंती हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यास ब्रिटिश सरकार तयार आहे. परंतु एका अटीवर. ती अशी की, जी घटना त्यावेळी अंमलात येईल ती हिंदुस्थानातील राष्ट्रीय जीवनातील सर्व प्रमुख घटकांना संमत असली पाहिजे. हे प्रमुख घटक कोणते, हेही व्हाइसरॉयांनी सांगितले आहे. आपल्या सुदैवाने आणि हिंदुबांधवांच्या दुर्दैवाने त्यात अस्पृश्यांचाही एक प्रमुख घटक म्हणून त्यांनी उल्लेख केला आहे.

या बाबतीत काही वर्तमानपत्रे ओरड करीत आहेत की, व्हाइसरॉयचे हे विधान नवीन आहे आणि क्रिप्सने ब्रिटिश सरकारतर्फे जी योजना मांडली होती तीत असे काही म्हटले नव्हते. या गोष्टींची मला चीड येते. असा खोटा आणि दुष्ट विचार त्यांनी का करावा कळत नाही. हिंदू वर्तमानपत्रकारांनी आणि संपादकांनी आपण ज्याविषयी बोलतो त्याची माहिती तरी नीट घ्यावी आणि सर्व कळल्यानंतर त्यांना जी भ्याड टीका करावयाची ती करावी.

अस्पृश्यांचा मतदार संघ निराळा असावा अशी शिफारस सायमन कमिशनने किती आग्रहाने केली, ते सांगण्याची गरज नाही. कोणाची असे म्हणण्याची छाती आहे काय की, अस्पृश्य समाज हा या देशातील एक स्वतंत्र व महत्त्वाचा

घटक नाही. गोलमेज परिषदेत सरकारने त्यांना वेगळे प्रतिनिधीत्व का दिले ? अस्पृश्य समाज म्हणजे हिंदुंची एखादी शाखा किंवा जात नाही. तो एक स्वतंत्र घटक आहे. म्हणूनच त्याचे स्वतंत्र प्रतिनिधी घेण्यात आले होते. त्याचप्रमाणे जॉईंट पार्लमेन्टरी कमिटीचा रिपोर्ट पाहा. हा सारा जुना इतिहास आहे. त्यानंतर कितीतरी गोष्टी घडलेल्या आहेत. अस्पृश्य समाज स्वतंत्र घटक आहे.

मला माझ्या हिंदुबांधवांना स्पष्ट सांगावयाचे आहे की त्यांनी ह्या सर्व जुन्या कल्पना आता टाकून द्याव्यात आणि बऱ्यासाठी म्हणा अथवा वाईटासाठी म्हणा, अस्पृश्य समाज हा हिंदुस्थानचा एक स्वतंत्र घटक आहे, याची त्यांनी आपल्या मनाशी खूणगाठ बांधावी. मला त्यांना अगदी स्पष्टपणे सांगावयाचे आहे की, याबद्दल त्यांनी कसलीही शंका ठेवू नये.

गांधी-जिनांच्या वाटाघाटीतील मुख्य प्रश्नाबद्दल मला काहीच सांगावयाचे नाही. लोक मला विचारतात तुम्ही गांधी-जिना वाटाघाटीविषयी काहीच का बोलत नाही ? या वाटाघाटीविषयी काय म्हणावे तेच मला कळत नाही.

आता चालला आहे तसा फक्त दोन पक्षांमधील तडजोडीचा प्रयत्न केव्हाही संशयास्पद आहे. तिसऱ्याला लुबाडून स्वतःचा फायदा करून घेण्याचा हा दोघांचा डाव असल्यासारखे मला वाटते. गांधींकडून जिनांना काय हवे आहे आणि गांधी काय द्यावयाला तयार आहेत, हे मला माहीत नाही. पण जिनांना योग्य त्याहून जर काही जास्त गांधींनी दिले तर ते माझ्या वाट्यातून देतील अशी भीती वाटते. तेव्हा या वाटाघाटीमुळे मला एवढी काळजी का वाटते ते तुम्हाला सहज कळेल. देशातील सर्वात मोठ्या पक्षाचा पाठिंबा मिळवून काँग्रेसची ताकद वाढविणे व त्याच्या जोरावर ब्रिटिश सरकारला घाबरवून अस्पृश्यांच्या मागण्या डावलून तडजोड करण्यास भाग पाडणे, हा गांधींच्या धोरणाचा सर्वात मोठा भाग आहे.

जातीय प्रश्न क्षितिजावर दिसू लागल्यापासून आपल्या सार्वजनिक आयुष्यामध्ये गांधींनी जर काही केले असेल तर ते अस्पृश्यांकडे दुर्लक्ष करणे हेच होय.

गोलमेज परिषदेत मला एकटा वेगळा पाडण्याचा गांधींनी खूप प्रयत्न केला. हिटलरच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे मला त्यांनी चौफेर घेरून घेतले. मला एकटा करून माझा सर्व पाठिंबा नाहिसा करण्याचा त्यांनी प्रयत्न

केला. बरेच दिवस प्रयत्न फसल्यानंतर कोठलाही प्रामाणिक मनुष्य करणार नाही अशी गोष्ट त्यांनी केली. मुसलमानांकडे जाऊन जिनांना त्यांनी त्यांच्या १४ अटी देण्याचे कबूल केले. पण ते एका अटीवर की, त्यांनी ह्या 'नालायक अस्पृश्य कुतरड्या' बरोबर बोलणी करू नयेत. ह्याचा माझ्याकडे लेखी पुरावा आहे. गोलमेज परिषदेत गांधी व लीग यांच्यात झालेला एक लेखी मसुदा माझ्याकडे आहे. यावेळी तरी तसे होणार नाही, अशी मला आशा आहे.

आपले उद्दिष्ट काय आहे ते नीट समजून घ्या. शासनकर्ती जमात बनणे हेच आमचे उद्दिष्ट व आकांक्षा आहे हे तुमच्या मनात ठसू द्या. तुमच्या घराच्या भिंतीवर ते कोरून ठेवा. म्हणजे दररोज तुम्हाला आठवण राहील की, ज्या आकांक्षा आपण उराशी बाळगून आहोत, ज्याच्यासाठी आम्ही लढत आहोत ते काही लहानसहान संकुचित ध्येय नाही. थोड्याशा नोकऱ्यांसाठी किंवा सवलतींसाठी आपला लढा नाही. आमच्या अंतःकरणातील आकांक्षा फारच मोठ्या आहेत. शासनकर्ती जमात बनणे हीच ती आकांक्षा होय. ती कृतीत उतरवण्यासाठी केवढे भगीरथ प्रयत्न करावे लागतील ते मग तुमच्या ध्यानात येईल. केवळ निवेदनाचा किंवा शब्दांचा काही उपयोग होणार नाही. कदाचित गांधी त्याला हवेत उडवून लावतील.

गांधींना व सरकारलादेखील दोघांनाही दाखवावे लागेल की ह्यावेळी आम्ही मनाचा निश्चय करून हे सांगत आहोत व सरकारलाही आपल्याला निश्चितपणे उत्तर द्यावे लागेल. आपण आता काहीही टाळाटाळ चालू देणार नाही. सरकारने एकदा जे वचन दिले आहे ते सरकार पाळील अशी आम्ही अपेक्षा करतो. पण सरकारच्या किंवा इतर कोणाच्याही सदिच्छेवर अवलंबून राहाण्यात काही अर्थ नाही. आपण स्वतःवरच विश्वास ठेवला पाहिजे. आपण आपली जोरदार संघटना केली पाहिजे. दुसऱ्या सर्व अडचणी आपण बाजूस सारल्या पाहिजे.

ह्या शहरातील अस्पृश्यांमध्ये मला अत्यंत मोठा उत्साह दिसून येत आहे. तो कदाचित माझ्या आगमनामुळे असेल, परंतु स्थानिक वृत्तीने स्थानिक कार्यक्रम करून आपली शक्ती वाढणार नाही. आपण सर्व एका राजकीय संघटनेमध्ये जमलो पाहिजे व जगाला दाखवून दिले पाहिजे की, अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्येच अखिल अस्पृश्य समाजाची एकजूट झालेली आहे. (प्रचंड टाळ्या)



## २१२

# युद्धानंतर हुकूमशाही प्रस्थापित होता कामा नये

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मद्रासहून राजमहेंद्रीकडे जाण्यासाठी सोमवारी रात्री २५ सप्टेंबर १९४४ ला निघाले. ते द्वारपौडी स्टेशनला मद्रास मेलने मंगळवारी २६ सप्टेंबर १९४४ ला सकाळी येऊन पोहोचले. तेथून ते मोटारीने रामचंद्रपूरला आले. तेथे अस्पृश्यांनी त्यांचे स्वागत केले. तेथून त्यांची मोटार कोकीनाडाकडे निघाली, रस्त्यात वेलंगी या गावच्या अस्पृश्यांनी बाबासाहेबांना मानपत्र दिले. संध्याकाळी ते कोकीनाडाला पोहोचले. तेथे त्यांना ईस्ट गोदावरी डिस्ट्रिक्ट बोर्डातर्फे मानपत्र दिले. बोर्डाचे अध्यक्ष राय बहादूर बी. बी. सर्वेरायडू हे मानपत्रसमारंभाचे अध्यक्ष होते. मानपत्राला उत्तर देताना बाबासाहेबांनी भारताची सध्याची परिस्थिती व तीत देशाचे हिताचे धोरण कोणते याबद्दल भाषण केले. ते म्हणाले,

युद्धाला बिनशर्त मदत करणे, सशर्त मदत करणे, काहीच मदत न करणे आणि युद्धाला विरोध करणे असे विचारप्रवाह भारतात चालू आहेत. यामुळे देशातील राजकीय परिस्थितीत मोठा गोंधळ उत्पन्न झालेला आहे. युद्धाकडे पाहाण्याची निरनिराळ्या पक्षांची व पुढाऱ्यांची दृष्टी वेगवेगळी आहे. हे युद्ध आमचे नव्हे, यात ब्रिटिशांचा पराजय झाला तर बरेच वगैरे उद्‌गार हे पक्ष व पुढारी काढतात. पण ही त्यांची भूमिका चुकीची आहे. ब्रिटिशांचे राज्य संपून भारतात जपान अगर जर्मनी यांचे राज्य सुरू झाले तर भारतातील सर्व लोकांना पशुसमान जीवन घालवावे लागेल. ब्रिटिशांनी भारतावर अनेक अन्याय केलेले आहेत व त्याविरुद्ध भारतीयांना, चळवळ करण्याची व बोलण्याची घटनात्मक स्वतंत्रता होती व आहे. परंतु जपान अगर जर्मनीच्या हुकूमशाही राज्यांमध्ये हे स्वातंत्र्य उपभोगायला मिळणार नाही. युद्ध संपल्यानंतर भारताला जादा हक्क नक्की मिळतील व ते हक्क मिळवण्यासाठी युद्धात जपान व जर्मनी यांचा पाडाव करण्यासाठी भारतातील सर्व पक्षांनी हातभार लावणे आपल्याच हिताचे आहे. या बाबतीत 'छोडो भारत' चळवळ करून युद्धाला उपयुक्त प्रयत्न जे होतात ते

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३९२-९३.

गुप्तपणे हाणून पाडण्याचे ज्यांनी ज्यांनी प्रयत्न केले त्यांना त्यांना सरकारने तुरुंगात डांबले, यात सरकारकडून अन्याय झालेला नाही. जीना आणि गांधी यांच्यात जी तडजोड व्हावी असे लोकांना वाटते तेवढ्या तडजोडीवरून भारताचे राजकीय प्रश्न सुटणार नाहीत. अस्पृश्य, हिंदू , मुसलमान वगैरे सर्व वर्गातील व पक्षातील लोकांनी एकत्र बसून हे प्रश्न सोडवण्याचे प्रयत्न करावे.



# २१३
# ब्राह्मणेतर लोक ब्राह्मणी जातीभेदाच्या विषाने मानवी सद्‌गुणांना मुकले

दिनांक २६ सप्टेंबर १९४४ रोजी संध्याकाळी कोकीनाडा येथील शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन, रचुपेटे डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशन, वर्मा आंध्र इव्ह्युक्यूज असोसिएशन, वलंदरपेटा, आदि आंध्र असोसिएशन आणि प्रबोधन साहित्य समिती या संस्थांतर्फे डॉ.बाबासाहेब आंबेडकरांना पी. आर. कॉलेज हॉल मध्ये मानपत्रे देण्यात आली. त्यांना उत्तर देताना बाबासाहेबांनी भाषण केले. ते आपल्या भाषणात म्हणाले,

बंधुंनो आणि भगिनींनो,

कोणताही वर्ग अगर कोणतीही जात एखाद्या देशाच्या समाजात प्रभुत्व गाजवणारी का होते ? त्या वर्गाच्या अगर जातीच्या हातात सत्ता असते म्हणून. मग ती सत्ता आर्थिक, धार्मिक, राजकीय अगर इतर कसलीही असो. ब्राह्मणांनी हे पाचसहा हजार वर्षापूर्वी ओळखले. म्हणून ब्राह्मण लोक आपली जात सर्व हिंदू समाजाच्या डोक्यावर मिऱ्या वाटणारी कशी करता येईल याबद्दल विचार करीत होते,. त्यासाठी त्यांनी वेदात चातुर्वर्ण्याची उत्पत्ती केली. समाजाचा प्रमुख, देवळांचा प्रमुख, गावांचा प्रमुख ब्राह्मणच असला पाहिजे. ब्राह्मणाला सर्व जातीच्या बायका करता याव्यात, त्याला आपला मुख्य प्रधान, पुरोहित, सेनानी राजाने करावे वगैरे नियम मनू व इतर धर्मशास्त्रकार यांनी आपापल्या स्मृतीग्रंथात तयार करून ते हिंदू समाजाच्या बोकांडी मारले. ब्राह्मणांचे हे श्रेष्ठत्व हाणून पाडण्यासाठी ब्राह्मणेतरांनी वैदिक काळात व नंतर एकंदर सात मोठे झगडे केले. ब्राह्मण मुठभर व ब्राह्मणेतर लाखोनी मोजता येतील असे असता या झगड्यात ब्राह्मणेतरांना हार खावी लागली. कारण ब्राह्मणेतर लोक हे ब्राह्मणी जातीभेदाच्या विषाने मानवी सद्‌गुणांना मुकलेले होते. तेव्हा अस्पृश्य वर्ग जर सामर्थ्यशाली व्हावयाचा असेल तर त्याच्या हातात राजकीय व आर्थिक सत्ता आली पाहिजे. राजकीय सत्ता हस्तगत करण्याचा

---

डॉ. भी. रा. आंबेडकर चरित्र : लेखक चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३९३-९४.

मोका सध्या अस्पृश्यांना प्राप्त झालेला आहे. त्यांना अशी संधी गेल्या हजारो वर्षात मिळाली नाही. या संधीचा फायदा घेण्यासाठी त्यांनी आपापसातील मतभेद सोडून द्यावेत व शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्ये सामील व्हांवे. तुम्ही राजकीय सत्ता काबीज केली की, आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक सत्ता मिळवण्याचे मार्ग तुम्हाला मोकळे होतील.

मात्र या मार्गात एक मोठी मानसिक अडचण आहे. गांधी व कॉंग्रेस यांनी हरिजन सेवक संघातर्फे अस्पृश्यातील लहानथोर विद्यार्थ्यांव्यतिरिक्त इतरांना आर्थिक मदत देण्याचे सत्र सुरू केले. यात त्यांचा हेतू पवित्र नसून दुष्ट आहे. त्यांना माहित आहे की, आपल्या पैशाने हे लोक मिंधे होतील व आपल्या बाजूने राहून, 'ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी' या न्यायाने कॉंग्रेसच्या चळवळीला उचलून धरतील. महाभारतातील पांडवांची बाजू न्यायाची व कौरवांची अन्यायाची होती हे माहीत असूनही भीष्म व द्रोण हे कौरवांचे मीठ खाणारे होते म्हणून त्यांनी कौरवांना सहाय्य केले व शेवटी त्यांचा सत्यानाश झाला. त्याचप्रमाणे हरिजन म्हणून जगणाऱ्या अस्पृश्यांची परिस्थिती होणार आहे. म्हणून मी आमच्या तरूण विद्यार्थ्यांना धोक्याची सूचना देतो की, या सापळ्यात अडकून पडू नका. माझ्या इशाऱ्याचे तुम्हाला प्रत्यंतर पाहावयाचे असेल तर तुम्ही हरिजन सेवक संघवाले, अगर कॉंग्रेसवाले हिंदू किंवा गांधी यांना सामाजिक समतेची मागणी करून पाहा. ते तुम्हाला दटावून गप्प बसायला लावतील हे मी नक्की सांगू शकतो.



## २१४
# पक्षांच्या व जातींच्या हार्दिक सहकार्यानेच राजकीय पेच सुटतील

डॉ. बाबासाहेब आंबेडकर गुरूवारी २८ सप्टेंबर १९४४ ला संध्याकाळी राजमहेंद्री येथे आले. बरोबर श्री. पां. ना. राजभोज, जनरल सेक्रेटरी फेडरेशन, आणि श्री. व्ही. रामकृष्णन, ए. सी. एम. लेबर डिपार्टमेंट, हे होते. बाबासाहेब आंबेडकरांना म्युनिसीपालिटीतर्फे म्युझियम हॉलमध्ये मानपत्र देण्यात आले. म्युनिसीपल चेअरमन श्री. सोमिना कामेश्वरराव आणि म्युनिसीपल कमिश्नर श्री. के. व्यंकटाद्रि चौधरी यांनी त्यांचे स्वागत केले. बाबासाहेबांचे अद्वितीय विद्यार्जन. त्यांनी केलेली अस्पृश्यातील जागृती आणि त्यांच्यासाठी व कामगारांसाठी त्यांनी केलेली कामे, याबद्दलचा मानपत्रात उल्लेख करून म्युनिसीपालिटीने लोकोपयुक्त व अस्पृश्यांना हितकारक अशी कोणती कामे केली, याबद्दलची माहिती देण्यात आली होती. सरकारकडे काही मागण्याही केलेल्या होत्या.

लोकोपयोगी कामे केल्याबद्दल बाबासाहेबांनी म्युनिसीपालिटीचे अभिनंदन केले. अस्पृश्यांच्या शिक्षणाची सोय केल्याबद्दल त्यांनी तिचे आभार मानले. भारतातील ही एकच म्युनिसीपालिटी अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी प्रयत्न करीत आहे, इतर म्युनिसीपालिट्यांनी हा धडा गिरवावा, असे उद्‌गार काढले.

गांधी-जीना वाटाघाटी फिसकटल्याबद्दल त्यांनी दुःख प्रदर्शित केले. या वाटाघाटी, मुळी एकांगीच होत्या. त्यात अल्पसंख्यांक जातींना स्थान नव्हते. राजकीय प्रश्न सोडविण्याची ही खरी रीत नव्हे. सर्वांनी एकत्र बसावे, घटना तयार करावी, या घटनेवर सह्या कराव्या आणि त्या घटनेप्रमाणे आम्हाला भारतात राजवट करू द्या अशी मागणी करण्याकरिता शिष्टमंडळ लंडनला पाठवावे. ते मंडळ एकट्या गांधींचे असले तरी चालेल. पण त्यांनी भारताची मागणी व्यवस्थितपणे मांडली पाहिजे. मी हे असे म्हणतो याचे कारण गांधींनी आतापर्यंत भारतात विलक्षण राजकीय जागृती निर्माण केली, पण तिचा फायदा देश स्वातंत्र्यासाठी कसा करून घ्यावा, याची दूरदृष्टी गांधीजींजवळ नाही.

---

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र : ले. चां. भ. खैरमोडे, खंड ९, पृ. ३९४-९५.

दूरदृष्टी ज्या देशात नाही त्याचा सत्यानाश होतो असे जुन्या करारात एक वचन आहे. गांधींच्या संबंधात त्याची आठवण होते. शिवाय गांधींजवळ संपूर्ण स्वातंत्र्याची आच नाही. गांधींची तुलना कधी कधी अब्राहम लिंकनशी करण्यात येते. लिंकन हा प्रथम संयुक्त राष्ट्र कसे उभारता येईल हे महत्त्वाचे मानीत होता. त्याच्या निर्मितीसाठी निग्रोंची गुलामगिरी ठेवणे अगर नष्ट करणे हे त्या निर्मितीच्या प्रश्नावर अवलंबून असावे, असे मानीत होता व त्याप्रमाणे त्याने प्रथम गुलामगिरी नष्ट करण्याचे नाकारले व काही वर्षांनी म्हणजे १८६३ साली त्यांनी गुलामगिरी नष्ट केल्याचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. कारण गुलामांचा उपयोग लढाया जिंकून युनियन अभंग ठेवणे, हे त्याला जरुरीचे वाटले. गांधींचेही असेच आहे. त्यांना स्वातंत्र्य हवे, पण वर्णाश्रमही हवा. समाजात संपूर्ण समता त्यांना नको आहे. अशा वृत्तीच्या पुढाऱ्यांजवळ दूरदृष्टी कशी असणार ? स्वातंत्र्याचा प्रश्न निघाला की अल्पसंख्यांक जाती आपापल्या संरक्षणासाठी जादा राजकीय हक्क मागतात. असले हक्क मागणे म्हणजे राष्ट्रद्रोह होय, अशी भावना गांधी व काँग्रेस यांनी देशांत पसरविली आहे. भारताला स्वतंत्र करण्यासाठी १८८५ मध्ये काँग्रेस उत्पन्न झाली. पण गांधींच्या नेतृत्वामुळे काँग्रेसने पाकिस्तानचा प्रश्न उत्पन्न केलेला आहे.

अशा परिस्थितीत भारताचे राजकीय पेच कसे सुटणार ? ते फक्त पक्षांच्या व जातींच्या हार्दिक सहकार्यानेच सुटतील.



# बुद्धाच्या वेदांवरील हल्ल्यामुळेच शूद्रांचा सेवाधर्म जावून ते राज्यकर्ते झाले

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना २९ नोव्हेंबर १९४४ रोजी सायंकाळी अखिल भारतीय दलित फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी, श्री. पी. एन. राजभोज यांनी पुणे येथे चहापार्टी दिली. त्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

आज भाषण करण्याची माझी इच्छा नव्हती. एकाने मी सर तेजबहादूर सप्रू यांच्या योजनेवर अभिप्राय द्यावा अशी सूचना केली. परंतु त्या बाबतीत येथे बोलण्याची माझी इच्छा नाही. मी मद्रासमध्ये गीतेसंबंधी जे बोललो त्याबद्दल पुण्यातील ब्राह्मणांनी नापसंती व्यक्त केली आहे. त्याला उत्तर देणे उचित वाटते. माझे म्हणणे समजून घेण्यासाठी एखादी जाहीर सभा पुण्यात घेतली गेली असती तर तेथे मी माझी बाजू मांडली असती. पण तशी संधी न मिळाल्यामुळे या समारंभ प्रसंगीच मी आपले म्हणणे मांडतो.

वेद हे ईश्वरनिर्मित आहेत, अपौरुष आहेत, त्यांची आज्ञा मानावी, असे सांगण्यात येते. पण त्याला इतिहासात कोठे पुरावा नाही. ब्राह्मणांखेरीज कोणीच वेदाला प्राधान्य दिलेले नाही व आपला धर्मग्रंथ म्हणून कधीच मानलेले नाही. वेदाला प्रमाण मानणे ही ब्राह्मणांनी मागाहून आणलेली पद्धती, 'थीअरी' आहे. याचा पुरावा आश्वलायन गृह्य सूत्रातून भरपूर मिळतो. त्यावेळी ब्राह्मणही वेदाला प्रमाण मानीत नव्हते, याचा स्पष्ट उल्लेख आहे. सामाजिक मूल्ये निर्माण करण्यापूर्वी जनता पंचायतीचा निर्णय ग्राह्य मानीत असत. त्यावेळी वेदाला चौथे किंवा पाचवे स्थान असे. शबर स्वामींनी जनमेजयाची सूत्रे घेऊन त्यावर भाष्य केले आहे. त्यात पूर्वपक्ष व उत्तरपक्ष मांडले आहेत. पूर्वपक्षात वेदासंबंधी उल्लेख आला असून वेदविरोधकांची बाजू मांडलेली आहे. शबर स्वामींनी ब्राह्मण वेद मानीत नव्हते, असेच म्हटले असून वेद निर्मिती म्हणजे मूर्खांचे व वेड्यांचे कार्य होय असा दावा मांडला आहे. बुद्धांनी वेद प्रमाणभूत कधीच मानले नाहीत. वेदप्रणित धर्मास बुद्धधर्माने धक्का दिला. हा बुद्धधर्म शूद्रांचा होता व तो वेदप्रामाण्य कधीच मानीत नव्हता.

---

जनता : ९ डिसेंबर १९४४.

मी गीता न वाचता टीका करतो अशी टीका केली जाते. पण ती टीका खोटी आहे. गेली पंधरा वर्षे गीतेचा अभ्यास केल्यावरच माझी मते मांडण्यास मी सुरवात केली.

गीतेत विशेष असे काही नाही. तीत प्रामुख्याने तीन गोष्टी सांगितल्या आहेत. मरणे, मारणे, हिंसा करणे पाप आहे काय, वर्णाश्रम धर्माची महती व भक्तीने मोक्ष मिळेल, ह्या त्या तीन गोष्टी होत. गीतेचा अभ्यास करताना निव्वळ गीता पुस्तकावर अवलंबून गीतेचा अर्थ कळणार नाही तर त्या कालीन इतर वाङ्मयाचाही अभ्यास करून गीतेचा अर्थ लावला पाहिजे.

या देशाचा पूर्वीचा इतिहास ध्यानात घेतला म्हणजे जवळजवळ दोन हजार वर्षे ब्राह्मणवर्ग व बुद्धधर्म यांचा वाद चालू होता. या वादात जे वाङ्मय निर्माण झाले ते धार्मिक स्वरूपाचे नसून राजकीय स्वरूपाचे आहे. देशातील सत्ताकेन्द्रावर आपली हुकूमत चालावी म्हणून गीता ग्रंथाचा जन्म झाला.

वेदातील थोडाफार अनुवाद गीता ग्रंथात करण्यात आला आहे. परंतु वेदात तरी असे कोणते ज्ञान साठविले आहे ? खरे पाहिले तर वेद दोनच आहेत. एक ऋग्वेद व दुसरा अथर्ववेद. मी वेद किती तरी वेळा वाचले आहेत. त्यात समाजाच्या किंवा मानवाच्या उन्नतीसाठी व नीतिमत्तेस पोषक असे काही सांगितलेले नाही. अथर्ववेदात, बायको प्रेम करीत नसली तर काय करावे, दुसऱ्याची बायको कशी वश करावी, द्रव्यहरण कसे करावे हे सांगितले असून जारण मारणादी गोष्टींचाही उल्लेख आहे. वास्तविक वेदांसारख्या ग्रंथात या विषयांची काय जरुरी होती ? यातील पुरुष सूक्तात ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत कोणी कसे वागावे हे दिले आहे. बुद्धाचा याचबाबत कटाक्ष होता व त्याच दृष्टीने चातुर्वर्ण्याबद्दल त्यांनी टीका केली आहे. क्षत्रियांनी मारणे हे त्यांचे कर्तव्य आहे, असे सांगितले आहे. एकाने दुसऱ्याला मारणे हे जरुरीही असू शकेल, पण कर्तव्य ठरणार नाही. गीतेच्या दुसऱ्या अध्यायात १८ ते ३९ श्लोकात वेदान्ताचा आधार घेऊन आत्मा अविनाशी आहे, देह जरेने किंवा अन्य कारणाने नाहिसा होणारच, असेच विवरण केलेले आढळेल. परंतु विचार करा की एखाद्या खुनी खटल्यात वकिलाने जज्जास असे सांगितले की 'साहेब आत्मा अविनाशी आहे, तेव्हा खुनाबद्दल आरोपीस का शिक्षा करता ?' तर हे वकिलाचे म्हणणे कसे दिसेल ?

बुद्ध धर्माच्या तत्त्वज्ञानापुढे हा पुरावा टिकणे शक्य नव्हते. बुद्ध तत्त्वाने सामाजिक, मानसिक व राजकीय क्रांती करुन शूद्रांना उच्चपद प्राप्त करुन दिले. त्याकाळी अनेक शूद्र राजे झाल्याचे दाखले आहेत. आपल्या हातातील

सत्ता गेल्यामुळे ब्राह्मणांनी पुन्हा चातुर्वर्ण्य पद्धतीचा पाया घालून भगवद्‌गीतेच्याद्वारे ते काम केले व देशाची आपल्या हातून गेलेली सत्ता पुन्हा परत आपल्या हातात आणली.

वर्णाश्रम धर्माचा गीतेपूर्वी काय पाया होता तो जैमिनीने आपल्या पूर्वमीमांसा ग्रंथात दिला आहे. वेदावर बुद्धानेच नव्हे तर चार्वाक वगैरे विद्वानांनीही टीका केलेली आहे. बुद्धाच्या वेदावरील हल्ल्यामुळेच शूद्रांचा सेवाधर्म जावून ते राज्यकर्ते झाले.

सांख्य तत्त्वज्ञानावर श्रीकृष्णाने चातुर्वर्णाची चौकट निर्माण केली. सांख्यकारांनी त्रिगुणाला मान्यता दिलेली आहे आणि गीताकारांनी चार गुण, चार वर्ण यांची सांगड घातलेली आहे. आतापर्यंत एकाही विद्वानाने सांख्यकारांच्या व गीताकारांच्या या तफावतीचा मेळ बसविलेला नाही. श्रीकृष्णाच्या भगवद्‌गीतेने चातुर्वर्णास आधार दिला म्हणूनच आज चातुर्वर्ण्य टिकून राहिला आहे.

भगवद्‌गीतेचा ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करताना मला या पुस्तकात चार ठिगळे बसविल्याचे आढळून आले. माझे मत असे आहे की प्रथम हा एक कृष्ण वर्णनाचा त्याच्या जातभाईंनी म्हणजे सातवतानी गवळ्यांनी, अर्जून हतवीर्य झाला असताना कृष्णाने त्याला युद्धप्रवण केले म्हणून कृष्णाचे गुणगान करण्यासाठी रचलेला पोवाडा होता. त्यात धर्म अगर तत्त्वज्ञान नव्हते. त्यावेळी त्यात फक्त ६० श्लोक असावेत. नंतर हे लोक जेव्हा कृष्णाला ईश्वर मानू लागले त्यावेळी त्यांनी गायिलेली स्तुती म्हणजे भक्तिमार्ग झाला व अशारीतीने कृष्णाला देव बनविला. नंतर पुढे गीतेचे असेच रूपांतर होऊन ती आजच्या स्वरूपात आली. यात मला कोणाला दोष द्यावयाचा नाही, परंतु जोपर्यंत तुम्ही हे ग्रंथ प्रमाण म्हणून मानाल तोपर्यंत जगात तुमचा उद्धार होणार नाही. या पुस्तकातून शूद्रांची निंदा व अवहेलना करण्यात आली आहे. त्यांच्यावर निरनिराळे आरोप करण्यात आले आहेत. त्यांच्यात न्यूनगंड निर्माण होईल, ते कायमचे दलित राहतील, अशी योजना करण्यात आली आहे. ती पुस्तके जर तुम्ही आम्हाला धर्मग्रंथ म्हणून प्रमाणभूत माना अशी सक्ती करीत असाल तर ते मी कधीही मान्य करणार नाही. हे माझे एक जीवन कार्य आहे. स्वतः समजावून घेऊन ते मला माझ्या लोकांना समजावून द्यावयाचे आहे. खालच्या वर्गातील लोकांना निःसंतान करण्याचा, त्यांना कायमचे पायदळी ठेवण्याचा व त्यांना रसातळाला नेण्याकरिता पद्धतशीर प्रयत्न करणारा असा एखादा विशिष्ट वर्ग जगातील इतर कोणत्याही देशात आढळणार नाही.

• • •

## २१६
# विद्यार्थ्यांनी शिक्षणापेक्षा राजकारणात दंग होणे हा शैक्षणिक ऱ्हास होय

कलकत्ता येथे ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् स्टुडन्टस् फेडरेशनच्या वतीने तारीख २ जानेवारी १९४५ रोजी डॉ. बाबासाहेबांच्या सन्मानाप्रित्यर्थ जंगी सभा घेण्यात आली होती. त्या वेळी अखिल भारतीय दलितवर्ग विद्यार्थी संघाच्या सभेपुढे भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

विद्यार्थी वर्गाची शिक्षण संपादनाच्या दृष्टीने परिस्थिती बरीच खालावलेली आहे. मागील सालापेक्षा सरकारने सध्या बरीच रक्कम शिक्षणासाठी खर्च केली आहे. परंतु अलिकडे विद्यार्थी शिक्षणापेक्षा राजकारणातच जास्त दंग असलेले दिसून येतात, हा सुद्धा मी म्हणतो तसा शैक्षणिक ऱ्हास होय. 'राजकारण हाच विद्यार्थी चळवळीचा हेतू होय ' हा बऱ्याच पुढाऱ्यांचा दृष्टिकोन आपल्याला मुळीच मान्य नाही. अखिल भारतीय विद्यार्थी परिषद ही काँग्रेसच्या ठरावाला पाठिंबा देण्यापलिकडे काहीच करीत नाही. त्यांच्या चर्चा-विषयात काहीच नाविन्य नाही. म्हणून राजकारणापासून अलिप्त राहाण्यासाठी अस्पृश्य विद्यार्थ्यांनी आपली स्वतंत्र संघटना स्थापन केली पाहिजे. अस्पृश्य विद्यार्थ्यांनी अखिल भारतीय विद्यार्थी फेडरेशनशी असलेले आपले संबंध तोडून टाकावे आणि विद्यार्थी जीवनाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या असलेल्या प्रश्नांकडे त्यांनी अधिक लक्ष पुरवावे.



---

जनता : ६ जानेवारी १९४५.

## २१७

# सत्ता कोणाचीही असो अस्पृश्यांना दडपण्याचाच प्रयत्न होईल

कलकत्ता येथे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे मुखपत्र म्हणून नवीनच सुरू झालेल्या ' पीपल्स हेराल्ड ' या इंग्लिश साप्ताहिकाचे प्रकाशन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते ता. ४ जानेवारी १९४५ रोजी झाले. या प्रसंगी ते आपल्या महत्त्वपूर्ण भाषणात म्हणाले,

काँग्रेसच्या राजकारणाचा इतका अध:पात झाला आहे की गांधींच्या नंतर काँग्रेसच्या ठिकऱ्या उडालेल्या आपणास दिसतील. राजकीय व नैतिकदृष्ट्या आपल्या अस्पृश्य समाजाचा पक्ष हाच या देशातील चिरकाल टिकणारा पक्ष राहील.

आपल्या पक्षाबद्दल विरोधकांकडून जाणूनबुजून गैरसमज पसरविण्यात येतात. केवळ काही नोकऱ्यांसाठी आणि अन्नाच्या तुकड्यांसाठी आपल्या पक्षाचा लढा आहे, हा आरोप मूर्खपणाचा आहे. त्यात काही अर्थ नाही. वास्तविक, या देशात स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या तत्त्वांची प्रस्थापना करण्याकरता अस्पृश्य समाजाचा पक्षच खरा लढा देत आहे आणि या बाबतीत आपल्या पक्षाची तत्त्वप्रणाली केवळ अस्पृश्य समाजाचाच प्रश्न सोडविण्याचा, ही मर्यादित ध्येयमर्यादा ओलांडून केव्हाच वरील तीन उदात्त आणि सर्वश्रेष्ठ तत्त्वावर जाऊन भिडली आहे.

काँग्रेसच्या राजकारणात या गोष्टींचा पूर्ण अभाव आपणास दिसून येतो. काँग्रेस देशाच्या स्वातंत्र्याचा दावा करते पण त्यात ढोंगीपणा आहे. काँग्रेस ही निर्भेळ स्वातंत्र्य किंवा समता यासाठी मुळीच लढत नाही. काँग्रेसच्या स्वातंत्र्यात आपणाला स्वातंत्र्य मिळण्याची आशा नाही. सामाजिक, राजकीय आणि आर्थिक समता मिळणार नाही, आपणाला बंधुभावाने वागविले जाणार नाही. म्हणून काँग्रेसच्या ह्या स्वातंत्र्य लढ्याच्या व्यापक चळवळीमध्ये भाग घेण्याऐवजी, हजारो वर्षे गुलामगिरीमध्ये अडकून पडलेल्या माझ्या अस्पृश्य समाजाच्या उद्धारकार्यासाठी मी माझे जीवित वाहून घेतले आहे. देशाच्या स्वातंत्र्यापेक्षा अस्पृश्योद्धार हाच माझा आयुष्यातील जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. हिंदुस्थानमध्ये, अस्पृश्योद्धारापेक्षा उदात्त आणि श्रेष्ठ

---

जनता : १३ जानेवारी १९४५.

प्रतीचे असे दुसरे एखादे कार्य आहे, असे मला मुळीच वाटत नाही. मी ज्या समाजामध्ये जन्मलो आहे, त्या समाजाच्या उद्धारासाठी झटणे हे माझे कर्तव्य आहे. आधी मला माझ्या समाजाचे ऋण फेडावयाचे आहे, त्यानंतर देशाचे. माझे हे जीवितकार्य उदात्त असेच आहे, याबद्दल मला मुळीच संदेह नाही.

स्पृश्य हिंदुंच्या विषयी असे म्हणता येईल की देशातील लक्षावधीच नव्हे तर कोट्यावधी रंजलेल्या, गांजलेल्या आणि दडपल्या गेलेल्या लोकांचे रक्त शोषण करून त्यांच्या श्रमावर मजा मारण्याचा ऐतखाऊ हिंदू लोकांचा कावा आहे. अशा भांडवलशाही खुशालचेंडूंच्या हाती देशाचे स्वातंत्र्य जाणार असेल तर त्याचा आपल्याला व देशातील जनतेला काहीच उपयोग होणार नाही. हिंदुंच्या हाती देशाची सत्ता गेली तर ते अस्पृश्य समाजाला आणि रंजल्या गांजलेल्या जनतेला अधिकच दडपण्याचा प्रयत्न करतील, याबद्दल मला मुळीच शंका नाही. म्हणून आपण एव्हापासूनच दक्षता बाळगणे अगत्याचे आहे. या वेळी आपण आपली संघटना मजबूत केली नाही तर अमेरिकेच्या राज्यघटनेमध्ये निग्रो लोकांची जी अवस्था आहे तीच गत आपली झाल्याशिवाय राहणार नाही, याबद्दल आपणापैकी प्रत्येकाने खातरजमा बाळगली पाहिजे. अमेरिकेसारख्या सुधारलेल्या देशात या विसाव्या शतकात देखील निग्रो लोकांच्या हक्कांना स्थान नाही. कारण त्यांच्यात एकी नाही, संघटना नाही म्हणून त्यांची अशी दुर्दशा आहे. निग्रो लोकांप्रमाणे आपली स्थिती होऊ देता कामा नये. यावर उपाय एकच की आपल्यातील झाडून साऱ्या जमातींनी, लहान थोरांनी, स्त्रीपुरुषांनी आपल्या शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या एकाच झेंड्याखाली संघटित होणे. आपण अशी अभेद्य संघटना निर्माण केली तर आपल्या हक्कांचे रक्षण करून हिंदू लोकांचे डाव आपण सहज हाणून पाडू शकू.

सध्याच्या युगात वर्तमानपत्राचे अत्यंत महत्त्व आहे. आपापल्या पक्षाचा प्रचार करण्याकरिता इतर पक्ष हजारो रुपये खर्च करून वर्तमानपत्रे चालवितात. जनतेपुढे आपली राजकीय आणि नैतिक बाजू मांडण्यासाठी व त्याचप्रमाणे आपण निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या कार्याची माहिती देण्यासाठी वर्तमानपत्रांची आवश्यकता आहे. आपल्या चळवळीचा दृष्टिकोन मांडण्याकरिता आज आपणास प्रांतोप्रांती अनेक वर्तमानपत्रे पाहिजे आहेत. त्या दृष्टीने अस्पृश्य समाजाच्या वतीने येथे सुरू होणारे हे ' पीपल्स हेराल्ड ' साप्ताहिक आपली बाजू निर्भीडपणे मांडण्याचे कार्य उत्तम प्रकारे बजावील असा मला पूर्ण भरवसा आहे. 'पीपल्स हेराल्ड' ची उत्तरोत्तर प्रगती होवो, असे मी इच्छितो.



२१८

# आम्ही आमच्या कर्तृत्वाने आणि हिंमतीने देशाकरिता जे करावयाचे ते स्वतंत्रपणे करू

" अखिल भारतीय दलित फेडरेशनचे तिसरे अधिवेशन मुंबई येथे ता. ५ व ६ मे १९४५ रोजी अत्यंत उत्साहाने पार पडले.

राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रात आज प्रचंड घडामोडी चालू असताना हिंदुस्थानातील आठ कोटी अस्पृश्य जनतेला कोणते प्रश्न सर्वात जास्त जिव्हाळ्याचे वाटतात व त्या प्रश्नांच्या बाबतीत तिचे काय म्हणणे आहे हे समजण्याच्या दृष्टीने हे अधिवेशन अत्यंत महत्त्वाचे होते.

अस्पृश्य समाज आपल्या देशातील जनतेचा सर्वात गांजला जाणारा विभाग आहे. गुलामगिरी, पिळवणूक, विटंबना या समाजाइतकी दुसऱ्या कोणाच्याही वाट्याला आलेली नाही. असा हा समाज आज जागृत झाला आहे. दलित फेडरेशनची प्रचंड संघटना उभारून त्याने ताकद पैदा केली आहे व 'शासनकर्ती जमात' बनण्याचे ध्येय पुढे ठेवून त्याकडे वेगाने प्रगती करण्याचा त्याने निर्धार केला आहे, हे या अधिवेशनात स्पष्टपणे दिसून आले.

या अधिवेशनाला हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतातून अस्पृश्य समाजाचे सुमारे १,००० प्रतिनिधी आले होते. याखेरीज बाहेरून आलेल्या प्रेक्षकांचा भरणाही फार मोठा होता. एकट्या नागपूरहूनच सुमारे ५०० लोक आले होते व त्यापैकी ५० हून अधिक स्त्रिया होत्या. गुजरात मधून २०० लोक आले होते.

परळ येथील 'नरे पार्क' चे विस्तीर्ण मैदान अधिवेशनाच्या वेळी लोकसमुदायाने भरगच्च भरले होते. प्रेक्षकांसाठी कमीतकमी १ रुपयाची तिकीटे ठेवली असताही ५० हजाराहून अधिक लोक अधिवेशनाला आले होते व त्यापैकी सुमारे ५ हजार स्त्रिया होत्या. डॉ. आंबेडकरांनी आपल्या भाषणात सभेला जमलेल्या लोकांची संख्या एक लाख ते दीड लाख असल्याचा उल्लेख केला. मुंबईत अस्पृश्य समाजाची वस्ती सुमारे दोन-अडीच लाख आहे व यापैकी निम्म्याहून अधिक कुटुंबातून प्रत्येकी एकतरी माणूस सभेला आला होता असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही. तान्ही मुले व म्हातारीकोतारी माणसे यासह सबंध कुटुंबच्या कुटुंब सभेला आल्याची शेकडो उदाहरणे नजरेस पडत होती.

## मुंबईत २६,००० सभासद

या अधिवेशनाची तयारी करण्यासाठी स्थानिक कार्यकर्त्यांना पुरेसा वेळ मिळाला नाही. प्रथम त्यांनी एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यात मुंबई शहरापुरती दलित फेडरेशनची परिषद भरविण्याचे ठरविले होते पण त्यानिमित्त डॉ. आंबेडकरांची भेट घेण्यासाठी फेडरेशनच्या मुंबई शाखेचे सेक्रेटरी श्री. एस. बी. जाधव दिल्लीस गेले तेव्हा फक्त मुंबई शहराऐवजी अखिल भारतीय अधिवेशन ताबडतोब भरविण्याचा निर्णय त्यांना कळविण्यात आला. एवढ्या थोड्या मुदतीत सर्व तयारी पार पाडण्याचे कार्य स्थानिक कार्यकर्त्यांनी उत्कृष्ट रीतीने बजावले. प्रथम त्यांनी मुंबई हा दलित फेडरेशनच्या संघटनेचा आदर्श बनविण्यासाठी सभासद नोंदणीची मोहीम जोरात सुरू केली. मुंबईतील फेडरेशनच्या २० वार्ड कमिट्यांनी धुमधडाक्याच्या प्रचाराने सभासदांची संख्या ६ हजारावरून २६ हजारावर नेली. 'नरे पार्क'वर शोभिवंत मंडप उभारण्याचे काम झटपट पार पाडण्यात आले. बाहेरून येणाऱ्या प्रतिनिधींना व प्रेक्षकांना उतरण्यासाठी परळ भागातील म्युनिसिपल शाळात सोय करण्यात आली. नरे पार्कवर अधिवेशनाच्या वेळी जमलेला प्रचंड जनसमुदाय मुंबईतील दलित फेडरेशनच्या शेकडो तरुण कार्यकर्त्यांनी रात्रंदिवस जिवापाड मेहनत घेऊन निर्माण केलेल्या प्रचंड उत्साहाचा पुरावा होता.

## दहा हजारांची मिरवणूक

शुक्रवार, ता. ४ रोजी संध्याकाळी दादर स्टेशनवर अखिल भारतीय दलित फेडरेशनचे अध्यक्ष रावबहादूर शिवराज यांचे थाटाने स्वागत करण्यात आले. परळ महिला संघातर्फे सौ. मीनांबल शिवराज यांना हार घालण्यात आला. तेथून नरे पार्कपर्यंत अध्यक्षांना मिरवणुकीने नेण्यात आले. मिरवणुकीत १०,००० लोकांनी भाग घेतला होता. "आठ कोटी दलित जनतेचे सामर्थ्य अजिंक्य आहे," "डॉ. बाबासाहेब आंबेडकर चिरायु होवोत," "दलित फेडरेशनच्या झेंड्याखाली एक व्हा," "हरिजन या नावाचा धिक्कार असो," "समता सैनिक दलात सामील व्हा," वगैरे ब्रीदवाक्ये लिहिलेल्या लाल पताका मिरवणूकीत प्रामुख्याने दिसत होत्या. डॉ. आंबेडकरांच्या जयजयकाराने वातावरण दुमदुमून गेले होते.

पाऊण मैल लांब पसरलेली ही मिरवणूक नरे पार्क वरील 'साध्वी रमाबाई आंबेडकर नगर' मध्ये पोहचल्यानंतर तेथे वीस हजारांच्या समुदायासमोर रा. ब. शिवराज यांच्या हस्ते झेंडावंदनाचा गंभीर समारंभ झाला. जहाजाच्या नांगराचे

चित्र असलेला दलित फेडरेशनचा लाल झेंडा उंचावरून फडकू लागताच समता सैनिक दलाच्या तीन हजार स्वयंसेवकांनी त्याला खडी सलामी दिली व सर्व प्रेक्षकांनी टाळ्यांचा प्रचंड गजर केला.

## खुले अधिवेशन

शनिवार, ता. ५ रोजी संध्याकाळी फेडरेशनचे खुले अधिवेशन सुरू झाले. भोवताली पडदे लावलेल्या मैदानात दुपारपासूनच लोक जमण्यास सुरवात झाली होती. दरवाज्याशी ऑफिसवर तिकिटे विकत घेणाऱ्यांच्या लांबच लांब रांगा लागलेल्या होत्या. अधिवेशनाचे कामकाज सुरू होण्याच्या वेळी मैदानात ४० हजाराहून अधिक लोक होते.

मैदानाच्या एका बाजूला विस्तीर्ण व्यासपीठ तयार केले होते व त्याच्या मध्यभागी शोभिवंत कमानीवर गौतम बुद्धाचे शांत-गंभीर चित्र काढलेले होते. हिंदुस्थानातील सामाजिक विषमतेवर हल्ला चढविण्याऱ्या पहिल्या देशव्यापी चळवळीचा संस्थापक म्हणून गौतम बुद्धाला अस्पृश्य समाज फार मोठा मान देत असतो.

व्यासपीठावर निरनिराळया प्रांतातले व निरनिराळया प्रकारचा पोषाख घातलेले प्रमुख प्रतिनिधी बसले होते. प्रांतिक कायदेमंडळात व म्युनिसीपालिट्या वगैरे संस्थात निवडून आलेले अस्पृश्यांचे प्रतिनिधी तेथे दिसत होते, तसेच खेड्यापाड्यात किंवा शहरात अत्यंत निकृष्टावस्थेत राहून स्वार्थत्यागपूर्वक आपल्या बांधवांची सेवा करणारे इतर तरुण व वृद्ध कार्यकर्तेही तेथे नजरेस पडत होते.

प्रथम मराठी, हिंदुस्थानी, तामिळ वगैरे निरनिराळया भाषात स्वागतपर गाणी झाली. ही गाणी म्हणण्यासाठी वृद्ध, तरुण, स्त्रिया, पुरुष वगैरेमध्ये जणू काय चढाओढच लागली होती. वेळेच्या अभावी कैक उत्साही कवींना गाणे म्हणण्याची संधी मिळाली नाही. अनेक युगांच्या गुलामगिरीच्या यातनांचे खोल पडसाद या गाण्यातून उमटत होते. त्याचवेळी संघटनेमुळे उत्पन्न झालेला अमर्याद आत्मविश्वास, ध्येयाची निश्चितता व ते साध्य करण्याचा लढाऊ निर्धार या गाण्यात स्पष्टपणे व्यक्त होत होता. अस्पृश्य जनतेच्या एकजुटीचे व सामर्थ्याचे प्रतीक या नात्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकर व दलित फेडरेशन यावरील अढळ भक्ती व्यक्त करताना गाणाराप्रमाणेच असंख्य श्रोत्यांचेही हृदय अभिमानाने उचंबळून येत होते.

फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी श्री. पी. एन. राजभोज यांनी गेल्या वर्षीच्या कामाचा अहवाल परिषदेला सादर केला.'' [१]

'' स्वागत समितीचे ज. से. श्री. एस. बी. जाधव यांनी अधिवेशनासाठी आलेले शुभसंदेश वाचले. त्यात रिझर्व बँकेचे गव्हर्नर सी. डी. देशमुख I. C. S., मुंबईचे मेअर डॉ. आल्बन डिसोझा, सिटी इंजिनियर मोडक, नॅशनल वॉरफ्रंटचे सर रुस्तम मसाणी, मुंबई गव्हर्नरचे सल्लागार मि. मदन I. C. S. व टॉटन् I. C. S., सर कावसजी जहांगीर, मुंबई प्रांताचे माजी मुख्य प्रधान बाळासाहेब खेर, आसामचे माजी मंत्री श्री. सेखिया, मद्रास जस्टिस पार्टीचे के. ए. पी. विश्वनाथन्, कानपूरचे प्राणदत्त, मुंबईचे श्री. वेलणकर, बॅरिस्टर माने, बडोद्याचे मणिलाल परमार वगैरे प्रभूतींचे संदेश होते. तद्नंतर स्वागताध्यक्ष श्री. जी. एम्. जाधव उर्फ मडकेबुवा हे भाषण करावयास उठले. पेंन्डालमध्ये जमलेला अफाट जनसमुदाय पाहून त्यांना गहिवरून आले. प्रस्तावनेदाखल थोडेसे बोलून त्यांचे भाषण वाचून दाखविण्यास आमदार पी. जे. रोहम यांना त्यांनी विनंती केली. त्यांच्या भाषणानंतर अधिवेशनाच्या अध्यक्षांना त्यांनी पुष्पहार आणि गुच्छ अर्पण केल्यावर रा. ब. एन. शिवराज हे बोलावयास उठले. प्रेक्षकातून सारखा टाळयांचा निनाद ऐकू येत होता. ऑ. इं. शे. का. फेडरेशनचे तिसऱ्यांदा अध्यक्ष निवडल्याबद्दल त्यांनी धन्यता व्यक्त केली आणि आपले अध्यक्षीय भाषण अध्यक्षांनी इंग्रजीतून केलेले सर्व लोकांना कळावे म्हणून आमदार भा. कृ. गायकवाड यांनी त्यांचे विचारपरिप्लुत भाषण सुंदर मराठीतून लोकांपुढे ठेवले. या अधिवेशनाला सुरवातीपासून डॉ. बाबासाहेब आंबेडकर हजर होते.'' [२]

## '' परिषेदेचे ठराव

डॉ. आंबेडकरांच्या भाषणानंतर परिषदेपुढील चार महत्त्वाच्या ठरावांवर निरनिराळया वक्त्यांची भाषणे झाली.

---पहिल्या ठरावात सप्रू योजनेला विरोध करण्यात आला आहे व घटनासमितीची कल्पना दलित फेडरेशनला नापसंत असल्याचे जाहीर करण्यात आले आहे.

---दुसऱ्या ठरावात फेडरेशनच्या वर्किंग कमिटीने सप्टेंबर १९४४ मध्ये मद्रास येथील बैठकीत मांडलेल्या राजकीय मागण्यांना पाठिंबा देण्यात आला आहे.

---

[१] लोकयुद्ध : १३ मे १९४५.

[२] जनता : १२ मे १९४५.

--बंगालचे श्री. मनोहर धाली यांनी मांडलेल्या तिसऱ्या ठरावात हिंदुस्थान सरकारच्या औद्योगिक धोरणाविषयी तीव्र नापसंती दर्शविण्यात आली असून उद्योगधंदे व जमीन सरकारी मालकीच्या झाल्या पाहिजेत अशी मागणी करण्यात आली आहे. याच ठरावात बंगालमधील दुष्काळाने उडालेल्या हाहाःकाराबद्दल दुःख व्यक्त करण्यात आले आहे व त्याची पुनरावृत्ती न होण्यासाठी उपाय योजण्यास सरकारला बजावले आहे.

--चौथ्या ठरावात युद्धानंतर बेकार होणाऱ्या अस्पृश्य सैनिकांसाठी योग्य तरतूद करण्यात यावी अशी मागणी केली आहे.

## महिला परिषद

याच प्रसंगी सौ. मिनांबल शिवराज यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्य महिला परिषद भरविण्यात आली होती. परिषदेपुढील मुख्य ठराव शिक्षणासंबंधी होता. कु. शांताबाई दाणी, डॉक्टर कु. लोंढे, सौ. विमलाबाई भोसले, सौ. गीताबाई गायकवाड, सौ. सर्वगोढ, सौ. शांताबाई वडळकर वगैरे वक्त्यांनी जोरदार भाषणे करून अस्पृश्य महिलांना फेडरेशनची संघटना बळकट करण्याचा संदेश दिला.

## म्युनिसीपल कामगारांच्या मागण्या

शनिवारी रात्री भरलेल्या मुंबई म्युनिसीपल कामगार संघाच्या परिषदेत अशी मागणी करण्यात आली की, म्युनिसीपल कामगारांच्या परिस्थितीची चौकशी करण्यासाठी हिंदुस्थान सरकारने एक कमिटी नेमावी. तसेच पुरेशा महागाई भत्त्याचीही मागणी करण्यात आली. अस्पृश्य समाजापैकी बराच मोठा भाग म्युनिसीपल कामगारांचा असल्यामुळे ह्या परिषदेचे विशेष महत्त्व होते.

## विद्यार्थी परिषद

रविवारी सकाळी श्री. प्यारेलाल तलीब यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या विद्यार्थी परिषदेत अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र शाळा व कॉलेजे उघडण्यात यावी अशी मागणी करण्यात आली.

## समता सैनिक दल

दुपारी श्री. जे. एच. सुबय्या यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या समता सैनिक दलाच्या परिषदेत अस्पृश्य तरुणांना या संघटनेमध्ये हजारोंच्या संख्येत सामील होण्याचा संदेश देण्यात आला. त्यांच्याच अध्यक्षतेखाली संस्थानातील दलित फेडरेशनचे अखिल भारतीय अधिवेशन झाले.

## प्रतिनिधींशी मुलाखत

परिषदेसाठी आलेल्या प्रतिनिधींची त्यांच्या निवासस्थानी भेट घेतली असता त्यांच्याकडून बरीच उद्‌बोधक माहिती मिळाली. अहमदाबादहून आलेल्या प्रतिनिधींनी सांगितले की, श्री. गुलजारीलाल नंदांच्या मजूर महाजनचे लोक स्पिनिंग खात्यातील अस्पृश्य गिरणी कामगारांना दमदाटी करून मजूर महाजनचे सभासद करून घेतात व कोणी न ऐकल्यास मालकाकडून त्याला कामावरून काढून टाकावयास लावतात. राजकीय बाबतीत अहमदाबादच्या अस्पृश्य कामगारांचा दलित फेडरेशनलाच पाठिंबा असल्याचे त्यांनी सांगितले.

यवतमाळ येथील एका प्रतिनिधीने संयुक्त मतदारसंघामुळे अस्पृश्यांवर होणाऱ्या अन्यायाबाबत अशी माहिती सांगितली की, त्या जिल्ह्यातील एका म्युनिसीपालिटीमध्ये अस्पृश्यांच्या राखीव जागेसाठी हिंदू व मुसलमानांनी एका अस्पृश्येतर इसमाच्या अस्पृश्य रखेलीला निवडून दिले ! अस्पृश्य समाजाला मुद्दाम चिडविण्याचे हे उदाहरण अपवादात्मक नाही, असे त्याने आपल्या अनुभवाच्या आधारे सांगितले.

## खेड्यातील जुलूम

वऱ्हाडातील दुसऱ्या एका प्रतिनिधीने खेड्यात अस्पृश्यांना भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टांची माहिती सांगितली. तेथे सनदी नोकर म्हणून काम करणाऱ्या अस्पृश्य कामगाराला गाव-कोतवाल म्हणतात. पूर्वी त्याला जमीन किंवा बलुते नेमून दिले असे, पण त्याबरोबर त्याने भीक मागितली पाहिजे अशी स्पृश्य समाजाने रूढी पाडून ठेवली होती. ही रूढी पाळण्याचे अस्पृश्यांनी नाकारल्यामुळे त्यांचे बलुते बंद करण्यात आले आहे व त्यांना दरमहा ८ रुपये पगार व ४ रुपये महागाईभत्ता देण्यात येतो. तसेच त्यांना कामावरून काढून टाकण्याचा अधिकार गावच्या पोलीस पाटलाला असल्यामुळे त्यांच्या या तुटपुंज्या पगारातून बराचसा भाग पोलीस पाटील स्वतः उपटतो व शिवाय त्यांना आपल्या शेतात व घरी मोफत काम करण्यास सक्ती करतो.

## गिरणी कामगारांच्या तक्रारी

नागपूर येथील गिरणीत काम करणाऱ्या काही प्रतिनिधींनी रुईकरांविषयी आपले तीव्र असमाधान व्यक्त केले व फारच कमी पगार व महागाईभत्ता मिळत असल्याचे सांगितले. नागपूरात शेकडा ७० गिरणी कामगार अस्पृश्य समाजातले आहेत व त्यांच्यापैकी बरेचजण युनियनचे सभासद आहेत.

## दलित समाजाची एकजूट

अस्पृश्य समाजातील बहुसंख्यांक भाग स्वत:ची जमीन नसलेल्या शेतकऱ्यांचा, शेतमजुरांचा व गिरण्या-कारखान्यात मोलमजुरी करणाऱ्या कामगारांचा आहे. त्यांच्या विशिष्ट मागण्यांचे प्रतिबिंब दलित फेडरेशनच्या ठरावात व कार्यात दिवसेंदिवस जास्त प्रमाणात दिसून येईल यात शंका नाही. तथापि, राजकीय मागण्यांच्या बाबतीत सबंध अस्पृश्य समाज आज दलित फेडरेशनच्या पाठिशी उभा आहे हे स्पष्ट आहे व ही संघटना अधिक बळकट करण्यात व इतर राजकीय संस्थांशी तिचे सहकार्य घडवून आणण्यात अस्पृश्य समाजाचेच नव्हे तर देशातील समग्र जनतेचे हित आहे याची फेडरेशनच्या या अधिवेशनावरून कोणाचीही खात्री पटेल.''[१]

## '' डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण

' रविवार ता. ६ मे १९४५ रोजी अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या तिसऱ्या अधिवेशनानिमित्त उभारलेल्या विस्तीर्णशा साध्वी रमाबाई आंबेडकर नगरात अखिल भारतीय महिला परिषदेचे अधिवेशन समाप्त झाल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर याचे प्रचंड अशा जनसमुदायापुढे ऐतिहासिक महत्त्वाचे भाषण झाले. डॉ. बाबासाहेबांच्या भाषणाचे वेळी सुमारे १,५०,००० (दीडलाख) लोक हजर होते. लोकांपुढे येवून त्यांना दर्शन देण्याबद्दल स्वागत मंडळाकडून डॉ. बांबासाहेबांना विनंती करण्यात आली, ती त्यांनी मान्य केली. श्री. मडकेबुवा यांनी डॉ. बाबासाहेबांना पुष्पहार घातल्यावर, स्टेजच्या जरा पुढे वक्त्यांसाठी खास उभारण्यात आलेल्या व्यासपीठावर डॉ. बाबासाहेब ७ वा. ५ मि. नी भाषण करण्यास उभे राहाताच ' आंबेडकर झिंदाबाद ' च्या प्रचंड जयघोषांनी आणि टाळयांच्या कडकडाटांनी सर्व वातावरण दुमदुमून गेले. या जनसमुदायात सबंध हिंदुस्थानातील अस्पृश्य लोक उपस्थित होते. या सर्व लोकांची आपल्या एकमेव पुढाऱ्यावर किती अनन्यभक्ती आहे हे कट्टर विरोधकांनाही मान्य करावे लागले. या अफाट अस्पृश्य जनसागरास स्वाभिमानाचा, स्फूर्ती व चैतन्याचा जणू पूर आला होता !

डॉ. बाबासाहेबांचे भाषण सुरू हाताच सर्व लोक चित्रासारखे तटस्थ होवून ऐकू लागले. ' सुई पडली तर तिचा आवाज ऐकू येईल', इतकी निवांत शांतता पसरली.

---

[१] लोकयुद्ध : १३ मे १९४५.

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

हा जो अफाट जनसमुदाय जमलेला आहे तो पाहून कोणाही सार्वजनिक काम करणाऱ्या माणसाला अचंबा वाटल्याशिवाय राहणार नाही. सार्वजनिक कार्यात कार्यकर्त्यास विशेष विद्या किंवा बुद्धी लागते असे नाही. जर कार्याची खरीखुरी तळमळ असेल, त्याग करण्याची प्रवृत्ती असेल तर कोणीही चांगले कार्य करून दाखवू शकेल. असे लोक आपल्यात आहेत व आणखीही निर्माण होतील, अशी मला आशा आहे. आपले कार्य अतिशय बिकट आहे. काँग्रेस, मुस्लिम लीग किंवा हिंदू महासभा यांच्यासारखा आपल्याजवळ पैसा नाही त्यामुळे पगारी लोक नेमून जागृतीचे कार्य करू शकत नाही. आपले काही लोक अती अज्ञानी व भोळसर असल्यामुळे काँग्रेसच्या किंवा हिंदू महासभेच्या लोकांनी काही आमिष दाखविले तर असे लोक त्यांना वश होतात. इतकेच नव्हे तर काँग्रेसचे अगर हिंदू महासभेचे प्रचारक बनून आपल्या चळवळीत फूट पाडण्याचा प्रयत्न करतात. आपल्या चळवळीच्या प्रचाराकरिता आपल्या हाती वर्तमानपत्रे नाहीत. काँग्रेसची वर्तमानपत्रे आपल्या बातम्याच देत नाहीत, बातमी दिलीच तर ती विकृत स्वरूपाची देतात. या समुदायाकडे पाहिले तर कोणलाही म्हणावे लागेल की येथे सव्वा, दिड लाख लोक हजर आहेत. पण एका मराठी वर्तमानपत्राने काल फक्त सहाशे लोक हजर होते असे लिहिले आहे !!

लॉर्ड वेव्हेलसाहेब विलायतेला गेले आहेत. ते का हे कुणालाही ठाऊक नाही परंतु ज्या बातम्या पसरल्या आहेत त्यावरून असे दिसते की हिंदुस्थानच्या नवीन बंधारणाची वाटाघाट करण्यासाठी लॉर्ड वेव्हेलसाहेब गेले आहेत. भुलाभाई देसाई व काँग्रेसची पत्रे यांनीच या बातम्या उठविल्या असल्याने त्यात काही सत्यांश असावा असे वाटते. त्या बाबतीत दोन शब्द सांगावयाचे मी ठरविले आहे. माझे भाषण इंग्रजीत लिहिले आहे. मातृभाषेऐवजी इंग्रजीत भाषण लिहून आणण्याचा खेद वाटतो. परंतु इंग्रजी ही राजकीय भाषा असल्यामुळे सरकारला व इतर सर्व प्रकारच्या लोकांना कळविण्याकरिता भाषण इंग्रजीतच लिहावे लागले. तुमच्या सर्वांच्या माहितीकरिता माझ्या या इंग्रजी भाषणाचे मराठीत भाषांतर आपल्या ' जनता ' पत्रकातून येईल.

आज बरेच लोक अस्पृश्य वर्गाकडे टक लावून पाहत आहेत. एकेकाळी अस्पृश्यांना कोणी विचारीत नव्हते. १९२८ साली सायमन कमिशन नेमले गेले. त्यावेळी लॉर्ड बर्कन हेड हिन्दी लोकांना म्हणाले की तुम्ही काही राजकीय घटनेची निर्मिती करून दाखवा ! या लॉर्ड बर्कन हेडच्या म्हणण्यावरून काँग्रेसने १९२८ साली ' नेहरू कमिटी ' नेमली व या नेहरू कमिटीने हिन्दी

राज्यघटनेसंबंधी जो रिपोर्ट लिहिला तो वाचण्यासारखा आहे. अस्पृश्यानी तर तो जरूर वाचला पाहिजे. १५० पानांच्या या रिपोर्टात फक्त तीनच वाक्यात अस्पृश्यांचा निकाल लावला आहे. नेहरू रिपोर्टाने या तीन वाक्यात म्हटले आहे की अस्पृश्यांचा प्रश्न राजकीय नसून धार्मिक आहे. फक्त शीख, ख्रिश्चन यांच्या बाबतीत काही प्रश्न सोडवावे लागतील. यावरून काय दिसते ? १९२८ साली काँग्रेस ७ कोटी अस्पृश्यांना शून्य समजत होती. दोन वर्षानंतर राऊंड टेबल परिषद भरली. तेथे अस्पृश्य लोकांनी काही जरी नाही तरी शून्याचे दहा केले. एकावर पूज्य वाढविले. (टाळ्या) पण गांधींनी दहाचे पुन्हा शून्य करण्याचा घाट घातला. पण त्यांचे साधले नाही. (हंशा)

गेल्या वर्षात सर्वांच्या दिलजमाईकरिता ' सप्रू समिती ' जन्माला आली. त्या समितीने नवे बंधारण कसे असावे याबाबत एक खर्डा तयार केला आहे. सप्रू समितीच्या मते १० चा आकडा ५० वर नेला पाहिजे. याचा अर्थ असा की, अस्पृश्यांची उन्नती ० वरून ५० वर आली आहे. (प्रचंड टाळ्या)

काँग्रेस, रॉय ग्रूप व कम्युनिस्ट हे आपल्याशी सलगी दाखवितात, ते आपल्या चळवळीचा विचका करण्यासाठी ! कम्युनिस्टांचे संदेशपर पत्र याच वाईट हेतूने आले होते. काल ते पत्र वाचण्याचे अर्ध्यावर बंद केले गेले.

१९२० सालापासून तो आजतागायत काँग्रेसशी आमचे भांडण आहे. ते मिटेल की नाही हे सांगता येत नाही. गेल्या अनेक वर्षात आमचा काँग्रेसशी घनघोर लढा चालला असताना हे कम्युनिस्ट व रॉयिस्ट-दुरूस्त निमूटपणे पाहात असत व आमची टवाळी करीत असत. आम्हाला राजकीय दृष्ट्या संरक्षक अशी बंधने असली पाहिजेत. या बाबतीत या लोकांनी गेल्या २० वर्षात काही केले नाही. आताच त्यांना आपुलकी का वाटू लागली आहे ?

रॉयवादी म्हणतात, अस्पृश्यांनी आमच्यात का येऊ नये ? कम्युनिस्ट म्हणतात आमच्यात का येऊ नये ? काँग्रेसच्या बाया महारवाड्यात जाऊन आमच्या बायांच्या डोक्यातील उवा काढतात, त्यांची लुगडी धुतात, पोरांना आंघोळी घालतात. नुकतेच काँग्रेसच्या बायांनी पुण्याच्या मांग वाड्यात जाऊन आमच्या मुलांना दूध पाजले. पण दुसऱ्याच दिवशी त्या मुलांना हगवण लागली, अशी बातमी उठली (हंशा) ! ही आपुलकी व स्नेहभाव हे लोक का दाखवितात हे तुम्ही सर्वांनी नीट समजून घेतले पाहिजे.

आमचे तरुण विद्यार्थी भाईंच्या व रॉयिस्टांच्या नादाला लागतात. पण ज्या लोकांनी सतत विरोध केलेला आहे, त्यांना आजच पुळका का आला, हे समजून घेतले पाहिजे. गुळाच्या ढेपीला मुंगळे जडतात ते ती गुळाची ढेप जतन करण्याकरिता नसून खाण्याकरिता जडतात. अस्पृश्य लोक गुळाची ढेप आहेत. म्हणून कम्युनिस्ट, रॉयिस्ट हे मुंगळे आले तर गूळ खातील ही गोष्ट सर्वांनी ध्यानात घेतली पाहिजे.

स्वराज्य म्हणजे काय हे आम्हाला चांगले कळते. कम्युनिस्ट किंवा इतर कोणी सांगितले तरच आम्हाला कळेल अशातला काही अर्थ नाही. आम्ही काँग्रेसला राजकारण शिकवू शकतो. आम्ही आमच्या कर्तृत्वाने व हिंमतीने देशाकरिता व स्वतःकरिता जे काय करावयाचे ते स्वतंत्रपणे करू. कोणाच्या साहाय्याची आम्हास जरूरी नाही. या देशात हिन्दू आणि मुसलमान यात तडजोड करून राष्ट्रीय सरकार आणण्याची खटपट चालल्याचे बरेच दिवसांपासून माझे कानावर आले आहे. त्या लोकांनी ४० टक्के मुसलमान, बाकीचे इतर असा फॉर्मुला कोणत्या तत्त्वावर बनविला आहे ते मला काही कळत नाही. २२ टक्के मुसलमानांना ४० टक्के व अस्पृश्य आणि शीख ३० टक्के असताना त्यांना २० टक्के ! हा न्याय कोठला ? मला हिन्दू लोकांची कीव वाटते. हिंदुंना पूर्ण ठाऊक आहे की अस्पृश्य समाज निर्धन, दडपलेला व मागासलेला आहे. असे असता त्यांना फक्त २० टक्केच व जे राजवंशाचे त्यांना ४० टक्के ! हा काय न्याय आहे ?

एका तरूण मनुष्याला त्याच्या रांडेपासून चार मुले झाली. ती बाई मेल्यावर तो मनुष्य साधु बनला, त्याचे नाव गुरुघंटाळ. त्याचा एक शिष्य व एक वामनभट नावाचा मित्र व ही चार पोरे असा त्यांचा परिवार होता. एकदा त्याला एका गृहस्थाने श्राद्धानिमित्त भोजनाचे आमंत्रण दिले. गुरुघंटाळाने यजमानास आठ पोळया करावयास सांगितले. त्या अशासाठी की स्वतःकरिता ४, वामनभटाकरिता २, शिष्याकरिता १ व बाकीची १ चार पोरांकरिता !! हाच न्याय राष्ट्रीय सरकार बनवू इच्छिणाऱ्यांना लावला तर काय दिसून येईल ? काँग्रेसवाले हिन्दू म्हणतात आम्हाला ३, मुसलमानांना ३ व बाकीच्या २ इतरांना !

आपण आपली तयारी ठेवली पाहिजे. आता जी घटना होणार ती शेवटचीच होणार. याच वेळी आपण जोरदार लढा दिला पाहिजे. ही शेवटची वेळ आहे. आतापर्यंत काँग्रेस व हिन्दू लोक यांच्याशीच आपला भांड होता.

पण आता मुसलमानांशी भांड करावा लागणार आहे. सप्रू समितीच्या निर्णयावरुन मुसलमानांकडून पत्रातून अस्पृश्यांवर टीका होऊ लागली आहे. मुसलमान म्हणतात की अस्पृश्य हिंदूच आहेत. हिंदुंच्या जागा कमी करून अस्पृश्यांना दिल्या तर त्यात आमचा काय फायदा ? मला मुसलमानांच्या या विचारसरणीबद्दल खेद वाटतो. मला त्यांच्याशी भांडावयाचे नाही. मुसलमानांनी १९०७ साली मॉंटेग्यूना जे मानपत्र दिले त्यात त्यांनीच अस्पृश्यांना हिन्दुपासून अलग करण्याची प्रथम मागणी केली. तेव्हापासून अस्पृश्यांच्या स्वतंत्र मतदार संघ वगैरे मागण्यांना मुसलमान पाठिंबा देऊ लागले पण तेच आज उठलेले आहेत. अशी स्थिती असल्यामुळे आपण फार जोराने लढा दिला पाहिजे. आपण जिंकलो आहो, अशी कोणीही कल्पना करू नये. शेवटी चळवळीच्या मजबुतीसाठी सर्व कार्यकर्त्यांनी आपल्या वरिष्ठांचे हुकूम बिनतक्रार मानले पाहिजेत.''[१]

'' आपण इतर कोणत्याही पक्षाच्या सहानुभूतीवर अवलंबून न राहाता आपली स्वतंत्र संघटना जोरदार उभी करावयास पाहिजे.

श्री. मडकेबुवांचा गौरवपूर्ण उल्लेख करून ते म्हणाले, '' आपणापैकी कोणालाही मग तो कितीही अशिक्षित असो, आपल्या समाजाची सेवा करण्याचा पूर्ण अधिकार आहे व असे कार्य करणारे नेते आपल्यातून उत्पन्न होतील अशी माझी खात्री आहे.

आपण सर्वांनी जो एवढा उत्साह व कार्यक्षमता दाखविली त्याबद्दल मी धन्यवाद देऊन माझे भाषण संपवितो. (प्रचंड टाळ्या).''[२]



---

[१] जनता : १२ मे १९४५.

[२] लोकयुद्ध : १३ मे १९४५.

# २१९

# आम्हाला राजकीय बहुमत हवे; जातीय बहुमत नको

मुंबई येथे दिनांक ६ मे १९४५ रोजी भरणाऱ्या अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या अधिवेशनाकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी 'खास' भाषण इंग्रजीत तयार केले होते आणि त्याचे मराठी भाषांतर 'जनता' पत्रातून वाचावयास मिळेल असे त्यांनी अधिवेशनात जाहीर केले होते. त्या इंग्रजी भाषणाचे मराठी भाषांतर खालीलप्रमाणे 'जनता' पत्रातून प्रसिद्ध झाले होते.

—संपादक

' ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या या अधिवेशनास आपण मला जे आमंत्रण दिलेत त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. अगदी अल्पावधीत फेडरेशनची झालेली प्रचंड वाढ पाहून कोणालाही अचंबा वाटल्याशिवाय राहाणार नाही. अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हीच आपली एकमेव प्रातिनिधिक संस्था बनविण्याच्या हेतूने प्रेरित होऊन हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्य समाज फेडरेशनच्या झेंड्याखाली एकत्रित झाला आहे.

अस्पृश्यांच्या उन्नतीच्या मार्गाला प्रतिरोध करणाऱ्या पुष्कळ अडचणी आहेत हे, जे प्रामाणिकपणे जाणतील त्यांनाच इतक्या अल्पावधीत फेडरेशनच्या झालेल्या प्रचंड वाढीचे रहस्य समजू शकेल. इतर राजकीय पक्षांच्या लोकांकडून आमच्या लोकांना खोटी आमिषे दाखवून फसविण्याचा बुद्धिपुररस्सर प्रयत्न केला जातो. आपल्या लोकात इतके अज्ञान भरले आहे की, त्यांना आपण किती आणीबाणीच्या प्रसंगात आहो हे समजू शकत नाही. त्याचप्रमाणे आपले राजकीय उद्दिष्ट साधण्यासाठी संघटनेचे किती महत्त्व आहे हेही कळू शकत नाही. आपल्या चळवळींची साधने इतकी तुटपुंजी आहेत की त्या बाबतीत आपली स्थिती फारच केविलवाणी आहे. चळवळीकरिता आपल्याजवळ पैसा नाही, आपल्याजवळ वर्तमानपत्रे नाहीत. आपल्या लोकांवर सबंध हिंदुस्थानभर जे सतत अमानुष अत्याचार केले जातात, जी दडपशाही केली जाते, तिला इतर वर्तमानपत्रातून मुळीच प्रसिद्धी दिली जात नाही, इतकेच नव्हे तर ही वर्तमानपत्रे आमची सामाजिक व राजकीय मते पद्धतशीरपणे दडपण्यासाठी व्यवस्थित कट करतात. आपल्या लोकात जागृती करण्यासाठी आणि आवश्यक ती मदत करण्यासाठी जी साधनसामग्री पाहिजे त्याकरिता आपल्याजवळ पैसा नाही.

या अडचणींना आपल्याला तोंड द्यावे लागते. असे असताना देखील, आपल्या लोकांच्या अविरत मेहनतीमुळे व निस्वार्थीपणामुळेच आज फेडरेशनचा एवढा मोठा विस्तार झाला आहे. फेडरेशनच्या मुंबई शाखेचे अध्यक्ष श्री. गणपत महादेव जाधव यांनी केलेल्या कार्याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावेत अशी तुम्ही माझ्याकडून अपेक्षा करीत असाल याची मला खात्री आहे. आपणा सर्वांना माहिती आहे की, त्यांच्यात संघटनाचातुर्य वाखाणण्यासारखे आहे. या अधिवेशनाच्या अपूर्व यशाचे श्रेय बऱ्याच अंशी त्यांना आणि त्यांच्या सहकाऱ्यांना आहे.

आजच्यासारख्या प्रसंगी आपल्या राजकीय आणि सामाजिक प्रश्नांसंबंधी मी बोलावे अशी आपण अपेक्षा करीत असाल परंतु अशा या प्रश्नांचा उहापोह करण्याचा आज माझा विचार नाही. मी एका महत्त्वाच्या विषयासंबंधी, हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेच्या रुपरेखेसंबंधी, बोलण्याचा माझा विचार आहे. याची निरनिराळी कारणे असू शकतील. अस्पृश्य समाजाचे हरघडीचे प्रश्न सोडविण्याची आणि त्यांच्या चळवळीचे मार्गदर्शन करण्याची जबाबदारी सध्या माझ्या शिरावर नाही. माझ्या दिल्लीतील ' वास्तव्या ' मुळे ती माझ्यावर नाही आणि मी ती घेवूही इच्छित नाही. म्हणूनच फक्त अस्पृश्य समाजाच्या प्रश्नांसंबंधी मी बोलू इच्छित नाही.

अस्पृश्य समाजावर पुष्कळदा असा आरोप केला जातो की, ते स्वार्थी आहेत, देशाच्या राजकीय प्रश्नासंबंधी विधायक सूचना मात्र त्यांच्याजवळ नाहीत. हा आरोप साफ खोटा आहे. पण हा आरोप खरा आहे असे जर गृहित धरले तर तो केवळ अस्पृश्यांनाच लागू होईल असे नाही. हिंदुस्थानातील बहुतेक लोक विधायक सूचना करीत नाहीत. तसे पाहिले तर विधायक उपाय सुचविण्याची कोणातच कुवत नाही, अशातील काही प्रश्न नाही . परंतु सर्व विधायक सूचना तशाच दडपल्या जाण्याचे कारण हेच की, लोकांच्या मनावर सतत प्रचाराने असे बिंबवण्यात आले आहे की, काँग्रेसच्या गोटातील निर्मितीशिवाय इतर कोणत्याही कृतीचा स्वीकार करण्यात येवू नये, तिकडे लक्ष देखील देता कामा नये. देशातील विधायक विचारसरणीला नेमकी हीच गोष्ट मारक झाली आहे. असे असताही अस्पृश्य समाजावरील आरोप नाहीसा करण्यासाठी मी अस्पृश्य समाजाच्यावतीने देशाच्या सर्वसाधारण राजकीय प्रगतीचे मार्ग सुचवितो. देशाला जरुरी असेल तर ते घ्यावेत.

आजच्या प्रसंगी, लोकांच्या सर्वसाधारण हिताच्या विषयावर बोलण्याचे मी ठरविले त्याचे हे दुसरे कारण आहे.

## राज्यघटनेची जबाबदारी

मी तयार केलेली योजना स्पष्ट शब्दात पुढे मांडण्याच्या अगोदर दोन वादग्रस्त प्रश्नांसंबंधी मला सांगावयाचे आहे. पहिला, हिंदुस्थानची राज्यघटना कुणी तयार करावी ? हा प्रश्न निर्माण करण्याचे कारण हिंदुस्थानात असे बरेचसे लोक आहेत ज्यांना– त्यांनी तशी विचारणा केली नसली तरी– वाटते की, ब्रिटिश सरकारनेच येथील पेचप्रसंग सोडवून, राज्यघटना तयार करावी. अशा प्रकारच्या विचारसरणीत निव्वळ मूर्खपणा भरला असून ती उजेडात आणली जावी असे माझे मत आहे. ब्रिटिश सरकारने घटना तयार करावी आणि ती आमच्यावर लादावी, ते दिवस आता गेले.

हिंदी लोकांनी भावी राज्यघटनेसंबंधी चालविलेली ओरड लक्षात घेता, ब्रिटिशांकडून लादली जाणारी घटना अगदीच निरुपयोगी होईल.

आजपर्यंत तयार करण्यात आलेल्या घटना आणि भावी राज्यघटना यामध्ये मूलभूत फरक राहाणार आहे. ब्रिटिशांनी हिंदुस्थानची राज्यघटना तयार करावी असे अजूनही ज्यांना वाटते त्यांच्या लक्षात हा फरक आला नसावा असे दिसते.

पूर्वीच्या घटनेत आणि भावी घटनेत हा फरक राहाणार आहे की, पूर्वीच्या घटनेत, घटना जर मोडली तर कोणते कलम उपयोगात आणले पाहिजे, ही तरतूद करण्यात आली होती. परंतु भावी राज्यघटनेत असे जादा आणि जुजबी कलम राहणार नाही. ह्या तरतुदीच्या कलमाविरूद्ध १९३५ च्या कायद्याच्या ९३ व्या कलमाविरूद्ध हिंदुस्थानातील लोकांनी बरीच-ओरड केली आहे. याचे कारण हेच की हे कलम कायद्यात कसे आणि का आले हे त्यांना माहीत नाही. हिंदुस्थानचे राजकीय जीवन ज्या दोन गोष्टीवर अवलंबून आहे ते जर त्यांना समजले तर ९३ व्या कलमाची निर्मिती त्यांच्या सहज लक्षात येईल.

या दोन गोष्टीपैकी पहिली ही की, कायदा आणि व्यवस्था या राजकीय जीवनाच्या औषधी आहेत आणि ज्यावेळेस राजकीय जीवनात काही बिघाड होतो त्यावेळी या औषधीचा उपयोग करावयाचा असतो. अशा वेळी या औषधीचा योग्य तो उपयोग केला नाही तर मानव समाजाच्या आणि संस्कृतीच्या विरूद्ध तो एक गुन्हा होईल. दुसरी गोष्ट अशी की, कोणत्याही सरकारला अव्याहतपणे राज्य करण्याचा मक्ता मिळालेला नसतो. हे जरी खरे असले तरी चांगले सरकार अस्तित्वात येईपर्यंत राज्यकारभार चालविण्यासाठी म्हणजेच कायदा आणि व्यवस्था राखण्यासाठी कोणते तरी सरकार असावयाला पाहिजे. या दोन

गोष्टींसाठीच ' घटनाभंग ' कलमाची आवश्यकता असते. लोकात शांतता आणि सुरक्षितता राखण्यासाठी या कलमाचे अत्यंत महत्त्व आहे. हे एकच एक कलम असे आहे की, ज्यायोगे अराजकतेपासून देशाचे संरक्षण करता येते. कारण ज्यावेळेस सनदशीर सरकार मोडून जाते त्यावेळेस राज्यकारभार चालविण्यास याच कलमाचा उपयोग होतो.

घटनेप्रमाणे बनविले गेलेले सरकार आणि ते मोडले तर त्या जागी येणारे कामचलाऊ सरकार नेमण्याची घटनेमध्ये ' घटनाभंग ' कलमान्वये जी तरतूद करण्यात आली होती ती आवश्यक होती. आवश्यक होती म्हणण्याचे कारण घटनेप्रमाणे सरकार बनविण्याचे अधिकार जरी हिंदी लोकांना देण्यात आले होते तरी ते घटनेप्रमाणे बनविण्यात आलेले सरकार मोडल्यास राज्य चालविण्याचा अधिकार मात्र ब्रिटिश सरकारने स्वतःकडेच ठेवला होता.

भावी राज्यघटनेत हा फरक, ही तरतूद ठेवता येणे शक्य होणार नाही. भावी राज्यघटनेनुसार ब्रिटिशांना, हिंदी लोकांना घटनेप्रमाणे सरकार बनविण्याचा अधिकार देता येणार नाही. इतकेच काय, पण ते सरकार मोडले तर राज्य चालविण्याचा अधिकारही त्यांच्याकडे राहाणार नाही. त्याचे कारण उघड आहे. हिंदुस्थानला वसाहतींच्या स्वराज्याचा दर्जा नाही असे धरूनच आजतागायतची हिंदुस्थानची राज्यघटना बनविण्यात आली होती. परंतु भावी राज्यघटनेत तसे धरून चालता येणार नाही. वसाहतींचे स्वराज्य नसलेल्या देशाच्या घटनेत ' घटनाभंग ' कलम असणे क्षम्य आहे. परंतु वसाहतींचे स्वराज्य देणारी घटना आणि ' घटनाभंग ' कलम असणारी घटना या दोन गोष्टी परस्परविरोधी आहेत. वसाहतींचे स्वराज्य असलेल्या किंवा स्वातंत्र्य असलेल्या देशात एक तर घटनात्मक सरकार असू शकेल नाही तर बंडाळी तरी असेल.

याचा अर्थ काय ? याचा अर्थ असा की, हिंदी राज्यघटनेला काळे फासले जाण्याची शक्यता दिसताना, ती तयार करणे अगदी अशक्य गोष्ट आहे. हीच गोष्ट थोडी निराळ्या भाषेत मांडू या. घटना अशाप्रकारे तयार केली पाहिजे की, तिने हिंदुस्थानातील सर्व घटकांचे हुकूम मानले पाहिजेत आणि त्या सर्वांचा मानही ठेविला पाहिजे. सर्वांनी, जरी सर्वांनी नाही, तरी, नाही नाही, वाटेल ते झाले तरी हिंदुस्थानातील सर्व महत्त्वाच्या घटकांनी तिला उचलून धरण्यास सिद्ध झाले पाहिजे व तिला संपूर्ण पाठिंबा दिला पाहिजे. जर हिंदी लोकांनी, हिंदी लोकांसाठी आणि हिंदी लोकांच्या इच्छेनुरूप त्यांची अनुमती घेऊन घटना तयार केली, तरच ही गोष्ट घडेल. ब्रिटिश सरकारने जर घटना लादली

आणि तिला एखाद्या घटकाने मान्यता दिली नाही व दुसऱ्या एखाद्या घटकाने विरोध दर्शविला तर या देशात या घटनेशी शत्रुत्वाचे नाते असलेला एक घटक तयार होईल आणि तो त्या घटनेच्या कामकाजात अडथळा उत्पन्न करूनच थांबणार नाही तर आपली सर्व शक्ती एकवटून ती, ती घटना नेस्तनाबूद करण्यासाठी खर्ची घालील. घटनाविरोधी घटक आपले कर्तव्य म्हणून ती घटना नाश करण्याचा आटोकाट प्रयत्न करील आणि घटना राबवीत असणाऱ्या घटकांविरूद्ध लॅटिन अमेरिकेच्या धर्तीवर स्पष्टपणे जाहीर प्रचार करील.

ब्रिटिशांनी हिंदी घटना तयार करणे अगदी निरुपयोगी आहे कारण ती अंमलात आणण्यासाठी ते येथे राहाणार नाहीत. कोणत्याही शक्तिमान घटकाने अगर अशा अनेक घटकांच्या समुदायाने ती घटना इतर घटकांवर जर लादण्याचा प्रयत्न केला, तर तोच अनुभव चाखावयास मिळेल. म्हणून माझे असे ठाम मत झाले आहे की, जर हिंदी लोकांना स्वायत्तता पाहिजे असेल तर घटना तयार करण्याच्या जबाबदारीतून ते केव्हाही निसटू शकणार नाहीत. अशाप्रकारे न टाळता येण्यासारखी ती परिस्थिती आहे.

## घटना

दुसरा प्रश्न जो उपस्थित करणार आहे तो हा की, घटना निर्माण करण्यासाठी घटना समितीची आवश्यकता आहे का ? प्रत्येक माणसाच्या तोंडी घटना समिती झाली आहे. ' जीमध्ये सर्वस्वी हिंदी लोकांचा भरणा असेल अशा घटना समितीने घटना तयार करावी ' अशा प्रकारची मागणी काँग्रेस मंत्रीमंडळांनी राजीनामे देण्यापूर्वी, काँग्रेस पक्षाने आपल्या ठरावाच्याद्वारे केली होती. क्रिप्स योजनेमध्ये सुद्धा घटना समितीचा अंतर्भाव करण्यात आला होता. सप्रू कमिटीने त्याचीच ' री ' ओढली आहे.

मला स्पष्टपणे सांगितले पाहिजे की, मी या घटना समितीच्या अगदी पूर्णपणे विरूद्ध आहे. तिची काही एक आवश्यकता नाही. मला वाटते की, जिच्यामुळे या देशात आपापसात बंडाळी माजेल अशी ती एक भयंकर योजना आहे. प्रथमतः मला समजत नाही की, घटना समितीची एवढी आपणास काय आवश्यकता आहे ? ज्यावेळी युनायटेड स्टेट्स्ची राज्यघटना तयार करण्यात आली त्यावेळी अमेरिकन घटनेचे निर्माते ज्या परिस्थितीत होते त्या परिस्थितीत हिंदी लोक नाहीत. स्वातंत्र्याचा उपभोग घेतलेल्या जनतेसाठी योग्य अशा कल्पना त्यांना पुढे मांडाव्या लागल्या. घटना तयार करण्यासाठी त्यांच्यापुढे एखादा उत्कृष्ट नमूना नव्हता. पण हिंदुस्थानची परिस्थिती याहून अगदी भिन्न

आहे. घटनेसंबंधीच्या कल्पना व आराखडे अगदी तयार आहेत आणि शिवाय विविधतेला अगदी थोडा वाव आहे. दोन किंवा तीन घटनेच्या उत्कृष्ट नमुन्यांपेक्षा अधिक उत्कृष्ट नमुने निवडीसाठी नाहीत. तिसरी गोष्ट, त्यामुळे हिंदी लोकात मतभेद माजला आहे असे म्हणण्यासारखे महत्त्वाचे व शुद्ध घटनात्मक प्रश्न फार थोडे आहेत. भावी हिंदी राज्यघटना फेडरल असावी हे तत्त्व सर्वमान्य झाले आहे. कोणते विषय मध्यवर्ती सरकारच्या ताब्यात असावेत व कोणते विषय प्रांतिक सरकारच्या ताब्यात असावेत याचासुद्धा कमी अधिक प्रमाणात निकाल लागला आहे. महसूल विभागणीच्या बाबतीत मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यामध्ये काहीएक वादग्रस्त प्रश्न उत्पन्न झाले नाहीत. त्याचप्रमाणे मताधिकारांसंबंधी न्यायदान मंडळ (Judiciary), कायदेमंडळ (Legislature) व कार्यकारी मंडळ (Executive) यांचे आपापसात संबंध कसे असावेत, याबाबतीत देखील काहीएक वाद नाही. फक्त राखीव अधिकारांच्या (Residuary Powers) बाबतीतच वादग्रस्त प्रश्न आपले लक्ष वेधून घेतो. हे अधिकार मध्यवर्ती सरकारला असावेत की, प्रांतिक सरकारला असावेत ? पण हा सुद्धा फारसा दगदगीचा प्रश्न नाही. हिंदुस्थान सरकारच्या वर्तमान कायद्यात जी तरतूद करून ठेविली आहे तिचाच जर स्वीकार केला तर उत्तम प्रकारची तडजोड होऊ शकेल.

या गोष्टीकडे लक्षपूर्वक पाहिले असता मला कळत नाही की, घटना तयार करण्यासाठी घटना समितीची आवश्यकता तरी काय ? १९३५ च्या हिंदुस्थानच्या कायद्यात एवढी घटना लिहून ठेवली आहे की, तीच गोष्ट परत करण्यासाठी घटना समिती नेमणे म्हणजे कर्तव्यापेक्षाही अधिक करण्यासारखे आहे. १९३५ च्या कायद्यात जे विभाग वसाहती स्वराज्यास बाधक आहेत त्यांनाच त्यातून वगळून टाकणे अगदी श्रेयस्कर आहे.

जातीय प्रश्नावर तोडगा शोधण्याचेच काम फक्त या घटना समितीवर सोपवावे. मला असे वाटते की, वाटेल त्या अटींवर घटना समिती जरी आधारभूत झाली, तरी जातीय प्रश्न हा तिचा एक विभाग होता कामा नये. सप्रू कमिटीने सूचित केलेल्या घटना समितीच्या रचनेसंबंधी विचार करू या. या कमिटीने १६० हा सभासदत्वाचा आकडा अगदी कायमचाच ठरवून टाकिला आहे. प्रमाणबद्ध प्रतिनिधीत्वाच्या तत्त्वावर प्रांतिक कायदे मंडळाच्या सभासदांनी संयुक्त मतदान पद्धतीने निवडणूक करावयाची आणि हजर असलेल्या तीन चतुर्थांश सभासदांनी व मतांनी निकाल लावावयाचा. कोणीही अल्पसंख्यांक

समाज अशा प्रकारची घटना समिती निःपक्षपाती व आत्मविश्वास ठेवण्यास योग्य समजून तिचा स्वीकार करू शकेल का या प्रश्नाचे उत्तर दुसऱ्या दोन प्रश्नांवर अवलंबून आहे. या समितीसाठी निवडलेले एखाद्या अल्पसंख्यांकांचे प्रतिनिधी ह्या अल्पसंख्यांकांचे खरेखुरे प्रतिनिधी असू शकतील, या बाबतीत ती जिम्मेदारी घेऊ शकेल का ? घटना समितीचा निकाल एका ठराविक अल्पसंख्यांकांच्या हक्कांवर गंडांतर आणणार नाही या बाबतीत ती हमी देऊ शकते का ?

या दोन्ही बाबतीत अल्पसंख्यांकांनी भिण्याचे कारण नाही असे निदान मला तरी नक्की सांगता येणार नाही. या प्रश्नांना हाताळण्यापूर्वी क्रिप्स साहेबांची घटना समिती व सप्रुंची घटना समिती यात काय फरक आहे ते पाहू. तो येणेप्रमाणे :–

(१) घटना समितीत १६० सभासद असावेत असा एक निश्चित आकडा सप्रू कमिटीने ठरवून टाकला आहे. सर स्टॅफर्ड क्रीप्सने मात्र एक निश्चित आकडा ठरविलेला नाही. परंतु प्रांतिक कायदे मंडळातील शेकडा १० सभासदांची ही समिती असावी, अशी तरतूद त्यांनी आपल्या योजनेत करून ठेविली आहे. वास्तविक पाहाता हा आकडा १५८ पर्यंत जातो. या दोघांमध्ये फक्त २ चाच फरक आहे.

(२) घटना समितीसाठी प्रमाणबद्ध प्रतिनिधीत्वाच्या तत्त्वावर संयुक्त मतदान पद्धतीने निवडणूक करावयाची अशी सप्रू कमिटीने निवडणुकीच्या बाबतीत योजना केली आहे. या बाबतीत क्रीप्स योजना व सप्रू योजना यामध्ये घटना समितीच्या रचनेसंबंधी काहीएक फरक नाही.

क्रिप्स योजनेत जातवारी प्रमाणे राखीव जागा नाहीत. याबाबतीत क्रीप्स योजनेपासून सप्रू योजना अगदी अलग झालेली आहे ती इतकी की, विशिष्ट जमातींना विशिष्ट प्रमाणात राखीव जागा असण्याची तरतूद देखील त्या योजनेत करून ठेविली आहे. परंतु हा अगदी सामान्य फरक आहे. कारण ज्याअर्थी क्रिप्स योजना एक ठराविक आकडा ठरवू शकत नाही त्याअर्थी राखीव जागे-संबंधी प्रमाणबद्ध प्रतिनिधीत्वाची योजना तयार होणे अगदी साहजिक

आहे. खालील तक्त्यावरून या दोन योजनेतील प्रतिनिधीत्वाच्या विभागणीतील फरक सहज ध्यानी येईल.

| जमाती आणि हितसंबंध (१) | घटना समितीतील जागेची विभागणी | |
|---|---|---|
| | क्रिप्स योजनेप्रमाणे (२) | सप्रू योजनेप्रमाणे (३) |
| हिंदू .. .. | ७७ | ५१ |
| मुसलमान .. .. | ५० | ५१ |
| अस्पृश्य समाज .. .. | १५ | २० |
| शीख .. .. | ३ | ८ |
| इंडियन ख्रिश्चन .. .. | २ | ७ |
| अँग्लो इंडियन .. .. | १ | २ |
| युरोपियन .. .. | ६ | १ |
| आदिवासीय जमाती .. .. | २ | ३ |
| विशिष्ट हितसंबंध .. .. | .. | १६ |
| इतर .. .. | २ | १ |
| एकूण .. | १५८ | १६० |

घटना समितीच्या रचनेत सप्रू कमिटीने प्रत्येक जमातीसाठी निश्चित केवळ नुसते आकडे ठरवून टाकलेले नाहीत तर तिने हिंदू-मुसलमानांना समपातळीत आणिले आहे. हा जो फरक आहे त्याबद्दल घटना समितीने अशी एक सबब पुढे केली आहे की, ज्याअर्थी मुसलमानांना एवढी देणगी देण्यात आली आहे त्याअर्थी घटना समितीच्या निवडणुका संयुक्त मतदान पद्धतीवर झाल्या पाहिजेत. या बाबतीत सप्रू कमिटीला क्रीप्स योजना समजली नाही, हे म्हणणे अगदी रास्त आहे. क्रिप्स योजनेमध्ये संयुक्त मतदान पद्धतीचा अवलंब केला आहे. त्यातील एक पोट-कलम असे आहे 'प्रांतिक कायदे मंडळांपैकी कनिष्ठ मंडळांच्या (Lower Houses) सभासदासाठी मतदारांचे फक्त एकच दालन असावे.' हेच दुसऱ्या प्रकाराने असे म्हणता येईल की, संयुक्त मतदान पद्धतीने निवडणूक व्हावी अशा रितीने सप्रू कमिटीने एका घटकाला विनाकारण काही तरी दिले आहे व इतर जमातींना संकटात नेऊन सोडले आहे.

क्रिप्स योजनेमध्ये जे सभासद हजर आहेत व ज्यांनी मतदान केले आहे, अशांच्या बहुमतावर घटना समितीचा निकाल अवलंबून राहाणार आहे, परंतु सप्रू योजनेमध्ये जे सभासद हजर आहेत व ज्यांनी मतदान केले आहे अशांच्या तीन चतुर्थांश मतांवर घटना समितीचा निकाल अवलंबून राहाणार आहे.

आता आपण मागील दोन प्रश्नांकडे वळू या. पहिल्या प्रश्नाच्या दृष्टीने एकंदर परिस्थिती कशी काय आहे ? या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी प्रांतिक कायदे मंडळातील सभासदत्वाच्या जातवार विभागणीची माहिती असणे अगदी आवश्यक आहे. खालील तक्ता सदरहू परिस्थितीची माहिती देत आहे.––

**प्रांतिक कायदे मंडळातील जातवार जागेची विभागणी**

| जमाती (१) | सर्व-साधारण (२) | स्त्रिया (३) | युनि-र्व्हसिटी (४) | ट्रेड युनिअन (५) | व्यापार (६) | जमीनदार (७) | बेरीज (८) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. हिंदू . . | ६५१ | २६ | ७ | ३३ | ३१ | २२ | ७७० |
| २. मुसलमान . . | ४८२ | १० | १ | ५ | ६ | १३ | ५१७ |
| ३. अस्पृश्य समाज | १५१ | . . | . . | . . | . . | . . | १५१ |
| ४. इंडियन ख्रिश्चन | २० | १ | . . | . . | . . | . . | २१ |
| ५. अँग्लो इंडियन. . | ११ | १ | . . | . . | . . | . . | १२ |
| ६. शीख . . | ३४ | १ | . . | . . | . . | १ | ३६ |
| ७. युरोपियन . . | २६ | . . | . . | . . | १९ | १ | ४६ |
| ८. आदिवासीय . . | २४ | . . | . . | . . | . . | . . | २४ |
| बेरीज . . | १,३९९ | ३९ | ८ | ३८ | ५६ | ३७ | १,५७७ |

क्रिप्स योजनेत जिचा मागमूसही नाही अशी जातवार जागांची जी सोय सप्रू योजनेत केली आहे तिला महत्त्व काय ? कोणत्याही जमातीला आपले उमेदवार निवडून आणण्यासाठी दुसऱ्या जमातीवर कितपत अवलंबून रहावे लागेल या प्रश्नाच्या उत्तरावर अवलंबून आहे. या बाबतीत कोणते फायदे होणार आहेत ? दुसरा एक तक्ता पहा :–

**जागेसंबंधी मतदान शक्ती**

| जमात (१) | घटना समिती-साठी मतदार (२) | घटना समिती-तील जागेचे प्रमाण (३) | प्रमाणाच्या निवडणूकीसाठी आवश्यक मताचा आकडा (४) | + पेक्षा अधिक मतदार – जरुरी पेक्षा कमी मतदार (५) |
|---|---|---|---|---|
| १. हिंदू . . | ७७८ | ५१ | ५६१ | +२१७ |
| २. मुसलमान . . | ५६१ | ५१ | ५१७ | +४४ |
| ३. अस्पृश्य . . | १५१ | २० | २२० | –६९ |
| ४. इंडियन ख्रिश्चन | २१ | ७ | ७७ | –५६ |
| ५. शीख . . | ३६ | ८ | ८८ | –५२ |
| ६. युरोपियन . . | ४६ | १ | ११ | +३५ |

या तक्त्यावरून पुढीलप्रमाणे सिद्धांत काढता येतात :–

(१) सर्व मतांची बेरीज १,५७७ व निवडल्या जाणाऱ्या उमेदवारांची संख्या १६० धरिता प्रतिनिधीत्वाच्या प्रमाणबद्ध योजनेनुसार १०+१ = ११ असे प्रमाण होऊ शकेल.

(२) ११ हे प्रमाण धरले असता हिंदू, मुसलमान व युरोपियन यांचे अनुक्रमे २१७, ४४ व ३५ मते सर्व उमेदवार निवडून येऊनही शिल्लक राहातात परंतु अस्पृश्य समाज, इंडियन ख्रिश्चन व शीख यांना त्यांचे उमेदवार निवडून आणण्यासाठी अनुक्रमे ६९, ५६ व ५२ मतांचा तुटवडा भासू शकतो.

हीच गोष्ट निराळया पद्धतीने मांडू या,

(१) हिंदू त्यांच्या वाजवीपेक्षा अधिक २१७ मतांवर जे मतांसाठी हिंदुंवर अवलंबून आहेत अशा २० उमेदवारांना निवडून आणू शकतात. मुसलमान देखील त्यांच्या ४४ अधिक मतांवर अवलंबून असणाऱ्या ४ मतदारांना निवडून आणू शकतात. त्याचप्रमाणे युरोपियन्स त्यांच्या ३५ अधिक मतांवर त्यांच्यावर जे अवलंबून आहेत अशा ३ युरोपियनेतरांना निवडून आणू शकतात.

(२) अस्पृश्यांना ६९ मतांच्या कमतरतेमुळे त्यांच्या एकूण सर्व मतांवर फक्त १२ उमेदवार निवडून आणता येतील व ७ जागेसाठी त्यांना हिंदू, मुसलमान व युरोपियन्स मतदारांवर अवलंबून राहावे लागेल. इंडियन ख्रिश्चन लोक ५६ मतांच्या उणिवेमुळे त्यांच्या एकूण मतांवर फक्त दोनच उमेदवार निवडून आणू शकतील व बाकीच्या ५ जागेसाठी त्यांना हिंदू, मुसलमान व युरोपियन्स यांच्यावर अवलंबून राहावे लागणार आहे. त्याचप्रमाणे शीखांना ५१ मतांच्या कमतरतेमुळे त्यांच्या एकूण मतदारांच्या संख्येवर फक्त तीनच जागा मिळू शकतील व राहिलेल्या ५ जागेसाठी त्यांना हिंदू, मुसलमान व युरोपियन्स यावर अवलंबून राहावे लागणार आहे.

आहे ती परिस्थिती अशी आहे. छोट्या अल्पसंख्यांकांना प्रमाणापेक्षा अधिक प्रतिनिधीत्व देणे म्हणजे डोळ्यात धूळ फेकण्यासारखे आहे. त्यांचे प्रतिनिधित्व इतके परावलंबी आहे की, कोणत्याही अर्थाने त्याला प्रतिनिधीत्वच म्हणता यावयाचे नाही.

आता मी दुसऱ्या प्रश्नाकडे वळतो. सप्रू कमिटीने घटना समितीच्या निर्णयाच्या बाबतीत ज्या कायद्याचा अवलंब केला आहे त्यामुळे संरक्षण मिळेल का ? बहुमतावर घटना समितीचा निर्णय अवलंबून असावा अशा प्रकारचा नियम क्रिप्स साहेबांनी आपल्या योजनेत घातला आहे. अशा प्रकारची वेडगळ सूचना कोणताही समंजस मनुष्य सुचविणार नाही. मला असे एकही उदाहरण माहीत नाही की, निव्वळ बहुमतावर घटनेतील प्रश्नांचे निर्णय अवलंबून आहेत.

बहुमतावर कायदा करण्यात यावा या तत्त्वाचा अंतर्भाव क्रीप्स योजनेत केला आहे. या बाबतीत एक पळवाट काढली आहे. ती अशी की, अल्पसंख्यांकांच्या हितसंबंधांचे संरक्षण व्हावे म्हणून एक तरतूद करून ठेवण्यात आली आहे. हिंदुस्थानातील आपल्या सत्तेचा त्याग करण्यापूर्वी ब्रिटिश सत्ताधिकारी व हिंदी घटनासमिती यामध्ये अल्पसंख्यांकांच्या हितसंबंधांच्या बाबतीत करार होईल. घटनेवर मात करण्याची ताकद जर या करारात असती तर या कराराच्या योजनेत काही तरी अर्थ असता. ज्याअर्थी क्रिप्स योजनेमुळे हिंदुस्थान स्वतंत्र होऊ शकतो त्याअर्थी, या सूचनेत काही अर्थ नाही. एकदा हिंदुस्थान स्वतंत्र झाला की, त्याला कोणताही कायदा किंवा ठराव करण्याचा पूर्ण अधिकार राहील व तो असे जाहीर करू शकेल की या कराराला आमच्या घटनेमध्ये ढवळाढवळ करण्याचा काहीएक अधिकार नाही आणि असे झाले तर त्या कराराला पंचांगापेक्षा जास्त महत्त्व राहाणार नाही आणि अल्पसंख्यांकांच्या सभासदांना वाटल्यास ते आपल्या घरच्या खुंटीला देखील लटकावत ठेऊ शकतील. आयर्लंडच्या कराराच्या वेळी तंतोतंत अगदी असेच घडले. जोपर्यंत आयर्लंड स्वतंत्र नव्हते तोपर्यंत आयर्लंडचे करार आयर्लंडमधील घटनेत ढवळाढवळ करीत असे. परंतु आयर्लंड स्वतंत्र होताक्षणी आयरिश फ्री स्टेटच्या पार्लमेंटने एक मामुली कायदा केला व त्याअन्वये करारात घटनेवर मात करण्याचा जो कायदा होता तो रद्द केला. याबाबतीत ब्रिटिश पार्लमेंटसुद्धा त्याचे काहीएक करू शकले नाही. पार्लमेंटला माहित होते की, आयर्लंड आता स्वतंत्र झाला आहे व आपणास काहीएक करिता यावयाचे नाही. मला कळत नाही की, अल्पसंख्यांकांना आश्वासन देण्यासाठी इतकी वेडगळ योजना मोठ्या प्रसिद्ध व्यक्तिने पुढे आणावी.

सप्रू योजनेमध्ये जी तरतूद केली आहे, ती बहुतेक क्रिप्सची सुधारलेली आवृत्ती असावी असे वाटते. पण खरोखरच ती तशी आहे का ? माझी अशी ठाम समजूत आहे की, ती बिलकूल तशी नाही. एखादी गोष्ट सफल करावयाची असेल तर १६० पैकी तीन चतुर्थांश म्हणजे १२० सभासदांचा पाठिंबा पाहिजे ही एक सुधारणा आहे असे मान्य करण्यापूर्वी १२० सभासदांचा समूह तयार कसा होईल, याची काही तरी कल्पना असलेली बरी. जर हिंदू-मुसलमान एक झाले तर त्यांच्या एकंदर सभासदांची संख्या १०२ होऊ शकेल. १२० सभासद असण्यासाठी त्यांना आणखी १८ सभासदांची गरज भासेल. विशिष्ट जागेसाठी निवडून आलेले सभासद व इतर काही सभासद या एकत्र आलेल्या जमातींच्या हाती पडतील. असे झाले तर त्यांचा निकाल अस्पृश्य समाज, शीख, इंडियन ख्रिश्चन वगैरे जमातींना एक शिक्षाच वाटेल हे अगदी उघड आहे. त्याचप्रमाणे जर मुसलमान अलिप्त राहिले तर घटना समितीचा निकाल हा संयुक्त निकाल

न होता मुसलमानेतरांकडून मुसलमानांना ती एक शिक्षाच होईल. ताबा ठेवण्यासाठी अदलाबदल व एकी करण्याची शक्यता वाटणे अगर काही जमातींनी रचलेला व्यूह इतरांनी फोडणे यासारख्या गोष्टी घटना समितीत घडतील. अशा प्रकारचा विचार सप्रू कमिटीने केला नाही, असे मला खेदाने म्हणावे लागत आहे. तीन चतुर्थांश बहुमतावर जर प्रत्येक घटकांपैकी कमीत कमी शेकडा ५० सभासदांचा समावेश करण्यासंबंधी काही तरतूद करण्यात आली असती तर काही तरी सुरक्षितता निर्माण झाली असती.

युनायटेड स्टेट्स्‌ची घटना तयार करताना जे धोरण स्वीकारण्यात आले होते त्याचाच जर अवलंब केला असता तर समितीच्या बाहेर असणाऱ्या अल्पसंख्यांक जमातींच्या प्रतिनिधीकरवी, सप्रू कमिटीला घटना समितीच्या निर्णयामध्ये अल्पसंख्यांकांना भाग घेण्यासंबंधी मंजूरीकरिता वाटेल तशी आणखी तरतूद करिता आली असती. अशा प्रकारची तरतूद सप्रू कमिटीच्या योजनेत आढळून येत नाही. याचा परिणाम असा झाला आहे की, ही घटना समिती म्हणजे एक ' पाश ' तयार झाला आहे.

घटना समितीच्या योजनेविरूद्ध कितीतरी विधाने करता येतील. मजवर ज्याचा फारच परिणाम झाला आहे, अशा एकाचाच मी उल्लेख करीत आहे. स्कॉटलंड व इंग्लंड यांच्या एकीकरणाचा इतिहास वाचीत असताना स्कॉटिश पार्लमेंटची मान्यता मिळविण्यासाठी लाचलुचपतीसारखे जे निंद्य प्रकार घडले ते वाचून मला अगदी जोराचा धक्का बसला. सबंध स्कॉटिश पार्लमेंट विकत घेण्यात आले होते. ठराविक घटकांच्या इच्छेनुरुप निर्णय मिळविण्यासाठी घटना समितीच्या सभासदांना लाचलुचपत देऊन, विकत घेण्यासारखे निंद्य प्रकार घटना समितीत होण्यास फारच जागा आहे आणि ही गोष्ट, माझी अशी खात्री आहे की, त्यांचे हे प्रयत्न केव्हाही निष्फळ होणार नाहीत आणि असे जर झाले तर त्यामुळे घटना समितीची नुसती टवाळकीच होऊन थांबणार नाही तर माझी अशी पक्की समजूत आहे की, तिने दिलेला निर्णय अंमलात आणण्यासाठी एखाद्याने प्रयत्न केल्यास आपापसात लढाई, दंगे झाल्याशिवाय राहाणार नाही. पूर्णपणे विचाराअंती माझे असे ठाम मत झाले आहे की, घटना समितीच्या सूचनेमुळे काहीएक फायदा न होता मोठा धोकाच मात्र निर्माण होणार आहे आणि म्हणून तिला धुडकावून लाविलीच पाहिजे.

## नवीन मार्गाची आवश्यकता

मला विचारण्यात येईल की, जर घटना समितीचा अवलंब करणे अगदी अयोग्य आहे तर मग आपण कोणता मार्ग सुचवू शकता ? मला माहिती आहे की, अशा प्रकारचा प्रश्न मला विचारतील परंतु मजवर माझा पूर्ण विश्वास आहे. जातीय

प्रश्नावर तोडगा काढणे कठीण झाले आहे त्याला कारण, या प्रश्नावर तोडगा काढणे अशक्य आहे अगर घटना समिती राबविली नाही, हे नाही. हे कोडे सोडविणे अशक्यप्राय झाले आहे, त्याला कारण, ते कोडे सोडविण्यासाठी ज्या मार्गांचा अवलंब केला आहे ते सर्व मूलतः चुकीचे आहेत. या वर्तमान मार्गात जो दोष दिसून येतो तो हा की, हे कोडे सोडविताना तत्त्वांचा अवलंब न करिता धोरणांचाच अवलंब करण्यात आला आहे. त्यासाठी फक्त एकाच तत्त्वाचा स्वीकार केला आहे आणि तो म्हणजे कोणत्याही तत्त्वाचा स्वीकार न करणे हा होय. फक्त धोरणाच्या मालिकांचाच आधार घेण्यात आला आहे. एक धोरण चुकीचे ठरले तर दुसऱ्या धोरणाचा अवलंब करावयाचा आणि या धरसोडीच्या धोरणामुळे जातीय प्रश्न म्हणजे एक इंद्रजालच निर्माण झाले आहे. जेथे तत्त्व नाही, तेथे एक विशिष्ट धोरण चुकीचे आहे हे सांगण्यासाठी मार्गदर्शक कोठून असणार, जेथे तत्त्व नाही तेथे एखादे नवीन धोरण यशस्वी होईल याबद्दल खात्री तरी कशी वाटणार !

जातीय प्रश्नावर तोडगा काढण्याचे प्रयत्न दोन प्रकारानी केले जात आहेत. पैकी एक प्रकार म्हणजे भ्याडाने गुंडापुढे योजना सादर करणे व दुसरा म्हणजे गुंडाने नेभळटांना योजना मान्य करावयास लावणे हे होय. जेव्हा जेव्हा एखादी जमात बलवत्तर होत जाते व राजकीयदृष्ट्या फायद्याच्या मागण्याचा पुरस्कार करिते तेव्हा तेव्हा चांगले मत राहाण्यासाठी तिला सवलती दिल्या जातात. तिने ज्या गोष्टींची पृच्छा केली आहे त्याबाबतीत न्याय अन्यायाची पर्वा करण्यात येत नाही किंवा तिच्या अंगच्या चांगुलपणाबद्दलही काही निर्णय देण्यात येत नाही. याचा परिणाम असा होत आहे की, तिच्या मागण्यांना मर्यादा राहात नाही व तिला देण्यात आलेल्या सवलतीलाही काही मर्यादा राहात नाही. अल्पसंख्यांकांसाठी स्वतंत्र मतदार संघ असावा या मागणीचा पुरस्कार करण्यात आला व ती मान्यही झाली. एखादी जमात अल्पसंख्यांक आहे की बहुसंख्यांक आहे याचा विचार न करिता, तिला स्वतंत्र मतदार संघ देण्यात यावा अशा प्रकारची मागणी केली असता, तीही मान्य केली गेली. नंतर लोकसंख्येच्या तत्त्वावर स्वतंत्र प्रतिनिधीत्वाची मागणी करण्यात आली होती ती सुद्धा मान्य झाली. त्या नंतर प्रतिनिधीत्वामध्ये बजेटची मागणी करण्यात आली आणि तीही मान्य झाली. इतर अल्पसंख्यांकांना धाब्यावर बसवून स्वतंत्र मतदार संघयुक्त बहुसंख्य जमात अशी कायद्याच्याद्वारे मान्यता देण्यात यावी अशा प्रकारचा हट्ट धरला असता तोही पुरविण्यात आला. इतर बहुसंख्य जमातीने राज्यकारभार केलेला खपत नाही कारण तो पक्षपाती राज्यकारभार आहे.

यास्तव अशा बहुसंख्य जमातींची छाटाछाट करून तिला तिच्या बरोबरीने आणण्याची मागणी केली अशा शाश्वत सांत्वनप्रिय धोरणापेक्षा दूसरे कोणतेही वेडगळ धोरण नाही. ज्याला अंत नाही असे सांत्वनप्रिय व अमर्याद मागण्यांचे धोरण आहे.

स्पष्टच बोलावयाचे झाले तर जी जमात हा डावपेच खेळते तिला बिलकूल दोषी ठरविता येत नाही, तिचा फायदा होतो म्हणूनच ती यामध्ये भाग घेते, मर्यादा घालण्यास काही तत्त्वे नाहीत म्हणूनच ती हा डावपेच खेळते आणि तिची अशी खात्री असते की आणखीही आपण फायदेशीर काही मागितले तर ते मिळेल. उलटपक्षी अशी एक जमात आहे की, आर्थिकदृष्ट्या तिची अत्यंत हलाखीची परिस्थिती आहे. सामाजिकदृष्ट्या ती अगदी हीन दर्जास पोहोचली आहे. शैक्षणिकदृष्ट्या फारच मागासलेली आहे व इतरांकडून निर्लज्जपणे होणारे जुलूम जिला निमूटपणे सहन करावे लागतात आणि ज्याबद्दल त्यांना कधीही पश्चाताप झालेला नाही, जिच्यावर समाजाने बहिष्कार घातला आहे, जिची सरकारने अवहेलना केली आहे, जिच्यासाठी संरक्षणाची लिहिलेली तरतूद केलेली नाही, न्यायदान, न्याय्य वागणूक व समान संधीविषयी जी नेहमी उदास असते अशा जमातीला संरक्षण देणाच्या बाबतीत अगदी नकार दर्शविण्यात आला आहे. याचे कारण तिला संरक्षणाची आवश्यकता नाही हे नसून ज्या गुंडाला हक्काचा मक्ता दिला आहे, तोच यात लक्ष घालीत नाही. याचे कारण असे दर्शविण्यात येते की, ही जमात राजकीयदृष्ट्या चांगली सुसंघटित झालेली नाही म्हणूनच तिच्या मागण्यांना मान्यता मिळत नाही आणि हा त्याचा थापेबाजीचा उपक्रम अगदी यशस्वी रितीने पार पडत आहे.

'एकास हात व दुसऱ्यास लाथ' हे जे वर्तन आज पाहावयास मिळत आहे, त्याचे कारण हे आहे की, ज्या जमातींचा जातीय प्रश्नात समावेश होत आहे, त्यांना बंधनकारक किंवा अधिकारयुक्त अशा कोणत्याच तत्त्वाचा या बाबतीत अवलंब करण्यात आलेला नाही. या कमतरतेमुळे अगदी घातूक परिणाम झालेला आहे. यामुळे समाजाला आपले मत स्पष्टपणे पुढे मांडणे अगदी अशक्यप्राय झालेले आहे. कोणत्या धोरणाचा अंगिकार केला आहे हे तो जाणू शकतो, शिवाय एक धोरण चुकीचे ठरून दुसरे सुचविले जात आहे याची देखील तो खुणगाठ बांधू शकतो. एक धोरण चुकीचे का ठरले ? व दुसरे धोरण तरी यशस्वी होईल का ? या प्रश्नांची उत्तरे समाज बिलकूल देऊ शकणार नाही कारण हे इंद्रजाल त्याला अगदी अगम्य आहे म्हणून याचा परिणाम असा झाला आहे की, हेकेखोरपणाने आणि दांडगाईने वागणाऱ्या पक्षांवर त्याचे कार्य किती सकारण आहे आणि त्यात किती अर्थ आहे या बाबतीत हात घालण्यासंबंधी दडपण न टाकता समाज बघ्यासारखा निव्वळ चित्रपटासारखे चाललेले जातीय प्रश्नासंबंधीचे वादविवाद तटस्थपणे पाहात उभा राहिला आहे.

जातीय प्रश्नांवर तोडगा काढण्याचा जो मी मार्ग सुचवित आहे तो, दोन विचार करण्यासारख्या गोष्टींवर आधारभूत झालेला आहे.

(१) जातीय प्रश्न सोडवावयाचा असेल तर ज्यामुळे अगदी शेवटचाच निश्चयात्मक निर्णय बाहेर पडेल, अशा कार्यकारण तत्त्वांची व्याख्या करणे अत्यावश्यक आहे.

(२) ज्या कार्यकारण तत्त्वांचा अवलंब करावयाचा असेल ती तत्त्वे निःपक्षपातीपणे व निर्भयपणे सर्व पक्षांना सारख्या दृष्टीने लागू केली पाहिजेत.

## जातीय प्रश्न सोडविण्यासंबंधी योजना

विशिष्ट प्रास्ताविक मुद्यांसंबंधी मी माझी भूमिका स्पष्टपणे मांडित आहे, आता मी त्याविषयाकडे वळतो.

जातीय प्रश्नाने ३ प्रश्न निर्माण केले आहेत.

(अ) कायदे मंडळातील प्रतिनिधीत्वाचा प्रश्न.

(ब) कार्यकारी मंडळातील प्रतिनिधीत्वाचा प्रश्न.

(क) नोकऱ्यामधील प्रश्न.

(अ) नोकऱ्यांमधील प्रतिनिधीत्वाचा शेवटचा प्रश्न प्रथमतः घेऊ. क्वचितच यास वादविवादाचा प्रश्न म्हणता येईल. सर्व जमातींना विशिष्ट प्रमाणात नोकऱ्या देण्यात याव्यात आणि कोणत्याही जमातीची सरकारी नोकऱ्यात मिरासदारी राहू नये, अशा तत्त्वाचा हिंदुस्थान सरकारने अंगिकार केला आहे. १९३४ आणि १९४३ च्या ठरावाद्वारे हिंदुस्थान सरकारने हे तत्त्व स्पष्टपणे जाहीर केले आहे. इतकेच नव्हे तर हे तत्त्व व्यवहारात उतरविण्यासाठी कायदेसुद्धा केले आहेत. या कायद्यांना झुगारून कोणतीही नेमणूक झाली असेल तर ती बेकायदा ठरविण्यात यावी अशा प्रकारचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. समजा एखादेवेळी आवश्यकता भासली तर कायदेशीर स्वरूप देऊन ही नेहमीची वहिवाट मोडण्यात येते. जिच्यामुळे ह्या ठरावात केलेल्या तजविजीचा अंतर्भाव होईल आणि भिन्न प्रांतांना त्यानुसार तजवीज करता येईल अशी कोष्टकवार यादी हिंदुस्थान सरकारच्या कायद्याला जोडून ही गोष्ट करता येईल व त्या यादीस घटनेच्या कायद्यातील एक विभाग समजण्यात येईल.

(ब) कार्यकारी मंडळातील प्रतिनिधीत्व :– या प्रश्नामुळे ३ मुद्दे उपस्थित होतात.

(१) कार्यकारी मंडळात प्रतिनिधीत्वाचे विशिष्ट प्रमाण.

(२) कार्यकारी मंडळाचे स्वरुप.

(३) कार्यकारी मंडळातील जागा भरण्याचे धोरण.

## (१) प्रतिनिधीत्वाचे विशिष्ट प्रमाण

हा प्रश्न निकालात काढावयाचा असेल तर कायदे मंडळातील प्रतिनिधीत्वाच्या विशिष्ट प्रमाणाबरोबर हिंदू, मुसलमान व अस्पृश्य समाज यांना प्रतिनिधीत्व असावे, या तत्त्वाचा अवलंब केला पाहिजे.

शीख, इंडियन ख्रिश्चन आणि अँग्लो इंडियन यासंबंधी म्हणाल तर कायदेमंडळात असणाऱ्या प्रतिनिधीत्वाच्या प्रमाणात त्यांना कार्यकारी मंडळात प्रतिनिधीत्व होणे अशक्य आहे. विशेषतः त्यांच्या फारच अल्पसंख्येमुळे ही अडचण मुख्यतः निर्माण झाली आहे. संख्येच्या प्रमाणात जर त्यांना प्रतिनिधीत्व द्यावयाचे असेल तर कार्यकारी मंडळ इतके वाढवावे लागेल की, शेवटी ते अगदी हास्यास्पद होईल. त्यांच्याकरिता काही करता येण्यासारखे असेल तर या मंडळात त्यांच्यासाठी एक किंवा दोन जागा राखून ठेविल्या पाहिजेत आणि नवीन घटनेनुसार ज्या जागा निर्माण होतील त्यामध्ये योग्य ते प्रतिनिधीत्व देण्यात यावे अशा प्रकारचा करार केला पाहिजे.

## (२) कार्यकारी मंडळाचे स्वरूप

कार्यकारी मंडळाच्या घटनेमध्ये माझ्या मते ज्या तत्त्वांचा समावेश करण्यात यावा ती येणेप्रमाणे :–

(अ) हे पक्के ध्यानात ठेवले पाहिजे की, या देशात बहुसंख्य व अल्पसंख्य जमातीत कायमचे हाडवैर आढळून येत आहे आणि बहुसंख्यांक विरूद्ध अल्पसंख्यांक असा नेहमीचा पवित्रा असल्यामुळे बहुसंख्य जमात अल्पसंख्य जमातींच्या बाबतीत सारासार विचार करीत नाही, अशी भीती अल्पसंख्यांकांना वाटते आणि तीच बहुसंख्य जमातींच्या बाबतीत त्यांना कायमचीच दहशत होऊन बसली आहे. कायदे करणाऱ्या सत्तेपेक्षा त्यांची अंमलबजावणी करणाऱ्या सत्तेला फार महत्त्व असते.

(ब) निवडणुकीत ज्या पक्षाचे इतरांपेक्षा जास्त लोक निवडून येतात त्या पक्षास सरकार स्थापन करण्याचा अधिकार असतो आणि या सरकारवर सर्व सभागृहातील बहुसंख्य सभासदांचा विश्वास असतो, अशा प्रकारची पद्धत आहे. परंतु हिंदुस्थानातील परिस्थितीचा विचार केला असता ही गोष्ट अगदी अशक्य आहे. कारण हिंदुस्थानातील बहुसंख्यांक हा जातीय बहुसंख्यांक आहे, राजकीय बहुसंख्यांक नाही. ही तफावत असल्यामुळे इंग्लंडमध्ये ज्या कल्पना उठाव घेतात त्या येथील एकंदर परिस्थितीच्या दृष्टीने अगदी चुकीच्या आहेत.

(क) कायदेमंडळातील बहुसंख्य पक्ष कार्यकारी मंडळ बनवू शकत नाही. ते अशा प्रकारे बनविले पाहिजे की नुसत्या बहुसंख्य पक्षाकडूनच त्याला आदेश मिळून भागणार नाही तर कायदेमंडळातील इतर अल्पसंख्य पक्षांकडूनही आदेश मिळाले पाहिजेत.

(ड) कायदेमंडळाची मुदत संपण्यापूर्वी कार्यकारी मंडळाचा अस्त होता कामा नये आणि याच अर्थाने कार्यकारी मंडळ नॉन पार्लमेंटरी असावे.

(ई) कार्यकारी मंडळातील सभासदांची निवड कायदेमंडळातील सभासदांमधून झाली पाहिजे आणि त्यांना सभागृहात बसण्याचा, बोलण्याचा, मतदान करण्याचा व प्रश्नांना उत्तर देण्याचा पूर्ण अधिकार असला पाहिजे आणि या अर्थाने कार्यकारी मंडळ पार्लमेंटरी असावे.

## (३) जागेच्या नेमणुकीसंबंधी योजना

याबाबतीत माझ्या मते खालील तत्त्वांचा अवलंब करावा.---

(अ) सरकारचा मुखत्यार जो पंतप्रधान त्यावर सर्व सभागृहाचा विश्वास असला पाहिजे.

(ब) कार्यकारी मंडळातील विशिष्ट जमातींच्या सभासदांवर कायदेमंडळातील त्या त्या जमातींच्या सभासदांचा विश्वास असला पाहिजे.

(क) कार्यकारी मंडळातील सभासदांवर सभागृहाने जर लाचलुचपतीचा किंवा अविश्वासाचा आरोप ठेविला असेल तरच त्यास बडतर्फ करण्यात यावे.

या तत्त्वांचा अंगीकार केल्यानंतर माझी अशी सूचना आहे की, पंतप्रधान व कार्यकारी मंडळातील बहुसंख्य जमातीच्या प्रतिनिधींची निवडणूक अखिल सभागृहाने करावी. परंतु कार्यकारी मंडळातील भिन्न जमातींच्या प्रतिनिधींची निवडणूक कायदेमंडळातील त्या त्या अल्पसंख्य जमातींच्या सभासदांनी करावी.

## कायदेमंडळातील प्रतिनिधीत्व

हा अगदी बिकट प्रश्न आहे. इतर सर्व प्रश्न या प्रश्नाच्या उलगडण्यावर अवलंबून आहे. या प्रश्नामुळे दोन महत्त्वाचे मुद्दे निर्माण होतात.

१. प्रतिनिधीत्वाचे प्रमाण,

२. मतदानाचे स्वरूप.

## प्रतिनिधीत्वाचे प्रमाण

प्रथमतः मी माझ्या सूचना मांडतो व तद्नंतर ज्या तत्त्वावर त्या आधारभूत झाल्या आहेत त्याचे विवेचन करतो. खालील तक्त्यांवरून या सूचना तुमच्या लक्षात येतील. ब्रिटिश हिंदुस्थानातील मध्यवर्ती व प्रांतिक कायदे मंडळातील भिन्न जमातींच्या प्रतिनिधीत्वाचे प्रमाण त्यात दर्शविण्यात आले आहे.

## कायदेमंडळात सुचित केलेले प्रतिनिधीत्वाचे प्रमाण

[ **वि. सू.**— आदिवासीय जमातींची लोकसंख्या जमेस न धरल्यामुळे शिरगणतीचे आकडे व खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेले लोकसंख्येच्या शेकडेवारी प्रमाणातील आकड्यांमध्ये तफावत दिसत आहे. ]

### (१) मध्यवर्ती मंडळ

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू .. .. | ५४.६८ | ४० |
| मुसलमान .. .. | २८.५ | ३२ |
| अस्पृश्य समाज.. .. | १४.३ | २० |
| इंडियन ख्रिश्चन.. .. | १.१६ | ३ |
| शीख .. .. | १.४९ | ४ |
| अँग्लो इंडियन.. .. | ०.०५ | १ |

### (२) मुंबई

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू .. .. | ७६.४२ | ४० |
| मुसलमान .. .. | ९.९८ | २८ |
| अस्पृश्य समाज.. .. | ९.६४ | २८ |
| इंडियन ख्रिश्चन.. .. | १.७५ | २ |
| अँग्लो इंडियन.. .. | ०.०७ | १ |
| पारशी .. .. | ०.४४ | १ |

## (३) मद्रास

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू .. .. | ७१.२० | ४० |
| अस्पृश्य समाज.. .. | १६.५३ | ३० |
| मुसलमान .. .. | ७.९८ | २४ |
| इंडियन ख्रिश्चन.. .. | ४.१० | ५ |
| अँग्लो इंडियन.. .. | ०.०६ | १ |

## (४) बंगाल

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| मुसलमान .. .. | ५६.५० | ४० |
| हिंदू .. .. | ३०.०३ | ३३ |
| अस्पृश्य समाज.. .. | १२.६३ | २५ |
| इंडियन ख्रिश्चन.. .. | ०.१९ | १ |
| अँग्लो इंडियन.. .. | ०.०५ | १ |

## (५) संयुक्त प्रांत

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू .. .. | ६२.२९ | ४० |
| अस्पृश्य समाज.. .. | २१.४० | २९ |
| मुसलमान .. .. | १५.३० | २९ |
| इंडियन ख्रिश्चन.. .. | ०.२४ | १ |
| अँग्लो इंडियन.. .. | ०.०३ | १ |

## (६) पंजाब

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| मुसलमान . . . . | ५७.०६ | ४० |
| हिंदू . . . . | २२.१७ | २८ |
| शीख . . . . | १३.२२ | २१ |
| अस्पृश्य समाज. . . . | ४.३९ | ९ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | १.७१ | २ |

## (७) मध्यप्रांत व वऱ्हाड

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू . . . . | ७२.२० | ४० |
| अस्पृश्य समाज. . . . | २०.२३ | ३४ |
| मुसलमान . . . . | ५.७० | २५ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | ०.३६ | १ |

## (८) बिहार

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू . . . . | ७०.७६ | ४० |
| मुसलमान . . . . | १५.०५ | ३० |
| अस्पृश्य समाज. . . . | १३.८० | २८ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | १.७१ | २ |

## (९) आसाम

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू . . . . | ४५.६० | ४० |
| मुसलमान . . . . | ४४.५९ | ३९ |
| अस्पृश्य समाज. . . . | ८.७६ | १९ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | ०.४८ | २ |

## (१०) ओरिसा

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू . . . . | ७०.८० | ४० |
| अस्पृश्य समाज. . . . | १७.६६ | ३६ |
| मुसलमान . . . . | २.०७ | २२ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | ०.३७ | २ |

## (११) सिंध

| जमाती (१) | लोकसंख्येच्या बाबतीत शेकडा प्रमाण (२) | प्रतिनिधीत्वाच्या बाबतीत शेकडा प्रमाण (३) |
|---|---|---|
| हिंदू . . . . | २३.०८ | ४० |
| मुसलमान . . . . | ७१.३० | ४० |
| अस्पृश्य समाज. . . . | ४.२६ | १९ |
| इंडियन ख्रिश्चन. . . . | ०.२९ | १ |

## अल्पसंख्यांकांवर होणारे परिणाम

हिंदुस्थान सरकारच्या १९३५ च्या कायद्यान्वये अल्पसंख्यांक जमातींच्या प्रतिनिधीत्वामध्ये जे फरक करण्यात आले आहेत व ज्यांना योजनेमध्ये मूर्त स्वरूप प्राप्त झाले आहे, ते जर तक्त्याच्या स्वरूपात आपल्या निदर्शनास आणले तर अनाठायी होणार नाही. ते येणेप्रमाणे.—

### मुसलमानांवर होणारे परिणाम

| कायदेमंडळ | लोकसंख्येचे प्रमाण | प्रतिनिधीत्वाचे प्रमाण | |
|---|---|---|---|
| | | १९३५ च्या कायद्यानुसार | सुचविलेल्या योजने-नुसार |
| (१) | (२) | (३) | (४) |
| मध्यवर्ती . . . . | २८.५० | ३२.०० | ३२ |
| मद्रास . . . . | ८.०० | १३.४९ | २४ |
| मुंबई . . . . | १०.०० | १७.४० | २८ |
| संयुक्त प्रांत . . | १५.३० | २८.९५ | २९ |
| मध्य प्रांत . . . . | ५.७० | १२.५० | २५ |
| बिहार . . . . | १५.०० | २६.३२ | २८ |
| आसाम . . . . | ४४.६० | ३१.४८ | ३८ |
| ओरिसा . . . . | २.०० | ६.६६ | २२ |

### अस्पृश्य समाजावर होणारे परिणाम

| कायदेमंडळ | लोकसंख्येचे प्रमाण | प्रतिनिधीत्वाचे प्रमाण | |
|---|---|---|---|
| | | १९३५ च्या कायद्यानुसार | सुचविलेल्या योजने-नुसार |
| (१) | (२) | (३) | (४) |
| मध्यवर्ती . . . . | १४.३० | ७.६० | २० |
| मद्रास . . . . | १६.५० | १३.९० | ३० |
| मुंबई . . . . | ९.६० | ८.५० | २८ |
| बंगाल . . . . | १२.६० | १२.०० | २५ |
| संयुक्त प्रांत. . . . | २१.४० | ८.७० | २९ |
| पंजाब . . . . | ४.४० | ४.५० | ९ |
| मध्य प्रांत . . . . | २०.२० | १७.८० | ३४ |
| बिहार . . . . | १३.८० | ९.८० | २८ |
| आसाम . . . . | ८.७० | ६.५० | २० |
| ओरिसा . . . . | १७.६० | १०.०० | ३६ |
| सिंध . . . . | ४.२० | . . | १९ |

## इंडियन ख्रिश्चन समाजावर होणारे परिणाम

| कायदेमंडळ | लोकसंख्येचे प्रमाण | प्रतिनिधीत्वाचे प्रमाण | |
|---|---|---|---|
| | | १९३५ च्या कायद्यानुसार | सुचविलेल्या योजनेनुसार |
| (१) | (२) | (३) | (४) |
| मध्यवर्ती .. .. | १.१६ | ३.०० | ३ |
| मद्रास .. .. | ४.१० | ४.२० | ५ |
| मुंबई .. .. | १.७० | १.७० | २ |
| बंगाल .. .. | ०.१९ | ०.८० | १ |
| संयुक्त प्रांत. . .. | ०.२४ | ०.९० | १ |
| पंजाब .. .. | १.७० | १.१४ | २ |
| मध्य प्रांत .. .. | ०.३५ | .. | १ |
| बिहार .. .. | १.७० | ०.६६ | २ |
| आसाम .. .. | ०.४८ | ०.९० | २ |
| ओरिसा .. .. | ०.३७ | ०.१६ | २ |
| सिंध .. .. | ०.२९ | .. | १ |

## प्रस्तावाची आधारभूत तत्त्वे
## शीख समाजावर होणारे परिणाम

| कायदेमंडळ | लोकसंख्येचे प्रमाण | प्रतिनिधीत्वाचे प्रमाण | |
|---|---|---|---|
| | | १९३५ च्या कायद्यानुसार | सुचविलेल्या योजनेनुसार |
| (१) | (२) | (३) | (४) |
| मध्यवर्ती .. .. | १.५० | २.४० | ४ |
| पंजाब .. .. | १३.२० | १८.२९ | २१ |

## हिंदू समाजावर होणारे परिणाम

| कायदेमंडळ | लोकसंख्येचे प्रमाण | प्रतिनिधीत्वाचे प्रमाण | |
|---|---|---|---|
| | | १९३५ च्या कायद्यानुसार | सुचविलेल्या योजनेनुसार |
| (१) | (२) | (३) | (४) |
| बंगाल .. .. | ३०.०० | २०.०० | ३३ |
| पंजाब .. .. | २२.१० | २०.०० | २८ |
| सिंध .. .. | २३.८० | ३१.६० | ४० |

ज्या मूलभूत तत्त्वांवर कायदेमंडळातील जागेची विभागणी आधारभूत झाली आहे, ती मी निवेदन करीत आहे.

(१) बहुसंख्य राज्यकारभार तात्त्विकदृष्ट्या ग्राह्य नसून व्यवहार्यदृष्ट्या अन्यायकारक आहे. बहुसंख्य जमातीला प्रतिनिधीत्वाच्या दृष्टीने सापेक्ष बहुसंख्यत्व देता येईल. परंतु तिला कधीही पूर्णपणे बहुसंख्यत्वाच्या जोरावर भरमसाट प्रतिनिधीत्व देता येणार नाही.

(२) प्रतिनिधीत्वाच्या दृष्टीने कायदेमंडळात ज्या बहुसंख्य जमातीला सापेक्ष बहुमत आहे, तिला इतक्या जास्त जागा असता कामा नये की, ज्यामुळे ती बहुसंख्य जमात एखाद्या छोट्याश्या अल्पसंख्य जमातीच्या सहाय्याने राज्यकारभार करू शकेल.

(३) जागेची विभागणी अशा दृष्टीने केली पाहिजे की, बहुसंख्य जमात व इतर कोणतीही एक प्रतिष्ठित अल्पसंख्य जमात यांच्या एकजुटीमुळे बहुमत तयार होता कामा नये की, ज्यामुळे इतर अल्पसंख्य जमातींच्या हितसंबंधाबद्दल इंद्रजाल तयार होईल.

(४) जागेची विभागणी अशा दृष्टीने केली पाहिजे की, बहुसंख्यांकावर अवलंबून न रहाता अल्पसंख्यांक जमातींनी आपली एकजूट केली तर त्यांना स्वत:चे सरकार प्रस्थापित करता यावे.

(५) बहुसंख्य जमातीकडून ज्या जादा जागा काढून घेण्यात आल्या आहेत त्यांची अल्पसंख्यांक जमातींमध्ये व्यस्त प्रमाणात विभागणी केली पाहिजे. ती अशी की, जी अल्पसंख्य जमात इतर अल्पसंख्य जमातींच्या मानाने मोठी आहे व जिची सामाजिक, आर्थिक व शैक्षणिकदृष्ट्या इतर अल्पसंख्य जमाती-पेक्षा चांगली परिस्थिती आहे तिला कमी जागा देण्यात याव्यात. उलट-पक्षी जी अल्पसंख्य जमात लोकसंख्येच्या मानाने अगदीच छोटी आहे व जिची शैक्षणिक, आर्थिक व सामाजिक परिस्थिती इतरांच्या मानाने कमी प्रतीची आहे तिला जास्त जागा देण्यात याव्यात.

मी असे म्हणतो की, प्रतिनिधीत्व हे समतोल प्रतिनिधीत्व आहे. केवळ लोकसंख्येमुळे कोणत्याही जमातीला इतर जमातीवर प्रभुत्व गाजविण्यास जागाच ठेवलेली नाही. हिंदू बहुसंख्येला मुसलमानांचा विरोध व मुस्लीम बहुसंख्येला हिंदुंचा व शीखांचा विरोध या गोष्टींना मध्यवर्ती त्याचप्रमाणे प्रांतिक कायदेमंडळात थारा देण्यात आलेला नाही.

## मतदानाचे स्वरूप

मतदानाच्या प्रश्नासंबंधीच जर बोलायचे झाले तर पुढील गोष्टींचा स्वीकार करणे अगदी आवश्यक आहे.–

(१) संयुक्त मतदारसंघ किंवा स्वतंत्र मतदारसंघ हे, अत्यावश्यक कार्य पार पाडण्याचे एक साधन आहे, ते कार्यतत्त्व नव्हे.

(२) याचा उद्देश हा की, अल्पसंख्य जमातीच्या नामधारी प्रतिनिधींना कायदेमंडळात स्थान मिळता कामा नये व त्यांना त्यांचे खरेखुरे प्रतिनिधी कायदेमंडळात पाठविता यावे.

(३) स्वतंत्र मतदार संघामुळे अल्पसंख्यांकांची अशी बालंबाल खात्री होते की, त्यांचे प्रतिनिधी हे दुसरे तिसरे कोणीही नसून त्यांचा ज्यांनी विश्वास संपादन केला आहे, असेच लोक असू शकतील. संयुक्त मतदारसंघ जरी अल्पसंख्यांकांना सारखे संरक्षण देत असला तरी त्याकडे कानाडोळा करता कामा नये.

(४) जीमध्ये अल्पसंख्यांकांना दोनदा मत देण्याचा अधिकार राहील व त्यांच्या मताच्या कमीत कमी प्रमाणाची आवश्यकता असेल अशी एक रदबदलीची शक्यता असावी म्हणून चतुस्सभासद घटना तयार करावी.

## विचारात न घेतलेल्या गोष्टी

### (१) विशिष्ट प्रकारच्या संरक्षणाचा प्रश्न

विशिष्ट अल्पसंख्य जमातींच्या ज्या इतर काही मागण्या आहेत त्या येणेप्रमाणे :––

(अ) अल्पसंख्य जमातींच्या परिस्थितीविषयी अहवाल तयार करण्यासाठी अधिकारी नेमण्यात यावा,

(ब) शिक्षणाच्या बाबतीत सरकारी मदतीची कायदेशीर तरतूद करावी, आणि

(क) जमीन निर्धारणाची कायदेशीर तरतूद करावी.

या सर्व गोष्टी कायद्याच्याद्वारे कराव्यात. ज्याअर्थी या सर्व गोष्टी जातीय स्वरूपाच्या नाहीत त्याअर्थी मी त्या येथे सविस्तर देऊ शकत नाही.

### (२) आदिवासीय जमाती

शीख, अँग्लो इंडियन, इंडियन ख्रिश्चन व पारशी या जमातींपेक्षा लोकसंख्येच्या मानाने जरी आदिवासीय जमाती फार मोठ्या आहेत, त्या मी विचारात घेतल्या नाहीत, हे अगदी उघड आहे. माझ्या योजनेमधून मी त्यांना का वगळले

याबाबतीत तशीच सबळ कारणे आहेत. राजकीय संधीचा योग्य तो फायदा घेण्याची कुवत अद्याप या आदिवासीय जमातीत आलेली नाही आणि त्यामुळे या जमाती बहुसंख्य किंवा अल्पसंख्य जमातींच्या हातातील अगदी सहज बाहुले बनतील, याचा परिणाम असा होईल की, यामुळे त्यांचा स्वतःचा फायदा काही एक न होता राजकारणातील समतोलपणा मात्र हवा तसा त्या ढासळू शकतील. त्यांच्या एकंदर वर्तमान परिस्थितीविषयी विचार करिता मला असे वाटते की, या मागासलेल्या जमातींविषयी जर कोणती योग्य गोष्ट करण्यासारखी असेल तर, ती ही की, दक्षिण आफ्रिकेची घटना ज्या तत्त्वावर आधारभूत झाली आहे त्या तत्त्वानुसार कायद्याच्याद्वारे एक मंडळ नेमण्यात यावे, त्याने आता ज्याला ' बहिष्कृत विभाग ' (Excluded areas) म्हणून संबोधण्यात येत आहे, त्याचा योग्य तो कारभार पाहावा. ज्या ज्या प्रांतात हा बहिष्कृत विभाग विखुरलेला नसेल, त्या त्या प्रांताने या बहिष्कृत विभागाचे कामकाज सुरळीतपणे चालण्यासाठी प्रतिवर्षी काही तरी एक ठराविक रक्कम द्यावी.

## (३) हिंदी संस्थाने

हिंदी संस्थानांचा माझ्या योजनेमध्ये मी अंतर्भाव केला नाही हे आपल्या निदर्शनास आलेच असेल. या संस्थानांचा अंतर्भाव करण्याच्या बाबतीत माझी काही एक आडकाठी नाही परंतु त्यांनी पुढील अटी मान्य केल्या पाहिजेत.––

(अ) ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थाने यामध्ये अखिल भारतीय राजकीय सत्ता दुभागली जाता कामा नये.

(ब) कायद्यानुसार व राजकीय दृष्ट्या बंधनामुळे ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थाने एकमेकांपासून विलग झाली आहेत त्यांचे उच्चाटन केले पाहिजे. त्याचप्रमाणे ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थाने हे स्वतंत्र घटक असता कामा नये इतकेच नव्हे तर, या दोन घटकांचा हिंदुस्थान या नावाने एकच घटक निर्माण केला पाहिजे.

(क) ज्या अटींमुळे हिंदी संस्थानांचा अंतर्भाव करण्यात येत आहे त्यांची हिंदी संपूर्ण स्वातंत्र्याला काही एक बाधा होत नाही. ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थाने यांच्या ऐक्याच्या दृष्टीने मी एक योजना आखली आहे. ती या ठिकाणी इत्थंभूत सांगून माझे भाषण मी अवजड करू इच्छीत नाही. तूर्त तरी ब्रिटिश हिंदुस्थानने हिंदी संस्थानांचा विचार न करिता आपले ध्येय गाठण्याचा प्रयत्न करावा, नाही तर हिंदुस्थानच्या प्रगतीचा मार्ग मात्र गुंतागुंतीत गुरफटल्याशिवाय राहाणार नाही.

## ही योजना व पाकिस्तान

हिंदी ऐक्याच्या दृष्टीने ही योजना मी आखली आहे. मला उमेद आहे की, मुसलमान लोक तिचा स्वीकार करतील कारण यामध्ये त्यांना पाकिस्तान पेक्षाही जादा संरक्षण देण्यात आले आहे. पाकिस्तानला माझा काही एक विरोध नाही. माझी अशी खात्री आहे की, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर पाकिस्तानची उभारणी करण्यात आली आहे आणि याबाबतीत आता शंकाकुशंका व्यक्त करणे अगदी अयोग्य आहे. या तत्त्वाचा मुसलमानांना जितका फायदा घेण्यासारखा असेल तितका त्यांनी घ्यावा. त्याबद्दल माझा काहीही विरोध नाही. पण त्याच्याबरोबर त्यांनी हेही लक्षात ठेविले पाहिजे की, मुसलमानेतर जे विभाग आहेत त्यामध्ये जर तेथील लोक या तत्त्वाचा फायदा घेत असतील तर त्यांना त्यांनी विरोध करता कामा नये. दुसऱ्या एका उत्कृष्ट व जिच्यामुळे जास्त संरक्षण मिळेल अशा योजनेकडे मी मुसलमानांचे लक्ष वेधू इच्छितो. मी असे प्रतिपादन करतो की, ती माझी योजना पाकिस्तानच्या योजनेपेक्षा अधिक उत्कृष्ट आहे. माझ्या योजनेशी अनुकूल जे मुद्दे आहेत ते जर याठिकाणी निविदिले तर अनाठायी होणार नाही ! ते येणेप्रमाणे,

(अ) ज्या जातीय बहुसंख्येच्या भीतीमुळे पाकिस्तानची मुहूर्तमेढ रोवण्यात आली आहे ती भीतीच या योजनेमुळे नष्टप्राय झाली आहे.

(ब) आजपर्यंत मुस्लिम समाजाने ज्या जादा जागांचा उपभोग घेतला आहे त्या माझ्या योजनेमध्ये जशाच्या तशाच कायम आहेत.

(क) पाकिस्तान विरहित प्रांतांमध्ये मुसलमानांच्या प्रतिनिधीत्वात वाढ केल्यामुळे त्यांची परिस्थिती इतकी मजबूत झाली आहे की, जी पाकिस्तानला मूर्त स्वरूप प्राप्त झाले असते तर त्यांना कधीही अनुभवावयास मिळाली नसती, एवढेच काय पण आज त्यांची जी परिस्थिती आहे त्यापेक्षाही वाईट परिस्थिती निर्माण झाली असती.

## हिंदू लोक इकडे लक्ष देतील काय ?

वाटेल ते झाले तरी बहुमतावरच राज्यकारभार चालवा हेच एकमेव पवित्र कार्य आहे, या प्रकारचे अडेलतट्टू धोरण हिंदुंनी स्वीकारल्यामुळे आज जातीय प्रश्नाचा अगदी बाऊ निर्माण झाला आहे. राज्यकारभार हाकण्याची दुसरी एक पद्धत आहे, जी कदाचित हिंदुंना माहित नसेल परंतु जिचा व्यक्ती व राष्ट्रे यामध्ये जेव्हा महत्त्वाचे भांडण निर्माण होते तेव्हा प्रामुख्याने उपयोग होतो,

ती पद्धत म्हणजे एकमतानुवर्ती राज्यकारभार ही होय. या बाबतीत हिंदू लोक जर बारकाईने पाहाण्याचा त्रास घेतील तर त्यांची खात्री पटेल की, या प्रकारचा राज्यकारभार हा काल्पनिक नसून खरोखरीच तो अस्तित्वात आहे. ज्यूरी पद्धतीचेच उदाहरण घ्या. पंचांपुढे चौकशी चालू असताना एकमताच्या तत्त्वाचाच अंगिकार करण्यात येतो. पंचांनी एकमताने दिलेल्या निर्णयानुसार न्यायमूर्तीला वागणे भाग पडते. त्यात त्याला यत्किंचितही ढवळाढवळ करता येत नाही. लीग ऑफ नेशन्सचे दुसरे उदाहरण घ्या. लीग ऑफ नेशन्सच्या निर्णयाबाबत कोणत्या नियमाचा स्वीकार केला होता? एकमताने कारभार चालविणे हाच तो नियम होय! कायदेमंडळात अगर कार्यकारी मंडळात निर्णय घेण्याच्या बाबतीत हिंदुंनी जर एकमताच्या तत्त्वाचा अवलंब केला तर या भारत वर्षात जातीय प्रश्नाचा मागमूस देखील शिल्लक राहिला नसता.

एखादी व्यक्ती हिंदुंना असा प्रश्न विचारू शकेल की, जर ते अल्पसंख्यांकांना घटनेद्वारे संरक्षण द्यावयास तयार नाहीत तर एकमताच्या तत्त्वाचा अंगीकार करण्यास ते सिद्ध आहेत का? पण दुर्दैव हे की यापैकी कोणत्याच तत्त्वाचा स्वीकार करण्यास ते तयार नाहीत.

बहुमतानुवर्ती राज्यकारभाराविषयी म्हणाल तर हिंदू लोक कोणत्याच बंधनास मान्यता देण्यास तयार नाहीत. त्यांना बहुमत पाहिजे पण ते संपूर्ण बहुमत पाहिजे. सापेक्ष बहुमताने त्यांचे केव्हाही समाधान होणार नाही. संपूर्ण बहुमतावर हिंदुंनी जो एवढा भर दिला आहे तो राजकारणातील मुरब्बी लोकांच्या दृष्टीने कितपत न्याय्य आहे याचा त्यांनी अवश्य विचार करावा. ज्या संपूर्ण बहुमताच्या तत्त्वावर हिंदुंनी भर दिला आहे त्या तत्त्वास युनायटेड स्टेट्‌स्‌चा बिलकूल पाठिंबा नाही, याचा हिंदुंना लवलेशही नसावा.

युनायटेड स्टेट्‌स्‌च्या घटनेतील मुद्दा उदाहरणादाखल घेऊ या. या घटनेमध्ये मूलभूत हक्कांना केंद्रीभूत करणारे एक पोट-कलम आहे. या पोट-कलमाचा अर्थ काय आहे ते आपण पाहू या. याचा अर्थ हा की, ज्या सर्वश्रेष्ठ गोष्टीचा मूलभूत हक्कात समावेश करण्यात आला आहे, त्यामध्ये बहुमत ढवळाढवळ करण्यास अगदी असमर्थ आहे. याच घटनेतील दुसऱ्या एका उदाहरणाकडे पहा. यापासून असा स्पष्ट बोध होतो की, जर घटनेतील कोणत्याही विभागात थोडाफार फरक करावयाचा असेल तर त्यास तीन चतुर्थांश बहुमताची आवश्यकता लागते आणि शिवाय सर्व संस्थानांची संमती लागते. यापासून एकच गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते आणि ती ही की, युनायटेड स्टेट्‌स्‌ची घटना विशिष्ट उद्देश दर्शविते आणि बहुमतानुवर्ती राज्यकारभार अगदी फोल आहे याची ग्वाही देते.

या सर्व गोष्टींची पुष्कळशा हिंदुंना जाणीव आहे. पण यापासून ते योग्य धडा घेत नाहीत याबद्दल त्यांची कीव येते. त्यांनी जर तसे केले तर त्यांची खात्री पटेल की, बहुमतानुवर्ती राज्यकारभार हे त्यांना वाटते तितके पवित्र तत्त्व नाही. तत्त्व या दृष्टीने बहुमतानुवर्ती राज्यकारभाराचा अवलंब केलेला नाही तर नियम म्हणूनच त्याचा अंगीकार करण्यात आला आहे आणि तोही केवळ या दोन कारणांसाठी,

(१) बहुमत हे नेहमी राजकीय बहुमत असावे,

(२) राजकीय बहुमतानुवर्ती निर्णयात अल्पसंख्यांकांचा दृष्टिकोनच फक्त मान्य केलेला असतो असे नसून तो त्यात अगदी एकजीव झालेला असतो. याचा परिणाम असा होतो की, अल्पसंख्यांक त्या निर्णयाविरूद्ध बंड पुकारण्यास केव्हाही धजत नाहीत.

हिंदुस्थानातील बहुमत हे राजकारणावर आधारलेले बहुमत नाही. हिंदुस्थानात बहुमत जन्माला येते ते तयार केले जात नाही. हाच तर जातीवाचक बहुमत व राजकीय बहुमत यातील फरक होय. राजकीय बहुमत हे चिरकाल टिकणारे बहुमत नव्हे. राजकीय बहुमत हे अळवावरील पाण्याप्रमाणे आज आहे तर उद्या नाही. जातीय बहुमत हे कायमचेच असून त्याचे धोरणही ठराविक असते. एखाद्याला त्यांचा विध्वंस करता येईल पण त्यात बदल घडवून आणता यावयाचा नाही. जिथे राजकीय बहुमताला इतका विरोध असतो तर मग जातीय बहुमताला कितीतरी आत्यंतिक स्वरूपाचा विरोध असू शकेल ?

हिंदू लोक जीनांना असा प्रश्न विचारु शकतात की, १९३० साली त्यांनी जो १४ मुद्यांचा मसुदा प्रसिद्ध केला त्यामध्ये बहुमतानुवर्ती राज्यकारभारावर फारच भर दिला, तो का ? त्यापैकी एका मुद्याने असे स्पष्ट ध्वनित केले आहे की, ज्यामुळे बहुसंख्यांकांची छाटाछाट करून त्यांना अल्पसंख्यांक करण्यात येईल अगर त्यांचे स्थान अल्पसंख्यांकांच्या बरोबरीने होईल, अशी कोणत्याही प्रकारची बंधने बहुसंख्यांकांवर घालू नयेत. त्याचप्रमाणे त्यांनी आणखी एक प्रश्न जिनांना विचारावा की, मुस्लिम प्रांतात मुसलमानांच्या बहुमताला जर काही एक आडकाठी नाही तर मग मध्यवर्ती कायदे मंडळातील हिंदुंच्या बहुमताला का ? हिंदुंनी या गोष्टीची खूणगाठ बांधली पाहिजे की, जिनांची वागणूक अगदी विसंगत आहे. एवढेच या एकंदर परिस्थितीवरून तात्पर्य काढता येण्यासारखे आहे. तेव्हा त्यांनी बहुमतानुवर्ती राज्यकारभाराचा पुरस्कार करू नये.

राजकारणातून जरी बहुमतानुवर्ती राज्यकारभाराचे उच्चाटन करण्यात आले तरी हिंदुंच्या जीवनातील इतर पुष्कळशा गोष्टींवर काही एक परिणाम होणार नाही. सामाजिक जीवनातील मूलभूत तत्त्वांनुसार ते बहुसंख्यांक राहातीलच. व्यापार व उद्योगधंदे त्यांची मिरासदारी आहे व ती यापुढेही राहणारच. हिंदुंनी एकमतानुवर्ती राज्यकारभाराचा स्वीकार करावा असे काही माझी योजना सांगत नाही किंवा त्यांनी बहुमतानुवर्ती राज्यकारभाराचा त्याग करावा असाही काही उपदेश करीत नाही. मला त्यांना हेच सांगावयाचे आहे की, सापेक्ष बहुमतात त्यांनी समाधान मानावे. या गोष्टीला जर त्यांनी मान्यता दिली तर त्यांनी फारच मोठी गोष्ट केल्यासारखे होणार आहे.

असा कोणत्याही प्रकारचा त्याग न दाखविता 'अल्पसंख्यांक हिंदी स्वातंत्र्याला खो घालतात' असे बहुसंख्य हिंदू सर्व जगाला सांगत आहेत ते अगदी अन्याय आहे व यामुळे त्यांचा काही एक फायदा होणार नाही. कारण, तशा प्रकारचा प्रयत्न अल्पसंख्यांकांनी अद्यापि केलेला नाही, उलटपक्षी स्वातंत्र्यासाठी वाटेल तो आत्मयज्ञ करण्यास ते तयार आहेत. मात्र त्यांना समाधानकारक संरक्षण मिळाले पाहिजे. हे त्यांचे कृत्य अपकारक आहे अशी समजूत हिंदुंनी करून घेता कामा नये. आयर्लंडमध्ये घडलेल्या गोष्टीच्या अगदी विरुद्ध अशी ही गोष्ट आहे. एकदा आयर्लंडच्या राष्ट्रीय पक्षाचे नेते श्री. रेडमंड, अल्स्टर परगण्याचे पुढारी कार्सन यांना म्हणाले, 'वाटेल ते संरक्षण मागा, त्याला माझी ना नाही, परंतु तुम्ही संयुक्त आयर्लंडला संमती द्या.' असे म्हणतात की, हे ऐकून तो चटदिशी वळला व असे आवेशयुक्त वाणीने वदला की, 'मसणात जावू द्या तुमचे संरक्षण, तुमची सत्ता आम्हास बिलकूल मान्य नाही.' हिंदुस्थानातील अल्पसंख्यांकांनी अशाप्रकारचे उत्तर दिले नाही. त्यांचे समाधान होण्यास संरक्षण पुरेसे आहे. म्हणून मी हिंदुंना विचारतो की, ही गोष्ट योग्य नव्हे काय ? माझी अशी खात्री आहे की, ती योग्यच आहे.

## उपसंहार

जातीय प्रश्नावर तोड काढण्यासाठी माझ्या मनात ज्या गोष्टी घोळत होत्या त्या मी आपणासमोर मांडिल्या आहेत. अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनला त्या बंधनकारक नाहीत, इतकेच नव्हे तर त्या व्यक्तिशः मलासुद्धा बंधनकारक नाहीत, त्या गोष्टींना तुमच्या पुढे मांडून मी फक्त एक नूतन मार्ग दाखविला आहे, यापेक्षा अधिक काहीही केलेले नाही. मी जी तत्त्वे प्रतिपादिली आहेत त्यावर माझ्या योजनेपेक्षा फारच भर दिला आहे. त्या तत्त्वांचा जर अंगिकार केला तर माझी अशी खात्री आहे की, जातीय प्रश्नावर तोड काढण्यासाठी जो गोंधळ माजला आहे तो बराचसा कमी होईल.

हिंदी पेचप्रसंग सोडविणे ही साधी गोष्ट नव्हे. जिला डिव्हाइनली आर्डेनड् कन्फयुजन (Divinely ordained confusion) म्हणता येईल अशा १८६७ साली अस्तित्वात असणाऱ्या कॉन्फेडरेशन पूर्वी जर्मनीची जी परिस्थिती होती तिचे एका इतिहासकाराने वर्णन केलेले माझ्या वाचनात आले आहे आणि ते मला चांगले आठवते. ती गोष्ट जर्मनीच्या बाबतीत सत्य होती किंवा नव्हती याबद्दल आपणाला काही एक कर्तव्य नाही, परंतु हिंदुस्थानाच्या वर्तमान परिस्थितीशी ते वर्णन अगदी तंतोतंत लागू पडते. कित्येक प्रयत्नानंतर जर्मनीला या बिकट परिस्थितीचा नाश करता आला. परवा या युद्धापूर्वी जर्मन जनता एकजीव झाली, तिच्या अंतरंगात व बहिरंगात एकरूपता निर्माण झाली इतकेच नव्हे तर नेहमीच्या वागण्यात देखील तिच्यात ऐक्य दिसू लागले. आदेश देण्यासाठी हिंदुस्थान या गुंतागुंतीच्या मार्गातून अद्याप बाहेर पडलेला नाही. याचा अर्थ असा नव्हे की, त्याला तसे करण्यास संधी मिळाली नाही, परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, बऱ्याच वेळा हिंदुस्थानला या बाबतीत संधी मिळाली आहे. १९२७ साली लॉर्ड बर्कनहेडने हिंदी लोकांना राजकीय घटना तयार करण्याचे जे आव्हान दिले ती पहिली संधी होय. त्याचा हिंदी लोकांनी स्वीकार करुन घटना तयार करण्यासाठी एक मंडळ नेमले. या मंडळाने ' नेहरू घटना ' नावाची एक घटना तयार केली व ती जनतेपुढे मांडली परंतु लोकांनी तिला वाटाण्याच्या अक्षता लावून दुःख प्रदर्शन न करिता मूठमाती दिली. १९३० साली हिंदी लोक गोलमेज परिषदेसाठी जमले. ही दुसरी संधी होय. त्यावेळी सुद्धा हिंदी लोक त्यांचा डाव खेळू शकले नाहीत व घटनाही तयार करू शकले नाहीत. कालपरवा सप्रू कमिटीने तिसरा प्रयत्न केला परंतु त्याचा काही एक उपयोग झाला नाही.

आणखी एखादा प्रयत्न करण्याच्या बाबतीत आता आशावाद किंवा औत्सुक्य उरलेले नाही. वाटेल तो प्रयत्न केला तरी तो विफल होणार आहे. मग प्रयत्न कराच कशाला, या विचाराने प्रत्येक व्यक्तीचे मन अगदी भारून गेले आहे. या प्रसंगी मला हे सांगावयाचे आहे की, कोणत्याही हिंदवासीयानी कचरून जाता कामा नये, अगर मेलेल्या ढोराची जशी घाण येते त्याप्रमाणे पेच प्रसंगाची घाण घेत राहाण्याइतके कठोर होऊ नये अथवा या देशातील राजकारणात कुत्र्याच्या भांडणाप्रमाणे जे भांडण चालले आहे ते बघ्यासारखे पाहात राहाण्यापेक्षा दुसरे काही एक करू शकणार नाही अशा प्रकारचे अवाक्षर देखिल काढता कामा नये. गतकालातील अपयशामुळे धैर्य खचून जाण्याचे काही कारण नाही आणि माझे धैर्य तर कधीही खचू शकणार नाही. कारण मला असे वाटते की, जातीय प्रश्न सोडविण्याचे आजपर्यंत जे प्रयत्न झाले ते सर्व अयशस्वी ठरले. याचे कारण मुख्यतः हिंदी लोकांच्या अंगी असलेले अनुवंशीक दोष हे नसून, हा प्रश्न सोडविण्यासाठी ज्या मार्गाचा अवलंब केला जातो

तोच मुळात चुकीचा आहे. मी सुचविलेली ही योजना निर्विकार मनाने विचारात घेतली तर ती स्वीकारणीय वाटेल. माझ्या योजनेमध्ये हा प्रश्न सोडविण्याचा नवा दृष्टिकोन आहे. हिंदी जनतेने तो अवश्य विचारात घ्यावा.

शेवटी, माझे टीकाकार काही बाबतीत या योजनेवर काही सूचना सुचवू शकतील, परंतु ती सर्वस्वी अमान्य करणे त्यांना जड जाईल. इतकेही करून त्यांनी ती नाकारलीच तर ही योजना ज्या तत्त्वांवर आधारली आहे, त्याबद्दल त्यांना वाद उपस्थित करावा लागेल.'' [१]

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रस्तुत भाषणावर ' टाईम्स ऑफ इंडिया ' पत्राने अग्रलेख लिहून दखल घेतली, तसेच श्री. ठक्करबाप्पा यांनी याच दैनिकाला पत्र लिहून प्रतिक्रिया व्यक्त केली. अग्रलेखाला आणि ठक्करबाप्पांच्या पत्राला डॉ. आंबेडकरानी 'टाईम्स ऑफ इंडिया'त उत्तर दिले. त्याचा वृत्तांत दि. २६ मे १९४५ च्या 'जनता' पत्रात प्रकाशित झाला होता. तो इथे देत आहोत.--संपादक.

'' मुंबई येथील ' टाईम्स ऑफ इंडिया ' या इंग्रजी दैनिकाने डॉ. आंबेडकर योजनेवर अग्रलेखात जी टीका केली आहे त्या टिकेला आणि ' ऑल इंडिया हरिजन सेवक संघाचे ' जनरल सेक्रेटरी श्री. ठक्करबाप्पा यांनी ता. १७ मे १९४५ च्या टाईम्समध्ये केलेल्या टीकेला अनुक्रमे ता. १७-५-१९४५ व १८-५-१९४५ च्या टाईम्समध्ये डॉ. बाबासाहेबांनी उत्तरे दिली आहेत. ती जनतेच्या वाचकाकरिता येथे देत आहोत.

संपादक ' टाईम्स ऑफ इंडिया '

जातीय पेचप्रसंग सोडविण्यासंबंधी मी सुचविलेल्या योजनेवर ' टाईम्स ऑफ इंडियाच्या ' १७-५-१९४५ च्या अग्रलेखात परिक्षण करण्यात आले आहे. या परिक्षणात संपादक महाशय लिहितात, '' सदर योजनेवर हिंदू आणि मुसलमान असेच मत देतील की अस्पृश्यांचे हित साधण्यासाठी त्यांना भरमसाठ अधिकार देणारी ही योजना आहे.

डॉ. आंबेडकरांच्या या योजनेचे बारकाईने निरीक्षण केले तर असेच दिसून येईल की अस्पृश्यांना मध्यवर्ती आणि प्रांतिक विधीमंडळात देऊ करण्यात येणाऱ्या जागांमुळे, दोन श्रेष्ठ जमातींवर वर्चस्व गाजविता येईल अशी तरतूद करण्यात आली आहे. या प्रकारे वाममार्गाचा चातुर्याने उपयोग करून अनादिकालापासून पददलित अशा लोकांना अभिनव जमातीचा दर्जा प्राप्त करून देण्याचा उपरोधिक प्रयत्न करण्यात आला आहे.

---

[१] जनता : १९-५-१९४५, २६-५-४५, २-६-४५, ९-६-४५, १६-६-४५, २३-६-४५

. . . . . आमच्या मते डॉ. आंबेडकर यांची योजना साधारणपणे विधायक असली तरी हिंदू-मुसलमानांच्या कडून करण्यात येत असलेल्या ज्या अतिशयोक्तिचे हे अस्पृश्यांचे पुढारी नेहमी वाभाडे काढीत असतात, तीच अतिशयोक्ती त्यांच्या योजनेत आत्यंतिक स्वरूपात दिसून येते.''

मला हे सांगताना वाईट वाटते की योजनेचा हा विपर्यास करण्यात आला आहे. याचे कारण सापेक्ष बहुमताच्या तत्त्वाचा मतितार्थच टाईम्सकारांना कळला नाही.

माझ्या योजनेसंबंधी पसरविण्यात आलेला गैरसमज दूर करण्यासाठी खालील लिखाणाला जागा द्याल अशी आशा आहे.

संपादक महाशय एक गोष्ट विसरले आहेत ती ही की एकदा का सापेक्ष बहुमताचे तत्त्व मान्य केले—संपादकांना ते मान्य आहे असे दिसते—तर संपूर्ण बहुमत आणि सापेक्ष बहुमत यांच्यातील फरकाइतक्याच जागा बाकी राहतात. दगडधोंडे समजून त्या बाकी राहिलेल्या जागा, कुठेतरी झुगारून काही देता येणार नाहीत. त्यांची वासलात लावायची म्हटले म्हणजे त्याला एकच उपाय आहे. तो म्हणजे अल्पसंख्यांकांकडे त्यांची योग्य वाटणी करायची. आता प्रश्न इतकाच राहील की त्यांची वाटणी कशी करायची ?

या बाकी राहिलेल्या सर्वच्या सर्व जागा मुसलमानांच्या हिताच्या कामी लावावयाच्या किंवा कोणत्याही संयुक्तिक तत्त्वाच्या आधारे अल्पसंख्यांकात त्यांची वाटणी करायची ? जर संपादकांना पहिली गोष्ट मान्य असेल तर त्याचा असा स्पष्ट अर्थ होईल की मुसलमानांच्या पन्नास टक्के मागणीला त्यांचा (संपादकाचा) पाठिंबा आहे. पण पहिल्या ऐवजी दुसरी गोष्ट जर त्यांनी मान्य केली आणि त्यामुळे परिणामी अस्पृश्यांना मिळणाऱ्या प्रतिनिधीत्वापेक्षा जादा प्रतिनिधीत्व प्राप्त झाले तर, माझ्या योजनेत अस्पृश्यांना इंद्रपद प्राप्त करून देण्याची मुद्दाम तरतूद करण्यात आली आहे असे कसे म्हणता येईल ? आणि संयुक्तिक योजनेनुसार जागांची वाटणी केल्यामुळे अस्पृश्यांना त्यांचा न्याय्य हिस्सा मिळत असला तर निःपक्षपाती मनुष्य त्याला कशी हरकत घेऊ शकतो, हे मला तरी काही समजत नाही. मी माझ्या योजनेत जागांची जी वाटणी केली आहे ती केवळ सापेक्ष बहुमताचे तत्त्व आणि संयुक्तिक वाटणीच्या सामान्य नियमावर आधारलेली आहे.

आपला,

बी. आर. आंबेडकर

मुंबई १५-५-१९४५.*,

---

* प्रस्तूत अग्रलेख प्रकाशित झालेल्या टाईम्स ऑफ इंडियाच्या अंकातील तारीख आणि त्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दिलेल्या प्रतिक्रियेच्या तारखेचा क्रम संयुक्तिक वाटत नाही. त्यामुळे जनतेच्या अंकात तारीख देण्यात चूक झाली असावी.—संपादक.

# डॉ. आंबेडकर योजनेवर श्री. ए. बी. ठक्कर उर्फ ठक्करबाप्पा यांची टीका

डॉ. आंबेडकर यांनी हिंदुस्थानच्या राजकीय पेच प्रसंगावर जातीय तोडगा सुचविताना काही तत्त्वे पुढे मांडली आहेत; त्यांचा असा आग्रह आहे की, कोणत्याही प्रकारची भीडभाड न ठेवता ती तत्त्वे सर्व जातींना लागू करण्यात यावी आणि ते असा दावा करतात की ती सर्वांना अनुरूप अशीच आहेत. परंतु विधिमंडळात, अधिकारी वर्गात आणि नोकऱ्यात प्रतिनिधीत्व देण्यासंबंधी डॉ. आंबेडकर यांनी ज्या जातींची निवड केली आहे त्यात ब्रिटिश सरकारने १९३५ च्या कायद्यानुसार मान्यता दिलेल्या ' रानटी जाती ' (भिल्ल वगैरे) ना अजिबात वगळले आहे.

पददलित व मागासलेल्यांच्या या कैवाऱ्याने, अस्पृशांपेक्षाही वाईट स्थिती आलेल्या रानटी लोकांकडे पूर्णपणे कानाडोळा केलेला पाहून आश्चर्य वाटते. इतकेच नव्हे तर त्यांना जे काही देण्यात आले होते तेही त्यांनी (डॉ. आंबेडकरांनी) काढून घेतले. अहारे कैवारी !

सर्व जमातींना निर्भयपणे लागू करण्यासाठी पुढे मांडलेल्या तत्त्वांपैकी एकात डॉ. आंबेडकर म्हणतात की सर्व जातींची सामाजिक, आर्थिक आणि शैक्षणिक परिस्थिती लक्षात घेऊन त्या (परिस्थिती) च्या व्यस्त प्रमाणात त्या त्या जातींना जादा अधिकार देण्यात यावेत आणि त्याच्याच आधारे अस्पृश्यांना मुसलमानांपेक्षा विशेष सवलती देण्यात याव्यात असे ते सुचवितात.

डॉ. साहेबांचे हे तत्त्व जर या रानटी जातींना (ॲबॉरिजिन्स) लागू केले तर अस्पृश्यांच्या पेक्षा किती तरी पटीने अधिक सवलती त्यांना दिल्या जातील आणि त्यामुळे संपूर्ण बहुमत होण्याचा संभव आहे. परंतु डोंगराळ प्रदेशात जीवन कंठणाऱ्या या एक कोटी सदुसष्ट लक्ष गरीबांना डॉ. आंबेडकर अजिबात विसरले आहेत.

यावरून एक तत्त्व मात्र ठळकपणे दिसून येते की अस्पृश्यांच्यासाठी पक्षपाताचा अतिरेक करून ' रानटी लोकांच्या ' न्याय्य हक्कांबद्दल मात्र डॉ. आंबेडकर तिरस्करणीय नकार देत आहेत.

ए. बी. ठक्कर.

# श्री. ए. बी. ठक्करबाप्पा यांच्या टीकेस डॉ. बाबासाहेबांनी दिलेले उत्तर

' संपादक, टाईम्स ऑफ इंडिया ' यास,

महाशय,

श्री. ठक्कर यांनी माझ्या योजनेवर केलेल्या टिकेस उत्तर म्हणून या लिखाणास आपण जागा द्याल अशी आशा आहे.

जातीय मसुदा सादर करताना मी '' रानटी जमाती (ॲबॉरीजिन्स) च्या हक्कांची पायमल्ली केली '' असे श्री. ठक्कर यांनी त्या जमातींच्या वतीने माझ्यावर सोटा उगारताना म्हटले आहे. या सोट्याची शोभा वाढविण्यासाठी ' पददलितांचा, रंजल्या-गांजलेल्यांचा कैवारी ' असे माझे वर्णन केले आहे. श्री. ठक्कर यांना मला असे सांगावेसे वाटते की, ' मी, पददलित-मानव जातीचा सार्वभौम नेता आहे ' असे मी कधीच म्हटलेले नाही. माझ्या शक्तिच्या मानाने अस्पृश्य समाजाचे कार्य माझ्यासाठी पुरेसे आहे आणि तुमच्या त्याचप्रमाणे गांधींच्या मगरमिठीतून, मी अस्पृश्यांची सोडवणूक करू शकलो तर मला पराकाष्ठेचा आनंद होईल.

कोणतेही कार्य कमी लेखण्याची मांझी इच्छा नाही परंतु आयुष्याची वयोमर्यादा लक्षात घेता एक मनुष्य एकच कार्य करू शकतो ही गोष्ट डोळयापुढे ठेऊन श्री. ठक्कर म्हणतात त्याप्रमाणे ज्यांना रानटी लोक देखील दूर लोटतात अशा अस्पृश्य समाजाच्या कार्यासाठी मी स्वतःला वाहून घेतले आहे. वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेल्या माझ्या भाषणातील काही भागावर विसंबून श्री. ठक्कर यांनी माझ्यावर टीका करावी याबद्दल त्यांची मला कीव कराविशी वाटते. माझे सबंध भाषण वाचून काढण्याची त्यांनी जर दक्षता घेतली असती तर त्यांना कळून चुकले असते की माझ्या योजनेत रानटी जातींना वगळलेले तर नाहीच पण उलट परिणामकारक आणि उत्तम प्रकारे त्यांच्या हक्कांचे संरक्षण केले आहे. सदर योजनेतील बारीकसारीक मुद्दे मांडण्यासाठी ही जागा अपुरी आहे. माझ्यावर पक्षपातीपणाचा आणि क्षुद्र मनोवृत्तीचा आरोप करण्यापूर्वी रानटी जमातीच्या दृष्टीने माझ्या योजनेचा विचार करावा.

कायदेमंडळातील जागांची विभागणी करताना त्यात रानटी जमातींचा मी समावेश केला नाही. याचे कारण त्यांच्याशी माझे वैर आहे हे नसून, त्यांच्याजवळ राजकीय मनःसामर्थ्य नाही, अशी मांझी खात्री आहे. म्हणून, श्री. ठक्कर यांना असे विचारतो की रानटी जमातीस आपण कोणत्या परिस्थितीत आहोत याची जाणीव होण्यासाठी, राजकीय सत्तेच्या जोरावर हिंदुंच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त करून देण्यासाठी आणि शैक्षणिक दर्जा वाढविण्यासाठी,

तुमच्या धंदेवाईक समाजसेवेच्या अमदानीत तुम्ही काही केलेत का ? वीस वर्षाच्या समाजसेवेच्या कारकिर्दीत श्री. ठक्कर बाप्पा रानटी जमातीतून एकही पदवीधर निर्माण करू शकले नाहीत ही गोष्ट त्यांच्या समाजसेवेस काळीमा फासणारी आहे.

दुसरे असे की या जमातीला विधिमंडळात अधिक प्रतिनिधीत्व देण्यात यावे असे एकाएकी श्री. ठक्कर यांना का वाटायला लागले हे ते सांगतील काय ?

या जमातीच्या लोकसंख्येचे प्रमाण पाहाता १९३५ च्या कायद्यात त्यांना लोकप्रतिनिधीत्व अगदीच क्षुल्लक आहे. मग श्री. ठक्कर यांनी या कायद्यांविरुद्ध कधी ओरड केली आहे का ? सप्रु कमिटीच्या विरुद्ध कधी त्यांनी ब्र काढला आहे का ? माझ्याविषयी श्री. ठक्कर बाप्पांचा जो दुराग्रह आणि द्वेष आहे, तो इतरांच्या बाबतीत नाही हेच याचे खरे कारण.

तिसरी गोष्ट ही की रानटी जमातीस कायदेमंडळात त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात किंबहुना अधिक जागा मिळाल्या पाहिजेत असे जर श्री. ठक्कर यांना वाटत असेल तर याकरता मुसलमानांच्या जागात कपात केली गेली तरच हे शक्य होईल. मग रानटी लोकांचा लढा लढविण्यासाठी मुसलमानांशी टक्कर देण्याची श्री. ठक्कर यांची तयारी आहे काय ? अस्पृश्यांच्या जागात कपात करून ते अस्पृश्यांविषयीचे आपले प्रेम व्यक्त करू शकत नाहीत.

लोकसंख्येच्या प्रमाणात अजूनपर्यंत ज्यांना लोकप्रतिनिधीत्व मिळाले नाही अशा कमकुवत अस्पृश्य समाजाविरुद्ध शस्त्र उगारून ते (श्री. ठक्कर) मर्दुमकी गाजवू पहात आहेत. मुसलमानांना मिळत असलेल्या जादा अधिकारातून जर ते रानटी लोकांना काही घेऊन देऊ शकले तरच त्यांचे यांच्यावरील प्रेम आणि नायकत्व सिद्ध होईल.

बी. आर. आंबेडकर.''



## २२०

# अस्पृश्य समाजाची सर्वात सुंदर आणि उपयुक्त इमारत व्हावी

सोमवार, तारीख १४ मे १९४५ रोजी संध्याकाळी सहा वाजता शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन मुंबई शहर शाखेतर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना दामोदर हॉलच्या पाठीमागील बगीच्यात चहापार्टी देण्यात आली. त्यावेळेस सर्व वॉर्डातील सभासद, मध्यवर्ती समिती आणि डॉ. बाबासाहेब यांचा ग्रुप फोटो घेण्यात आला. तद्नंतर चहापान झाल्यावर डॉ. बाबासाहेबांना बोलण्यास विनंती करण्यात आली. त्यावेळेस डॉ. बाबासाहेब टाळयांच्या कडकडाटात बोलावयास उठले. ते म्हणाले,

आज या ठिकाणी हा जो प्रसंग घडून आला आहे त्या प्रसंगानिमित्त मी बोलावे अशी इच्छा प्रदर्शित करण्यात आल्यावरुन दोन शब्द सांगणे मला उचित वाटते.

ही जी परिषद झाली तीत आपण सर्वांनी जी मेहनत घेऊन अपूर्व यश साधलेत त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो.

आज ही एवढी मोठी परिषद झाली तिचा सगळीकडे गवगवा झाला आहे इतकेच नव्हे तर आपले शत्रु असलेल्या सर्व वर्तमानपत्रांनी तिच्या यशस्वीतेबद्दल मनसोक्त स्तुती केली आहे. या परिषदेच्या निमित्ताने तुम्ही जी एकजूट दाखविली आहे ती अभिनंदनीय आहे. तुम्ही जे कार्य केले ते आता संपले, आता आपल्याला घरी बसायला हरकत नाही असे समजू नका.

आपल्याला एक मोठे कार्य करावयाचे आहे. तुम्हा सर्वांना माहित आहे की आपल्याला एक मोठा हॉल बांधायचा आहे. त्यासाठी आपण सदतीस हजार रुपये खर्च करुन जागा घेतलेली आहे. लढाईमुळे त्याचे बांधकाम हातात घेता आले नाही परंतु लढाई संपल्यावर त्या कामाला सुरुवात करण्यात येईल. लढाई जवळ जवळ संपत आली आहे, तेव्हा सहा महिन्यानंतर प्रत्यक्ष कामाला सुरुवात होईल असे म्हणायला हरकत नाही. या हॉलला दोन लाख रुपये खर्च येईल ही कल्पना मी आपणास दिलेलीच आहे. आपण जो हॉल बांधणार आहोत तो इतका सुंदर झाला पाहिजे की त्यासारखा हॉल मुंबईत शोधून मिळता कामा नये. कुणी प्रतिष्ठित पाहुणा जर इथे आला आणि त्याने सर्व हॉल पाहावयाचे

---

जनता : १९ मे १९४५.

ठरविले व त्याबद्दल त्याला मत द्यावयाचे झाले तर सर्वात उत्तम आणि श्रेष्ठ प्रकारचा हॉल जर कोणाचा असेल तर तो अस्पृश्यांचाच. असे उद्गार त्याने काढायला पाहिजेत. बाकी ह्या हॉलला आपलाच पैसा लागला पाहिजे ही गोष्ट मात्र तुम्ही लक्षात ठेवायला पाहिजे, कारण आपला हॉल आपणच बांधला तरच आपली इभ्रत राहाणार आहे.

या बाबतीत आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणे अठरा वर्षांवरील प्रत्येक स्त्री-पुरुषाने एक रुपया द्यावयाचा आहे. यासाठी आजतागायत गोळा झालेली रक्कम बँकेत ठेवण्यात आली असून त्याचा हिशोब श्री. शा. अ. उपशाम यांचेकडे आहे.

परिषदेच्या कामानिमित्त वार्ड कमिट्यांची जी संघटना झालेली आहे त्याद्वारे हा पैसा गोळा केला तर ते अधिक सुलभ होईल.

आपल्यातील जे गोरगरीब आहेत त्यावर अवलंबून राहिलो तर पुरेसा पैसा गोळा होईल याबद्दल मला खात्री देता येत नाही, तेव्हा मला वाटते की ज्यांना शक्य आहे त्यांनी कमीतकमी पंचवीस रुपये द्यावेत. आपली इमारत पूर्णपणे तयार झाल्यावर मी इतिहास लिहिणार आहे. त्या इतिहासात पंचवीस रुपये देणाऱ्याचा फोटो देण्यात येईल. त्या लोकांना ही अमूल्य संधी आहे असे मला वाटते.

वॉर्डातील लोकांनी त्यांच्या वॉर्डामधून पंचवीस रुपये देणारे इसम निवडावे, त्यांच्या पाठीशी लागून मी सांगितलेली रक्कम गोळा करावी.

हे जे पैसे गोळा करावयाचे आहेत ते अधिवेशनासाठी अंगिकारण्यात आलेल्या पद्धतीप्रमाणेच करावे.

आज मला जे सांगावयाचे होते ते मी सांगितले. शेवटी पुन्हा एकदा तुम्हा सर्वांचे अभिनंदन करून रजा घेतो.

डॉ. बाबासाहेबांचे भाषण झाल्यावर मडकेबुवा यांनी आभारादाखल बोलल्यावर हा गोड समारंभ संपला.

● ● ●

## २२१

# व्यक्तिमात्राच्या स्वातंत्र्याचे मापन करण्याचे मूलभूत माप म्हणजे राजकारण होय

बुधवार ता. ३ ऑक्टोबर १९४५ रोजी पुणे येथील 'अहिल्याश्रमाचे' जागेत ' आंबेडकर स्कूल ऑफ पॉलिटिक्स् ' या संस्थेचा उद्‌घाटन समारंभ डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे हस्ते मोठ्या थाटात पार पडला. त्यावेळी राजकारणाच्या अभ्यासूंना मार्गदर्शन करण्यासाठी व प्रचलित हिंदी राजकारणाचे शास्त्रशुद्ध ज्ञान देण्यासाठी डॉ. बाबासाहेबांनी अत्यंत विद्वत्ताप्रचुर असे भाषण केले. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या या भाषणात विशेषतः गांधींनी हिंदी राजकारणात पदार्पण केल्यापासून काँग्रेसला तत्त्वहीन आणि बुद्धिहीन मेंढरांच्या कोंडवाड्याचे स्वरुप कसे दिले आहे व त्यामुळे देशाचे किती भयंकर नुकसान झाले आहे याचे अत्यंत मार्मिक विवेचन केले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

राजकारणाचा अभ्यास करण्याच्या ज्या उद्देशाने ही संस्था उघडण्यात आली आहे तो उद्देश मला मान्य आहे. तुमचा माझ्यावर आत्यंतिक विश्वास असल्यामुळे आज मी माझे विचार मनमोकळेपणाने तुमचे पुढे मांडणार आहे.

कोणत्याही पिढीतील लोकांपुढे त्यांच्या काळातील जे महत्त्वाचे प्रश्न असतील ते प्रश्न स्वतंत्रपणे विचार करून सोडविण्याचे स्वातंत्र्य त्या लोकांना असलेच पाहिजे. जो समाज पारतंत्र्यात जखडला गेला असेल त्या समाजाने स्वातंत्र्यासाठी अहर्निश लढा दिलाच पाहिजे.

काही विशिष्ट विचार पवित्र मानले जाऊन त्यांचा अवलंब अव्याहतपणे पिढ्यान् पिढ्या केला जाईल अशी नैतिक बंधने घातलेली विचारसरणी समाजाच्या रोमरोमी भिनून गेली तर तो समाज शेवटी अधोगतीला जाणार यात मुळीच शंका नाही. महंमद पैगंबर, येशू ख्रिस्त हे महान तत्त्ववेत्ते असू शकतील. पैगंबराचे ' कुराण ', ख्रिस्ताचे ' बायबल ' व श्रीकृष्णाची ' गीता ' ह्या धर्मग्रंथांचा विचार करा. कुराणात महंमद पैगंबराने जे जे म्हटलेले आहे, बायबलामध्ये येशू ख्रिस्ताने जे काही सांगितले आहे व गीतेत श्रीकृष्णाने जे काही निवेदिले आहे ते सर्वच्या सर्वच ' यावच्चंद्रदिवाकरौ ' सत्य आणि प्रमाणभूत

---

जनता : १३ ऑक्टोबर १९४५.

मानण्यात यावे, असे बंधन घालण्यात आल्यामुळे माणसाच्या बुद्धीला कायमचा 'खो' देण्यात आला आहे. त्यामुळे सत्य कोणते, असत्य कोणते, आपल्या उद्धाराचा मार्ग कोणता, अधोगतीला जाण्याचा मार्ग कोणता हे समजावून घेण्याचाही प्रयत्न कोणी करू शकत नाही. ही गोष्ट बहुजन समाजाच्या व देशाच्या दृष्टीने सर्वस्वी विघातक आहे. तुम्ही मला देव मानीत नाही हे मी माझे सद्‌भाग्य समजतो. मी आजतागायत तुम्हाला जे जे सांगितले आहे ते ते तुमच्या बुद्धीला पूर्णपणे पटेल याच भूमिकेवरून सांगितले. बुद्धीच्या कसून केलेल्या परीक्षणातून तावून सुलाखून निघालेल्या गोष्टीच मी आजपर्यंत प्रतिपादित आलो आहे. माझा धर्म कायद्यावर किंवा काही विशिष्ट तत्त्वांवर आधारलेला नसेल पण त्यात ' वास्तवता ' मात्र तुम्हाला नक्कीच आढळेल.

प्रत्येकाने हे अवश्य लक्षात ठेवले पाहिजे की प्रत्येक पिढीसमोर जे निरनिराळे प्रश्न उभे असतात ते प्रश्न सोडविण्यासाठी मागच्या पिढीतील लोकांच्या विचारांचाच आधार घेऊ म्हटले तर त्याचा काहीच उपयोग होणार नाही. असा विचार करा की जर आपणाला एखादा राजकीय प्रश्न सोडवावयाचा असला तर लो. टिळक हयात असते तर त्यांनी तो प्रश्न कसा सोडविला असता हे पाहून जर आपण आपल्या पुढील आजचा प्रश्न सोडवू तर तो यशस्वीरित्या सुटू शकणार नाही, असे माझे स्पष्ट मत आहे.

मनुष्यप्राण्याला जन्मतःच राजकारणाचे ज्ञान असते, असे जर कोणी म्हणत असेल तर ते म्हणणे मूलतःच चुकीचे आहे. उलट मी तर असे म्हणेन की मनुष्यमात्रामध्ये राजकीय दृष्टिकोन निर्माण करणे ही फार कठीण किमया आहे. माझ्या या म्हणण्यास इंग्लंडच्या इतिहासाची पाने साक्ष देतील. व्यक्तिमात्राच्या स्वातंत्र्याचे मापन करण्याचे मूलभूत माप म्हणजे राजकारण होय.

गांधी हिंदी राजकारणात घुसण्यापूर्वी आपल्या देशात राजकारणाचे धडे देणाऱ्या दोन शाळा-मतप्रणाली होत्या. एक रानडे-गोखले या उदार-मतवाद्यांची (Liberal School of Thoughts) व दुसरी बंगालमधील क्रांतिवाद्यांची (School of Revolutionaries). उदारमतवाद्यांच्या शाळेत निर्बुद्धांना दाखल करण्यात येत नसे व क्रांतिवाद्यांच्या शाळेत तत्त्वहीन लोकांना प्रवेश मिळू शकत नव्हता. रानडे-गोखल्यांच्या शाळेत बुद्धिवाद्यांनाच दाखल होता येत होते. ज्ञान संपादन व अभ्यासूवृत्ती यावरच त्यांचा अधिक भर असे. राजकारणात पारंगत असलेल्यांनाच उदारमतवाद्यांच्या शाळेत स्थान असे.

क्रांतिवाद्यांच्या शाळेचेही अत्यंत कडक नियम होते. प्राणावर तिलांजली देण्याची प्रतिज्ञा घेतलेल्यांनाच त्या संप्रदायात घेण्यात येत असे. परंतु गांधींनी उघडलेल्या शाळेचा दरवाजा केवळ निर्बुद्धांना व तत्त्वहीन लोकांनाच सताड उघडा ठेवण्यात आला. काँग्रेसच्या राजकारणात बुद्धिवाद्यांना बिलकूल स्थान नाही. म्हणून बुद्धिवाद व अभ्यासूवृत्ती यापासून काँग्रेसवाल्यांची पुरीच फारकत झालेली आहे, असे स्पष्ट म्हणणे भाग आहे.

काँग्रेस श्रेष्ठींना राजकारण कशाशी खातात याचे मुळीच ज्ञान नाही. यामुळे काँग्रेसच्या राजकारणाला वेळोवेळी जोरदार ठोकरा बसल्या व त्यामुळे देशाचे आणि बहुजन समाजाचे लवकर भरून न येणारे असे अपरिमित नुकसान झाले आहे. जातीय सलोख्याचा प्रश्न आजपर्यंत जो लोंबकळत राहिला आहे तो काँग्रेसवाल्यांच्या निर्बुद्धपणामुळे, अभ्यासहीनतेमुळे व तत्त्वशून्यतेमुळेच. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टमध्ये व्यापाराबाबतच्या संरक्षणासंबंधीचे ५१ वे जे कलम आले आहे ते केवळ एका माणसाच्या शुद्ध मूर्खपणामुळेच.

प्रत्येक पक्षाने आपल्या ध्येयसिद्धीसाठी सतत लढत राहिले पाहिजे. प्रत्येक पक्षात बुद्धिवादी लोक असलेच पाहिजेत. ज्ञान ही अत्यंत आवश्यक अशी गोष्ट आहे. मी रानडे-गोखले यांच्या तत्त्वप्रणालीचा असल्यामुळे मला अभिमानपूर्वक समाधान वाटते.



# २२२

# आपल्या प्रगतीसाठी देशाला मिळणाऱ्या सत्तेमध्ये आपण भागीदार झालेच पाहिजे

आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणे ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वर्किंग कमिटीची बैठक पुण्याच्या अहिल्याश्रमाच्या हॉलमध्ये ता. २ ऑक्टोबर १९४५ ते ता. ४ ऑक्टोबर १९४५ पर्यंत भरून अनेक महत्त्वपूर्ण ठराव पास करण्यात आले. वर्किंग कमिटीच्या सर्व बैठकीस भारतीय दलित वर्गाचे एकमेव पुढारी ने. ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे खास आमंत्रणावरून हज़र होते. वर्किंग कमिटी ज्या हॉलमध्ये बसत होती तो हॉल उत्तम प्रकारे श्रृंगारण्यात आला होता. वर्किंग कमिटीच्या बैठकीस अध्यक्ष रा. ब. एन. शिवराज व श्री. ई. डी. वाडापल्ली, श्री. एस. सालेना (मद्रास), श्री. जे. एन. मंडल, श्री. आर. एल. विश्वास (बंगाल), श्री. डी. एल. पाटील, श्री. खंडारे (मध्यप्रांत) व मुंबई प्रांतातील श्री. बी. के. गायकवाड, श्री. आर. आर. भोळे, श्री. बी. एच. वराळे हे वर्किंग कमिटीचे सन्माननीय सभासद आणि श्री. पी. एन. राजभोज, जनरल सेक्रेटरी हजर होते. वर्किंग कमिटीच्या निर्णयाचे आलोचन करण्याकरिता व आपले पूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे दर्शन घेण्याकरिता अनेक प्रांतातील शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे कार्यकर्ते पुण्यास गोळा झाले होते. ठिकठिकाणच्या प्रांतातून अनेक डेप्युटेशन्स घेऊन लोक आलेले होते. प्रांताप्रांतातून तारांचा जणू पाऊस पडत होता. या अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगी होत असलेल्या वर्किंग कमिटीच्या निर्णयाकडे साऱ्या भारतीय दलितवर्गाचे एकसारखे डोळे लागलेले असल्यामुळे या बैठकीस अत्यंत महत्त्व प्राप्त झाले होते.

यां बैठकीकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर सोमवार ता. १ ऑक्टोबर १९४५ रोजी रात्री मुंबईहून रवाना झाले. मंगळवार ता. २ ऑक्टोबर १९४५ रोजी पहाटे पुणे स्टेशनावर आपल्या पूज्य पुढाऱ्यांच्या सत्कारासाठी व दर्शनासाठी अनेक लोक हजर होते. डॉ. बाबासाहेब पुणे स्टेशनावर उतरताच ' डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय ' ' आंबेडकर–जिंदाबाद ' इ. गगनभेदी घोषणांनी सर्व वातावरण भरून गेले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर व रा. ब. शिवराज अहिल्याश्रमात पोहोचताच तेथेही त्यांचे उत्साहाने स्वागत करण्यात आले. अशा प्रकारे अत्यंत उत्साहाच्या वातावरणात वर्किंग कमिटीच्या कामास सुरवात झाली.

---

जनता : ६ आणि १३ ऑक्टोबर १९४५.

## पहिला दिवस

मंगळवार ता. २ ऑक्टोबर १९४५ रोजी बरोबर २ वाजता वर्किंग कमिटीची मिटिंग रा. ब. एन. शिवराज यांच्या अध्यक्षतेखाली व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मार्गदर्शित्त्वाखाली सुरू झाली. प्रथम अस्पृश्य समाजाचे एक मान्यवर पुढारी मद्रासचे रा. ब. श्रीनिवासन यांच्या निधनाबद्दल दुःखप्रदर्शक ठराव अध्यक्षांनी मांडला व त्यांच्या बहुमोल कार्यांची स्तुती केली. नंतर ठराव सर्वांनी उभे राहून मंजूर केला. नंतर आपल्या प्रगतीचा आढावा घेण्यात येऊन सध्याची जागतिक परिस्थिती व हिंदी राजकारण याबाबत विचारविनिमय करून आपल्या पक्षाचे पुढील धोरण कसे असावे याची स्थूल रुपरेषा आखण्यात आली व त्या दिवसाचे कमिटीचे कामकाज संपले. नंतर संध्याकाळी पेठ मंगळवार येथे रा. ब. एन. शिवराज यांच्या अध्यक्षतेखाली फेडरेशनच्या वार्ड कमिटीमार्फत प्रचंड सभा झाली. जनसंमर्द ५ हजारावर होता. रा. ब. शिवराज यांचे अस्पृश्य समाज व आगामी निवडणुकी याविषयावर दणदणित भाषण झाले. या सभेस वर्किंग कमिटीचे सर्व सभासद हजर होते. सदर सभा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रचंड जयघोषात विसर्जन पावली. नंतर लगेच दुसरी सभा भोर संस्थान दलित फेडरेशनतर्फे घेतली होती. तेथेही ४ हजार जनसमुदाय होता. रा. ब. शिवराज अध्यक्षस्थानी होते. या सभेत कमिटीतील अनेक सभासदांची भाषणे झाली. उत्साह फार दांडगा होता.

' निवडणुकीत प्रतिपक्षाची पुरी भंबेरी उडवून शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या उमेदवारांसच यशस्वी करा ' असा सर्व वक्त्यांनी आदेश दिला व सभेचे काम संपले. नंतर संध्याकाळी सुमारे ९ वाजता अहिल्याश्रमातच डॉ. बाबासाहेब आंबेडकर, रा. ब. एन. शिवराज व वर्किंग कमिटीचे सभासद यांना थाटाची मेजवानी देण्यात आली. अशा प्रकारे पहिला दिवस मोठ्या उत्साहात पार पडला.

## दुसरा दिवस

दुसऱ्या दिवशी म्हणजे ता. ३ ऑक्टोबर १९४५ रोजी सकाळी १० वाजता वर्किंग कमिटीची बैठक रा. ब. शिवराज यांचे अध्यक्षतेखाली भरून ती दुपारी ३ वाजेपर्यंत चालू होती. या बैठकीत वर्किंग कमिटीने अत्यंत महत्त्वाचे ठराव, दीर्घ विचारविनिमयानंतर पास केले. सदर बैठकीस सुरवातीपासून अखेरपर्यंत डॉ. बाबासाहेब आंबेडकर हजर होते.

## ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या वर्किंग कमिटीने पास केलेले ठराव

ठराव १ ला--

ऑ. इं. शे. का. फेडरेशनची ही वर्किंग कमिटी, आपले पूज्य पुढारी राव बहादूर आर. श्रीनिवासन यांच्या दुःखद निधनाबद्दल शोक प्रदर्शित करते आणि त्यांनी शेड्यूल्ड कास्ट्स्च्या उद्धाराकरिता केलेल्या बहुमोल कार्याची चिरंतन आठवण गुणग्राहकतापूर्वक नमूद करून, त्यांच्या मृत्युमूळे आपल्या जमातीचे फार मोठे नुकसान झाले आहे असे मोठ्या दुःखित अंतःकरणाने जाहीर करते.

ठराव २ रा--

### मध्यवर्ती सरकारची पुनर्रचना

ब्रिटिश साम्राज्य सरकारने हिंदी मध्यवर्ती सरकारच्या पुनर्रचनेबाबत केलेल्या घोषणेवर ऑ. इं. शे. कास्ट्स् फेडरेशनच्या या वर्किंग कमिटीने सांगोपांग विचार केलेला आहे. सरकारी घोषणेनुसार स्वतंत्र हिंदुस्थानकरिता राज्यघटना तयार करण्याची सुवर्ण संधी हिंदी लोकांनाच देण्याबद्दल ताबडतोब तजविजी करण्यात येणार आहेत हे जरी सत्य असले तरी, सरकारच्या प्रस्तुत योजनेला, ही वर्किंग कमिटी आपली मान्यता मुळीच देऊ शकत नाही.

वर्किंग कमिटीच्या मते, मध्यवर्ती सरकारच्या प्रचलित कायदे मंडळाची रचनाच इतकी अप्रातिनिधीक आहे की, जगात अशा प्रकारचे अप्रातिनिधीक कायदे मंडळ हेच पहिले असेल ! या मध्यवर्ती कायदे मंडळाच्या निवडणुकीकरिता मतदान करणाऱ्या लोकांना इतकी अवजड लायकी ठेवण्यात आलेली आहे की, त्यामुळे देशातील वयात आलेल्या लोकांपैकी नऊ दशांशापेक्षाही जास्त लोकांचा मतदानाचा न्याय्य हक्क हिरावून घेण्यात आलेला आहे.

या मध्यवर्ती कायदे मंडळात शेड्यूल्ड कास्ट्स् आणि हिंदी ख्रिश्चन यांना कायद्याने मुळीच प्रतिनिधीत्व देण्यात आलेले नाही.

अशा अप्रातिनिधीक मध्यवर्ती कायदे मंडळाची निवडणूक करणे पूर्णपणे गैर आहे असे या वर्किंग कमिटीचे स्पष्ट मत आहे.

अशा अप्रातिनिधीक कायदेमंडळाची निवडणूक करून, त्या कायदेमंडळातून पुनर्रचित असे मध्यवर्ती सरकार निर्माण करणे, म्हणजे, देशाची राजसत्ता सर्वस्वी सत्तामदांध अशा मूठभर अप्रातिनिधीक लोकांच्या हवाली करण्यासारखे आहे, असेच या वर्किंग कमिटीस वाटते.

जर आपलीच योजना अंमलात आणावयाचे ब्रिटिश सरकारने ठरविले असेल तर पुनर्रचित मध्यवर्ती सरकारच्या कार्यकारी मंडळात शेड्यूल्ड कास्ट्स्ला त्यांच्या न्याय्य हिश्यानुसार पूर्ण प्रतिनिधीत्व देण्यात आलेच पाहिजे अशी या वर्किंग कमिटीची ब्रिटिश सरकारला जोराची सूचना आहे.

शेड्यूल्ड कास्ट्स्ला हिंदी मध्यवर्ती सरकारात केवळ तुटपुंजे प्रतिनिधीत्व देण्यात येणार असेल व अशारितीने त्यांच्या पूर्ण प्रतिनिधीत्वाच्या न्याय्य हक्कांवर बोळा फिरविण्याचा प्रयत्न करण्यात येणार असेल, तर ब्रिटिश सरकारचे ते कृत्य शेड्यूल्ड कास्ट्स्च्या दृष्टीने विश्वासघातकीच ठरेल.

ठराव ३ रा——

## घटना समिती

स्वतंत्र हिंदुस्थानची घटना स्वतः हिंदी लोकांनीच तयार करावी या ब्रिटिश सरकारच्या योजनेचे ऑ. इं. शे. का. फेडरेशनची ही वर्किंग कमिटी स्वागत करते; मात्र घटना समितीच्या नियोजित योजनेला पुढील कारणांमुळे या वर्किंग कमिटीचा तीव्र विरोध आहे :——

(१) नियोजित घटना समितीपुढे निर्णयार्थ येणाऱ्या प्रश्नांची योग्य उकल करण्याइतके सखोल ज्ञान ज्यांना आहे किंवा तशा प्रकारचा ज्यांना पूर्वानुभव आहे व त्या प्रश्नांवर जे अधिकारवाणीने बोलू शकतील व विचार करू शकतील असे अत्यंत लायक लोकच या घटना समितीवर निवडले जातील अशी ग्वाही देण्यात आलेली नसल्यामुळे अशी घटना समिती म्हणजे केवळ भावनावशतेचा खेळच होईल !

(२) भांडवलदार लोकांकडून या घटना समितीवरील सभासदांना पैशाची लाच देऊन आपलेसे करण्याचा व अशाप्रकारे त्यांची मते विकत घेण्याचा डाव खेळला जाण्याचे फार मोठे भय आहे.

(३) घटना समिती अनावश्यक व निरुपयोगी आहे. कारण घटनात्मक मतभेदाच्या मुद्दयांवर निर्णय घेताना ते मुद्दे आवर्तातच फिरत राहाणार असल्यामुळे अशा घटना समितीच्या अवजड यंत्राचा खोडा घालणे पूर्णपणे निरर्थक आहे. महत्त्वाच्या मुद्दयांच्या निर्णयावर हिंदी लोकांचा नक्कीच मतभेद होत असतो व असे मतभेदाचे मुद्दे मुख्यतः जातीय स्वरुपाचेच असल्यामुळे, कोणतीही अल्पसंख्य जमात, जातीय प्रश्नांचा निर्णय घेण्याची मुखत्यारी घटना समितीतील बहुसंख्यांक पक्षाच्या हाती सोपविण्यास कधीही मान्यता देणार नाही व यामुळे ही घटना समिती निखालस निरुपयोगी आहे.

ठराव ४ था––

## प्रांतिक विधिमंडळाचा घटना समितीशी संबंध

ऑ. इं. शे. का. फेडरेशनच्या वर्किंग कमिटीचे असे निश्चयात्मक मत आहे की, घटना समितीच्या निर्मितीकडे प्रांतिक विधिमंडळाच्या निवडणुकीचा संबंध जोडण्याचा प्रयत्न करणे ही ब्रिटिश सरकारची घोडचूक आहे. या बाबींवर खोल विचार करून ही वर्किंग कमिटी असा निर्णय घेते की, खाली दिलेल्या कारणांमुळे प्रांतिक विधिमंडळातून निवडून गेलेल्यांची बनविली जाणारी घटना समिती खऱ्या घटना समितीचे कार्य पार पाडण्यास पूर्ण नालायक अशीच असेल.

कारणे––

(१) प्रांतिक विधिमंडळाच्या मतदानाचा हक्क मालमत्तेच्या लायकीवर आधारलेला असल्यामुळे शेड्यूल्ड कास्ट्स् व कामगारवर्ग यातील बहुसंख्य लोकांना या विधिमंडळाच्या मतदानाचा हक्क मिळालेला नाही व अशाप्रकारे बहुसंख्यांक जनतेला वगळून केवळ मालमत्ताधारी मतदारांच्या मतांनी निवडलेल्या प्रांतिक विधिमंडळामार्फत बनविल्या जाणाऱ्या घटना समितीला राज्यघटना तयार करण्याचा नैतिकदृष्ट्या कोणताही अधिकार पोहोचत नाही.

(२) स्वातंत्र्य किंवा पाकिस्तान या घोषणांवरच जर निवडणुका लढविण्यात आल्या तर अशा घोषणानुसार निवडल्या जाणाऱ्या प्रांतिक विधिमंडळामार्फत बनविण्यात येणाऱ्या घटना समितीला––राज्यघटनेचे स्वरुप व त्यातील मूलभूत प्रश्न यावर अधिकृतपणे––अधिकाराने निर्वाळा देता येईल असे मुळीच म्हणता येणार नाही आणि अशा प्रकारच्या घटना समितीने बनविलेली घटना ही 'लोकांनी लोकांसाठी तयार केलेली घटना' होणेच शक्य नसल्यामुळे तिचा स्वीकार करताच येणार नाही.

(३) संयुक्त मतदार संघ पद्धतीने होणाऱ्या निवडणुकीतून निर्माण होणाऱ्या प्रांतिक विधिमंडळातर्फे बनविल्या जाणाऱ्या घटना समितीत, शेड्यूल्ड कास्ट्स् व अशाच इतर जमातींचे खरेखुरे व विश्वासू प्रतिनिधी जाण्याची संभवनीयता नसल्यामुळे, या घटना समितीवर त्यांचा (शेड्यूल्ड कास्ट्स् व तत्सम जमातींचा) विश्वास असणे शक्य नाही. म्हणूनच या घटना समितीच्या कोणत्याही निर्णयाला या जमाती नैतिकदृष्ट्या बंधनकारक राहू शकत नाहीत.

प्रांतिक विधिमंडळाच्या निवडणुकीशी घटना समितीचा कोणत्याही प्रकारचा संबंध जोडला जाऊ नये अशा प्रकारची खबरदारी घेण्याची आत्यंतिक आवश्यकता असून घटना समितीची निवड निराळ्या पद्धतीने करण्यात

यावी. घटना समितीत भाग घेऊ इच्छिणाऱ्या प्रत्येक पक्षाने निवडणूक लढविण्यापूर्वी भावी घटना व जातीय निवाड्यासंबंधीची आपली योजना जाहीर केल्याशिवाय घटना समितीच्या निर्मितीला काहीच अर्थ उरणार नाही म्हणून प्रत्येक मक्षावर सदर गोष्टी आगाऊ जाहीर करण्याविषयी सक्ती करण्यात यावी. तसे न झाल्यास घटना समितीची निवड मुळीच होता कामा नये, असे या वर्किंग कमिटीचे ठाम मत आहे.

ठराव ५ वा—

## शे. का. फेडरेशनमध्ये सामील होण्यासाठी अखिल अस्पृश्यांना निर्वाणीची हाक

ऑ. इं. शे. का. फेडरेशनची वर्किंग कमिटी अखिल भारतीय अस्पृश्यांना अशी समज देऊ इच्छिते की, अस्पृश्यांचे भवितव्य ज्यात ठरविले जाईल अशी हिंदुस्थानची भावी राज्यघटना तयार करण्यासाठी जी घटना समिती अस्तित्वात येणार आहे तीत फक्त प्रांतिक विधिमंडळातून निवडून गेलेल्या सभासदांचीच निवड होणार असल्यामुळे आगामी प्रांतिक निवडणुकींना हिंदुस्थानाच्या इतिहासात विशेषेकरून अस्पृश्यांच्या इतिहासात ' न भूतो न भविष्यति ' असे महत्त्व प्राप्त झालेले असल्यामुळे, 'जागे होऊन, न्याय्य हक्कांसाठी लढा द्यायचा किंवा सर्वनाश करून घ्यायचा,' हा प्रश्न आज अस्पृश्यांना सोडवायचा आहे ही गोष्ट नीटपणे लक्षात घेऊन हिंदुस्थानातील प्रत्येक अस्पृश्याने शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनमध्ये सामील व्हावे आणि या फेडरेशनला हिंदुस्थानातील अस्पृश्यांची एकमेव अशी प्रातिनिधीक संस्था बनवावी. घटनात्मक संरक्षणाच्या अस्पृश्यांच्या मागणीला विरोध करणाऱ्या राजकीय पक्षात वैयक्तिक स्वार्थासाठी जे अस्पृश्य सामील झाले असतील अशा अस्पृश्यांना कोणत्याही प्रकारची मदत करणे म्हणजे अस्पृश्य समाजाशी विश्वासघात करण्यासारखे असल्यामुळे अशा लोकांपासून अत्यंत सावधगिरीने राहावे अशा प्रकारची ही वर्किंग कमिटी अस्पृश्य जनतेला धोक्याची सूचना देते.

ठराव ६ वा—

## मध्यवर्ती सरकारची पुनर्रचना

हिंदी सैन्याचे विसर्जन व शांतताकालीन पुनर्व्यवस्थेसंबंधी आणि अस्पृश्यांच्या पलटणीवर त्यामुळे होणाऱ्या परिणामासंबंधी ह्या वर्किंग कमिटीला बरीच आस्था वाटते आणि सरकारच्या नजरेला आग्रहपूर्वक आणू इच्छिते की, अस्पृश्यांच्या पलटणींच्या आजच्या शक्तीला तर बाधा येता कामा नये, त्यात शक्य तितकी वाढ

होऊन त्यांना अधिक सवलती देण्यात याव्याच पण त्याबरोबर सदर पलटणीतील लायक लोकांना हुद्याच्या जागा मिळविण्यासाठी सर्व प्रकारचे सहाय्य देण्यात यावे अशी अस्पृश्य समाजाची अपेक्षा आहे.

ठराव ७ वा––

हिंदी सैन्याचे विसर्जन झाल्यावर बाहेर पडणाऱ्या सैनिकांची पुढील व्यवस्था पाहाण्यासाठी नेमण्यात आलेल्या (ऑफिसर-इन-चार्ज, रिसेटलमेंट व रिहॅबिलिटेशन) ऑफिसरच्या पूर्वग्रहदुषित सामाजिक दृष्टिकोनामुळे मोकळया झालेल्या अस्पृश्य सैनिकांचे हितसंबंध डोळयाआड केले जातील अशी या वर्किंग कमिटीला भीती वाटते. ही गोष्ट सरकारच्या नजरेला आणून हिंदुस्थान सरकारला अशी विनंती करण्यात येते की, रिसेटलमेंट व रिहॅबिलिटेशन संबंधी जी व्यवस्था करण्यात येणार आहे त्यात अस्पृश्यांना अधिकाराच्या जागासंबंधी योग्य प्रमाणात प्रतिनिधीत्व देण्यात यावे.

## तिसरा दिवस

गुरुवार ता. ४ ऑक्टोबर १९४५ रोजी सकाळी पुणे येथील विद्यार्थ्यांच्या संघटनेतर्फे वर्किंग कमिटीचे सभासद व प्रेस रिपोर्टर्स यांना चहापार्टी देण्यात आली. त्यानंतर प्रेस कॉन्फरन्स झाली. सदर कॉन्फरन्सचे वेळी अनेक पत्रांचे व वृत्तसंस्थांचे प्रतिनिधी उपस्थित होते. जनता पत्रातर्फे ॲ. आर. डी. भंडारे, बी. ए. एल. एल.बी. हेही हजर होते. यावेळी ऑ. इं. शे. का. फेडरेशनचे अध्यक्ष रा. ब. एन. शिवराज यांनी आपल्या वर्किंग कमिटीने पास केलेल्या ठरावांचे वृत्त-पत्र प्रतिनिधींपुढे स्पष्टीकरण केले. नंतर बातमीदारांनी विचारलेल्या अनेक प्रश्नांना रा. ब. शिवराज यांनी समर्पक उत्तरे दिली. या प्रेस कॉन्फरन्सला वर्किंग कमिटीचे सभासद हजर होते. त्यांनीही बातमीदारांच्या शंकाकुल प्रश्नांना उत्तरे दिली. यावेळी प्रेस रिपोर्टर्सना व वर्किंग कमिटीच्या सभासदांना थाटाची पार्टी देण्यात आली.

नंतर दुपारी १२ वाजता पुन्हा वर्किंग कमिटीची बैठक सुरू झाली. या बैठकीसही डॉ. बाबासाहेब आंबेडकर उपस्थित होते. सदर बैठकीत, हिंदुस्थानभर फेडरेशनतर्फे लढविल्या जाणाऱ्या निवडणुकीकरिता प्रांतिक पार्लमेंटरी बोर्ड्स् व या प्रांतिक बोर्डाच्या कार्यावर नियंत्रण ठेवण्याकरिता व अखेर निर्णय देण्याकरिता सेंट्रल पार्लमेंटरी बोर्ड यांची एका ठरावाने स्थापना करण्यात आली व वर्किंग कमिटीचे काम संपविण्यात आले.

संध्याकाळी अहिल्याश्रमाच्या पटांगणात रा. ब. एन. शिवराज यांच्या अध्यक्षतेखाली निवडणुकीच्या प्रचारार्थ प्रचंड जाहीर सभा घेण्यात आली. सदर सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर खास भाषण करणार असल्याचे हस्तपत्रिकांद्वारे व गेल्या जनता पत्राच्या अंकात जाहीर झाले असल्यामुळे सभेस प्रचंड जनसंमर्द जमा झाला होता. या सभेत येत्या निवडणुकी व अस्पृश्य समाजाचे भवितव्य याविषयी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अत्यंत ओजस्वी असे भाषण झाले. लोकसमुदाय ५० हजारपर्यंत होता. 'आंबेडकर झिंदाबाद' च्या गगनभेदी घोषणांनी सर्व वातावरण निनादून गेले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या भाषणात म्हणाले,

भगिनींनो आणि बंधुजनहो,

आज ही सभा भरविण्यात आली आहे तिचा मुख्य उद्देश आगामी निवडणुकांचा प्रचार आहे. आज मला अस्पृश्य समाजाला वेळीच सूचना, चेतावणी द्यावयाची आहे. आता जी भाषणे झाली ती फार महत्त्वपूर्ण होती. ही भाषणे ज्यांनी केली ते कदाचित उमेदवार असू शकतील. म्हणून त्यांनी ती मोठ्या आवेशाने केली. पण मी काही उमेदवार नाही. (हंशा) मला इलेक्शनला उभे राहाण्याची इच्छा नाही, म्हणून माझ्या भाषणात आपणास आवेश आढळणार नाही. मी जरी आज कमान्डर-इन-चीफ नसलो तरी अस्पृश्य समाजाचे पुढारीपण माझ्याकडे अंशतः तरी आहे. म्हणून माझ्या अनुयायांच्या बऱ्यासाठी मी माझ्या अनुभवावरून सल्ला देण्यासाठी उभा आहे.

ही जी निवडणूक आहे, तिच्याकडे पाहून मला एका गोष्टीची आठवण होते. तुकारामाने म्हटले आहे की, ''आली सिंहस्थ पर्वणी, न्हाव्या, भटा झाली मेजवाणी'' ही निवडणूक सिंहस्थ पर्वणी आहे. इतर पक्षांना ही एक मेजवानी वाटते. पण ही म्हण अस्पृश्य समाजास मात्र मुळीच लागू नाही.

असा समज होता की, राजकारण फक्त ब्राह्मणालाच येते. राजकारण खेळणे हा फक्त भटांचा मक्ता होता आणि हे थोडेसे खरे देखील होते. कारण लोकल बोर्ड्स, म्युनिसीपालट्या, कायदेमंडळे यात फक्त ब्राह्मण सभासद होते. परंतु आता मी म्हणू शकेन की, या देशात राजकारण फक्त अस्पृश्य आणि ब्राह्मण यांनाच कळते. फक्त दहा वर्षात हा फरक झाला आहे. १८९२ पासून लोकनियुक्त पद्धती सुरू झाली. हळूहळू हिंदू, मुसलमान आणि ख्रिश्चन यांना त्यात आपापल्या परीने भाग घेता येऊ लागला. आश्चर्य हे की, १९३५ पर्यंत अस्पृश्य समाजास मतदानाचा हक्क नव्हता. अर्थात १९३५ पर्यंत मतदान,

उमेदवार व निवडणूक याबद्दल त्याला काही माहीत नव्हते. १९३७ च्या निवडणुकीत अस्पृश्य समाजाने मुंबई असेंब्लीतील १५ पैकी १५ जागा जिंकल्या, काँग्रेसने आपल्या दोन जागा जिंकल्या. आपण देखील काँग्रेसच्या उमेदवारांना सपशेल चीत करून त्यांच्या दोन जागा जिंकल्या, एकूण हिशेब बरोबर झाला. हिशोबाच्या वहीत काँग्रेसला मिळविणीच्या बाजूस श्रीशून्य जमा लिहावे लागले. ज्या समाजाला राजकारण औषधाला माहीत नव्हते, तो समाज १९३७ च्या निवडणुकीच्या पहिल्याच सलामीत संपूर्ण विजयी झाला. ही काही साधी गोष्ट नाही, या समाजाला राजकारण शिकविण्याची काही जरूरी नाही. कारण त्याला कोणीही फसवू शकत नाही. अस्पृश्य समाजास काँग्रेसने आव्हान दिले म्हणूनच हे दोन शब्द मी सांगत आहे.

काँग्रेस आज जवळ जवळ ५०–६० वर्षे राजकारण चालवित आहे. एवढ्या या दीर्घकालात आपण कमविले काय आणि गमविले काय याचा विचार कोणीही व्यवहारी मनुष्य करीत असतो. दरेक वाणी-उदमी प्रत्येक दिवाळीला हिशोब करतो, तसेच या देशाने, प्रत्येक चाणाक्ष माणसाने, काँग्रेसच्या राजकारणाचा आढावा घ्यावा, विशेषतः हिंदू लोकांनी याचा आढावा घ्यावा. ते त्यांचे कर्तव्य-कर्म आहे. ज्या काँग्रेसने मोठमोठी वचने दिली त्याचा हिंदूंनी आढापाढा करावा. हिंदू लोक आढापाढा करतील की नाही हे मला माहित नाही. तो त्यांचा प्रश्न आहे, परंतु आपण मात्र याचा जरूर विचार केला पाहिजे.

काँग्रेस ही हिंदुंची संस्था आहे. कारण काँग्रेसला मुसलमान सोडून गेले, खिश्चन वेगळे झाले, पार्शी वेगळे झाले आणि आपण तर वेगळे आहोतच ! आता काँग्रेसच्या भूलथापांना बळी पडून ज्या हिंदुंनी स्वार्थत्याग केला त्यांच्या पदरात काय पडले ? हिंदुंना काही मिळो वा न मिळो, तो त्यांचा प्रश्न आहे. परंतु, ज्याअर्थी हिंदुंनी आम्हाला आव्हान दिले आहे त्याअर्थी आपमतलबी हिंदू–काँग्रेसबद्दल आपल्यातील ज्या कोणाला आस्था वाटत असेल त्यांनी या गोष्टीचा अवश्य विचार करावा.

काँग्रेसच्या कार्याचा आढावा मी देतो म्हणजे हिंदुंच्या डोक्यात थोडा उजेड पडेल. मला जर कोणी विचारले की, काँग्रेसने जे काही मिळविले ते दोन-चार शब्दात तुम्ही सांगू शकाल काय ? तर मी अवश्य सांगू शकेन. मी सांगू शकेन की, काँग्रेसने जे काही मिळविले ते म्हणजे ''पदोपदी पराजय.'' सुरवातीपासून त्यांनी ज्या ज्या वेळी सिंहासारखी गर्जना केली त्या त्या वेळी त्यांना दुसऱ्याचे बूट चाटण्याची पाळी आली. काही लोक म्हणत होते की, आमचे पुढारी मवाळ आहेत. गांधी फार तिखट–ते फार जहाल. त्यांनी कायदा मोडावयाचा,

जंगले तोडावयाची व तुरुंगात जावयाचे, असे गांधींचे राजकारण. गांधींनी लोकांच्या हाती कोलीत दिले. लोकांनी १९२१ साली एक पोलीस चौकी जाळली. गांधी फारच घाबरले. त्यांनी तो नाद सोडून दिला. नंतर त्यांनी तो मार्ग सोडून दिला. १९३१ साली गांधी गोलमेज परिषदेला गेले. १९३१ साली गांधी परत आल्यावर त्यांना तुरुंगात टाकण्यात आले. गांधींना काही करता येईना. तुरुंगात गांधींची एवढी दुर्दशा झाली की, गांधींनी शेवटी आपल्या सुटकेसाठी बिलींग्डनला पत्र लिहिले. परंतु व्हाईसरॉय काही केल्या ऐकेना. गांधींनी पुष्कळ पत्रे लिहिली. पण त्यांचा काही उपयोग होत नाही असे पाहून शेवटी गांधींनी त्यांचा जुना दोस्त जनरल स्मस्ट्स् यांना पत्र लिहून मध्यस्थी घातले. जनरल स्मस्ट्स् मध्यस्थी पडून त्यांनी बिलींग्डनला पत्र लिहिले व अशा तऱ्हेने गांधींनी नामुष्कीने स्वतःची सुटका करून घेतली.

जे मिळेल ते पदरात पाडून घ्यायचे व उरलेल्यासाठी झगडावयाचे असे टिळक प्रभृतींचे ध्येय होते. गांधींच्या आज्ञेनुसार 'साम्राज्याची अडचण ती आपली संधी' या ध्येयसुत्राचा कॉंग्रेसने अवलंब केला. १९३९ साली युद्ध सुरू झाले. १९३९, ४०, ४१ साली कॉंग्रेसने काही केले नाही. १९४२ चे अर्धे साल कॉंग्रेसवाले मूग गिळून गप्प बसले व १९४२ ऑगस्टला ठराव केला की, ब्रिटिश सरकार 'चले जाव'. 'चले जाव' म्हणून दरवाजावर प्रत्येक ठिकाणी लिहिण्यात आले. दरवाजावर 'चले जाव' म्हणून भाडेकरूला नोटिस देवून जर भाडेकरू जाऊ लागला तर मग त्याला घालवून देण्यासाठी कोर्टात जाण्याची काही आवश्यकता भासली नसती. ८ ऑगस्टला १० वाजता ठराव झाला आणि ११ वाजता वारंट्स् काढून कॉंग्रेस पुढाऱ्यांना तुरुंग दाखविण्यात आला. बाकीचे जे बाहेर राहिले त्यांनी चळवळ केली, त्यांनी जाळपोळ, लुटालूट, अत्याचार केले. त्यांनी कोर्ट, कचेऱ्या जाळल्या, रेल्वे रूळ उखडण्यात आले, पोस्टाचे खांब, तारा वगैरे तोडण्यात आल्या, लाखो रुपयांचे नुकसान करण्यात आले. पण हे नुकसान झाले कोणाचे ? कोर्ट कचेऱ्या कोणाच्या पैशातून बांधण्यात आल्या होत्या ? लोकांच्या पैशातूनच ना. रेल्वे रुळ कोणाच्या पैशातून बांधण्यात आले होते ? लोकांच्या पैशातूनच. हे खरे आहे की नाही ? मग कॉंग्रेसने नुकसान केले ते जनतेचे नुकसान केले की ब्रिटिश सरकारचे ? जे काही नुकसान करण्यात आले त्यापासून इंग्रज माणसाचे काही नुकसान झाले नाही. जे काही नुकसान झाले ते या देशातील गरीब जनतेचे झाले.

कॉंग्रेसचे जे लोक तुरुंगात होते त्यांची काय अवस्था होती ? त्यांची तुरुंगात चांगली बडदास्त होती. जवाहर वगैरे प्रभृतींना अहमदनगरच्या तुरुंगात ठेवण्यात आले होते. त्यांच्यासाठी दिल्लीहून उत्तम प्रतीचे तांदूळ मागविण्यात

येत होते. गांधींची तरी काही कमी व्यवस्था नव्हती. एवढेही करून शेवटी मला सोडा म्हणून गांधींनी व्हाईसरॉयला पत्र लिहिले. परंतु व्हाईसरॉय काहीच ऐकावयास तयार होईना. निदान मला भेटावयास तरी बोलवा असे गांधींनी पत्र लिहिले, त्याचा देखील काहीच उपयोग झाला नाही. शेवटी गांधींनी कसे तरी करून आपली सुटका करून घेतली.

आता १९४५ साली सिमला कॉन्फरन्सचे काय झाले याचा विचार करू. असेंब्लीमध्ये असा नियम होता की, व्हाईसरॉय एकदा ठराव वाचून दाखवित असता सर्वांनी उठून उभे राहावयाचे. नियमाप्रमाणे आम्ही सर्वजण उठून उभे राहत असू. कॉंग्रेसचे लोक मात्र तसेच बसून राहत असत. त्यांना उठून उभे राहण्याची लाज वाटत असे. त्यांचे म्हणणे असे की, आम्ही व्हाईसरॉयला मानीत नाही. तेव्हा त्यांच्यापुढे आम्ही उभे राहणार नाही. परंतु सिमला कॉन्फरन्सच्या वेळी आपणास काय दिसले ? व्हाईसरॉयनी जाहीर केल्याबरोबर कॉंग्रेसचे सर्व पुढारी नाक मुठीत धरून सिमल्याला पळत सुटले. कोणी गाडीतून गेला, कोणी घोड्यावरून गेला, तर कोणी गाढवावरून गेला. सिमल्याला त्यांनी गर्दी केली. सिमल्याला त्यांची एवढी गर्दी झाली की, त्यांनी सिमल्याची अगदी घाण करून टाकली. जे लोक व्हाईसरॉयला मानीत नव्हते तेच लोक व्हाईसरॉयच्या घराजवळ धरणे धरून बसले.

असे हे गांधींचे राजकारण आहे. हे पराजिताचे राजकारण आहे. कॉंग्रेसचे लोक ही राजकारणात नापास झालेली पोरे आहेत. आपण नापास झालेल्या पोराला नोकरीवर घेत नाही. कारण तो लायक नसतो. म्हणून कॉंग्रेसचे पुढारी राजकारणात अगदी नालायक आहेत.

कॉंग्रेसच्या लोकांजवळ इतका पैसा आहे की, त्या पैशाच्या जोरावर वाटेल ते करता येईल. परंतु या पैशाचा काय उपयोग झाला ? हिंदू लोकांनी जो एवढा स्वार्थत्याग केला त्याचा काय उपयोग झाला ? जनतेने जो एवढा गांधींच्या म्हणण्याप्रमाणे स्वार्थत्याग केला त्याचा उपयोग काय झाला ? ज्या माणसाला एवढी परिस्थिती अनुकूल असता काही करता येत नाही तो पुढारीपणाला नालायक असला पाहिजे.

आता मी दुसरी बाजू सांगतो. या देशात अशा असंख्य जाती आहेत की, ज्यांच्यात संघटना नाही. त्यांच्यात अनेक भेदाभेद आहेत. कारण ते अनेक धर्मांचे व अनेक जातींचे आहेत. सर्व लोक आपापसातले भेद विसरून एकमेकावर विश्वास ठेवून, एकमुखाने जर काही मागू लागले तरच त्यांचा थोडा

बहुत ब्रिटिश सरकार विचार करील आणि आपण जर जोरात मागणी केली तर इंग्रज सरकार हा देश सोडून जाईल. काँग्रेस ज्यावेळी स्थापण्यात आली, त्यावेळी तिच्या चालकांना आपल्या सर्वांच्या ऐक्याचे महत्त्व चांगले पटले होते. म्हणून आपणाला आढळून येईल की, काँग्रेसमध्ये सर्व धर्मांचे लोक होते. त्यावेळी हिंदू, मुसलमान, खिस्ती, पारसी वगैरे जातीचे लोक काँग्रेसचे अध्यक्ष झालेले आपणास आढळून येतात. म्हणून सर्व लोकांना काँग्रेसबद्दल आपुलकी वाटत होती.

१९२० पासून काँग्रेसची सूत्रे गांधींच्या हाती गेली. त्यावेळेपासून मौलाना आझादशिवाय काँग्रेसचे सर्व सूत्रधार हिंदू आहेत. वर्किंग कमिटीवर फक्त दोनच मुसलमान आहेत. हा देश आता अशा बिकट परिस्थितीत आहे की, जातीय भेदाला आता राजकीय महत्त्व प्राप्त झाले आहे. जातीजातींमध्ये जे भेद होते त्यास राजकारणाची जोड मिळाली आहे. मुसलमान आता केवळ धर्मानेच दूर राहिले नाहीत, आता ते राजकारणात देखील शत्रु झाले आहेत. कारण काँग्रेसने अल्पसंख्यांकांसाठी काही केले नाही. याची जाणीव झाल्यामुळेच मुसलमान भराभर काँग्रेस सोडून जात आहेत. यावरून काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या पात्रतेची जाणीव होते ! राष्ट्रीय Nationalist मुसलमान आता काँग्रेसमधून फुटून निघून देशाची विभागणी करू पाहात आहेत. काँग्रेसला जन्म देणाऱ्यांच्या मनात देशाची शकले करण्याची कल्पना स्वप्नात तरी आली असेल काय ? पण असे हे का झाले ? हे राजकारण वेड्या लोकांचे आहे की शहाण्या लोकांचे आहे ? जातीवादाचा हा भस्मासूर का भेडसावित आहे ? हा परिणाम कशाचा ? थोडा विचार केला तर हा परिणाम हिंदुंच्या राजकारणाचा आहे हे चांगले दिसून येईल. मुंबईला जी ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक झाली तिच्याकडे पाहिले तर हिंदुंच्या राजकारणाचे मला आश्चर्य वाटते.

मी तुम्हाला वारंवार सांगत आलो आहे की, आपल्याला राजकीय सत्ता मिळाल्याशिवाय आपला सामाजिक व धार्मिक उद्धार होणे अशक्य आहे. आपणास समता आणि स्वातंत्र्य मिळवावयाचे असेल, आपणास इज्जतीने जगावयाचे असेल, आपली प्रगती करून घ्यावयाची असेल तर या देशाला मिळणाऱ्या सत्तेमध्ये आपण भागिदार झालेच पाहिजे. राजकीय सत्ता हे एक प्रभावी शस्त्र आहे. या शस्त्रास आपण देवाप्रमाणे मानले पाहिजे. आपण या शस्त्राची पूजा करावयास पाहिजे, म्हणजे या शस्त्राचा उपयोग आपणास आपल्या

शत्रूवर करता येईल. हे शस्त्र मिळविणे आगामी निवडणुकीवर अवलंबून आहे. म्हणून भावी निवडणूक म्हणजे आपल्या जीवन मरणाचा संग्राम आहे. या निवडणुकीवर आपल्या जीवनाचा आणि मरणाचा प्रश्न अवलंबून आहे. या जीवन मरणाच्या दारूण संग्रामात आपण विजयी-यशस्वी झालेच पाहिजे. हा लढा जिंकण्यासाठी आपण जय्यत तयारी केली पाहिजे. या जय्यत तयारीस आपण आतापासूनच लागले पाहिजे.

सध्या हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहण्यासाठी एकंदर १५ मंत्री आहेत. मीही त्या १५ पैकी एक आहे. हे आपणाला माहीत आहेना ? मी व्हाईसरॉयच्या कार्यकारी मंडळामध्ये फक्त दोनच वर्षे आहे. परंतु या दोन वर्षात मी आपणासाठी काय केले ? अस्पृश्य समाजाच्या शिक्षणाची जबाबदारी जी कधीही आपल्यावर घेतली नव्हती ती मध्यवर्ती सरकारने घेतली. बनारस हिंदू युनिव्हर्सिटी बांधण्यासाठी हिंदुस्थान सरकारने २० लाख रुपये दिले. आता देखील त्या युनिव्हर्सिटीचे जवळ जवळ ४१ हजार रुपयाचे बील सरकारजवळ येऊन पडले आहे. अलिगड युनिव्हर्सिटी बांधण्यासाठी मुसलमानांना ?० लाख रुपये देण्यात आले होते आणि प्रत्येक वर्षी ३ लाख रुपये अलिगड युनिव्हर्सिटीसाठी मध्यवर्ती सरकार देत असते. अस्पृश्य समाजाच्या शिक्षणाची जबाबदारी आपल्यावर आहे याची कल्पना सरकारला स्वप्नात देखील झाली नाही. मी गेल्यानंतर अस्पृश्य समाजाच्या शिक्षणासाठी ३ लाख रुपये मंजूर करून घेतले. या तीन लाख रुपयांमधून प्रत्येक वर्षी ३०० विद्यार्थ्यांना शिक्षण घेता येईल. यावेळी ३० विद्यार्थी उच्च शिक्षण घेण्यासाठी परदेशात जाणार आहेत. त्याचप्रमाणे दरवर्षाला १५ विद्यार्थी उच्च शिक्षणासाठी परदेशात जावू शकतील. आपल्यापैकी असा कोणी विलायतेला गेला आहे काय ? साहेबाचा बुटलेर म्हणून कोणी कदाचित गेला असेल. यावेळी जाणाऱ्या ३० विद्यार्थ्यांमध्ये एक भंगी, एक मांग आणि किती तरी चांभार आहेत. मला हेच सांगावयाचे आहे की, या योजनेचा फायदा अस्पृश्यांतील प्रत्येक जातीला करून घेता येईल.

प्रॉव्हीन्शियल सर्व्हिसेसमध्ये आणि सेन्ट्रल सर्व्हिसेसमध्ये २५ टक्के मुसलमानांसाठी जागा राखून ठेवलेल्या आहेत. त्याचप्रमाणे ख्रिश्चन, शिख व अँग्लो इंडियन यांच्यासाठी ठराविक नोकऱ्याचे प्रमाण राखून ठेवण्यात आले आहे. परंतु अस्पृश्य समाजाकडे कोणी लक्ष दिले आहे का ? आपल्यासाठी काही सोय करण्यात आली होती काय ? आपणाला एक तुकडा देखील दिला गेला नव्हता. मी मात्र तशी सोय करून घेतली आहे. अस्पृश्य समाजासाठी

शेकडा आठ पूर्णांक एक तृतीआंश इतके प्रमाण नोकऱ्यांमध्ये राखून ठेवले आहे. मी गेल्यापासून आपले पुष्कळ लोक मोठ्या हुद्यावर चढले आहेत. आपल्यापैकी एक डेप्युटी सेक्रेटरी टू दी गव्हर्नमेन्ट ऑफ इंडिया आहे. दुसरा एक अन्डर सेक्रेटरी आहे. तीन एक्झीक्युटिव्ह इंजिनियर आहेत. सिमल्याला माझ्या डिपार्टमेन्टचा एक भाग आहे तेथे एकंदर २८ क्लार्क आहेत. त्यापैकी १८ भंगी आहेत.

राजकीय सत्तेच्या जोरावर मनुष्य काय करू शकतो याचे हे एक चांगले उदाहरण आहे. मी हे माझा बडेजाव अगर गौरव करण्यासाठी सांगत नाही. तर आपल्या हाती राजकीय सत्ता आली तर आपण काय करू शकू हे दाखविण्यासाठीच मी हे सांगत आहे. माझ्या जोडीला आणखी एखादा आपल्यापैकी मंत्री असता तर आम्ही दोघांनी पुष्कळच केले असते. मी जर प्रत्येक डिपार्टमेन्टमध्ये फक्त पाच पाच वर्षे राहिलो तर आपल्या लोकांचे पुष्कळ कल्याण करता येईल. राजकीय सत्तेशिवाय आपणास काही करता येणार नाही म्हणून आपण राजकीय सत्तेसाठी झगडले पाहिजे. Politics should be the life-blood of the Scheduled Castes. आपला जो नाश झाला आहे, आपण आज हजारो वर्षे खितपत पडलो आहो त्याचे कारण आपणास राजकीय सत्ता नव्हती. ही सत्ता आपण मिळविली पाहिजे. राजकीय सत्ता ही एक अजब शक्ती आहे, तिचा उपयोग आपण आपल्या शत्रुवर केला पाहिजे.

निवडणुकीसाठी एक पार्लमेंटरी बोर्ड स्थापण्यात आला आहे. या पार्लमेंटरी बोर्डावर पाच माणसे राहतील. त्यांनी उमेदवार निवडावयाचे आहेत. त्या बोर्डाला काही नियम घालून दिले आहेत. त्या नियमाप्रमाणे निवडणुकीसाठी उमेदवार निवडण्यात येतील. आपण अशाच उमेदवारांना निवडून दिले पाहिजे. ज्याला वाटत असेल की, असेंब्लीमध्ये तो एकटाच वाटेल ते करू शकेल, तर तो त्याचा मुर्खपणा आहे. जे काही करू शकेल तर तो पक्षच करू शकेल. गेल्यावेळी काँग्रेसला फक्त स्वतंत्र मजूर पक्षाचे भय होते. कारण त्यांना माहित होते की, हजारो रुपये जरी दिले तरी आपला सभासद ते घेणार नाही.

पार्लमेंटरी बोर्ड जे काही करील आणि जी माणसे निवडली जातील त्याच माणसाला आपण निवडले पाहिजे. तुम्ही सर्वांनी शपथ घेतली पाहिजे की, आपण ही निवडणूक जिंकूच म्हणून.

माझे असे ठाम मत आहे की, विद्यार्थी दशेत विद्यार्थी-विद्यार्थीनींनी राजकारणात भाग घेता कामा नये. कारण अभ्यास सोडून ते जर राजकारणात पडले तर त्यांच्या आयुष्याचे नुकसान होते. परंतु यावेळी मात्र तो नियम ढिला केला पाहिजे. त्यांनी आपल्या अडाणी जनतेला मतदारांच्या यादीत नाव घालावयास मदत केली पाहिजे. त्यांना निवडणुकीची सर्व माहिती दिली पाहिजे.

हे इलेक्शन हिंदुस्थानच्या इतिहासात स्मरणीय होणार आहे. कारण घटनेचा नवीन बंधारा तयार करावयाचा आहे. या इलेक्शननंतर जी घटना समिती निर्माण होणार आहे, ती जे काही घटनेचे बंधारे तयार करणार आहे, ते बंधारे पुष्कळ दिवस टिकणार आहेत. त्या भावी घटनेत आपला भाग काय राहील याकडे आपण सर्वांनी लक्ष दिले पाहिजे. आपण जे निरनिराळे ठराव पास केलेले आहेत त्यामध्ये आपली योजना आपण जाहीर केली आहे. हे इलेक्शन म्हणजे खरोखरच आपल्या जीविताचा किंवा मरणाचा प्रश्न आहे. आपण जर यावेळी जागृत राहिलो नाही तर आपला नाश झाल्याशिवाय राहणार नाही. पुढे हे जे 'स्वराज्य' होणार आहे ते आपल्यावर जुलमी राज्य होणार आहे.

आपणाला योग्यवेळी मार्ग दाखविण्याचे मी माझे कर्तव्य बजाविले आहे. तुम्ही तुमच्या कर्तव्यास कितपत जागता हेच मला पाहावयाचे आहे. तुम्ही आपले कर्तव्य योग्य तऱ्हेने पार पाडाल याची मला खात्री आहे.

डॉ. बाबासाहेबांच्या भाषणानंतर पुष्पहारादी समर्पण समारंभ होऊन सभा विसर्जित झाली.

या तीन दिवसांच्या वरील कार्यक्रमाशिवाय अखिल भारतीय समता सैनिक दलाच्या वर्किंग कमिटीची सभा अहिल्याश्रमात ता. २-१०-४५ रोजी श्री. जे. एच. सुबय्या यांचे अध्यक्षतेखाली होऊन मागील कामकाजाचा आढावा घेतला गेला व दलाच्या घटनेत काही दुरुस्ती करण्यात आली. तसेच अ. भा. दलाचे शिक्षण केंद्र नागपूर येथे उघडण्याचे ठरविण्यात येऊन त्याच्या व्यवस्थेची जबाबदारी जनरल सेक्रेटरी आर. आर. पाटील (नागपूर) यांचेवर सोपविण्यात आली व सभेचे काम संपविण्यात आले. ता. ४-१०-४५ रोजी पुणे येथील समता सैनिक दलाच्या अजिंक्य पथकास रा. ब. शिवराज यांनी श्री. पी. एन. राजभोज व श्री. आर. डी. भंडारे यांचे समवेत भेट दिली. सदर प्रसंगी दलाच्या पथकातर्फे रा. ब. शिवराज यांचा यथोचित सत्कार करण्यात आला.

अशाप्रकारे वर्किंग कमिटीच्या बैठकीच्या अनुषंगाने अनेक कार्यक्रम पार पाडले गेल्यामुळे तिनही दिवस मोठ्या आनंदाचे व उत्साहाचे गेले.

या तिनही दिवशी स्थानिक फेडरेशनतर्फे व कार्यकर्त्यांतर्फे ने. ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर व वर्किंग कमिटीचे सभासद यांची उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवली गेली होती.

शे. का. फेडरेशनच्या या वर्किंग कमिटीच्या बैठकीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विशाल मार्गदर्शिकत्वाखाली अस्पृश्य समाजाचे राजकारण उंच पातळीवर नेऊन ठेवले आहे, यात कसलीही शंका नाही.

वर्किंग कमिटीने केलेल्या मार्गदर्शनाने, अस्पृश्य वर्ग, आपल्या पोलादी संघटनेने, येत्या निवडणुकीत प्रतिपक्षांचा धुव्वा उडवून संपूर्णपणे यशस्वी होणारच होणार ही सर्वांची खात्री झालेली आहे.

अशाप्रकारे सर्व कार्य आटोपल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर ता. ४-१०-४५ रोजी रात्रीच्या गाडीने मुंबईस रवाना झाले. रा. ब. शिवराज मद्रासकडे व वर्किंग कमिटीचे इतर सभासद आपापल्या प्रांताकडे रवाना झाले.

शे. का. फेडरेशनच्या वर्किंग कमिटीची ही बैठक हिंदी राजकारणाच्या इतिहासात जशी महत्त्वाची ठरेल त्याचप्रमाणे पुणेकर अस्पृश्यांच्या चिरंतन स्मरणात राहील यात कसलीच शंका नाही.



## २२३

# मजुरांच्या सुधारणेसाठी निधी उभारण्यास धनिकांनी विरोध करू नये

नवी दिल्ली येथे तारीख २७ नोव्हेंबर १९४५ रोजी सातवी हिंदी मजूर परिषद भरली होती. या परिषदेचे अध्यक्षस्थान नेक ना. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्वीकारले होते. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या भाषणात, सरकारची मजूरविषयक कर्तव्ये कोणती याचे विवरण करून, मजुरांच्या राहाणीचे मान वाढविण्यासंबंधी सुस्पष्ट असे निवेदन केले. मजुरांच्या प्रश्नांविषयी रॉयल कमिशनने केलेल्या शिफारसी अंमलात आणणे आणि आंतरराष्ट्रीय कामगार संघटनेच्या कामगारांना मान्यता देण्याच्या बाबतीत हिंदुस्थान सरकारने कोणत्या गोष्टी केल्या त्याचा आढावा घेऊन, डॉ. बाबासाहेब म्हणाले,

रॉयल कमिशनने केलेल्या दहा महत्त्वाच्या शिफारशींना अद्यापि मान्यता मिळाली नाही आणि आंतरराष्ट्रीय मजूर संघटनेच्या ६३ करारांपैकी ४९ करारांना अद्यापि मान्यता मिळालेली नाही. त्यांना मान्यता देण्यास सरकार नाखूष आहे असे नव्हे. परंतु करारात कोणताही फरक न करता त्यांना मान्यता मिळाली पाहिजे अशी अट असल्यामुळे हा विलंब होत आहे. कामगारांच्या राहाणीचे मान वाढविण्यासाठी निधी उभारण्यास धनिकांनी विरोध करू नये असे मला वाटते. युद्धखर्च भागविण्यासाठी कर भरण्यास धनिकांना अवघड वाटत नाही, मग मजुरांच्या सुखसोयीसाठी निधी उभारण्यास धनिक वर्गाकडून विरोध होण्याचे कारण नाही.

युद्ध संपून शांतता प्रस्थापित झाली आहे. या संक्रमणकाळात मजुरांची परिस्थिती सुधारण्यासाठी काही सुधारणा घडवून आणणे आवश्यक आहे. कामाचे तास कमी करणे, कमीतकमी ठराविक वेतन करण्याच्या बाबतीत कायदे करणे आणि मजुरांच्या संस्थांना मान्यता देणे इत्यादि सुधारणा झाल्या पाहिजेत असे माझे म्हणणे आहें, परंतु ह्या सुधारणा अंमलात आणताना दिरंगाई होऊ न देण्याचा मी निर्धार केला आहे. मजुरांचे कायदे करण्यासाठी ब्रिटिशांना शंभर वर्षे लागली म्हणून आम्हीही शंभर वर्षे खर्च करावीत असा युक्तिवाद केला तर तो समर्थनीय ठरणार नाही.

---

जनता : १ डिसेंबर १९४५.

युद्धकार्यासाठी जे कर उभारण्यात आले त्यांचा विनियोग सार्वजनिक हितासाठी करण्यात आला असता तर त्यातून किती निराश्रित लोकांना जागा देता आली असती, किती अर्धनग्नांना कपडे देता आले असते, किती भूकेल्या स्त्री-पुरुषांना अन्न देता आले असते, किती निरक्षरांना साक्षर करता आले असते आणि किती रोग्यांना निरोगी करता आले असते असे प्रश्न कामगार सर्व मुत्सद्यांना विचारू शकेल.



# मला केवळ स्वराज्य नको तर संपूर्ण स्वराज्य हवे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे मुंबई प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या अधिवेशनाला हजर राहाण्यासाठी अहमदाबाद येथे शुक्रवार, तारीख ३० नोव्हेंबर १९४५ रोजी सकाळी आले. आगाऊ ठरल्याप्रमाणे त्याच दिवशी दुपारी त्यांना अहमदाबाद म्युनिसीपालिटीतर्फे म्यु. गांधी हॉलमध्ये मानपत्र देण्यात आले. ते येणेप्रमाणे–

**अहमदाबाद म्युनिसीपालिटीने डॉ. बाबासाहेबांना दिलेले मानपत्र**

डॉ. बी. आर. आंबेडकर, एम्. ए., पीएच्. डी., डी. एससी.,

बार-ॲट-लॉ, यांस,

आमच्या या ऐतिहासिक शहरी, अहमदाबादला, आज आपले पाय लागले आहेत हे आम्ही आमचे सद्भाग्य समजून आम्ही आपले हार्दिक स्वागत करतो. देशातील प्रमुख पुढाऱ्यांपैकी आपण एक आहात. सहा कोटी अस्पृश्यांच्या अंतःकरणातील आपले स्थान अढळ आहे. खोल गर्तेत रुतलेल्या व पायदळी तुडविले गेलेल्यांच्या उद्धारासाठी स्वतःचे आयुष्य वाहून हिन्दुस्थानातील एका महत्त्वाच्या घटकाचे पुढारीपण आपण जिंकले आहे.

जे लोक अस्पृश्यांच्या सावलीचाही विशाद मानीत असत अशा लोकांच्या हातात सर्व शैक्षणिक संस्था असताही आपण या परिस्थितीतही सर्व प्रकारच्या आपत्तींना तोंड देऊन असामान्य असे शिक्षण संपादन केलेत. कोट्यावधी अस्पृश्यांना शतकानुशतके हीन-दीन-परिस्थितीत सक्तीने डांबून ठेवणाऱ्या निंद्य-बुरसटलेल्या विचारसरणीवर प्रखर प्रहार करून अस्पृश्योद्धाराचे दरवाजे सताड उघडे करण्याचे अत्यंत बिकट असे कार्य आपल्या असामान्य बुद्धिमत्तेच्या जोरावर अचाट धीरोदात्ततेने आपणच करू शकलात. आपल्या भगिरथ प्रयत्नाने अस्पृश्य समाजाची शैक्षणिक व इतर प्रगती करून, सामाजिक समता व लोकशाही प्रस्थापित करण्यात आपण पुष्कळच कार्य केलेत. आपल्या देशातील सामाजिक समतेच्या चळवळीचे आपणच खरे दिग्दर्शक आहात.

या देशातील चाळीस कोटी लोकांचे हितसंबंध गोविल्या गेलेल्या हिंदी जनतेचे भवितव्य ठरविणारी हिंदुस्थानची भावी घटना तयार करताना सहा कोटी अस्पृश्य जनतेचा विचार केला जावून त्यांच्या संमतीशिवाय ही घटना अस्तित्वात येऊ

जनता : १ आणि ८ डिसेंबर १९४५.

शकणार नाही असे सरकारला जाहीर करणे भाग पडले त्याचे कारण आपल्या मार्गदर्शनाखालील अस्पृश्यांच्या चळवळीचे अचाट सामर्थ्य सरकारने पुरते जाणले आहे. हिंदी राजकारणात अस्पृश्यांना प्राप्त झालेल्या या महत्त्वाच्या नि मानाच्या स्थानाचे यश केवळ आपल्यालाच आहे.

हिंदभूच्या मोजक्या सुपुत्रांपैकी, उच्च विचारसरणी, प्रभावी लेखन, बिनतोड नेतृत्व या आपल्या विविध अशा अमूल्य गुणांमुळे हा हिंद देश आपल्याबद्दल जाज्वल्य अभिमान बाळगीत आहे.

बहुसंख्यांकांच्या जुलमी पकडीतून, असहाय्य अशा अल्पसंख्यांकांची, विधायक सूचना करून राजकारणाच्या दीर्घ व्यासंगामुळे अचूक मार्गदर्शन आणि राजकारणातील कोंडी फोडण्याचे सामर्थ्य व प्रस्थापित करण्याची तळमळ यांच्या जोरावर आपण सोडवणूक केलीत. थोडक्यात ' आपण अस्पृश्यांचे उद्धारक आहात ' आम्ही दुर्दैवी हिंदवासीयांना प्रगतीपथावर नेण्यासाठी आपण चिरायु व्हावेत हीच आमची इच्छा आहे.

आम्ही,<br>
चेअरमन, व्हाइस चेअरमन<br>
आणि म्युनिसीपल कमिटीचे<br>
सभासद, अहमदाबाद.

अहमदाबाद, ३०-११-४५.

सदर मानपत्राला उत्तर देताना डॉ. बाबासाहेब आंबडेकर म्हणाले ,

'' मी राहात असलेल्या मुंबई शहराच्या म्युनिसीपालिटीने मला मानपत्र देण्यासंबंधीचा ठराव विचारात घेण्याचेही नाकारले, त्याबद्दल मी त्या म्युनिसीपालिटीला मुळीच दोष देत नाही, कारण माझ्या सेवेचे चीज केले जावे या गोष्टीला मी माझ्या आयुष्यात कधीच महत्त्व दिलेले नाही. परंतु तुमच्या म्युनिसीपालिटीने दिलेली ही वागणूक व मी ज्या शहरी राहातो त्या म्युनिसीपालिटीची वागणूक यातील फरक मात्र लक्षात घेण्याजोगा आहे.

या देशामध्ये कायदा व सुव्यवस्था याबद्दल मुळीच आस्था दाखविण्यात येत नाही. १९४२ च्या चळवळीच्यावेळी राज्यकारभाराचा गाडा हाकण्यात किंबहुना देशात शांतता राखण्यासाठी ज्यांनी मदत केली ते काही भावनाप्रधान लोकांना आवडले नाही. परंतु १९४२ च्या चळवळीमध्ये कायद्याला मान देऊन ज्यांनी सुव्यवस्था राखली त्यांचे ते करणे योग्य होते इतकेच नव्हे तर त्यांनी त्याप्रकारे वागून देशाचे हितच केले हे कबूल करणे जरूर आहे.

देशातील राजकारणात बिघाड होऊन कायदा व सुव्यवस्थेला धोका उत्पन्न झाल्यास देशातील अराजकतेचे निर्मूलन करण्यासाठी प्रयत्न करणे राजकारणी पुरुषांचे कर्तव्य ठरते. ते कर्तव्य जर त्यांनी केले नाही तर राजकारणात वावरण्यास ते नालायक ठरतात. १९४२ च्या ऑगस्ट चळवळीनंतर देशात जी अराजकता माजली त्यावेळी देशात सुव्यवस्था ठेवण्यासाठी आम्ही सहकार्य केले नसते तर जपान किंवा जर्मनी यांच्याकडून हिंदुस्थानची दुर्दशा झाली असती. हिंदुस्थानला या दुर्दशेपासून आम्ही वाचविले ही देशसेवा नव्हे काय ?

देशाला स्वराज्य नको असे कोणीतरी, कधीतरी म्हणू शकेल काय ? मला संपूर्ण स्वराज्य हवे. काँग्रेसच्या पन्नास वर्षाच्या काळात कधीही निर्माण झाली नव्हती अशी परिस्थिती आज निर्माण झाली आहे.

काँग्रेसच्या राजकीय पुढाऱ्यांवरचा मुसलमानांचा विश्वास अजिबात उडाला आहे. सहा कोटी अस्पृश्यांचा काँग्रेसवर तर विश्वासच नाही. काँग्रेसचे पुढारी जर मुत्सद्देगिरीने वागले असते तर हे असे झाले नसते. बहुसंख्य हिंदुंनी या गोष्टीचा जरूर विचार करावा.

स्वराज्य आपल्या दृष्टीपथात आहे. ब्रिटिश सरकार आता फार काळ राहू शकणार नाही. परंतु त्याला आजच आपण घालवूही शकत नाही याचे कारण हे की आपल्यामध्ये (हिंदी लोकात) एकी नाही. आज ज्या ठिकाणी माझा सन्मान होत आहे तो काँग्रेसचा बालेकिल्ला आहे हे मला ठाऊक असताही मी माझी मते स्पष्टपणे बोलून दाखविली याचे कारण हेच आहे की, ही माझी मते काँग्रेसच्या हायकमांडपर्यंत पोहोचली जावीत.



२२५

# निवडणुकीच्या माध्यमातूनच राजकीय सत्ता हस्तगत करता येईल

गुजरातेतील इतिहास प्रसिद्ध अहमदाबाद शहरी गांधी-वल्लभांच्या राज्यात–साबरमतीच्या विस्तीर्ण तिरावर लाल दरवाजानजिक उभारलेल्या भव्य बुद्धनगरात दिनांक २९ व ३० नोव्हेंबर १९४५ रोजी मुंबई प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे प्रथम अधिवेशन अत्यंत उत्साहाने यशस्वीरित्या पार पडले. भारतीय अस्पृश्यांचे महान नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिनांक ३० रोजी या इतिहासप्रसिद्ध अधिवेशनास खास उपस्थित होते. त्यांच्या आगमनाप्रित्यर्थ अहमदाबादेच्या सर्व कामगारांनी गिरण्या बंद पाडून त्यांचे प्रचंड प्रमाणात स्वागत केले, ही गोष्ट अत्यंत अभिमानास्पद व भूषणावह म्हणून उल्लेखनीय होय. पहाटे ५ वाजेपासून अहमदाबाद स्टेशनवर हजारो लोकांचा समुदाय त्यांच्या स्वागतासाठी जमला होता. समता सैनिक दलाचे लढाऊ सैनिक या प्रचंड समुदायात शांतता व व्यवस्था राखण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते. अनेक संस्थांच्या व व्यक्तिच्यातर्फे पुष्पहार घालून, त्यांचे स्वागत करण्यात आले. ' डॉ. आंबेडकर जिंदाबाद ' ' आंबेडकर कौन है दलितोंका देव है, ' ' दलित फेडरेशनचा विजय असो ' ' अलग मताधिकार हासील करो ' या गगनभेदी घोषणांनी अहमदाबादचे सारे वातावरण दुमदुमून गेले होते. स्टेशनवर त्यांच्या खास सलूनमध्ये कम्युनिस्ट पार्टी, रॉयीस्ट पार्टी, हिंदू महासभा आदि पक्षांच्या पुढाऱ्यांनी आणि अनेक प्रमुख व्यक्तिंनी त्यांच्या मुलाखती घेतल्यावर सत्कार केला. अहमदाबाद शहराचे वातावरण त्यांच्या आगमनाने अत्यंत उत्साहपूर्ण झालेले दिसत होते. आश्चर्याची नव्हे अभिमानाची गोष्ट ही की, याच दिवशी अहमदाबादेला मुंबईच्या गव्हर्नर साहेबांचे आगमन झाले. लोकांच्या प्रचंड समुदायात एक खादीधारी देशभक्त मान उंचावून डोकावत होता. गर्दीतून मोठ्या मुष्कीलीने धडपडत आलेला एक किसान चौकशी करू लागला. गांधी टोपीवाल्याने जबाब दिला, ' गव्हर्नर साब आवे छे ' ! माझ्या शेजारी उभा असलेला दूरच्या खेड्यातील एक अस्पृश्य तरुण गांधी भक्ताचा धिक्कार करून उत्तरला. ' बापडा कोई अंधाने गूंगा पण जाणे छे के बाबा आंबेडकर आवेला छे', त्याच्या या तिखट उत्तराने शरमिंदा होऊन त्या बनियाने हळूच तेथून पाय काढला. प्रांताध्यक्ष श्री. गायकवाड आणि ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे जनरल सेक्रेटरी श्री. राजभोज यांनी

---

जनता : ८ डिसेंबर १९४५.

दर्शनोत्सुक जनसमुदायास शांततेने परिषदेच्या स्थळी हजर राहण्याची व आपल्या पुढाऱ्याचा संदेश ऐकण्यासाठी प्रचंड संख्येत जमा होण्याची विनंती केल्यावर सर्व लोक शांततेने घरोघर निघून गेले. रात्री जागरण झाले असताही अनेक कार्यक्रम विश्रांती न घेता बाबासाहेबांनी पार पाडले. सकाळपासून संध्याकाळपर्यंत भरगच्च कार्यक्रम आखण्यात आले होते. परंतु वेळेच्या अभावी काही कार्यक्रम साहजिकच रद्द करावे लागले. दुपारी रखिया रोडवरील कामगारांच्या चाळीत भोजनाचा कार्यक्रम ठेवण्यात आला होता. जेवणाचा बेत डॉ. बाबासाहेबांच्या आग्रहावरून डाळ-भात-भाजी असा अगदी साधा होता. त्यांच्या समवेत फेडरेशनचे कार्यकर्ते आणि प्रतिनिधीही उपस्थित होते. भोजनोत्तर गुजरातमधील प्रचलित परिस्थितीसंबंधी अनेक कार्यकर्त्यांनी आपापले विचार मांडले. शेवटी अत्यंत साध्या सोप्या गुजराती भाषेत बाबासाहेबांनी फेडरेशनच्या कार्यासंबंधी व आगामी निवडणुकीसंबंधी बहुमोल अशा विधायक सूचना केल्यानंतर तेथून लगेच ते अहमदाबाद म्युनिसीपालिटीच्या मानपत्र समारंभास गेले. हा समारंभ आटोपून लगेच ते परिषदेसाठी खास उभारलेल्या बुद्ध नगरात प्रविष्ट झाले. त्यांच्या आगमनापूर्वी अनेक गुजराती कवींनी व शाहिरांनी समाज क्रांतीपर गाणी गाऊन श्रोत्यात उत्साह निर्माण केला. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनाबरोबर जयघोष करून लोकांनी सारे वातावरण दणाणून सोडले. स्वागताध्यक्ष श्री. पी. एम. पटनी यांच्या भाषणानंतर टाळयांच्या प्रचंड गजरात व जयघोषात डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाषण करण्यास उभे राहिले. ध्वनीक्षेपकांची व्यवस्था केलेली असल्यामुळे बुद्ध नगराच्या विस्तीर्ण जनसमुदायाने त्यांचे ओजस्वी भाषण अत्यंत शांतपणे आणि भक्तिभावाने श्रवण केले.

डॉ. बाबासाहेब आपल्या भाषणात म्हणाले,

' बंधुंनो आणि भगिनींनो,

अध्यक्षांनी मला गुजरातीत बोलण्याची विनंती केली आहे. हिंदीत बोलणे मला चांगले जमले असते. गुजरातीत मी बोलू शकतो पण हल्ली तिचा थोडासा विसर पडला आहे. तरीपण मी गुजरातीत बोलण्याचा प्रयत्न करीत आहे. आजचा हा प्रचंड जनसमुदाय पाहून मला १९२६ सालची आठवण होते. त्यावेळी मी या शहरात अस्पृश्य विद्यार्थ्यांच्या बोर्डिंगच्या कामकाजासाठी आलो होतो. मला जाणणाऱ्या येथील काही सद्‌गृहस्थांनी माझी भेट घेऊन, मला ' इथे एखादी सभा करून जा ' अशी विनंती केली. त्यावेळी मी त्यांना सांगितले की, ' हे शहर तर काँग्रेसचे माहेरघर आहे. येथील लोक काँग्रेसवादी तर मी काँग्रेसविरोधी म्हणून प्रसिद्ध ! ' परंतु मंडळींचा अतिशय आग्रह पाहून मी

सभेला हजर राहून बोलण्याची संमती दिली. ही सभा येथील एका प्रशस्त हॉलमध्ये भरली होती व सभेच्या अध्यक्षस्थानी आपल्यातीलच एका जुन्या कार्यकर्त्याची योजना करण्यात आली होती. या सभेत मी माझ्या अनुभवाप्रमाणे बोललो. अध्यक्षांनी आपल्या भाषणात मला समज दिली की, ' आम्ही लोक सर्व गांधींचे प्रजाजन आहोत. आम्ही गांधीला सोडू शकत नाही. तुम्ही तसा प्रयत्न केला तर त्याचा परिणाम वाईट होईल. ' हे उद्‌गार मला चांगले आठवतात व त्या सभेला हजर असलेल्या आपल्यापैकी कुणीही सद्‌गृहस्थ हे सत्य असल्याचे सांगू शकेल. वीस वर्षापूर्वीचा हा अनुभव आणि आज येथे जमलेला प्रचंड समुदाय पाहून मला वाटते की, ' सत्य कधीही लोपत नाही, ते कधीतरी प्रगट होतेच होते. ' आज १९४५ साली काँग्रेसचे केंद्र असलेल्या या अहमदाबाद शहरात अस्पृश्य लोक काँग्रेसविरोधी सामना करण्यास सिद्ध झाले आहेत. हेच ते सत्य होय (टाळ्या). आज मी येत्या निवडणुकासंबंधी बोलणार आहे. कोणावर टीका करण्याचा माझा उद्देश नाही. परंतु गेल्या वीस वर्षातील गांधींचे कुटील राजकारण आणि अस्पृश्य विरोधी कारस्थानांचा इतिहास सांगितल्याखेरीज गत्यंतर नाही आणि त्याशिवाय माझ्या म्हणण्याचा मतितार्थ आपल्या ध्यानात येणार नाही आणि म्हणून मला जे काही सांगायचे आहे ते कडवट असले तरी कटु सत्य असल्याचे आपल्या ध्यानात येईल.

गांधी अस्पृश्यांचे उद्धारकर्ते आहेत असे बोलले जाते. मी गेली वीस वर्षे याच गोष्टीचा विचार करीत आहे की, गांधी अस्पृश्यांचा उद्धार कसा करणार ? त्यांची खरोखरच तशी इच्छा आहे काय ? ह्याचा आपण विचार केला पाहिजे. राऊन्ड टेबल परिषदेला आम्ही गेलो, तेव्हा गांधींनी ' अस्पृश्योद्धार होईल तो राजकीय प्रगतीने नव्हे तर सामाजिक सुधारणाद्वाराच होईल, ' अशी घोषणा केली होती. गांधींच्या दृष्टीने ते कितपत खरे आहे हे त्यांचे तेच जाणोत. परंतु राजकीय हक्काखेरीज उन्नती अशक्य आहे असे माझे ठाम मत आहे. (टाळ्या). १९१९ साली गांधींनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला आणि १९२० साली असहकारितेची चळवळ केली. बार्डोलीच्या सत्याग्रहात लाखो रुपये जमवून, इंग्रजांना या देशातून हाकलून देण्याची घोषणा केली. त्यावेळी त्यांनी हिंदू-मुस्लिम ऐक्याशिवाय आणि अस्पृश्यता व जातीभेद नष्ट झाल्याशिवाय स्वराज्य मिळणार नाही, असे जाहीर केले होते. पण जातीभेद व अस्पृश्यता नाहीशी करण्यासाठी त्यांनी काय केले ? अस्पृश्यता निवारण्यासाठी एक मामुली कमिटी नेमून अस्पृश्यांचा उद्धार करण्याचे गांधी व काँग्रेसने ठरविले, पण त्यासाठी काही न करिता या कमिटीने अपुरे काम सोडून दिले आणि ते हिंदुमहासभेकडे सोपविले. इतर कामी लाखो रुपयांचा खर्च केला. पण अस्पृश्यांसाठी ३० हजार रुपयेच खर्च केले. इतके हे कार्य त्यांच्या दृष्टीने

महत्त्वाचे वाटले ! माझ्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ' व्हॉट काँग्रेस अँड गांधी हॅव डन टू दी अनटचेबल्स ' ( What Congress and Gandhi have done to the untouchables) ग्रंथात मी हे सर्व साधार स्पष्ट केले आहे. १९२० ते १९३२ पर्यंत अस्पृश्यता निवारणाच्या वल्गना करण्यापलिकडे त्यांनी काहीच केले नाही. १९३२ साली पुना करार झाला. त्यावेळी अस्पृश्यांच्या स्वतंत्र राजकीय हक्कांविरूद्ध गांधी आणि काँग्रेसने माझ्याशी झगडा केला. हिंदूंपासून अस्पृश्य वर्ग वेगळा झाल्याने, हिंदू निर्बल होवू नयेत म्हणून गांधींनी येरवड्याच्या तुरुंगात प्राणांतिक उपोषण केले आणि या प्रसंगी घडून आलेल्या करारातूनच हरिजन सेवक संघ जन्माला आला. तेव्हापासून आज तेरा वर्षात या संघाने अस्पृश्यांसाठी काय केले ? हा माझा जाहीर सवाल आहे. तुमच्या शिक्षणासाठी त्याने कोणते मोठे कार्य केले ! आमच्या हाती सत्ता असेल तर आम्ही काय करू शकतो याचे उदाहरण म्हणून गेल्या तीन वर्षातील माझी कामगिरी तुम्हा पुढे आहेच ! या तीन वर्षात मी आपल्या मुलांच्या शिक्षणासाठी दरवर्षी तीन लाख रुपये मिळविले. आता पाच लाख रुपये मिळतील. पाचशे विद्यार्थी आज कॉलेज शिक्षण घेत असून तीस विद्यार्थी विलायतेत उच्च शिक्षणासाठी गेले आहेत. तुलना करा आणि ध्यानी आणा, हे कार्य गांधीने वा काँग्रेसने केले नाही. हरिजन सेवक संघाच्या कार्याने आमचा कसा काय उद्धार होईल हेच मला काही कळत नाही ! तीन-चार रुपड्याच्या शिष्यवृत्त्या आणि मंदीरे खुली करणे या तुटपुंज्या गोष्टींचा काय गाजावाजा ! आम्ही अस्पृश्यांना मंदीरे खुली केली असे दाखविले जाते. पण त्याचा परिणाम काय झाला. स्वाभिमानी अस्पृश्य तर या मंदिरांकडे ढुंकूनही पाहात नाहीत ! त्रावणकोर सोडून इतर ठिकाणी कोणती मंदीरे खुली केली ? ज्यात ' कुत्रो अने गधेडो ' जातात अशीच मंदिरे खुली केली ? (हंशा) ज्या सामाजिक सुधारणेचा हे लोक डांगोरा पिटतात त्याची ही तऱ्हा. आता राजकारण पहा. १९३२ साली राऊंड टेबल कॉन्फरन्समध्ये मुसलमान-ख्रिश्चन वगैरे अल्पसंख्यांकांप्रमाणेच अस्पृश्यांना देखील राजकीय हक्क मिळालेच पाहिजेत म्हणून मी जोरदार लढा केला आणि आज काही मूर्ख आणि बदमाष लोक जनतेत असा खोटा प्रचार करतात की, हे राजकीय हक्क गांधींनी मिळविलेत. पण ते साफ खोटे आहे. अस्पृश्यांना सुईच्या अग्राइतकेही राजकीय हक्क मिळू नयेत म्हणून मुसलमानांशी गुप्त संधान बांधणाऱ्या गांधींनी ते मिळविले नसून मी मिळविले आहेत. (टाळया). जातीय निर्णयाने आपणाला स्वतंत्र मतदार संघ मिळाला होता. त्यामुळे आपण आपला योग्य प्रतिनिधी निवडून देवू शकलो असतोच, पण आपणास त्याखेरीज मिळालेला सार्वत्रिक मताधिकारही गाजवू शकलो असतो. पण गांधींनी प्रायोपवेषनाची धमकी दिली. त्यापूर्वी 'आंबेडकर कोण झाडाचा पाला आहे' असे म्हणणारे

काँग्रेसजन घाबरले व म्हणू लागले 'आंबेडकर कृपा करा आणि गांधी मरतो आहे त्याला वाचवा.' पण माझ्यापुढे गांधींच्या जिवापेक्षाही दहा कोटी अस्पृश्यांच्या कल्याणाचा श्रेष्ठ प्रश्न होता. गांधी काकूळतीस आला आणि म्हणाला 'आंबेडकर माझा जीव तुमच्या हाती आहे.' त्यासाठी मी पुना करार केला. पण गांधीने काय केले. उपकार जाणणे दूरच राहिले. पण गांधीने कृतघ्नपणा केला. अस्पृश्यांचा गळा कापला. तुमच्या राजकीय हक्काला विरोध करणार नाही या वचनाला हरताळ फासून काँग्रेसने आमच्या उमेदवारांना विरोधक म्हणून स्वार्थी व नालायक लोक उभे केले. विचार करा. हे काय झाले. हे मी कशासाठी मिळविले ?

दरेक गावात एकही दिवस असा जात नाही की, आपल्यावर अत्याचार होत नाहीत ! येथील एका नजीकच्या गावची हकीकत ऐकून तुम्हाला भयंकर संताप वाटेल. तेथल्या अस्पृश्य लोकांवर सामाजिक बहिष्कार पुकारला. सतत एकवीस दिवस त्यांना नाही नाही त्या प्रकारे छळल्यानंतर स्पृश्य हिंदुंनी त्यांना धमकी दिली की, तुम्ही 'मेलेला पार्डा उचललाच पाहिजे' नाहीतर त्याबद्दल तुम्ही ५० रुपये दंड द्या. वेठ करून रस्ता दुरुस्त करा. नाहीतर तुम्हाला येथे राहणे मुष्कील करू. दुसरे कविठा गावचे उदाहरण. त्यांच्या झोपड्या उठविल्या. पाण्यात घासलेट टाकले. असे अनेक प्रकारे तेथल्या अस्पृश्य लोकांना छळिले. तेथल्या लोकांनी गांधींकडे आपली गाऱ्हाणी पाठविली. पण गांधीने काय केले. त्यांना गाव सोडून जाण्याचा सल्ला दिला. (शेम-शेम) जुलूम करणारांना शिक्षा करा किंवा त्यांच्यावर कायदेशीर इलाज करा. असा सल्ला गांधीने दिला नाही. ही गांधींची नीती. कायदे मंडळाच्या जागांवर आमचे उमेदवार पाठविण्याचा हेतू, आम्हावर होणारा जोरजुलूम नाहिसा करणे होय. आमचा उमेदवार तेथे जावून आमची गाऱ्हाणी मांडील. आम्हावरच्या जुलूमाची दाद मागेल. आमच्या हितासाठी सतत झगडेल. कायदे मंडळाच्या निवडणुका लढविणे हाच आमचा अंतिम हेतू आहे. काँग्रेस तिकीटावर निवडून आलेल्या हरीजन उमेदवारांना विचारा. दोन वर्षे सात महिन्याच्या तुमच्या कारकिर्दीत तुम्ही अस्पृश्यांसाठी काय केले ? त्यांनी एकतरी सवाल विचारला आहे काय ? तुमच्या हिताचा एकतरी ठराव केला आहे काय ? तर मग ते तिथे कशाला गेले ? व्हॉइसरॉयच्या नव्या घोषणेप्रमाणे मध्यवर्ती सरकारात अस्पृश्यांचा प्रतिनिधी घेण्याचे जाहीर केले गेले. पण गांधीने तुमच्याविरूद्ध तक्रार केली. तुमचा प्रतिनिधी म्हणजे मला तेथून काढण्याचा प्रयत्न केला होता. हा प्रयत्न आजही चालू आहे. काँग्रेसच्या मागे लागलेल्या हरिजनांनी गांधीकडे शिष्टाई केली. गांधीने त्यांना सांगितले की, तुम्हाला काही एक मिळणार नाही. या

सर्व परिस्थितीचा तुम्ही शांत चित्ताने विचार करा. ही वेळ मोठी आणीबाणीची आहे. हजारो वर्षापासून आपणास गुलामगिरीत डांबून ठेवण्यात आले आहे. आजही त्या गुलामगिरीचे चटके आपण सोशीत आहोत. यापुढे या गुलामगिरीचा समूळ उच्छेद करायला तुम्ही तयार व्हा. त्यासाठी आपण राजकीय सामर्थ्य (सत्ता) मिळविले पाहिजे. गांधींच्या ढोंगी हृदय पटलावर विश्वास ठेवू नका. यापुढे आणखी दोन हजार वर्षे गेली तरी परिवर्तन होणार नाही. दुसऱ्यावर विसंबून राहू नका. आपला उद्धार आपणच केला पाहिजे. राजकीय सत्ता मिळाल्याशिवाय आपला उद्धार होणार नाही. ही गोष्ट लक्षात ठेवा. (टाळया) या दृष्टीने आगामी निवडणुकांचे अतिशय महत्त्व आहे. आमचा लढा हा कौरव पांडवांच्या संग्रामासारखा आहे. हिंदू आणि अस्पृश्यातील हा संग्राम अखेरचाच आहे. या निवडणूकातून या देशाचे भवितव्य ठरविणारी घटना समिती निर्माण होणार आहे. तीमध्ये बहूसंख्यांक आणि अल्पसंख्यांक जमाती यांचे संबंध याचा निर्णय लागेल. आपले योग्य आणि लायक उमेदवार गेले पाहिजेत. त्यासाठी प्रचंड प्रयत्न झाला पाहिजे आणि कायदेमंडळातील आपल्या सर्व जागा आपण मिळवल्या पाहिजेत. नवी राजकीय घटना येवू घातली आहे. कॉँग्रेस आणि हिंदू महासभा त्यावेळेस तहनामा करील आणि हे हिंदू लोक हजार वर्षांपूर्वीची परिस्थिती परत आणतील हे लक्षात ठेवा. कॉँग्रेसचे लोक स्वराज्याचा टाहो फोडतात पण माझा त्यांना सवाल आहे. आमच्यावर कोणाचे राज्य होणार ? पाटीदार-धनिक, तालुकदार-भांडवलदार की, वरिष्ठ हिंदुंचे राज्य ? गेली वीस वर्षे मी हेच विचारतो आहे. इतर कुणाहीपेक्षा स्वराज्याची निकड आम्हाला जास्त आहे. आम्हाला आमचे राज्य पाहिजे आहे. तेच आपले स्वराज्य खरे आहे. गेली लढाई सुरु झाली तेव्हा कॉँग्रेसने सरकार बरोबर असहकार पुकारला. लढाई संपल्यावर स्वराज्य देण्याचे वचन द्याल तरच आम्ही मदत करू असे सरकारला कॉँग्रेसने सांगितले. कॉँग्रेसने सरकारला जो सवाल केला तोच माझा कॉँग्रेसला सवाल आहे. न्याय- नीती-सचोटी-प्रामाणिकपणा असेल तर त्यांनी स्वराज्यात अस्पृश्यांना योग्य प्रतिनिधीत्व देऊन शिक्षण, नोकऱ्या आणि सामाजिक प्रगतीचे बाबतीत स्वराज्यात अस्पृश्यांना योग्य सवलती आणि संरक्षण देवू अशी हमी द्यावी. पण ते तसे आश्वासन देत नाहीत. त्याबाबत ते काही बोलत नाहीत. जो बोलत नाही त्याच्या पोटात काही काळेबेरे असते, विष असते. हे लक्षात घ्या. माझ्या गुजराती बांधव हो ! मला महाराष्ट्राची काही एक चिंता वाटत नाही. कारण ते संघटीत आहेत. ते कोणाला फसू शकत नाहीत. संघटनेच्या प्रचंड सामर्थ्यामुळे ते विरोधकांचा धुव्वा उडवितील याची मला खात्री आहे. महाराष्ट्राप्रमाणे गुजरातेत अस्पृश्यांसाठी चार जागा

आहेत. या चारीही जागा फेडरेशन लढविणार, लढविल्याशिवाय आम्ही मागे हटणार नाही. आमच्या विरोधकांजवळ प्रचार–पैसा–माणूसबळ विपूल आहे. हे आम्ही जाणतो. पण त्यांच्या जोरावर विजय मिळविणे हा काही खरा विजय नव्हे. आम्ही मारून मरू पण या संग्रामातून पळणार नाही. हा आमचा निश्चय आहे. तो सफळ करणे आपल्या हाती आहे. काँग्रेसच्या खोट्या प्रचाराला व लाचलुचपतीला ठोकरीने उडवा. तीर्थयात्रा पायी केल्याने पुण्य लाभते असे म्हणतात. त्याचप्रमाणे तुम्ही येत्या निवडणुकीत आपल्या समाजाच्या उद्धाराचे पुण्य संपादण्यासाठी स्वतः पायी जावून, फेडरेशनच्याच उमेदवारांना मते द्या आणि त्यांना निवडून आणा. अखिल भारतीय दलित फेडरेशन हीच आपली एकमेव अशी राजकीय संस्था आहे तिच्यावर विश्वास ठेवा आणि तुम्ही एकत्रित व्हा. शेवटी मला तुम्हाला एकच गोष्ट सांगावयाची आहे. या अहमदाबाद शहरात मील मजदूरांची प्रचंड संख्या आहे. हे मजूर बहुसंख्यांक अस्पृश्य आहेत. कायदे मंडळात या शहरातील कामगारांच्या प्रतिनिधींसाठी दोन जागा आहेत. गेल्यावेळी येथील मजूर महाजन या काँग्रेसवादी संस्थेने अस्पृश्य कामगारांच्या मतावर गुलजारीलाल नंदा व खंडूभाई देसाई यांना कायदेमंडळात निवडून पाठविले. हे आपले प्रतिनिधी होवू शकतात काय ? यावेळी या दोनही जागा आपण लढवून आपलेच उमेदवार निवडून आणू. भांडवलदार व काँग्रेस यांच्या तंत्राने चालणाऱ्या मजूर महाजन या संस्थावर विश्वास ठेवू नका. शेवटी तुम्हा सर्वांस असा इशारा देतो. भविष्य ओळखा, आपली गुलामगिरी नष्ट करावयासाठी आगामी निवडणूका जिंका आणि विजय मिळवा. ( प्रचंड टाळ्या व जयघोष ).



## २२६

# कामगारांना मानवी हक्क जरूरीचे आहेत

गुरुवार तारीख ६ डिसेंबर १९४५ रोजी दुपारी ११ वाजता सेक्रेटरीएट मध्ये लेबर प्रां. कमिशनर्स, सल्लागार व इतर अधिकारी यांच्या परिषदेचे मुंबईत उद्घाटन करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले,

आजपर्यंतची परिस्थिती अशी होती की, मूठभर सत्ताधाऱ्यांच्या हातात सरकारची सूत्रे होती व त्यांच्या अरेरावीपणाच्या कारभाराखाली कामगार वर्ग दडपून जाणे व औद्योगिक धंदेवाल्यांची वाढ होणे या गोष्टी शक्य होत्या, पण तो काळ बदलला असून सत्तेच्या व कायद्याच्या जोरावर कामगार वर्गांना दडपणे शक्य राहिले नाही. सध्याच्या राज्यघटनेप्रमाणे हिंदुस्थान सरकारला काही करता येत नाही. कामगारांचा प्रश्न प्रांतिक सरकारकडे असल्यामुळे पंचाईत पडते. पैसा देऊन कामगार मिळू शकले तरी त्यांना वाटेल तसे वागवता येत नाही. कामगार हा मनुष्य आहे व मानवाचे हक्क जे आहेत ते कामगाराला असणे जरुरीचे आहे. लढाया संपल्या असल्या तरी भांडवलवाले व कामगार यांच्यातील लढा काही कमी महत्त्वाचा नाही. सध्या हिंदुस्थान सरकारपुढे तीन मार्ग आहेत. तडजोडीचा, कामगार वेतन निश्चित करण्याचा व कामगार व मालक यांच्यातील संबंध निश्चित ठरविण्याचा या परिषदेत विचार केला जाणे जरूर आहे.



---

जनता : १५ डिसेंबर १९४५.

## २२७

# शिक्षणाशिवाय मान्याच्या जागा काबीज करता येणार नाहीत

मुंबई इलाखा शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष श्री. भा. कृ. गायकवाड यांनी तारीख १ व ८ डिसेंबर १९४५ च्या 'जनते' त प्रसिद्ध केले की, आपल्या समाजाचे एकमेव पुढारी नेक नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर, एम. ए., पीएच.डी., डी. एससी., बार-ॲट-लॉ. हिंदुस्थान सरकारचे लेबर मेंबर (मजूर मंत्री), यांना कामाच्या व्यापामुळे नाशिक, अहमदनगर, पश्चिम खानदेश व पूर्व खानदेश या दरेक जिल्ह्यास भेट देणे अशक्य झाल्याने या चार जिल्ह्यांच्या विद्यमाने रविवार तारीख ९ डिसेंबर १९४५ रोजी सायंकाळी ४ वाजता मनमाड सारख्या मध्यवर्ती ठिकाणी सभा घेण्यात येत आहे. ते 'अस्पृश्य मानलेल्या समाजाचे आजचे कर्तव्य' या विषयावर जाहीर व्याख्यान देणार आहेत. अशा या सुवर्ण संधीचा फायदा सर्व बंधु-भगिनींनी हजर राहून अवश्य घ्यावा. असे आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणे मनमाड येथे नाशिक, अहमदनगर, पश्चिम खानदेश व पूर्व खानदेश या जिल्ह्यांच्या विद्यमाने रविवार ता. ९ डिसेंबर १९४५ रोजी मनमाड येथे प्रचंड सभा झाली.

या सभेसाठी मुंबईहून डॉ. बाबासाहेब आंबेडकर रविवारी सकाळच्या गाडीने निघाले होते.

महाराष्ट्रातील अस्पृश्यांच्या या बालेकिल्ल्याला जवळ जवळ सहा-सात वर्षांच्या कालावधीनंतर डॉ. बाबासाहेब भेट देणार होते. अस्पृश्य जनता आपल्या या वंदनीय पुढाऱ्याच्या दर्शनासाठी आतूर झालेली होती. बऱ्याच लांबलांबच्या भागातून लोकांच्या झुंडीच्या झुंडी मनमाडकडे कूच करीत असताना दिसत होत्या. उन्हा-तान्हातून, काटे-कणेऱ्यातून लोक मार्ग काढीत होते. पाठीशी शिदोऱ्या बांधून, विजय मार्गावरील अस्पृश्यांच्या चळवळीचा जयघोष करीत फार दिवसातून आज आमचा मोहरा पुन्हा आम्हाला आमच्या भागात दिसणार, ही जाणीव उराशी बाळगून या चार जिल्ह्यातून अस्पृश्य जनता आनंदोत्सुक्याने मनमाड येथे गोळा झाली होती. अगदी प्रचंड संख्येत जवळ जवळ पाऊण लाखांचा अस्पृश्यांचा जमाव जमला होता.

दुपारी बरोबर सव्वा दोन वाजता डॉ. बाबासाहेबांची गाडी स्टेशनात आली. निनाद, जयघोष, गगनभेदी घोषणांनी सारे स्टेशन हादरत असल्याचा भास होत होता. डॉ. बाबासाहेबांचे कंपार्टमेंट पुष्पहारांनी भरगच्च दिसत होते.

---

जनता : १५ डिसेंबर १९४५.

चौकशीअंती कळले की, मनमाडला येईपर्यंत ज्या ज्या स्टेशनवर गाडी थांबली त्या त्या प्रत्येक ठिकाणी त्यांचे हार्दिक स्वागत होऊन पुष्पांचा वर्षाव करण्यात आला होता.

साडेतीन वाजताच्या सुमाराला स्टेशनाहून टोलेजंग मिरवणूक निघाली. शहरातील मुख्य विभागातून फिरून सुमारे दोन मैलावर असलेल्या अस्पृश्य वस्तीत आल्यावर मनमाड येथील अस्पृश्य विद्यार्थी बोर्डिंगच्या इमारतीच्या कोनशिला समारंभासाठी डॉ. बाबासाहेब गेले. सदर कोनशिला समारंभाप्रसंगी डॉ. बाबासाहेबांनी खालील भाषण केले. ते म्हणाले,

आपण राजकीय चळवळीला जितके महत्त्व देतो तितकेच महत्त्व शिक्षण प्रसाराला दिले पाहिजे कारण शिक्षणाशिवाय आपल्याला मान्याच्या जागा काबीज करता येणार नाहीत आणि जोपर्यंत मान्याच्या जागा आपण काबीज करीत नाही तोपर्यंत खरीखुरी सत्ता आपल्या हाती आली असे म्हणता येणार नाही. वास्तविक शिक्षणाची तरतूद प्रांतिक सरकारांनी केली पाहिजे पण तसे झालेले विशेष काही दिसत नाही. मी यापूर्वी सांगितलेच आहे पण आता क्रमप्राप्त आहे म्हणून सांगतो की, मी मात्र हिंदुस्थान सरकार कडून अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी तीन लाख रुपयांची मंजूरी मिळविली आहे. त्यामुळे आपल्या बऱ्याच विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या मिळत आहेत, पण दुर्दैवाची गोष्ट ही की, आपलेच विद्यार्थी जास्त नापास होतात. याचे कारण मला तरी काही समजत नाही. मी विद्यार्थी असताना या लहानशा मंडपा एवढीच आमची खोली होती. तीत आम्ही सर्व कुटुंब राहत होतो. त्यात बहिणीची दोन मुले, एक बकरी, जाते, पाटा वगैरे आणि मिणमिण जळणारा तेलाचा दिवा. इतकी हलाखीची परिस्थिती असताना मी अभ्यास केला. आमच्या विद्यार्थ्यांना बोर्डिंगांमधून आमच्यापेक्षा किती तरी पटीने चांगली सोय असताना त्यांनी रात्रंदिवस का अभ्यास करू नये. तुम्हाला माहिती आहे की, जो कोणी पैसा देत असतो तो त्याचा जाब विचारीत असतो. तद्वतच हिंदुस्थान सरकार विचारील की, आम्ही अस्पृश्यांच्यासाठी जो इतका पैसा खर्च करतो त्याचे त्यांनी काय चीज केले ? म्हणूनच आपल्या विद्यार्थ्यांनी झटून अभ्यास केला पाहिजे आणि पास झाले पाहिजे. न जाणों उद्या जर कॉंग्रेस मिनिस्ट्री, प्रधान मंडळं आली तर हे काय करतील याचा भरवसा नाही. म्हणूनच मी आताच त्या तीन लाखांचे पाच लाख व्हावेत म्हणून खटपट करीत आहे.

भाषण झाल्यावर डॉ. बाबासाहेबांच्या हस्ते अस्पृश्य विद्यार्थी बोर्डिंगच्या इमारतीची कोनशिला बसविण्यात आली.

● ● ●

# २२८

# अधिकारांचे किल्ले ताब्यात असले तर भय बाळगण्याचे कारण नाही

दिनांक ९ डिसेंबर १९४५ रोजी मनमाड येथील अस्पृश्य विद्यार्थी बोर्डिंगच्या इमारतीची कोनशिला बसविल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर जाहीर सभेच्या ठिकाणी आले. या सभेला सव्वा सहा वाजता सुरूवात झाली. मुंबई प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष श्री. भाऊराव कृ. गायकवाड व आंध्र प्रांतिक शाखेचे सेक्रेटरी श्री. सुर्यप्रकाशमराव यांची प्रास्ताविक भाषणे झाल्यावर डॉ. बाबासाहेब बोलावयास उठले. सुमारे पाऊण लाखांच्या अस्पृश्य जनसमुदायासमोर त्यांनी एक तास भाषण केले. टाळयांच्या प्रचंड कडकडाटात भाषणास सुरूवात करताना ते म्हणाले,

बंधु आणि भगिनींनो,

आज सहा-सात वर्षांच्या कालावधीनंतर या ठिकाणी मी आलो आहे. याचे कारण असे आहे की, सर्व हिंदुस्थानात अस्पृश्य समाजाच्या कार्याविषयी, लढ्याविषयी सर्वात जास्त जागृत असा महाराष्ट्र हा एकच भाग आहे आणि म्हणून या भागात वारंवार येण्याची मला तितकिशी जरुरी भासत नाही. तरी पण आज या ठिकाणी येणे विशेष महत्त्वाचे वाटल्यावरूनच मी आलो आहे.

आज या देशात कॉंग्रेस, मुस्लिम लीग, हिंदू महासभा वगैरे अनेक राजकीय पक्ष आहेत. हा प्रत्येक पक्ष आपापल्या परीने राजकीय मागण्या मागत आहे. मुसलमान लोक पाकिस्तान मागत आहेत. कॉंग्रेस स्वराज्य मागत आहे. आम्हालाही स्वराज्य पाहिजे आहे. स्वराज्याबद्दल कॉंग्रेसचा व आमचा मतभेद नाही. कॉंग्रेसचे लोक ब्रिटिशांना सांगत आहेत की हिंदुस्थान आमचा आहे. हिंदुस्थानच्या राजकारणाच्या किल्ल्या आमच्या हाती द्या आणि हिंदुस्थानातून चालते व्हा. पण गेली वीस वर्षे कॉंग्रेसला मी एक प्रश्न विचारीत आहे. त्याचे उत्तर मात्र गांधी अगर कॉंग्रेसचे लोक देत नाहीत.

तो प्रश्न हा की, तुम्ही जे स्वराज्य मागता त्या स्वराज्यात कोणाचे राज्य कोणावर होणार आहे ? राज्य कोणी करायचे ? आणि ते कोणावर ? हिंदुंनी अस्पृश्यांवर राज्य करावयाचे असे काही आहे काय ? हे जे स्वराज्य मिळणार आहे ते स्वराज्य कोणाचे ? तुम्हाला कदाचित तुमचे स्वराज्य मिळेल परंतु तुमचे स्वराज्य म्हणजे आमची गुलामगिरीच ना ?

---

जनता : १५ डिसेंबर १९४५.

हाच प्रश्न मी काँग्रेसच्या लोकांना व गांधींना आज वीस वर्षे विचारीत आहे. या प्रश्नाचे उत्तर ते देत नाहीत आणि ज्याअर्थी ते उत्तर देत नाहीत त्याअर्थी त्यांच्या पोटात काही तरी काळेबेरे आहे हे सिद्ध होते.

हे जे स्वराज्य मिळणार आहे त्या स्वराज्यात आम्हाला काय मिळणार याचा तुम्ही विचार केला पाहिजे.

आज आपल्यावर कोणती कामे लादण्यात आलेली आहेत ? झाडू मारणे, गटारे साफ करणे वगैरे. काँग्रेसच्या हाती राजकारणाच्या किल्ल्या मिळाल्या तर आमच्यावर पूर्वापार चालत आलेल्या गुलामगिरीवर शिक्कामोर्तब होणार आहे. झाडू मारणे, गटारे साफ करणे हीच कामे आमच्यावर लादण्यात येऊन आमची दुर्दशा कोणत्या थरास जाईल हे सांगता येत नाही.

आज मी एवढा खटाटोप करून दरवर्षी ३ लाख रुपये आपल्या समाजातील मुलांना परदेशी जाऊन उच्च शिक्षण घेण्याकरिता सरकारातून खर्च होण्याची सोय केली आहे. ३ लाख रुपयाचे ५ लाख करण्याचा मी सध्या प्रयत्न करीत आहे. त्याचप्रमाणे जवळजवळ आठ टक्के जागा सरकारी नोकऱ्यात आपल्या उमेदवारांना मिळण्याची सोय करण्यात आलेली आहे. आपल्या प्रगतीकरिता आजपर्यंत या व इतर ज्या काही सरकारी सवलती व सरकारी मदत मिळाली व मिळत आहे ते सर्व काही काँग्रेसच्या लोकांच्या हाती राजकारणाच्या किल्ल्या गेल्या की नेस्तनाबूत होणार आहे.

हा सर्व खटाटोप मी का करीत आहे ? आपणाला मान्याच्या जागा, अधिकाराच्या जागा हस्तगत करावयाच्या आहेत. किल्ले सर करावयाचे आहेत म्हणून. त्याशिवाय आपणाला तरणोपाय नाही. किल्ल्यावरूनच शत्रुच्या सैन्याची टेहळणी करता येऊन शत्रूवर जोराचा मारा करता येतो. शत्रुने सर्व प्रांत जरी व्यापला तरी जोपर्यंत किल्ले ताब्यात असतात तोपर्यंत कशाचेही भय बाळगण्याचे कारण राहात नाही.

पेशवाईच्या काळात काही इंग्रजांचे राज्य नव्हते, अगर मुसलमानांचेही नव्हते. त्यावेळेस पूर्ण स्वराज्य होते. त्या स्वराज्यात आपली काय परिस्थिती होती ?

अस्पृश्य जातीच्या मनुष्याने रस्त्यावर थुंकू नये म्हणून त्याच्या गळयात गाडगे अडकविण्यात आले होते. त्याचप्रमाणे रस्त्याने चालताना त्यांची पावले उमटू नयेत म्हणून त्याच्या पाठीमागे झाडू बांधण्यात येत असे. पेशव्यांच्या स्वराज्यात अस्पृश्यांची जी दैना झाली तशीच दुर्दशा हिंदू लोकांच्या हाती स्वराज्य गेल्याने अस्पृश्यांची होणार आहे, हे कोणीही विसरता कामा नये.

आजही हे भिक्षापात्र अवलंबणारे ब्राह्मण लोक अधिकाऱ्याच्या जागेपासून तो तहत क्लार्कच्या जागेपर्यंत सरकारी जागा व्यापून आपले स्थान कायम राखून आहेत.

कोणत्याही गावात मुसलमानांचे एक घर असले तरी त्याच गावात राहाणारे हजार-पाचशे स्पृश्य हिंदू लोक त्याची किती मनधरणी करतात. त्याच्याकडे ब्र शब्द काढण्याची कोणाची ताकद नसते आणि त्याच गावात, स्वधर्मीय अशा पाच-पंचवीस अस्पृश्य लोकांना हेच स्पृश्य हिंदू ठोकरीने उडवितात. इंग्रज आमदानीत स्वराज्य मागणाऱ्या या स्पृश्य हिंदुंच्या हाती जर स्वराज्य गेले तर आपली दशा काय होईल याचा विचार करा.

हिंदुस्थानात युरोपियन, मुसलमान, शीख, अँग्लो-इंडियन, पारशी, ख्रिश्चन वगैरे अल्पसंख्यांक जाती आहेत. सर्वसाधारण राजकारण जाणणारा कोणताही मनुष्य तुम्हाला सहज सांगू शकेल की, या सर्व जातींपैकी राजकीय संरक्षणाची खरोखर आवश्यकता जर कोणाला असेल तर ती अस्पृश्य समाजातील लोकांनाच आहे. असे असताना काँग्रेसचे लोक आजपर्यंत काय करीत आले आहेत ? १९३०-३२ साली विलायतेला जी राऊंड टेबल कॉन्फरन्स भरविण्यात आली त्यावेळी अस्पृश्य समाजातर्फे मला जाण्याचा प्रसंग आला. अस्पृश्य समाजाकरिता प्राणांतिक उपोषण करणाऱ्या गांधींनी त्यावेळी काय केले ?

गांधींकडे ख्रिश्चन, युरोपियन, पारशी, शीख, मुसलमान या अल्पसंख्यांक लोकांनी राजकीय संरक्षण मिळविण्याकरिता खलिते पाठविले. मुसलमानांखेरीज सर्वांच्या मागण्या मान्य करण्यात आल्या. मीही अर्ज पाठविला होता. या प्रसंगी गांधींना भीती वाटत होती की, हे सर्व लोक एक होतील. असे झाल्यावर काँग्रेसला सुरुंग लागेल आणि हे लोक आपली रेवडी उडवतील. म्हणून गांधींनी मुसलमान लोकांशी गुप्त करारनामा केला. त्यांना सांगण्यात आले की तुमच्या ज्या काही १४ मागण्या आहेत, त्या सर्व मला मान्य आहेत परंतु अस्पृश्यांच्या ज्या काही मागण्या आहेत त्या सर्वांना तुम्ही विरोध केला पाहिजे. वास्तविक मुसलमान लोकांची लोकसंख्या व अस्पृश्यांची लोकसंख्या जवळ जवळ सारखी असून राजकीय संरक्षणाची आवश्यकता मुसलमानांपेक्षा अस्पृश्य लोकांनाच जास्त आहे. परंतु अशा रीतीने गांधींनी सर्व पक्षांचे अर्ज मंजूर करून मुसलमानांशी गुप्त करारनामा केला आणि माझा अर्ज नामंजूर केला.

अशी ही गांधींची कपटनीती आहे. काही दिवसांपूर्वी सिमला मुक्कामी जी परिषद भरविण्यात आली त्यावेळी तरी गांधींनी काय काय केले ?

परिषदेसंबंधी सरकारचे धोरण जाहीर करणारे पत्रक व्हाईसरॉयसाहेबांनी काढले होते त्यात त्यांनी राजकीय दृष्टीने ' अस्पृश्य व अस्पृश्येतर हिंदू ' असा हिंदू समाजाचे दोन तुकडे पाडणारा शब्दप्रयोग केला होता. धार्मिक दृष्टीने अस्पृश्य लोक खरोखरीच निराळे आहेत की नाहीत ही गोष्ट जरी दृष्टीआड केली तरी राजकीय दृष्टीने अस्पृश्य समाज स्पृश्य हिंदू लोकांपासून निराळा, भिन्न असा मानण्यात आला होता. परंतु सर्व राजकारणाच्या आंदोलनातून व व्हाईसरॉयसाहेबांच्या पत्रकातून गांधींचा ' आतील आवाज ' जागृत झाला व त्या आवाजानुसार गांधींनी एक पत्रक काढून त्यात जाहीर केले की ' अस्पृश्य व अस्पृश्येतर हिंदू अगर सवर्ण हिंदू ' हा राजकीयदृष्ट्या हिंदू समाजाचे तुकडे पाडणारा शब्दप्रयोग गैरवाजवी आहे.

याच्या मुळाशी काय आहे ? तुम्हाला कौरव-पांडवांच्या युद्धाची थोडी माहिती असेल. कौरव शंभर होते व पांडव पाच होते. कौरवांनी सर्व राज्य बळकावले होते. या राज्याचा काही भाग पांडवांना मिळावा व हे युद्ध टाळता यावे म्हणून कृष्ण शिष्टाई करण्याकरिता कौरवांचा नेता दुर्योधन याच्याकडे गेला व त्याला सांगितले की, अर्धे राज्य तुम्ही घ्या व अर्धे राज्य पांडवांना द्या. परंतु दुर्योधनाने ते मान्य केले नाही. त्यावर कृष्ण म्हणाला की या राज्यातील दंडकारण्य तरी पांडवांना द्या. त्यावर दुर्योधनाने उत्तर दिले की, दंडकारण्यच काय पण सुईच्या अग्रावर जेवढी माती राहील तेवढी जमीनही मी देणार नाही.

अशाच प्रकारची गांधींची व काँग्रेसच्या लोकांची अस्पृश्य लोकांविषयी मनोवृत्ती आहे. याचे कारण काय ?

राजकीय दृष्ट्या हिंदू समाजाचे असे दोन भाग पाडल्याने मुसलमानांप्रमाणे अस्पृश्यांना राजकारणात स्वतंत्र अधिकार प्राप्त होणार आहेत, ही गोष्ट गांधी व त्यांचे हस्तक जाणून आहेत.

मध्यवर्ती असेंब्लीच्या निवडणुकीचा निकाल लागून फार दिवस झाले नाहीत. या निवडणुकीत मुसलमान लोकांचा स्वतंत्र मतदार संघ असल्यामुळे मुसलमान लोक मुस्लिम लीगच्या बाजूने प्रचंड बहुमताने निवडून आले. मुस्लिम लीगशी काँग्रेसला लढण्याचे सामर्थ्य राहिले नाही.

परंतु नवीनच उदयास आलेले आणि इतर काही पक्ष, जस्टीस पार्टी, हिंदू महासभा वगैरे, या सर्व पक्षांचा या निवडणुकीत बोजवारा उडाला.

यशापयश येणे जरी सर्वस्वी हाती नसले तरी पण एक गोष्ट निर्विवाद आहे. लढताना अपयश येण्याने निरुत्साही होण्याचे काहीच कारण नसते. परंतु काही पक्षांनी आपला कारभारही आटोपता घेण्याचे ठरविले.

यावरून काय दिसून येते ? आता जी आगामी निवडणूक होणार आहे त्या निवडणुकीच्या वेळी खरा लढा फक्त दोनच पक्षात होणार आहे आणि तो म्हणजे शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन व दुसरा काँग्रेस पक्ष.

याकरिता तुम्ही काय केले पाहिजे ? तुम्ही मनाशी निश्चय केला पाहिजे. आपणाला अतिशय बलवान शत्रुशी टक्कर द्यावयाची आहे. तुम्हा सर्वांवर ही जबाबदारी आहे. काँग्रेसने सर्व पक्षांना नेस्तनाबूत करण्याचा डाव रचला आहे. सर्व पक्षांना दडपून टाकले आहे. ही वेळ लापसी खाण्याची नाही अगर दोन चार रुपयांनी खिसे भरण्याची नाही.

आपणाला लढा करावयाचा आहे. याकरिता तुम्ही लोकांनी निश्चय, निर्धार केला पाहिजे आणि या निश्चयानेच आपणाला यशस्वीरितीने हा लढा जिंकता येईल. निवडणुकीच्या दिवशी प्रत्येकाने सकाळीच उठून मतदानाचे जे जे ठिकाण नेमून दिले असेल त्या त्या ठिकाणी स्वतः होऊन गेले पाहिजे.

आपणाजवळ मोटारी नाहीत आणि पैसाही नाही. परंतु निश्चय आहे. ज्या ज्या ठिकाणी अशी सोय नसेल त्या त्या ठिकाणी कोणाची वाट न पाहता तुम्ही पायी जाऊन आपल्या फेडरेशनच्या उमेदवारालाच मत दिले पाहिजे.

निरनिराळ्या पक्षातर्फे उमेदवाराला तिकीट देण्यात येते. मध्यवर्ती असेंब्लीत काँग्रेसच्या तिकिटावर नुकतेच गाडगीळ निवडून आले आहेत. त्याचप्रमाणे मराठा लीगचा राजकीय क्षेत्रात टिकाव लागत नाही हे जाणून अशाच प्रकारे काँग्रेसच्या तिकिटावर हिरे हेही निवडून आले आहेत. हे तिकीट म्हणून जे म्हणतात याचा अर्थ तरी काय आहे ? गाडगीळांच्या जोडीला हे दुसरे बांडगूळ मिळाले आहे इतकाच त्याचा अर्थ.

मला कोणीतरी सांगितले की अमृतराव रणखांबे यांना काँग्रेसचे तिकीट मिळाले आहे. हे काँग्रेसचे तिकीट म्हणजे काय ?

म्युनिसीपालिटीकडून कुत्र्याच्या गळयात अडकविण्याकरिता एक बिल्ला देण्यात येतो आणि तो कशाकरिता देण्यात आलेला असतो तर त्या बिल्ल्यावरून त्या कुत्र्याचा मालक कोण आहे हे समजते. या बिल्ल्याप्रमाणेच हे काँग्रेसचे तिकीट आहे.

आगामी निवडणुकीकरिता ज्या उमेदवारांची नावे 'जनते' तून जाहीर करण्यात आली आहेत त्यांच्याविषयी अनेक लोकांच्या मनात अनेक प्रकारचे तर्क चालू आहेत.

या अमुक उमेदवाराला तिकीट दिले. त्या दुसऱ्याला का दिले नाही. हे पाहण्याचे काम तुमचे नाही.

तुम्ही लोकांनी आपली जबाबदारी, आपले कर्तव्य काय आहे, हे नीट समजावून घेतले पाहिजे.

ज्या पक्षातर्फे हे उमेदवार उभे केले आहेत त्या शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन या पक्षाची भूमिका काय आहे ? त्या पक्षाची दिशा कोणती ? मार्ग कोणते ? ध्येय काय आहे ? हे समजावून घेणे तुमचे कर्तव्य आहे.

मुंबई प्रांतातील बहुतेक सर्व जिल्ह्यातून उभे केलेले उमेदवारच यावेळीही का उभे केले असे कोणी म्हणेल.

तुम्ही सर्व जण जाणता की आपणाला काँग्रेसशी लढा करावयाचा आहे. काँग्रेस जवळ मुबलक पैसा आहे. दोन चार हजार रुपये ओतून कोणाही उमेदवाराला ते सहज वळवू शकतील. ज्याप्रमाणे एखादा लोखंडी खांब जमिनीत रोवला असता ऊन, वारा, पाऊस कशाचीच उपाधी त्याला होऊ शकत नाही, तो वाकत नाही अगर मोडत नाही त्याप्रमाणेच हे उमेदवार लोखंडी खांब आहेत. वाकणार नाहीत अगर मोडणार नाहीत ही माझी खात्री झालेली आहे.

यावेळी तुम्ही लोकांनी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे आणि ती ही की, जबाबदारी एकदोन माणसांची नाही. जबाबदारी तुम्हा सर्वांची आहे. माझा भाऊ उभा केला नाही म्हणून एक रुसतो तर कोणी माझा बाप, चुलता वगैरे नात्यातील माणूस उभा केला नाही म्हणून रागावतो.

माझी दोन मुले आहेत, त्यांनीही समाजकार्य हाती घेतले आहे, असे मला आज पुष्कळ लोक सांगत आहेत. इतकेच नव्हे तर त्यांच्यापैकी एकाला तरी निवडणुकीला उभा करा असेही म्हणताहेत. परंतु अधिकाराच्या जोरावर मी माझ्या मुलांना वर चढविले असा माझ्यावर आरोप करायला कोणालाही जागा मिळू नये असा माझा संकल्प आहे.

हे जे उमेदवार येत्या निवडणुकीकरिता उभे केले आहेत त्यांच्यात जरी काही अंशी कमतरता असली तरी ती भरून काढण्याचे सामर्थ्य माझ्यात आहे. ज्यादिवशी ही नौका पैलतिराला नेण्याचे सामर्थ्य माझ्यात नाही असे मला दिसून येईल त्या दिवशी मी राजकारण सोडून देईन.

● ● ●

# २२९

# आपण अन्यायाचा प्रतिबंधच केला नाही तर आपला उद्धार होणे शक्य तरी आहे काय ?

वऱ्हाड प्रांतिक शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनची पहिली परिषद अकोला (वऱ्हाड) येथे तारीख ९ व १० डिसेंबर १९४५ रोजी भरली होती. या परिषदेला अमरावती, बुलढाणा, यवतमाळ, अकोला व मध्यप्रांत अशा दूरदूरच्या ठिकाणाहून शेकडो प्रतिनिधी उपस्थित झाले होते. परिषदेला पाऊण लाख लोक हजर होते.

## परिषदेचे वैशिष्ट्य

अकोला येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे प्रथमच आगमन असल्यामुळे वऱ्हाड प्रांतातील चारही जिल्ह्यातील हजारो स्त्री-पुरुष बाबासाहेबांच्या दर्शनाकरिता आले होते. काही भागातून दोन दिवसांचा प्रवास करुनही लोक आपल्या आवडत्या पुढाऱ्याच्या दर्शनाकरिता व त्यांचा संदेश ऐकण्याकरिता आले होते. बाबासाहेब अकोल्याला येणार असल्याचे आगाऊ माहित असल्यामुळे खास सिनेमातून ''अखिल भारतीय बहिष्कृत वर्गाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे तारीख १० डिसेंबर १९४५ ला अकोल्याला उपस्थित राहून भाषण करणार आहेत .'' अशा तऱ्हेची जाहीरात दहा दिवस अगोदर दाखविली जात होती. थोडक्यात बाबासाहेबांच्या आगमनाविषयी सबंध अकोल्यातील जनतेला नव्हे तर वऱ्हाड प्रांतातील जनतेला आमचे अनभिषिक्त राजे, आमचे पुढारी आम्हाला केव्हा भेटतील अशी उत्कंठा लागून राहिली होती. अकोल्याला येईपर्यंत ज्या ज्या स्टेशनवर गाडी थांबली त्या त्या ठिकाणी त्यांचे हार्दिक स्वागत झाल्यामुळे त्यांना सबंध रात्रभर त्रास झाला होता. प्रतिनिधींना मुलाखती व मध्यप्रांतातील पुढाऱ्यांशी आगामी निवडणुकी संबंधी त्यांनी पाऊण तास चर्चा केल्यावर प्रमुख पुढाऱ्यांचा फोटो घेण्यात आला.

अकोला स्टेशनापासून प्रचंड मिरवणुकीला सुरुवात झाली. या मिरवणुकीची लांबी तीन चार फर्लांग होती. अकोला स्टेशन ते टिळक मैदानापर्यंतचा रस्ता स्त्री-पुरुषांनी फुलून गेला होता. या मिरवणुकीत अखिल

---

जनता : २२ डिसेंबर १९४५.

भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे उत्साही जनरल सेक्रेटरी श्री. राजभोज, भारतीय संस्थानी शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष सुबय्या, म्यु. कामगार परिषदेचे नियोजित अध्यक्ष श्री. सज्जनसिंग, शांताबाई दाणी, नाशिक, वगैरे प्रामुख्याने दिसत होते. वऱ्हाड प्रांतातील जिल्ह्यातील समता सैनिक दलाने या मिरवणुकीत उत्साहाने भाग घेऊन उत्तम प्रकारे शिस्त सांभाळली होती. दुतर्फा सैनिक दल, मधोमध पुढाऱ्यांच्या मोटारी, मागे महिला मंडळ व इतर जनसमूह व सर्वांच्या आघाडीला नानाविध वाद्यांचे ताफे आणि मर्दानी दांड-पट्टयाचा खेळ आणि बँड अशा उत्साही थाटात व बाबासाहेबांच्या जयघोषात मिरवणूक चालली होती. मिरवणुकीत ' डॉ. आंबेडकर कौन है । दलितोंका राजा है ।' ' शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा विजय असो,' ' हरिजन नावाचा धिक्कार असो, ' ' आंबेडकर झिंदाबाद । थोडे दिनमें भीमराज ' । वगैरे गगनभेदी घोषणांनी सर्व वातावरण दुमदुमून गेले होते.

अशा अपूर्व सोहळ्यात मिरवणूक 'साध्वी रमाबाई आंबेडकर नगरात' विसर्जन पावल्यावर श्री. सुबय्या यांच्या हस्ते झेंडावंदनाचा कार्यक्रम झाला. अध्यक्षांनी उभारलेल्या शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा निळा झेंडा उंचावर जाऊन फडकला. समता सैनिक दलाने त्याला खडी सलामी दिली. त्यावेळी टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात व फेडरेशनच्या जयघोषात वातावरण दुमदुमून गेले होते.

समता सैनिक दलाची परिषद श्री. सुब्बय्या यांच्या अध्यक्षतेखाली पार पाडल्यावर लगेच महिला परिषद शांताबाई दाणी यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आली. सौ. गिताबाई गायकवाड व मिसेस नाईक यांनी महिलांना स्फूर्तिदायक आदेश दिल्यावर परिषदेचे कामकाज संपले.

बरोबर साडेपाच वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे मंडपात आगमन झाले. त्यावेळी गगनभेदी घोषणांनी व टाळ्यांच्या कडकडाटानी सारे वातावरण हर्षोत्फुल्ल झालेले होते. ध्येयनिष्ठेनी ओथंबलेल्या त्या अस्पृश्य वर्गाचा स्वाभिमान व स्वावलंबन याचे हे दिव्य प्रतीक पाहून स्वधर्मीय व विधर्मीय लोकांच्या तोंडून आपोआपच धन्योद्गार बाहेर पडत होते.

## परिषदेचे कामकाज

परिषदेची सुरूवात बरोबर साडेसहा वाजता नागपूरचे शेंद्रे वकील यांनी आपल्या सुस्वर गायनानी केली. स्वागताध्यक्ष श्री. डी. झेड. पळसपगार यांनी आपल्या भाषणात जमलेल्या मंडळीचे व बाबासाहेबांचे स्वागत केले.

नंतर अकोल्याचे अकर्ते वकील (काँग्रेस), अमृतकर वकील (हिंदू महासभा), म्युनिसीपल कमिटीचे अध्यक्ष रावबहादूर आठल्ये, मुस्लिम लीगचे सभासद श्री. काझी वकील यांनी बाबासाहेबांची मुक्त कंठाने स्तुती करून बाबासाहेब हे केवळ अस्पृश्यांचेच ठरत नसून अखिल भारताचे ते पुढारी, तपस्वी आहेत, अशा तऱ्हेची घोषणा करून बाबासाहेबांच्या चळवळीविषयी व फेडरेशन पक्षाविषयी आदर व्यक्त केला. नंतर डिप्रेस्ड क्लासेस असोशिएशनचे जनरल सेक्रेटरी रावसाहेब ठवरे यांनी आपण हा पक्ष सोडून फेडरेशन पक्षामध्ये सामील कसे झालो यासंबंधी उल्लेख करून आपले भाषण संपविले. तद्नंतर श्री. इंगळे यांनी अखिल वऱ्हाड प्रांतातील अस्पृश्य जनतेतर्फेचे मानपत्र वाचून दाखविले. नंतर डॉ. बाबासाहेबांना ११०१ रुपयांची थैली अर्पण करण्यात आली.

बरोबर साडेसात वाजता डॉ. बाबासाहेब बोलायला उभे राहिले, यावेळी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होऊन ' आंबेडकर झिंदाबाद, ' ' आंबेडकर कौन है। दलितोंका राजा हैं ', वगैरे गगनभेदी जयघोष सारखा चालला होता. जनसमुदाय पुन्हा शांत झाल्यावर बाबासाहेबांनी आपले भाषण सुरू केले. ते म्हणाले,

बंधूनो आणि भगिनींनो !

आतापर्यंतच्या वक्त्यांनी जी भाषणे केली आहेत त्यावरून माझी भूमिका स्पष्ट झाली आहे. तेव्हा त्याचेसंबंधी मी चर्वीतचर्वण न करता इलेक्शनसंबंधी बोलणार आहे. तुम्हाला माहित आहे की यावेळचे इलेक्शन म्हणजे १९३७ सालचे इलेक्शन नाही. यावेळचे इलेक्शन म्हणजे अस्पृश्यांचा जगण्या-मरण्याचा प्रश्न आहे. हा प्रश्न सोडवून आपल्या जीविताचे आद्यकर्तव्यकर्म आपण बजाविले पाहिजे आणि आपली अभेद्य संघटना सर्व जगाला दाखवून दिली पाहिजे. अर्थातच फेडरेशनच्या सर्व उमेदवारांना निवडून आणून आपले राजकीय हक्क संपादन केले पाहिजेत.

राजकीय सत्ता हाती असली म्हणजे मनुष्य काय करू शकतो याचे मी उदाहरण सांगतो. मी व्हाइसरॉयच्या ज्या कार्यकारी मंडळात प्रवेश केला त्या मंडळाचे १५ सभासद आहेत. मी तेथे एकटाच आहे. या गोष्टीला अडीच वर्षावर कालावधी लोटला आहे. तेवढ्या अवधीत मी तिथे राहून काय केले हे सांगितले म्हणजे उलगडा होईल. मी तेथे जाण्यापूर्वी मध्यवर्ती सरकारने अस्पृश्यांच्या शिक्षणाची कसलीही जबाबदारी स्वतःच्या अंगावर घेतली नव्हती. मात्र मुसलमानांच्या अलिगड विश्वविद्यालयाला २० लाख रुपयांची मदत देऊन

व बनारस हिंदू विश्वविद्यालयाला १९ लाख भांडवल पुरवून सहाय्य केले आहे. शिवाय या दोन्हीही संस्थांना सालिना ३ लाखाची मदत चालूच आहे. मी तेथे गेल्यानंतर सरकारने अस्पृश्यांकरिता ३ लाख रुपयांची मदत चालू केली आहे. शिवाय ३०० कॉलेज-शिष्यवृत्या, प्रत्येकी ६० रुपयांच्या, मंजूर झालेल्या आहेत. विद्यार्थ्यांना जर मदत द्यावयाची तर ती भरपूर द्यावयाची असे धोरण आखले आहे. याचवर्षी ३० विद्यार्थी उच्च शिक्षणासाठी विलायतेस जातील. आता अशी व्यवस्था केली आहे की, निदान २ वर्षात १५ विद्यार्थी विलायतेला येथून जातील. याप्रकारची पूर्वी कधीही नसलेली ही व्यवस्था आज झाली आहे. आता नोकरी संबंधी पहा. मुसलमानांना शेकडा २०, खिश्चनांना शेकडा साडेआठ, पण आपल्याला मात्र अशा प्रकारचे प्रमाण पूर्वी अजिबात नव्हते. फक्त 'यांचेकडे लक्ष पुरवावे' एवढीच शिफारस होती. पण नुकतीच माझी मागणी सरकारला पटून आमचेही नोकऱ्यात शेकडा आठ पूर्णांक एक तृतीयांश असे प्रमाण ठरविण्यात आले आहे. मी तेथे गेलो तेव्हा माझ्या खात्यात अस्पृश्यांचे हमालसुद्धा नव्हते. पण आता डेप्यूटी सेक्रेटरीज २, अंडर सेक्रेटरी १ व एक्झिक्युटिव्ह इंजिनियर्स ३ असे अस्पृश्य वर्गाचे लोक भरले आहेत. कोणी म्हणतात की, मी महारांचेच हित करतो. मी महार जातीत जन्मलो याला मी काय करू. पण माझ्याविरूद्ध केली जाणारी ही तक्रार खोटी आहे. माझ्याच खात्यात सिमल्याला २८ क्लार्क पैकी *१८ भंगी आहेत. विलायतेला जाणाऱ्या लोकात १ मांग, १ भंगी व चांभार पुष्कळच आहेत. मी आणखी एक गोष्ट यातच सांगू इच्छितो. एक मळकट असा भंगी अस्पृश्यांचा उमेदवार जेव्हा मुलाखती करता सिमल्याला आला तेव्हा त्याला खात्रीने नकार मिळेल हे जेव्हा मला समजले तेव्हा बोर्डावर मी माझे वजन आणून त्याला निवडून घेतले. आता तो उमेदवार परदेशात आहे. मी स्वतःची आत्मप्रौढी करतो असे मात्र समजू नका. सांगण्याचा हेतू हाच की, राजकीय सत्ता हाती असता मनुष्य काय करू शकतो आणि म्हणूनच अस्पृश्य समाजाला इज्जत व माणुसकीसाठी राजकारण काबीज करायला पाहिजे. म्हणजेच फेडरेशनच्या प्रतिनिधींना कायदे मंडळात जाऊन आमच्यावरील जुलूमाविरूद्ध आवाज काढता आला पाहिजे. ही एक आमची मागणी आहे.

१९२० साली गांधींनी हरिजन संघ काढला. या संघातून हरिजन विद्यार्थ्यांना शिष्यवृत्या देण्याचा उपक्रम सुरू केला. हेतु इतकाच की, आमच्या स्वाभिमानी चळवळीपासून त्यांना आपल्या गोटात ओढणे. या बाबतीत मी अस्पृश्य

*मूळ प्रतीत आकडा दिलेला नाही. परंतु १८ भंगी असल्याचा उल्लेख बाबासाहेब आंबेडकरांनी पुणे येथील दि. ४ ऑक्टोबर १९४५ च्या भाषणात केला आहे.

विद्यार्थ्यांना इतकेच सांगतो की, असल्या आमिषांचा जितका फायदा घेता येईल तितका घ्या पण कर्तव्याला जागा, हे मला तुम्हाला सांगावयाचे आहे. पुराणातील देव व दैत्य यामध्ये जे युद्ध झाले होते त्या युद्धाला यश येण्याकरता कचाला संजीवनी मंत्र शिकविण्याची देवांनी युक्ती काढून सफलही केली, कचासारखी वृत्ती तुम्ही आपल्या कृतीत उतरुन त्याचप्रमाणे वागा, यातच समाजाचे हित आहे.

या देशात असंख्य जाती व धर्म आहेत. यात सामाजिक समता अगर संघटना नाही. जाती जातीत रोटीभेद. बेटी व्यवहार होत नाही आणि कदाचित झालाच तर अपवाद म्हणून समजावा. जर महाराच्या मुलाने ब्राह्मण मुलीशी लग्न केले अथवा ब्राह्मण मुलीने महार मुलाशी लग्न केले तर त्याबद्दल मला काही एक वाटणार नाही. पण मी असे विचारतो की, अशा तऱ्हेच्या विवाहाने अस्पृश्यांची अस्पृश्यता नाहिशी होईल काय ? आमच्या मुली का काळ्या आहेत की नकट्या आहेत का कुरूप आहेत ? मी असेही तुम्हाला विचारतो की, अस्पृश्याने, स्पृश्य वर्गाच्या मुलीशी लग्न करण्यात मतलब काय ?

स्वराज्याच्या प्रश्नावर आमचा मतभेद नाही. पण या स्वराज्यात आम्हाला आमचे हक्क प्राप्त झाले पाहिजे. तुमच्या स्वराज्यात आमच्यावर कुणाचे राज्य होणार या प्रश्नाचे उत्तर द्या असे काँग्रेसला मला सांगावयाचे आहे.

सध्या आपल्या जवळ कोणतेच साधन नाही. स्पृश्य लोक सत्ताधीश आहेत आणि म्हणून ते पाहिजेत त्या गोष्टी ठरवितात. काँग्रेस ही आपली हितशत्रु आहे. त्यांच्याजवळ मुबलक पैसा, वाहनाची साधने व इतर उपकरणे आहेत, ती आपणाजवळ नाहीत. या मोहाला आपल्यातील कितीतरी सहज बळी पडून गेली आहेत, पण मी मात्र पडलो नाही (हंशा). तेव्हा मला तुम्हाला हे स्पष्ट सांगावयाचे आहे की, अशाप्रकारच्या साधनांची अपेक्षा न करता केवळ आपल्या पक्षाचे कर्तव्य म्हणून, पायी जाऊन ज्यांना मताधिकार असेल त्यांनीं विनामूल्य समाज सेवा घडावी म्हणून, फेडरेशनच्या उमेदवारालाच मते द्यावीत, हेच त्यांचे सर्वश्रेष्ठ कर्तव्य आहे.

देशातील अल्पसंख्यांकांना वाटणारी भीती दूर करण्यासाठी झटत असल्याचे काँग्रेस म्हणते, पण तसे काहीच नाही. सर्व देशाचे प्रतिनिधी असा तिने चालविलेला प्रचार फसवणूक करणारा आहे. मोठ्या प्रमाणात सर्वसामान्य

जनतेचा पाठिंबा मिळावा म्हणून कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा हा प्रयत्न आहे. ब्रिटिश निघून गेल्यावर आणि स्वराज्य मिळाल्यावर निरनिराळया अल्पसंख्यांकांचे हक्क मध्यवर्ती सरकारात कसे संरक्षिले जातील याचा विचारविनिमय करण्यासाठी कॉंग्रेसने एक हिंदी गोलमेज परिषद बोलावून वाटाघाटी करावयास पाहिजे होत्या. हे करण्याच्या ऐवजी कॉंग्रेसने इतर पक्षाला डावलले आणि आपल्याच हाती सत्ता असावी असा दावा सुरू केला. कॉंग्रेसचा हा दुराग्रह आम्ही कबूल करणार नाही. कॉंग्रेसपासून अलिप्त राहाण्यासंबंधीच माझा तुम्हाला सल्ला आहे.

आज सकाळी एक गृहस्थ माझ्याकडे आला आणि म्हणाला, आम्हाला सर्वस्वी स्पृश्यांच्या मदतीवर अवलंबून राहावे लागत असल्यामुळे आम्ही जर त्यांच्याविरूद्ध काही तक्रार केली तर ती तक्रार देखील ऐकून घेण्याला स्पृश्य अधिकारी तयार नसतो तेव्हा या गोष्टीला आम्ही काय करावे. तेव्हा मी म्हणतो, हे जरी खरे असले तरी मी तुम्हाला असे विचारतो की, शेळी होऊन अशा प्रकारचे आयुष्य किती दिवस आणखी कंठणार ? कधी ना कधी तरी अन्यायाविरूद्ध तोंड काढावे लागणार नाही काय ? आपण जर या अन्यायाचा प्रतिबंधच केला नाही तर आपला उद्धार होणे शक्य तरी आहे काय ? मी तुम्हासमोर कोट, बूट, पाटलोण घालून उभा आहे. माझ्या हातात सोन्याचे घड्याळ आहे. मी स्वच्छ आहे. मला महार म्हणण्याची कोणाची ताकद आहे काय ? तरी पण मी महार आहे (हंशा). ही स्थिती प्राप्त करून घेण्यासाठी मी जर कच खाल्ली असती तर ही स्थिती प्राप्त झाली असती का ? माझ्या हातात सोन्याचे घड्याळ दिसते ते दिसले असते काय ? (हंशा) तेव्हा सांगण्याचा मतलब हा की, अन्यायांच्या विरूद्ध तुम्ही लोकांनी 'जशास तसेच' या न्यायाने प्रतिकार करायला शिकले पाहिजे. कर्तव्याला जागरूक रहा. तेव्हा मला तुम्हाला शेवटी इतकेच सांगावयाचे आहे की, यापुढचा काळ अत्यंत आणीबाणीचा आहे. त्या करता आपण आपली तयारी भक्कम पायावर केली पाहिजे आणि आपल्या फेडरेशनच्या सर्वच उमेदवारांना प्रचंड मतांनी निवडून द्यावयाला पाहिजे. हिंदुस्थान सरकारने, प्रांतिक विधीमंडळामध्ये निवडून आलेल्या प्रतिनिधींमधून घटना समिती निवडली जाणार असल्याची घोषणा केली आहे. या समितीकडून तयार होईल ती घटना बऱ्याच वर्षाकरिता अस्तित्वात राहिल, कदाचित ती कायमसुद्धा होईल. कॉंग्रेसने आपल्या काही जागा पटकाविल्या तर आपले नुकसान होईल आणि म्हणून आपणाला स्वतंत्र ध्येय गाठता येणार नाही. त्याकरिता अहोरात्र प्रयत्न करुन आपल्या सर्व जागा काबीज केल्या पाहिजेत. इतका तुम्हाला आदेश देऊन मी माझे भाषण संपवितो.

● ● ●

## २३०

# कम्युनिस्टांपासून सावध रहा

' डी. एल. पाटील, अध्यक्ष, एच. डी. आवळे, ज. सेक्रेटरी, आर. व्ही. कवाडे, सेक्रेटरी, सिताराम हाडके, कोषाध्यक्ष. ऑफीस––मध्यप्रांत-वऱ्हाड शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन, अभ्यंकर रोड, सिताबर्डी, नागपूर ', यांनी पुढील पत्रक काढले होते.

' नागपूरला ता. १२ डिसेंबर १९४५ रोजी सायंकाळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जाहीर व्याख्यान होईल. आगामी निवडणुकीच्या संबंधात डॉ. बाबासाहेब आंबेडकर अस्पृश्य जनतेला उद्देशून जाहीर दिव्य संदेश देणार आहेत.

हा दिव्य संदेश ऐकण्याकरिता अस्पृश्य बंधु-भगिनींनो ! हजारो नी लाखाच्या जमावात या सभेला हजर व्हा !

फेडरेशनच्या निवडणुकी लढविण्याकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना थैली अर्पण करण्यात येईल. या कार्याला सर्व बंधू-भगिनींनी व जिल्ह्या-जिल्ह्यातील फेडरेशनच्या कार्यकर्त्यांनी पूर्ण सहाय्य द्यावे अशी विनंती आहे. त्याबरोबरच त्यांना सर्व लहान मोठ्या खेड्यापाड्यातून सभेला फार मोठ्या जमावात लोकांनी हजर राहाण्याकरिता प्रचार करावा.

सभेच्या कार्यक्रमाला तिकीटे ठेवली आहेत. जे फेडरेशनचे १९४५-४६ चे चार आण्याचे प्राथमिक सभासद होतील त्यांनाच सभेच्या कार्यक्रमाची तिकीटे मिळतील. खुर्ची १ ला वर्ग ३ रुपये, खुर्ची २ रा वर्ग २ रुपये, प्रेक्षक ८ आणे, महिला ४ आणे. तिकीटे फेडरेशनच्या ऑफिसमध्ये मिळतील. '

याप्रमाणे नागपूर येथे ता. १२ डिसेंबर १९४५ रोजी भरलेल्या प्रचंड सभेत जवळ जवळ एक लाख लोक होते. त्यामध्ये स्त्रियाही बहुसंख्येने उपस्थित होत्या. आतापर्यंतच्या निवडणूक प्रचारार्थ झालेल्या सर्व सभांमध्ये ही सभा प्रचंड होती.

संध्याकाळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर रायपूरहून येथे आले , त्यावेळी त्यांचे स्वागतासाठी स्टेशनवर फार मोठा जनसमुदाय जमला होता. स्टेशनपासून कस्तुरचंद पार्कपर्यंत हजारो लोकांची दुतर्फा रांग लागली होती व त्याची व्यवस्थाही समता सैनिक दलाने चांगली राखली होती.

---

जनता : ८ आणि २२ डिसेंबर १९४५.

त्यांच्या ह्या दौऱ्यातील ही शेवटची सभा होती. येथे येण्यापूर्वी ते वऱ्हाडमध्ये अकोला व महाकौशलमध्ये रायपूर शहरी जाऊन आले.

भाषणाच्या सुरुवातीलाच डॉ. बाबासाहेबांनी सर्व पक्षांनाच स्वराज्य पाहिजे आहे असे सांगितले. ते म्हणाले,

मतभेद फक्त एकाच मुद्यावर आहे आणि तो म्हणजे ब्रिटिशांनी हिंदुस्थान सोडल्यावर येथे कोणी राज्य करावयाचे या मुद्यावर. कॉंग्रेसचे पुढारी सांगतात की, कॉंग्रेसखेरीज इतर पक्षांना स्वराज्य नको आहे, पण ही गोष्ट धादांत खोटी आहे.

मी आपणा सर्व दलितवर्गीयांच्या वतीने सर्वांना असे बजावित आहे की, यापुढे होणाऱ्या हिंदुस्थान सरकारमध्ये अस्पृश्यांना दुय्यम स्थान दिल्यास ते कधीही सहन केले जाणार नाही. आम्हाला आमचे राजकीय हक्क मिळालेच पाहिजेत आणि ते मिळविण्यासाठी लढण्याचा आम्ही निश्चय केला आहे.

गेल्या वीस वर्षात आमच्यासारखा अल्पसंख्यांकांचा विश्वास पैदा करण्यासाठी कॉंग्रेसने कोणताही प्रयत्न केलेला नाही. कॉंग्रेस ही स्वतःला देशाची प्रतिनिधी म्हणविते, परंतु हे खरे नसून लोकांचा पाठिंबा मिळविण्यासाठी कॉंग्रेस पुढारी असे सांगून मुद्दाम लोकांची दिशाभूल करीत आहेत.

उदाहरणार्थ, सर्व अस्पृश्य समाज हा कॉंग्रेसच्या पाठीमागे नसून ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्याच पाठीमागे आहे. ब्रिटिशांनी हिंदुस्थान देश सोडल्यानंतर मध्यवर्ती सरकारात कोणाला कोणते व किती स्थान असावे यासंबंधीचे मतभेद मिटविण्यासाठी कॉंग्रेसने सर्व अल्पसंख्य पक्षांच्या पुढाऱ्यांची एक परिषद भरवून सर्वांच्या मनातील अविश्वास दूर करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावयाला हवा होता, पण त्याऐवजी कॉंग्रेसने देशातील इतर पक्ष जणू अस्तित्वात नाहीत अशा आविर्भावाने सर्व सत्ता आपल्या ताब्यात दिली जावी असे सांगितले.

मी सर्वांना माझ्या अस्पृश्य समाजाच्या वतीने असे सांगतो की कॉंग्रेसला आमचे प्रतिनिधीत्व करण्याचा कोणताही हक्क नाही आणि माझे तुम्हा सर्व ज्ञातिबांधवांना असे कळकळीचे सांगणे आहे की, आपण आपला पक्ष स्वतंत्र राजकीय पक्ष म्हणून संघटित करून आपल्या रास्त राजकीय हक्कासाठी झगडत राहिल्यानेच आपले कल्याण होणार आहे.

येत्या निवडणुकी त्यादृष्टीने फार महत्त्वाच्या आहेत. त्यासाठी येत्या निवडणुकीमध्ये आपणासाठी राखून ठेवलेल्या चौदाही जागांवर शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे उमेदवार निवडून येतील अशी काळजी घ्या. आपल्या हाती सत्ता आल्याशिवाय राज्यकारभारात आपल्या म्हणण्याला महत्त्व राहणार नाही. सर्व कष्ट सहन करा, निर्भय बना, हीनगंड झाडून टाका आणि आपल्या देशाच्या राज्यकारभारात आपल्याला योग्य वाटा मिळालाच पाहिजे, असा आग्रह धरा.

येत्या निवडणुकी ह्या आपल्या समाजाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या आहेत. आपल्याला जर आपली प्रगती करावयाची असेल तर आपल्याला राजकीय सत्ता मिळविलीच पाहिजे. आपल्या राजकीय हक्कासंबंधी आपण कोणती आकांक्षा बाळगावी हे आम्हाला कोणताही राजकीय पक्ष सांगू शकत नाही किंवा कोणतीही राजकीय सत्ता आम्हाला त्या बाबतीत माघार घेण्यास भाग पाडू शकणार नाही आणि मला खात्री आहे की, यापुढे कोणी पुढारी अस्पृश्यांना दुय्यम स्थान देऊ पाहील तर ती गोष्ट आम्ही कधीही सहन करणार नाही.

ज्याप्रमाणे अल्पसंख्यांकांचा विश्वास कॉंग्रेसला संपादन करता आलेला नाही, त्याचप्रमाणे सवर्ण हिंदुंवरही कॉंग्रेसचा विशेष प्रभाव आहे असे नाही. गांधींच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेसने चालविलेल्या अस्पृश्यता नष्ट करण्याच्या व मंदीरप्रवेशाच्या चळवळीमध्ये कॉंग्रेसला संपूर्ण अपयश आलेले आहे. त्यांच्या चळवळीचा काहीही परिणाम झालेला दिसत नाही. मी नुकताच जगन्नाथपुरी येथे गेलो होतो. तेथील जगन्नाथाचे देवालय मला बाहेरूनच बघावे लागले. त्या देवालयाच्या आत जाऊन मला जगन्नाथाची मूर्ती पाहता आली नाही. यावरून लक्षात येईल की, आपले हक्क मिळविण्यासाठी आपल्याला आपल्याच संघटनेवर भिस्त ठेवली पाहिजे आणि शेकडो वर्षे हिंदुंकडून सोसलेल्या कष्टातून आपली मुक्तता करून घेतली पाहिजे.

कम्युनिस्ट पक्षापासून सावध रहा असे माझे तुम्हाला सांगणे आहे. कारण गेल्या काही वर्षातील त्यांच्या कृत्यावरून ते कामगारांचे अहित करीत आहेत, किंबहुना ते त्यांचे शत्रु आहेत अशी माझी खात्री झाली आहे. कॉंग्रेस भांडवलवाल्यांची संस्था आहे असे कम्युनिस्ट सांगतात आणि त्याच वेळी कामगारांना तीत प्रविष्ठ होण्याचा उपदेश करतात! हिंदुस्थानातील कम्युनिस्टांना त्यांचे असे काही धोरणच नाही, त्यांना सर्व स्फूर्ति रशियातून मिळते.

भारतीय कामगारांसाठी कम्युनिस्टांना, ते सांगतात त्याप्रमाणे खरोखरीच जिव्हाळा वाटतो काय ? तसे असते तर त्यांनी भारतीय कामगारांचा एक स्वतंत्र राजकीय पक्ष संघटीत केला असता. आतापर्यंत करीत आले तसे काँग्रेसला मिळा असा कामगारांना उपदेश करीत बसले नसते.

त्यांना आता काँग्रेसने हाकलले असल्यामुळे ते आता आपल्यात शिरून आपले उपद्व्याप सुरू करू लागले आहेत. म्हणून माझे तुम्हाला असे सांगणे आहे की, कम्युनिस्टांपासून अलिप्त राहा आणि त्यांना आपल्या शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचा उपयोग त्यांच्या प्रचारासाठी करू देऊ नका.

शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन हीच भारतीय अस्पृश्यांची खरी प्रतिनिधी आहे. तिचा जोर आपल्या प्रांतात वाढतो आहे, हे या ठिकाणी भरलेल्या प्रचंड जमावाने सिद्ध झाले आहे. आपण माझे भाषण इतक्या शांततेने ऐकत आहात त्याबद्दल मला आनंद होत असून ज्या शेकडो स्वयंसेवकांनी येथील व्यवस्था राखली आहे, त्यांना माझे धन्यवाद आहेत. सर्व तरुणांना त्यांनी फेडरेशनला मिळावे व येत्या निवडणुकीत निर्वेतन काम करण्यासाठी बहुसंख्येने पुढे यावे अशी माझी विनंती आहे.

आपण अशीच साथ द्याल तर भारताच्या कारभारात आपल्याला आपला रास्त वाटा मिळालेला पाहण्याचे दिवस फार लांब नाहीत.

डॉ. बाबासाहेबांच्या भाषणानंतर त्या अफाट जनसमुदायाने हर्षोत्फुल्ल अंतःकरणाने ' जयभीम ' जयघोषाचा जयजयकार केला.



## २३१

# अस्पृश्य समाजाने निवडणुकीत फार जागरुक राहिले पाहिजे

डॉ. बाबासाहेब आंबेडकर रविवार दिनांक २३ डिसेंबर १९४५ रोजी दुपारी १.३० वाजता मुंबईहून ' मद्रास एक्स्प्रेस ' ने मद्रास प्रांताच्या दौऱ्यावर गेले. दुसरे दिवशी सायंकाळी मद्रास स्टेशनवर पोहचले. डॉ. बाबासाहेबांचे समवेत श्री. पी. एन. राजभोज, जनरल सेक्रेटरी, ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन, हेही होते. मद्रास स्टेशनात हजारो अस्पृश्य बंधुंनी डॉ. बाबासाहेबांचे हर्षोत्फुल्ल अंतःकरणानी अपूर्व स्वागत केले. मद्रास कार्पोरेशनचे मेयर व ऑल इंडिया शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनचे अध्यक्ष रा. ब. एन. शिवराज यांनी मद्रास प्रांतातर्फे डॉ. बाबासाहेबांचा सत्कार केला. समता सैनिक दलाच्या शेकडो सैनिकांनी डॉ. बाबासाहेबांस ' गार्ड ऑफ ऑनर दिला '. 'आंबेडकर जयघोषांनी', सर्व वातावरण दुमदुमून गेले. ' पूना कराराचा धिक्कार असो ' अशा घोषणा पुकारण्यात आल्या. डॉ. बाबासाहेबांच्या आगमनाने मद्रास प्रांतात नवचैतन्य निर्माण झाले.

तारीख २५ डिसेंबर १९४५ रोजी मद्रास येथे अस्पृश्य वर्गाच्या विराट सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे ' येत्या निवडणुकी व अस्पृश्य समाजाचे कर्तव्य ' या विषयी मननीय व उद्‌बोधक भाषण झाले. आपल्या भाषणात डॉ. बाबासाहेब म्हणाले,

लौकरच होणाऱ्या प्रांतीय निवडणुकी अत्यंत महत्त्वाच्या आहेत कारण यावेळी जे निवडून येतील त्यांच्या हातात हिंदुस्थानची भावी राज्यघटना बनविण्याचा अधिकार जाणार आहे. त्यासाठी अस्पृश्य समाजाने या निवडणुकीत फार जागरूक राहिले पाहिजे. कुणाच्या व कसल्याही प्रचाराला व आमिषांना बळी न पडता आपले खरोखरीचे हित पाहतील असेच प्रतिनिधी निवडून देणे हे अस्पृश्यांचे आजचे कर्तव्य आहे. ब्रिटिश हिंदुस्थानात आपला समाज ६ कोटीवर असून गेली दोन हजार वर्षे इतरांनी आपणास सर्व प्रकारे वाईट अवस्थेत ठेवलेले आहे. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशन ही आपली एकमेव संस्थाच आपणास या गर्तेतून वर काढू शकेल. ' काँग्रेस म्हणजे स्वराज्य ' या फसव्या घोषणांनी भुलून जाऊ नका. स्वराज्य असले तरी त्यात आम्हा अस्पृश्यांना किती भाग मिळेल हाच मुख्य प्रश्न आहे.

---

जनता : २९ डिसेंबर १९४५.

काँग्रेसचा निवडणुकीचा जाहीरनामा म्हणजे शुद्ध थोतांड आहे, ढोंग आहे. या जाहीरनाम्यात काँग्रेसने कामगारांना व शेतकऱ्यांना कोणते फायदे मिळवून देण्याचा विचार केला आहे त्याची जंत्री दिली आहे. परंतु त्यामध्ये अस्पृश्यांचे हक्कांचा नामनिर्देश सुद्धा नाही.

काँग्रेसकडून एकच गोष्ट शिकण्यासारखी आहे व ती म्हणजे त्यांच्या पक्षाची शिस्त. आपण सर्व जण पोलादी शिस्तीत शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या झेंड्याखाली उभे राहाल तर आपली उन्नती निश्चित होईल.



# २३२

# आपले ध्येय साकार करण्यासाठी फेडरेशनला अपूर्व विजय मिळवून द्या

तारीख २७ डिसेंबर १९४५ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वागताप्रित्यर्थ कोईम्बतूरमधील आबालवृद्ध अस्पृश्य समाज स्टेशनवर अवाढव्य संख्येत गोळा झालेला होता. डॉ. बाबासाहेब स्टेशनातून बाहेर पडताच ' जयभीम ' च्या गगनभेदी घोषणांनी दक्षिण हिन्दुस्थान देखील डॉ. बाबासाहेबांच्या दर्शनासाठी सदैव उत्सुक असतो याची अस्पृश्येतरांना साक्ष पटवून दिली. शेड्यूल्ड कास्ट्स् फेडरेशनच्या स्थानिक शाखेच्या विद्यमाने झालेल्या या सभेतील अस्पृश्यांच्या अफाट जनसमुदायासमोर भाषण करताना डॉ. बाबासाहेब म्हणाले,

आगामी निवडणुकीतून निवडून येणाऱ्यांच्याकडून हिन्दुस्थानची घटना बनविली जाणार असल्यामुळे या निवडणुकीला अत्यंत महत्त्व आहे. यात मुख्यत्वेकरून दोनच पक्षांचा झगडा आहे. एक आपले शेडयूल्ड कास्ट्स् फेडरेशन आणि दुसरी कॉंग्रेस आणि तुम्ही सर्वांनी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे की, येथे ब्राह्मणेतर पक्ष मोडकळीस आल्यामुळे कॉंग्रेसकडून आपल्याला जोराचा विरोध होईल. १९३७ मध्ये ब्राह्मणांनी आपले वर्चस्व गाजवून मंत्रिमंडळ हस्तगत केले.'' ब्राह्मण-ब्राह्मणेतर पक्षासंबंधी बोलताना श्री. राजगोपालाचारी आणि श्री. कामराज नादर यांच्यात चालू असलेल्या वादाचा निर्देष केला आणि असेही म्हणाले की, कॉंग्रेसला निवडणुकीत बहुमत मिळून राजगोपालाचारीला मंत्रिमंडळ बनविण्याचा अधिकार प्राप्त झाला तर श्री. नादर याला ते जेलची हवा खायला लावतील. पुढे बोलताना बाबासाहेबांनी सांगितले की, '' आम्हाला [अस्पृश्यांना] काय पाहिजे ? आम्हाला कायदेमंडळात व अधिकाऱ्यांच्या जागांबाबतीत ठराविक प्रमाणात प्रतिनिधीत्व पाहिजे, शिक्षणाकरिता पुरेसा पैसा पाहिजे आणि शेतीभातीसाठी गरजेपुरती जमीन पाहिजे. अस्पृश्यांच्या भवितव्याची काळजी दूर करण्यासाठी या गोष्टींची जास्त आवश्यकता आहे. या गोष्टी मिळविण्यासाठी राजकीय अधिकार काबीज करणे जरुर आहे. म्हणूनच मी तुम्हाला सांगतो की, तुम्ही सर्वांनी या निवडणुकीत आपल्या फेडरेशनच्याच

---

जनता : २९ डिसेंबर १९४५.

उमेदवारांना निवडून दिले पाहिजे. तुम्हा सर्व लोकांनी असा निर्धार केला पाहिजे की, याउपर आम्ही कोणाचेही वर्चस्व स्वतःवर लादून घेणार नाही. आमच्यावर कोणीही राज्य करता कामा नये. आम्ही शासनकर्ते होणार आहोत आणि याच निर्धारानुसार वागून आपल्या फेडरेशनला अपूर्व विजय मिळवून दिलात तर आपले ध्येय आपण लवकरच हस्तगत करू.



# सूची

सूचीकार : डॉ. गंगाधर पानतावणे

## विषय सूची

### अ ते अं

## विषय सूची--चालू

## विषय सूची—चालू

## विषय सूची—–चालू

### ट



### ठ



### ड



### त



### द



### ध



### न



### प

## विषय सूची--चालू

## विषय सूची—-चालू

### भ



### म

## विषय सूची--चालू

## विषय सूची——चालू

## विषय सूची--चालू

## विषय सूची---चालू

## विषय सूची--चालू

# व्यक्तिनाम सूची

## अ ते अं



## क

## व्यक्तिनाम सूची--चालू

## व्यक्तिनाम सूची--चालू

### घ



### च



### ज



### ट



### ठ



### ड

## व्यक्तिनाम सूची--चालू

## व्यक्तिनाम सूची--चालू

## व्यक्तिनाम सूची---चालू

## व्यक्तिनाम सूची--चालू

### र



### ल



### व

## व्यक्तिनाम सूची--चालू

### श



### स



### ह



### ज्ञ

# स्थळ सूची

## अ ते अं



## क

## स्थळ सूची--चालू

## स्थळ सूची--चालू

### द



### ध



### न



### प



### फ

## स्थळ सूची—चालू

### ब



### भ



### म



### य

## स्थळ सूची--चालू

### र



### ल



### व



### श



### स



### ह

## जाती/समाज सूची

## जाती/समाज सूची--चालू



❁ ❁ ❁

**Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES**

**Vol. 13**
*Pages 1240, Rs. 190.00*
Dr. Ambedkar as the Principal Architect of the Constitution of India.
1st Edi. 1994.

**Vol. 14 in Two parts**
*Pages 1385, Rs. 200.00 (Overseas $ 20.00)*
Dr. Ambedkar and the Hindu Code Bill.
1st Edi. 1995.

**Vol. 15**
*Pages 1110, Rs. 110.00 (Overseas $ 10.00)*
Dr. Ambedkar as Free India's First Law Minister and Member of Opposition in Indian Parliament
(1947 to 1956).
1st Edi. 1997.

**Vol. 16**
*Pages 752, Rs. 75.00 (Overseas $ 10.00)*
Dr. Ambedkar's (i) The Pali Grammar
(ii) The Pali Dictionary-
(a) Pali into English
(b) Pali into English, Marathi, Hindi and Gujarathi.
(iii) Bouddha Pooja Path.
1st Edi. 1998, 2nd Edi. 2015, 3rd Edi. 2016.

**Vol. 17 in Three Parts**
*Pages1606, Rs. 375.00*
Dr. Babasaheb Ambedkar and his Egalitarian Revolution
1st Edi. 2003.

**Vol. 18 in Three Parts**
*Pages1779, Rs. 300.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची भाषणे (भाग १ ते ३)
1st Edi. 2003.

**Vol. 19 (Marathi)**
*Pages 639, Rs. 200.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता.
1st Edi. 2005.

**Vol. 20**
*Pages 663, Rs. 200.00*
डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता.
1st Edi. 2005.

**Vol. 21**
*Pages 434, Rs. 225.00*
Correspondence
1st Edi. 2006.

**Vol. 22 in Two Parts**
*Pages 212, Rs.*
Photo Biography (English) & चित्रमय चरित्र (मराठी)
1st Edi. 2010.

**Other Published Volumes (Source Material)**
Source Material on Dr. Babasaheb Ambedkar and the Movement of the untouchables.
Vol. 1: Pages 468, Rs. 10.00 (Out of Print)
1st Edi.

**Vol. 2:** *(मराठी)*
*पृष्ठे ५००, मूल्य रू. ७५.००*
डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारत मूकनायक.
1st Edi. 1990, 2nd Edi. 2008.

---

**Special issue on the occasion of Diamond Jubilee (1936 -2012) of the book.**
**Annihilation of Caste**
*Pages 98, Rs. 15.00*
1st Edi. 14 Apr. 2013, 2nd Edi. 2016.

**जातीव्यवस्थेचे निर्मूलन**
*पृष्ठे ९०, मुल्य १५.००*
प्रथम आवृत्ती २०१५, द्वितीय आवृत्ती २०१६.

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबद्दल अस्पृश्यांना फारशी आस्था नाही, अशा प्रकारचा खोडसाळ, निंद्य व दुष्ट प्रचार कॉंग्रेस व राष्ट्रीय वर्तमानपत्रांकडून केला जातो. आपण राष्ट्रविरोधी, देशबुडवे आहोत अशाही प्रकारचे हल्ले आपणावर करण्यात येतात. अस्पृश्यांना माणुसकी पाहिजे, समता पाहिजे. त्यांना इतरांबरोबर राजकीय दर्जा पाहिजे. ती या देशात शासनकर्ती जमात बनली पाहिजे, याकरिता आपली चाललेली चळवळ जर देशबुडवी आहे असे त्यांना म्हणावयाचे असेल तर त्यांच्या या करणीबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. अस्पृश्यांना इतर कुठल्याही जमातीपेक्षा स्वातंत्र्याविषयी कमी आस्था नाही, उलट ती अधिक आहे. परंतु देशाच्या स्वातंत्र्याबरोबर स्वत:च्या समाजाचेही स्वातंत्र्य आम्हाला हवे आहे. – (पृ. क्र. ४५२-४५३)

— डॉ. बाबासाहेब आंबेडकर